# निवेदन

महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभेने नेमलेल्या समग्र सावरकर वाङ्मय प्रकाशन समितीच्या वतीने प्रसिद्ध करण्यात येत असलेल्या समग्र सावरकर वाङ्मयाचा हा आठवा आणि 'तूर्त तरी' शेवटचा खंड आहे. 'तूर्त तरी' म्हणण्याचें कारण असें की येवढ्याने स्वातंत्र्यवीर सावरकरांचा वाङ्मयोदधि संपला आहे असें मुळीच नाही. अद्यापिही त्याचें काही वाङ्मय खंडरूपाने प्रसिद्ध करण्यासारखें शिल्लक असून त्यात अजूनही नित्य नवी भर पडत आहे. तथापि पुढील खंडाचा प्रश्न तूर्त थोड्या कालावधीवर सोडून व योजिलेले सावरकर वाङ्मय प्रकाशनाचें हें कार्य आटोपतें घेऊन आम्ही येथे अर्धविराम करीत आहो.

या आठव्या खंडात मॅझिनीच्या आत्मचरित्राला सावरकरांनी १९०६ वर्षी लिहिलेली, क्रांतिकार्याचें बीज असलेली व त्या काळी फार गाजलेली प्रस्तावना दिली आहे; व त्यानंतर सावरकरांनी मूळ मराठीत लिहिलेला, परंतु मूळ स्वरूपात आजपर्यंत कधीच प्रसिद्ध न झालेला 'अठराशे सत्तावनचें भारतीय स्वातंत्र्यसमर' हा अैतिहासिक ग्रंथ दिला आहे.

हा ग्रंथ मुळात जसा अेक वस्तुस्थिति कथन करणारा अितिहास आहे, त्याच प्रमाणे या ग्रंथाच्या जीवनाचाही अेक अितिहासच झालेला आहे. हा ग्रंथ मुळात जसा अलौकिक, तसाच तो अपूर्व असून विशिष्ट परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्याची अभूतपूर्वताही सिद्ध झाली आहे.

हा ग्रंथ लिहिण्याचा सावरकरांचा अुद्देश क्रांति घडवून आणणें हाच होता. भारतमाता स्वतंत्र करण्यासाठी जनतेत अुठावणी करणें, व क्रांतिकार्याची पद्धतशीर संघटना करून यशस्वी स्वातंत्र्यसंग्राम घडवून आणणें यासाठी त्यांचा प्रयत्न होता. पण असा प्रचार ब्रिटिश राजवट अुघड रीतीने करू देणें शक्य नसल्याने व १८५७-चें भारतीय स्वातंत्र्यसमर हें अगदी या मार्गाचें यथार्थदर्शन घडविणारें असल्याने या स्वातंत्र्यसमराचा अितिहास निवेदन करण्याकरिता व या समरातील योद्ध्यांच्या मुखाने आपले विचार व कार्याची दिशा जनतेस सांगण्यासाठी त्यांनी हा १८५७-चा क्रांतिकारक अितिहासग्रंथ लिहिला.

'अठराशे सत्तावनचें भारतीय स्वातंत्र्यसमर' हा ग्रंथ सावरकरांनी १९०७ वर्षी विलायतेत असताना मुळात मराठीत लिहिला होता. अभिनव भारत या संस्थेच्या वतीने प्रसिद्ध करण्यासाठी तो त्यांनी भारतात पाठविला; परंतु सावरकरांच्या अेकंदर दाहक चळवळीची धग ब्रिटिश सरकारला आधीच लागलेली असल्याने ह्या ग्रंथाच्या नावावर ब्रिटिश सरकारचे भारतीय गुप्तहेर होतेच. दहशती

धाक व जप्त्यांचें सत्र याच्या साहाय्याने पोलिसांनी असें वातावरण निर्माण केलें कीं, हा ग्रंथ भारतात छापणे अशक्यच झालें. अखेर तो जगाच्या तगा सावरकरांकडे परत पाठविला गेला. तेव्हा युरोपात हा ग्रंथ कोठे छापता येईल का याचाही विचार झाला. संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या निमित्ताने देवनागरी टाईप जर्मनीत आणलेले होते; परंतु मराठी ग्रंथ तेथे छापून घेणे अशक्यप्राय आहे असें जेव्हा आढळून आले, तेव्हा या मूळ मराठी ग्रंथाचें अिंग्रजी भाषांतर करून तें प्रसिद्ध करण्याचें ठरलें.

त्याप्रमाणे आय. सी. अेस. परीक्षेसाठी विलायतेस गेलेले व अभिनव भारत संघटनेचे घटक असलेले अितर विद्वान् तरुण भाषांतराच्या कार्यास बसले व त्यांनी अल्प कालावधीत त्याचें अिंग्रजी भाषांतर तयार केलें. हें भाषांतर चालू असताना या पुस्तकाच्या मूळ मराठी हस्तलिखितातील काही चार आठ पानें गुप्त हेरांच्या हाती लागलीं व तितावरून मालाची परीक्षा या न्यायाने त्या पानांतील मजकुराच्या दाहकतेवरून सबंध ग्रंथ कसा जाज्वल्य नि भयंकर असला पाहिजे याची ब्रिटिश सरकारला कल्पना येअून त्यांनी हें भाषांतर प्रसिद्ध होण्यापूर्वीच हा ग्रंथ जप्त केल्याचें प्रसिद्ध करून टाकलें.

सरकारचें हे धोरण नियमबाह्य होतें. सावरकरांनी सरकारच्या या धोरणाविरुद्ध खूप तक्रार केली. ग्रंथाचें हस्तलिखित जर सरकारजवळ असलें तर सरकारने तें सावरकरांचे आहे हें सिद्ध करून हवें तर त्यांजवर खटला भरावा; पण जर सरकारजवळ काहीच पुरावा नसला तर सरकारचें हें कृत्य केवळ जुलमी आहे असेंच ठरेल असें म्हणणें त्यानी मांडलें व वर्तमान पत्रातूनही त्यावर पुष्कळच टीका झाली. लंडन टािअिम्स पत्रानेही सावरकरांचे म्हणणे अुचलून धरून व सरकारच्या धोरणास गैर ठरवून ठपका दिला. पण सरकारने जें करावयाचें ठरविलें होतें तें करून टाकलें होतें; व आपल्या धोरणात बदल करण्याचा त्याचा मुळीच विचार नव्हता.

अशा स्थितीत हा भाषांतरित ग्रंथ विलायतेत कोणी छापील अशी शक्यता अुरली नाही. फ्रान्समध्येही कोणी तयार होअीना. शेवटी हॉलंडमधील अेक मुद्रक तयार झाला व त्याने हा ग्रंथ छापून दिला. तेव्हा त्याच्या शेकडोशे प्रती वेगवेगळ्या पुस्तकांच्या नावाखाली भारतात गुप्त रीतीने प्रथम पाठविण्यात आल्या. त्यात अेक पेटीभर पुस्तकें श्री. सिकंदर हयातखान (हेच सर सिकंदर हयातखान पुढे पंजाबचे मुख्यमंत्री म्हणून कित्येक वर्षे होते.) यांनी आपल्या बरोबरच्या सामानात दडवून आणलेलीं होतीं.

अशा रीतीने या पुस्तकाच्या बऱ्याच प्रती भारतात रवाना केल्यानंतर या ग्रंथाचें फ्रान्समध्ये अधिकृतपणे प्रकाशन करण्यात आलें व त्याच्या शेकडोशे प्रती युरोप खंडात, अिंग्लंडात, अमेरिकेत, जगभर पसरल्या. त्या वेळी हा ग्रंथ राजकीय चर्चेचा अेक विषयच होअून राहिला होता.

या वेळी सावरकर फ्रान्समध्ये होते. त्याचा मूळ मराठी ग्रंथही तेथेच होता. तो नीट जपून ठेवण्यासाठी त्यांनी मॅडम कामा यांच्याजवळ दिला होता. त्यांनीही तो बँक ऑफ फ्रान्समध्ये सुरक्षित ठेविला होता.

पुढे ब्रिटिश सरकारने दडपशाहीचें षड्यंत्र जोरात चालू केलें व भारतात व अन्यत्रही अनेकानेक देशभक्ताना खटले भरून तुरुंगाची, काळया पाण्याची व देहदंडाची अशा शिक्षा दिल्या जाऊ लागल्या. अशा स्थितीत आपण फ्रान्समध्ये नुसतें बसून राहणें योग्य नाही असा मनाशी विचार करून सावरकर फ्रान्सहून विलायतेस परत गेले. ते तेथे जाताच त्यांस अटक करण्यात आली व खुनाच्या कटात गोवून त्यांस भारतात पाठविण्यात आले.

या खटल्याचा अितिहास प्रसिद्धच आहे. फ्रान्सच्या किनाऱ्याजवळ बोट येताच सावरकरांनी बोटीच्या पोर्ट होलमधून समुद्रात अुडी टाकली व ते मार्सेल्स बंदराच्या किनाऱ्याला लागले. तथापि ते फ्रान्सच्या भूमीवर असताही ब्रिटिशांनी फ्रेंच अधिकाऱ्यांची 'समजूत' करून व सावरकराना अटक करून भारतात आणलें. ही अटक आंतरराष्ट्रीय नियमांना सोडून आहे या कारणास्तव कटाच्या खटल्यात भाग घेण्याचें सावरकरानी नाकारलें असताही त्याजवर आरोप शाबीत धरून त्यास अेका मागून अेक भोगावयाच्या पन्नास वर्षांच्या कालावधीची दोन जन्मठेपाची शिक्षा सांगण्यात आली..

सन १९११ ते १९२० पर्यंत सावरकर अंदमान बंदिगृहात होते व तेथून त्यांना भारतातील तुरुंगात १९२४ पर्यंत ठेवण्यात आलें होते. त्या वर्षी त्यांची तुरुंगातून मुक्तता करण्यात येअून त्यास रत्नागिरी जिल्ह्यात स्थानबद्ध करून ठेवण्यात आलें ते १९३७ पर्यंत. त्याही वेळी केवळ दैवयोगाने त्यांची बंधमुक्तता झाली. कॉंग्रेसने निवडणुका जिंकून बहुमत मिळविलें असताही मंत्रिमंडळ बनविण्यास नकार दिला व घटनात्मक शासनात अडथळा निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यावर मात करण्याकरिता सरकारनें साताऱ्याचे सर धनजीशहा कूपर यांना मंत्रिमंडळ बनविण्यास पाचारण केले. या मंत्रिमंडळाचा कारभार चेलण्यासाठी त्यास योग्य अर्थमंत्री हवा होता म्हणून कूपरनी जमनादास मेहता यांना अर्थमंत्री होण्याची गळ घातली. तेव्हा त्यांनी सावरकरांना बिनशर्त बंधमुक्त करण्याची अट घातली. सरकारला ती प्रथम मान्य नव्हती. पण कॉंग्रेसच्या डावावर प्रतिडाव करण्यास तें अुत्सुक होते व अखेर विलायतेपर्यंत तारातारी होअून सावरकरांना संपूर्ण बंधमुक्त करण्यास सरकार तयार झाले.

अशा रीतीने सावरकरांची सुटका होताच त्यांनी हिंदुराष्ट्रस्वातंत्र्यार्थ चळवळ अुभारली. १९३८ मध्ये भागानगर निःशस्त्र प्रतिकाराची सार्वत्रिक अुठावणी त्यांनी केली व १९३९ वर्षी दुसरें महायुद्ध सुरू होताच त्या युद्धकालीन परिस्थितीचा

फायदा घेण्यासाठी स्वातंत्र्यलालसेने भारलेल्या हिंदु तरुणांनी सैन्यात शिरावें अशी चळवळ त्यांनी आरंभिली. तिचा अिष्ट तो परिणाम पुढे कसा झाला तें प्रसिद्ध आहे. तिकडे सावरकरांना १९१० मध्ये अटक झाल्यावर त्यांच्या अभिनव भारत संघटनेचे कार्यकर्ते युरोपभर पसरले व पहिल्या महायुद्धास प्रारंभ होतात त्यांनी गदर चळवळीची अुठावणी केली. अमेरिकेत पंजाबी व शीख लोकांचा भरणा बराच असल्याने त्याच्यात ही स्वातंत्र्याची चळवळ लाला हरदयाळ यांनी सुरू केली. त्यासाठी सावरकरांचें १८५७-चें स्वातंत्र्यसमर या ग्रंथाची दुसरी आवृत्ति त्यांनी तेथे प्रसिद्ध करून त्यावर क्रांतिकार्यासाठी धनही गोळा केलें. त्याचप्रमाणे गदर या वर्तमानपत्राच्या द्वारे त्यांनी प्रचारही चालविला व स्वातंत्र्यसमर या ग्रंथाचे अिंग्रजीत व हिंदीत भागशः अुतारे प्रसिद्ध करण्यात येअू लागले. अशा रीतीने भारतीय स्वातंत्र्य संपादनार्थ तरुणांत स्फूर्ति निर्माण करून क्रांतीची ज्योत पेटविली जात होती व क्रांतिसंघटना यशस्वी करण्यासाठी द्रव्यनिधि गोळा करण्याच्या कामीही या स्वातंत्र्यसमर ग्रंथाचा अुपयोग केला जात होता.

पहिल्या महायुद्धाच्या काळात अभिनव भारत संघटनेच्या नेतृत्वाखाली राष्ट्रस्वातंत्र्यार्थ अुठावणी करण्याची सिद्धता करण्यात आली. स्वयंसैनिक सिद्ध झाले. दारुगोळ्यांनी भरलेलें शस्त्रसज्ज जहाजही तयार करण्यात येअून ते भारताच्या किनाऱ्यापर्यंत आले. सावरकर अंदमानात कैदेत असल्यामुळे त्यांना सोडविण्यासाठी जर्मनीचें अेमडेन जहाजही अंदमानभोवती घिरट्या घालू लागलें परंतु ब्रिटिशांच्या सावधगिरीमुळे ते सर्व प्रयत्न फसले. क्रांतिकारकांचे अेकंदर संघटित सामर्थ्य कमी पडलें. युद्ध अेकाच आघाडीवर चालले होतें. त्यामुळे क्रांतिकारकांनी दीर्घकाळपर्यंत बाहेरून अुठावणी करण्याचा प्रयत्न करूनही त्यांना यश आलें नाही.

पुढे १९२७-च्या सुमारास सरदार भगतसिंग प्रभृतींनी सावरकरांच्या या स्वातंत्र्यसमर ग्रंथाचें गुप्त प्रकाशन दोनदा केलें, व त्या ग्रंथाच्या द्वारे क्रांतिकार्यासाठी निधिही अुभारला. हा गुप्त ग्रंथ दुर्मिळ असल्याने व क्रांतिकार्याची ती केवळ स्फूर्ति असल्याने काही काही वेळा तो तीनतीनशे रुपयांसही क्रांतिभक्तांनी विकत दिला घेतला आहे. अशा रीतीने संपत्ति नि स्फूर्ति अशा दोन्ही गोष्टी या ग्रंथाने पुरविल्या आहेत.

दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर सावरकरांनी सैनिकीकरण कार्याचा पुन्हा जोराने पुरस्कार सुरू केला. या वेळी कांग्रेसनिष्ठ लोकमत विरुद्ध असताही सावरकरांनी सैनिकीकरणाची आघाडी अुघडली. कारण स्वातंत्र्यसंपादनाच्या कार्यात सैनिक संघटनेची अत्यंत आवश्यकता असते व विद्यमान सैन्यातच प्रवेश करून रुजविलेली क्रांतीचीं बीजें मूळ धरून चांगलीं फोफावतात हा सार्वत्रिक अनुभव आहे. अशाच घटनांनी १८५७-चा अितिहास भरलेला आहे. अशा सैनिक संघटनेवर त्यांनी १९३९-च्या दुसऱ्या महायुद्धकाळातही विशेष भर दिला व अखेर तीच स्वातंत्र्यप्राप्तीच्या

कामी अपयोगी पडली. सावरकरांनी सैनिकीकरणाकरिता चालविलेले प्रयत्न किती फलदायी झाले याची नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी मुक्तकंठाने स्तुति गायिली आहे. व स्वातंत्र्यसंपादनाच्या कार्यात सावरकरांनी केलेल्या या महनीय कामगिरीचें ऋणही मानलें आहे. त्याचप्रमाणे ब्रिटिश लोक भारताला स्वातंत्र्य देण्यास कां तयार झाले याचेंही कारण ब्रिटिशांच्या पंतप्रधानानेच भरपार्लमेंटातच अुघडपणे बोलून दाखविलें. अॅटली म्हणाले :

Britain is transferring power due to the fact that the Indian mercenary army is no longer loyal to Britain and Britain cannot afford to have a large British army to hold down India.

(हिंदी पोटभरू सेना ब्रिटिशांशी अेकनिष्ठ राहिली नाही व हिंदुस्थान त्याब्यात राखण्याला पुरेशी मोठी ब्रिटिश सेना ब्रिटन जवळ बाळगू शकत नाही. अशा स्थितीत ब्रिटनला सत्तान्तर करावें लागत आहे.)

राष्ट्रस्वातंत्र्यार्थ सैनिक संघटनेवर भर का होता व अखेर तीच स्वातंत्र्य-संपादनाच्या कार्यास कशी फलदायी ठरली हें यावरून अुघड स्पष्ट होत आहे.

तथापि या सर्व परिस्थितीत सावरकराचा जो मूळ मराठी ग्रंथ तो तसाच पडून होता. मॅडम कामा यांनी तो बँक ऑफ फ्रान्समध्ये सुरक्षित ठेविला होता. तथापि पहिलें महायुद्ध सुरू झालें व फ्रान्सची दाणादाण अुडून पॅरिस शहरही असुरक्षित झालें, तेव्हा सावरकरांचे अेक सहकारी, अभिनव भारत संघटनेचे अेक कार्यकर्ते व मूळचे गोव्याचे रहिवासी डॉ. कुटिनो हे त्या वेळी फ्रान्समध्ये होते व अमेरिकेला स्थायिक होण्यासाठी जाण्यास निघाले होते, त्यानी जाताना हा ग्रंथ आपल्या बरोबर नेला व तेथे तो जपून ठेवला. पुढे भारताच्या स्वातन्त्र्याची प्रभात होअून सर्वच देशभक्त लेखकांचे ग्रंथ जप्तीतून मुक्त करावे अशी लोकांची मागणी सुरू झाली. तेव्हा लोकाग्रहास्तव सरकारने सर्वांचे ग्रंथ बंधमुक्त केले त्यात सावरकरांचेही केले. सावरकरांचा '१८५७-चें भारतीय स्वातन्त्र्यसमर' हा अिंग्रजी ग्रंथ जप्तीतून सोकळा झाल्याची वार्ता जेव्हा डॉ. कुटिनो याना अमेरिकेत समजली, तेव्हा सावरकरांचा मूळ मराठी ग्रंथ त्याचा त्यास परत पाठविण्याचे त्यांनी ठरविले, हा मोठाच सुयोग होय ! डॉ. कुटिनो यांचे स्नेही श्री. रामलाल वाजपेयी हे १९४७-मध्ये भारतास यावयास निघाले असता सावरकराचा हा ग्रंथ त्याचा त्यांस परत देण्यासाठी कुटिनो यानी वाजपेयी यांजजवळ दिला. त्यांची व सावरकरांची पूर्वीची ओळख नव्हती, परंतु त्यांचा डॉ. मुंजे यांच्याशी घनिष्ठ संबंध होता. म्हणून त्यांनी तो ग्रंथ डॉ. मुंजे यांच्याजवळ दिला व त्यांनी तो सावरकरांच्या घरी पोचता केला. अशा रीतीने भारतीय राष्ट्रस्वातन्त्र्यसंपादनार्थ लिहिलेला मूळ मराठी ग्रंथ, त्यांच्या लेखकाप्रमाणेच विवासनाच्या आपत्तीत दीर्घकाळपर्यंत पडून राहिला होता तो स्वातंत्र्य प्रत्यक्षात संपादन होण्याच्या काळापर्यंत! तो जेव्हा मूळ घरी परत आला तो प्रत्यक्ष स्वातंत्र्य घेअूनच!

सावरकरांचा हा मूळ मराठी ग्रंथ आता प्रथमच प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे. महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभेचें हें मोठेंच भाग्य होय! या ग्रंथाचें मूळ हस्तलिखित आता त्याच्या कर्त्याप्रमाणेंच विकलांग झालें आहे. त्याचीं कित्येक पानें फाटलीं आहेत व कागद जीर्ण झाल्यामुळे त्याचे तुकडे पडू लागले आहेत; तथापि अशाही अवस्थेत त्याचें राष्ट्रीय महत्त्व लक्षात घेअून नागनाने त्याचें संरक्षण करण्याची आवश्यकता आहे. अेक संस्मरणीय वस्तु म्हणून तिचें जतन झाले पाहिजे. तें तसें होंअील तेव्हा होवो. हा ग्रंथ मुद्रित करण्यासाठीं त्याची श्री. दातार यांनीं प्रत तयार करुन दिली. काही फाटकीं पानें जुळवून त्यांचा नीट ग्रंथ लावून ती प्रत विण्यात आलीं, व काही हरवलेलीं पानें श्री. बाळाराव सावरकर यांनीं मुळच्याशी जुळतें रफू करुन सांधून दिलें. स्व. सावरकरांना तो ग्रंथ अंकविण्यात आला व कोठे त्रुटि होत्या त्याही पुऱ्या करण्यात आल्या. अशा रीतीने ही मुद्रण प्रत तयार करण्यात आली.

ही प्रत त्याच्या, यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या अिंग्रजी भाषांतराशी ताडून पाहता काही बाबतीत किरकोळ फरक असल्याचें आढळून येअील. भाषांतरापेक्षा मुळात काही ठिकाणी अधिक टीपा असल्याचें आढळून येतें. कोठे भाषांतरात टीपा वेगळ्या न देता मुळाशीच तो मजकूर जोडून घेण्यात आला आहे. अेकदोन परिच्छेद मुळातच मराठीत अुतरावयाचे राहिलेले होते (लेखकाने तशी तेथे सूचनाही लिहिलेली आहे.) ते अिंग्रजी भाषांतरात आले आहेत. त्या जागी त्या भाषांतरावरुन श्री. पटवर्धन यानी जें पुढे मराठी भाषांतर केलें त्यावरुन तो संदर्भगत अुतारा घेतला आहे. परंतु हे सारे फरक केवळ नाममात्र होत. मूळ अिंग्रजी भाषांतर अनेकांनी सामुदायिकपणे केलें असले तरी त्यावर श्री. अय्यर याचा हात फिरलेला होता. तें भाषांतरच अितकें प्रस्फोटक ठरले की, क्रांतिकारकांची हा भाषांतरित ग्रंथच गीता ठरली[1] व त्यानेच अखेरपर्यंत क्रांतिकार्याचें खरे मार्गदर्शन केले[1] या अिंग्रजी भाषांतराचेही पटवर्धनानी सुरेख मराठी भाषांतर केलें आहे पण भाषांतरें किती झालीं तरी तीं भाषांतरेंच! त्यांना मुळाची सर कशी येणार! कुरुक्षेत्रावर विषण्णमनस्क झालेल्या अर्जुनाला भगवान् श्रीकृष्णानी गीता सांगून कार्योद्युक्त केले. ती गीता पुन्हा अेकदा आपणांस सांगावी अशी विनंती अर्जुनाने त्याना नंतर केली असता आता ती मलाही तशी सांगता येणार नाही असें अर्जुनास श्रीकृष्ण म्हणाले. या ग्रंथाची तशीच स्थिति आहे. सावरकरानी मनाच्या अेका विशिष्ट अवस्थेत हा ग्रंथ लिहिला. पुन्हा तसा तो त्यानाही आज सांगता येणार नाही! अितकें त्या ग्रंथाचें असामान्यत्व आहे. मग त्याची दाहकता, त्याची तेजस्विता, त्याची ओजस्विता, त्याची प्रस्फोटक अुत्स्फूर्तता त्याचें मार्गदर्शित्व, त्यातील दिव्य दृष्टि या सर्वांचें अेकात्मस्वरूप अन्यत्र कसें आढळणार ? भाषांतरकर्त्यांचें वैशिष्ट्य हे की त्यांनी हे सर्व गुण त्यात अितक्या प्रमाणावर अुतरविले! हा मूळ ग्रंथ आता मराठी वाङ्मयाचें अेक अमर लेणे होअून राहील यात शंका नाही.

पारतंत्र्याच्या काळात स्वातंत्र्यसंपादन हें जसें अेकमेव ध्येय असतें तसेंच स्वातंत्र्यसंपादनानंतर त्याचें संरक्षण व संवर्धन करीत राहणें हेंही तितकेंच महत्त्वाचें ध्येय सतत बाळगावें लागतें. स्वा. सावरकरांनी स्वातंत्र्यसमर ग्रंथात स्वातंत्र्यसंपादनाचा मार्ग जसा सांगितला आहे त्याचप्रमाणे या संपादित स्वातंत्र्याचें संरक्षण कसें करावें या संबंधानेही त्यांनी भाषणांच्या व लेखांच्या रूपाने मार्गदर्शन केलें आहे. महाराष्ट्र हा भारताचा खड्गहस्त झाला पाहिजे व तो कां झाला पाहिजे त्याचेंही विवेचन या ग्रंथात समाविष्ट केलेल्या त्यांच्या लेखात सापडेल.

भारताचें स्वातंत्र्य संपादित झाल्यानंतर ज्या पुण्यात्म्यांनी व हुतात्म्यांनी या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ १८५७-पासून १९४७-पर्यंत आपल्या प्राणांचे बलिदान दिलें त्या सर्व दिवंगत स्वातंत्र्यवीरांचें पुण्यस्मरण करून त्यांस कृतज्ञतांजलि समर्पण करण्याकरिता व ज्या अभिनव भारत संघटनेने ही स्वातंत्र्याची स्फूर्ति दिली व मार्ग दाखविला, त्या संघटनेचें कालोद्दिष्ट कार्य सिद्धीस गेलें म्हणून त्याची सांगता करण्याकरिता सावरकरांनी १९५२ वर्षी अभिनव भारत सांगता समारंभ पुण्यास घडवून आणला त्या समयी जागोजागचे अभिनव भारताचे विद्यमान सभासद गोळा झाले होते. त्या सर्वांचा सत्कार करण्यात आला व दिवंगत हुतात्म्यांच्या पुण्यस्मरणार्थ अेक वीरस्मृतिस्तंभ अुभारून त्यांस श्रद्धांजलि समर्पण करण्यात आली. या समयी स्वा. सावरकरांचीं जी भाषणें झाली तीं या ग्रंथात समाविष्ट केली आहेत. ती भाषणें म्हणजे त्यांच्या विचारांचा, भावनांचा व जीवितकार्याचा अेक संपूर्ण आढावाच होय असें म्हटलें तर तें योग्य होअील.

सावरकरांनी आपल्या आयुष्याच्या बाल्यावस्थेतच भारतीय स्वातंत्र्याचा बीजमंत्र अुच्चारला, व तो विविध चळवळींच्या व परिस्थितींच्या अवस्था-अवस्थांमधून व टप्प्याटप्प्यावर अुंची घेत घेत अुन्नत होत जाअून अखेर भारतीय राष्ट्रस्वातंत्र्य संपादित झालेलें 'याच देही याच डोळा' पाहण्याचे भाग्य त्यांस लाभलें हें त्यांचें केवढें सुदैव !

सरकारने सावरकरांना दोन जन्मठेपांच्या पन्नास वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा ठोठावली होती; परंतु सावरकर या दोनही जन्मठेपींच्या कालखंडाला पुरून अुरले व ज्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी देह झिजविला तें स्वातंत्र्यही संपादन होअून तें संपूर्णपणे यशस्वी झालें, म्हणून अेका अर्थी मृत्युंजय ठरलेल्या स्वा. सावरकरांचा मृत्युंजय-समारंभ करण्याचें जनतेने ठरविलें व १९६१ वर्षी पुण्यास हा मृत्युंजय समारंभ मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला. त्या समयी त्यांनी केलेलें भाषण असेंच चिरंतन स्वरूपाचें मार्गदर्शन करणारें आहे. त्याचाही या ग्रंथात समावेश करण्यात आला आहे.

आणि त्याहीपेक्षा आपलें जीवितकार्य संपन्न झालें नि संपलेंही याची जाणीव होअून त्यांनी संपूर्ण समाधानाने नुकतेच असे अुद्गार काढले की,

धन्योऽहं ! धन्योऽहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ।
धन्योऽहं ! धन्योऽहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ॥

ही मनाची धारणा केवळ योगियांचीच असू शकते. ती सावरकरांनी अनेक प्रसंगांनी यापूर्वी व्यक्त केली आहे. तीच पुन्हा त्यांनी सह्याद्रीच्या अलीकडच्या (डिसेंबर १९६४ च्या) अंकात व्यक्त केली असून आदर्श वीरजीवनाचा नवा आदर्श त्यांनी दाखवून दिला आहे ! याही लेखाचा यांत संग्रह करण्यात आला आहे.

अशा रीतीने महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभेच्या सावरकर वाङ्मय प्रकाशन समितीकडे सोपविण्यात आलेलें प्रकाशनाचें कार्य हातावेगळें झालें आहे. समग्र सावरकर वाङ्मयांतील नियोजित असलेला हा आठवा स्वातंत्र्यसमराचा खंड १८५७-च्या भारतीय स्वातंत्र्य समराच्या अष्टोत्तरशततमवर्षी दि. १० मे या पुण्यदिवशीच प्रकाशित करण्याचा योग येत आहे हाही सुयोगच होय ! प्रकाशनाच्या या कामी तिला आजपर्यंत अनेकांचें सहकार्य लाभलें याबद्दल प्रत्येकाचा वेगळा ऋणनिर्देश न करतां सर्वांचा मिळून सामुदायिक ऋणनिर्देश करून व प्रकाशन झालें तरी त्याचें पुढचें कार्य अुर्वरित असतेंच त्या कामी सहकार्याची अपेक्षा व्यक्त करून हें लांबलेलें निवेदन संपवितों.

पुणें
वैशाख शु. १० शक १८८७
दि. १० मे १९६५

प्रकाशक



# समर्पण

स्वधर्म नि स्वदेश यांच्या - स्वातंत्र्यासाठी लढत लढत मरणाऱ्या वीरहो, तुमच्या त्या पवित्र स्मृतीला हा कृतज्ञ अितिहास अर्पण असो. देशासाठी लढू निघालेले तुम्ही कोण होतात, तुमचीं नांवें काय होतीं, तुम्हांमध्ये तत्त्वनिष्ठेची दिव्य ज्योति प्रकाशत असता तिला चैतन्य देणारा कोणचा वीरवर धुरीण तिथे तुम्हांस धारातीर्थाचे संकल्प सांगत होता, हें कथन करण्याचें महद्‌भाग्य, जगाच्या कल्याणास्तव अुपकारक कर्मामध्ये देह झिजविणाऱ्या तुम्हां संतांच्या विभूतींचा नामोच्चार अुच्चारण्याचें किंवा लिहिण्याचें महद्‌भाग्य जरी आमच्या नशिबी नाही, तरी तुमच्या वीर्यस्मृतीला हा कृतज्ञ अितिहास अर्पण असो. विजय गेला परंतु तुम्ही स्वकीय यशाला भंगू दिलें नाहीत! विजय गेला पण स्वयशाला उष्णोष्ण रक्ताच्या दोन हजार कारंजांखाली तुम्ही सुस्नात करून निर्मल ठेवलेलें आहात! तुमचें रक्त, ही भूत कालची तिलांजलि – आगामी वीरांची संजीवनी होवो!

लेखक



' लखनौ 'प्रकरणातून

# अनुक्रमणिका

पृष्ठ



## अठराशें सत्तावनचें स्वातंत्र्यसमर



भारतीय राष्ट्रस्वातंत्र्य-संघटनेचे जनक व '१८५७ चें
भारतीय स्वातंत्र्यसमर' या ग्रंथाचे लेखक
स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर

# समग्र सावरकर वाङ्मय

## खंड ८ वा

## स्वातंत्र्यसमर

### मॅझिनीच्या आत्मचरित्राच्या भाषांतराला

## सावरकरांची प्रस्तावना

शास्त्रांचीं प्रमेयें हीं कालदेशांनी मर्यादित नसतात. भूमितीचे सिद्धान्त हे ग्रीसमध्ये जितके सत्य आहेत तितकेच ते हिंदुस्थानातही आहेत व ते युक्लिडच्या काळी जितके यथार्थ होते तितकेच आजही आहेत. मानवी जातीचें विस्तृत क्षेत्र व कालाची अनंतता ध्यानात घेऊन त्याच्या अनुरोधाने बसविलेले जे सिद्धान्त असतात ते सर्व कालीं व सर्व मनुष्यांना सारखेच लागू आहेत. असले सर्वसाधारण सिद्धान्त पठन करणे व त्याचा आपल्या स्वतःचे अुन्नतीसाठी अुपयोग करणे हें अत्यंत आवश्यक आहे. प्रत्येक मनुष्य मागच्या अितिहासाचा व अनुभवाचा फायदा न घेता मनुष्यजातीने आरंभी केलेल्या चुका पुन्हा करू लागल्यास मानवी अुत्क्रांति खुंटली असेच म्हणावे लागेल. मनुष्य जातीने जे प्रश्न सोडवून ठेविले आहेत ते पुन्हा सोडविण्यात काल व्यर्थ घालविण्यापेक्षा त्या प्रश्नाचा कालदेशातीत असणारी अशीं अुत्तरें जीं अनेक तत्त्ववेत्त्यांनी सिद्धान्तरूपाने ग्रथित केलेली आहेत, तीं समजावून घेऊन ज्या प्रश्नाचीं अुत्तरें मनुष्यजातीला अजून मिळाली नाहीत ते प्रश्न सोडविण्यात तो काल घालविणे हेंच श्रेयस्कर आहे. मानवी अुत्क्रांति सुलभ करण्यासाठी तत्त्ववेत्त्यांनी जगाचा आजपर्यंतचा अनुभव व्यर्थ न जाअू देता त्याचें सूक्ष्म परीक्षण करून सर्वव्यापी तत्त्वें सिद्ध केलेली आहेत. ज्योतिषशास्त्र, भूमितिशास्त्र, रसायनशास्त्र वगैरे शास्त्रांचीं आज जी रूपें दिसत आहेत तीं मनुष्याच्या निरनिराळ्या अनुभवावरून सर्वमान्य ठरलेली तत्त्वे संगृहीत केल्यानेच शक्य झालेलीं आहेत. त्या शास्त्रातील तीं सर्वव्यापी तत्त्वे सर्व देशाना व सर्व काली लागू होणारी असल्याने त्याचा फायदा मुद्दाम करून न घेता पुन्हा 'पहिले पाढे पढ पंचावन' करीत बसणे हा मूर्खपणाचा कळस आहे. ही गोष्ट जशी ज्योतिषशास्त्र, भूमितिशास्त्र व रसायनशास्त्र वगैरेंना लागू आहे, तशीच ती

राजकारण शास्त्रालाही लागू आहे. राजकारणशास्त्राची अुत्क्रांति मनुष्याच्या प्रगमनाबरोबरच होत आलेली आहे. राजकारणशास्त्रावरही अितर शास्त्रसत्यां-प्रमाणेच काही तत्त्वें कालदेशाने अमर्यादित अशा महत् सत्यांच्या योग्यतेला पावलेलीं आहेत. त्या सत्यांचें ज्ञान असणें, मनुष्यजातीच्या आजपर्यंतच्या अनुभवाचा फायदा घेणें, भूतकालाच्या यष्टीचा भविष्यन्मार्गगमनास आधार घेणें व 'अिति-हासप्रदीपेन मोहावरणघातिना लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत् ' संप्रकाशित करण्यास तत्पर होणें हें अत्यंत श्रेयस्कर आहे. अितर राष्ट्रांनी अनेक शतके त्रास सोसून व अनेक देहाचे बळी देअून जीं महत् तत्त्वें शोधून काढलीं आहेत त्याचा अुपयोग न करून घेता जर अेखादा देश अज्ञानात जाणून बुजून चाचपडत राहत असेल तर ह्या राष्ट्रीय वेंधळेपणाबद्दल त्यास परिणामी भयंकर पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाही. आग लागली असता त्यावर पाणी ओतावें हें सर्वमान्य तत्त्व मुद्दाम फेटाळून त्या आगीवर घृताचा वर्षाव करून ती विझते की नाही म्हणून धिमेपणाने प्रयत्न करणाऱ्या पढतमूर्खाला त्या आगीच्या टोंबात दग्ध होण्याशिवाय दुसरें काय वक्षीस मिळणार आहे ? अशी स्थिति माझ्या प्रिय आर्यभूमीची होअू नये म्हणून माझ्या तरुण देशबंधूनी राजकारणातील अंतिम सत्यें व महत् सिद्धान्त शिकावे अशी माझी अुत्कट अिच्छा आहे. हीं सत्यें शिकण्यास राजकारणशास्त्रात ज्यानी अग्रेसरत्व मिळविलें आहे त्यांच्या अुपदेशामृताच्या प्राशनाशिवाय दुसरा अुत्तम मार्ग नाही; व राजकारणशास्त्रात ज्यानी अग्रेसरत्व मिळविलें आहे, अशा तत्त्ववेत्त्यामध्ये महा-भाग मॅझिनीशिवाय तरुण राष्ट्रभक्ताना अुत्साहक, दिव्य, प्रेमळ, व अुदात्त अशा राष्ट्रमंत्राची दीक्षा देण्यास कोणता गुरु सापडणार आहे ?

" नाही, नाही, राष्ट्रें कधीही मरत नाहीत. परमेश्वर आजकोणाचा कंवारी आहे. त्याने मनुष्य स्वातंत्र्यास राहण्यासाठी अुत्पन्न केला आहे. तुम्ही मनात आणा की तुमचा देश स्वतंत्र झालाच !" याहून अधिक अुत्साहक असा दुसरा कोणचा राष्ट्र-मंत्र आहे ? " अेकदा मनुष्याने असा निश्चय केला की, मी स्वातंत्र्य, स्वदेश व मानव्य यावर भक्ति करतो की मग त्याने स्वातंत्र्यासाठी, स्वदेशासाठी व मानव्या-साठी लढलेच पाहिजे, अखंड लढले पाहिजे, सर्व आयुष्यभर लढले पाहिजे, शक्य त्या त्या शस्त्राने लढले पाहिजे, तिरस्कारापासून तों मरणापर्यंत सर्व संकटें तुच्छ मानली पाहिजेत, द्वेषाला व निंदेला तोंड दिले पाहिजे, दुसऱ्या कोणच्याही फलाच-आकांक्षा न करिता फक्त कर्तव्य म्हणून त्याने तत्पर झाले पाहिजे !" याहून अधिक दिव्य असा दुसरा कोणचा राष्ट्रमंत्र आहे ? " प्रीति करा, तरुणहो, प्रीति करा. मनुष्याला परमेश्वराकडे नेणारी प्रीति ही सोपानपरंपरा आहे. कुटुंबावर प्रीति करा, स्वदेशावर प्रीति करा, तरुणहो, मनुष्य जातीवर प्रीति करा !" याहून अधिक प्रेमळ असा दुसरा कोणचा राष्ट्रमंत्र आहे ? व " गुलाम असता मुक्ती अिटली स्वतंत्र होअून काय अुपयोग ! आपण स्वतंत्र होताच दुसऱ्याना स्वतंत्र केलें पाहिजे."

याहून अधिक अुदात्त असा दुसरा कोणचा राष्ट्रमंत्र आहे? अशा या राष्ट्रीय मंत्राचा द्रष्टा जो अिटलीचा स्वातंत्र्यदाता देशभक्त मॅझिनी, त्याचें आत्मचरित्र व काही राजकीय लेख यांचें भाषांतर या ठिकाणी केलें जात आहे. या लेखांनी दोन कोटी लोकांना चैतन्य आलें. या लेखांचें पाणी ग्यॅरिबाल्डीच्या तरवारीवर झळकत होतें. या लेखांनी युरोपचीं सिंहासनें अुलथीच्या पालथीं केलेलीं आहेत. या लेखांनी अिटली देश स्वतंत्र झाला आहे व सर्व परतंत्र देशांना स्वातंत्र्य देण्याचें सामर्थ्य या लेखांमध्ये भरलेलें आहे! मॅझिनीनें हीं तत्त्वें केवळ अिटलीकरिताच सांगित-लेलीं नाहीत. अिटली निमित्तमात्र असून हीं राजकारणशास्त्रांतील महत्तत्त्वें त्या महात्म्यानें सर्व मनुष्यजातीसाठी प्रकट केलेलीं आहेत. हा स्वातंत्र्यसुधेचा मेवा सर्व संतप्त भूमिकांकडे वळला आहे. चातकांनो, ही संधि साधून आपल्या तृपा भागवून घेणें हें आता तुमच्या हाती आहे.

यापेक्षा मॅझिनीच्या लेखाची प्रस्तावना मी पामर जास्त ती काय लिहिणार? तथापि या पुस्तकात त्याचे निवडक लेख तुटक रीतीनें भाषांतर केलेले असल्यानें मॅझिनीच्या सर्व मतांची बरोबर साखळी जुळविणें हें जरा अवघड जाणार आहे. अेतदर्थ या महात्म्याच्या राजकीय मतांची दिग्दर्शना होअील तितकी त्याच्याच वाक्यांत गुंफून संक्षिप्त व साररूपानें तयार केली असता ती समजण्याला सुलभ पडेल अशा आशेनें मी तसें करण्याचा प्रयत्न करीत आहे.

'जगामध्ये आजपर्यंत जेवढ्या राज्यक्रांत्या झाल्या त्या सर्वांहून अिटलीच्या राज्यक्रांतीत अुदात्त वृत्तीचा कळस झालेला आहे. स्वदेशाभिमानाची ज्योत अितकी प्रज्वलित झालेली होती, प्रत्येक देशभक्त व्यक्तिविषयक सुखाबद्दल अितका अुदासीन होता, स्वदेशासाठी सर्वस्व वाहण्याची अितकी चढाओढ सुरू होती, परक्या सत्तेकडून हे चैतन्य दाबून टाकण्यासाठी अितके भयंकर जुलूम करण्यात येत होते, त्या जुलु-मात देशभक्तांचे तांडे चिरडले जात असताही प्रत्येक वर्षी लोकक्षोभाची अुसळी अितकी विलक्षण व निधड्या छातीची होत होती व अखेर साठ वर्षांवर लढून लढून देशवीरांनी अितक्या चिकाटीनें यश मिळविलें की, या सर्व महत्तत्त्वांनीं व महनीय नरमण्यांनी अलंकृत अशी दुसरी राज्यक्रांति आजपर्यंत झालेली नाही, असें अितिहासास कबूल करावें लागतें. या अिटलीच्या राज्यक्रांतीत सद्गुणाचा जो अितका अुत्कर्ष झाला याचें मुख्य कारण हें आहे की, ती राज्यक्रांति ही व्यक्तीसाठी, लोभासाठी किंवा द्वेषासाठी झालेली नसून तिचा पाया अत्यंत अुन्नत अशा मह-त्तत्त्वावर रचलेला होता. " मोठाल्या शाल्या ह्या तरवारींपेक्षा तत्त्वांनीच घडवून आणलेल्या असतात." पण तरवारीशिवाय तत्त्वाचा जय होत नाही ही दुःखाची गोष्ट आहे व म्हणून अिटलीनें तरवार अुपसली. परंतु " त्या तरवारीचे अग्रभागी जर सत्याचें अधिष्ठान नसतें तर त्या तरवारीला तिनें स्पर्शही केला नसता.' ज्या तत्त्वावर या पवित्र स्वातंत्र्ययुद्धाचा पाया रचला होता तीं तत्त्वें प्रथमतः मॅझिनीनें अिटलीस

शिकविली. अिटलीच्यासाठी लढलेल्या देशभक्तामध्ये मॅझिनीच्या 'तरुण अिटली'त ज्यांनी शिक्षण घेतलें नव्हतें असे लोक फारच थोडे होते. ह्या तत्त्वविचारात व अितर राजकारणपटु कारस्थान्यांच्या अुपदेशांत एक महत्त्वाचा भेद आहे. मॅझिनीचें राजकारण हें केवळ अैहिक व स्वार्थप्रवृत्तीचें नव्हतें. तसें असतें तर त्या राजकारणानें प्रवृत्त झालेल्या देशवीरांच्या अंत:करणात अितक्या अुदात्त वृत्तीचा अुदय झाला नसता. मॅझिनीचें राजकारण हें प्रवृत्ति व निवृत्ति ह्यांचें अेकीकरण होतें. त्याच्या राजकारणाची अिमारत ही नीतीच्या पायावर अुभारलेली होती. हे सिद्ध केल्याने त्या वेळपर्यंत राजकारणाची थोर पुरुषांकडून जी अवहेलना होत असे ती नष्ट झाली. राजकारण हें स्वार्थाचें व अप्पलपोटेपणाचें शास्त्र आहे व यात 'जो बळी तो कानपिळी' या पशुवृत्तीचाच अंमल आहे असी सर्वत्र समजूत असल्यानें या राजकारणाचा साधुपुरुषाना तिटकारा येणें साहजिक होतें. दुसऱ्याच्या देशावर घाला घालणें, त्याचें स्वातंत्र्य लुबाडून घेणें, हें जर राजकारण असेल—तोपर्यंत व अजूनही तें बहुतेक राष्ट्रांकडून तसेंच आहे असें मानण्यात येतें—तर मग त्या राजकारणात व नरकात भेद कोठे राहिला ? मॅझिनीने राजकारणास या नरकगामी कल्पनेपासून मुक्त केलें. राजकारण हे परमेश्वरी कर्तव्य आहे असें त्याने स्पष्ट रीतीने सिद्ध केलें. प्रवृत्ति व निवृत्ति हीं दोन परस्परविरोधी तत्त्वें नसून तीं अेकाच मार्गाच्या दोन भिन्न भागांचीं नावें आहेत असें त्याने प्रतिपादन केले. "नाही, स्वर्ग व पृथ्वी यांच्यामध्ये विरोध आहे किंवा ती भिन्न आहेत हे सत्य नाही; नाही, स्वर्गात सत्य व न्यायाचें अीश्वरी राज्य चालावें व पृथ्वीवर असत्य व अन्याय याचा अंमल चालावा हें खरें नाही. पृथ्वी ही स्वर्गाची शिडी आहे." राजकारणाला स्वार्थपरायणतेचें हिडीस स्वरूप देणाऱ्या लोकांची चुकी असा रीतीने अुघडकीस आणून मग मॅझिनीने फाजील धर्माभिमान्यांचा समाचार घेतला आहे. धर्माने राजकारणात लक्ष घालणें अवश्य आहे अितकेंच नव्हे तर तें त्याचें कर्तव्य आहे. राजकारण म्हणजे समाजाची, स्वदेशाची व स्वराष्ट्राची दास्यमोचना व सवर्धना होय. तिकडे दुर्लक्ष करणें म्हणजे मनुष्यजातीवर आलेलें भयंकर संकट निमूटपणे पहाण्याचें असम्य पातक करणें होय. धर्माची खरी व्याख्या म्हणजे मनुष्यमात्राचें धारण करणें ही होय. मनुष्यमात्र दास्यपंकात किंवा अनीतीत पतन असता आपण तेवढें स्वत:स मुक्त करून घेणें ही समजूत ढोंगीपणाची आहे. भूतदयेशिवाय स्वत:च्या मुक्तीला दुसरा मार्ग नाही. "तुमची जेव्हा चौकशी होअील तेव्हा परमेश्वर तुम्हाला असें विचारणार नाही की 'तुम्ही स्वत:च्या कल्याणासाठी काय केलेंत?' तर तो तुम्हाला असेंच विचारणार आहे की 'तुम्ही भूतमात्राच्या कल्याणाकरिता काय केलें आहे? मी जे स्वदेशबंधु तुम्हाला दिले त्याच्या कल्याणाकरिता काय केलें आहे?'' हे भूतमात्राचें अंतिम कल्याण करण्यासाठी, त्याची ज्ञानानें व पावित्र्याने आत्मोन्नति होण्यासाठी व त्याना सद्गुणी करण्यास सामर्थ्य येण्या-

साठीं पहिली अत्यंत आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे त्याचें दास्यविमोचन करणें—त्यास स्वातंत्र्य मिळवून देणें—ही होय. जोंपर्यंत अेखाद्या व्यक्तीला तुरुंगात बांधून टाकिलें आहे तोंपर्यंत तिच्या हातून सत्कृत्यें व प्रगमन होणें जितकें अशक्य आहे तितकेंच जोंपर्यंत अेखादा देश राजकीय पारतंत्र्यात पिळून टाकलेला आहे तोंपर्यंत त्याच्या हातून मानवी प्रगमनाला मदत होणें हें अशक्य आहे. अशा स्थितीत "आपण सर्वजण अेकमेकाच्या मुक्ततेबद्दल जबाबदार आहोत. जर आपण आपल्या अितर मानवी बंधूंस परतंत्रतेत व अज्ञानात तसेंच पडू देऊं, तर परमेश्वराचा द्रोह केल्याचें महत्पाप आपल्या माथीं बसेल. स्वतःची अुन्नति व मुक्तता करण्याचा अेकच मार्ग आहे, व तो सर्वांना मुक्ति मिळेल असा प्रयत्न करणें हा होय." आपण ज्या देशात जन्मलों व ज्या देशाचें अन्न खाल्लें त्याचें कर्ज फेडल्याशिवाय आपणांस स्वर्गाचीं दारें खुलीं होणार नाहीत, हें व्यक्तिविषयक मोक्षासाठी धडपडणाऱ्या ढोंगी साधूंस किंवा भ्रमिष्ट धर्माभिमान्यांस कळलें पाहिजे.

"भूतांची दया हें भांडवल संतां । आपुल्या ममता नाहीं देहीं ॥
तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥"

हें खरें धर्मरहस्य होय; व म्हणून धर्माभिमान्यास व धर्मोपदेशकास मॅझिनी विचारतो, "अहो धर्माधिकारी हो, तुमचाही जन्म या भूमीतच झाला नाही काय? तुम्हालाही या भूमीनेच पोसलें नाही काय? हिच्याच दुधावर तुम्ही वाढला नाही काय? मग ती जुलुमासाली चिरडत असता तुम्ही स्वस्थ बसून स्वर्गात कसे चढाल? तुम्हाला देश नाही काय? तुम्हांला भूतदया नाही काय? तुमच्या या कृतघ्नतेने तुम्ही पापी ठरत आहा. धर्म हा आता तुमच्या छावणीत नसून तो आमच्या छावणीत आलेला आहे. बायबलमध्ये स्वातंत्र्य पवित्र मानलें नाही काय? व तुमचा देश पारतंत्र्याने अपवित्र झालेला नाही काय? मग सर्वत्र स्वातंत्र्य नांदावें, मनुष्यांतील द्वेषभाव नष्ट व्हावा, धर्माचा खरा जयजयकार व्हावा, अशी जर तुमची खरी अिच्छा असेल तर तुम्ही आम्हास मिळा." अशा रीतीने धर्म हा राजकारणाला विरोधी नाही हें मॅझिनीने आपल्या अधिकारयुक्त वाणीने प्रतिपादन केलें. तो स्वतःच अेका ठिकाणी म्हणतो की, "राजकारणाला आम्ही धर्माच्या अुच्चपदाप्रत नेतों. जे कारस्थानपटु धर्माचा व नीतीचा तिरस्कार करून राजकारणाला धर्म नाही म्हणून म्हणत होते व जे धर्मपटु राजकीय स्थितीकडे दुर्लक्ष करून धर्माला राजकारण नाही म्हणून म्हणत होते त्या दोन्ही पक्षांचे अपराध व दोष अुघडकीस आणून, "आयुष्यात भिन्नता नाही. आयुष्य अेकरूप आहे. परमेश्वराच्या आज्ञा परस्परविरोधी नाहीत. परमेश्वरी आज्ञा अेकच आहे व ती सर्वांना सारखी लागू आहे" असा पवित्र व अुदात्त तत्त्वाचा मॅझिनीने पुरस्कार केला. राजकारणविषयक पुढाऱ्यांस नीति व धर्म यांच्या पावित्र्यांतून त्याला राजकारणाची स्फूर्ति मिळाली आहे असा महात्मा मॅझिनीशिवाय अन्यत्र

सापडणें हें यूरोपच्या अितिहासात दुर्लभ आहे. हें मॅझिनीचें विशिष्ट कर्तृत्व आहे. त्याच्या व त्याच्या अुपदेशाने प्रवृत्त झालेल्या तत्कालीन अिटालियन देशवीरांच्या आयुष्यात जो अुदात्तपणा व जें पावनत्व दिसून येतें ते सर्व वरील नीतितत्त्वांचें फल आहे. स्वार्थासाठी नव्हे तर परमेश्वरी कर्तव्य म्हणून स्वदेश स्वतंत्र करण्यास जे देशवीर तयार होतात त्यांच्या तरवारीपुढे ऑस्ट्रियाच काय, पण गर्वाने मदांध झालेला वाटेल तो देश चळचळ कापू लागेल. जर सर्व लोकांनी मनें राजकारण व धर्म हें अेकरूपच आहेत असा पूत निष्ठेने अुद्युक्त होतील तर या जगात पारतंत्र्याचें नाव देखील अुरणार नाही. राजकारणाला धर्म आहे व धर्माला राजकारण आहे, हें महत् सत्य, हें कालदेशावाधित सत्य, हें परमेश्वरी सत्य ओळखून "जर माझ्या प्रिय देशभूमीचे दोन कोटी लोक 'आता स्वातंत्र्य मिळवावयाचेंच' असे म्हणून अुठले तर त्याना अेक ऑस्ट्रिया तर काय, पण असे तीन ऑस्ट्रिया अेकत्र झाले तरी त्याना अुच्छेद करून आपलें स्वातंत्र्य परत मिळविता येअील!" दोन कोटी देशबंधूवरचा त्या महात्म्याची ही केवढी श्रद्धा! मग जर त्याच्या देशाची लोकसंख्या याहून दहा पांच पट असती व त्याचा शत्रु जर ऑस्ट्रियाअेवढाच असता तर त्याने स्वदेशस्वातंत्र्य मिळवावयास अेक क्षणही लागू दिला नसता! मर्दांची गोष्ट अशीच आहे. धर्म व स्वराज्य या तत्त्वद्वयाची अेकरूपता मॅझिनीचे शब्दात अैकविल्यावर कोणाही महाराष्ट्रीयाला महाराष्ट्राच्या मॅझिनीची आठवण झाल्यावाचून राहणार नाही. सत्पुरुष हे परमेश्वराच्या अंशाने संभूत झालेले असल्याने त्यांचे आत्मे हे भिन्न नसतात व म्हणूनच त्यांचे विचारही परस्परांशी विसंगत होत नाहीत. निरनिराळ्या देशांतील त्यांची नावे तेवढी वेगळी, बाकी तत्त्व अेकच. अिटलीमध्ये जन्मलेल्या रामदासांना मॅझिनी म्हणतात व हिंदुस्थानात जन्मलेल्या मॅझिनीला रामदास म्हणतात. बाकी दोघेही अेकच तत्त्व सांगतात की, राजकारण धार्मिक असेल तरच ते पवित्र आहे. व धर्म राजकीय असेल तरच तो पवित्र आहे. "अमका मनुष्य धार्मिक आहे असें मला कळताच मी पहिला प्रश्न हा विचारीन की त्याने लोकांच्या मुक्ततेसाठी काय केले आहे व काय सोसले आहे? अमका 'मनुष्य' आहे असे कळताच मी पहिला प्रश्न हा विचारीन की तो गुलाम आहे काय? कारण जो गुलामगिरीत स्वस्थ राहतो तो मनुष्य नसून ती नुसती जड माती आहे!"

राजकारणाला स्वार्थलंपटतेच्या तावडीतून सोडवून त्याला अीश्वरी कर्तव्याचें अुच्च स्वरूप दिल्यानंतर मग अर्थातच त्या कर्तव्यासाठी प्रत्येक मनुष्याने कसा रीतीने अुद्योग करावा हे सांगणें प्राप्त होतें. मॅझिनीची कर्तव्यमीमांसा फारच सुंदर तत्त्वावर रचलेली आहे, परंतु येथे मी त्या महात्म्याच्या राजकीय मतांचीच माहिती देण्याचा प्रयत्न करीत असल्याने त्या मीमांसेचे यथास्थित विवेचन करणे शक्य नाही. मॅझिनीच्या 'मानवी कर्तव्यें' या नावाच्या अत्यंत चटकदार निबंधाचें भाषांतर करण्याचा हेतु आहे. तो जर सफल झाला तर ही कर्तव्यमीमांसा केवळ

मराठी वाचकांना मॅझिनीचे शब्दांतूनच वाचावयास मिळेल. येथे इतकें सांगितलें म्हणजे पुरें आहे की, जें कर्तव्य म्हणून ठरत असेल तें मनुष्यानें वाटेल तें संकट आलें तरी पार पाडलेंच पाहिजे, असें मॅझिनीचें मत आहे. "कर्तव्यासाठी कर्तव्य करा. कर्तव्याच्या तत्त्वानें आत्मार्पणाचें सामर्थ्य येतें. ह्या उदात्त कल्पनेनें आत्मा परमेश्वराच्या रूपांत लीन होतो. या कर्तव्यनिष्ठेनें मनुष्याच्या अंगांत विलक्षण चैतन्य येतें. मनुष्य अचाट कर्मे करूं शकतो. या कर्तव्याच्या फलाशाविरहित निष्ठेनें देशवीरांच्या फाशीचे खांब हे स्वर्गाकडे नेणारे जिने होतात." आयुष्य हे सुखलंपटतेंत न घालवितां तें कर्तव्यलंपटतेंत घालवावें. "आयुष्य हें चैन नसून आयुष्य हें कर्तव्य आहे." राजकारणांतील अगदीं प्रथम आधारभूत कर्तव्य म्हटलें म्हणजे स्वदेशस्वातंत्र्य हें होय. मनुष्यजाति, स्वदेश, कुटुंब व व्यक्ति अशा पायरीनें मनुष्यांची कर्तव्यतारतम्यता आहे. या परंपरेच्या वाट्याला जीं राजकीय कर्तव्यें आलीं आहेत त्यांमध्यें स्वदेशस्वातंत्र्य हें प्रधान कर्तव्य आहेच आहे, परंतु राजकीय कर्तव्यासाठीच केवळ नव्हे, तर इतर सर्व कर्तव्यें मनुष्याकडून यथास्थित रीतीनें पार पाडण्यास स्वदेशस्वातंत्र्य आधीं मिळविलें पाहिजे. व्यक्तीचीं किंवा कुटुंबाचीं कर्तव्यें जर त्यांचा स्वदेश पारतंत्र्यांत असेल तर कधींही यथास्थित चालावयाचीं नाहींत. लोकांत आलस्य व दारिद्र्य माजून तो देश म्याड व कमकुवत होतो. त्या देशाला ज्ञान देणें अशक्य होतें. "जेथें शिकण्यास दारिद्र्यानें वेळ मिळत नाहीं तेथें नुसत्या शाळा उघडून काय होणार?" या राजकीय पारतंत्र्यानें देशांतील व्यक्ति व कुटुंब यांचीच वाढ खुंटते असें नाहीं, तर मनुष्यजातीची वाढही तितक्या प्रमाणानें खुरटत जाते. "प्रत्येक देशाला मनुष्य जातीच्या उन्नतींत भर टाकण्यासाठीं एक विशिष्ट कामगिरी सांगितलेली असते. परंतु पारतंत्र्यामुळें तो देशच अस्तित्वांत आहे असें म्हणतां येत नसल्यानें त्याच्या वाट्याला आलेलें कर्तव्य त्या देशाकडून पडणें अशक्य होतें व म्हणून तितक्या मानानें मनुष्यजातीची उन्नति अडकून राहते. सर्व देशांची उन्नति म्हणजे मानव्याची उन्नति. परंतु जोंवर पारतंत्र्यानें काही देश नीचतेला खिळून टाकलेले आहेत तोंवर मानव्य उन्नतीला जाणार कसें? म्हणून व्यक्तीच्या, कुटुंबाच्या, समाजाच्या व मनुष्यजातीच्या सर्व प्रकारच्या उन्नतीचें मुख्य साधन जें राजकीय स्वातंत्र्य तें संपादन व संरक्षण करणें हे प्रथम कर्तव्य होय. ही परमेश्वराची आज्ञा होय. ही धर्माची आज्ञा होय."

परंतु हें राजकीय स्वातंत्र्य मिळविण्याचें कर्तव्य पार पाडण्यास मार्ग कोणचा योजावा? त्या वेळेस इटलीची स्थिति अशी होती कीं तिचें स्वामित्व ऑस्ट्रियाकडे गेलेलें आहे. पंचाहत्तर हजार ऑस्ट्रियन शिपाई इटलीवर राज्य करीत आहेत. पारतंत्र्याचे दुःख, दारिद्र्य व अज्ञानादिक परिणाम घडून आलेले आहेत. व्हेनिस व मिलन वगैरे व्यापारांत पूर्वी जगत नाणावलेल्या प्रांतांतील लोकांस खावयाला

मिळत नाही. शिक्षण परक्यांच्या हातीं, व्यापार परक्याच्या हातीं, जीवन परक्यांच्या हातीं, स्वातंत्र्य परक्यांच्या हाती, अिटली हा गुलामांचा बाजार बनला होता. तेथें जीं काही थोडीं बहुत नेटिव्ह संस्थानें होतीं तीं ऑस्ट्रियाच्या ताटाखालचीं मांजरे बनलीं होतीं. " अिटलीचें नाव पुसून गेलें होतें. अिटलीचें निशाण फाटून गेलें होतें. ज्या रोमने दोन वेळा सर्व जगावें पुढारीपण स्वीकारलें होतें तें रोम मेलें आहे ! अिटली हा अेक भला थोरला तुरुंग बनला आहे व त्यावर ऑस्ट्रियन शिपायांचा पहारा बसलेला आहे.' ' अिटलींत शांतता आहे; परंतु ती शाश्वत जिवंत मनुष्याची नसून ती मेलेल्याची शांतता आहे." या अत्यंत अपमानकारक स्थितीतून स्वदेश वर कसा आणावा ? स्वातंत्र्य परत कसें मिळवावें ?

मॅझिनी जन्मला त्याच वेळेस अिटलीच्या लोकांनी अेक प्रश्न सोडविलेला होता कीं, स्वदेशाची अुन्नति ही भिक्षादेहीनें किंवा परक्याच्या मदतीनें केव्हांही होणार नाही. "तुम्हांला भिक्षा मागून स्वातंत्र्य मिळेल अशी आशा आहे काय ? नाही, नाही, या भिक्षादेहीनें स्वातंत्र्य मिळणार नाही." त्याच्यापुढे जें काम होतें तें उंच व धिप्पाड मनुष्याचें होतें. व ते काम करण्यासाठीं ते जमिनीवर सपशेल पसरले. " त्यांनीं प्रत्येक मुख्य प्रधानाच्या थापांनीं भुलून जावें, त्यांनीं भिकार सवलतींत संतुष्ट राहावें, व त्यांनीं प्रचंड लोकशक्तीवर विश्वास ठेवण्याचें सोडून देवून परक्यांच्या दाराशीं जोगवा मागण्याचा अुपक्रम करावा." परंतु या अुपक्रमाचा अुपसंहार लवकरच झाला. अिटलीचे धूर्त पुढारी या परक्याच्या थापांपासून फार दिवस भुलले नाहीत. त्याच्या तेव्हांच ध्यानांत आलें कीं, ऑस्ट्रियानें जें आपणांस जिंकिलें आहे तें आपल्या अर्जाच्या चिटोऱ्यांनी आपणास मुक्त करण्याकरिता नव्हे. राष्ट्राच्या अितिहासात वहुत. आढळून येणारे हे भिक्षादेहीचें व्यसन अिटलीस लागलें होतें. पण ते तावडतोब सुटले. शंभर शंभर वर्षे परक्याच्या दारी लाथा बसत असता व हजारो वेळा विश्वासभंग झाला असताही पुन्हा अेकदा कटोरा घेअून भिक्षा मागण्याअितका अिटली देश राजनिष्ठ झालेला नव्हता. त्याच वेळेस पोलंड, स्पेन वगैरे देशांत राज्यक्रांतीची लाट अुसळली होती. तीमुळेही अिटलींतील लोकांत आत्मनिष्ठा अुत्पन्न झाली. परंतु अशा भयंकर राज्यक्रांत्या आजूबाजूस चालत असताही त्याच्याकडे पाहून ज्यांना आपल्या गुलामगिरीची व भिक्षादेहीची शरम वाटत नाही, असे देश या भूमीवर काय थोडे आहेत ! पण अिटली अितकी मदट झालेली नव्हती. ती खडबडून जागी झाली. या जागृतीचा परिणाम वहूकडे दिसू लागला. स्वदेशाची प्रीति ही वाङ्मयात प्रथम प्रादुर्भूत झाली. नंतर अिटलीमध्ये स्वदेशी चळवळ सुरू झाली. मिलनमध्ये तर या स्वदेशी चळवळीचा कळसच झाला होता. प्रत्येक अुदात्त व धाडसी कृत्यात तरुणवर्ग जसा सदोदित आघाडीवर असतो तसाच तो अिटलीच्या राज्यक्रांतीतही होता. मिलनमध्ये ऑस्ट्रियाच्या तंबाखूवर विद्यार्थ्यांनी कडक बहिष्कार टाकला. रस्त्योरस्त्यातून विद्यार्थ्यांनी

नाकेबंदी केली व कोणी ऑस्ट्रियाची विडी ओढताना पाहिला की त्याला हाणमार करून देण्याचा सपाटा चालविला. या स्वदेशी चळवळीला लवकरच पूर्ण राजकीय स्वरूप प्राप्त झालें.

अमेरिकेतही स्वातंत्र्ययुद्धाच्या आधी अशीच स्वदेशी चळवळ अुत्पन्न झाली होती. काय विलक्षण प्रकार आहे! अितिहासाची पुनरावृत्ति होते ती अशी. अितिहासात स्वदेशी चळवळीचें पर्यवसान राज्यक्रांतीत व स्वातंत्र्यप्राप्तीत झाल्याचीं ही अुदाहरणें काही आकस्मिक रीतीने घडून आलेलीं नाहीत. ते काही अपघात नाहीत. त्याच्या या विलक्षण साम्याचें विवरण करता येणें शक्य आहे. स्वदेशी चळवळ म्हणजे, “ दुसऱ्याच्या लुटारूपणास आळा घालून आपल्या हक्कांचा बचाव करणे होय. आपले हक्क काय आहेत हे सामान्य लोकांस अेकदम कळत नाही. म्हणून प्रथमतः त्यांच्या ग्राहकशक्तीला अितकेंच कळतें की परक्याच्या व्यापाराने आपण बुडत आहोत. म्हणून ते व्यापारावर बहिष्कार घालण्यास तयार होतात. अितकी त्यांची तयारी झाली की, अर्थातच परके लोक आपल्या व्यापाराच्या संरक्षणार्थ जुलमी अुपाय योजू लागतात. हा जुलूम सुरू झाला की प्रथमतः व्यापारावरच बहिष्कार घालणारे लोक अनायासेंच सत्य मार्गाला लागतात. त्याना कळू लागते की, निर्जीव परदेशी कापडावर किंवा तंबाखूवर अगर चहावर बहिष्कार घालून काही अुपयोग नाही. या निर्जीव वस्तूवर राग काढण्यात काय अर्थ आहे? खरा राग या निर्जीव वस्तूंना ज्या सजीव वस्तूंचा आधार आहे त्यांच्यावरच अुगविला पाहिजे. परक्या मालाला नव्हे तर परक्यालाच बहिष्कार घातला पाहिजे. तंबाखूलाच नव्हे तर या ऑस्ट्रियन लोकांना व चहालाच नव्हे तर या अिंग्रज लोकांनाच आपल्या देशातून हुसकून दिले पाहिजे. अशा विचारपरंपरेने अिटालियन व अमेरिकन लोकांमध्ये स्वदेशी चळवळीचें स्वातंत्र्ययुद्धात रूपांतर झाले. मॅझिनीचे आधी जे देशभक्त होअून गेले, त्यानी अिटलीचें राजकारण या स्थितीत आणून ठेविलेले होते. चहूकडे परक्या सत्तेबद्दल असंतोष माजला होता. आपलीं दुःखें भिक्षावृत्तीने कमी होणार नाहीत ही बहुतेकांची खात्री झालेली होती व स्वदेशी चळवळीसारख्या आत्मनिष्ठेच्या चळवळीचा प्रादुर्भाव झालेला होता. अितकेंच नव्हे, तर काही काही पुढाऱ्याना स्वातंत्र्याची लालसाही अुत्पन्न झाली होती. परंतु ही स्वातंत्र्याची लालसा सर्व लोकाना कशी कळवावी? परक्याना अिटलीतून घालवून दिल्याशिवाय अिटली देश कधीही वर यावयाचा नाही हे लोकाना कसें शिकवावे? वर्तमानपत्रें व अुघड सभा असंतोष अुत्पन्न करीत होत्या. परंतु या असंतोषाला कृत्याचें स्वरूप देणें आवश्यक होतें. कारण ऑस्ट्रियाला हुसकून द्या असें अुघड रीतीने कोणालाच सांगता येअीना व लाक्षणिक भाषेत सांगितलें असता ते सामान्य जनाना कळेना.

याहीपेक्षा मोठी अडचण म्हणजे ही असे की, नुसते ऑस्ट्रियाला हुसका

जिवाच्या आशेनें मौनव्रता सोडाव्या लागतात. अशा रीतीनें सर्वत्र भीति उत्पन्न होते आणि भीक नको पण कुत्रा आटप अशी परक्यांची अवस्था उडते. दुसरा फायदा असा आहे कीं, फार थोडक्या शक्तीनें गुप्त मंडळ्यांना परकी सरकारास गांगरून सोडता येतें. मॅझिनी म्हणतो, " ते शंकर होते, पण त्यांनी युरोपच्या सिंहासनें साम्राज्यें, आज्ञापत्रकें, तुरुंग, फांशी वगैरे सर्व राक्षसांना थरथर कांपविले होतें."

तिसरा फायदा म्हणजे, लढाईची तयारी करता येते. हें काम उघड रीतीनें करणें अगदी अशक्य होतें. तें अशक्य कार्य मॅझिनीनें आपल्या गुप्त कटांनी शक्य करून दाखविलें. याशिवाय एक मार्ग, एक दिशा व एक उद्दिष्ट देता येतें. अशा अनेक फायद्यांचा विचार करून मॅझिनीनें ' तरुण इटली ' स्थापन केली. या प्रस्तावनेंत, मॅझिनीच्या राजकीय मतांचीच साखळी जुळविण्याचा संकल्प असल्यानें या ' तरुण इटली ' च्या इतिहासाकडे वळणें इष्ट नाहीं. तिनें इटली देशांत काय केलें किंबहुना सर्व युरोपभर प्रत्येक देशावर तिचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष परिणाम कसे घडत गेले या अत्यंत महत्त्वाच्या विषयाला बाजूला सारणें भाग आहे. साधारण कल्पना यावयास इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, "या 'तरुण इटली'च्या उपदेशानेंच इटलीस स्वातंत्र्य मिळालें व इटलीचें ऐक्य झालें. इटलीच्या स्वातंत्र्यार्थ झगडलेल्या अनंत देशवीरांचें शिक्षण ' तरुण इटली ' त झालेलें होतें. ' तरुण इटली ' नें सार्‍या देशांतील भिन्न पंथ मोडून टाकून स्वदेश एक केला. त्यापूर्वी इटलीच्या ऐक्याला लोक हसत होते. इटलीचें राष्ट्रैक्य मनोराज्य आहे, असें सर्व पुढारी म्हणत होते. परंतु 'तरुण इटली'नें सार्‍या देशांत नवीन युगाचा प्रारंभ केला." तरुण इटलीनें हें युगांतर करण्याचें कार्य कसें सिद्धीस नेलें याची फोड करण्याकरितां तिच्यातील धर्मविभागाचें निरनिराळें विवेचन केलें पाहिजे. " तरुण इटलीचें साध्य मिळविण्यासाठीं ती दुहेरी कार्यक्रमाची योजना करीत आहे- शिक्षण व युद्ध – शिक्षण युद्धाला मदत करील व युद्ध शिक्षणाला मदत करील." अशा दुहेरी कार्यक्रमाचें क्रमशः विवरण केलें म्हणजे मॅझिनीनें आपलें अचाट कर्म कसें सिद्धीस नेलें व नेवविलें हें स्पष्ट होईल.

प्रथमतः मॅझिनीनें इटलीला कोणतें शिक्षण दिलें हें पाहिलें असता या महात्म्याचे विचार किती प्रगल्भ व पवित्र होते हें सहज दिसून येतें. पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे कीं, मॅझिनीचें सर्व राजकारण नीतीच्या पायावर उभारलेलें होतें. " आपल्यापुढें जें कार्य आहे तें लहानसहान कार्य नाहीं. आपण देशानें जें कार्य केलें तेंच करीत आहोंत. आपण लोकनिर्मिति करीत आहोंत ! आपण स्वराष्ट्र उत्पन्न करीत आहोंत." यापुढे हिच्यानंतर कर्तव्य तें कोणतें असणार ? " परमेश्वरानें अगदीं स्पष्ट अशा आज्ञेनें सांगितलें आहे कीं, इटली हा एक स्वतंत्र देश आहे. समुद्राच्या व पर्वताच्या रेषा आपल्या दिव्य करांगुलीनें आखून देवानें इटली देश

अिटालियनांस दिलेला आहे." तेव्हां अिटालियन लोकांचें पहिलें कर्तव्य म्हणजे ह्यां ओीश्वरी आज्ञेप्रमाणे अिटली स्वतंत्र करणें हें होय. "कारण बंधुहो, स्वदेश हें परमेश्वरानें आपणास दिलेलें घर आहे. या घरात राहून त्याच्या आश्रयाखाली तुम्ही वाढावें व वाढत वाढत अखेर मनुष्यजातीसह अंतिम स्वरूपाला जावें अशी त्याची अिच्छा आहे." हें निसर्गनिर्मित गृह अिटालियनांना वाढण्याकरिता आश्रय म्हणून दिलेलें असून परक्यानी तो अेक तुरुंग बनवून ठेवला आहे. म्हणून अिटलीच्या पुत्रांचें पहिलें कर्तव्य म्हणजे स्वदेश स्वतंत्र करणें हें होय. मॅझिनीने आपल्या गुप्त संस्थेतून पहिलें शिक्षण या तत्त्वाचें दिलें. "प्रथम स्वातन्त्र्य मिळविलें पाहिजे. दास्यमुक्तता झाली पाहिजे. अितर सर्व प्रश्न मागाहून सुटतील. आल्पकडे धावा ! चला ! ऑस्ट्रियाशी लढाओ !" अशा स्पष्ट रीतीने अिटालियन तरुणांत स्वातंत्र्याचें चैतन्य अुत्पन्न झाल्यामुळे मॅझिनीचे पूर्वी जीं भिकारडीं मतें प्रचलित होती त्याचा अेकदम नाश झाला. अमका कर माफ झाला पाहिजे व तमका हक्क मिळाला पाहिजे असें म्हणणारा पंथ निर्माल्यवत् झाला. कारण सर्वांची अशी खात्री झाली की, "आपणांस अनेक हक्क नको असून अेकच हक्क पाहिजे आहे व तो हक्क म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य--दास्यमुक्तता--हा होय," व हें स्वातंत्र्य तें फायद्याचें आहे म्हणूनच नव्हे, तर मर्दाचें कर्तव्य आहे म्हणून मिळविलें पाहिजे. "अिटलीमध्यें भाकर स्वस्त आहे किंवा महाग आहे हा मुख्य प्रश्न नाही. त्या भाकरीवर गुलामगिरीचा शिक्का आहे की नाही हा मुख्य प्रश्न आहे." मग ऑस्ट्रियाने अनंत हक्क जरी दिले असते तरी अिटलीचे लोक स्वातंत्र्य मिळविल्याशिवाय राहतेना. मॅझिनीने स्वातंत्र्याला कर्तव्याचे स्वरूप दिल्याने ऑस्ट्रिया अेकदम हतवीर्य झाला.

त्या वेळेपर्यंत जरा जास्त कमी चळवळ झाली की लहान-लहान हक्क देअून ऑस्ट्रिया खुबीनें चळवळी मारून टाकीत असे. परंतु आता, "हक्काचा प्रश्न नसून हक्काचा आहे." शिवाय आपण स्वातंत्र्यसंपादनात अेक अत्यंत पवित्र कर्तव्य करीत आहोत अशी तरुणांची भावना झाल्याने त्यांच्या अुदात्त वृत्ति जाग्या झाल्या. तुरुंगात देशवीर राष्ट्रगीतें गाअू लागले व फाशीवर "जो स्वदेशासाठी मरतो तो चिरंजीव होतो." या महामंत्राचा जयघोष करूं लागले. "तरुणांना कर्तव्यबुद्धीने अुद्दीपित करा, ध्येयाची भक्ति शिकवा, म्हणजे त्यांच्या अंगात काय सामर्थ्य आहे हे तुम्हाला कळेल" असें तो महात्मा अुगीच म्हणत नसे. अिटलीत १८३१-पासून तो १८७०-पर्यंत दरसाल कोठे ना कोठे तरी अेक बंड होतच असे. अितकी चिकाटी धरून स्वदेशभक्तांनी अखेर विजय संपादन केला. बडामध्ये बायकांनी जे पराक्रम केले ते अितर निर्जीव देशातील पुरुषांना देखील लाज आणतील ! रोममध्ये १८४८ साली फ्रेंच लोकांशी लढाओ चालू असता, "ग्यारीबाल्डी सैन्यात अुडी टाकून बेहोश लढत होता. अितक्यात त्यास सेनेटचें बोलावणें आल्यामुळे तो तिकडे गेला. त्याला पाहताच सेनेटने टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला. ग्यारीबाल्डीला प्रथम

त्या जयनादाचें कारण कळेना. जितक्यात त्याने स्वतःकडे पाहिलें तों रक्ताच्या धारा नखांनखांतून गळत आहेत, शस्त्रांनी व निसटत्या लागलेल्या गोळ्यांनी कपड्यांची जाळीं झालीं आहेत व हातातील तरवार वार करता करता अितकी वाकली आहे की म्यानांत ती अर्धी देखील शिरत नाही !" अशा त्या तरवारीला अनंत प्रणाम असोत ! जोपर्यंत अशी अेक तरवार जगात कायम आहे तोपर्यंत परतंत्र देशांनी स्वतंत्र होण्याची आशा धरण्यास हरकत नाही ! मिलनमध्ये बंड सुरु करण्याचे आधी पुढारी म्हणू लागले, " तुम्ही अुठू नका, तुमच्याजवळ शस्त्रें नाहीत." दुसऱ्या दिवशी लोक म्हणाले, " अुठा, दगड घ्या, सुऱ्या घ्या, काठ्या घ्या व अुठा ! म्हणजे आता शस्त्रें चालत येतील." ते अुठले व ऑस्ट्रियनांवर छापा घालून त्यांचीं शस्त्रें लुटून आणली ! गुप्त मंडळ्यांची जमवाजमव अितकी अुत्तम असे की. वायकापोरांतमुद्धा त्यांचीं तत्त्वें निकविलीं गेलीं होतीं. मिलनमध्ये व व्हेनिसमध्ये राज्यक्रांतीची नौबत धडधडताच, " बायका रस्त्यांत सज्ज होअून अुभ्या राहिल्या. अेक म्हातारा लंगडत लंगडत गवताचा भारा घेअून सरकारी ठाण्यात गेला व त्या भाऱ्यास आग लावून देअून तें ठाणें भस्म करून परत आला! तरुण लोक पुस्तकें टाकून बाहेर पडले, तरुण स्त्रिया फंडासाठी रस्तोरस्तीं भिक्षा मागू लागल्या, स्वयंपाकी लोक आपल्या सोवण्यासुद्धा रस्त्यांत अुड्या घेअू लागले व ऑस्ट्रियन शिपाअी शहरात शिरु पाहताच त्यांच्यावर टेबलें, कौलें, सुऱ्या, खाव, दगड, तापलेल्या मळ्या, कढणारें तेल यांचा वर्षाव होअू लागला !" अशा दृढ-निश्चयानें अिटली लढली ! अनंत अपजय आले तरी ती लढली. कारण, " प्रत्येक अपजय ही जयाची अेक पायरी आहे " असें त्यांना 'तरुण अिटली'नें दीक्षा दिली होती. १८२० साली पराजय झाला. १८३१ साली पराजय झाला, १८४८ साली पराजय झाला; तथापि मॅझिनी म्हणाला, " फिरुन प्रयत्न करा. यश किंवा अपयश हा विचार नसून कर्तव्यतेचा विचार असला पाहिजे. तुमच्या पक्षास परमेश्वर आहे. तुम्हांस अंती जय मिळालाच पाहिजे अिटलीनें या महर्षीच्या अुपदेशाप्रमाणे फिरुन प्रयत्न केला व अिटली स्वार्थत्याग, शौर्य, तेज, तत्त्वनिष्ठा आदिकरून सद्गुणांनी युक्त आहे असें पाहून १८५९ सालापासून त्यांच्या श्रमाला परमेश्वरही फळें देअू लागला.

हीं स्वातंत्र्याचीं गोड फळें चाखावयास मिळण्यासाठी अिटलीला जी किंमत द्यावी लागली ती 'तरुण अिटली'च्या खजिन्यातून दिली गेली. अशा रीतीनें मॅझिनीने स्वातंत्र्याचें शिक्षण अिटलीच्या तरुणांस दिलें. परंतु नुसतें स्वातंत्र्यप्राप्तीचें कार्य म्हणजे काहीं अंतिम कार्य नव्हे. जोपर्यंत लढाअी सुरु आहे तोपर्यंत लोक अेकत्र राहतील, परंतु ती बंद होताच अिटली देशातील निरनिराळ्या प्रांतात यादवी माजू लागेल, म्हणून मॅझिनीचें दुसरें तत्त्व म्हणजे 'राष्ट्रैक्य' हें होय. अिटलीच्या भिन्नभिन्न प्रांतांत पूर्वीपासून अितकी यादवी माजलेली होती की, ते निरनिराळे देशच झालेले

होते. लहान लहान संस्थानें हीं अेकमेकांशीं अखंड लढाया करीत होतीं. शहरें अेकमेकांशीं भाडत होतीं. अशा स्थितीत अिटली देशाचें मिळविलेलें स्वातंत्र्य कायम राहण्यास त्याचें राष्ट्रैक्य होणें आवश्यक होतें. संयुक्तसंस्थानपद्धति ठेवून भागलें नसतें. कारण निरनिराळीं संस्थानें ठेवलीं की प्रांतिक अभिमानाला आरंभ होतो व त्या राष्ट्रात अेकरूपता नाहींशी होअून तें राष्ट्र परक्याच्या पायांत लवकरच पडतें. म्हणून मॅझिनीचें आग्रहाचें सांगणें असें की, अिटलीनें प्रांतिक अभिमान सोडून देअून सर्व राष्ट्र अेकीकृत झालें पाहिजे. ही गोष्ट मॅझिनीपूर्वी कोणासच समजली नव्हती. अितकेंच नव्हे तर ह्या मताबद्दल मॅझिनीला सर्वजण प्रथम प्रथम हसत होते. परंतु तिकडे लक्ष न देता या भविष्यवाचानें 'तरुण अिटली'च्या द्वारें अिटलीचें राष्ट्रैक्य झालेंच पाहिजे, कारण अैक्याशिवाय देशत्व नाहीं. अैक्याशिवाय शक्ति नाही. अिटलीच्या भोवती बलवत्तर्वी राष्ट्रें पसरलेलीं असल्यानें स्वातंत्र्य कायम रहावें अशी अिच्छा असेल तर अिटलीनें अेक राष्ट्र झालें पाहिजे असा अुपदेश दिला. जेव्हा जेव्हा अेखादा प्रांत युद्धाला आरंभ करील तेव्हा तेव्हा तें युद्ध अिटलीचे नावानें केलें जाअील व त्या युद्धाचें निशाण हें अिटलीचें अेकराष्ट्रीय निशाण असेल. सर्व अिटलीमध्ये जें मनोराज्य म्हणून समजलें जात होतें, तें अिटलीचें राष्ट्रैक्य या महात्म्याच्या दिव्य दृष्टीस संध्येनेचें तुरुंगातून दिसलें. त्यानें आपल्या देशबांधवांस ती गोष्ट कळविली. ज्यांचा त्याच्यावर विश्वास बसला ते त्याच्या मागें गेले व अखेर खडतर मार्गाचें आक्रमण करता करता तें मनोराज्य खरें झालेलें पाहण्याची धन्यता त्यांना मिळाली!

अशा रीतीनें प्रथम दास्यमुक्ता व मग राष्ट्रैक्य ही दोन तत्त्वें सांगितली. परंतु आपलें काम नुसतें नाशकारक नाहीं. तर आपणांस नाश केल्यानंतर त्या नाशातूनच सृष्टि अुत्पन्न केली पाहिजे. ही सृष्टि अुत्पन्न करावयाला अिटलीच्या सुदैवानें योग्यतम असाच सृष्टिकर्ता मिळाला होता यांत शंका नाही. राष्ट्र स्वतंत्र झालें व त्यातील निरनिराळे प्रांतिक भेद मोडून व द्वेष नाहींसे करून तें अेक झालें म्हणजे मग तेथें तें स्वातंत्र्य व ती अेकराष्ट्रीयता कायम राहण्यास अंतर्गत स्वतंत्रता मिळाली पाहिजे. जुलूम म्हटला की तो त्याज्य आहे. मग तो परक्याचा असो किंवा स्वकीयाचा असो तो धार्मिक असो किंवा राजकीय असो म्हणून राष्ट्रामध्ये व्यक्तिस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य हीं आवश्यक असलीं पाहिजेत. परंतु जेथें राजसत्ता आहे तेथें असमता अुत्पन्न होणेच होतें. मनुष्यात सद्गुण व योग्यता या योगांनीं जेवढे भेद झाले असतील तेवढेच भेद न्याय्य व अुन्नतिमूलक आहेत; बाकी सर्व प्रकारची असमता ही अत्यंत गर्हणीय होय, व म्हणून राजसत्ता गर्हणीय आहे. मॅझिनीचें सर्व राजकारण जसें नीतिमत्तेस धरून होतें तसेंच त्याचें लोकसत्तावादित्वही नीतीच्या भक्कम पायावर अुभारलेलें होतें. शिवाय अिटलीसारख्या देशाला कायमपणा देणारी लोकसत्तेशिवाय दुसरी राज्यपद्धति शक्य नव्हती. मॅझिनी स्वतः राष्ट्राच्या बहुमताला विरुद्ध नव्हता. राष्ट्रीय आज्ञेचा मी बंदा आहे. परंतु माझी अशी खात्री आहे की,

लोकसत्तेशिवाय दुसऱ्या सर्व राज्यपद्धति अन्यायमूलक व अनीतिमान् आहेत. अिटलीमध्ये अनंत प्रांत, अनंत संस्थानें व अनंत दुरभिमान मुरू असल्यानें त्या सर्वांना सारखे हक्क दिल्याशिवाय त्यांची ओकी फार दिवस टिकणार नाही अशी त्याची पक्की समजूत असे. ओका संस्थानाला राजा केलें की अितर संस्थानें त्याच्या नाव्यात जाअू अिच्छिणार नाहीत. ओका प्रांताचा अंमल कबूल केला की अितर प्रांतांतील लोक आपली सत्ता त्याच्या हाती देणार नाहीत. अशा स्थितींत खरी खरी राज्यपद्धति म्हणजे लोकसत्ता हीच होय. लोकसत्ता स्थापिली म्हणजे कोणालाही विशिष्टाधिकार दिल्यासारखें किंवा पक्षपात केल्यासारखें होणार नाही. जी व्यक्ति खाजगी व सार्वजनिक वर्तणुकीने योग्यतम असेल ती सर्वानुमताने अधिकृत केली जाअील. शिवाय मनुष्यजातीच्या अुत्क्रांतीप्रमाणे पाहिले असता लोकांचें युग आलें आहे. देश व लोक ही तत्त्वें आता मुटलीं आहेत. राजाचा किंवा पोपचा जुलूम यापुढे चालणार नाही. युरोपमध्ये सर्वत्र लोकसत्तेकडे प्रवृत्ति होत आहे. म्हणून अिटलीने ही लोकसत्तेचीच योजना करावी असा मॅझिनीचा अत्याग्रह होता. तुम्ही राजसत्ता नेमाल तर काही दिवस शांतता राहील. परंतु कायमची शांतता राहणार नाही. पहिली राज्यक्रांति संपताच दुसरी सुरू होअील अशा अर्थी त्याने वारंवार सूचना दाव्या; व त्या भविष्याचे सत्यत्व लोकांच्या निदर्शनास आपल्या आयुष्यात आलें नाही तथापि भावी काळात तें आल्याशिवाय राहणार नाहीं अशी त्याची पक्की भावना होती व ओतदर्थ 'तरुण अिटली'त लोकसत्तेचें तत्त्व अंगीकृत केलेले होतें. अशा रीतीने दास्यमुक्तता, राष्ट्रैक्य, समता, व लोकसत्ता ह्या तत्त्वचतुष्टयाचें शिक्षण ' तरुण अिटली'त दिलें जाअी ही तत्त्वें अिटलीच्या अंतःकरणावर मॅझिनीने कोरून ठेविलीं आहेत. त्याचा बहुतेक जय झालेलाच आहे व जो थोडा राहिला आहे तोही भविष्यत्काळी होणारच होणार यात कोणालाही शंका नाही.

'तरुण अिटली' च्या 'शिक्षणा'च्या कार्यक्रमाचा हा विस्तार झाला. आता 'युद्धकांडाचा थोडासा प्रपंच केला पाहिजे. ऑस्ट्रियाशी युद्ध केल्याशिवाय आपले स्वातंत्र्य परत मिळणार नाही ही मॅझिनीची पूर्ण खात्री होती. " लढाअीशिवाय स्वातंत्र्य मिळणार नाही. भयकर, तुमुल, दीर्घ, निकराची लढाअी केल्याशिवाय आपणांस दुसरा मार्ग नाही." असल्या वेळी लढाअी करणें हे पाप नाही, " जेव्हा अेखाद्या सत्याचा जयजयकार करावयाचा असतो किंवा अेखाद्या असत्याचा विनाश करावयाचा असतो तेव्हा लढाअी पवित्र आहे." अिटलीमध्ये ही लढाअी करणें हें फार कठीण झालें होतें. त्याच्यापाशी युद्धोपयोगी हत्यारें नव्हतीं किंवा ती बाळगण्याची परवानगी नव्हती. अशा स्थितीत अिटलीशिवाय दुसरें ओखादें राष्ट्र सांपडलें असतें तर तें गर्भगळीत होअून लढाअीचे नांव काढण्यासही भिअू लागलें असतें. परंतु अिटली असल्या संकटांना भीक घालणारी नव्हती. तिच्यातील शूर व तरुण लोक हे स्पेन, अमेरिका, जर्मनी, पोलंड वगैरे देशांत येथे व तेथे युद्धकलेचें ज्ञान मिळवून, त्यांतिचाली,

रिमीओटी वगैरे 'तरुण अिटली'चे सभासद अशाच रीतीने युद्धकलेत निष्णात झाले. दुसरा बेत असा योजला होता की, अिटलीच्या हद्दीबाहेर परंतु लगत्यालगत्यानी जर्मनी वगैरे देशांतून हत्यारे विकत घेअून त्यांचे खजिने करुन ठेवावयाचे व स्वदेशात गडबड झाली की लगेच हद्द फोडून आंत घुसण्याचा प्रयत्न सिद्धीस न्यावयाचा. अेकदा हद्द फोडली की मग बाहेरुन शस्त्रें आत आणण्याचा मार्ग मोकळा झाला. मॅझिनीच्या सॅव्हॉयवरल्या स्वारीत हाच बेत योजण्यात आला होता. हा मार्ग फारच अुत्तम होता. ह्या युक्तीने अेकदा स्वातंत्र्ययुद्धाचें निशाण अुभारलें गेलें की, बाहेरुन शस्त्रांचा अुत्तम पुरवठा करता येतो.

तिसरा अुपाय असा योजला होता की, स्वदेशात गुप्त रीतीने हत्यारें तयार करण्याचे अगदी लहान परंतु पुष्कळ व अंतराअंतरावर असे गुप्त कारखाने काढावे. चौथी युक्ति अशी योजली होती की, गुप्त मंडळयानी अितर देशांत हत्यारें खरेदी करुन ती मालाचे जहाजातून लपवून धाडावी. पुष्कळ वेळा हे उघडकीसही येत असे. अेकदा मॅझिनीच्या फ्रेंच मित्राने मार्सेलीसहून अिटलीकडे शस्त्रें नेण्याचें काम अंगावर घेतले. त्याने शस्त्रें भरून जहाज हाकारलें, परंतु अिटलीच्या किनाऱ्याला लागावयाचे आधीच त्याला पाळत ठेवून पकडण्यात आलें. ते जहाज जप्त करून त्यावरचा सर्व माल हिमकण्यात आला; परंतु स्वातंत्र्ययुद्धासारख्या महत्कार्यात संकटें ही यावयाचीच. त्याना भिअून भ्याड लोक हे गुलामगिरीत तसेच पचतात व त्या संकटाशी टक्कर घेअून मर्द लोक हे स्वातंत्र्य मिळवितात. या सर्व युक्त्याहून मॅझिनीने व त्या अिटालियन देशभक्तांनी मुख्य अुपाय योजला तो सैन्य वळविण्याचा होय. आस्ट्रियाचे लष्करात जेवढे अिटालियन होते तेवढ्यावरील अंमलदाराना 'तरुण अिटली'ची दीक्षा मिळालेली होती. परकीय सरकाराला तद्देशीय सैन्य ठेवल्यावाचून कोणच्याही देशावर राज्य करता येणें शक्य नसतें. अशा स्थितीत लष्करी शिपायांना जर स्वदेशाकडे वळविता आलें तर त्याचा दुहेरी अुपयोग होतो. अेक तर परक्यांचा विश्वास अुडून जातो व आयत्या वेळी ते घाबरे होतात; व दुसरे असें की राष्ट्रपक्षास आयते शिकलेले व सशस्त्र लोक मिळू शकतात. " लष्करी शिपाअी वळविताना त्याच्यावरचे अधिकारी तेवढे वळविले म्हणजे झाले. तेही अगदी वरचे अधिकारी नव्हेत तर दुय्यम प्रतीचे सुभेदार, मेजर वगैरे अधिकारी वळवावे " हे लष्कर वळविण्याचें काम रशियामध्ये फार कठीण जात आहे; कारण तेथे दोन्ही पक्ष अेकाच जातीचे व देशाचे आहेत. परंतु अिटलीत हें काम सहज करता आलें, कारण परकीयाचा तिरस्कार व स्वकीयाचा लोभ हा मनुष्यमात्रात निसर्गत च कायम असतो. त्यास चेतना देणारा मॅझिनी मात्र भेटला पाहिजे.

असो. थोडक्यात म्हणावयाचे म्हणजे स्वातंत्र्ययुद्धाची तयारी अशा रीतीने करावी असा मॅझिनीचा कार्यक्रम होता. परंतु ही तयारी साधारण झाली म्हणजे युद्ध जें करावयाचें तें मोठमोठ्या लढाया देण्याचें नसून ' गनिमी काव्याचें ' होय.

मॅझिनीचा या गनिमी काव्यावर पूर्ण भरंवसा होता. ग्यॉरिबाल्डीही गनिमी युद्धात निष्णात होता. " परवयांच्या जोखडाला झुगारून देण्याची ज्यांची ज्यांची अिच्छा असेल त्या त्या राष्ट्रांना गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीचाच आश्रय केला पाहिजे." शत्रूप्रमाणे आपल्या सैन्यात कवाअीत येत नसल्याने जी अुणीव राहिलेली असते ती गनिमी काव्याने भरून निघते. शिवाय लोकपक्षाच्या लहान लहान टोळ्या चोहोंकडे पसरून दिल्या म्हणजे शत्रूच्या विस्तीर्ण सैन्याला देशभक्ताच्या मूठभर सैन्याने गुतवून ठेविता येते. गनिमी काव्याला युद्धकलेचें काही विशेषसें ज्ञान लागत नसल्याने निश्चयी व करारी असा देशभक्ताच्या मनात येताच त्याला आरंभ करता येतो, व जसजसें युद्ध जुंपत जाते तसतसें त्या देशभक्तास लढाअीचें ज्ञान व अनुभव मिळू लागतो. " गनिमी काव्याने जंगी पराभवाचें भय नसतें." गनिमी टोळ्या सुटसुटीत असल्याने त्या मान्यामारस्या चहूकडून हिंडू लागतात व शत्रूचें अवजड सैन्य वेड्यासारखें मागून पुढे व पुढून मागे हेलपाटे घालीत बसते. शिवाय, परवयांना गनिमी काव्याचा केव्हाही आश्रय करता येत नाही. कारण त्यास या मुलखाचें ज्ञान नसते व त्यांना तेथील लोक अनुकूल नसतात. त्यांनी गनिमी काव्याचा अंगीकार करून लहान लहान टोळ्या केल्या की त्याचा नाश अेका क्षणात झालाच असे समजावे. अशा रीतीने परतंत्र देशांना गनिमी युद्ध फारच फायदेशीर असेल असे पाहून मॅझिनीने या युद्धाची योजना केली. या युद्धपद्धतीचा त्याने किती खोल अभ्यास केला होता हें त्याच्या लेखावरून दिसून येअील. अशा रीतीने सर्व देशभर लढाअी सुरू झाली असता ऑस्ट्रियाला अिटलीत राहणे अशक्य होअील अशी मॅझिनीची युद्धयोजना होती.

साराश, प्रथमत. राजकारणाला नीति आहे व आपलें स्वातंत्र्य मिळविणें हें न्याय्य आहे अशी अिटलीची मन प्रवृत्ति झाली की, मग गनिमी काव्याने युद्ध सुरू करावें असा अेकदर कार्यक्रम होता. वरील विवेचनाचा मथितार्थ थोडक्यात असा काढता येअील. राजकारण हें नीतीला धरून असावें. राजकारणातील प्रथम कर्तव्य स्वातंत्र्यसंपादन होय. ज्या राष्ट्रात हे सत्यप्रतिपादन करण्याची बंदी झालेली असेल त्यांनी गुप्त मंडळ्या स्थापाव्या. त्या गुप्त मंडळ्यांचे कर्तव्य दुहेरी असावे. पहिले कर्तव्य म्हणजे मानसिक शिक्षण हें होय. या मानसिक शिक्षणाने गुप्त व अुघड रीतीने चार तत्त्वांचे मुख्यत: शिक्षण द्यावें. स्वातंत्र्य, समता, राष्ट्रैक्य, व लोकसत्ता ही ती चार तत्त्वें होत. दुसरे कर्तव्य असे की, या चार तत्त्वांच्या जयासाठी धर्मयुद्ध करण्याची तयारी करणें. हे युद्ध गनिमी काव्याने करावें. मानसिक शिक्षणाने युद्धास साह्य मिळेल व युद्धाने मानसिक शिक्षण वाढेल. अशा रीतीने स्वदेश परवयांच्या ताब्यातून मुक्त झाल्या म्हणजे त्याचे वर्तन असें ठेवावें की त्या योगाने मनुष्यजातीच्या अुन्नतीला व प्रगमनाला साह्य व्हावें. आपणांस सामर्थ्य येताच अितर गांजलेल्या राष्ट्रांना मुक्त करावें व सर्व मनुष्यजातीने स्वतंत्रतेने व बंधुभावाने परमेश्वरी आज्ञेचें पालन करावें.

हा मॅझिनीच्या राजकीय मतांचा व कार्यक्रमाचा मथितार्थ आहे. हा नकाशा पुढे ठेवून अिटली स्वतंत्र झाली. या कार्यात मॅझिनीप्रमाणेच अनेक थोर विभूतींनी दिव्य कृत्यें केलेली आहेत व ते सर्व अितिहासाला वंदनीय झाले आहेत. अिटलीच्या भाग्याची धन्य आहे! जिच्यामध्ये भगवान् मॅझिनी जन्मास येतो, जिच्यासाठी ग्यारिबाल्डीचे रक्तबिंदु खर्च होतात, जिच्या सेवेसाठी मानिन हा बद्धपरिकर होऊन सज्ज होतो, जिच्यावर मामेली हा कवि कविता करतो व जिला स्वातंत्र्य-देवी वश होते त्या अिटलीच्या भाग्याची धन्य आहे! अनेक देश पारतंत्र्यात पडलेले असताना आपल्या सत्कृत्याने जी भूमि स्वातंत्र्यलक्ष्मीला आपल्याकडे सर्वांच्या आधी वेधून नेते त्या अिटलीच्या भाग्याची धन्य आहे! ज्यांचा जन्म परतंत्रतेत झालेला आहे, परंतु जे आपल्या पराक्रमाने त्या परतंत्रतेचें निर्दालन करून आपला स्वदेश स्वतंत्र झालेला पाहतात व स्वतःचे कर्तबगारीने दास्यमुक्त केलेल्या भूदेवीचे अंकावर आपलें शुभ्र मस्तक ठेवून निन्मय होतात, त्यांच्या आनंदाला सीमा नाही! जर जगात काही निर्मल सुखाचे क्षण असतील तर त्याच्यात तो क्षण शुद्ध सुखाची परम सीमा करणारा होय की, ज्या क्षणी, आपल्या अत्यंत प्रिय देशजननीला ज्याने असह्य दु.ख दिलें तो शत्रु मार खात खात देशाच्या हद्दीबाहेर पळून चाललेला आहे हे पाहता येते. जर निर्भेळ धन्यतेचा अेखादा दिवस असेल तर तो तोच होय की, ज्या दिवशी देशजननीला पूर्ण स्वातंत्र्य मिळवून रणांगणा-तून देशभक्त परतत आहेत व त्या स्वातंत्र्यासाठी पतन पावलेल्या देशवीराच्या आत्म्यांना संबोधून अशी गर्जना करीत आहेत की, "देशवीर हो, आपला देश स्वतंत्र झाला आहे! तुमच्या रक्ताचा सूड अुगविला आहे!" हें सुख व ही धन्यता ज्या थोडया महात्म्यांच्या नशिबी आहे, त्यात भगवान् मॅझिनीची गणना आहे. १८४८-नंतरचा जीवन वृत्तान्त मॅझिनीने लिहिलेला नाही. १८५९-साली अिटलीमध्ये राज्यक्रांतीची दुसरी लाट अुसळली. तेव्हा पुन्हा मॅझिनीने रणात अुडी घेतली. त्या वेळेला निम्मेवर अिटली स्वतंत्र झाली. मग १८६६ साली व्हेनिस स्वतंत्र झाले, व १८७० साली रोम स्वतंत्र झाले १८७१ साली मॅझिनीच्या आयुष्याची तीन चतुर्थांश स्वप्नें खरीं झालीं. १८७१ साली त्या महात्म्याच्या नेत्रांचे बहुतेक पारणे फिटलें! सर्व अिटली स्वतंत्र झाली. सर्व अिटली अेकराष्ट्र झाली. सर्व अिटली जिवंत झाली, व त्या स्वतंत्र, अेकराष्ट्रीय आणि चैतन्ययुक्त अिटलीची रोम राजधानी झाली. हजारो वर्षें रोमची व अिटलीची ताटातूट झाली होती. ती ताटातूट संपून या भाग्यशाली दिवशी रोमवर स्वतंत्र अिटलीचें निशाण फडकू लागले! तीस वर्षांपूर्वी ज्या रोममध्ये लोकसत्तेच्या प्रतिनिधित्वाचा अधिकार गाजविला होता, ज्या रोमसाठी "रोम, रोम! रोममध्ये मृत्यु नाही, रोममध्ये अशुभ नाही, रोम माझी प्रीति आहे. रोम माझा प्राण आहे!" म्हणून सदोदित टाहो फोडला जात होता, त्या रोममध्ये मॅझिनी प्रवेश करता झाला! त्या वेळेस त्याच्या हृदयात काय विचार

असतील ? अखेर अिटली स्वतंत्र झाली ! रोमवर स्वातंत्र्याचें निशाण डौलत आहे व आस्ट्रियाच्या निशाणाचे तुकडे रस्त्यांतून पोरगोरांच्या पायाखाली तुडविले जात आहेत! हे पाहून पाळीग पर्यंत असी त्याला स्वतःचा असा देश नव्हता व हद्दपार होऊन देशोदेशीला लागून त्याचें सर्व आयुष्य गेलें होतें तरी त्या यदक देशभक्ताचें पारणें त्या दिवशी फिटलें असेल नाही काय ? मॅझिनीचे सुरुंगात कोंडून ठेवलेला १८३१ सालचा मॅझिनी व १८७१ सालची स्वतंत्र अिटलीच्या, अेकराष्ट्रीय अिटलीच्या, त्या स्वतंत्र राजधानीत–रोममध्ये–प्रवेश करणारा मॅझिनी ! कोणी अिटलीचा चित्रकार हीं दोन चित्रें रंगवील काय ?

अिटली देश स्वतंत्र व अेकीकृत झाल्यावर मॅझिनीची अेक अिच्छा राहिली होती. ती अिच्छा म्हणजे लोकसत्ता ही होय. परंतु त्याला या लोकसत्तेची काही खात्री झालेली नव्हती. "या जन्मात नाही तर अितरत्र कोठे तरी अिटलीवर लोकसत्तेचें निशाण फडकलेले पाहून मी कृतकृत्य होअीन" ही त्याची खात्री होती. परतु दुःखाची गोष्ट अशी आहे की, बहुतेक अिंग्रजी ग्रंथकारांनी मॅझिनीला या 'वेडेपणा'बद्दल दोष दिलेला आहे. त्यांच्या मतानें मॅझिनी हा महान् तत्त्ववेत्ता व भविष्यवादी होता. परंतु त्याला व्यवहारज्ञान नव्हतें. त्याला लोकसत्तेचा 'भ्रम' झालेला होता! लोकसत्तेचाच का ? मॅझिनीला अिटलीच्या स्वातंत्र्याचा, राष्ट्रैक्याचा व समतेचाही 'भ्रम' झाला नव्हता का? त्या वेळच्या लोकांनी मॅझिनीच्या ह्या महत्त्वाकांक्षानाही मनोराज्येंच म्हटलें नव्हते काय ?. पण तीं मनोराज्यें आज सत्य झालेली दिसत आहेत. तसाच हा लोकसत्तेचा 'भ्रम'ही सत्य कशावरून होणार नाही? ज्याने राखेच्या ढिगाऱ्यातून जिवंत राष्ट्र निर्माण केले, त्या मॅझिनीला अिंग्रज ग्रंथकार 'व्यवहारचतुरते'चे शिक्षण देत आहेत ! मॅझिनीची महत्त्वाकांक्षा लोकसत्तेपर्यंत पोचली ह्यातच त्याच्या भविष्यवादित्वाचा विजय आहे. तशी ती पोचली नसती तर मात्र त्याची दृष्टि अिंग्रजी राष्ट्राच्या अितकीच खुरटी होती व ती राजसत्तेच्या पलीकडे जाऊ शकली नाही असे म्हणावे लागते परतु मॅझिनीची नीतिमीमांसा ही अिंग्रजांच्या नीतिमीमांसेसारखी पोटगळू नव्हती. त्याने अिंग्रजी राष्ट्रातील अनीतिमान् व पापकारक राजनीतीवर येता जाता कडाके अुडविले आहेत म्हणून का तो व्यवहारकुशल ठरत नाही? मॅझिनी व्यवहारकुशल नाही हें अुघडच आहे! कारण त्याने कोठे दुसऱ्याची पत्रें फोडून, वाचून व त्यातील मजकूर दुसऱ्यास कळवून आपले व्यवहारकौशल्य गाजविलें आहे ! मॅझिनी व्यवहारकुशल नाही हें अुघडच आहे, कारण त्याने, "अिटली स्वतंत्र होताच तिने बाकी सगळ्या राष्ट्रांना गुलाम करीत सुटावे" असें सांगण्याच्या ऐवजी, "आपण स्वतंत्र होअूनच काम भागत नाही, तर आपण अितर देशांना स्वतंत्र केले पाहिजे" असें सांगण्याचा विनधोरणीपणा केला! मॅझिनीची परीक्षा स्वार्थलंपट राष्ट्राला कशी व्हावी ? परतु त्यांनी जरी त्याला वेडा ठरविला तरी अखेर तो अितिहासदेवीचा ताअीत झालाच झाला.

मॅझिनीने लोकसत्तेसाठी जरी अश्रात श्रम केले तरी त्याने हें हजारो वेळा स्पष्ट जाहीर केलें होतें की, " प्रथम स्वातन्त्र्य, मग अैकी व मग लोकसत्ता." याचप्रमाणे त्याने शक्य तेव्हा तेव्हा वर्तनही केलें व अिटली स्वतंत्र झाल्यावर त्याने लोकसत्तेचा जो अुपदेश केला, तो प्रसिद्ध रीतीने केलेला आहे. कारण त्याची व मनुष्यजातीच्या अुत्क्रांतीचें ज्याने ज्याने सूक्ष्म निरीक्षण केलें आहे त्याची त्याची अशीच खात्री आहे की, 'आता लोकांचें युग आलेलें आहे.' आता, आज नाही, अुद्या, पण लोकसत्तेचान जयजयकार होणार आहे! मॅझिनीने जें निशाण अुभारलेलें होतें, ते परमेश्वरापर्यंत पोचणारें निशाण होतें. या निशाणाचा अग्रभाग जरी अदूरदृष्टि लोकाना दिसला नाही तरी तो त्याला स्पष्ट दिसत होता. लहान पक्षी अेखाद्या टेकडीवर अुडत जाअून बसले म्हणजे त्यांना मतकृत्य केल्यें बाटतें. मॅझिनी हा गरुड होता. त्याने त्या टेकाडावरच समाधान कसें मानावें? तो कालाच्या आकाशात भराऱ्या घेत गेला व तेथून लोकसत्तेच्या स्तोत्राचें गीत गाअू लागला.

मॅझिनीचे आयुष्यात दोनदा लोकसत्तेचा विजय होण्याचा बेत आला होता. तेव्हा जर तो अितर लोकांच्या स्वार्थपरायणतेने फसला नसता, तर मॅझिनीच्या अितर 'स्वप्ना'प्रमाणेच तेंही स्वप्न आज खरें झालें असतें. तें आज तसें झालें नाही म्हणून काय झालें? मॅझिनीचा आत्म्याच्या अमरत्वात व कालाच्या अनन्ततेत विश्वास होता, आणि लोकसत्ता ही नीतियुक्त राज्यपद्धति आहे हें त्याने सिद्ध केलें होतें. तत्त्व बरोबर आहे कीं नाहीं हा मुख्य प्रश्न होता. त्याचा विजय आज होणार कीं अुद्या होणार हा गौण भाग आहे. अत्यंत आनंदाची गोष्ट ही आहे की, भगवान् मॅझिनीची खरी योग्यता अितर कोणी न जाणली तरी तीं त्याच्या स्वदेशबधूंनी पूर्ण जाणलेली आहे. तो महात्मा ज्या दिवशी अिहलोकाचीं सर्व कर्तव्यें पूर्ण करून— ऑस्ट्रियाच्या निशाणाखाली नव्हे तर—स्वतंत्र अिटलीच्या निशाणाखाली पंचत्वाप्रत पावला त्या दिवशी रोममध्ये अिटलीच्या पार्लमेंटने राष्ट्रीय सुतक पाळण्याचा ठराव केला. त्याच्या अपरिमित स्वार्थत्यागाची व त्याच्या अनवरत स्वदेशसेवेची मुख्य प्रधानाने वक्तृत्वपूर्ण भाषेत प्रशंसा केली. जिनोआमध्ये त्या महात्म्याच्या जडदेहाचा अुत्तरविधि चालला असताना हजारों अिटालियन लोक आपल्या देशपित्याच्या शेवटच्या दर्शनासाठी दाटी करू लागले व ते शेवटचें दर्शन होताच अर्भकाप्रमाणे रडू लागले. अेका मनुष्याच्या मृत्यूसाठी अितका अश्रुपात जगावर केव्हांही झाला नसेल!

परमेश्वराच्या घरी प्रत्येक देशाकरिता अेकेक मॅझिनी ठेवला असेल तर कोणाळाच अिटलीचा हेवा करण्याचें कारण नाही!

लंडन,
अिंडिया हाअुस,
ता. २८ सप्टेंबर १९०६

विनायक दामोदर सावरकर

स्वातंत्र्यवीर सावरकरांचें हस्ताक्षरात–

(अठराशे)

# सत्तावनचें स्वातंत्र्यसमर

भाग १ ला

## ज्वालामुखी

॥ रणीं राष्ट्र स्वातंत्र्ययुद्धासि ठेलें ॥
॥ मरे बाप, बेटे लढायासि आले ॥
॥ किती भिन्न रूपें; किती भंग होतो ॥
॥ तरी लाभ अंतीं जयालाच देतो ॥ १ ॥

विनायक

# अठराशे सत्तावनचें स्वातंत्र्यसमर

## भाग पहिला

## ज्वालामुखी

### प्रकरण पहिलें

## स्वधर्म नि स्वराज्य

धर्मासाठी मरावें, मरोनि अवघ्यांसि मारावें, ।
मारिता मारिता घ्यावें, राज्य आपुलें ॥ —रामदास

अेखादें लहानमें घर बाधावयाचें असलें तरीही त्या घराचा तोल संभाळला जाअील अितका भक्कम पाया बाधण्यात येतो. पाया भक्कम व घराच्या वजनाचा तोल सभाळणारा असल्याशिवाय त्या पायावर अुभारलेले घर हें पत्त्यांच्या तंबूहून जास्त भव्य व विशाल कधीही अुठविता यावयाचें नाही, हे अशिक्षित मनुष्यासही समजत असते. परंतु हे अगदी मनुष्यालाही अवगत असणारें व्यवहारज्ञान विसरून जाअून जेव्हा अेखादा लेखक प्रचंड क्रांतिरचनेचा अितिहास देताना त्या क्रांतीची ती भव्य व विशाल अिमारत तोलण्यास मूलभूत असणारा पाया कोणचा होता याची मीमांसा करीत नाही किंवा ते प्रचड क्रातिमदिर अेखाद्या गवताच्या काडीवर अुभारलेलें होतें असे वरळन मुटतो तेव्हा तो वेडगळ तरी असतो किंवा भामटा तरी असतो व ह्या दोहोंतून तो कोणत्याही विशेषणास पात्र असला तरी अितिहासलेखनाच्या पवित्र कृत्यास तो सर्वथैव नालायक ठरतो.

मोठमोठाल्या धर्मक्रान्त्या किंवा राज्यक्रान्त्या याच्या वरवरच्या स्वरूपास असणाऱ्या असबद्धतेची किंवा विभिन्नतेची साखळी त्या क्रात्याचे मुळाशी असणाऱ्या तत्त्वास समजून घेतल्याशिवाय कधीही जुळविता येणार नाही. अनेक चक्रे व अनेक लोहभाग यानी युक्त असणारें अेखादे भव्य यत्र प्रचड शक्तीचीं कामे करीत असताना ती शक्ति कोणच्या यन्त्रशास्त्रीय नियमाने अुत्पन्न केलेली आहे हे पूर्ण रीतीने कळल्याशिवाय प्रेक्षकामध्ये आश्चर्याने अुत्पन्न होणारी विस्मयता अुद्भवेल. परंतु ज्ञानाने येणारी मार्मिकता मात्र कधीही आढळणार नाही. फ्रेंच राज्यक्रांति किंवा हॉलंडमधील धर्मक्रांति यासारखी अद्भुत कृत्यें जेव्हा वाचकाना व लेखकाना

आपल्या मध्यतेने चकित करतात तेव्हा त्या त्यांच्या भव्यतेने गोंधळून जाऊन वाचकांची दृष्टि व लेखकांची लेखणी ही त्यांचे मूलभूत असणाऱ्या मर्मांना विवरण करण्यास धजत नाही. परंतु या मूलमर्मांच्या विवरणाशिवाय त्या क्रांतीचें खरें रहस्य कधीही लक्षात येणारें नसल्याने अितिहासशास्त्रात नुसत्या वर्णनापेक्षा मूलविवरणालाच अधिक महत्त्व दिलेले आहे.

हे मूलविवरण करीत असताना पुष्कळ वेळा अितिहासलेखकांनी आपली अेक चूक घडत असते. प्रत्येक कार्याला काही प्रत्यक्ष व काही अप्रत्यक्ष, काही विशिष्ट व काही सामान्य, काही आकस्मिक व काही प्रधान कारणें कारणीभूत झालेलीं असतात व यांचें वर्गीकरण करण्यातच अितिहासकाराचें खरें कौशल्य असते. परंतु पुष्कळ अितिहासकारांची या वर्गीकरणात तारांबळ अुडून जाअून आकस्मिक कारणानाच प्रधान कारणांचें स्वरूप देण्यात येतें व अेखाद्या घराला आग लागली असता ती आग लावणाऱ्या मनुष्याचे अैवजी त्याच्या हातातील आगकाडीवर सर्व जबाबदारी लादणाऱ्या मूर्ख न्यायाधीशाप्रमाणे तो अितिहासकार हास्यास्पदतेला पात्र होतो. निमित्तकारणांनाच प्रधान कारण समजून अेखाद्या अैतिहासिक प्रसंगाचा अितिहास लिहू लागल्याने त्या प्रसंगाचें खरें महत्त्व कधीही लक्षात येत नाही. किंबहुना ते अद्भुत व क्रांतिकारक प्रसंग असल्या क्षुल्लक कारणाकरिता घडले हें पाहून त्या प्रसंगांबद्दल व त्यांतील व्यक्तींबद्दल अयथार्थबुद्धि अुत्पन्न होअू लागते. यासाठी अैतिहासिक प्रसंगाचा व विशेषतः क्रांतिकारक प्रसंगाचा अितिहास लिहिताना त्यांचें नुसतें वर्णन देअून त्याची बरोबर कल्पना देता येत नाही किंवा त्याचा अुगम त्याच्या निमित्त-कारणापर्यंतच शोधून माघारे फिरल्यानेही त्यांचें यथार्थ स्वरूप जाणता येत नाही; तर ज्याला सत्य, निःपक्षपाती व मार्मिक अितिहास लिहावयाचा असेल त्याने त्या प्रसंगाची व त्या क्रांतींची अुभारणी कोणत्या पायावर केलेली होती, त्यांच्या मुळाशी काय तत्त्व होते व त्यांची प्रधान कारणें काय होती याचें पर्यालोचन अवश्य केले पाहिजे.

प्रत्येक क्रांतीच्या मुळाशी कोणते तरी तत्त्व असलेच पाहिजे असें अिटलीचा प्रख्यात तत्त्ववेत्ता व देशभक्त मॅझिनी ह्याने कार्लाअिलच्या फ्रेंच राज्यक्रांतीवरील पुस्तकावर टीकात्मक लेख लिहिताना म्हटलेले आहे. क्रांति म्हटली म्हणजे अितिहासातील मनुष्यजातीच्या आयुष्याची अुलथापालथ होय. लाखो व्यक्ति ज्यासाठी झटतात, राजांची सिंहासने ज्यासाठी डळमळू लागतात, असलेले मुकुट फुटले जाअून नवलेले मुकुट ज्यासाठी अुत्पन्न होतात, स्थापिलेल्या मूर्तींचा भंग व नवीन मूर्तींची अुत्थापना हीं ज्यासाठी होतात व ज्याच्यापुढे रक्ताचे पूर वाहविण्याची काहीच कथा नाही, असे प्रचंड समूहाला वाटू लागते अशा अेखाद्या क्षोभकारक तत्त्वाशिवाय दुसऱ्या कोणच्याही क्षुल्लक व क्षणिक पायावर क्रांतीची अिमारत अुभारली जाणें शक्य नाही. प्रत्येक क्रांतीच्या मुळाशी असणारें हें तत्त्व ज्या मानाने पवित्र किंवा

अपवित्र असेल त्या मानाने त्या क्रांतीतील कार्यकर्त्या व्यक्तींची स्वरूपें व कृत्यें पवित्र किंवा अपवित्र ठरत असतात. हेतूवरून कृत्यांची परीक्षा जशी व्यवहारात केली जाते त्याचप्रमाणे अितिहासातही व्यक्तींच्या किंवा राष्ट्रांच्या हेतूवरुन त्याच्या कृत्याचें स्वरुप ठरत असतें. ही कसोटी सोडून दिली असता अेखाद्या व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीला मारणें व अेखाद्या सैन्याने दुसऱ्या सैन्याला मारणें ह्यात काहीच भेद राहणार नाही. साम्राज्यासाठी झालेल्या शिकंदराच्या स्वाऱ्या व अिटलीच्या स्वातंत्र्यासाठी झालेल्या ग्यारिबाल्डीच्या स्वाऱ्या ह्या सारख्याच किंमतीच्या ठरतील. ह्या भिन्न कृत्यांचें यथायोग्य परीक्षण होण्यास जसा त्यांचा हेतु समजावून घेतलाच पाहिजे त्याचप्रमाणे प्रत्येक क्रांतीचें यथायोग्य विवेचन होण्यास तिचा हेतु काय होता, तिच्या अंतर्यामीची अिच्छा काय होती, कोणच्या तत्त्वांतून ती अुद्भवली होती हे अवश्य पाहिलें पाहिजे.

सारांश, अैतिहासिक क्रांतीच्या अितिहासलेखकानें त्या क्रांतीतील वरवर असंबद्ध दिसणाऱ्या प्रसंगाना किंवा तिच्या अद्भुततेला पाहून तिथेच स्तिमित होअून न बसता तिच्या अुगमाकडे शोध करीत गेले पाहिजे. अितकेच नव्हे, तर त्या शोधात भरतत्याच व आकस्मिक निघालेल्या फाटचास सोडून अगदी मूलतत्त्वापर्यंत शोध लावला पाहिजे, व मग त्या तत्त्वाची दुर्बीण घेअून त्या क्रांतीच्या विस्तीर्ण प्रदेशाचें निरीक्षण केले पाहिजे. अशा रीतीने आरंभ केल्यास अनेक असंबद्ध प्रसंगात पूर्ण संबद्धता दिसू लागते, वक्ररेषा सरळ भासू लागतात व सरळ रेषा वक्र भासू लागतात. अंधकारात प्रकाश दिसू लागतो व प्रकाशात अंधकार दिसू लागतो, नीचतेत अुच्चता व अुच्चतेत नीचता दृग्गोचर होते, विद्रूपतेत सुरुपता व सुरुपतेत विद्रूपता आढळते व अपेक्षित किंवा अनपेक्षित रीतीने परंतु स्पष्ट स्वरुपाने ती क्रांति ही अितिहासाच्या दृष्टोत्पत्तीस येते.

परंतु हिंदुस्थानात अि. स. १८५७ साली घडलेल्या प्रचंड राज्यक्रांतीचा अितिहास अशा शास्त्रीय पद्धतीने कोणीही स्वदेशी किंवा विदेशी ग्रंथकारानें लिहिलेला नसल्याने त्या क्रांतियुद्धाबद्दल लोकांत विलक्षण, भ्रामक व दुष्ट समजुती प्रचलित झालेल्या आहेत. वर वर्णन केलेले सर्व दोष ह्या क्रांतियुद्धाच्या अिंग्रजी लेखकानी केलेले आहेत. काही लेखकानी त्याचें वर्णन देण्यापलीकडे प्रयत्नच केला नाही. परंतु बहुतेकानी तो प्रयत्न दुष्ट बुद्धीने व पक्षपातीपणाने केल्यामुळे त्याच्या दूषित दृष्टीला त्या क्रांतियुद्धाचें मूलतत्त्व दिसलें नाही किंवा दिसत असताही पहावलें नाही.

अि. स. १८५७ सारखी प्रचंड क्रांति हेतूव्यतिरिक्त घडणें शक्य आहे काय? पेशावरपासून कलकत्त्यापर्यंत जी लाट अुसळली ती आपल्या सामर्थ्याने काही तरी विशिष्ट पदार्थ बुडवून टाकण्याच्या हेतूशिवायच अुठणें शक्य होते काय? दिल्लीला पडलेले वेढे, कानपूरला झालेल्या कत्तली, साम्राज्याचे अुभारलेले ध्वज व त्या ध्वजाखाली लढत लढत शूराच्या घारातीर्थात पडलेल्या अुड्या ह्यासारखी अुदात्त

व स्फूर्तिजनक दृश्यें काही असे अत्यंत अुदात्त व स्फूर्तिजनक साध्याशिवाय घडणें शक्य होणें काय ? अेखाद्या आठवड्याच्या भरणारा बाजार देखील काही विशिष्ट हेतूव्यतिरिक्त भरलेला नसतो. मग जो बाजार भरविण्याची तयारी वर्षांवर्षे चाललेली होती, ज्यानें हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत असणाऱ्या प्रत्येक सिंहासनावर अुपडलेली होती, ज्यांत राजांची व साम्राज्यांची देवघेव चाललेली होती व जिथे रक्ताच्या व मांसाच्या नाण्यांशिवाय दुसरें चलनी नाणें कोणी जुमानीत नव्हतें तो बाजार काय अुगीच भरला व अुगीच अुठून गेला ? नाही, नाही. तो बाजार अुगीच भरला असेंही नाही व अुगीच अुठून गेला असेंही नाही. हें कळणें फार कठीण आहे म्हणून नव्हे, तर हें कळूं अगर कबूल करणें हे आपल्या हिताचें न वाटल्याने या मुद्द्याकडे अिंग्रजी अितिहासकारांनी मुद्दाम दुर्लक्ष केलेलें आहे. परंतु ह्या दुर्लक्षाहूनही अधिक फसविणारी व ५७-च्या ह्या क्रांतियुद्धाचें स्वरूप सर्वतोपरी भ्रष्ट करणारी दुसरी युक्ति किंवा दुसरी चूक विजातीय व त्यांची री ओढणाऱ्या स्वजातीय अितिहासकारांनी जी केलेली आहे ती ही होय की, ह्या ५७-च्या प्रलयाचें कारण दुसरें काही नसून मूठभर आपमतलबी लोकांनी अुठविलेली काडतुसांची कंडी होय. अिंग्रजी अितिहासावर व अिंग्रजांच्या लाचलुचपतीवर वाढलेले अेक अेतद्देशीय ग्रंथकार म्हणतात : 'काडतुसास गाअीची व डुकराची चर्बी लावितात अितकें केवळ अैकूनच मूर्ख लोक चिथरले. अैकलेली गोष्ट खरी की खोटी ह्याचा कोणी शोध केला आहे काय ? अेक बोलला म्हणून दुसरा बोलला, आणि दुसरा चिथरला म्हणून तिसरा चिथरला असो अंधपरंपरा चालून अविचारी मूर्खांचा समाज जमला आणि बंड माजलें.

काडतुसांच्या गोष्टीवर लोकानी अंधपरंपरेने विश्वास ठेवला कीं काय ह्याचा निर्णय पुढे ययावकाश होअीलच. परंतु ह्या खऱ्या किंवा खोट्या विश्वासात बंडाचें मूळ होतें ही समजूत करविण्याचा कसा दीर्घ प्रयत्न चाललेला होता हे यावरुन दिसून येअील ५७-सारखी प्रचंड क्रांति असल्या कारणापासून अुत्पन्न होअील हे म्हणणाऱ्या मंद किंवा दुष्ट बुद्धीला क्रांति म्हणजे अेक ' अविचारी मूर्खांचा समाज ' होय असें वाटल्यास त्यात काही आश्चर्य नाही. जर ५७-ची क्रांति ही मुख्यतः काडतुसांवरुनच प्रदीप्त झाली होती, तर तिला नानासाहेब, दिल्लीचे बादशाह, झाशीची राणी किंवा रोहिलखंडचे खानबहादूर स्वान हे का मिळाले? याना अिंग्रजी लष्करात नोकरी धरावयाची नव्हती किंवा धरी बसले तरी ती लष्करी काडतुसे तोडलीच पाहिजेत असाही हुकूम कोणी त्याच्यावर केलेला नव्हता. जर ५७-ची अुठावणी ही केवळ किंवा मुख्यतः काडतुसांच्या चर्वीनेच झाली होती तर हिंदुस्थानावरील अिंग्रजी गव्हर्नर-जनरलने तीं न वापरण्याचा हुकूम सोडल्यावरोबर ती झटकन थांबलीही असती. परंतु शिपायानी आपल्या हाताने आपलीं काडतुसें बनवावीं अशी सरकारी परवानगी मिळाल्यावरही तिचा अुपयोग करुन घेण्याचे अंवजी किंवा लष्करी नोकरी सोडून

-सर्वच कटकट मिटविण्याचे अैवजी लष्करी शिपायांनीच नव्हे, तर लष्कराशी ज्यांचा अर्थाअर्थी संबंध नाही अशा लाखो लोकांनी, राजांनी व महाराजांनी आपले प्राण रणांगणात का खर्च केले? लष्करी व बिनलष्करी, राजा व रंक, हिंदु व मुसलमान या सर्वांना स्फुरण येण्यास असलेल्या किरकोळ गोष्टी कारणीभूत होत नसतात तर त्या गोष्टींच्या मुळाशी असणारें तत्त्व त्यास कारणीभूत होत असतें.

काडतुसांची भीति हें बंडाचें प्रमुख कारण आहे हया म्हणण्यात जितकी अयथार्थता आहे तितकीच त्या बंडाचा अुगम केवळ अयोध्येच्या राज्याला खालसा करण्यात आहे या म्हणण्यात दिसून येअील. अयोध्येच्या राज्यातील हिताहिताशी ज्यांचा काही अेक संबंध नव्हता असे किती तरी लोक या भयंकर क्रांतीत हातावर शिर घेअून लढत होते! मग त्या लढण्यात त्यांचा काय हेतु होता? खुद्द अयोध्येचे नबाव तर कलकत्त्याच्या किल्ल्यात अटकेत पडलेले होते व त्यांची प्रजा अिंग्लिश अितिहास-काराच्या म्हणण्याप्रमाणे नबाबाच्या अंमलाला अत्यंत नाखूष झालेली होती. मग पंजाबापासून तो बंगालपर्यंत फक्त राजेच नव्हेत किंवा लष्करी लोकच नव्हेत तर प्रत्येक अस्सल हिंदी मनुष्य आपली समशेर अुपसून कां अुभा राहिला? सत्तावनच्या क्रांतीबद्दल अेक लेख बंगालच्या कोणी 'हिंदू'ने त्या वेळेसच अिंग्लंडात प्रसिद्ध करविला होता. त्यात तो हिंदु म्हणतो: "ज्यानी अयोध्येच्या नबाबाला कधी जन्मात सुद्धा पाहिलेले नव्हते किंवा पुढेही बघण्याचा संभव नव्हता, असे किती मरळ व दयाई लोक आपआपल्या झोपडीत नबाबाचीं दुःख सांगताना ढसढसा रडत असत, याची कल्पना तुम्हाला नाही! व हे अश्रु गळून गेल्यानंतर प्रत्यक्ष स्वत वरच हा क्रूर प्रसंग गुदरल्याप्रमाणे वजीद अल्लीशाह याच्या अपमानाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा किती शिपाअी दररोज करीत होते हेही तुम्हास माहीत नाही."[1]

---

१. हा लेख अिंडिया ऑफीसच्या लायब्ररीत आहे. हा लेख अनेक दृष्टींनी फार महत्त्वाचा आहे. या लेखातील पुढील अुतारा दिल्याशिवाय राहवत नाही.

"Your (Englishmen's) conduct has all along been mean and pettifogging. You accuse our ancient Mogal rulers of despotism. They were despotic to some extent; but, on the whole, they knew how to govern an empire – you know how to keep a shop They had a large mind; you have an ingenious and a crafty one. They could conceive of grand projects. Despite their faults, they were loved by a grand people like us. They settled in the country and tried to improve it. Your servants come here only to make money and go home as soon as they have satisfied themselves on that score. Indeed, in as much as we have come to know you, we have learnt to dispise you. With increasing

(टीप पुढील पानावर चालू)

हया शिपायांना ही सहानुभूति कां वाटू लागली व ज्यांनी नवाबांना जन्मांत पाहिलेलेंही नव्हतें त्यांचे डोळे व कंठ कां भरून आले? तेव्हां अयोध्येचें राज्य खालसा केल्यानें बंड अुद्भवलें नाहीं तर हीं राज्यें खालसा करण्यांत ज्या तत्त्वाचा अुपमर्द होत होता त्या तत्त्वांमुळें बंड अुत्पन्न झालें. काडतुसांची भीति किंवा अयोध्येचें खालसा केलेलें राज्य हीं आनुषंगिक व आकस्मिक कारणें होत. हयांनाच प्रधान कारण समजलें असता सत्तावनाच्या क्रांतीचें खरें स्वरूप कधींही कळणार नाहीं.

ह्या निमित्तकारणानाच मूलकारणांचें स्वरूप दिल्यास त्याचा असा अर्थ होअील कीं, जर हीं विशिष्ट कारणें घडलीं नसतीं तर त्यांचें कार्यही घडलें नसतें— जर काडतुसांची भीति नसती किंवा अयोध्येचें राज्य खालसा केलें गेलें नसतें तर १८५७-ची क्रांति घडली नसती. परंतु ह्या समजाहून वेडगळ व भ्रामक असा दुसरा समज सापडणें शक्य नाहीं. काडतुसाची भीति अुत्पन्न झाली नसती तरी क्रांति घडलीच असती. कारण त्या भीतीच्या मुळाशी असणारें तत्त्व हें दुसऱ्या अेखाद्या प्रसंगांत दृग्गोचर झालें असतें व अयोध्येचें राज्य खालसा झालें नसतें तरीही हें क्रांतियुद्ध झालेंच असतें. कारण त्या राज्याच्या खालसा करण्याचे मुळाशी असलेलें तत्त्व आपलें दुसऱ्या अेखाद्या राज्याच्या खालसा करण्यांत प्रादुर्भूत झालें असतें. फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीचें प्रधान कारण जसें धान्याच्या वाढलेल्या किंमती किंवा बॅस्टाअिल किंवा राजाचें पॅरिस सोडून जाणें, किंवा मेजवानीचा रंग हें नव्हे, तद्वतच वरील आकस्मिक व विशिष्ट प्रसंग हीं हया प्रचंड क्रांतीचीं प्रधान कारणें नसून केवळ निमित्तभूत निमित्तें होत. सीताहरण हें रामायणाचें जसें केवळ निमित्त झालें त्याचप्रमाणें वरील सर्व लहानमोठीं कारणें हीं निमित्तें असून मुख्य प्रधान कारणें म्हटलीं म्हणजे त्यांच्या मुळाशी असलेलीं तत्त्वेंच होत.

हीं तत्त्वें कोणतीं होतीं? हजारो शूरांच्या तरवारी त्यांच्या म्यानांतून ओढून काढून रणांगणांत चमकविणारीं हीं तत्त्वें कोणतीं होतीं? निस्तेज झालेल्या मुकुटांना सतेजता देणारीं व मोडून पडलेल्या ध्वजांचें पुनरुद्धरण करणारीं हीं तत्त्वें कोणतीं होतीं? ज्यांच्यावर हजारो व्यक्तींनीं आपल्या अुष्ण रक्ताचा अभिषेक वर्षानुवर्ष अखंड प्रेमानें सुरू ठेवावा तीं हीं तत्त्वें कोणतीं होतीं? मौलवींनीं ज्यांचा अुपदेश करावा, ब्राह्मणांनीं ज्यांना 'विजयी भव' म्हणून आशीर्वाद द्यावे, दिल्लीच्या मशिदींतून व काशीच्या देवळांतून ज्यांच्या यश प्राप्तीसाठीं परमेश्वराकडे दिव्य

---

(टीप मागील पानावरून चालू)

knowledge we have known that the Anglo-Saxon race is selfish and hypocritical in the extreme and always unprincipled in matters of gain!" हा लेख सुमारें २५ पानांचा असून तो दि. १३ ऑक्टोबर १८५७ रोजीं प्रसिद्ध झालेला आहे

प्रार्थना धाडण्यात याव्या, ज्याच्या साह्यासाठी श्रीमत् हनुमानजीनें कानपूरच्या रणांगणावर हुंकार करू लागावा व ज्यासाठी झाशीच्या महालक्ष्मीनें गौरनिराभाच्या रक्तात भिजलेली आपली पुराणप्रसिद्ध तरवार पुन्हा उपसू लागावें अशी हीं तत्त्वें कोणतीं होतीं ?

हीं १८५७ च्या क्रांतीचीं प्रधान कारणें असलेलीं दिव्य तत्त्वें म्हणजे 'स्वधर्म व स्वराज्य' हीं होत. आपल्या प्राणप्रिय धर्मावर भयंकर, विघातक व कपटप्रचुर हल्ला आलेला आहे असें यथार्थ रीतीनें दिसू लागताच स्वधर्मरक्षणार्थ जी 'दीन दीन' ही गर्जना सुरू झाली, त्या गर्जनेंत व आपल्या निसर्गदत्त स्वातंत्र्याला कपटीपणानें हिरावून आपल्या पायांत राजकीय गुलामगिरीच्या शृंखला घातल्या गेल्या हें पाहताच स्वराज्यसंपादनाच्या पवित्र अिच्छेनें त्या दास्यशृंखलेवर केलेल्या प्रचंड आघातांत या क्रांतियुद्धाचें मूळ आहे. स्वधर्मप्रीति व स्वराज्यप्रीति हीं तत्त्वें हिंदुस्थानच्या अितिहासांत जितक्या स्पष्टतेनें व अुदात्ततेनें दिसतात त्याहून अधिक कोणत्या अितिहासांत दिसणार आहेत ? परकीय व आपमतलबी अितिहासकारांनी त्या दिव्य हिंदभूचें चित्र कितीही घाणेरड्या रंगांत काढलेलें असलें तरी जोपर्यंत आमच्या अितिहासाच्या पानावरील चितोडचें नांव पुसलेलें नाही, सिंहगडचें नांव पुसलेलें नाही, प्रतापादित्याचें नांव पुसलेलें नाही किंवा गुरु गोविंदसिंगाचें नांव पुसलेलें नाही तोपर्यंत हीं स्वधर्म व स्वराज्याचीं तत्त्वें हिंदुस्थानच्या रक्तमांसांत खिळून राहणारीं आहेत ! त्यांच्यावर क्षणभर गुलामगिरीच्या भ्रमाचे ढग येवोत—सूर्यावरदेखील ढग येतात—परंतु तो क्षण संपतो न संपतो तों त्या तत्त्वसूर्याच्या ज्वलततेनें ते वितळून जातील यांत मुळीच शंका नाही.

स्वराज्यासाठी हिंदुस्थानने कोणचे प्रयत्न केलेले नाहीत व स्वधर्मासाठी हिंदुस्थानने कोणचें दिव्य अंगीकारलें नाही ? "सूरा सो पचानिये जो लडे दिनके हेत । पुरजा पुरजा कट मरे तवहू न छोडे खेत ।" (गुरु गोविंदसिंह). अशा रीतीनें स्वधर्मासाठी रणांगणावर तिळतीळ तुकडे झाले तरी जे हटत नाहीत अशा प्रसंगानी भरतभूमीचा अितिहास आपूर्ण भरलेला आहे.

या परंपरागत व दिव्य तत्त्वांचा संचार होण्यास १८५७ साली जितकीं कारणें होतीं तितकीं पूर्वी फारच थोड्या वेळेस घडून आलेलीं होतीं. या विशिष्ट प्रसंगानीं हिंदभूमीच्या अंगात किंचित् सुप्तवत् झालेल्या या मनोवृत्तींना विलक्षण चेतना दिली व स्वधर्म व स्वराज्यासाठी लोकराशि सज्जचाप होअू लागल्या. दिल्लीचे बादशहानी काढलेल्या स्वराज्यसंस्थापनेच्या जाहिरनाम्यात ते म्हणतात : "हिंदवासीयानो, जर आपण सर्वजण मनात आणू तर शत्रूचा क्षणार्धात धुव्वा अुडवून देअू व आपल्या प्राणप्रिय धर्माला व प्राणप्रिय देशाला पूर्ण भयमुक्त करू ![२]

२. दिल्लीचा जाहिरनामा 'Lackey's Fictions Exposed.'

ह्या जाहिरात असलेल्या दिव्य तत्त्वांसाठी जी क्रांति होते, आपल्या प्राणप्रिय धर्माला व आपल्या प्राणप्रिय देशाला बंधमुक्त करण्यासाठी जें क्रांतियुद्ध होतें त्या क्रांति-युद्धाहून पवित्र असें जगांत दुसरें काय आढळणार आहे? स्वदेशरक्षण, स्वराज्य संस्थापन व स्वधर्म परित्राण यांसाठी दिल्लीच्या सिंहासनावरून प्रार्थना केलेल्या या स्पष्ट, दिव्य व स्फूर्तिजनक मंत्रांतच १८५७-च्या क्रांतीचें बीज आहे! बरेलीला छापून प्रसिद्ध केलेल्या व अयोध्येच्या नवाबानी काढलेल्या दुसऱ्या अेका जाहिर-नाम्यात ते म्हणतात: "हिंदुस्थानांतील सर्व हिंदूंनो व मुसलमानांनो, अुठा! स्वदेश बांधवहो, परमेश्वराने दिलेल्या देणग्यांत अत्यंत श्रेष्ठ देणगी म्हणजे स्वराज्य (sovereign) हीं होय. ही अीश्वरदत्त देणगी ज्याने आपल्यापासून फसवून, हिसकावून नेली आहे त्या जुलमी राक्षसाला तो फार दिवस पचेल काय? हें अीश्वरी अिच्छे-विरुद्ध असलेलें कृत्य फार दिवस जयास जाअील काय? नाही, नाही! अिंग्लिशांनी अितके जुलूम केलेले आहेत की, त्यांच्या पापाचे घडे पूर्वीच तुडुंब भरलेले आहेत! व त्यात आता आपल्या पवित्र धर्माचा नाश करण्याची त्यांना दुर्बुद्धि सुचली! आता तुम्ही अजूनही स्वस्थ बसणार काय? तुम्ही स्वस्थ बसावें अशी परमेश्वराची अिच्छा नाही. कारण सर्व हिंदूंच्या व मुसलमानांच्या हृदयात त्याच्याच अिच्छेनें या फिरंग्यांना आपल्या देशातून हाकून देण्याची बुद्धि अुत्पन्न झालेली आहे ... व परमे-श्वराच्या अिच्छेने व तुमच्या पराक्रमाने लवकरच त्यांचा अितका पूर्ण नायनाट होअील की, ह्या आपल्या हिंदुस्थानात त्यांचा मागमूसमुद्धा अुरणार नाही! ... लहान थोर हे सर्व क्षुल्लक भेद विसरून जाअून ह्या सैन्यात सर्वत्र समताच नांदली पाहिजे. कारण जे जे पवित्र धर्मयुद्धांत स्वधर्मासाठी आपली समशेर अुपसतात ते सर्व सारख्याच योग्यतेचे आहेत! ते भाअीभाअी आहेत! त्यांच्यात मुळीच भेद नाहीत ... म्हणून पुन्हा अेकदा मी सर्व हिंदी बंधूंस म्हणतो की, अुठा व या परमेश्वरी व दिव्य कर्तव्यासाठी रणांगणात अुडी घ्या!"[१]

हीं तत्त्वरत्नें पाहून ज्याला ह्या क्रांतियुद्धाची ओजस्विता भासणार नाही तो अेकतर मद किंवा अेकतर भामटा असला पाहिजे. अीश्वरदत्त हक्कासाठी लढणें हें मनुष्यमात्राचें कर्तव्य होय व म्हणून आपल्या स्वधर्मासाठी व स्वराज्यासाठी त्या वेळच्या हिंदी शूरांनी आपल्या तरवारी अुपसलेल्या होत्या हे सिद्ध करण्यास याहून सबळ पुरावा तो काय देता येणार! भिन्नभिन्न स्थली व भिन्न भिन्न काली निघालेले हे जाहिरनामे या क्रांतियुद्धाच्या मीमांसेवर अेक अक्षरही जास्त लिहिण्याचें कारण अुरू देत नाहीत. हे जाहिरनामे कोणी भलत्यासलत्याने काढलेले नसून सर्ववंद्य व

१. Lackey's Fiction Exposed'. हा जाहिरनामा ह्या क्रांतियुद्धाच्या वेळेस लोकवृत्ति कशा चैतन्ययुक्त झालेल्या होत्या हें दाखविण्यास फारच अुपयोगी आहे-हा पुढे थोड्याबहुत अंशाने दिला जाअीलच.

सर्वाधिकारी तिहासानाचीं तीं शासनपत्रें आहेत ! त्या वेळच्या क्षुब्ध मनोवृत्तीचे ते अुष्ण अुष्ण अुमासे आहेत. भाडभिडेमुळे किंवा भयामुळे जेव्हा त्या मनोवृत्ति दाबून ठेवण्याचें काही अेक प्रयोजन नसतें, अशा रणप्रसंगातील हे अंत:करणाचे स्पष्ट बोल आहेत. ज्या युद्धात " जें जे समशेर अुपसतात ते ते सारख्याच योग्यतेचे असतात " अशा धर्मयुद्धात अुठलेली ही वीरगर्जना 'स्वधर्म व स्वराज्य' या तत्त्वद्वयांचा अुच्चार व जयघोष करीत आहे !

परंतु ही दोन तत्त्वें परस्परांशी विरुद्ध किंवा विभिन्न समजलीं जात होतीं काय ? स्वधर्म व स्वराज्य यांना परस्परांशी अर्थाअर्थी संबंध नाही असा निदान पौर्वात्यांची तरी केव्हाही समजूत नव्हती. मॅझिनीच्या म्हणण्याप्रमाणे स्वर्ग व पृथ्वी यांच्यात अेक जंगी आडकाठी अुभारलेली नसून अेकाच वस्तूचीं हीं दोन टोकें आहेत असीच पौर्वात्य मनाची पूर्वापार यथार्थ व परिपक्व समजूत आहे. आमची स्वधर्माची कल्पना ही स्वराज्याहून भिन्न नाही. तीं दोन्ही साध्य-साधन नात्याने संलग्न आहेत. स्वधर्माशिवाय स्वराज्य तुच्छ होय व स्वराज्याशिवाय स्वधर्म बलहीन होय. स्वराज्य ही अैहिक सामर्थ्याची तरवार स्वधर्म ह्या पारलौकिक साध्यासाठी सदोदित अुपसलेली असावी हा पौर्वात्य मनाचा कल अितिहासात पदोपदी आढळून येअील. पौर्वात्याच्या अितिहासात झालेल्या क्रांत्यांना धार्मिक स्वरूप कां मिळतें, किंबहुना धार्मिक पावित्र्य असल्याशिवाय व धर्मम्लानता असल्याशिवाय प्रचंड क्रांति होणे हें पौर्वात्यांच्या अितिहासाला मुळीच ठाअूक का नाहीं याचे बीजही या धर्माच्या विश्वव्यापक स्वरूपातच आहे. हिंदुस्थानच्या अितिहासात आजपर्यंत अखंडत्वाने व्यक्त होत आलेले हे स्वराज्य व स्वधर्म यांच्या साधनसाध्यत्वाचे तत्त्व या १८५७ च्या क्रांतियुद्धातही व्यक्त झालें यात काही नवल नाही. दिल्लीच्या बादशहानी अगदी प्रथम काढलेल्या जाहिरनाम्याचा अुल्लेख पूर्वी केलाच आहे. त्यानंतर दिल्लीला अिंग्रजाचा वेढा पडून युद्ध भर रंगात आलेले असताना बादशहानी सर्व हिंदवासीयांस अनुलक्षून दुसरा अेक जाहिरनामा काढलेला होता. त्यात ते म्हणतात :४ " जमी राजगान वो रौसाअे हिंदपर वाझे होके तुम वेहामा अुजूः नेकीऔर फय्याजीमें मुस्तऔर अुद्‌अीर हो . . . . . खुदावंनने तुमको ये मर्तबये आली और मुल्क और दौलत और हुकूमत अिसीवास्ते बक्षी है कि तुम अुन लोगोंको जो तुमारे मजहबमें रखना अंदाजी करे गारद करो." आपल्याला अीश्वराने संपत्ति, देश, अधिकार हे कशासाठी दिलेले आहेत ? ते केवळ व्यक्तिविषयक विषयसुखासाठी नसून स्वधर्मसंरक्षणाच्या पवित्र हेतूसाठी होत !

---

४ हा सबंध जाहिरनामा कन्हयालाल यानी प्रसिद्ध केलेल्या 'तारीखे बगावते हिंद' या अुर्दू पुस्तकात जसाच्या तसाच दिलेला आहे. हे गृहस्थ (?) कोण्या चीफ कमिशनराचे 'अिंटरप्रीटर' असून यानी बडवाल्यावर अिंग्रजी अितिहासकाराहूनही जास्त तोंडसुख घेतलेलें आहे !

. परंतु ह्या पवित्र व अंतिम हेतूंची हीं साधनें आतां कोठे आहेत? मागे दिलेल्या जाहिरनाम्यात म्हटल्याप्रमाणे परमेश्वराच्या सर्व देणग्यात अत्यंत श्रेष्ठ अशी स्वराज्याची देणगी कोठे आहे ? दौलत कोठे आहे ? मुल्क (देश) कोठे आहे ? हुकूमत कोठे आहे ? गुलामगिरीच्या प्लेगात हीं सर्व दैविक स्वतंत्रता मृतप्राय झाली आहे. गुलामगिरीचा हा प्लेग कसा संहार करीत आहे हे दाखविण्यासाठी वरील जाहिरनाम्यात, नागपूरचीं, अयोध्येचीं व झाशीचीं स्वराज्यें कशीं बुडीस निघालीं गेलीं याचे मार्मिक वर्णन करून नंतर अशा रीतीने धर्मरक्षणाचीं साधनें गमाविल्यामुळे तुम्ही परमेश्वराचे खरे अपराधी व धर्मद्रोही ठराल अशी जागवणूक दिलेली आहे. " ईश्वराची आज्ञा हीं आहे कीं, स्वराज्य संपादा. कारण स्वधर्मसंरक्षणाचें ते मूल साधन आहे. जो स्वराज्य संपादन करीत नाहीं, जो गुलामगिरीत तटस्थ बसतो तो अधर्मी व धर्मद्रोही होय. म्हणून स्वधर्मासाठी उठा व स्वराज्य संपादन करा !"

" स्वधर्मासाठी उठा व स्वराज्य संपादन करा ! " ह्या तत्त्वाने हिंदुस्थानच्या इतिहासात किती दैविक चमत्कार केलेले आहेत? श्रीसमर्थ रामदासांनी महाराष्ट्राला अडीचशे वर्षांपूर्वी हीच दीक्षा दिली होती ! " धर्मासाठी मरावें। मरोनि अवघ्यांसि मारावें। मारिता मारिता घ्यावें। राज्य आपुलें ! ! "

सत्तावनच्या क्रांतियुद्धाचें हेंच तात्त्विक कारण होय. ह्या क्रांतियुद्धाचें हेंच मन शास्त्र होय. ज्या दुर्बिणीने त्या युद्धाचे स्पष्ट व सत्य स्वरूप दिसेल अशी खरी दुर्बीण म्हटली म्हणजे "धर्मासाठी मरावें। मरोनि अवघ्यासि मारावें। मारिता मारिता घ्यावें। राज्य आपुलें ॥"

ह्या दुर्बिणीतून त्या क्रांतीकडे पाहिले असता किती निराळा देखावा आढळू लागतो ! स्वधर्म व स्वराज्य ह्या पवित्र हेतूंनी जें क्रांतियुद्ध घडलें होतें त्याचें पावित्र्य त्याच्या झालेल्या पराजयाने भंग पावत नाही. गुरु गोविंदसिंगाचे प्रयत्न तादृश रीतीने विफल झाले म्हणून त्याचे दिव्यत्व कमी होत नाहीं किंवा १८४८ साली इटलीमध्ये जी राज्यक्रांतीची जंगी लाट उसळली होती त्यात त्या क्रांतिकारक पुढाऱ्यांचा संपूर्ण पराजय झाला म्हणून त्यांच्या हेतूंचें पुण्यत्वही क्षीण होत नाहीं !

ज. मॅकार्थी म्हणतात : " The fact was that throughout the greater part of the northern and north-western provinces of the Indian peninsula, there was a rebellion of the native races against the English power. It was not alone the Sepoy who rose in revolt – it was not by any means a merely military mutiny. It was a combination of military grievence, national hatred, and religious fanaticism against the English occupation of India. The native princes and the native soldiers were in it. The Mahomedan and the Hindu forgot their old religious antipathies to join against the Christian. Hatred and panic were the stimulants of

that great rebellious movement. The quarrel about the greased cartridges was but the chance spark, flung in among all the combustible material. If that spark had not lighted it, some other would have done the work......The Meerat Sepoys found, in a moment, a leader, a flag and a cause, and the mutiny was transformed into a revolutionary war. When they reached jumna, glittering in the morning light they had all unconsciously seized one of the great critical moments of history and converted a military mutiny into a national and religious war!"[५]

Charles Ball writes: "At length, the torrent overflowed the banks, and saturated the moral soil of India. It was then expected that those waves would overwhelm and destroy the entire European element and that, when the torrent of rebellion should again confine itself within bounds, patriotic India, freed from its alien rulers, would bow only to the independent sceptre of native prince. The moment, now, assumed a more important aspect. It became the rebellion of a whole people incited to outrage by resentment for imaginary wrongs and sustained in their delusions by hatred and fanaticism."[६]

White writes in his Complete History of the Great Sepoy War: "I should be wanting in faithfulness as an historian if I failed to record the admiration, the courage displayed by the Oudhians. The great fault of the Oudh Talukdars from a moral point of view was their having made a common cause with the murderous mutineers. But for this, they might have been regarded as noble patriots fighting in good cause, *pro rage et pro patia*, for the King and the Motherland"— for Swaraj and Swadesh!"

5. History of Our Own Times Vol. III
6. Indian Mutiny Vol. I, page 644.

प्रकरण दुसरें

# कारण परंपरा

स्वधर्म व स्वराज्य या देवतांच्या अधिष्ठानाखालीं ५७ सालीं सुरू झालेल्या या रणमन्त्राचा संकल्प कधीं सोडला गेला होता ? अिंग्रजी अितिहासकारांच्या मता-प्रमाणे या रणमन्त्राचा संकल्प डलहौसी साहेबाच्या कारकिर्दीत सोडला गेला होता. ही त्यांची समजूत अगदी भ्रामक आहे. ज्या क्षणीं हिंदुस्थानच्या शिराज्याला पारतंत्र्यानें पहिला पाय टाकला तेव्हांच! गरीब डलहौसी! त्यांनी विशेष वाअीट तें काय केलें ? हिंदुस्थानची जन्मदत्त स्वतंत्रता हरून घेअून त्यांच्या स्वातंत्र्याचें अिंग्रजी गुलामगिरी व स्वधर्माचें अिंग्रजी खिश्चानिटी देण्याचें पातकी विचार जेव्हां प्रथमतः अिंग्रजी व्यापाऱ्यांचे डोक्यात शिरले तेव्हांच हिंदभूमीच्या अंतःकरणात क्रांतिचेतना ही संचरलेली आहे. सत्तावनच्या क्रांतियुद्धाचें कारण अिंग्लिशांच्या *'चांगल्या अंमलांत' किंवा 'वाअीट अंमलात' नसून ते फक्त 'अंमलातच' आहे.* चांगला किंवा वाअीट हा गौण प्रश्न असून मुख्य प्रश्न 'अंमल' हा आहे. ज्या देशाला हिमालयांनी अुत्तरेकडे व समुद्रदेवतांनी दक्षिणेकडे संरक्षित केलेला आहे, त्या निसर्गवलिष्ठ व निसर्गप्रिय हिंदुस्थानावर अिंग्रजांचा *अनैसर्गिक अंमल* चालू द्यावा की नाही हा मुख्य प्रश्न सत्तावनच्या समरपटावर सोडविला जात होता हें जर सत्य आहे, तर मग ह्या समराची मूळ अुत्पत्ति तेव्हांच झाली असली पाहिजे की जेव्हा हा प्रश्न प्रथम अुपस्थित झाला.

मॅझिनी म्हणतो : " स्वातन्त्र्य हा प्रत्येकाचा निसर्गदत्त हक्क आहे व म्हणून या पवित्र हक्काचा अपहार करू अिच्छिणाऱ्या जुलुमाचा अुच्छेद करणें हें प्रत्येकाचें *निसर्गसिद्ध कर्तव्य आहे. व्यक्तींची, राष्ट्राची व मनुष्यजातीची प्रगति होण्यासाठी* त्यांच्यांत चैतन्य पाहिजे. परंतु जेथे स्वतंत्रता नसते तेथे चैतन्य असणें शक्य नाही. जो लोकाचें स्वातंत्र्य हिरावून घेतो तो लोकाच्या प्रगतीचा विरोध करून परपीडनाचें अक्षम्य पाप करतो. अितकेंच नव्हे तर नकळत सर्व मानवी जातीचे व अतअेव स्वतः-चेच मानेवर कुऱ्हाड मारून घेअून आत्महत्येच्या भयंकर पापाचाही अधिकारी होतो. हीं पापें करून आजपर्यंत कोण तरला आहे ? ही गुलामगिरीची बेडी परमेश्वराच्या अिच्छेविरुद्ध आपल्या मानवी बंधूच्या पायात अडकवून आजपर्यंत कोणाचा पक्ष जयाला गेला आहे ? स्वतंत्रतेच्या व गुलामगिरीच्या झगडयात शेवटी स्वतंत्रतेचाच जय ठरलेला आहे.[१]

मॉर्ले म्हणतो की, अिंग्रजाचा हिंदुस्थानशी असलेला संबंध ही निसर्गाची चेष्टा आहे ! ह्या दोन देशात कोणच्याही प्रकारचें नैसर्गिक बंधन नाही. त्याचें रक्त

---

१. Duties of Man.

निराळें आहे, त्यांचे धर्म निराळे आहेत, त्यांचे हिताहित निराळें आहे.[२] परंतु हें सर्व विसरून जाऊन ज्या साली क्लाअिव्हने आपमतलबाचे व अन्यायाचें साम्राज्य अुभारण्यासाठी प्लासीचे मैदानावर रक्तमांसाचा पाया घातला त्या १७५७ सालीच ह्या क्रांतियुद्धाचा संकल्प सोडलेला आहे !

ह्या स्व-स्वातंत्र्य-संपादन-संकल्पाला अितर कोणत्याही गोष्टींपेक्षा अिंग्रजांचेंच जंगी साह्य झालेलें आहे! त्यांनी ह्या संकल्पित क्रांतियुद्धाचीं बीजें कुठे म्हणून पेरलीं नाहीत? कारण हेस्टिंग्जने काशीत, रोहिल्खंडात व बंगाल्यात तीं बीजें पेरलीं तर वेलस्लीने म्हैसूर, आसजी, पुणें, सातारा व अुत्तर हिंदुस्थानाच्या सुपीक जमिनीत त्यांची पेरणी केली ! या पेरणीला काहीच श्रम पडले नाहीत असें नाही. तरवारींनी व तोफांनी हिंदुस्थानची जमीन नांगरावी लागली. कारण अितर भलत्यासलत्या नांगराना श्रीवर्धनचे तट, शनवारचे वाडे, सह्याद्रीचे मुंचवटे, आग्र्याचे बुरुज व दिल्लीची अवजड सिंहासने दाद देती ना! या खडकाळ जमिनींवर नांगर फिरवून त्यांना सपाट केल्यानंतर मधील चुकून माकून अुरलेल्या लहान लहान ढेकळांनाही फोडण्यात आले. वचनभंग, अविश्वास, घात, जुलूम वगैरे लहान मोठ्या टोल्याखाली किरकोळ संस्थानिक चिरडून गेले. सैन्यात नेटिव्ह शिपायाचे अपमान होअू लागले. त्याना अुन्मत्त झालेल्या फिरंगी अधिकाऱ्याच्या चाबकाखाली मार बसू लागले. त्यांच्या पराक्रमाने नवे प्रांत मिळाले असता अितरत्र मराठे व निजाम यांच्याकडून त्यांस जहागिरी मिळत. परंतु कंपनीकडून फक्त गोडगोड थापांचीं बक्षिसें वाटली जात![३]

२. Expansion of England—page 214.

३. If he were to pass his whole life in the Company's service and do what he might—he could not rise higher than the Subhedar. Even an English sergeant commanded native officers of the highest rank. On parade the English officers made mistakes, used wrong words of command and threw the blame upon the Sepoys and reviled them. Even native officers, who had grown grey in the service, were publicly abused by European striplings...... (They) had not, as in the armies of native potentates, elephants and palanquins assigned to them for their conveyance how great so ever the distance which they were obliged to traverse "The Sepoys of the Nizam and Marhatta Chiefs", they said, "are better off than our Subhedars and Jamadars." That the English officers could import into Zananas the most beautiful women in the country.....and to crown all it was declared that General Aurther Wellesley had ordered his wounded Sipahis to be mercilessly shot to death!"

—Kaye Vol. I, page 160–61

ज्यांच्या तरवारीने अिंग्रजांच्यासाठी सर्व हिंदुस्थान जिंकला होता त्या शिपायांना अितक्या कृतघ्नतेने वागविण्यात येअी की, जनरल आर्थर वेल्स्लीने जखमी झालेल्या शिपायांचे संगोपन करण्याचे अैवजी त्यांना तोफेच्या तोंडी द्यावे ! अशा रीतीने हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यातून भयंकर क्रांतियुद्धाचीं बीजें अिंग्रज लोक अेकसारखी पेरीत चाललेले होते व या त्यांच्या प्रयत्नास यशःप्राप्ति लवकरच होअील अशीं चिन्हें प्रादुर्भूत होण्यासही फारसा अुशीर लागला नाही !

## डलहौसी

ज्या दिवशी स्पेन देशाने नेदर्लंडच्या भूमीवर परमेश्वरी अिच्छेविरुद्ध आपलें गुलामगिरीचे जोखड लादलें त्याच दिवशी नेदर्लंडचें व स्पेनचें हजारो लढायांनी भरलेलें असें क्रांतियुद्ध होणार हें निश्चित झालेलें होतें. फक्त तें केव्हा, कोठे व कसें व्हावें ह्या गौण मुद्द्याचा निकाल काय तो अल्व्हा नावाच्या स्पेनच्या गव्हर्नराने केला. ज्या क्षणी ऑस्ट्रियाने अिटलीच्या पायात दास्याची बेडी ठोकली त्याच दिवशी अनेक पराजयांनी परंतु अंतिम जयाने घटित झालेलें प्रचंड क्रांतियुद्ध निश्चित झालेलें होतें. फक्त अुरलेला तिथिनिश्चय काय तो माटरनिच ह्याच्या जुलमाने झाला. त्याचप्रमाणे ज्या वेळेस आंग्लभूहीं हिंदभूमीवर दासीपणा लादण्यासाठी अेखाद्या राक्षसीणीसारखी धावून आली त्याच दिवशी अिंग्रजांचें व हिंदूचें जें युद्ध—भयकर, अभूतपूर्व, क्रूर व कडाक्याचें—ठरलेलें होतें, त्याचा आरंभ केव्हा व्हावा हें काय ते डलहौसीने ठरविलें. डलहौसीच्या कारकिर्दीत झालेल्या अमानुष अन्यायांचे अैवजी जरी त्यांनी किंचित् मवाळ अंमल केला असता, तथापि त्याच्या योगाने अंतिम रणसंग्राम त्यांना टाळता येताना. कारण प्रत्येक देशाने पूर्ण स्वतंत्र असावें हाच नैसर्गिक तर्कशास्त्राचा अबाधित रहाणारा अंतिम सिद्धान्त आहे. ह्या निसर्गहेतूच्या विरुद्ध जाअून कोणीही अेखाद्या राष्ट्राचे पायात बळजोरीने गुलामगिरीची बेडी—मग ती सोन्याने का मढविलेली असेना—लादली की, काळाच्या घणाखाली तिचे तुकडे अुडावयाचे हे ठरलेलेच आहे. तथापि जेथे जेथे गुलामगिरी असते तेथे तेथे जुलूम अुत्पन्न झालाच पाहिजे व जेथे जेथे फिरंगी राज्य आहे तेथे तेथे डलहौसी आलेच पाहिजेत. कारण बिनजुलमी गुलामगिरी ही जितकी अशक्य गोष्ट आहे तितकीच बिनडलहौसी फिरंगी राज्य ही गोष्टही अशक्य होय !

कारण परक्यावर आपली अन्यायमूलक सत्ता चालविणे हे जिथे सर्वसंमत होतें, तिथे जो ही सत्ता प्रकर्षाने गाजवील त्यालाच श्रेष्ठाधिकार मिळतात. या योगाने जो अत्यंत अन्यायी अंमल तो अत्यंत श्रेष्ठ गणला जाअून त्याला त्या अन्यायांची कमाल करून दाखविल्यावाचून आपलें श्रेष्ठत्व ठेवण्याची दुसरी युक्ति शिल्लक नसते. अशा रीतीने जेथे अन्यायात व अधमपणात राजरोस चढाओढ सुरू असते तेथे *डलहौसीच काय ते निपजावयाचे ! ही अनीतिमूलक साम्राज्यें जेथे जेथे* माजलीं तेथे तेथे असल्या डलहौसीचीं रानेचीं राने राहिलेलीं होतीं !

परंतु या सर्व डलहौसीना मागे टाकणारा असा अेक आंग्ल डलहौसी १८४८ साली हिंदुस्थानात आला. डलहौसीला अिंग्रजी अितिहासकार 'साम्राज्याचा प्रणेता' म्हणतात. ह्या गोष्टीहून डलहौसीच्या अधम व नीच कर्तबगारीबद्दल दुसरी साक्ष ती काय द्यावी? शंभर वर्षपर्यंत चालविलेल्या अिंग्रजी अनीतीचा मूर्त परिणाम, स्वभावाने हेकेखोर, मी म्हणेन ती पूर्व दिशा या बाण्याने राहणारा, साम्राज्याची चटक व साम्राज्याचा माज ज्याच्या रक्तामासांत खिळून गेलेला होता असा हा धूर्त नेमला तरी धाडसी मुत्सद्दी 'हिंदुस्थानची जमीन सपाट करण्यासाठी' या जमिनीवर येअून अुतरला.

दरोडेखोरांच्या टोळीवरील मुख्य नायकाचें लक्ष कोणाच्या घरात संपत्ति भरलेली आहे अिकडे प्रथमतः जाणे अगदी साहजिक आहे. असें संपत्तीने भरलेलें घर त्यास दिसलें की, त्या घरावर शक्य त्या रीतीनें दरोडा घालण्याची तयारी करण्यात तो चूर झालेला असतो. या गर्दीमध्ये न्यायान्यायाचा विचार हा सर्वस्वी अस्वाभाविक, अशक्य व विघातक आहे. ज्याचें न्यायान्याय-विचारपण सुरू होतें त्याचें त्याच क्षणी दरोडेखोरपण संपते! अशी वस्तुस्थिति असल्याने अिंग्रजाच्या हिंदुस्थानावर पडलेल्या भयंकर दरोड्यात[४] अिंग्रजाच्या अंमलात त्या अंमलाला स्थिरता देणारी व त्या दरोड्याला वर्धन करणारीं त्याचीं कृत्यें न्याय्य होतीं कीं अन्याय्य होतीं हे ठरविण्याची धामाधीस करणें म्हणजे अितिहासाला व्यर्थ शिणविणें होय! तहनामे, वचनें, दोस्तपणा, वगैरे कल्पनांना दरोडेखोरपणाच्या शास्त्रात जागा मिळत नसते अितकें ध्यानात ठेवलें की मग अितिहासाची किती तरी याता-यात वाचेल! मग वॉरन हेस्टिंग्जने नंदकुमारला न्यायाने मारलें की अन्यायाने व त्या वॉरन हेस्टिंग्जची अिंग्लिश लोकांनी निरपराध म्हणून सुटका कां केली हे ठरविण्यास कागदाचे ढीग नासणे नको. अिंग्रज लोक आपल्या भोळसर स्वभावानुरूप ठरलेल्या तहांच्या याद्या घेअून, त्याच्या सारखा देअून, धर्मशास्त्राची वचने अुतरून, कोटिक्रमांची जाळीं रचून किंवा मागील परंपरेचे आधार दाखवून आपल्या परावर चालून आलेल्या दरोडेखोरात परावृत्ति किंवा सहानुभूति अुत्पन्न करण्याचा

---

४. Malcolm Lewin says : "......Grasping everything that could render life desirable, we have desired to the people of the country all that could raise them in society, all that could elevate them as men......we have delivered up their pagoda–property to confiscation; we have branded them in our official records as 'heathens.' We have seized the possessions of their native princes and confiscated the estates of the nobles; we have unsettled the country by exactions and collected the revenue by means of torture; We have held India as the highway man holds his neighbour's purse for what it contains."

भ्रामक प्रयत्न करोत, परंतु धूर्त लोक या निष्फळ वांझ खटपटीला हसल्यावाचून राहणार नाहीत. ही सर्व दरोडेखोरांना लागू असणारी गोष्ट डलहौसीच्या दरोडेखोरांना तर विशेषच लागू पडते व म्हणून त्याच्या कारकीर्दीत घडलेल्या कृत्यांची न्याय्यान्याय्यता ठरविण्याची वेडगळ खटपट करीत बसणे, हा मूर्खपणा होय. 'हिंदुस्थानची जमीन सपाट करून' तिच्या अुरावर दणदण नाचण्यासाठी डलहौसी आलेला होता अेवढें ध्यानात धरलें म्हणजे बस्स आहे. निसर्गसुंदर हिंदभूला आपली वर्दीक बनविण्याचा ज्याचा अंतिम अुद्देश होता त्या दुर्योधनाला न्याय कसला व अन्याय कसला! ही पापी वासना तृप्त करण्याम जें जें साधन सापडेल तें तें तो अुपयोगात आणणार!

या साधनांपैकी पहिलें साधन म्हणजे पंजाबशी झालेली लढाओ होय. डलहौसीच्या पायांचा हिंदुस्थानचे किनाऱ्यास स्पर्श होताच त्याच्या हें तावडतोब ध्यानात आले की पंजाबमध्ये जोपर्यंत रणजितसिंह निपजत आहेत तोपर्यंत आपली पापवासना पूर्ण करणें हें अिंग्लंडला फार जड जाणारें आहे. असें पाहून त्या पंजाबी सिंहास गुलामगिरीच्या मापळ्यात कसें तरी पाडलेच पाहिजे, असा त्याचा दृढनिश्चय झाला व जरी चिलियनवालाच्या दारातून बाहेर पडून त्या पंजाबी सिंहानी अेक भयंकर चपराक आपल्या शत्रूच्या छातीवर मारली, तरी मागून गुजरातच्या दाराने शत्रू आत घुसले व सिंहाची गुहा ही लवकरच सिंहाचा पिंजरा बनली! रणजितसिंहाची पट्टराणी चंदकुवर ही लंडनमध्ये कुजून मेली व रणजितसिंहाचा धुलीपसिंह हा परक्याच्या दारी तुकडे मोडीत पडला![५]

आता मात्र हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत सर्व हिंदुस्थान तांबडे झालें. परंतु अजून सिंधुनदीपासून अिरावतीपर्यंत तें व्हावें तसें तांबडें झालेले नव्हतें. मग अुशीर कशाला? ब्रह्मदेशामध्ये अेक शांतता मिशन धाडलें की काम फत्ते होणारें आहे! फक्त त्या शांतता मिशनने शांततेला अतिशय प्रेमाने दृढालिंगिली पाहिजे की तिच्या बरगड्या मोडून चुरल्या जाव्या! हे अत्यंत प्रेमळ काम असेर पार पडले व ब्रह्मदेश तावडच्या रंगात रंगून गेला. आता मात्र सिंधुनदीपासून

---

५. रणजितसिंहाचे साम्राज्याचा मालक धुलीपसिंह याची ही दुर्दशा अैकून कोणासही दया येअील. परंतु 'नि:पक्षपाती' Kaye म्हणतो :

"It was a happy change for Dhulipsingh .....Becoming in his twelfth year the ward of the Governor General, he was placed under the immediate tutelage of an Assistant servant of the Bengal Army who was so fit a man for the office, so worthy of the confidence reposed in him that the little Sikh Prince, under his wise ministrations, developed into a Christian gentleman, an English courtier, a Scotch laird."

भिरावतीपर्यंत व हिमालयापासून रामेश्वरापर्यंत सर्व हिंदुस्थान तांबडें झालें खरें !
—पण लवकरच लाल भडकही होणार नाही कशावरून !

पंजाब व ब्रह्मदेश जिंकिल्यानें जिकलें म्हणजे काय केलें त्याची कल्पना नुसत्या त्या नांवांनी येणार नाही. अेकटा पंजाब म्हणजे पन्नास हजार चौरस मैलांचा प्रदेश व त्याची चाळीस लक्ष लोकसंख्या ! ज्या पांच नद्यांच्या काठी ऋषींनीं वेदमंत्र म्हटले, त्यांनी आर्द्र केलेला जो प्रदेश तो पंजाब होय ! असला हा प्रदेश घेण्यासाठी अलेक्झांडर आला व असला हा प्रदेश राखण्यासाठी पौरस लढला ! तो हा प्रदेश घेतल्यावर रावणाची महत्त्वाकांक्षाही तृप्त झाली असती. परंतु डलहौसीला पंजाब व ब्रह्मदेश ह्या विस्तीर्ण प्रदेशांच्या अपहारानी मुळीच समाधान वाटेना. हिंदुस्थानची सरहद्द जरी वाढली तरी आतल्या जमिनीत पूर्वीच्या बादशाहीची काही थडगीं बुरलेलीं होतीं तीं देखील अुखडून टाकून जिकडे तिकडे 'सपाट मैदान' करण्याची त्याने प्रतिज्ञा केली. जुन्या बादशाहींचीं हीं थडगीं नुसती जागा अडवीत होतीं अितकेच नव्हे तर ह्या जुन्या थडग्यांत पुरलेल्या प्रेतांतूनच भावी बादशाहींचें पुनरुज्जीवन होण्याचा संभव होता व हा संभव डलहौसीच्या पूर्ण ध्यानात आलेला होता. सातान्याचे थडग्यात हिंदुपदपादशाही पुरलेली होती व ख्राअिस्टच्या पुनरुज्जीवनाप्रमाणे त्या पुरलेल्या प्रेतातूनच कदाचित् अेखाद्या भावी बादशाहीचें पुनरुद्भवन होअील हीं भीति ख्राअिस्टचे चरित्रावर विश्वास ठेवणाऱ्या डलहौसीस पडली यात काही नवल नाही. अि. स. १८४८ सालच्या अेप्रिल महिन्यात सातारचे शेवटचे महाराज अप्पासाहेब हे वारले. ही बातमी कळताच डलहौसीने ते संस्थान खालसा करण्याचा निश्चय केला. कारण काय ? तर राजाला औरस संतति नव्हती ! औरस संतति नसल्यामुळे मोलमजुरी करणाऱ्या गावढ्याची झोपडीसुद्धा बिनवारसी ठरत नाही तर त्याने नेमलेल्या दत्तकाकडे किंवा त्याच्या नजीकच्या आप्ताकडे ती दिली जाते. परंतु सातारा हो तर अेखाद्या गावढ्याची झोपडी नसून ते ब्रिटिशांच्या बरोबरीचें 'दोस्त सरकार' होते [६] अि. स. १८३९ साली

---

६. साताऱ्याच्या गादीवर १८१९ साली छत्रपतींची घातलेली पुनर्योजना करते वेळीं अिंग्रज सरकारने केलेल्या तहाचे पहिलें कलम असें आहे :

"The valiant English Government on its part agrees to give the country or territory specified to the Government or State of His Highness the Maharaja Chatrapati ( the Rajah of Satara). His Highness the Maharaja Chatrapati and His Highness's sons and heirs and successors are perpetually, that is from generation to generation, to reign in sovereignty over the territory, on account of this, these are given."

प्रतापसिंह छत्रपतींवर ब्रिटिश राज्याला अुलथून पाडण्यासाठी खटपट केल्याचा आरोप (?) ठेवून त्यांना गादीवरून पदच्युत केल्यानंतर त्यांचे जागी छत्रपति अप्पासाहेब यांची योजना ब्रिटिश सरकारने केली होती. या पदच्युतीसंबंधाने मि. आर्नोल्ड हा 'Dulhousie's Administration नावाच्या पुस्तकात म्हणतो : "It is not pleasant to dwell upon the circumstances of the dethronement—so discreditable they were!" परंतु असल्या ह्या अश्लाघ्य पदच्युतीनंतर ज्याला ब्रिटिशांनी सातारच्या गादीवर बसविले तो प्रतापसिंहाचा औरस पुत्र नसून भाअु होता. अर्थात् औरसपुत्राचे अभावी अितर नातलगाचा हिंदुशास्त्रातील पद्धतीप्रमाणे सिंहासनावर हक्क लागू होतो हें ह्या वेळेस अिंग्रजांनी स्पष्ट कबूल केलेले आहे. ही कबुली आपल्या नेहमीच्या विश्वासघातकी रीती-सुसार डलहौसी साहेबानी सोडून घेतली हेंच काय ते सत्य आहे. निरनिराळ्या राजांशी केलेल्या तहांत आम्ही पूर्वीपासूनच दत्तक संतति अमान्य केलेली आहे असें त्यांस कालत्रयीही म्हणता येणार नाही. अि. स. १८२५ साली कोटाच्या राजाचा दत्तक कबूल करतेवेळी ब्रिटिश सरकारने असें स्पष्ट म्हटलें आहे :

"The prince of Kotah must be considered to possess the right, in concern with all other .... of adopting a son and a successor in conformity with the rules of the Shastras."[७]

पुन्हा अि. स. १८३७ मध्ये ओर्च्छाच्या राजाने दत्तक घेतला असता तो कबूल करून ब्रिटिशांनी खालील वचन दिलेले होतें :

"Hindu sovereigns have a right to adopt to the exclusion of collateral heirs and the British Government is bound to acknowledge the adoption provided it is regular and not in violation of the Hindu Law."[८]

अशा स्पष्ट भाषेत व अितकीं लिहून दिलेलीं वचनें कागदोपत्रीं नमूद असता तीं आम्ही दिलीच नव्हती हे म्हणण्याचे धाष्टर्य अिंग्रजी वाचेशिवाय व अिंग्रजी नीतीशिवाय अितरत्र आढळणार नाही! अितकेच काय ते वरील दोन अुतारे देण्यात सांगायचे आहे हे अुतारे फक्त दोनच आहेत असे नाही, तर हिंदुशास्त्रा-प्रमाणे दत्तक घेण्याचा संस्थानिकाचा हक्क अिंग्रजांनी अनंत वेळा व अनंत शब्दांत मान्य केलेला आहे. नुसत्या १८२६ पासून १८४७ पर्यंत अिंग्रज सरकारने अगदी स्पष्ट शब्दांनी जवळजवळ पंधरा राज्यांचे गादीवर दत्तक राजांची योजना व हक्क मान्य केलेले आहेत अितके सांगितले म्हणजे बस! कारण ह्या संस्थाने खालसा करण्याचे मूळ कारण वरील तहाचे व वचनाचे भाषेत शोधीत बसणे म्हणजे पूर्व

७ Parliamentary papers, 15 February 1850, page 153.
८. Ibid, page 141.

दिशेचा शोध करीत उत्तरेकडे जाणें होय. ' हिंदुस्थानची जमीन सपाट ' करण्या-साठी डलहौसी आलेला होता व सातारच्या हिंदुपदपादशाहीचें धडगें आपलें डोकें उंच करू पाहात होतें. अर्थात् प्रतापसिंह व अप्पासाहेब ह्या दोघाही बंधूंनी शास्त्रोक्त दत्तविधानें केलेली असतानाही सातारचें राज्य त्याला वारस नाही म्हणून इंग्रजांनी खालसा केलें ! सातारचें राज्य, सातारची गादी ! इ. स. १६७४ साली गागाभट्टांच्या हस्ते अभिषिक्त झालेला शिवराज जीवर विराजमान झाला होता तीच ही गादी ! ज्या गादीला पहिल्या बाजीरावानें आपले विजय अर्पण करून मुजरा करावा तीच ही गादी ! महाराष्ट्रा, शिवाजी जिच्यावर बसत असे व संताजी, धनाजी, निराजी, बाजी, जिच्यापुढे ' जी ' म्हणून नम्र होत ती सुद्धा गादी डलहौसीनें तुकडे तुकडे करून पाडून टाकली ! आता तू खुशाल अर्ज लिहीत बैस व डेप्युटेशनें धाडीत बैस ! डलहौसी ऐकत नाही तर नाही. इंग्लंड-मध्ये त्याच्यावरचे अधिकारी तर जिवंत आहेत ना ? डलहौसी बोलून चालून मनुष्य, पण ते त्याचे वरील अधिकारी देव नसतील म्हणून कशावरून ? आपण काय त्यांना थोडेंच पाहिलेलें आहे ? तेव्हा हा रंगो बापूजी फार उत्तम व स्वामिनिष्ठ मनुष्य आहे. त्याने सातारचें गाऱ्हाणें घेऊन इंग्लंडला जाणें अगदी योग्य आहे. पावला तर देव, नाहीतर धोंडा ! पण तो पावणार की नाही ही वाट पहात तू किती वेळ बसणार ? आता तरी पावेल, मग तरी पावेल अशा आशेनें रंगो बापूजी लंडनमध्ये लीडन हॉल स्ट्रीटच्या पायऱ्या किती वेळ झिजवणार ? चेष्टा होईनोपर्यंत — अपमान होईनोपर्यंत — कोटपवधी रुपयावर इंग्रजी बॅरिस्टरें पोसता पोसता शेवटी परत भाड्याला दमडीही न उरेपर्यंत — व अखेर आम्ही सातारा परत देत नाही असा उद्दाम जबाब मिळेनोपर्यंत रंगो बापूजी लंडनच्या मृगजळामागे धावत बसणार !

रंगो बापूजी लंडनकडे जाण्याच्या भानगडीत गुंतले असताना इकडे डल-हौसीचें लक्ष दुसरीकडे घोटाळत होतें. मराठ्यांच्या सत्तेचें एक रोपटें नागपूरला जीव धरून होतें. त्याचें उन्मूलन करून टाकण्याचा योग जमून आलेला होता. नागपूरच्या गादीचे मालक रघोजी भोसले हे आपल्या वयाच्या ४७-व्या वर्षी ऐन-ऐशीं मृत्यु पावले. नागपूरच्या राजाशी इंग्रज सरकारचें नातें ' स्नेहाचें ' होतें.[1] व इंग्रजाचा हा ' स्नेह ' सर्वनाशाचे नामाग कारणीभूत झालेला आहे ! ज्यांना ज्यांना इंग्रज आपला ' द्वेष ' करतात हें कळलें ते ते बचावले. परंतु ज्यांनी ज्यांनी इंग्रजांचा आपल्याशी ' स्नेह ' आहे असें मानलें त्यांची त्यांची मान केसानें कापली

---

१. इ. स. १८२६ साली झालेल्या तहाचा आरंभ असा आहे :

Treaty of perpetual friendship and alliance between the honourable East India Company and his Highness the Maharajah Ragoji Bhonslah his heirs and successors "

गेली ! वऱ्हाडचें राज्य ही अिंग्लिशांची जहागीर नव्हती, की तें त्यांचें मांडलिक संस्थान नव्हतें. तें अेक स्वतंत्र व बरोबरीचें सरकार होतें. अशा राज्यातील राजा निपुत्रिक वारला तर ते खालसा करण्याचा 'हक्क' कोणत्या पौर्वात्य किंवा पाश्चिमात्य न्यायाने मिळतो हें सिद्ध करून दाखविण्याचें आव्हान जे. गिल्हिअनने त्या वेळेस अिंग्रज सरकारला केलेले होते ! गगळा मानभावीपणाचा बाजार' अेकाने खावें व दुसऱ्याने पचवावें ! अेकाने गळा कापावा व दुसऱ्याने तो कापल्यानंतर कोणत्या कायद्याप्रमाणे कापला हे विचारावें ! —जणू काय गळेकापूना कायद्याची फारच पर्वा असते ! अि. स. १८५३ साली डलहौसीने आपल्या 'स्नेह्याचा' गळा अघोर कापला व त्याला कारण असे दाखविलें की, राजाने दत्तकच घेतला नव्हता ! राजे रघोजी संततीची सर्वस्वी आशा असता अेकाअेकी वारले. त्यातूनही जरी ते दत्तक न घेता वारले तरी तो अधिकार त्यांच्या पत्नीकडे आलेला होता. राजपत्नीने राजमृत्यूनंतर घेतलेले दत्तक अिंग्रजांनी पूर्वी कबूल केलेले नसते तर गोष्ट निराळी. परंतु १८२६ साली दौलतराव शिंद्याच्या बायकोचा दत्तक, १८३६ साली जनकोजी शिंद्यांच्या बायकोने घेतलेला दत्तक, १८३४ साली धारच्या राजपत्नीचा दत्तक, १८४१ साली किशनगडच्या राणीचा दत्तक—अेक का दोन ! हे सर्व दत्तक *अिंग्रजांनी कबूल केलेले आहेत. परंतु त्या वेळेस कबूल करणे फायद्याचे* होतें. आज रघोजीच्या मागे त्यांच्या पत्नीने घेतलेला दत्तक नाकबूल करणे फायद्याचे आहे ! काय फायद्याचे आहे हा मुख्य प्रश्न होता व त्याच्याच अनुरोधाने सर्व गोष्टी ठरत असत. दत्तक घेतला नाही म्हणून नागपूरचे राज्य खालसा केले *तर घेतलेला दत्तक वारस नसतो म्हणून सातारचें राज्य खालसा केलें ! आपला* जीव वचावावा अशी खरी खरी अिच्छा असल्यास तर्कशास्त्राने असल्या भानगडीत न पडणेच बरे !

नागपूरचे राज्य खालसा करून डलहौसीने ७६४३२ चौ. मैलांचा विस्तीर्ण प्रदेश ४६,५०,००० *लोकसंख्या व जवळजवळ पाच लक्ष सालीच्या अुत्पन्नाचा मुलूख* मिळविला ! राजवंशातील गरीब राण्या दुःखाने आक्रोश करीत असता राजवाड्याच्या दारावर थाप पडली कोण आहे म्हणून पाहतात तो अिंग्रजाचे शिपाअी वाड्यात घुसू लागले तबेल्यातून घोडे सोडले गेले, हत्तीच्या पाठीवर बसलेल्या *राण्यांना खाली अुतरवून हत्तींची बाजारात विक्री मांडली गेली व राजवाड्यात* असलेल्या सोन्याचांदीच्या जिनसा हिमकूहिसकून घेअून नागपूरच्या रस्तोरस्ती विक्रीस ठेवल्या गेल्या ! राजपत्नीच्या गळ्यात डुलणारा हार बाजारात धूळ खात पडला आहे ! हत्तीची किंमत जेथे शंभर रुपये झाली त्या लिलावात घोड्याची *किंमत—ज्या घोड्यांना डलहौसीच्या खाण्याहून अधिक मौल्यवान् खुराक मिळत* असे त्या घोड्यांची किंमत—रुपये २० व खाजगी जोडीची किंमत ५ रुपये झाली ह्यात काय नवल ! हत्ती व हत्तींचे हौदे, घोडे व बैलांच्या झुली

विकल्या. परंतु अजून राण्या व राण्यांचे दागिने राहिले आहेत ना ? मग तेही का विकू नयेत ? अंगावरील सर्व दागिने जाऊन राण्या निष्कांचन झाल्या तरी अग्रजाचा 'स्नेह' शांत होईना ! म्हणून वाडधाम खणती लागली ! खुद्द राणीच्या निजावयाच्या खोलीत फिरंग्यांची कुदळी पडली ! वाचका, थांब. अंगावर शहारे अितक्यातच येअू देअू नकोस. कारण ती कुदळी अजून कितीतरी पुढे जाणार आहे – चालली आहे – पहा ती राणीच्या निजावयाच्या पलंगाला फोडून फेकून देअून त्याच्या खालची जमीन अुकरू लागली.[१०] आणि हें केव्हा तर त्या शेजारच्या खोलीत महाराणी अन्नपूर्णाबाअींना शेवटचा घोर लागला असताना ! नागपूरच्या भोसले घराण्यातील राजपत्नीला अपमानाच्या वायूने शेवटचा घोर लागलेला असता जनानखान्यातील शेजारच्या खोलीत राणीच्या निजावयाच्या पवित्र पलंगा-वर बसून अिंग्रज कुदळीने त्या घोराचा ताल धरीत आहे ! आणि अपराध काय ? तर राजा रघोजी दत्तक घेण्याचे आधीच मेला !

अखेर अन्नपूर्णाबाअी त्या असह्य अपमानाने त्या घोरातच मेली. परंतु राणी बांकाबाअींची विलायतेत न्याय मिळविण्याची आशा मात्र अजून मेली नव्हती. तथापि लवकरच अिंग्लिश डॉक्टराला लाखो रुपये चारल्यावर त्यांनी बरीच राम-बाण औषधें देअून त्या आशेला लवकरच निजधामास धाडली. परंतु मग राणी बांकाबाअी काय करीत होती ? ती आपले राहिलेलें आयुष्य 'राजनिष्ठेत' घालवीत होती ! १८५७ साली झांशीकडे विजा कडाडत असताना ही बाका अिकडे नागपूरला आपल्या मुलाचे मनात स्वराज्यासाठी तरवार अुपसण्याचें येअीलसें पाहून "मी स्वतः तुमची नांवें सरकाराम कळवीन व तुमच्या शिरच्छेद करण्याची सल्ला देअीन" म्हणून त्याना धाक घालीत होती ! कुलकलंकिणी बाके, जा पड नरकात – जर तिथे तरी देशद्रोह्यांना आत घेत असतील तर !

---

१०. Dalhousie's Administration, pages 165–168.

प्रकरण तिसरें

# नानासाहेब आणि लक्ष्मीबाअी

महाराष्ट्राच्या पुण्यभूमीमध्ये माथेरानच्या गिरिशिखरांनी भेट व त्या गिरिशिखराचे पायथ्याशी हिरव्या शालूनें सुंदर असलेल्या भूमीचा डौल यापैकी कोणाचें वर्णन अधिक करावें हें ठरविणें अशक्य आहे. या भेटवाज माथेरानच्या देवरेखीसारखी व ह्या डौलदार भूमीच्या अंगावर अेक वेणू नावाचें चिमुकलें खेडें आपल्या सहजसुंदरतेने त्या आधीच सुंदर असलेल्या प्रदेशास अधिकच सौंदर्य देत असे. वेणुग्रामी जीं कुलीन व सदाचारसंपन्न कुटुंबें होतीं त्यात माधवराव नारायण याचें कुटुंब हें प्रमुखत्वानें मोडत असे. माधवराव नारायण व त्याची सुशील भार्या गंगाबाअी हें जोडपें गृहदारिद्र्याचा भाग होत असताही परस्पर प्रेमाच्या सुखात स्वतःस भाग्यवान् समजत असे. ह्या पवित्र कुटुंबाच्या त्या लहानशा घरात अि. स. १८२४ साली नवीचीं सनें व वदनें अुन्हानित दिसू लागलीं. साध्वी गंगाबाअीचा गर्भ पूर्णमास होताच त्या चिमुकल्या कुटुंबाला पुत्रोत्सवाचा आनंद देता झाला. तो हा सत्पुत्र म्हणजे अितर कोणी नसून ज्याच्या नांवानें जुलुमी राजांचे देह भयानें थरारत असत व ज्यानें स्वराज्यासाठी व स्वतंत्रतेसाठी लढणाऱ्या सत्पुरुषांत विभूतींत आपलें नाव अजरामर करून ठेवलेलें आहे ते श्रीमंत नानासाहेब पेशवे हे होत ! हें भाग्यशाली बालक जन्मलें तो दिवस कोणता होता याची देखील अितिहासास दाद लागत नाही ! ज्या दिवसाच्या जयंत्या व्हावयाच्या त्या दिवसाची स्मृति अितिहासामही नसावी ही गोष्ट किती अुद्वेगजनक आहे ! असले दिवस हें राष्ट्राच्या अितिहासात फारसे अुगवत नसतात. हिंदुस्थानात गुलामगिरीच्या शेणात खितपत पडणाऱ्या शेणकिड्यांना जन्म देणारे दिवस लाखो अुगवतात व मावळतात परंतु आपल्या अीश्वरदत्त स्वातंत्र्याचा व स्वराज्याचा अपहार करणाऱ्यांच्या रक्तप्राशनासाठी तृषित झालेल्या मानधन नानासाहेबांना जन्म देणारे दिवस शतकातून अेकदोनच यावयाचे ! असल्या या अलभ्य दिवसाची ही संभावना पाहून परमेश्वर पुन्हा हें अपात्री दान करणार नाही याची लाज, महाराष्ट्रा, तुला वाटावयास पाहिजे आहे ! ज्याने तुझ्यासाठी व तुझ्या सन्मानासाठी रणांगणात आपलें रक्त ओकावे, त्याची जन्मतिथि तुला ठाअूक नसावी व — हायहाय — त्याची मृत्युतिथिहि तुला माहीत नसावी ! तुझे सारे पुत्र जन्मले कधी हें तुला ठाअूक नसावे व ते तुझ्याच विश्वासघातामुळे नाश पावून मेले कधी हेंही तुला ठाअूक नसावे या अक्षम्य कृतघ्नतेला गुलामगिरीच्या बेडीचीच शिक्षा योग्य आहे ! व ती तू भोगीतही आहेस !

ही गुलामगिरीची बेडी आठ लक्ष रुपयांवारी पहिल्याने विकत घेणारे कुलांगार शेवटचे रावबाजी पुण्याचे तक्तावरुन अुतरुन भागीरथीचे तीरावर याच सुमारास जाअून बसलेले होते. त्याचेबरोबर महाराष्ट्रातील बरीच कुटुंबे गेलेली होती व त्या सर्व कुटुंबाचा योगक्षेम आपल्या पेन्शनातून अुत्तम रीतीने करण्याअितके औदार्य भरलेलें अैकून कित्येक नवीं कुटुंबेंही त्यांचे आश्रयाला जाअून राहू लागली. माधवराव नारायण हेही या मंडळींबरोबर अि. स. १८२७ साली ब्रह्मावर्तास रावबाजींच्या आश्रयास राहण्यासाठी सहकुटुंब गेले. तेथे रावबाजींची माधवरावांचे मुलावर फारच ममता जडली. सर्व दरबारात नानासाहेब हे लहानथोरांचे आनंद-निधान होअून गेले. त्यांच्या बालतेजाला पाहून रावबाजी अितके चकित झाले की, माधवरावांचें व आपलें सगोत्र आहे असे कळताच त्यांनी नानासाहेबांस आपल्या मांडीवर ता. ७ जून अि. स. १८२७ रोजी दत्तक घेतलें. या वेळेस नानांचे वय सारे अडीच वर्षाचें होतें. अशा रीतीने वेणुग्रामात जन्म पावलेला हा बालक आपल्या पूर्वसंचित पुण्याने महाराष्ट्रराज्याधिपतीच्या गादीचा वारस झाला. पेशव्यांच्या गादीचा वारस होणें ही गोष्ट महाभाग्याची होय. परंतु हे तेजस्वी राजकुमारा, त्या भाग्याबरोबरच येणारी जबाबदारी तुझे ध्यानात आहे ना ? ही पेशव्याची गादी म्हणजे काही सामान्य गोष्ट नव्हे ! हिच्यावर बाजीराव बसलेले आहेत, हिच्यावर पानपतच्या लढाया लढलेल्या आहेत, हिच्यावर वडगांवचे तह झालेले आहेत व विशेष महत्वाची गोष्ट ही की, हिच्यावर आता लवकरच नष्टस्पर्शाने भ्रष्ट होण्याचा प्रसंग गुदरणार आहे किंबहुना गुदरलेला आहे, हें सर्व तू ध्यानात ठेवलें आहेस ना ? गादीचा वारस होणें म्हणजे तिच्या संरक्षणाची व अब्रूची हमी घेणे होय. मग ह्या पेशव्यांच्या गादीची अब्रू संरक्षण करशील की नाही ? अेक तर विजयाचा मुकुट ह्या गादीचे मस्तकावर घातला गेला पाहिजे किंवा ते नाही तर चितूरच्या मानिनीप्रमाणे दीप्त चितेत तिचे दिव्य तरी झाले पाहिजे ! ह्याशिवाय पेशव्यांच्या गादीची अब्रू तिसऱ्या कोणच्याही अुपायाने राहणार नाही ! हे तेजस्वी राजकुमारा, ही जबाबदारी ध्यानात धरुन तू ह्या महाराष्ट्राच्या गादीवर खुशाल बैस. पेशव्यांची गादी मरण गेली असे अैकण्याचा प्रसंग तुझ्या बापाने आपल्या-पासून सर्वत्र लज्जेने काळे ठिक्कर झालेले होते व सर्वांचीच अशी अिच्छा होती की, जर पेशव्याच्या गादीचा शेवट होणेंच असेल तर तो तिच्या आरंभाला साजेल असा होवो – मरणेच असेल तर ती ' मारिता मारिता ' तरी मरो ! बाळाजी विश्वनाथ ज्या गादीचा पहिला पेशवा होता त्या गादीचा शेवटचा पेशवा श्रीमंत नानासाहेब होता हे अभिमानाने अितिहासास सांगता यावे अेतदर्थ, हे राजतेजी बालका, तू महाराष्ट्राचे पेशवाअीवर विरवाने विराजमान हो !

याच सुमारास श्रीक्षेत्र काशीला मोरोपंत तांबे व त्यांची सुशील भार्या भागीरथीबाअी हे दाम्पत्य चिमणाजी आप्पासाहेब पेशवे यांच्या पदरी रहात होते.

या दांपत्याला या वेळेस आपलें नाव अितिहासात अजरामर होणारें आहे हें काय माहीत असणार! हिंदुस्थानच्या हातात विद्युल्लतेप्रमाणे तळपणारी जी मनमोरच होती अशा अेका कन्येला जन्म देण्याचें भाग्य ज्यांच्या पदरी होतें त्या या दांपत्याग हे आपलें भाग्य त्या वेळेस क्वचितच कळलेलें असेल! ता. १९ नोव्हेंबर जि. स. १८३५ साली वरील दांपत्यापासून श्रीमती महाराणी लक्ष्मीबाअीसाहेब जन्म पावल्या. या सौंदर्यशालिनीचें लहानपणींचें नाव मनुबाअी असें होतें. या सुलक्षणेचा जन्म होअून तीन चार वर्षें लोटली नाहीत तोंच, तें सर्व कुटुंब काशीहून निघून बाजीरावाचें अुदार आश्रयास ब्रह्मावर्ती गेलें व तेथें लक्ष्मीबाअी व नानासाहेब यांची भेट होअून रत्नाचा व कांचनाचा हा समागम पाहून कोणाला आनंद होणार नाही? भावी काळामध्यें आपल्या स्वधर्मासाठी व स्वराज्यासाठी तरवारी कशा पेलावयाच्या हें शिक्षण घेत दरबारशाळेंत राजपुत्र नानासाहेब व ही मनोहारिणी छबेली लक्ष्मीबाअी अेकत्र खेळताना पाहून कोणत्या नेत्रास समाधान वाटणार नाही? मनुष्याची शक्ति किती मर्यादित आहे! ज्या वेळी राजपुत्र नाना व छबेली लक्ष्मी तरवार खेळण्यास अेकत्र जिवत असत, तेव्हा लोकांना त्या अद्वितीय बालकाचें भविष्यकालीन दिव्यत्व दिसलें नाही व आता त्यांना तें दिव्यत्व दिसतें आहे तेव्हा त्यांना त्यांच्या भूतकालीन बाललीला दिसत नाहीत! तथापि मनुष्याच्या चर्मचक्षूची ही अदूरदृष्टि घालविण्यास जर कल्पनेचा चष्मा मिळेल तर भूतकालांतील त्या त्यांच्या बाललीला आपणांस सहज पहाता येतील. श्रीमंत नानासाहेब व त्यांचे बंधु रावसाहेब हे आपल्या शिक्षकापाशी विद्याभ्यास करीत असता ही तेजस्वी छबेली आपणही अडखळत अडखळत वाचावयास शिकत आहे,[1] हत्तीच्या अंबारीत नानासाहेब बसले आहेत व ही चपल कुमारी मला वर घ्याना म्हणून लडिवाळपणानें हट्ट करीत आहे! अेका घोड्यावर नाना बसले आहेत व दुसऱ्या घोड्यावर बसून ही मूर्तलक्ष्मी केव्हा येते याची वाट पहात लगाम खेचीत आहेत, तोंच कमरेला तरवार लटकवलेली आहे, वाऱ्याच्या कोमल लहरीनें कुरळ केश किंचिन्मात्र उडत आहेत व जिची गौरतनु अुन्मत्त घोड्याला काटोकाट टेकवण्याच्या श्रमानें गुलाबी झालेली आहे अशी ही छबेली आपल्या घोड्यासह येताच दोघेही भरधाव निघून जात आहेत! नानाचें वय सुमारे अठरा व छबेलीचें वय सुमारे सात वर्षांचें होतें. सातव्या वर्षापासून भावी धर्मयुद्धातील या दोन प्रमुख लढवय्यांची कवाअीत सुरू व्हावी ही किती मनोरम गोष्ट आहे! या दोन मानवी रत्नाचें तेव्हापासूनच अेकमेकावर फार प्रेम असे. या दोन बहीणभावंडाची यमद्वितीयेला भाअूबीज होत असे! सुंदर, सतेज व मनोहारक छबेली हातात सोन्याची दीपावलि घेअून त्या तरुण राजकुमाराला ओवाळीत आहे!

---

१. पारसनीस कृत 'झांशीच्या राणीचें चरित्र' पृ. २८–२९.

जि. स. १८४२ साली छबेलीचा झांशीचे महाराज गंगाधरराव बाबासाहेब यांच्याशी विवाह होअून ती झांशीची महाराणी लक्ष्मीबाओी बनली! महाराणी लक्ष्मीबाओी हृचा झांशीकडे आपल्या भ्रतारासह लोकप्रिय होत चालल्या असता जि. स. १८५१ साली बाजीरावसाहेब मेले. बाजीरावसाहेबांच्या मृत्यूबद्दल अेक अश्रूही गळावयास नको आहे. कारण १८१८ साली स्वतःचें राज्य गमावल्यानंतर हृचा कुल्दीपकाने अितरांचीं राज्यें बुडविण्यासही अिंग्रजांस मदत केलेली होती. आपल्या आठ लक्षाच्या पेन्शनातून यानी वरीच रक्कम शिल्केत पाडली होती. अफगाणिस्थानच्या लढाओीत अिंग्रजाना पैशाची अत्यंत तूट पडली असता हृचा शिल्केतून पांच लक्ष रुपये बाजीरावाने अिंग्रजास धाडून दिले. पुढे लवकरच पजाबच्या शीख राष्ट्राशी अिंग्रजाची लढाओी सुरू झाली व ब्रह्मावर्तास वसाहत केलेलें मराठ्यांचें मडळ शीख मिसलींना मिळून अिंग्रजा विरुद्ध जंगी अुठावणी होणार असा रग दिसू लागला. परंतु हृचा बाजीने त्याचा बेरंग करून टाकला. त्याने — शिवाजीच्या ह्या पेशव्याने — आपल्या पदरचा खर्च करून अेक हजार पायदळ व अेक हजार स्वार अिंग्रजाचे मदतीस धाडून दिले. हृचा बाजीरावापाशी स्वतःचा मानवारचाळा राखण्यास सैन्य नव्हतें. पण गोखाचा घाव अिंग्रजांचे ताब्यात देण्यासाठी मात्र मुबलक सैन्य शिल्लक आहे! हाय रे राष्ट्रा! मराठ्यांनी शिखांचे राज्य घ्यावें व शिखानी मराठ्यांचे राज्य घ्यावें — कशासाठी, तर दोघांचेही छातीवर अिंग्रजांना नाचता यावें म्हणून! असला हा बाजीराव मेला याबद्दल मृत्यूचे आभारच आहेत. बाजीरावाने मरणाचे पूर्वीच मृत्युपत्र करून त्यांत श्रीमत नानासाहेबांकडे पेशवाओीचे सर्व अधिकार व आपल्या वारसदारीचे सर्व हक्क सोपविले होते. परंतु बाजीराव मेल्याची बातमी अैकताच अिंग्रज सरकारने नानासाहेबांचा आठ लक्ष रुपये पेन्शनावर कोणत्याही प्रकारचा हक्क नाही असें जाहीर केलें. हा अिंग्रज सरकारचा निकाल अैकून नानाना काय वाटले असेल! त्यांच्या हृदयात चाललेल्या कालवाकालवीचे थोडेसे प्रतिबिंब त्यानी स्वतःच्या देखरेखीखाली लिहविलेल्या खलित्यात प्रतिबिंबित झालेले आहे. ते विचारतात : "आमच्या हृचा विख्यात राजवंशाशी तुमचें हे कडू वर्तन अगदी अन्याय्य आहे. आमचें विस्तृत राज्य व राज्यासन ही जेव्हा तुम्हास श्रीमत बाजीरावांकडून मिळालीं तेव्हा तीं अशा करारावर मिळाली आहेत की, तुम्ही त्यांची किमत म्हणून आठ लक्ष रुपये दरसाल द्यावेत. हे पेन्शन जर सदोदित टिकणारें नाहीं तर त्या पेन्शनासाठी दिलेलें राज्य सदोदित तुमच्याकडे कसे राहील? त्या करारातील पहिली शर्त तेवढी मोडली जावी व दुसरी तेवढी कायम रहावी हें असबद्ध आहे."[२] नंतर आपण दत्तक पुत्र असल्याने आपला हक्क नाशाबीत होतो असें जे सांगण्यात

२. 'Nanasahib's claim against the East India Company.' त्यात हा असमल खलिता दिलेला आहे.

मैशी त्याबद्दल स्पष्ट व मुद्देसूद निवेदन करून नंतर श्रीमंत नानासाहेब म्हणतात : " श्रीमंत बाजीरावसाहेबांनी आपल्या पेन्शनातून काटकसरीने राहून काही रक्कम शिल्लक टाकली म्हणून आता पेन्शन चालू ठेवण्याचे काही अेक कारण नाही असे जर कंपनीचे म्हणणे असेल तर ह्या कोर्टिदमान सर्व अितिहासात तोड सापडणें मुष्कील आहे. हें पेन्शन जें दिले गेले ते तहाची शर्त म्हणून दिलें गेलेलें आहे. त्या शर्तीत बाजीरावांनी त्या पेन्शनाचा सर्व खर्च करावा याचा ठराव केलेला आहे की काय ? दिलेल्या राज्याचे अैवजी हें पेन्शन मिळालेले आहे. त्याचा खर्च कसा व्हावा हें सांगण्याचा या जगात कोणासही यत्किंचित् मुद्दा हक्क नाही. अितकेंच नव्हे तर श्रीमंत बाजीरावांनी ह्या पेन्शनपैकी सारीची सारी रक्कम जरी शिल्लक टाकली असती तरी तसें करण्यास ते पूर्ण स्वतंत्र होते. कंपनीस मी असें विचारतो की, त्याच्या नोकराच्या पेन्शनाचा विनियोग कसा होतो याची तरी चौकशी करण्याचा तिला अधिकार आहे काय ? कोण पेन्शनदार कितो खर्च करतो, काय शिल्लक ठेवतो हें स्वतःचे नोकरास तरी पुसणें शक्य आहे काय ? परंतु ह्या नोकरांना जो प्रश्न होत नाही तो अेका विख्यात राजवंशाच्या अधिपतीला विचारण्यात येत आहे ! " हा खलिता घेअून नानाचे विद्वान् वकील अझीम अुल्ला खान हे विलायतेस गेले.

ह्या ५७-च्या क्रांतियुद्धात जीं महत्त्वाचीं पात्रें आहेत त्यांत अझीम अुल्ला खान याचे नाव संस्मरणीय आहे. अझीम अुल्ला खान हे प्रथमतः फार गरीब स्थितीत असतानाही त्यांनी आपली अुन्नति आपल्या बुद्धीच्या बळावर करून ते नानाचे अेकनिष्ठ वकील झाले होते.[३] हे प्रथमतः अेका अिंग्रजाचे घरी खिदमतगारीचे नोकरीवर असत. त्या अत्यंत गरिबीच्या जागेवर असतानाही त्यांनी आपली महत्त्वाकांक्षा न सोडता तेथे अिंग्लिश व फ्रेंच भाषांचा चांगलाच परिचय करून घेतला. या दोन भाषा बऱ्याच येअू लागल्यावर त्यांनी कानपूरच्या अेका शाळेत बाकीचा विद्याभ्यास केला, व थोडेच दिवसात तेथील सरकारी शाळेत शिक्षकाची जागा मिळविली. त्याच्या बुद्धिमत्तेचा लौकिक नानासाहेबांचे कानांवर जाताच त्यांनी त्यास आपले दरबारी ठेवून घेतले. नानासाहेबांच्या सर्व मसलतीत अझीम अुल्लाचें नानाचे फार वजन असे. अि. स. १८५४-मध्ये अझीम अुल्ला खान हे अिंग्लडमध्ये आले. त्याचा चेहरा सुमदा व मोहक असून त्याची वाणी फार मिठ्ठास असे. अिंग्रजी रीतीरिवाजाची पूर्ण माहिती असल्याने लडनमधील लोकांत ते फारच प्रिय होअू लागले. त्याच्या त्या मोहक व मिठ्ठास वाणीला, त्याच्या अंगावरील तेजाला व त्याच्या पौर्वात्य अुदारतेला पाहून कित्येक आंग्ल युवतींच्या अझीम अुल्ला खान हे गळयातले ताबीत बनले. लंडनमधील सार्वजनिक बागांत किंवा ब्रायटन वरील समुद्रकिनाऱ्यावर त्या रत्नखचित पोषाखाच्या 'हिंदी राजास' पहाण्यासाठी

३. Thomson's Cawnpore

आंग्ल नरनारींची अेकच गर्दी अुडत असे ! काही आंग्लयुवती तर अझीम अुल्ला खानावर अितक्या लुब्ध झालेल्या होत्या की, ते परत हिंदुस्थानात आल्यावरही त्याम अत्यंत गौरवाच्या व प्रेमाच्या भाषेत त्यांचीं प्रीतिपत्रें येत असत. हॅवेलॉकच्या सैन्याने पुढे ब्रह्मावर्त घेतलें तेव्हा त्यांना अिंग्लंडातील कित्येक संभावित स्त्रियांचीं त्यांच्या ' प्रियकर अझीमखानास ' धाडलेलीं पत्रें पहावयास सापडलीं, म्हणून स्वत: थाम्सनच लिहितो ! अझीम अुल्ला खानाकडे जरी आंग्ल स्त्रियांचीं मनें आकर्षिलीं गेलीं होतीं तरी औस्ट अिंडिया कंपनीचें मन त्याच्यावर न बसता तिने बरेच दिवस घोटाळवून अखेर अखेर त्यांस साफ जबाब दिला की, "गव्हर्नर जनरलने दिलेला निकाल आम्हांस सर्वस्वी पसंत आहे व म्हणून बाजीरावाच्या दत्तकाचा त्याच्या पेन्शनावर कोणत्याही प्रकारचा हक्क अुरलेला नाही." अशा रीतीने मुख्य कामाबद्दल निराशा झाल्यावर अझीम अुल्ला खान हे अिंग्लंड सोडून हिंदुस्थानकडे येण्यासाठी फ्रान्सच्या मार्गाने निघाले. आपण त्यांना मध्या त्यांच्या प्रवासातच सोडून अिकडे नानासाहेब त्या वेळेस काय करीत होते हें पाहूं.

श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या आयुष्याची सविस्तर माहिती प्रसिद्ध होण्याची सुसंधि महाराष्ट्राचे अितिहासाच्या नशिबात असेल काय ? ती संधि येअील तेव्हा येवो, पण सध्या त्यांच्याबद्दल जी काहीं माहिती मिळेल ती—जरी ती त्यांच्या शत्रूकडूनच आलेली आहे तरी ती—संकलित करून ठेवणें वावगें होणार नाही. श्रीमंतांच्या बालवयाची थोडीफार हकीगत वर दिलेलीच आहे. ब्रह्मावर्त हे अेक लहानसे व अेटबाज असे शहर होतें. शहराला खेटूनच श्रीभागीरथीचें पात्र वहातें. तेथे सुंदर घाट, नाना रचनेचीं देवालयें व नाना भूषणांनीं मंडित असा येणारा नरनारीसमूह यांच्या शोभेने तें ब्रह्मावर्त शहर व तें भागीरथीचें पात्र फारच खुलून गेलेलें असे. श्रीमंतांचा वाडा हा फारच विस्तीर्ण असून अुत्तम अुत्तम सामानाने सुशोभित केलेला होता. निरनिराळ्या रंगाच्या अत्यंत मौल्यवान् गालिच्यांनी व गालिच्यांनी त्या वाड्यातील दिवाणखाने मंडित झालेले असत. युरोपियन कारागिरीचें निरनिराळ्या रंगाचें कांचेचे सामान, सोनवल्याची सुंदर झाडें, मोठमोठाले आरसे, हस्तिदंताच्या सोन्यावर केलेलीं रत्नजडित नक्षीचीं कामें, थोडक्यात म्हटलें म्हणजे हिंदुस्थानातील राजमहालात दृष्टोत्पत्तीस येणारी सर्व प्रकारची चमकदार श्रीमंताच्या त्या निरनिराळ्या दिवाणखान्यात दिसून येअी.[४] घोड्यांचे व अुंटाचे सरंजाम हे सर्व त्यांचे असत. श्रीमंतांना घोड्यांचा फारच शोक असून अुत्तर हिंदुस्थानात त्यांचा अश्वविद्येविषयी फार लौकिक होता. त्यांची भाषा ही अुत्तम

४. 'Thomson's Cawnpore' थॉम्सन हा कानपूरचे कत्तलीतून बचावलेले जे फक्त दोनच अिसम होते, त्यांपैकी अेक असल्याने त्याच्या ह्या वर्णनास किंचित् महत्त्व आहे.

व उत्कृष्ट पोशाखानी सदोदित सजलेली असे. निरनिराळ्या जातींची हरणें, शिकारी कुत्रे, सांबरें, उंट व हिंदुस्थानातील सर्व प्रकारचीं जनावरें पाळण्याची त्याला फार आवड होती. परंतु या सर्व वस्तूंपेक्षा श्रीमंताचें शस्त्रागार फारच उत्तम सरणीनें ठेवलेलें होतें. त्यात निरनिराळ्या प्रकारचीं शस्त्रें, तीक्ष्ण तरवारी, बनदी च्या बंदुका व सर्व तऱ्हेच्या तोफा ह्यां मुबलक होत्या. श्रीमंतांचा स्वभाव पहिल्या-पासूनच फार मानी असे. आपण अेका मोठ्या राजवंशाचे असून आहोंत व त्या थोर व प्रथित वंशाला शोभेल अशा रीतीनें आत असल्यानच आयुष्य ठेवावें, नाहीं तर अजिबात नामशेष होऊन जावें पक्करेंक हा त्याचा निर्धार असे. आपल्या अभिजातत्वाचा व आपल्या कुलाच्या थोरवीचा त्यांच्या वर निर्दिष्ट केलेल्या खलितयात त्यांनी वारंवार अभिमानपुरस्सर उल्लेख केलेला आहे. आपण मराठ्यांच्या विस्तृत साम्राज्याचे अधिपति असून आज आपल्याला पेन्शनासाठी दुसऱ्याच्या दारीं अर्ज करावे लागतात याचा त्यांना अत्यंत खेद होत असे. 'संभावितस्य चाकीर्तिर्मरणा-दतिरिच्यते' या वचनानुरूप अकीर्तिशी मरणास जवळ करणारे ते संभावित होते. त्याचा स्वभाव राजासारखा अुदार व शूरासारखा मानधन होता. केव्हा केव्हा कानपूरच्या सैन्यातील युरोपियन अंमलदारांना ते मेजवान्या देत, परंतु त्यांनी केलेल्या परतभेटींची विनंति मात्र ते कधीही स्वीकारीत नसत. कारण त्यांच्या योग्यते-प्रमाणे त्याना तोफांची सलामी देण्यास कंपनी कबूल नव्हती.[५] त्यांनी आपल्या प्रांता-तील लोकांस फार ममतेने वागवीत असावें. त्याचा स्वभाव गंभीर व राहणी फार साधी असे. कोणत्याही प्रकारच्या दुर्व्यसनाचा त्यांना लवलेशही छंद नव्हता.[६] त्याना पुष्कळ वेळा निरीक्षून पाहिलेले अेक गृहस्थ लिहितात :

"मी ज्या वेळेस त्याना पाहिले त्या वेळेस त्याचें वय सुमारें २८ वर्षांचें असावें; परंतु ते चाळिशीच्या जवळपास दिसत. त्याचें शरीर स्थूल असे. चेहऱ्याची ठेवण वाटोळी, डोळे अुग्र, पाणीदार व चंचल, अंगकाठी साधारण, स्पॅनिश लोकांइतकी गोरी व भाषण अेकदरीत आनंदी व किंचित् विनोदी असे असे.[७] दरबारात ते किनखाबी पोषाख घालून बसत असत." त्याच्या अंगावरील जवाहीर व त्यांच्या मस्तकावरील अत्यंत मूल्यवान् मुकुट पाहून युरोपियन स्त्रिया अगदी लोलुप होत असें ट्रेव्हेलियन लिहितो. अशा या भव्यतेला शोभेल असेच नानाचें वर्तनही अुदार व दयार्द्र असे. स्वतःचे प्रजेवर ते कृपा करीत यात तर काहीच नवल नाही परंतु,

५. Thomson's Cawnpore, page 48.

६. Sir john Kaye says, "A quiet, unostentatious young man,. not at all addicted to any extravagent habits."

७. The History of Indian Mutiny by Charles Ball Vol. I, page 305.

त्यांच्याशी बेअिमान होअून ज्यांनी त्यांच्या सर्वस्वाचा नाश केला त्या अिंग्लिश लोकांवरही ते सदोदित कृपा करीत असत. कित्येक तरुण अिंग्रजी जोडप्यांना हवा-पालट करावीशी वाटली की, महाराजांची बग्गी त्यांचेकडे घाडली जावयाचीच. कित्येक प्रसंगी महाराजांच्या घरी अिंग्रजी अधिकारी व अितर गृहस्थ हे आपल्या मडमासह पार्टीस्ले जात व अुत्तम अुत्तम शाली, मूल्यवान् मोती, नामांकित रत्ने वगैरे वस्तूंच्या भेटी त्यांना देण्यात येत.[९] व्यक्तिविषयक द्वेष हा त्यांच्या अुदार आत्म्याला विटाळवीत नसे हे यावरून चांगलेच सिद्ध होते. राष्ट्रयुद्धात ज्यांच्या देहाचे तरवारीने तुकडे तुकडे करावयाचे त्याच प्रतिस्पर्ध्यांना अितर प्रसंगी अुपकृत करणे ही वीरतेची अुच्च कल्पना हिंदुस्थानच्या काव्यांतून व अितिहासांतून प्रत्येक क्षणी दृग्गोचर होत आलेली आहे. रजपूत वीरानी त्यांच्या कट्टया शत्रूंनाही युद्धप्रसंगाचे विरहित अशाच औदार्याने वागवीत असावें. श्रीमंत नाना ह्या औदार्याने त्या वेळेच्या अिंग्रजांच्या पूर्ण प्रीतीस पात्र झालेले होते हें ध्यानात ठेवण्यासारखें आहे.[१] श्रीमंत नानाचे पाहुणचार मिळत होते तोंपर्यंत अिंग्रजी अधिकाऱ्यांच्या व अिंग्रजी मडमांच्या ते गळ्यातील ताअीत झालेले होते. परंतु कानपूरच्या रणांगणात स्वराज्यासाठी व स्वधर्मासाठी त्यांनी तरवार अुपसताच त्यांच्यावर दु:शब्दांचा व हलकट शिव्यांचा मारा सुरु! अशा या कृतघ्न 'चोराच्या अुलट्या बोंबांनीच' हिंदुस्थानातील अिंग्रजी अितिहास भरलेला आहे! श्रीमंत नानासाहेब हे विद्याव्यासंपन्न होते. त्यांना जगा-तील राजकारणाची अतिशय आवड असे व त्यासाठी त्यांनी बहुतेक प्रमुख अिंग्रजी पत्रें घेत असावें. दररोज दैनिक पत्रें येताच महाराज तीं सर्व वाचवून घेत ह्या कामासाठी मि. टॉड ह्या नांवाचा अिंग्लिश मनुष्य नेमलेला असे. हे प्रोफेसरही पुढे कानपूरच्या कत्तलीत कापले गेले. अिंग्रजांच्या अिंग्लंडमधील व हिंदुस्थानातील राजकारणाची नाना फार बारीक रीतीने चर्चा करीत असत. अयोध्येच्या राज्याचे संबंधी त्यांनी अिंग्लिश गृहस्थाशी वाद करीत असावें [१०] श्रीमंत महाराज नाना-साहेब पेशवे यांच्या व्यक्तिविषयक चरित्राची वर दिलेली माहिती ही त्यांच्याच शत्रूचे अितिहासातून शब्दश: घेतलेली असल्याने त्यात अेक गोष्ट ध्यानात धरली पाहिजे. ती ही की, त्या माहितीत जर सद्गुणांचे वर्णन असेल तर ते आधिक्यानेच सत्य असले पाहिजे. कारण अिंग्रजांसारखे दीर्घद्वेषी शत्रु नानांसारख्या कट्टया प्रति-स्पर्ध्याचे सद्गुण नाअिलाज म्हणूनच किंचिन्मात्र देणार. अशा स्थितीत वरील

---

८. Trevelyan's Cawnpore P P. 68–69.

९. "Nothing could exceed the cordiality which he constantly displayed in his intercourse with our countrymen. The persons in authority placed an implicit confidence in his friendliness and good faith and ensigns emphatically pronounced him a capital fellow." —Trevelyan's Cawnpore.

१० [illegible] y of [illegible] M[illegible] v by C[illegible] Vol. I

वर्णन वाचून श्रीमंतांच्या बद्दल मनात आदर दाटून येतो व ज्या वंशाला बाळाजी विश्वनाथापासून अुद्गम झालेला आहे त्या रणविख्यात भट वंशातील ह्या शेवटच्या पेशव्याची ती गौर व भव्य मूर्ति—मस्तकावर रत्नजडित मुकुट लखलखत आहे, कांतिवान् देहावर किनखाबी पोशाख रुळत आहे, सतेज व चपल नेत्रांना मानभंगाने अुत्पन्न झालेल्या संतापाची लाली चढलेली आहे, कमरेला तीन लक्ष रुपयाची तरवार लटकलेली आहे व स्वराज्याचा सूड व स्वधर्माचा सूड कधी घेईन म्हणून त्वेषाच्या ज्वाला ज्याच्या अंगातून व पाणीदार तरवारी ज्याच्या म्यानातून बाहेर अुडी घेअू पहात आहेत त्या शेवटच्या पेशव्याला प्रणाम करण्यासाठी मस्तक नम्र होअू लागते.

शेवटी अिंग्रजांचें शेवटचें अुत्तर आलें की "तुमचा बाजीरावाचे पेन्शनावर काडीअितकाही अधिकार नाही. अितकेच नव्हे तर तुमचा ब्रह्मावर्तांतील प्रदेशावर असणारा स्वतंत्र संस्थानिकत्वाचा हक्कही आता तुम्हास मिळणार नाही!" असा शेवटचा जवाब अिंग्रजाकडून नानास आलेला आहे! व आम्ही करतो हा न्याय आहे असेंही सांगण्यात आलेलें आहे! न्याय? आता हा न्याय आहे कीं अन्याय आहे ह्याचें नक्की अुत्तर देण्याची तसदी अिंग्रज सरकारने घेण्यास नको आहे. तिकडे कानपूरच्या मैदानावर लवकरच ह्या प्रश्नाचा यथार्थ निकाल लावण्याची जंगी तयारी सुरु झालेली आहे व मराठ्यांच्या हृदयांत दुखविणे हा न्याय आहे कीं अन्याय आहे याची विवेचना आता पूर्ण चर्चा करण्यात येअील. अिंग्रजांची अुडालेलीं डोकी, त्यांच्या कापलेल्या माना, त्यांचीं चिरलेली शरीरें व त्यांचे वाहणारे रक्ताचे लालभडक पाट हे या प्रश्नाची यथायोग्य चर्चा करतील व या चर्चेला शांतपणे अैकून घेअून कानपूरच्या विहिरीचे काठावर बसणारी गिधाडें 'हा न्याय कीं अन्याय' या प्रश्नाचें निश्चित अुत्तर देतील !

नानाच्या घरी अमल्या टोलेजंग समारंभाच्या तयारीची गर्दी अुडालेली असताना त्याची 'छबेली' बहीणही तिकडे स्वस्थ बसलेली आहे असें नाही. तिच्याही पुढे 'न्याय कीं अन्याय' हाच प्रश्न येअून पडलेला आहे. अि. स. १८५३ साली तिचा भ्रतार अेकाअेकी परलोकी गेला व त्याने दत्तक घेतलेला तिचा प्रिय पुत्र दामोदर याला वारसदारीचे हक्क न देता अिंग्रज सरकारने झांशी संस्थान खालसा केले. परंतु अशा नुसत्या कागदोपत्री खालसा करण्याने खालसा होणारे ते संस्थान नव्हते. त्या झांशीच्या संस्थानावर नागपूरची बाका राज्य करीत नसून तिथे नानाची 'छबेली' बहीण महाराणी लक्ष्मीबाअी राज्य करीत होती! ती अशा 'खालसा-करणाला' थोडीच दाद देणार आहे! अिंग्रजांची ही कुटिल व मागपणाची करणी पाहताच संतापाची, अपमानाची व मानभंगाची अशी गडगडाट करू लागली व त्यांतून ती झांशीची चपला कडाडली की, 'मेरी झांशी मैं नहीं दूंगी!!'[११]

'मेरी झांशी मैं दूंगी नहीं!' ज्याची छाती असेल त्यांनी ती घेअून पहावी!

११. Dalhousie's Administration, Vol. II. * * *

-प्रकरण चौथें

# अयोध्या

चोराला सोडून संन्यानाला फाशी देणारे न्याय मनुष्यजातीच्या दुर्दैवाने या जगात नेहमी सुरू असतात. परंतु त्यातूनही राजकारणातील धमामोडीत तर हे प्रकार राजरोम रीतीने करण्यात येतात. जुलूम व अन्याय ह्या भाववाचक कल्पना मनुष्याच्या मनाला दुर्ग्राह्य असल्याने तो त्यांच्यापासून होणाऱ्या त्रासाचा सूड काढण्यासाठी चवताळून बाहेर पडला असता त्या जुलूमाच्या व अन्यायाच्या मुळाशी कोण आहे हें बघत बसत नाही तर तोंडाशी जो कोणी असेल त्या गरिबावरच सर्व मारा करू लागतो. या अुतावळेपणानें अन्यायाचें तोंड होणाऱ्याच्या अपराधाचा जरी वचपा निघतो तरी त्या अन्यायाचा जो प्रत्यक्ष आत्मा असतो तो मात्र विसरून जाअू शकतो ह्या घालमेलीनें काही विशेपशी नुकसानी न होती तर निजकडे हल्ली होणारें दुर्लक्ष क्षम्य झालें असते. परंतु खरोखर पाहिलें असता या घालमेलीचे परिणाम फार भयंकर होत असतात चोराना मारण्यासाठी अुभारलेले फास संन्याशाला मारण्यात खपून जातात व पुन्हा चोर तिकडे सुरक्षित रीतीनें साव म्हणून वावरू लागल्याने चोरीचा अुपद्रव पहिल्याहूनही जास्तच होअू लागतो. या फाशीवर संन्याशाचे अैवजी जरी अेखादा चोरच दिला गेला तरीही त्या चोरीचा सर्व राग त्या अेकट्या चोरावरच काढला गेल्याने बाकीचे चोर निर्भय रीतीने 'पुनश्च हरिः ओम्' करावयास तयार होअू शकतात. विषारी झाडाचा खरा नायनाट त्याच्या फांद्या व पानें खुडीत बसल्याने होणार नाही, तर त्या फांद्याना व त्या पानाना वारंवार पुढे धाडणारी व त्याचें पोषण करणारी त्या झाडाची मुळे शोधून काढून त्यांचा नायनाट केला पाहिजे.

डलहौसी हे त्याच्या 'परिस्थितीचे' परिणाम आहेत. ती परिस्थिति जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत अेक डलहौसी गेला तरी दहा डलहौसी येणार आहेत परंतु हे तत्त्व विसरून जाअून अिंग्रजी अितिहासकार जाणून बुजून व हिंदुस्थानी लोक भोळ-सट अज्ञानाने डलहौसीच्या कारकिर्दीत झालेल्या सर्व जुलमाचे खापर त्याच्या अेक-ट्याच्या डोक्यावर अितक्या जोराने फोडतात की जणू काय त्या अपराधाचा तोच काय तो मुख्य कर्ता होता. परंतु हा समज सर्वस्वी भ्रामक आहे ह्या समजाचा असा परिणाम होत असतो की, डलहौसी सोडून मुख्य आदिकारणाकडे लक्ष दिले जात नाही. जर अिंग्लंडच्या सरकारची संमति नसती तर डलहौसीची काय छाती होती की त्याने अेक पाअूल अिकडचे तिकडे टाकावें! डलहौसीच्या प्रत्येक कृत्यास अिंग्लंडचे सरकारची संमति मिळाल्याशिवाय हिंदुस्थानात अेक पानही हलणे अशक्य होते. अशा स्थितीत डलहौसीवर जर अेकाद दोष असेल तर त्याच्यामागे दडून हीं अधम कृत्यें करणाऱ्या

डुकांवर दमपट दोष आला पाहिजे. परंतु अिंग्लंडमधले सरकार म्हणजे तिथले मूठभर अधिकारी होत. ह्या मूठभर लोकांना अिंग्लंडच्या जनतेपुढे चळचळ कापावें लागते. अिंग्रज लोकांची मर्जी अुतरली असता अेक क्षणभरही ह्या अधिकाऱ्यांना आपले अधिकार ठेवता येत नाहीत. अशा स्थितीत हे अधिकारी तरी डलहौसीच्या पापी कृत्यांस संमति कां देत असत तर त्यांचीं हीं कृत्यें सर्व अिंग्रज लोकांना पसंत असत म्हणूनच होय. अशा रीतीने पाहिलें असता हें अिंग्लंडचें सर्व राष्ट्र या अन्यायांचें व जुलुमांचे अधिकारी ठरत आहे. साम्राज्याच्या रक्ताची चटक लागून हें सर्व राष्ट्र क्रूर, निर्घृण बनलेलें आहे. सर्व अिंग्लंड हें अेक डलहौसींचें मोहोळ असताना त्यातील अेका माशीवरच सर्व राग काढण्यात काय फायदा आहे ? जोपर्यंत त्या मोहोळाशीच संबंध आहे तोपर्यंत ह्या माशा हिंदुस्थानच्या फुलांतील मध नेअून त्याच्या अैवजीं तीक्ष्ण व विषारी नांग्या मारीत राहणारच ! तें मोहोळ तर अुराशीं ठेवावयाचें व मग त्यातून मध नेण्यासाठी येणाऱ्या माशा नांग्या फार मारतात म्हणून त्या व्यक्तिविषयक माशांना मिथ्याशाप देत बसावयाचें ! ही मूर्खपणाची कल्पना व ही दुर्दैवाची अंधता सत्तावनचे पुढाऱ्यांच्या दृष्टीला स्पर्श करू शकली नाही. त्यातच त्या क्रांतियुद्धाचें मुख्य रहस्य आहे. त्यांचें साध्य अमुक कायदा रद्द करावा किंवा तमुक डलहौसी परत न्यावा हें नसून तो कायदा करण्याची व तो डलहौसी धाडण्याची मुख्य शक्ति जी राजसत्ता तीच परत मिळविण्याचें होतें. सगळेच अिंग्रज डलहौसी आहेत व ह्या मोहोळातील सगळ्याच माशांचा अुद्देश आपल्या हिंदी फुलांचा मध नेअून त्याअैवजी विषारी नांग्या मारण्याचा आहे हें अंतिम सत्य त्या धूर्त व माननीय पुरुषांच्या ध्यानात आलें व अशा या अिंग्रजाचा संबंध अजिबात तोडल्याशिवाय परवशतेच्या फाचा खुडत न बसता त्या हालाहलमय काटेरी झाडास समूळ अुलथून पाडल्याशिवाय, थोडक्यात म्हणजे स्वराज्य मिळविल्याशिवाय ह्या दुर्धर रोगावर दुसरे रामबाण औषध नाही व तीं स्वराज्याची औषधि संग्रामभूमीशिवाय अितरत्र मिळत नाही. हीं अत्यंत दिव्य सत्यें त्यांच्या कुशाग्र बुद्धीला कळताच अेक क्षणभरही न थांबता त्यांनी आपले प्राण आपल्या हातावर व आपली तरवार आपल्या शत्रूच्या मानेवर ठेवण्यासाठी रणांगणात अुडी घेतली !

सत्तावनच्या क्रांतियुद्धाचें पावित्र्य व थोरवी ह्याच सत्यज्ञानात व तदर्थ होणाऱ्या प्राणदानात आहे. ज्यांना डलहौसी हाच काय तो सर्व जुलुमाचा मुख्य जबाबदार वाटतो त्यांना ह्या युद्धाची खरी महती कळणार नाही. अशा असमंजस मनुष्यांना जर सत्यज्ञानाची चाड असेल तर त्यांनी विशेषतः अयोध्येचें राज्य कोणी खालसा केलें हें बघावें व तें का खालसा झालें हे समजून घ्यावें. अयोध्येचें हें विस्तृत व संपन्न राज्य डलहौसीचे आधी अेक शतकभर खालसा होतच होतें. अयोध्येच्या नवाबानें अिंग्लिशांशी संबंध ठेवला तेव्हापासून त्याच्या राज्यातील अेकेक तुकडा अिंग्लिशांकडे येत चाललेला होता. अि. स. १८०१ साली वजिराचे अुरावर अेक

तह वळाने वसविण्यात आला. त्यात तर ही अपहाराची अिच्छा अगदी निर्लज्जपणे प्रदर्शित झालेली होती. नबाव वजीर त्या वेळी आधीच कंपनीच्या 'मदतगार सैन्या'-साठी म्हणून दरमाल ७६ लक्ष रुपये देत होते. कंपनीच्या ह्या लुटीने नबाबाचा खजिना अगदी हलाखीस आला होता. परंतु अिंग्रजानी अशी निकडीची मागणी केली की, नबाबाने स्वतःजवळ असलेले स्वदेशी सैन्य काढून टाकून त्याच्या जागी कंपनीचे सैन्य ठेवले पाहिजे. ह्या सैन्याचा खर्च व वरील संरक्षक सैन्याचा खर्च देण्याची ताकद नबाबाच्या खजिन्यात नाही ही अिंग्रजांना पूर्ण कल्पना होती. अितकेच नव्हे, तर ही माहिती होती म्हणूनच त्यांनी ही मागणी केली. अखेर नबाबापाशी खजिना नसला तरी प्रदेश होता म्हणून त्यापैकी अत्यंत सुपीक भाग ब्रिटिशांना नबाबाने तोडून दिला व नको नको म्हणता नबाबाच्या बोकांडी हे संरक्षक सैन्य बसले! या १८०१ सालच्या तहातील तिसरे कलम असा अर्थी होते की, "नबाबानी आपल्या प्रांताची व्यवस्था प्रजेस सुखकारक अशी ठेवावी व प्रत्येक कामात त्यांनी कंपनीचे अधिकाऱ्यांची सल्लामसलत घ्यावी." आता ही प्रजेस सुखकारक व्यवस्था ती कशी ठेवावयाची ? जर अेखादी सुधारणा करण्याचे नबाबांनी मनांत आणले तर त्यांच्या या अिच्छेबद्दल त्याच्या अंगावर कंपनी गुरगुरू लागे.[1] तरी तिचा आग्रह असा होता की, प्रजेस सुखकारक पद्धति सुरू करावी! नबाबाच्या खजिन्यावर अेकसहा हात मारून त्याला रिता केला तोंच नवीन मागणी व्हावी, व असल्या लुटीची शातता करण्यासाठी नबाबाला कर बसविणे भाग पडले की, कंपनीचा आग्रह व्हावा की, प्रजेस सुखकारक अशी पद्धति सुरू करावी! नबाबाला स्वतःचे राज्य सुधारणे अशा रीतीने अशक्य केल्यानंतर क्वचित् लोकसमूह बंड करून राज्यपद्धति सुधारतील तर त्याचा बंदोबस्त करण्यासाठी अिंग्रजी बेयोनेटा व 'सरक्षक' सैन्याच्या तरवारी लोकांच्या मानेवर लटकत ठेवून त्याना हू की चू करण्याची फुरसत ठेवावयाची नाही.[2] तरी कंपनीचा आग्रह मात्र सुरूच की प्रजेस सुखकारक अशी पद्धति

१. Dalhousie's Administration page 348–49

२. Sir John Kaye says, "In truth, it was a vicious system, one that can hardly be too severely condemned By it he established a double government of the worst kind. The political and military government was in the hands of the Company The internal administration of the Oudh territories still rested in the hands of the Nabab Vazirs. In other words, hedged in and protected by the British battalions, a bad race of Eastern Princes were suffered to do or not to do what they liked "

(page 82 Vol. I.)

सुरू करावी ! अशा रीतीनें अेकीकडे नवाबांना व लोकांना राज्यपद्धति सुखकारक करणें पूर्ण अशक्य करून टाकून दुसरीकडे कंपनी म्हणे की, राज्यपद्धति सुखकारक केलीच पाहिजे ! अेखादा जुलमी पालक-लहान मुलास अेकीकडे जोरानें मारीत असतो व दुसरीकडे म्हणत असतो 'गप् ! खबरदार रडशील तर !' भेद अितकाच की, तो पालक हें मूर्खपणाचें कृत्य करताना निदान तें मद्‌हेतूनें तरी करीत असतो. परंतु कंपनीनें नवाबावर जो हा तोंड बाधून बुक्क्यांचा मार चालविला होता तो केवळ त्याचा गळा दाबून प्राण घेण्यासाठीच होता. हा प्राणघात जितका लौकर व जितका सुलभ होअील तितका करण्यासाठीं अिंग्रजांनी हजारो खटपटी व हजारो लटपटी केल्या. त्या सर्व देण्यास स्थलावकाश नाही. तरी अुदाहरणार्थ अेक अत्यंत नीच कावा दिल्याशिवाय रहावत नाही. तो कावा म्हणजे १८३७ साली लॉर्ड ऑक्लंड यांनी नवाबाशी केलेला तह काही वर्षांनतर अजिबात नाकबूल जाणें हा होय ! हा तह झाल्याबरोबरच अिंग्रज विसरले असें नाही. कारण १८४७ साली लॉर्ड हार्डिंगटनने तह कबूल केलेला होता. कर्नल स्लीमननें १८५१ साली हा तह कबूल केलेला होता. १८५३ साली हिंदुस्थानांतील चालू तहांच्या यादीतही तो १८३७ चा तह लिहिलेला होता ![३] परंतु १८५३ साली जो तह अिंग्लंडला आठवत होता तो त्याच साली खरी खरी वेळ येताच अिंग्लंड अेकदम विसरून गेलें ! १८३७ च्या ह्या तहानें तें संस्थान अेकदम खालसा करणें शक्य नाही असें पाहताच अेका घटकेपूर्वी कबूल केलेला व चालू असणाऱ्या तहांच्या यादींत लिहून घाडलेला तह हिंदुस्थान सरकार साफ नाकबूल करू लागलें ! तो तह झालाच नव्हता म्हणून-धडधडीत विधान ठोकून देण्यास अिंग्रज सरकारास शरम कशी वाटली नाही-याचें हिंदुस्थानचा अिंग्रजी अितिहास ज्यानें थोडा तरी वाचलेला आहे त्याला विशेषसें आश्चर्य वाटावयास नको आहे. कारण अिंग्रज सरकारास अयोध्येचें राज्य पाहिजे होतें व तें राज्य घेण्यास १८३७ सालापेक्षा १८०१ सालचाच तह जास्त अुपयोगी होता !

ह्या सर्व लटपटी डलहौसीच्या आधीच झालेल्या होत्या हें मात्र लक्षात धरलें पाहिजे, म्हणजे डलहौसीनें अयोध्या खालसा करण्यात काहीं अपूर्व पातक केलें नाही हें स्पष्ट होअूं लागेल. अयोध्येचा मुलूख सर्वांनाच पाहिजे होता. परंतु तो घ्यावा कसा ह्याचा निकाल मात्र तो डलहौसीच्या हस्ते झाला. पंजाबप्रमाणे किंवा ब्रह्मदेशाप्रमाणे त्यावर स्वारी करून तो जिंकता येअीना. कारण त्यातील लोक ब्रिटिशांच्या कधींही अुलट गेलेले नव्हते. आपल्यापाशीं स्नेहभावानें नवाब वागलें नाहींत असा आरोप करावा तर तेंही अगदींच अशक्य झालेलें होतें. कारण आजपर्यंत प्रत्येक कठीण प्रसंगी नवाबांनी अिंग्लिशांना मदत केलेली होती. ज्या वेळेस अिंग्लिशांच्या खिशांत पैसे नव्हते तेव्हा नवाबांनी त्यांस पैसे दिले व जेव्हा मोठमोठ्या

३. Dalhousie's Administration Vol. II. page 367

लढाईत अिंग्रजाना खायला मिळेना तेव्हा त्यांनी त्यास धान्याचा पुरवठा केला नाही प्रमाणे तिथे वारस कोणी नाही अशीही तक्रार नव्हती. कारण राजवाडा औरस संततीने गजबजलेला होता; किंवा झांशीप्रमाणे दत्तक पुत्राचीही भानगड नव्हती. कारण हल्लीचा राजा हा मृत राजाचा औरस पुत्र असून राज्यावर सुस्थित झालेला होता. अशा रीतीने ह्या लखनौच्या नवाबाने ह्या वरील अपराधातील कोणताही अपराध केलेला नव्हता. परंतु हे सर्व अपराध जरी नवाबाने टाळले होते तरी त्या मूर्खाचे हातून अखेर अेक जंगी प्रमाद घडलाच ! तो प्रमाद हा की, नवाबाच्या राज्यातील प्रदेश अतिशय सुपीक, सुंदर व सपन्न असा होता ! ! हा त्याचा अपराध अिंग्रजाच्या कधीच ध्यानात आलेला होता- अयोध्येच्या सुंदर प्रदेशाचें वर्णन देताना अिंग्रजी ब्ल्यू बुकातील रुक्ष भाषेलाही कवितेचे पांखर फुटत असत. " ह्या सुंदर प्रांतात जिकडे तिकडे वीस तर कोठे कोठे दहा फुटावर पाण्याचे मुबलक साठे आहेत. सर्व प्रदेश हिरव्यागार शेतांनी फुललेला, आंबराअींच्या छायेने शीतल झालेला व बाबूंची अुंच अुंच वनें आपली मस्तकें ठायी ठायी अैटबाज रीतानें डोलवीत असणारा, चिंचेची दाट छाया, नारिंगीचा सुगंध, अंजीर वृक्षांची विचित्रता व पुष्प-परागाचा परिमल ही सर्व ह्या निसर्गसुंदर प्रदेशाला अवर्णनीय शोभा देत आहेत ! " असला हा प्रदेश आपल्या ताब्यात ठेवण्याचा प्रचंड अपराध केल्याबद्दल अयोध्येच्या नवाबास त्याच्या गादीवरून अुचलून फेकून देण्याचा डलहौसीने १८५६ साली हुकूम सोडला व त्या हुकुमाला यच्चयावत् अिंग्रजाचें साह्य व अनुमत मिळून अयोध्या अेका झटक्यासरशी खालसा करण्यात आली! व कारण काय तर नवाब आपल्या राज्याची सुधारणा करीत नव्हते ! अहाहा, येशू ख्रिस्ताने देखील ह्या औदार्याला पाहून मान खाली घालावी ! नवाबाच्या राज्यात अेकपट दारिद्र्य होत ते चौपट करण्याकरिता, नवाबाचे राज्यात काहीतरी चैतन्य होते ते अजिबात नाहीसे करण्याकरिता व अयोध्येच्या अंगावर फाटका तुटका का होअीना, पण स्वातंत्र्याचा असलेला पदर पार फाडून तिला नग्न करण्याकरिता अयोध्येच्या सिंहासनावर बलात्कार करणाऱ्या अिंग्लंडा, ही अव्यवस्थेची सबब जर अेकदा कबूल केली तर तुझें हिंदुस्थानावरील राज्य अेक दिवस तरी रहाणे योग्य होअील काय? आज चीनमध्ये अफूचे व्यसन आहे, अफगाणिस्थानात जुलूम आहे, फार कशाला तुझ्या पायाजवळ असणाऱ्या रशियात अंदाधुंदीचा कळस झालेला आहे, म्हणून तेथील झारला तू अव्यवस्थेच्या अपराधाबद्दल पदच्युत करून ते राज्य अिंग्लंडला जोडू शकशील काय? तुझ्या शेजाऱ्याचे सामान त्याच्या स्वतःच्या घरात अव्यवस्थित पडलेलें आहे म्हणून त्याच्या घरात शिरून व त्याच्या मुसक्या बांधून ते घर ताब्यात घेण्याचा 'हक्क' तो तुला कसा मिळाला? परंतु डलहौसीचों वकिली देणारा आर्नोल्ड म्हणतो की, " नवाबाने ह्याशिवाय कितीतरी अपराध केलेले होते ! पहिली गोष्ट ही की ते आपल्या दासदासींना शालू बक्षीस देत, दुसरी गोष्ट म्हणजे ११ मे रोजी

त्यांनी दारूकाम सोडण्याचा जलसा केला. फार काय, पण अेक दिवस नबाबी त्यांनी औषध घेतलें व साही बेगम व ताज बेगम ह्यांना भोजनाचा आग्रह केला ! ! आता याहून भयंकर अपराध तो कोणता ! तरीपण नबाब ह्या अिंग्रजांचे की त्यानी म्हणून, नवाब नबाबी औषध घेत असतानाही निकटे कानाडोळा करून त्याना राज्यावरून काढलें नाही ! पण अखेर सर्व अिलाज थकले, कारण अेक दिवस नबाबाचें समोर काही घोड्यावर घोडे सोडले गेले! अर्थात् अिंग्रज सरकारास त्या घोड्याच्या या पातिव्रत्यभंगाची फारच कीव आली व त्यानी नवाबाना ह्या भयंकर प्रसंगी हजर राहण्याच्या अपराधाबद्दल राज्यावरून दूर केले !" असल्या क्षुल्लक गोष्टी देवून नबाबांच्या राज्यव्यवस्था-अक्षमतेचा डांगोरा पिटवू पहाणाऱ्या मूर्ख व मत्सरी अिंग्रज अितिहास-लेखकांनी हे प्रकार पहाण्यासाठी हिंदुस्थानापर्यंत येण्याची तसदी कशास घेतली कोण जाणे ! त्याना अिंग्लंडातच कोठेही रेनॉल्डचे ग्रंथ सापडले असते निदा ते जरी लज्जेने त्याना कोणी दिले नसते तरी अिंग्लंडच्या राजवाड्यातूनही त्याना पुष्कळ माहिती गोळा करता आली असती व घोड्याच्या पातिव्रत्यभंगापेक्षा फार महत्त्वाचे भंग करविणाऱ्यांची जिंदगी व राज्यें सालसा करून घेण्यात व स्वतःच्या घरचीं ही मोठीं बुजविण्यात त्यांना त्यांच्या वेळेचा जास्त अुपयुक्त व्यय करता आला असता !

* * *

प्रकरण पांचवें

## ढकला त्यांत –!!

आता अिच्छित राष्ट्रकार्याची तिथि जवळ येत चाललेली आहे. अशा समयी अिष्ट सिद्धीसाठी कुलदेवताची कृपा संपादन केलीच पाहिजे. ह्या प्रचंड राष्ट्रक्षोभाची कुलदेवता सूड ही आहे. हिला प्रसन्न केल्याशिवाय व तिला आपल्या मदतीस येणें भाग पाडल्याशिवाय १७५७ साली संकल्प सोडलेल्या रणकार्याची सिद्धि चांगली व्हावयाची नाही. म्हणून होमकुंडास प्रदीप्त करा व त्यात अितकी दिव्य हवनें द्या की, मुख्य कुलदेवता चैतन्ययुक्त होअून प्रकट झालीच पाहिजे. अिंद्र-जिताच्या प्रचंड यज्ञातून जसा अजिंक्य रथ निघेतोंपर्यंत हवनाचा धडाका अुडाला होता तसाच ह्या यज्ञातून मूर्तिमत सूड आपल्या सहस्र जिव्हा व सहस्र दंष्ट्रांनिशी आविर्भूत होअीपर्यंत होमकुंडात हवनें देण्याचा सपाटा चालवा. अिंद्रजिताचे वेळेस वानरलोक त्या यज्ञाचा भंग करण्यास धडपडत होते परंतु सुदैवाने ह्या राष्ट्रयज्ञास मदत करण्यासाठी अिंग्रजी लोक धडपडत आहेत. मग अुशीर का ? कोपहुताशन

चढाडलेला आहे व त्याच्या सात जिव्हा लवलव करीत अुंच अुड्या घेत आहेत. मग अुशीर कां ? चला, हविर्दानाला आरंभ करा !

ह्या पंजाबच्या अितिहासप्रसिद्ध कोहिनुराहून, ह्या तेजाच्या गिरिवराहून व ह्या राजचिन्हांच्या राजाहून पहिल्या हविर्दानाचा मान मिळविण्यास दुसरें कोण योग्य असणार ! म्हणून चल ये, हे डलहौसी, त्या कोहिनुरास त्याच्या खऱ्या मालकापासून हिसकावून घेअून चल ये. पंजाबच्या स्वातंत्र्याचा खून झाला हें त्या राष्ट्रक्षोभाच्या कुलदेवतेला कळविण्यासाठी हा अग्नि भडकत आहे. हा कोहिनूरही ढकला त्यांत !

ह्या ब्रह्मदेशाला दुसऱ्या हवनाचा मान मिळणें योग्य आहे म्हणून चल ये, हे डलहौसी, त्या ब्रह्मदेशास त्याच्या खऱ्या मालकापासून हिसकून घेअून चल ये ! अग्नि भडकत आहे तर अिष्टसिद्धीसाठी ह्या ब्रह्मदेशाला ढकला त्यात !

सातारची शिवाजीची गादी कुठे आहे? तिचा मान तिसऱ्या हवनाचा आहे. म्हणून तिच्यावरच्या राजांना स्मशानात वसावयास सांगून ती गादी, अिंग्रजांनो, जा नि लवकर आणा ! हा अग्नि भडकत आहे म्हणून मराठ्यांच्या वतीने ही सातारची गादी ढकला त्यात !

ह्या चौथ्या हवनाला नुसती नागपूरची गादी पुरे कशी पडणार ! तदर्थ त्या गादीबरोबर नागपूरचे सारे वाडे, हत्ती, घोडे, राजे, राण्या, राण्यांचे दागिने, आक्रोश, आरोळ्या जें जें मिळेल तें ते आणा ना लवकर ! हा अग्नि भडकत आहे म्हणून नागपूरचे नागपूर ढकला त्यात !

आता मात्र होमकुंड जाज्वल्य दिसू लागलें खरें. अशा वेळेला तितकाच जाज्वल्य असा हवि पाहिजे आहे. पण असा विस्तवाहूनही जालीम हवि ब्रह्मावर्ताशिवाय अितर कुठे सापडणार ! अग्नि प्रज्वलित झाला आहे म्हणून ब्रह्मावर्ताचा मुकुट ढकला त्यात !

राष्ट्रक्षोभाची न्यायदेवता मूड हीं प्रसन्न होण्यासाठी हा नवा हवि असा निवडा कीं यंव! हा मान तिचाच! ह्या वीतिहोत्राच्या ज्वाला आकाशास भिडाव्या अेतदर्थ ही झाशीची विजली ढकला त्यात!

पहा, पहा ह्या दिव्य होमकुडातून सर्व पापी दुर्योधनाच्या अंगाला कंप भरविण्यासाठी सूडाचे मस्तक वर दिसू लागलें! अशा वेळेला त्या आविर्भूत होअू पहाणाऱ्या देवतेला पूर्ण संतुष्ट करण्यासाठी हवनाचा मारा अुडविला पाहिजे. म्हणून चला हे अर्काटचे नबाब ढकला त्यात!

तंजावरची गादी ढकला त्यात !
अंगूलचे राजास ढकला त्यात !
सिक्किमच्या भागास ढकला त्यात !
संबलपूरच्या राज्यास ढकला त्यात !
खैरपूरच्या अमिरांना ढकला त्यात !

परंतु असा 'रुपये व मुर्दा किती गळाला याची तर गणतीच नाहीं. वास्तव असलीं हविर्दानें कोण मोजीत बसतो ! अत्यंत पुष्ट व अगदी निरपराध असा बळी लखनौच्या नवाबाशिवाय मापडणे दुर्मिळ आहे, म्हणून लखनौच्या नवाबांना ढकला त्यात !

अहाहा, ह्या अग्निकल्लोळांतून वर निघणाऱ्या देवतेची ही कोण अुग्रता! ह्या मुखाच्या ह्या भयंकर दाढांमध्ये सर्व जगत् देखील चिरडलें जाअील ! परंतु त्या दाढांची धार अधिक तीक्ष्ण झाल्याबाचून आपण थांबता अुपयोगी नाही. म्हणून दिल्लीच्या राजवाड्याला कुलुपें ठोकून व तेथील मयुरासनावर बसणाऱ्या अकबराच्या वंशजाला फरफर ओढीत आणून ढकला त्यात !

अयोध्येच्या प्रांतात मोठमोठाले तालुकदार[१] काय करताहेत ? त्यांच्या सर्व जमिनी व त्यांचे सर्व हक्क काढून टाकून व त्यांना रानटी पशूप्रमाणे पाठलाग करून आणा अिकडे ! तसेंच मुबअी अिलाख्यात अिनाम कमिशनमार्फत हजारो हक्कदारांचे हक्क झुगारून देअून त्यानाही आणा अिकडे ! होमकुंड धडाडून राहिलेले आहे. अेतदर्थ जमिनदार, जहागिरदार, तालुकदार, वतनदार, वगैरे सर्व दारांना नादार करून ढकला त्यात !

---

१. अयोध्येच्या राज्याला खालसा केल्यानंतर तेथील अत्यंत कुलीन व जनदार व प्रमुख लोकांची जी दुर्दशा अुडविली तिची हकीगत केवळ भयंकर आहे ! वंशपरंपरा असणाऱ्या जमिनी व वतनें अेका क्षणात नाहीशी होत ! ह्या दुर्दैवी तालुकदाराबद्दल के लिहितो—

"The charges against him were many and great for he had diverse ordeals to pass through and he seldom survived them all... When the claims of a great Talukdar could not be altogether ignored, it was declared that he was a rogue or a fool.... .They gave him a bad name and straightway they went out to ruin him! .. It was at once a cruel wrong and a grave error to sweep it away as though it were an encumbrance and an usurpation".

नवाबाना लावता न येणारी अशी त्याच्या राज्याची ही 'व्यवस्था लावण्याबद्दल ह्या व अितर सर्व जमिनदारांनी कंपनीस लवकरच कमा वेदम चोप दिला हे पुढे देण्यात येअीलच! अिनाम कमिशन जें नेमलें त्याने तर अेकच कहर अुडविला होता. अिग्रजाना जसे मोठमोठाले राजे नको होते तसेच त्यांना डोअीजड जमिनदारही नको होते. ज्या जमिनी व जहागिरी तरवारीचे सनदेने मिळविलेल्या होत्या त्या कागदी सनदा नव्हत्या म्हणून अेकसटा खालसा होत चालल्या! जवळ जवळ पस्तीस हजार वतने व टोलेजंग जहागिरी चौकशीत काढल्या गेल्या व त्यापैकी नुसत्या पांच वर्षात तीन पंचमांश गट्ट करून टाकल्या गेल्या !

राजे, महाराजे, बादशाह, प्रधान नवाब, वजीर, असले असले ह्या होमकुंडात पडलेले हे उत्तम हवि आमच्या राष्ट्रक्षोभाच्या कुलदेवतेला प्रसन्न करोत! आमच्या पूर्वजांच्या डोळ्यांतून आमची प्रस्तुतची ही दुर्दशा व गुलामगिरी पाहून गळणारे अश्रु त्या देवतेला सुस्नात करोत! सातारच्या गादीचे तुकडे पाहून संताप झालेला शिवाजी त्या देवतेला चैतन्य देवो! अयोध्येच्या राजवाड्यातील बेगमांचे हाल व नागपूरच्या महालात अपमानाने मेलेल्या अन्नपूर्णाबाईचा आत्मा त्या आमच्या राष्ट्रीय सुडाला चैतन्य देवो! हे सूडा, जगातील न्याय्य तरवारीचे धारेवर तू चढतोस तेव्हा तू देवांनाही वंद्य व ऋषींनाही स्तुत्य होतोस. सज्जनरक्षक सूडा! तुझा धाक जर नसेल तर अन्यायाचा कलि ह्या जगावर निरंकुशत्वाने नाचू लागेल. हे सूडा, तुझ्या उग्रत्वानेच कंपित होऊन पाप्यांना पुण्यवान् व्हावें लागतें तूच रावणाचा राम होतास, तूच दुर्योधनाचा भीम होतास व तूच हिरण्यकश्यपूचा नारसिंह होतास! त्यांच्या वेळेसही तुला प्रसन्न करण्यासाठी जितके हविर्दान झालेलें नव्हतें, तितके ह्या प्रचंड होमकुंडात झालेले आहे. अतएव, जगात अन्याय व अदाधुंद बंद करावी, परवशता व परदासता ठार व्हावी व स्वतंत्रतेचा व स्वराज्याचा जयजयकार व्हावा अशी परमेश्वराची इच्छा असल्यास तू ह्या यज्ञातून मूर्तिमंत प्रकट हो! वाहवा! 'मृत्युः सर्वहरश्चाहम्' अशी गर्जना करीत हा मूर्तिमंत राष्ट्रक्षोभ वर येत आहे! या भयंकर मूर्तीला शतशः प्रणाम असोत! ज्याच्या भयंकर दंष्ट्रांखाली उन्मत्त राजे चिरडले जाताहेत, ज्याच्या हातातील घणाने निरपराधी देशांच्या पायातील दास्याच्या बेड्या ताडकन् तुटत आहेत, ज्याच्या नेत्रातून सुटणाऱ्या ज्वाला जुलमाच्या अंधारकोठड्यांना जाळून भस्म करीत आहेत व ज्याच्या लवलव करणाऱ्या तप्त जिव्हा सहस्रशः दुःशासनांचीं रक्तें घटाघट पीत आहेत त्या ह्या भयंकर, उग्र व भयानक राष्ट्रीय सूडाला शतशः प्रणाम असोत!

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ।।

'हे हिंदभूमि, अखेर ह्या महायज्ञातून तुझा 'सूड' मूर्तिमंत रीतीने प्रादुर्भूत तर पावला खरा—पण तो शांत होऊन पूर्ण अंतर्धान काय काय केले म्हणजे पावेल हें तुला ठाऊक आहे काय?

* * *

प्रकरण सहावें

# आगीत तेल !

जगात असा कोणता सद्धर्म आहे की, ज्यात पारतंत्र्य व दास्य यांचा धिक्कार केलेला नाहीं ? यासाठी जिथे परमेश्वर असतो तिथे पारतंत्र्य कधींही असू शकत नाहीं व जिथे पारतंत्र्य असतें तिथे परमेश्वराचें अधिष्ठान कधीही असू शकत नाहीं. जिथे परमेश्वराचें अधिष्ठान नाही तिथे धर्म नाहीं. अेतदर्थ कोणच्याही प्रकारचें पारतंत्र्य म्हणजे धर्माचा अुच्छेद व परमेश्वरी अिच्छेचा भंग होय.

मनुष्य जातीच्या अुन्नतीसाठी अुत्पन्न झालेले सर्व धर्म हे मनुष्यजातीच्या अवनतीसाठी अुत्पन्न झालेल्या पारतंत्र्याला अेक क्षणभर तरी जिवंत ठेवण्याची आज्ञा देतील काय ? त्यातूनही राजकीय पारतंत्र्य सर्व पारतंत्र्यापेक्षा मनुष्यजातीची अत्यंत भयंकर अवनति करणारें असल्यामुळे या अधम राक्षसाचा कंठच्छेद करण्याची धर्माला प्रमुखत्वाने दिलेली असलीच पाहिजे. जे अितरांना परतंत्र करतात व जे पारतंत्र्यात राहतात ते दोघेही मनुष्यजातीला नरकाकडे लोटीत नेतात. म्हणून मनुष्यजातीला स्वर्गाकडे नेणारे सद्धर्म ह्या राजकीय पारतंत्र्याचा अुच्छेद करण्यासाठी आपल्या अनुयायांना कंठरवाने अुपदेश देत असतात. हा त्यांचा अुपदेश अमान्य करणारे सर्व लोक धर्मद्रोहीच होत. लोकांना पारतंत्र्यात टकलणारे अिंग्रज रोज चर्चमध्ये जात असले तरी ते धर्मद्रोहीच होत व पारतंत्र्याच्या नरकात कुजत पडणारे हिंदी लोक रोज अंगाला राख चोळीत असले तरी धर्मद्रोहीच होत. जे कोणच्याही प्रकारच्या दास्यात व विशेषत अनैसर्गिक अशा राजकीय दास्यात राहतात ते सर्व हिंदु धर्मभ्रष्ट होत व ते सर्व मुसलमानही धर्मभ्रष्ट होत. मग ते रोज हजार वेळा सध्या करोत किंवा हजारवेळा निमाज पढोत. हें लक्षात घेअूनच श्रीसमर्थ रामदासांनी स्वराज्यप्राप्ति हें धर्माचें मुख्य कर्तव्य आहे असें सांगितलेलें आहे. जें राज्य आपल्या संमतीशिवाय केवळ बलाने आपल्यावर चालविलेलें असतें असें परराज्य फेकून देणे, दास्याचा शृंखला तोडून टाकणें व मनुष्यजातीच्या अुन्नतीचें प्रथम साधन असलेले स्वराज्य मिळविणे—स्वातंत्र्य मिळविणे हें धर्माचें अत्यंत प्रधान कर्तव्य आहे असा प्राणनाथ प्रभूचा छत्रसालाला झालेला किंवा समर्थांचा शिवराजाला झालेला अुपदेश दोन शतकांनंतर हिंदुस्थानच्या पुण्यभूमीतील पुरुषाचे कानात आज व अज्ञात स्थाने जि. स. अठरासे सत्तावन साली पुन्हा गुणगुणू लागला !

हिंदुस्थानच्या पुण्यभूमीचें स्वराज्य घेअून हिंदुस्थानातील सर्व धर्म अिंग्रजांनी पायाखाली तुडविलेच होते. परंतु धर्माचा हा तात्त्विक अुपमर्द पुरा न वाटूनच की काय, त्या हिंदुस्थानातील पवित्र धर्माचा व्यावहारिक अुपमर्द करण्यासाठी अिंग्लिश लोक अेका पायावर तयार होते. आफ्रिकेत व अमेरिकेत तद्देशीयांना ख्रिश्चन धर्माची

दीक्षा देण्याचे कामात आलेल्या यशाने शेफारलेल्या पाश्चात्यांना त्या आफ्रिके-प्रमाणेच हिंदुस्थानातही सर्व लोकांना ख्रिस्ती बनवून टाकू अशी फार आशा होती. वेदप्राचीन हिंदुधर्मांची व ख्रिश्चानिटीचे पाठीवर नाचत आलेल्या अिस्लामाची पाळें-मुळें किती खोलवर गेलेली आहेत ह्याचें त्यांना यत्किंचितही ज्ञान नव्हते. तत्त्वज्ञानात, भक्तिप्रेमात व नीतिनैपुण्यात सर्व जगाचा आद्यगुरु असलेला आर्यधर्म आजपर्यंत कित्येकांच्या वारशास व वाराच्यास पाहात आलेला आहे. हें या अल्पधींना काय कळावयाचें आहे! त्यांना हिंदुस्थान ख्रिस्ती करण्याची आज जरी लवलेशही आशा अुरलेली नाही तरी मत्तावनपर्यंत त्यांची या यशःप्राप्तीबद्दल पूर्ण खात्री होती. औरंगजेबासारख्याच्या अुघड द्वेषाहून अत्यंत भयंकर असा गळेकापू द्वेष करण्याचा व हिंदुस्थानाला नकळत ख्रिस्तमय बनवून टाकण्याचा त्यांचा दृढ अुद्देश होता. अितकेंच नव्हे, तर तदर्थक त्याचे राजरोस प्रयत्नही चाललेले होते. हिंदुस्थानात पाश्चिमात्य शिक्षण-पद्धति सुरू करणारा मेकॉले आपल्या अेका खाजगी पत्रात लिहितो की, आपली ही शिक्षणपद्धति अशीच राहिली तर अेका तीस वर्षांत बंगालचा बंगाल ख्रिस्तमय बनून जाअील ! [१] ह्या टिटवीची अशी आशा व अशी खात्री होती की माझ्या चोचीने मी हा अगाध जलधि हा हा म्हणता अटवून टाकीन ! सर्व हिंदुस्थान ख्रिस्तमय बनवून टाकण्यासाठी प्रत्येक अिंग्रजाचे काहीतरी वेत चाललेलेच असत. ह्या धर्मप्रवर्तनास अिंग्रज सरकारने अुघड अुघड मदत करावी म्हणून हजारो मिशनऱ्याची होत असलेली विनवणी मान्य करून तीप्रमाणे हिंदु व अिस्लामी धर्मांच्या मानेवर अुघड रीतीने तरवार चालविण्यासही अिंग्रज सरकारने कमी केले नसते. परंतु त्या राष्ट्रास धर्मप्रवर्तनापेक्षा व्यापारप्रवर्तनाची व ख्रिस्तापेक्षा द्रव्याची भक्ति अधिक असल्याने ह्या अुघड मोहिमा करून धर्मासाठी हिंदुस्थानावरील राज्य बुडविण्यास तयार होण्याची छाती होअीना. अिच्छा नव्हती असे नाही, तर छाती होअीना. तरीही मोठमोठ्या नावाखाली आपले हेतु दडवून सतीचा कायदा, विधवा विवाहाचा कायदा, दत्तक पुत्राधिकाराची पायमल्ली वगैरे प्रसंगी हिंदुस्थानातील धर्ममजुतीत बळाने फेरफार करण्याचा संप्रदाय त्यांनी सुरू केलेलाच होता. मिशनऱ्यांच्या शाळांत सरकारी पैशाची मदत अव्याहत चाललेली होती. मोठमोठाले आर्चबिशप यांचे पगार मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांनी हिंदुस्थानच्या पिळून काढलेल्या पैशातून सुरू

---

१ Our English schools are flourishing wonderfully. In a single town of Hoogly 1400 boys are learning English. The effect of this education is prodigious ....It is my firm belief that if our plan of education is followed up there would not be a single idolator in Bengal 30 years hence ! "

— Macaulay's letter to his mother, O[illegible] 1[illegible] 183[illegible]

असत. ह्या अधिकाऱ्यांनी आपल्या हाताखालच्या लोकांस स्वतःच्या पवित्र धर्मांस सोडून ख्रिस्ती होण्याचा उपदेश करू लागावें. सरकारी कागदपत्रांत हिंदुस्थानातील लोकांचा उल्लेख 'Heathen' ह्या शब्दानें करण्यात यावा! आकाशातील बापाचें शुभवर्तमान ऐकविण्यासाठी इंग्रजी खजिन्याचा बहुतेक वेळ खर्च होत असे.

सैन्यामध्ये इंग्लिश लोक जे निरनिराळे अमलदार असत त्यांपैकी पुष्कळ केवळ अधिकाराचे जोरावर हिंदी धर्मांची पायमल्ली करण्यासाठीच शिरलेले असत. शांततेमध्ये सैन्यातील लोकांस कोणताच उद्योग राहत नसल्याने त्या वेळेस हिंदु व मुसलमान शिपायांस येशूचे वर्तमान सांगण्यास सवड ही अवधि मिळत असल्याने लष्करी खात्यात जिकडे तिकडे या मिशनरी कर्नलांचा व सेनापतींचा सुळसुळाट झालेला होता. ज्या रामचंद्राच्या पवित्र नामोच्चारणाबरोबर प्रत्येक हिंदूच्या अंतःकरणास भक्तीचे पाझर फुटू लागतात व ज्या महंमदाचे नांवाबरोबर सर्व इस्लामीयांचे रंध्रारंध्रांतून प्रेम दाटून येतें त्या रामचंद्राच्या व त्या महंमदाच्या नांवास ह्या पाद्री कर्नलांनी अश्लील शिव्यांची लाखोली वहावी! उठता बसता हिंदी शिपायांना अधिकाराचे जोरावर गप्प बसवून त्यांच्या प्राणप्रिय वेदांची व कुराणाची यथेच्छ निंदा त्यांच्या समक्ष सुरू होत असे. या मानवी राक्षसांचा हा उद्योग किती अव्याहत चाललेला होता व ह्या कृत्यामध्ये त्यांना किती गर्व वाटत असे ह्याचें स्पष्ट स्वरूप ध्यानात यावयास एक व्यक्तिविषयक उदाहरण देणें इष्ट आहे. सर्व धर्मांचा जनक आर्यधर्म व ख्रिस्तानिटीच्या मानेवर सुरी ठेवीत पुढे आलेला महंमदीय धर्म या धर्मद्वयाना व त्यांच्या अनुयायांना आपल्या तुटपुंज्या शुभवर्तमानानें पावन करू पाहणाऱ्या ह्या पाद्री सेनापतींपैकी बंगाल पायदळाच्या रेजिमेंटवरील एक कमांडर डौलात सांगतो की, "मी आज वीस वर्षेपर्यंत हें शुभवर्तमानाचें काम अव्याहत रीतीने करीत आहे. या काफर लोकांच्या आत्म्यांना सैतानापासून बचाव करणें हे एक लष्करी कर्तव्यच होय!" हिंदुस्थानच्या पैशावर पोसलेल्या ह्या पाद्रीवीरांनी एका हातात लष्करी हुकुमाचें बाड व दुसऱ्या हातात बायबलाचे बाड घेऊन एतद्देशीय शिपाई लोकांस बाटविण्याचा राजरोस प्रयत्न करीत असावे. इतकेच नव्हे तर त्या प्रयत्नास लवकर यश मिळण्यासाठी त्यांनी जो शिपाई ख्रिस्ती होईल त्याची बढती करण्याची उघड वचने देत असावें! शिपाई आपला धर्म सोडीत असल्यास हवालदार होई व हवालदार सुभेदार मेजर होई! अशा रीतीने लष्करी खाते म्हणजे एक ख्रिश्चानिटीचें बळजोरीचें मिशनच होऊन बसले! हिंदुस्थानच्या पैशाने पोसलेले हात व हिंदुस्थानच्या पैशाने विकत घेतलेल्या तरवारी हिंदुस्थानी धर्मांच्या मानेवर ठेवण्यात आलेल्या पाहून सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांच्या या हेतूबद्दल संशय उत्पन्न झाला व त्यात दररोज नव्या पुराव्यांची भर पडून हलके हलके सर्व हिंदुस्थान ख्रिस्ती करण्याचे इंग्रजी धोरण सर्वत्रांस स्पष्ट दिसू लागलें. आपल्या सनातन आर्यधर्मांचा व आपल्या प्राणप्रिय इस्लाम धर्मांचा गळा कैसाने कापला जात आहे असें पाहताच हिंदु व मुसलमान

चवताळू लागले. धर्मरक्षणार्थ प्राणही देऊं म्हणून धापया घेऊं लागले व फिरंग्यांच्या असह्य जुलमानें त्यांच्या अंगाची लाही लाही होऊं लागली !

—व अशा या भडकत चाललेल्या आगीत तेल ओतण्यासाठीं हिंदुस्थानच्या लष्करात नवीन काडतुसें वापरण्याचा हुकूम सुटला ! नवीन प्रकारच्या बंदुकांना नवीन काडतुसें वापरण्याची आवश्यकता पडल्याने हीं काडतुसें करण्याचा कारखाना हिंदुस्थानात काढण्याचा सरकारनें ठराव केला. हा ठराव जरी १८५७-च्या आरंभी अंमलात येऊं लागला तरी या काडतुसांचा प्रवेश हिंदुस्थानात पूर्वीच झालेला होता. हिंदुस्थानातील हिंदु व मुसलमानांच्या धर्मसमजुतींना कस्पटाप्रमाणे मानणाऱ्या फिरंगी सरकारनें इंग्लंडमध्ये गाईची चरबी लावलेलीं हीं काडतुसें १८५३ सालीच हिंदुस्थानात आणविलीं होतीं असें आता सिद्ध झालेलें आहे ! कानपूर, रंगून व फोर्ट विल्यम येथील हिंदुस्थानी फौजेला त्या काडतुसांना कशाची चरबी लावलेली आहे हें बिलकुल कळू न देता हिंदु—मुसलमानांना अिंग्रजांनीं १८५३ सालीच वाटविलेलें होतें ! ह्या दगेखोरपणाचे कपट १८५७ साली अुघडकीस येअीपर्यंत काडतुसांना वाटेल ती चरबी लावण्याची अिंग्रजांनीं जाणून बुजून व्यवस्था केली होती. ही गोष्ट अजमासानेच सिद्ध केलेली नसून १८५३ च्या डिसेंबरामध्ये कर्नल टकरनें धाडलेल्या सरकारी रिपोर्टात ह्या गोष्टीचा स्पष्ट अुल्लेख केलेला आहे.[२] खुद्द कमांडर-अिन-चीफलाही ही गोष्ट माहीत होती ! असें असताही हिंदुस्थानी शिपायांना तीं काडतुसें देण्यात येऊन त्यांच्या पवित्र धर्माला भ्रष्ट करण्याचें अधम कृत्य सतत सुरु ठेवलेलें होतें ! अिंग्रजाच्या मनातील या दगेबाजपणाची कल्पना सन १८५३ साली हिंदी शिपायांना मुळीच नसल्यानें त्यांनीं हीं काडतुसें राजरोस रीतीनें व नि:शंकपणानें वापरलीं. अशा रीतीनें आपलें कपटप्रचुर बेत सिद्धीस जात असलेले पाहून तीं काडतुसें करण्याचा कारखाना खुद्द डमडम येथे काढण्यात आला. ह्या कारखान्यात तयार होणाऱ्या काडतुसांना पूर्वीचीच चरबी लावण्यात येत असे. पण असें करण्यात हिंदुस्थानातील लोकास बाटविण्याचा सरकारचा अुद्देश नव्हता हें मात्र कोणीही विसरता कामा नये ! अुद्देश नव्हता ! असला अुद्देश नसतानाच आमचा देश धुळीस मिळाला ! असला अुद्देश नसतानाच आमचें स्वराज्य चरचर चिरलें गेलें व असला अुद्देश नसतानाच आमच्या धर्माचा अुच्छेद होत आला ! कमांडर-अिन-चीफलाही ही चरबीची गोष्ट माहीत असून त्यानें काय म्हणून हिंदूंच्या तोंडात गाईचें मांस व मुसलमानाचे तोंडांत डुकराचें मांस कोंबलें ? ह्या अेका व्यवहारात अिंग्रज सरकारनें किती वेळा धडधडीत खोटीं विधानें केलेली आहेत हे पाहिलें म्हणजे रक्ताचा प्रत्येक बिंदु बदू लागतो ! काडतुसाला गाईची व डुकराची चरबी लावितात ह्या कंडीवर शिपायांनीं अंधपरंपरेनें विश्वास ठेवला असें म्हणणाऱ्या निर्लज्ज

२. Kaye Vol. I. p. 380

लोकांनी डमडम येथे कारखान्यात मक्तेदाराने चरबी पुरवीत असावें, त्याचें करारपत्र अवश्य पहावे[३] त्यात काडतुसासाठी गाअींची चरबी अुपयोगात आणलेली होती की नाही याचें स्पष्ट अुत्तर मिळेल ![४] दोन आण्यांना अेक पौंड अशा दराने हिंदु लोकांच्या आअींचे ठिकाणी असलेल्या गाअींची चरबी पुरविली जात होती व त्या चरबीत डुकराच्या चरबीचा अंश मिसळविला जात होता हेंहि बिलकूल असंभवनीय नाही. या काडतुसांचा गवगवा होताच १८५७ च्या जानेवारी २९ ला अेक सरक्युलर धाडण्यात आलें होतें. त्यात सरकारी हुकूम म्हणतो : "नेटिव्ह शिपायासाठी केलेल्या काडतुसाना जी चरबी लावावयाची असते तीत फक्त शेळीची किंवा बोकडाचीच चरबी लावावी. डुकराची किंवा गाअींची चरबी बिलकुल अुपयोगात आणू नये." या घाअींघाअीने काढलेल्या सरक्युलरावरून हेंच सिद्ध होत आहे की, गाअींची व डुकराची चरबी न लागू देण्याचा यापूर्वी शिरस्ता नव्हता ! डमडम व मिरत येथे हे काडतुसांचे कारखाने होते. त्यांपैकी डमडमच्या कारखान्यात काम करीत असलेल्या अेका मेहेतराने अेका ब्राह्मणापाशी त्याच्या लोट्यातील पाणी मागितलें. तसें केल्यास लोटा विटाळेल असें त्या ब्राह्मणाने म्हणताच तो मेहेतर अुत्तरला : "आता सर्वत्रच विटाळ माजणार आहे ! ज्या काडतुसांना तुम्ही दातानी तोडणार तीं काडतुसें *गाअींच्या व डुकराच्या चरबीने मढविलीं जात आहेत !*" हें अैकताच तो ब्राह्मण अितर शिपायाकडे जाअून हे वृत्त कथन करू लागला. डमडम येथे लवकरच सर्व शिपाअीलोक साशंक झाले व बारीक तपास करता काडतुसांना गाअींची व डुकराची चरबी लावलेली असते हे सत्य त्यांच्या नजरेस स्पष्ट दिसू लागलें ! ही डमडम येथील बातमी वणव्याप्रमाणे अितस्ततः पसरली. प्रत्येक शिपायाला आपल्या हातास गाअींची व डुकराची चरबी लपटलेली दिसू लागली व प्रत्येक लष्करी ठाण्यामध्ये ख्रिस्ती लोकांच्या या कपटाने ज्याला त्याला आपल्या धर्माचा व आपल्या अस्तित्वाचा अेक क्षणाचाही भरंवसा वाटेनासा झाला. हे पाहताच धावरून गेलेल्या अिंग्रजी सरकारने आपले कृष्णकृत्य लपविण्यासाठी मनुष्यजातीला सदोदित काळिमा लावण्यासारखीं नीच व खोटीं विधानें करण्याचा सपाटा चालविला. काडतुसास गाअींची व डुकराची चरबी लावलेली होती हे जेव्हा नाकबूल करणें अशक्य झालें तेव्हा हिंदुस्थान सरकारचा लष्करी सेक्रेटरी बर्च ह्याने सरकारी रीतीने जाहीर केलें की मीरत व डमडम येथे होणारीं नवी काडतुसें आम्ही अजूनपर्यंत मुळीच वाटलेलीं नाहीत ! हें त्याचें विधान साफ खोटें होतें. अंबाला, सियालकोट व नवीन बंदुकांचे शिक्षणासाठी अुघडलेल्या मोठमोठ्या लष्करी वर्गांतून हीं

३ Kaye Vol. I, p. 381.

४ "There is no question that some beaf fat was used in the composition of the tallow. Kaye Vol. I, page 381.

चरबी लावलेलीं काडतुसें १८५६ सालापासून धाडण्यात येत होतीं. अंबाल्याच्या डेपोमध्ये २२५०० व मियालकोटला १४००० काडतुसें २३ ऑक्टोबर १८५६ या दिवशीच रवाना झालेली असताही कर्नल बर्च जानेवारी १८५७ मध्ये सरकारी रीतीने म्हणतो की, कारखान्यातून अेकही काडतूस वाटण्यात आलेले नाही! जिथे लष्करी वर्ग होते तिथे ही नवीन बंदूक कशी वापरावयाची हें शिकवितांना हीं काडतुसें अुपयोगात आणलेलीं नव्हतीं हें असंभवनीयच होतें. शिवाय मागे लिहिलेंच आहे की, १८५३ साली हीच काडतुसें हिंदी शिपायांना बिलकुल माहिती न देता त्यांच्याकडून वापरविण्यात आली होती. गुरखा पलटणीत तर हीं काडतुसें राजरोस रीतीने वाटण्यात आलेली होतीं! तरी बर्च अेवाद्या कसलेल्या भामटयासारखा निधडया छातीने म्हणतो की, चरबी लावलेलें अेकही काडतूस वाटण्यात आलेलें नव्हतें! ५

भोळसर शिपायांना वाटेल ते लपंडाव करून फसवू पाहणाऱ्या सरकारचा हा प्रयत्न फसताच मग शिपायांना पाहिजे तर त्यांनी आपल्या काडतुसास स्वतःच वाटेल तो चिकट पदार्थ लावावा अशी परवानगी देण्यात आली. या परवानगीचा परिणाम जसा व्हावयाचा तसाच झाला. ज्याअर्थी सरकारने चरबी लावण्याचा हट्ट अितक्या लवकर सोडून दिला त्या अर्थी या दाराने आपली समजूत काढून आपणांस दुसरीकडून फसविण्याचा सरकारचा बेत असला पाहिजे असें त्यांस नक्की वाटू लागले. चरबीचे अैवजी आपणांस वाटेल तो चिकट पदार्थ लावण्यास सांगितले खरें; परंतु ज्या सरकारने चरबीत नकळत गाअीचें व डुकरानें मांस घातलेलें होतें तें सरकार ह्या काडतुसांवर असलेल्या कागदालाही चिकटपणा आणण्यासाठी असाच अेखादा धर्मबाह्य पदार्थ लावण्यास कमी करणार नाही कशावरून ? तेव्हा हीं काडतुसेंच काही केल्या घ्यावयाचीं नाहीत असा दृढ निश्चय करून तो सर्वत्रानी पार पाडला पाहिजे.

परंतु हें जरी ठरलें तरी अितक्या ठरण्याने काही मुख्य संकट टळणार नाही. फारतर हीं काडतुसें निघून जातील; परंतु याच्या अैवजीं अुद्या दुसरें अेखादें संकट येअील. तेव्हा ही काडतुसें न घेण्याने काही धर्मावरील खरें खरें संकट टळणार नाही. परदास्याच्या नरकात पडलेल्यांचा धर्म पवित्र कसा असू शकणार ! गाअीची चरबीच काय, परंतु देशमातेची चरबी कापून काढण्यात येत आहे तिकडे खुशाल

५. " At the twelfth hour, Colonel Birch came forward to assure the sepoys that not a single cartridge served out to them had been greased The declaration was a lie on the very face of it. The sepoys were not to be deceived and, as says a bold and truthful writer, "The Government only stooped to the meaness of prevarication." —Pamphlet by a Hindu of Bengal, 1857.

कानाडोळा करून बसणाऱ्यांचा धर्म जिवंत कसा राहू शकेल ! सद्धर्मं स्वर्गात असतात व पारतंत्र्यातील लोक नरकात असतात. तेव्हा त्यांना धर्म जर हवा असेल तर त्यांनी ह्या पारतंत्र्याच्या घाणीला आपल्या व आपल्या शत्रूंच्या रक्ताने धार धुऊन साफ केलें पाहिजे !

म्हणून आता काडतुसे वापरावीं लागोत किंवा न लागोत, हिंदुस्थाना, धर्म-रक्षण अवश्य असेल, धर्मोद्दिष्ट जें मानवी प्रगमन ते साधण्याचा जर तुझा हेतु असेल, तुला जर सर्व अपमानाची लाज वाटत असेल तर ह्या परदास्याचा भंग करण्यास तयार हो ! धर्मासाठी मर, मरोनि अवध्यासि मार आणि मारिता *मारिता स्वराज्य परत घे ! सत्तावनवें साल युजाडलेलें आहे म्हणून बूठ,* हिंदुस्थाना, ऊठ व स्वराज्य परत घे !

* * *

प्रकरण सातवें

# गुप्त संघटना

मागील प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे सर्व हिंदुस्थानभर क्रांतीची सामग्र इतस्ततः तयार होऊन पडत असता त्या सामग्रीची यथायोग्य घटना कशी करा-वयाची व त्यातून क्रांतियुद्धाची इमारत कशी उभारावयाची याचा नकाशा इकडे ब्रह्मावर्ताकडे तयार होत होता.

मागील प्रकरणात आपण अझीमुल्ला खानाना युरोपच्या प्रवासात सोडून दिलेले आहे. त्या प्रवासात जाण्यापूर्वी लंडनमध्ये त्याच वेळेस साताऱ्याचे गाऱ्हाणें घेऊन रंगो बापूजी नावाचे जे एक हुशार व कर्ते गृहस्थ आलेले होते, त्यांची गाठ अझीमुल्लाखान यांनी घेतली. साताऱ्याच्या गादीचे प्रेत जाळण्यासाठी आलेले रंगो बापूजी व पेशव्याच्या गादीचे प्रेत जाळण्यासाठी आलेले अझीमुल्लाखान याचे *त्या दोन्ही इतिहासप्रसिद्ध गाद्यांच्या प्रेतसंस्कारसंबंधी काय बेत झाले, आपल्या* देशाचा सर्वनाश करणाऱ्या फिरंग्याचा समाचार घेण्यासाठी त्यांनी कोणत्या शपथा घेतल्या व हिंदुस्थानात परत जाऊन साताऱ्यास रंगो बापूजीने व ब्रह्मावर्तास अझीमुल्लाखानाने स्वदेशस्वातंत्र्यार्थ प्रचंड युद्धाची रचना करावयासाठी काय काय खलबतें केली हे इतिहासास जरी वर्षाहीं नक्की सांगता येणार *नाहीं, तरी अठराशे सत्तावनचे युद्ध झाले ही गोष्ट जितकी खरी आहे, तितकीच* त्या युद्धाचे बेत लंडनमध्ये रंगो बापूजींनी व अझीम उल्लाखानानें केले होते ही

गोष्टही खरी आहे. लंडन सोडल्यानंतर रंगो बापूजी साताऱ्याला अेकदम परत गेले व अुतरेकडे ब्रह्मावर्तास ज्या अिमारतीचा नकाशा तयार होत होता, त्या अिमारतीच्या साहित्याची तयारी करू लागले. परंतु अझीमुल्लाखान हे परस्पर रीतीने हिंदुस्थानात न येता युरोपमध्ये प्रवास करू लागले. त्याच वेळेस क्रिमिया बेटात अिंग्रजांची रशियाशी झुंज सुरू होती व रशियन अस्वलाच्या तावडीत ब्रिटिश सिंहही गाय होअू लागला होता. अझीमुल्लाखानाच्या कानावर ही बातमी येताच त्यांच्या मनात घोळत असलेल्या महत्कार्यास पुष्टि मिळाली व आपल्या स्वदेशाच्या छातीवर नाचणाऱ्या या अिंग्रज सिंहास रशियनांनी कितपत जखमी केलेले आहे, त्याचे किती पंजे कापलेले आहेत व बाकीचे कापण्यासाठी आपल्या प्रिय हिंदुस्थानाच्या होणाऱ्या प्रयत्नांस रशियाची कितपत सहानुभूति किंवा सहकारिता मिळविणे शक्य आहे याचा प्रत्यक्ष खुलासा करण्यासाठी अझीमुल्लाखान हे क्रिमिया बेटाकडे जाण्यास सिद्ध झाले.

युरोपमध्ये प्रवास करून अझीमुल्लाखान हे हिंदुस्थानात परत आल्यावर ब्रह्मावर्तांच्या राजवाड्यात निराळेंच वातावरण खेळू लागले. सर्व हिंदुस्थानभर विजयानंदात डुलणारा जरिपटका आजपर्यंत त्या वाड्यात धूळ खात पडलेला होता. जिच्या आवाजाबरोबर लाखो मराठी समशेरी शत्रूवर रणांगणात तुटून पडत ती पेशव्यांची दुंदुभि आजपर्यंत त्या वाड्यात वीररसाच्या अैवजी करुणरसाचे ध्वनि काढीत पडलेली होती व जिच्या मुद्रणावर दिल्लीच्या सिंहासनाची घडामोड अवलंबून असे ती देशव्यापी राजमुद्रा आजपर्यंत त्या वाड्यात आपल्या स्वतःच्याच वैधव्यावर शिक्का मारीत पडलेली होती. परतु अझीमुल्लाखान युरोपातून परत येताच त्या सर्व वस्तूंना अेक विलक्षण चैतन्य मिळाल्यासारखें दिसू लागलें. धूळ खात पडलेले जरिपटके पुन्हा चमकू माहू लागले, व श्रीमंत नानासाहेबांच्या त्या 'तेजस्वी, चपल व अुग्र' नेत्रांना असह्य मानभंगातून अुत्पन्न झालेल्या सुडाने अधिकच अुग्रता व 'तस्मात् युद्धाय युज्यस्व' या भगवत् चेतनेने अधिकच तेजस्विता येअू लागली. 'तस्मात् युद्धाय युज्यस्व!' स्वराज्याची होळी झालेली आहे, तस्मात् युद्धाय युज्यस्व! स्वदेशात, ह्या आपल्या हिंदुस्थानात फिरंगी चोराचा सुळसुळाट आलेला आहे, तस्मात् युद्धाय युज्यस्व! स्वधर्माची पायमल्ली होत आहे, व स्वातंत्र्याची पायमल्ली होत आहे, तस्मात् युद्धाय युज्यस्व! स्वदेशस्वातंत्र्य हे कोणासही आजपर्यंत युद्धावाचून मिळालेलें नाही. छत्रपतींना ज्यासाठी तानाजीचा बळी द्यावा लागला तो हा स्वराज्याचा सिंहगड युद्धावाचून कधी मिळणार नाही. धर्मरक्षणासाठी जो स्वराज्य संपादन करीत नाही तो महाराष्ट्रधर्मातला अस्सल मराठा नव्हे व जो महाराष्ट्रधर्मातला अस्सल मराठा आहे तो स्वराज्य संपादण्याचा जो अेकच मार्ग आहे त्या समरमार्गाकडे अढी घेण्यास कधीही मागे येणार नाही. अेतदर्थं युद्धाय युज्यस्व!

श्रीछत्रपतींनी आरंभिलेल्या स्वातंत्र्ययज्ञाच्या होतृत्वाचें कंकण बांधण्यास जो हात पुढे सरसावतो तो सदोदित धन्यतम होय ! " *हतो वा प्राप्यसि स्वर्गं, जित्वा वा भोक्ष्यसे महीम्* । तस्मात् युद्धाय युज्यस्व ! ! "

अशी दैविक चेतना श्रीमंत नानासाहेबांचे नेत्रांस अधिक अुग्रता व अधिक तेजस्विता देअू लागली. श्रीशिवराजाला जें कर्तव्य करावें लागलें तेंच महत्कार्य करण्याचें त्याच्या वाट्याला आलेलें होतें व म्हणून जय येवो किंवा अपजय येवो, परंतु मी अेकतर स्वातंत्र्याचा 'नूतन' शिवराज तरी ठरेन किंवा निदान *पहिल्या पेशव्यास शोभेल असा 'शेवटचा' पेशवा तरी ठरेन असा त्याच्या मनाचा* दृढ निश्चय झाला.

आपल्या देशाचें व आपल्या राज्याचें निदान ठरवू असा वीरोचित निश्चय *ठरविल्यानंतर त्या निश्चयाची सिद्धि करण्याकडे श्रीमंत नानांचे सर्व लक्ष वेधून* गेलें. स्वराज्य प्राप्तीसाठी जें क्रांतियुद्ध करावयाचें त्याला यश येण्यासाठी दोन गोष्टी अगदी अवश्य होत्या. पहिली गोष्ट म्हणजे हिंदुस्थानातील सर्व लोकांमध्ये स्वातंत्र्याची जंगी व अनिवार्य अिच्छा अुत्पन्न होणें व नंतर त्या अिच्छेच्या सिद्धी-साठी अेकमयावच्छेदेंकरून सर्व देशानें अुठावणी करणें. हिंदुस्थानच्या मनास स्वातंत्र्यगामी करणें व हिंदुस्थानच्या अितिहासास स्वातंत्र्यगामी करणे, ही दोन्हीही कामें परवशाच्या हातावर तुरी देअूनच करावयास पाहिजे होतीं कारण ज्या ज्या परतंत्र देशाच्या मनात स्वातंत्र्यसंग्राम करावयाचें असतात, त्या त्या देशास त्या संग्रामाची गुप्त तयारीच करावी लागते. परकी लोकांच्या हातात सर्व सत्ता असल्याने त्यांच्या विरुद्ध करावयाचे प्रयत्न फार गुप्ततेनेच करावे लागतात. नाहीतर त्या प्रयत्नांच्या अुत्पन्नकालीच त्यावर अमोघ दमतीचा मारा करून बलवान शत्रु त्यांचा सहज चुराडा करू शकतो. हे अैतिहासिक सत्य जाणून श्रीमंत नानासाहेब व अझी-मुल्लाखान या दोघा महनीय विभूतींनी सुमारे १८५६-च्या आरंभापासून स्वातंत्र्या-कडे हिंदुस्थानचें मन प्रवर्तन व शरीरप्रवर्तन करण्यासाठी युद्धसंघटना सुरू केली !

हिंदुस्थानात जेवढे राजे होते तेवढ्यांना जर अिंग्रजांविरुद्ध अुठण्याची अिच्छा अुत्पन्न झाली तर अेका क्षणात आपला देश आपल्या ताब्यात येअील ही गोष्ट नानाच्या बरीच ध्यानात आलेली होती. त्या हिंदुस्थानी डॉअीजड राजापासून पुढेमागे अिंग्रजी राज्यास धोका येअील असे जाणूनच अिंग्रज सरकार संस्थानामागून संस्थान खालसा करीत चालले आहे ही वस्तुस्थिति सर्व राजेरजवाड्यांपुढे मांडून *त्यांची मनें स्वातंत्र्यगामी करण्यासाठी नानांनी प्रत्येक दरबारात आपले दूत* धाडण्यास आरंभ केला. कोल्हापूर, दक्षिणेकडील सर्व पटवर्धनी संस्थाने, अयोध्येतील जमिनदार व दिल्लीपासून म्हैसूरपर्यंत असलेल्या सर्व राजधान्या वगैरे ठिकाणी नानांचे दूत व नानांची पत्रें सर्व हिंदुस्थानास स्वातंत्र्ययुद्धार्थ अुठविण्याची चेतना देत हिंडत होतीं. अिंग्रजांच्या अमलाखाली स्वराज्याची व स्वधर्माची कशी धुळधाण

होत चाललेली आहे, जीं संस्थानें आज हयात आहेत तीं देखील अुद्या कशीं नामशेष होणारीं आहेत, अिंग्रजाच्या विश्वासघातकी दास्यामुळे आपल्या प्राणप्रिय हिंदुस्थानची कशी धुळधाण अुडालेली आहे, हें स्पष्ट व मार्मिक रीतीने जनतेच्या मनात भरवून देत मौलवी, पंडित व राजकीय संन्यासी सर्व हिंदुस्थानभर गुप्त रीतीने संचार करू लागले. दास्याची व पारतंत्र्याची चीड अुत्पन्न करून नंतर तें दास्य नामशेष करणें हें किती सुलभ आहे, हिंदुस्थानच्या अुरात हिंदुस्थानची तरवारच कशी भोसकली जात आहे व हिंदुस्थानी लोकांनी आपल्या स्वदेशासाठी अुठण्याचें मनात आणताच अेका क्षणात त्यास आपला स्वदेश फिरंग्यांचे ताब्यातून मुक्त करणे कसें सोपें आहे, हे राजापासून रंकापर्यंत प्रत्येक हिंदी अंतःकरणास त्या राजकीय संन्याशांनी समजावून सांगावें. आपण सर्व देशबंधु अेक होअू तर मूठभर गोऱ्यांचा धुव्वा अुडवून देअून स्वदेश अेका क्षणार्धात स्वतंत्र करू हा आत्मविश्वास प्रत्येक शिपायाचे व प्रत्येक नागरिकाचे मनात या राजकीय संन्याशांनी कसा अुत्पन्न केलेला होता हें त्या वेळच्या स्वदेशभक्तांचे अुद्‌गारात पदोपदी दृष्टीस पडतें. काली नदीच्या लढाअीत पाडाव केलेल्या अिंग्रजानी प्रश्न केला की, "आमच्या विरुद्ध अुठण्याची तुमची छाती कशी झाली ?" त्या अुर्मट प्रश्नाला त्या शिपायांनी अुत्तर दिलें, "हिंदुस्थानी शिपाअी अेक झाला तर गोरा चटणीला पुरणार नाही!"

अिंग्रज सरकारने सत्तावनचे आरंभी शिपायांचीं पत्रें फोडण्यास आरंभ केलेला होता. त्या पत्रांपैकी अेक पत्र हिंदुस्थानातील लोकांच्या सामर्थ्यासंबंधी म्हणतें की, "परकयांना आपणच आपल्या अुरावर चढवून घेत आहोत! जर आपण अुठू तर फिरंग्यांच्या मूठभर लोकास तरवारीच्या अेका झटक्यात गारद करून टाकू! कलकत्त्यापासून पेशावरपर्यंत 'साफ मैदान है!"

श्रीमन्त नानासाहेबांच्या स्वदस्तुरच्या पत्रांनी व ब्रह्मावर्ताहून धाडलेल्या संन्याशांनी असल्या अुदात्त आत्मनिष्ठेचीं बीजें हिंदी अंतःकरणात पेरून दिलीं. परंतु हल्ली अुपलब्ध असलेल्या माहितीवरून असें दिसते की, या बीजांना अयोध्येचें राज्य खालसा होअीतोपर्यंत जोमदार अंकुर फुटले नव्हते[1]

---

1. निरनिराळ्या प्रांतात धाडलेल्या राजकीय दूतांपैकी अेक जण म्हैसूरला पकडण्यात आला होता. त्याच्या जबानीतील खालील भाग फार महत्वाचा असल्याने तो सादर देत आहे. "श्रीमंत नानांनी अयोध्येला खालसा करण्याचे पूर्वी सुमारे दोनतीन महिने पत्रेंपण सुरू ठेवलेले होते. परन्तु प्रथम त्यांना अुत्तरें आलीं नाहीत. कोणाल्याही आशा नव्हती. अयोध्येच्या राज्याला खालसा केल्यानंतर नानांनी पत्रांचा आणखी मारा केला व तेव्हा मात्र लखनौच्या सावकारांना नानांचीं मतें ग्राह्य वाटू लागलीं. पुरभय्या वगैरा परदेशी लोकांचा पुढारी राजा मानसिंग

(टीप पुढील पानावर चालू)

१८५६ साली अयोध्येचें राज्य खालसा होताच परदास्याचा तिटकारा सर्व लोकांत अकस्मात् रीतीनें उत्पन्न झाला. स्वातंत्र्याचें रम्य व पुण्यदर्शन श्रीमंत नानाच्या दीर्घ दृष्टीला यापूर्वीच घडलें होतें व परदास्याच्या घाणीचा दुर्गंध लांब अंतरावरूनच त्यांनी ताडला होता. परंतु जडबुद्धीच्या सामान्य जनसमूहाला प्रत्यक्ष पुराव्याशिवाय तें ग्रहण करता आलें नाहीं. ह्या अयोध्येच्या राज्याला खालसा करण्यात येताच मात्र जो तो आपल्या अस्तित्वाचा धिक्कार करू लागला व गुलामगिरींत खितपत पडण्यापेक्षा मरण बरें अशी गर्जना करून आपल्या तरवारीला पाणी चढवू लागला. याच सुमाराम हिंदुस्थानच्या अितिहासप्रसिद्ध राजधानीलाही नवीन चेतना मिळाल्यासारखी होअून दिल्लीचें राजवाड्यात स्वातंत्र्ययुद्धाची खलबतें सुरू झाली. दिल्लीच्या पादशहाची पातशाही घेअूनच अिंग्रज थांबले नाहीत, तर त्याची 'बादशहा' ही शाब्दिक पदवी देखील त्याच्या पश्चात् चालू नये म्हणून ठरविलेले होते. अशा विपन्नावस्थेत आपले पूर्ववैभव मिळविण्यासाठी अेकदा शेवटचा प्रयत्न करून पहावा व मरायचेंच असेल तर बादशहाला शोभेल असे बादशाही मरण तरी यावें असा दिल्लीचे राजवाड्यात घाट जमू लागला. या कामात प्रमुख मुसलमानी सत्तांचे साह्य मिळावें म्हणून मी सुन्नी पंथ सोडून देअून अयोध्येचे नवाब व अिराणचे शाह यांच्या शिया पंथाचा स्वीकार करतो असेही बहादूरशहाने जाहीर केले. अितक्यात अिंग्रजांची अिराणशी लढाअी सुरू झाली. तेव्हा हिंदुस्थानातही त्याच सुमाराम अुठावणी होणे आपल्यास फार अिष्ट आहे असें पाहून अिराणचे शहाने १८५६ साली आपण दिल्लीचे पादशहास मदत देतो असे लिहून पाठविले. अितकेंच नव्हे तर १८५७ चे आरंभी दिल्लीच्या मशिदीवरून याच अर्थी सार्वजनिक जाहिरनामे फडकू लागले ! "फिरंग्यांचे ताब्यातून हिंदुस्थानची मुक्तता करण्यासाठी अिराणी सैन्य लवकरच येत आहे. तेव्हा वृद्ध व तरुण, लहान व थोर, सुशिक्षित व अशिक्षित, रयत व लष्कर अशा सर्व जनांनी या काफीर लोकांच्या ताब्यातून मुक्त होण्यासाठी समरांगणात अुडी घ्यावी ! !"[२]

---

(टीप मागील पानावरून चालू)

हाही मिळाला. नतर शिपाअी लोकांनी आपआपल्यात 'तजविजा' करण्याला आरंभ केला व लखनौच्या सावकारावडून त्याना मदत होअू लागली. अयोध्या खालसा होअीतोपर्यंत बिल्कूल अुत्तरें आलीं नाहीत. परतु ते राज्य खालसा होताच थोकडो लोकानी धीटपणानें पुढे येअून नानास वचनपत्रें धाडलीं. शिपायाच्या तजविजा आधीच सुरू झालेल्या होत्या. पुढे काडतुसाचा प्रसग गुदरला, व मग त्या प्रसतोपानतर तर नानावर पत्राचा पाअूस पडू लागला! जम्मूच्या गुलाबसिंगाने 'मी सैन्य व खजिना घेअून सिद्ध आहे' असे पत्र धाडले व लखनौच्या सावकारापर्यंत पैशाच्या रकमाही त्याने पाठवून दिल्या."

2. Kaye Vol. II page 30.

या जाहिरनाम्याचे अुतारे सर्व हिंदी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले व दिल्लीचे लोकांत क्रांतियुद्धाची लाट अुमळू लागली. दिल्लीचे बादशहाचे चिटणीस मुकुदलाल म्हणतात : "राजमंदिराचे द्वारासी बसून मोंगल लोक व वाड्यांतील मंडळी अुघड रीतीने युद्धाची चर्चा करीत असत. शिपाओ लोक लवकरच बंडावा करीत राजवाड्याकडे येतील व मग फिरंग्यांचें जोखड झुगारून देअून आपलें राज्य पुन्हा प्रस्थापित होओील अशी निश्चयात्मक बोलणी चालत व आपले राज्य झाल्यावर आपल्या देशातील सर्व सत्ता व सर्व अधिकार आपल्याच हाती राहतील अशा आशेने सर्व लोक अुत्सुक होत." या लोकजागृतीला अुत्तेजन देण्यासाठी शाहजाद्यांनी व राजवंशातील अितर पुरुषांनी निरनिराळे अुपाय योजिले व दिल्लीमध्ये क्रांतीच्या ज्वाला सर्व दिशांना पेटत चालल्या.

अशा रीतीने दिल्लीच्या दिवाण-अि-आम मध्ये व ब्रह्मावर्ताच्या राजमंदिरामध्ये स्वातंत्र्ययुद्धाची गुप्त संघटना चाललेली होती. ह्या दोन राजवाड्यांतून हिंदुस्थानच्या क्रांतिशक्ति अेकत्रित व संघटित करण्यासाठी जे प्रचंड प्रयत्न चालले होते ते अितक्या गुप्त रीतीने करण्यात येत की, अिंग्रजांसारख्या धूर्त लोकांनाही सत्तावनच्या साली तोफांचे गडगडाट होओीतोपर्यंत त्याची लवलेशही दाद नव्हती ! हजारो रुपयांचे तनखे व हत्तींच्या नेमणुका करून देअून ही राजकीय जिहाद अुपदेशिण्यासाठी मोठमोठाले मौलवी धाडण्यात आले. त्यांनी खेडेगावांतून व शहरातून ह्या राजकीय धर्मयुद्धाचा अुपदेश गुप्तसभांतून देत हिंडावें. शिपायांच्या ठाण्यांतून रात्री यांची व्याख्यानें चालू असत. लखनौला तर मशिदीमशिदींतून मौलवींनी जिहाद सुरू करण्यासाठी अुघड व्याख्यानें देत असावे ! पाटणा व हैद्राबाद येथे रात्रीरात्रीतून सभा भरत व निरनिराळ्या मौलवींकडून सर्व दर्जाच्या लोकास स्वातंत्र्ययुद्धाचे व स्वधर्मयुद्धाचे शिक्षण देण्यात येओी. ज्याच्या पवित्र नावाने आपल्या हिंदुस्थान देशाचा अितिहास भूषित झालेला आहे व ज्यांच्या पावन चरित्राचे कथन पुढे यथाप्रसंगी करण्यात येणार आहे त्या देशभक्त व धर्मभक्त मौल्वी अहमदशाह यांनी लखनौला हिंदु व मुसलमानांना फिरंग्याविरुद्ध अेकदम अुठावणी करा असा अुघड अुपदेश दिल्यावरून त्यास फाशीची शिक्षा देण्यात आली होती !

ह्या मौलवींप्रमाणेच शेकडो अुपदेशक फकिरांनी व संन्याशांनी इतस्ततः प्रांतोप्रांतीं गुप्त संचार करू लागले. भिक्षेच्या निमित्ताने प्रत्येक घरी जाणें सुलभ असल्याने शत्रूच्या मनात कोणतीहि शंका अुद्भवू न देता या स्वदेशभक्त फकिरांनी व संन्याशांनी दारोदार हिंडून प्रस्तुत दास्याचा तिटकारा व भावी स्वातंत्र्याचा अभिलाष लोकसमूहात प्रदीप्त करावा. विशेषतः सैन्यामध्ये या लोकांचा फार अुपयोग असे. कारण प्रत्येक तुकडीमागे अेक पंडित व अेक मुल्ला धार्मिक कृत्यांसाठी ठेवणें जरूर असल्याने त्या जागेवर हेच लोक जाअून बसत. शिवाय शिपायांचे

[illegible]

स्वातंत्र्याच्या पवित्र धर्माची दीक्षा देणें अवश्य होतें. स्वातंत्र्याशिवाय धर्मरक्षण अशक्य होय हें मर्म ओळखून हजारो धर्मगुरु ह्या राजकीय जिहादीचा अुपदेश करण्यास पुढे आले हें हिंदुस्थानचे अितिहासास सदोदित अभिमानास्पद आहे. मीरत येथे सत्तावनच्या अेप्रिलचे सुमारास असाच अेक देशभक्त फकीर तेथील शिपायांच्या छावणीजवळ येअून अुतरला. त्याच्याबरोबर हत्ती, घोडे व अितर सरंजामही होता. तेथील शिपायांना राजकीय जिहादीची दीक्षा देण्यात तो मग्न असताना ह्या फकिराबद्दल अिंग्रजी अधिकाऱ्यांना संशय वाटू लागला व त्यांनी त्यास तेथून निघून जाण्याचा हुकूम दिला. हा हुकूम सुटताच तो फकीर तेथून निघाला परंतु जवळच्याच अेका गावात शिरून पुन्हा आपल्या गुप्त रचनेस प्रारंभ करता झाला ![३] असे किती अेक स्वातंत्र्यभक्त लोक आपल्या हातावर शिर घेअून त्या अवाढव्य रचनेचें गुप्त-कार्य असल्या शिताफीने पार पाडीत असतील ! परंतु ते " होते कोण, कुठील, हेंही नुरली हा हा ! जनाते स्मृति ! ! "

मशिदींतून व देवळांतून व भिक्षेचे निमित्ताने घरांदारांतूनही स्वातंत्र्यचेतना अुत्पन्न करण्यासाठीं जसे मौलवी व पंडित, फकीर व संन्यासी धाडण्यात आले तसेंच ह्या निरनिराळ्या स्थानांहून ज्यास्त महत्वाच्या ठिकाणींही अुपदेशकाची व शिक्षकाची पाठवणी झालेली होती. हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रांतांचे लोक अेकत्र सापडण्याची मुख्य स्थाने म्हणजे मोठमोठालीं क्षेत्रें होत. हीं क्षेत्रें म्हणजे सर्व देशांतील लोकांचीं राष्ट्रीय संमेलनेंच होत. मशिदींत स्थानिक लोकच येणार, परंतु तीर्थास सर्व दर्जाचे लोक येणारे असल्याने या तीर्थांचे ठिकाणींही राजकीय महंत नेमण्यात आले व लवकरच गंगेच्या पुण्यस्नानासाठी आलेल्या हजारो बायबाप्या हिंदुस्थानच्या मनात खेळत असलेल्या ह्या स्वातंत्र्ययुद्धात सामील होण्याचा गुप्त अुपदेश देत देत पंडित लोक तीर्थोतीर्थीं हिंडू लागले.[४]

अफाट जनसमूहांचे मनात अेकच अिच्छा अुत्कटतेने अुत्पन्न करण्यास व तिचा अक्षय्य ठसा त्यांच्या हृदयावर अुमटवून ठेवण्यास कवितेसारखें दुसरें अुत्तम साधन नाही. मार्मिक शब्दांत व मोहक पद्धतीनें पद्यामध्ये गुंफिलेलें सत्य जनतेच्या अंतःकरणात फार त्वरेने रुजू शकतें. राष्ट्रगीतांचे माहात्म्य यासाठींच फार मानलें जातें. राष्ट्रगीतें राष्ट्राच्या अंतःकरणाची अेकवाक्यता करू शकतात. जेव्हा जेव्हा अेखाद्या अुत्कट भावनेनें राष्ट्रीय आत्मा तळमळू लागतो तेव्हा त्याचे निघणारे जे सहज बोल तींच राष्ट्रगीतें होत. फ्रान्सच्या राष्ट्रीय आत्म्याचे बोल म्हणजेच ला मार्सेलिस होय. सत्तावनच्या सालीं स्वधर्मरक्षणाच्या, स्वराज्यसंपादनाच्या व स्वातंत्र्य प्राप्तीच्या अुदात्त भावनेने भरतभूमीचा आत्मा तळमळू लागताच त्याच्या

३. The Meerut Narrative of Mr. Williams.

४. Trevelyan's Cawnpore

मुखावाटे असें अेखादें राष्ट्रगीत निघालें नसतें तरच आश्चर्य असतें! दिल्लीचे बादशहांचे खाजगी गवयाने सर्व हिंदुस्थानच्या कंठातून दिनादित होण्यासाठी अेक राष्ट्रगीत स्वतःबसविलेले होते.[५] आपल्या पूर्वजांचे पराक्रम वर्णन करून नंतर त्या राष्ट्रगीतात आपल्या सध्याच्या अवनतीचें करुणरसात्मक चित्र रेखाटलेले होतें. जे लोक अेक दिवस हिंदुस्थानच्या ह्या टोकापासून तों त्या टोकापर्यंत विजयशाली वैभवाने अभिषिक्त झालेले होते त्याच लोकांना आज जगतात ' गुलाम ' म्हणवून घेण्याची पाळी यावी, त्यांचा धर्म पोरका व्हावा व त्यांचीं अभिषिक्त मस्तकें परक्याचे लाथांखाली अेकसहा तुडविली जावीं या विपर्यस्त व लज्जास्पद स्थितीबद्दल त्या राष्ट्रगीतात भारतभू आक्रोश करीत होती! परंतु आता हा तिचा आक्रोश आपणांस अैकावयास सापडेल काय? आता हें सत्तावननें गाणें आपल्यास पुन्हा अैकू येअील काय? ह्या राष्ट्रगीताचा अेखादा मसुदा जर कोणी शोधून काढील तर त्याचे आपल्या अितिहासावर अक्षय्य अुपकार होतील! तोपर्यंत अितिहास अितकेच सांगतो की, आपली धरित्रीमाता सत्तावन साली आक्रोश करीत होती व कानपूरच्या मैदानावर अुडी घेताना नानाचे कानात तोच आक्रोश भयंकर किंकाळ्या मारीत होता!!

विस्तीर्ण रचनेची साधनें ही विस्तीर्णच असावी लागतात. दुबळी झालेली मायभू मदोन्मत जुलुमाचे हातून मोडविण्यासारखें अवघड कृत्य घडवून आणण्यास पहिली महत्त्वाची व मूलभूत अशी गोष्ट म्हटली म्हणजे सर्व लोकांचें मन:प्रवर्तन होय. वस्तुस्थितीत क्रांति घडवून आणावयाची असेल तर प्रथम मनस्थितीत ती पूर्णपणे विजयी झाली पाहिजे. ही मन:क्रांति घडवून आणण्यासाठी त्या मनाकडे जे जे रस्ते जातात, त्या सर्व रस्त्यावर क्रांतीची नाकीं स्थापिलीं पाहिजेत. मानवी मन हें साहजिक रीतीनेच अुत्सवप्रिय असल्यामुळे सामान्य जनसमूहाला वश करून घेण्यास या अुत्सवाशिवाय दुसरे राजमार्ग आढळत नाहीत या अुत्सवाच्या साखरेत घोळून तात्त्विक औषधाची गोळी दिली म्हणजे समाजाचें बालमन ती आवडीने गिळते, व त्यापासून रोगही साध्य होअू शकतात. अशा अत्यंत मार्मिक विचाराने त्या

५. A mandate had of late gone forth from the palace of Delhi enjoining the Mahomedans at all their solemn gatherings to recite a song of lamentation indicated by the royal musician himself which describes in touching strains the humiliation of their race and the degradation of their ancient faith once triumphant from the Northern snows to the southern states but now trodden under the foot of the infidel and the alien." – Trevelyan's Cawnpore. आमच्या मतें वृत्तींचें हृद्गत वळण्यास सर्वस्वी असमर्थ असणाऱ्या या ग्रंथकाराच्या अिनके लिहिणें भाग पडावें हें त्या राष्ट्रगीताच्या सौंदर्याचेंच द्योतक आहे

गुप्त संघटनेच्या कार्यक्रमात निरनिराळ्या चित्ताकर्षक अुत्सवातून सामान्य जनांस स्वातंत्र्ययुद्धाचें शिक्षण देण्याची व्यवस्था केलेली होती. निरनिराळे चित्राचे खेळ तयार करून स्वधर्माची व स्वातंत्र्याची कशी अवहेलना झालेली आहे याचें हुबेहूब नाटक त्या चित्रांकडून करून दाखविण्यात येअी व ह्या सर्व अपमानाचा, गुलामगिरीचा व पारतंत्र्याचा सूड़ही कसा अुगवावयाचा याची अुद्दीपक व अनिवार्य चेतना देणारीं चरित्रें त्या तारेच्या बाहुल्यांकडून करविण्यात येअीत. चावडीवर, पारावर, धर्मशाळेत व चव्हाठ्यावर वीररसोत्पादक लावण्या व पोवाडे म्हणून दाखवून लोकांना भयकर अवमान चढविण्यात येअी. अुत्तर हिंदुस्थानात अत्यंत प्रिय असलेलें व जें अैकलें असता आठ दिवसात कुठेतरी लढाअी झालीच पाहिजे अशी दृढ समजूत आहे तें अला-अुदलच्या मर्दुमकीचें गाणे गाता गाता श्रोत्यांचे बाहू स्फुरू लागले. पूर्वजाच्या पराक्रमाने त्यांचें रक्त कढू लागलें म्हणजे झटकन विषय फिरवून प्रस्तुत दास्याची कल्पना मूर्तिमंत अुभी केली असता जो हरहर महादेवाची घनगर्जना करणार नाही असा नामर्द कोण आहे !

राष्ट्रीय महत्कार्याना त्या राष्ट्रातील नुसत्या पुरुषांचेच अनुमत असून भागत नाही. तर त्या पुरुषांना जन्म देणाऱ्या कुमव्वातूनही ही राष्ट्रक्षोभाचीं बीजें रजावयास पाहिजे असतात. हिंदी स्त्रियांच्या शौर्याचें माहात्म्य म्हणजे काय असतें हें दीक्षाचा व रजपुतांचा अितिहास अभिमानाने सांगतो आहे. अशा या हिंदी स्त्रियांचें मन:सामर्थ्य संपादन करण्यासाठी ह्या गुप्त संघटनेच्या कार्यक्रमात वैदू लोकांच्या बायाना धाडण्यात आलेले होते.[६] या वैदू बायांनी घरगुती औषधासाठी व किरकोळ भविष्य कथनासाठी हिंदुस्थानातील सामान्य वर्गाच्या स्त्रियाचें सदोदित दळणवळण असते. तेव्हा हिंदी स्त्रियाना आपल्या मायभूमीचा हा पारतंत्र्य रोग ज्याने बरा होअील असें औखद देण्यासाठी व तें औखद दिलें असता गुलामगिरीचें भूत आअीला केव्हा सोडील व ही भूतबाधा सरताच तिला सुंदर स्वातंत्र्यबालक केव्हा होअील हें भविष्य सांगण्याला या वैदू बायांशिवाय दुसरा कोणचा धन्वंतरि समर्थ होता ! या वैदू बायांनी स्त्री समाजात, व मौलवींनी व पंडितांनी पुरुष समाजात ज्याप्रमाणे प्रचंड जागृति करून दिली त्याचप्रमाणे गावोगाव फिरत जाणाऱ्या तमासगिराच्या नाचानीही या राष्ट्रक्षोभात विलक्षण भर पडलेली आहे. या तमासगिराच्या कंपूने आपआपल्या तमाशातून पारतंत्र्याचा तिटकारा जनसमूहात अुत्पन्न करावा. अशा रीतीने सर्व नऱ्हेच्या व सर्व दर्जाच्या लोकातून अिंग्लिशांचा अमल अुगारून देण्यासाठी त्या सत्तावनच्या गुप्त संघटनेचे प्रचंड प्रयत्न चाललेले होते.

६ Trevelyan.

या संघटनेची मुख्य केंद्रें आता सर्व हिंदुस्थानभर पसरलेलीं होतीं.[७] या गुप्त संघटनेची ज्या वाड्यात प्रथम प्राणप्रतिष्ठा झाली त्या ब्रह्मावर्तास तर तिची सकस व जोरदार वाढ चाललेली होतीच; परंतु श्री. नानांच्या व अझीम अुल्लाखानांच्या पत्रांनीं व अुपदेशकांनीं आता हजारो ठिकाणीं त्या रचनेच्या शाखा अुघडलेल्या होत्या. ब्रह्मावर्तास जसा श्रीमंत नानाचा वाडा या आगामी मंगल कार्याच्या तयारीनें गजबजलेला होता तसाच दिल्लीचा वाडाही त्याच तयारीनें गजबजलेला होता. अिकडे लखनौला व आग्र्याला त्या महानुभाव देशभक्ताने—मौलवी अहमद शाह ह्यांनी—ह्या स्वातंत्र्ययुद्धाच्या जिहादीचें प्रचंड केंद्र निर्माण केलेलें होतें. पाटणा शहरी जिहादीची बीजें अितकीं खोल रुतलीं गेलीं कीं, तें सर्व शहर म्हणजे अेक क्रांतिकारक पक्षाचें भयानक भुयार बनलें. मौलवी, पंडित, जमिनदार, शेतकरी, व्यापारी, वकील, विद्यार्थी अशा सर्व जाति व सर्व पंथ स्वधर्मार्थ व स्वदेशार्थ आपले प्राणदान करण्याची दीक्षा घेअून सज्ज झालेले होते व या गुप्त रचनेचा पुढाकार घेणारातील अत्यंत प्रमुख पुढारी म्हणजे अेक पुस्तक विकणारा होता ! कलकत्त्याला तर खद्द अयोध्येचे माजी नबाब व त्याचे मुख्य वजीर अल्ली नक्कीखान हे येअून राहिलेले होते. या मुख्य वजिराने सत्तावनचे घटनेत जितका नेट, चातुर्य व धाडस दाखविलें तितकें फारच थोड्यानी दाखविलेलें असेल ! कलकत्त्याच्या बाजूला मुख्य काम म्हणजे बराकपूर, डमडम वगैरे ठिकाणीं असलेल्या शिपायाना राज्यक्रांतीला अनुकूल करून घेण्याचे होतें. तें अत्यंत नाजूक काम अल्ली नक्कीखान यानीं अितक्या शिताफीनें केले की, सत्तावन साल अुगवलें तोंच सर्व शिपाअी राष्ट्रकार्याला मिळण्यासाठी बेलभंडार अुचलून, श्री गंगाजीचें पाणी हाती घेअून व कुराणाची कसम देअून वचनबद्ध झालेले होते व अयोध्येच्या नबावानेही त्याना अुदार रीतीनें वागवावयाचें कबूल केलेलें होतें ! शिपायांच्या सर्व ठाण्यातून रात्रीच्या गुप्त सभा भरत व तेथे हे शपथविधि होताच दुसरे दिवशी त्या त्या रेजिमेंटचे सुभेदार नबाबाकडे जाअून स्वातंत्र्ययुद्धार्थ मिळण्याची त्याम वचनें देत. ह्या शिपायाच्या जुटीची मुख्य स्थानें म्हणजे मीरत व बराकपूर ही होत. अुत्तरेकडे अशी संघटित व पद्धतशीर रचना होती तसाच दक्षिणेकडे करण्याबद्दल सातान्यास रंगो बापूजी झटत होते. पटवर्धनी संस्थानात व कोल्हापूरच्या दरबारात क्रांतियुद्धाच्या रचनेची जाळीं विणलीं जात होतीं. फार काय, पण थेट मद्रासपर्यंत ह्या राष्ट्रयज्ञाच्या

७. आपल्या विस्तृत अितिहासाचे शेवटी मॅलेसन लिहितो : "Of this conspiracy the Moulavi was undoubtedly a leader. It had its ramifications all over India—certainly at Agra where the Moulavi stayed some time and almost certainly at Delhi, at Meerut, at Patna, at Calcutta where the ex-king of Oudh and a large following were residing.

ज्वाळा जाअून धडकल्या होत्या. सत्तावनचे जानेवारीत खालील जाहिरनामा मद्रासेस फडकला : " हे देशबंधूंनो व धर्मनिष्ठांनो, अुठा ! काफीर अिंग्रजांना आपल्या हिंदुस्थान देशातून पिटाळून लावण्यासाठी सर्वजण अुठा ! या अिंग्रजांनी न्यायाच्या सर्व तत्त्वांना तुडविलेलें आहे. त्यांनी आपलें स्वराज्य लुबाडून नेलें आहे व स्वदेशाला धुळीस मिळविण्याचा त्यांचा कृतनिश्चय झालेला आहे ! अिंग्रजांच्या ह्या भयंकर यातनांतून आपल्या हिंदुस्थानची मुक्तता करण्यास आता अेकच अिलाज अुरलेला आहे व तो अिलाज म्हणजे तुमुल युद्धसंग्राम हाच होय ! अशा युद्धात जे रणांगणात पतन पावतील ते आपल्या देशाचे शहीद होतील ! जे स्वदेशासाठी व स्वधर्मासाठी लढतील व मरतील त्या वीर्यवान् शहीदांसाठी स्वर्गाचीं कवाडे अुघडत आहेत व जे भ्याड व देशद्रोही अधम ह्या राष्ट्रकार्यापासून परावृत्त होतील त्यांच्यासाठी नरकाचीं पेवें भरलेली आहेत ! देशबंधूंनो, यांतून तुम्ही कोणचें पत्करणार ?[८]

अशा स्थितीत सत्तावन साल अुजाडलें व हिंदुस्थानात जिकडे तिकडे सांकेतिक महत्कार्याचा मुहूर्त आला रे आला अशा सूचना जाअू लागल्या. अितक्यात काडतुसाचें कारस्थान अुघडकीस आलें ! मग काय ! जो तो शिपायी दिवसा आपल्या बंदुकीला घासून पुसून स्वच्छ करीत रात्र पडताच त्या त्या रेजिमेंटच्या सुभेदार मेजरांचे बंगल्यावर भरणाऱ्या गुप्त सभेला जाअून स्वातंत्र्ययुद्धाची शपथ कधी घेअीन यासाठी अुत्सुक होअू लागला. शिपायांच्या निरनिराळ्या रेजिमेंटमध्ये अशी शपथबद्धता झाली की, त्या रेजिमेंटस् परस्परास आणाभाका देण्यासाठी मेजवानींचे बेत ठरवीत. या मेजवानींचे वेळेस अेकमेकांचे बेत अेकमेकांस कळविण्यात येत व नंतर ते बेत नानासाहेब किंवा अल्ली नक्कीखान यांना कळविण्यात येत. काही रेजिमेंटमध्ये ही क्रांतिघटना चालली असता चुकीने किंवा विश्वासघाताने ही सरकारच्या कानावर जाअून अेक दोनदा त्यांनी रेजिमेंटला निःशस्त्र करून दूर केले. फारच अुत्तम ! हे अितके शिपायी लोक म्हणजे क्रांतियुद्धाची जिहाद अुपदेशिण्यासाठी गावोगाव धाडलेले स्वयंसेवकच होत ! शिपायांच्या सर्व ठाण्यातून वचनचिठ्ठ्या धाडण्यास याव्या व त्यातील भावार्थ सांकेतिक भाषेत लिहिलेला असावा. ह्या चिठ्ठ्या पोस्टातून चोरून अिंग्रज फोडीत असावे. त्यांपैकी सातव्या अयोध्या रेजिमेंटने अठ्ठेचाळिसाव्या रेजिमेंटला धाडलेली वचनचिठ्ठी अशी होती : " रेजिमेंटमधील आमच्या भाअींचे मत आम्हांला मान्य आहे. काडतुसाचे बाबतीत त्यांच्याप्रमाणेच वर्तन करू व वेळ येताच सुटून पडू.".[९] बराकपूरहून सियालकोटसारख्या दूरच्या ठिकाणी गेलेलीं पत्रें पकडण्यात आलेलीं आहेत. त्यात बराकपूरचे शिपायी सियालकोटच्या शिपायांना लिहितात: " भाअीओ, गनिमाविरुद्ध अुठा !"

---

८. Charles Ball's Mutiny Vol. I, page 40.
९. Red Pamphlet Part I.

[ यापुढे 'सब लाल होगा है' व 'कमलफुलें' या संबंधीचा मजकूर Red Pamphlet वरुन घालावयाचा असा मूळ हस्तलिखितावर अुल्लेख आहे. तो भाग पुढे अिंग्रजी भाषांतरात समाविष्ट करण्यात आला आहे. पण मूळ मराठी लेखनात भाषांतर समाविष्ट करण्याचें त्या वेळी राहून गेले. तो मजकूर श्री. पटवर्धनांच्या भाषांतरावरुन पुढे अुद्धृत केला आहे :

रशियन क्रांतीमध्ये नव्हे तर हिंदुस्थानच्या क्रांतियुद्धात पोलीस लोक जनतेशी अत्यंत सहानुभूतीने वागत होते क्रांतीच्या गुप्त संघटनायंत्राचे प्रचंड चक्र आता तीव्र वेगाने फिरु लागले होते. अशा वेळी निरनिराळ्या चक्रांच्या गति एकाच लयीत फिरु लागतील असा प्रयत्न अवश्य होता. याच अुद्देशाने क्रांतिपक्षाचा अेक दूत हातात रक्त कमलपुष्प घेअून बंगालमधील सैनिकांच्या छावणीत प्रवेश करुन घेता झाला. त्याने ते फूल पहिल्या तुकडीच्या मुख्य हिंदी अधिकाऱ्याजवळ दिले. हिंदी अधिकाऱ्याने तें आपल्या खालच्या माणसाजवळ दिले, आणि अशा रीतीने ते कमल प्रत्येक शिपायाच्या हातातून जात जात शेवटच्या शिपायाकडून पुन्हा, आलेल्या क्रांतिदूताच्या हाती परत आले. बस्स ! अितके पुष्कळ होतें. अशा रीतीने अेका शब्दाचीही चाहूल न लागता हा क्रांतिदूत अेखाद्या बाणाप्रमाणे पुढे जाअी नि मार्गामध्ये दुसरी अेखादी तुकडी भेटताच तेथील हिंदी प्रमुखाच्या हातीं तें रक्तकमल देत असे. या कृतीने केवळ काव्यपूर्ण होअून राहिलेली ही संघटना क्रांतीच्या अेकाच रक्तमय विचाराने भारली जाअी. हे रक्तकमल म्हणजे क्रांतीची अंतिम राजमुद्राच जणू होती! या रक्तकमलाला स्पर्श करताच शिपायाच्या मनामध्ये कोणत्या भावनांचें थैमान अुसळून येत असेल याची कल्पनाच करवत नाही. खरोखर जी वीरवृत्ति अेखाद्या महान् वक्त्यालाही आपल्या अमोघ वक्तृत्वाने श्रोत्यामध्ये जागृत करता येणें अशक्य होतें त्या वीर वृत्तीच्या संचार या लढाअू सैनिकामध्ये त्या निर्वाक् कमलपुष्पाने आपल्या लालभडक रंगाच्या वाग्विलासाने केला

कमल पुष्प ! शुचि, यश नि प्रकाश याच कविजनानी मानलेले काव्यमय प्रतीक! आणि त्याचा वर्ण? रक्तोज्ज्वल! या पुष्पाच्या नुसत्या स्पर्शानेही हृदयपुष्प विकसित होअून अुठावे अितके ते मृदुचेतन ! शेकडो शिपायाकडून जेव्हा हे कमलपुष्प या हातामधून त्या हातामध्ये परस्परांकडून हाताळले गेले असेल, तेव्हा त्या पुष्पाच्या मूक बावमदेशात सुद्धा फार मोठा मूढार्थ नि अुदात्त ध्येयानी स्फूर्ति सूचित करण्यात आली असली पाहिजे हे खचित! या रक्तकमलाने सर्वांचें अंतःकरण खरोखर अेकत्र साधलीं. कारण बंगालमध्ये शिपाअी नि शेतकरी दोघेही अेकच गोष्ट बोलताना आढळून येत की 'सब कुछ लाल होगा है !' आणि तें बोलताना त्या वेळी त्यांच्या डोळ्याची अशी काही हालचाल होअी की, या त्यांच्या बोलण्यात फार खोल अर्थ असला पाहिजे याची प्रचिती तत्काळ येअी 'सब कुछ लाल होगा है !' सगळीकडे आता लाल व्हावयाचें आहे ! [१०]

१० ट्रेव्हेल्यिन कृत 'कानपूर'

या रक्तकमलाने नि त्या मागील सूचित केलेल्या भावनेने प्रत्येक व्यक्तीच्या हृदयात अेकच ध्वनि अुमटविला होता.]

शिपायाशिपायांतून जाणारीं पत्रेंही अशाच रीतीने लिहिलेलीं असत. परंतु त्या संघटनेच्या पुढाऱ्यांचीं पत्रें अत्यंत महत्त्वाचीं असल्याने तीं फारच सावधगिरीने लिहिलेलीं असत. बहुतेक बेत व रचना प्रत्यक्ष मनुष्यें धाडूनच ठरविल्या जात. परंतु पत्रें टाकावयाचींच झाल्यास ती अत्यंत मोघम भाषेत लिहिलेली असत. अितकेच नव्हे तर हीं मोघम पत्रें फुटलीं जाअून क्वचित् फसगत होअील अेतदर्थ धूर्त पुढारी लोक आपला सर्व पत्रव्यवहार सांकेतिक भाषेत करीत असत. काही टिंबांची व आकड्यांची लिपी बनवून तिचा या गुप्त संघटनेत अुपयोग केला जाअी.[११]

परंतु या संकेतचिन्हांनी व या गुप्त पत्रांनीही जो राष्ट्रीय अुद्बोध दिला गेला नाही तो अुद्बोध हिंदुस्थानच्या भविष्यवाणीने दिला. भविष्यें हीं मनाच्या आगामी कालात पडणाऱ्या अुड्या होत. मनाच्या दिव्यत्वावर भविष्याचें दिव्यत्व अवलंबून असते. सत्तावन साली हिंदुस्थानचे मन स्वातंत्र्याच्या प्रकाशाने दिव्य झालें म्हणून सत्तावन सालचीं हिंदुस्थानची भविष्येंही दिव्य होअू लागलीं! या भविष्यात अत्यंत महत्त्वाचें व सत्तावनच्या अितिहासावर, त्याच्या कित्येक पानावर शिक्का पडलेला आहे असे भविष्य म्हटले म्हणजे तें हें होय की, कंपनीचें राज्य बरोबर शंभर वर्षांनी लयास जाणार! प्लासीच्या लढाअीला सत्तावन साली शंभर वर्षें होत होतीं. अेतदर्थ त्या सालच्या जानेवारीपासून अेक विलक्षण आशा व अेक विलक्षण चेतना सर्व देशाचे रंध्रारंध्रातून संचार करीत होती! या अेका भविष्याने राष्ट्रामध्ये अशीच चेतना हा हां म्हणता अुमळवून दिली. जो तो अिंग्रजाचें राज्य बुडणार या भविष्यकालाचा वर्तमान काल करण्यासाठी सज्ज होअू लागला.

सत्तावनचे साली कंपनीचे राज्य बुडणार ह्या भविष्याने राष्ट्रविभूतीला स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आधीच तयार करून ठेवले ते असासाठी की, रणदेवतेकडून स्वातंत्र्यदान मिळताच कोणत्याही प्रकारचा आकस्मिक घोटाळा अुडू नये. शिपाअी, सेनापति, पोलीस, पाटील, कुलकर्णी, जमिनदार ह्यानी अिंग्रजाच्या अंमलाखाली ते ज्या ज्या जागेवर होते त्याच त्या जागेवर राहून स्वतंत्र राज्याची सेवा बिलकूल घोटाळा अुडू न देता करावी असा बेत ठरलेला होता. गुप्त संघटनेच्या पुढाऱ्यानीं किती कौशल्याने सर्व राष्ट्र बांधून टाकलेले होत हे लक्षपूर्वक पाहिले असता अत्यंत धन्यता वाटू लागते

लोकसंमाला क्षुब्धता देण्यासाठी रोज रात्रीं लखनौला अुत्तेजक व क्रांतिकारक जाहिरनामे लावण्यात येत. या जाहिरनाम्यात सर्व भाअीनी अेकदम अुठून हिंदुस्थानचें राज्य परत घ्यावे असा अुपदेश अत्यंत जालीम भाषेत केलेला असे. सकाळ-

११ Sepoy Revolt by Innes, page 55.

झाली की शहराच्या सर्व चव्हाठ्यांवर ह्याच अर्थी नवीन जाहिरनामे व हस्तपत्रकें फडकलेलीं असत! ही गोष्ट जिग्रजी अधिकाऱ्यांच्या कानांवर आधीपासून असताही त्यास ही पत्रकें वाचीत व त्याच्या लेखकांना शिव्या हसडीत कुढत बसणें भाग पडे कारण पोलीस लोक स्पष्ट सांगत की, हीं पत्रकें लिहितो कोण, लावतो कोण, चिकटवितो कोण, हें शोधून काढणे अशक्य आहे. थोडयाच दिवसांत अिग्रजांना कळून आलें की, हें पोलीस लोकच क्रांतिपक्षाचे पुढारी होते.[१२] परदास्याच्या संरक्षणापेक्षा स्वतंत्र-तेच्या रक्षणासाठी झटणारे पोलीस रशियाच्या राज्यक्रांतीतच आढळतात असें नसून ते हिंदुस्थानच्या राज्यक्रांतीतही आढळत असतात! अुत्तर हिंदुस्थानात जशी ही गुप्त संघटना कौशल्याने झालेली होती तशी जर का ती दक्षिणेतही झालेली असती तर किती बहार होती !

अशा रीतीने जिकडे तिकडे मनःप्रवर्तनाची लाट अुसळून दिल्यानंतर मग श्री. नानासाहेब हे सर्व केंद्रसूत्रांनाही सूत्रबद्ध करून टाकण्यासाठी व मुख्य मुख्य गुप्त मंडळांची अेकवाक्यता करण्यासाठी ब्रह्मावर्त सोडून निघाले. सत्तावनच्या अेप्रिलमध्ये श्रीमंतांची स्वारी बरोबर आपले बंधु बाबासाहेब व आपले मंत्री अजीम अुल्लाखान ह्यांना घेअून दिल्लीकडे गेली. दिल्लीच्या वातावरणात त्या वेळेस नानांनी काय मंत्र अुच्चारले व दिल्लीच्या दिवाण-अी-आममध्ये बादशहाशी नानाच्या काय ख्याजगी गोष्टी झाल्या याची याद फक्त त्या वातावरणापाशी व दिवाणखान्यापाशीच असेल! अिंग्लिश लोकांपैकी मोर्लंड नांवाचा अधिकारी आग्ऱ्यास जज्जाचे जागेवर होता. तो ह्याच वेळेस नानांचे भेटीस गेला असता त्यास नानाचे हस्ते अुत्तम स्वागत मिळालेलें होतें व त्यायोगाने पुढील तीन महिन्यांत अिंग्रजासाठी कोणतें स्वागत नाना तयार करीत होते याची त्याला दादही लागली नाही. दिल्लीची सर्व तयारी पाहून व तेथील सर्व कृत्यें संपवून नाना लखनौला जातो. सत्तावनच्या गुप्त संघ-टनेच्या मुख्य केंद्रात लखनौ हें अत्यंत प्रमुख केंद्र होते. ता. १८ अेप्रिलला नाना-साहेब लखनौकडे वळले. त्याच दिवशी सकाळी लखनौचा चीफकमिशनर सर हेन्री लॉरेन्स ह्याच्या बगीमागे धावत जाअून लोकांनी त्यास चिखलाचे गोळे मारलेले होते! आणि लवकरच याहून जास्त महत्त्वाचे गोळे कसे फेकावे हें दाखविण्यासाठी श्री. नानाची स्वारी तिथे आली! मग काय त्या लखनौ शहराच्या अुत्साहाला व अवसानाला पारावार नाहीसा झाला. लखनौच्या प्रमुख रस्त्यांतून नानाची जंगी मिरवणूक निघाली, व सर्व क्रांतिकारक लोकांना आपल्या या भावी स्वातंत्र्य-योद्ध्यास पाहून अनिवार्य चैतन्य अुत्पन्न झालें. नाना आपण होअूनच सर हेन्री लॉरेन्सकडे गेले होते व लखनौ शहर पाहण्यासाठी आपण आलेलो आहोत असें त्यास सांगण्यात आलें. ही लखनौ शहराची पहाणी म्हणजे काय याची त्या वेड्याला काय कल्पना येणार! नाना याच महिन्यात काल्पी शहराचीही पाहणी करण्यासाठी गेले.

१२. Red Pamphlet, part II.

पुढील स्वातंत्र्यसंग्रामात ज्यांनी आपल्या अतुल देशाभिमानाने व रणकौशल्याने सर्व जगास चकित केले त्या जगदीशपूरच्या कुंवारसिंगाशीही नानांचें राजकारण चाललेलें होतें.[१२] व तिकडच्या सर्व चळवळींचा नकाशाही याच मुमाराम नक्की रेखाटलेला होता. अशा रीतीने दिल्ली, लखनौ, काल्पी, जगदीशपूर वगैरे ठिकाणी असलेल्या मुख्य पुढाऱ्यांच्या प्रत्यक्ष गाठी घेऊन व त्यांच्या संमतीने पुढील क्रांतीचा नक्की नकाशा रेखाटून श्री. नानासाहेब अेप्रिलचे शेवटास ब्रह्मावर्ती परत आले.

मुख्य पुढाऱ्यांच्या गाठी घेऊन वाटनिश्चय करण्यास श्री. नानासाहेब अिकडे हिंडत असताना तिकडे सर्व देशास भावी मंगल कार्याची सुवार्ता देण्यासाठी राज्यक्रांतीचे दूत अितस्ततः धावत चाललेले होते! राज्यक्रांतीचे हे दूत हिंदुस्थानात याच वेळी प्रथमच आले असे मुळीच नाही. हिंदुस्थानात पवित्र राज्यक्रांतीचें मंगल कार्य जेव्हां जेव्हां निघालें तेव्हा तेव्हा हे दूत आपलें संदेशकाचें काम करीत आलेले आहेत. कारण वेलोरच्या बंडाचे आधीही त्या बाजूस असाच चपात्या धाडलेल्या होत्या. सत्तावनच्या आरंभाला अेकदम सर्व हिंदुस्थानभर हे गुप्त पंखाचे देवदूत भावी मंगल कार्याची वार्ता देत देत भ्रमण करू लागले. ते आले कोठून व जात होते कोणीकडे याचा कोणासही पत्ता लागेना. ते देवदूत फक्त ज्याला समजे त्यालाच मुख्य संदेश देत व ज्याला काही समजत नसे त्याच्याशी तर अतोनात बोलू लागत. ह्या विचित्र चपातीना काही वेडगळ अिंग्रजी अधिकाऱ्यांनी पकडून पकडून त्यांचा चुरा करून त्या चुऱ्याचा चुरा करून तो आपल्याशी काही तरी बोलेल म्हणून प्रयत्न करावा परंतु अेखाद्या चेटकीसारखें चपातीने तिला बोल म्हटले की, आपल्या तोंडातली जीभच नाहीशी करून टाकावी! तिला वाटेल त्याच्याशीच ती बोले! गव्हाच्या किंवा बाजरीच्या पिठाची ती चपाती बनविलेली असे. तिच्यावर जरी काही अेक लिहिलेले नसे तरी ती हाती पडताच तिच्या स्पर्शाबरोबर प्रत्येकाच्या अंगात क्रांतिचेतना संचार करू लागे. प्रत्येक गावाच्या मुख्य अधिकाऱ्याचे हाती त्या चपात्या पडत तो त्यांचे किंचिन्मात्र भक्षण करी व बाकीच्यांना त्याचा प्रसाद वाटून देई. नंतर नवीन तितक्याच चपात्या तयार करून त्यांना ते गावकरी शेजारच्या गावाकडे धाडून देत!

जा, हे क्रांतीच्या देवदूता, तसाच पुढे जा! आपली प्रियमाता तिच्या स्वातंत्र्यासाठी जिहाद करण्यास तयार झालेली आहे ही सुभवार्ता तिच्या लेकरांना कळविण्यासाठी दश दिशांना धावत जा! "तुमच्या आअीवर संकट आहे, तेव्हा तिच्या बचावासाठी धावा हो धावा" अशी कर्कश किंकाळी फोडीत मध्यान्ह रात्रीही न थांबता अेकसारखा धावत जा! गडकोटांचीं द्वारे बंद आहेत तथापि तीं अुघडण्याची वाट न पाहता तिथे आकाशमार्गाने अुडत जा!

दऱ्या खोल आहेत, कडे तुटलेले आहेत, नद्या अफाट आहेत, अरण्यें हिंस्र आहेत. परंतु म्हणून अेक क्षणभरही न कचरता हा भयंकर राष्ट्रसंदेश घेअून तू तीरासारखा पुढे जा! तुझ्या वेगावर आमच्या या मातेचें आयुष्य किंवा मरण

अवलंबून आहे; म्हणून आपल्या पंखांनी कापवेल तितके अंतर कापीत सर्व वाता-वरणात भराऱ्या मारीत जा ! मनूंनी तुझ्या ऐरावदुमऱ्या देहाचा चुराडा केला तर हे मायावी देवदूता, आमच्या राष्ट्राच्या या निर्वाणप्रसंगी तू हजारों व लाखो देह धारण करून त्यातील अनेका देहात लाखो जिव्हा घालून पुढे जा! पत्नीला व पतीला, मातेला व बालाला, बहिणींस व भावाला सर्वांना स्वातंत्र्यसमराच्या कार्यसिद्धीसाठी सहकुटुंब येण्याची विनंती कर. मराठ्यांचे भाले, रजपूतांच्या तरवारी, शिखांच्या कट्यारी, अिस्लामचे चांद या सर्वांना स्वातंत्र्यसमराच्या कार्य-सिद्धीसाठी सहकुटुंब येण्याची विनंती कर! कानपूरच्या देवतांना बोलाव. कर्णे, भेरी, दुदुंभि, ध्वज, पताका, रणशींगे, गर्जना, गडगडाट वगैरे सर्व आप्तेष्टांना ह्या मंगलकार्याच्या अिष्ट सिद्धीसाठी घेऊन ये ! कुलदेवता, ग्रामदेवता, व राष्ट्रदेवता आपल्या आपल्या अनुचरासह स्वातंत्र्यसमराच्या मंगलसमारंभासाठी सज्ज होऊन अुत्सुकलेल्या आहेत, त्या सर्वांना सांग 'अति समयो वर्तते, सावधान!'

सावधान! मित्रहो सावधान व आपल्याच डोलात ह्या हिरव्यागार पर्वतावर शांत रीतीने पहुडलेल्या शत्रूंनो, आता सावधान! ह्या पर्वत वरून जितका हिरवागार दिसतो आहे तितकाच तो आतूनही असेल अशा पूर्ण विश्वासाने ! [१३] तुम्ही याच्या मस्तकाला लाथेने तुडवीत आहा काय? तुडवा, खुशाल तसेच तुडवा! लवकरच तुम्हाला कालिदासाच्या 'शमप्रधानेषु तपोधनेषु गूढं हि दाहात्मकमस्ति तेजः' ह्या वचनाची सत्यता पटेल! हे जग, हा आमचा तपोधन हिंदुस्थान शमप्रधान आहे खरा; परंतु म्हणून तू त्याच्या या शमप्रधानत्वाचा फाजील फायदा घेऊ नकोस कारण या तपोनिधीचे अंगात प्रदाहक असा प्रचंड शक्तिही गूढत्वाने वसत आहेत। शंकराच्या तृतीय नेत्राची कथा तू कधी अैकली आहेस? तो नेत्र अुघडला नाही तोपर्यंत फार शांत असतो, परंतु तो अुघडताच सर्व जगाची राख करून टाकणाऱ्या ज्वाला त्यातूनच सुटू लागतात. तू कधी ज्वालामुखीला पाहिले आहेस। तो ज्वालामुखी वरून हिरवागार असतो परंतु अेकदा का तो आपला जबडा अुघडू लागला की, त्यातील कढणाऱ्या अग्निरसानी दश दिशा भाजू लागतात. परंतु ह्या सामान्य ज्वालामुखी-हूनही जाज्वल्यतर असा हिंदुस्थानचा जिवंत ज्वालामुखी आता कढू लागला आहे। त्याच्या अुदरातील भयंकर अग्निरसाच्या लाटा अुसळू लागल्या आहेत. त्याची दाहा-त्मक द्रवमिश्रणे सालवेली आहेत व त्यावर स्वातंत्र्यप्रेमाची ठिणगी पडलेली आहे. त्याच्या मस्तकावर नाचणाऱ्यानो, अेक क्षण आणखी—की दिग्गजांची काठाळी बसेल असा कडकडाट होऊन हिंदुस्थानच्या ज्वालामुखीचा सूड म्हणजे काय हे मदांध जुलुमाला कळू लागेल।

१३. अिंग्रजांना हिंदुस्थानच्या मनोवृत्ति अितक्या माहीत असतात की सत्तावनच्या फेब्रुवारीतही अिंग्रजी पत्रे व अिंग्रजी सरकारी रिपोर्ट म्हणतात की, "The whole-country is profoundly tranquil!" vide Charles Ball. * * *

# भाग २ – स्फोट

प्रकरण पहिलें

## शहीद मंगल पांडे

सत्तावनच्या क्रांतियुद्धाच्या अितिहासातील अेक आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे त्या युद्धाची रचना करताना जी गुप्तता राखण्यात आली ती होय. सर्व हिंदुस्थानभर क्रांतिरचनेची गर्दी अुसळली असतानाही अिंग्रजासारख्या धूर्त राज्यकर्त्यांना त्या चळवळीचा अितका थोडा सुगावा लागलेला होता की अुघड बड होअून अेक वर्ष लोटेपर्यंतही त्यांतील बहुतेक अधिकाऱ्यांच्या मते बंडाचें कारण काडतुसें हें होतें ! काडतुसें हें किती निमित्तमात्र कारण होतें हें आताशी अिंग्रजी अितिहासकाराना कळू लागलेलें आहे व सत्तावनच्या भयंकर युद्धप्रसंगी स्वदेशाभिमानाचें व स्वधर्माभिमानाचें पवित्र स्फुरण त्या योद्धयामध्ये कसें सचरत होतें हे आता स्पष्ट रीतीने काही अिंग्रजी अितिहासकार दबत दबत कबूल करीत आहेत.[१]

---

१. Malleson writes : "In this lesser sense, then, and in this only did the cartridges produce the mutiny. They were instruments used by the conspirators and those conspirators were successfull in their use of the instruments only because, in the manner I have endeavoured to point out the mind of the sepoys of certain sections of the population had been prepared to believe every act testifying bad faith of their foreign Masters." Madley आपल्या पुस्तकात म्हणतो, "But in fact, the greased cartridges was merely the match that exploded the mine which had, owing to the variety of causes, been for a long time preparing " "Mr. Disraeli dismissed the greasing of the cartridges with the remark, that nobody believed that to have been the real cause of the outbreak." (Charles Ball's Indian Mutiny Vol. I, P 629.) आणखी अेक ग्रंथकार पुढे जाअून म्हणतो : "That the fear about the cartridges was a mere pretext with many, is shown beyond all questions. They have not hesitated to use freely when fighting against us the very cartridges which they declared would, if used, have destroyed their cast.

हिंदुस्थानसारख्या विस्तीर्ण देशात राज्यक्रांतीसारख्या नाजूक कामी अिंग्रजां-सारख्या चाणाक्ष अधिकाऱ्यांच्या हातावर तुरी देअून अितक्या गुप्ततेनें संघटित करणें हें कार्य ज्यांनी केलें त्या श्रीमंत नानासाहेब, मौल्वी अहमदशाह, वजीर अल्ली नवकीखान वगैरे पुढाऱ्यांच्या शिताफीची तारीफ करावी तितकी थोडीच आहे. शिपाअी, पोलिस, जमिनदार, मुलकी अधिकारी, शेतकरी, व्यापारी, सावकार वगैरे सर्व वर्गांमध्ये व हिंदु व मुसलमान या दोन्ही जातींमध्ये अपूर्व सलोख्याची व प्रचंड क्रांतीची बीजें पेरून दिल्ली व तीं बीजें तिथे रुजतात त्या सर्वांची अुत्कृष्ट संघटना करून त्यांनी अिंग्रजांना या सर्व प्रचंड गडबडीचा कारला मागमूसही लागू दिला नाही. ही गुप्त संघटना पूर्ण स्वरूपाला पोचत असतांना बंगालमध्ये सरकारनें नवीं काडतुसें शिपायांवर बळजोरीनें लादण्यास आरंभ केला. प्रथमतः अेकोणिसाव्या पलटणीवर प्रयोग करण्यात येणार असा रंग दिसू लागला. बंगालमध्ये फेब्रुवारी महिन्यात सर्व पलटणींपेक्षा चौतिसावी पलटण राज्यक्रांतीसाठी अत्यंत अुत्सुक झालेली होती. ह्या ३४ व्या पलटणीचे ठाणे बराकपूरला असल्यामुळे कलकत्त्याच्या नजीक असलेल्या वजीर अल्ली नवकीखान यांनी ती सर्व पलटण शपथपूर्वक राज्य-क्रांतीच्या कार्याला मिळवून घेतलेली होती. या पलटणींपैकी काही तुकड्या १९-व्या पलटणीकडे धाडल्या गेल्या होत्या. तेव्हा त्या तुकड्यांनी ती १९-वी पलटणही राष्ट्र कार्याकडे वळवून घेतलेली होती. परंतु ही स्थिति असल्या प्रचंड राज्यक्रांतिघटनेचा बिलकूल सुगावा नसलेल्या अिंग्रजी अधिकाऱ्यांस माहीत नसल्यानें त्यांनी त्या १९ व्या पलटणीवरच पहिल्यानें काडतुसांचा प्रयोग केला. परंतु ती काडतुसें घेण्याचें त्या पलटणींत अुघड रीतीनें नाकारलें व वेळ पडल्यास अेकदम शस्त्रें अुपसण्यापर्यंत त्यांनी आपला निश्चय असल्याचें कळविलें. हें कृत्य पाहतांना नेहमीच्या शिरस्त्या-प्रमाणें अिंग्रजांनी 'नेटिव्हांस' धाकदपटशा देण्याचा अुपक्रम केला. परंतु आता ती पूर्वीची 'नेटिव्हें' तिथे नव्हती हें त्या पलटणीत चाललेल्या तरवारींच्या खणखणा-टानें गोऱ्या अधिकाऱ्यांचे लवकरच नजरेस आलें. परंतु हा मानभंग काही दिवस मुकाट्यानें गिळण्याशिवाय त्यांना दुसरा अिलाज नव्हता. कारण त्या सर्व प्रांतात नेटिव्ह सैन्यास ताब्यात ठेवण्यासाठी अेकही फिरंगी पलटण नव्हती. ही अडचण दूर करावी म्हणून मार्चच्या आरंभी ब्रह्मदेशात असलेली फिरंगी पलटण कलकत्त्यास आणविली गेली व १९-व्या पलटणीला निःशस्त्र करून नामावरून दूर करण्याचा हुकूम सुटला व ह्या हुकुमाची अमलबजावणी बराकपूरला करावयाचे ठरलें !

आपल्या बांधवांना आपल्या डोळ्यादेखत शिक्षा होणार हें अैकूनही स्वस्थ बसणारें बराकपूर नव्हतें. तिथे स्वातंत्र्याची ज्योत प्रत्येक तरवारीत लकाकू लागलेली होती. परंतु त्या सर्व तरवारींत मंगल पांड्याची तरवार म्यानांत काही केल्या धीर धरीना ! १९-व्या पलटणीप्रमाणेच ३४-व्या पलटणीलाही वेळ येताच कंपनीच्या नोकरीवर लाथ मारून निघून जाण्याचीच अिच्छा होती. म्हणून १९-वी

पलटण कंपनी आपण होऊनच काढून देते आहे हें फार उत्तम होत आहे असे सर्व स्वदेशाभिमान्यांचें मत झालेलें होतें. सर्वांचा अेक विचार होअीतोपर्यंत अेक महिना दम घ्यावा असें धूर्त पुढारी सांगत होते व बराकपूरहून सर्व हिंदुस्थानभर निरनिराळ्या पलटणींत कोणता दिवस ठरवावा याबद्दल सांकेतिक पत्रेंही रवाना झालेलीं होतीं. परंतु मंगल पांड्याच्या तरवारीला दम कसा निघणार ! मंगल पांडे हा ब्राह्मण कुलांत अुत्पन्न झालेला व क्षात्रधर्माची दीक्षा घेतलेला तरणा बांड शिपाअी होता. स्वधर्मावर प्राणापलीकडे निष्ठा ठेवणारा, आचरणानें मच्छील, स्वभावानें तेजस्वी व वयानें तरुण अशा या मंगल पांड्याच्या पवित्र रक्तांत तुफानीच देशस्वातंत्र्याची विद्युच्चेतना संचरली ! मग त्याच्या तरवारीला धीर कसा निघेल ? मर्दांच्या तरवारींना कधी धीर निघत असतो काय ? जयापजयाची कवडीमात्रही पर्वा न करता आपल्या तत्वनिष्ठेवर जे स्वत:च्या अुष्ण रक्ताचा अभिषेक करतात त्याच लोकांच्या मस्तकांवर मर्दानेचा मुकुट झळकत असतो व ह्या निष्फळ वाटणाऱ्या कढत रक्तांतूनच विजयाची मूर्ति अुद्भव पावत असते ! आपल्या स्वदेशबंधूंचा आपल्या देखत अपमान व्हावा ही गोष्ट मंगल पांड्याच्या अंतःकरणास असह्य वेदना करूं लागली व तो आपल्या रेजिमेंटनें त्याच दिवशी अुठावें असा आग्रह करूं लागला. गुप्त मंडळाचे पुढारी आज अुठण्यास अनुमोदन देत नाहीत असें कळताच त्या तरुणाचें अवसान अनिवार्य झालें. त्यानें आपली बंदूक खाडदिशी अुचलली व 'मर्द हो अुठा ! ' अशी गर्जना करून परेडच्या मैदानात अुडी घेतली. "अरे आता मागें का पैता ? भाअी हो, चला तुटून पडा! तुम्हांला तुमच्या धर्माची शपथ आहे ! चला, आपल्या स्वातंत्र्यासाठी शत्रूवर तुटून पडा " अशी गर्जना करीत तो आपल्या स्वदेशबांधवास आपल्यामागें येण्याविषयी आव्हान करूं लागला. हे पहाताच सार्जंट मेजर ह्यूसन यानें मंगल पांडेला धरावयाला शिपायांना हुकूम सोडला. परंतु अिंग्रजांना आजपर्यंत आढळलेले देशद्रोही शिपाअी आता दुर्मिळ होते त्या सार्जंटची आज्ञा त्याच्या तोंडातून निघताच अेकही शिपाअी मंगल पांड्यास धरावयास हलला नाही. अितकेंच नव्हे तर मंगलपांड्याच्या बंदुकींतून सू सू करीत येणाऱ्या गोळीनें त्या ह्यूसनचें मढें अेका क्षणार्धांत जमिनीवर आदळून दिलें ! अितकी गडबड होते आहे तोंच लेफ्टेनंट बॉ हाही तिथे आला, त्याचा घोडा नाचत नाचत पुढे सरकतो आहे तोंच मंगल पांड्याच्या बंदुकीतून दुसरी गोळी सुटली व ती त्या घोड्याच्या पोटात शिरताच तो घोडा त्या लेफ्टेनंट-सह जमिनीवर धाडदिशी पडला. मंगल पांड्याला पुन्हा बंदूक भरण्याचा अवसर मिळण्याचे आधीच तो धुळीत लोळणारा लेफ्टेनंट आपलें पिस्तुल काढून अुभा राहिला आहे हें पाहताच मंगल पांड्यानें तिळमात्रही न डगमगता आपली समशेर अुपसली. बॉनें पिस्तुल झाडलें परंतु गोळी हुकली व तो आपली तरवार काढतो तोंच मंगल पांड्याच्या तरवारीचा रट्टा बसून बॉ जमिनीवर लोळूं लागला !

अितक्यात मंगल पाड्यावर तो पूर्वीचा गोरा चालून येअू पहाताच जवळच्या अेका शिपायाने आपल्या बंदुकीच्या दस्त्याने त्यावें डोकें ठेचून काढलें व सर्व शिपायानी मंगल पाड्यास कोणीही हात लावू नये अशी गर्जना केली. तोंच कर्नल व्हीलर तिथे आला व मंगल पांड्यास पकडण्याविषयी हुकूम देअू लागला. आम्ही आमच्या पूज्य ब्राह्मणाच्या केसालाही धक्का लावणार नाही अशी पुन्हा गर्जना झाली, व अिंग्लिशांच्या लाल भडक रक्ताचे पाट वाहत असलेल्या त्या देखाव्यापुढे जास्त वेळ न थांबता कर्नलसाहेब जनरलच्या बंगल्याकडे पळून गेला. अिकडे मंगल पाडे आपले रक्ताने भिजलेले हात अुभे करून 'मर्द हो अुठा' अशी भीम भयानक गर्जना करीत अिकडे तिकडे हिंडत होता. जनरल हीर्से याला ही बातमी कळताच तो आणखी काही युरोपियन घेअून मंगल पांडे याजकडे दौडत आला. आता मात्र आपण शत्रूच्या ताब्यात सापडू असा रंग पाहून त्या देशवीर मंगल पांड्याने फिरंग्यापेक्षा मरण जवळ करावें असा निश्चय केला व आपली बंदूक आपल्या छातीकडे रोखली व क्षणार्धात त्याचा पवित्र देह जखमी होअून खाली पडला! लगेच त्या जखमी तरुणाला अिस्पितळाकडे नेण्यात आले व सर्व अिंग्रज अधिकारी या अेका शिपायानें जें वीरत्व दाखविलें त्याने लज्जित होत्साते आपआपल्या तबूत निघून गेले ही १८५७ सालच्या मार्चची २९ वी तारीख.

मंगल पाडे याची नंतर कोर्ट मार्शलपुढे चौकशी झाली. त्या चौकशीत त्याने अितर कटवाल्यांची नावे घ्यावीं म्हणून प्रयत्न करण्यात आले. परंतु त्या तेजस्वी तरुणानें आपण कोणाचीही नावे देण्यास तयार नाही असें साफ अुत्तर दिले. त्याने हेंही कळविलें को मी ज्याना गोळ्या घातल्या त्या अिंग्रजी अधिकाऱ्याविरुद्ध माझा कोणत्याही प्रकारचा व्यक्तिविषयक द्वेष नव्हता. जर व्यक्तिविषयक द्वेष असता तर ते खूनच झाले असते. मंगल पांड्याचे मंगल नाम हे शहीदाच्या यादीत न देता ते खुनी मनुष्याच्या यादीत द्यावे लागले असते! परंतु मंगल पाड्याचे ते धाडसी कृत्य तत्त्वनिष्ठेसाठी होते. स्वदेशाच्या व स्वधर्माच्या सरक्षणाकरिता 'सुखदुःखे समे कृत्वा' मंगल पाडे याची तरवार म्यानातून बाहेर पडली होती' स्वदेश व स्वधर्म याचा अपमान पहाण्यापेक्षा मरण बरें असा कृतनिश्चय करूनच तो बाहेर निघाला होता. या कृत्यात जशी त्यानी पवित्र स्वदेशभक्ति व स्वधर्मप्रीति दिसून आली तसेच त्या तरुणाच्या तरवारीचे पाणीही दिसून आले. अशा या वीर तरुणाला अखेर फाशीची शिक्षा झाली. ता. ८ अेप्रिल ही त्याच्या फाशीसाठी नेमली होती. शहीदाच्या रक्तात काय तेज असेल त असो, परंतु त्याच्या नामस्मरणाने देखील मनात अुदात्त वृत्तींना जास्त बहर येअू लागतो! पण ज्याच्या दृष्टीला मंगल पाड्याच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ झालेला होता त्या बराकपूरच्या सर्व नागरिकांचे अंतःकरणात दिव्य प्रेम अुत्पन्न झाले यात काय नवल आहे! त्या सर्व बराकपूर शहरात मंगल पांड्याला फाशी देण्यासाठी अेक मांग मिळेना! अखेर कलकत्त्याहून

त्या अमंगल कृत्यासाठी चार मांग आणवावे लागले. तारीख ८ एप्रिलच्या दिवशी सकाळी मंगल पाड्याला फाशीकडे नेले. त्याचे भोंवती लष्करी लोकांचा पहारा होता. त्यांतून मंगल पांडे धीटपणाने चालत गेला व फाशीवर चढला. आपण कोणाचींही नावें सांगणार नाही असे पुन्हा अेकदा सांगताच त्याच्या पायाखालचा आधार काढून घेण्यात आला व मंगल पांड्याचें शरीरांतून त्याचा पवित्र आत्मा स्वर्गांत जाता झाला ! !

अशा रीतीने सत्तावनच्या क्रांतियुद्धाची पहिली चकमक झडाली व अशा रीतीने त्या क्रांतियुद्धांतील पहिला शहीद स्वर्गवासी झाला ! ज्याच्या रक्तांतून सत्तावनच्या शहादतीची नदी सुगम पावत आहे त्या देशवीर, धर्मवीर मंगल पाड्याचें नांव आपल्या प्रत्येकाच्या वदनात व हृदयात अक्षय्य असले पाहिजे ! सत्तावनच्या साली हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यबीजाला अंकुर फुटविण्यासाठी प्रथम मंगल पाड्याने त्याच्यावर आपलें अुष्ण रक्त ओतलें आहे. त्या स्वातंत्र्यबीजाचा हंगाम जर पुढे मागे आला तर त्याच्या पहिल्या नैवेद्याचा मान मंगल पांड्याला आहे !

मंगल पांडे नाहीसा झाला, पण त्याचें चैतन्य सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहे व ज्या तत्त्वासाठी मंगल पांडे मेला तें तत्त्व चिरंजीव झालेले आहे ! मंगल पांड्याने सत्तावनच्या क्रांतियुद्धाला आपलें रक्त दिलें, अितकेंच नव्हे तर त्या क्रांतीत जे जे स्वदेशार्थ व स्वधर्मार्थ लढले त्या सर्वांना 'पांडे' हें अभिधान लावण्याचा प्रयत्न चालू झाला.[२] असलें हें पवित्र नाव प्रत्येक आर्यो आपल्या मुलाला स्वाभिमानपूर्वक शिकवी !

---

२. 'The name has become a recognised distinction for rebellious Sepoys throughout India." —Charles Ball
This name was the origin of the Sepoys generally being called Panday." —Lord Robert's Forty-one years in India.

* * *

प्रकरण दुसरें

# मीरत

देशवीर मंगलपांडे याच्या शहादतीत सत्तावनचें बीं रजताच ते अंकुरित होण्यास वेळ कसाला ! ज्या १९-व्या रेजिमेंटमध्ये मंगल पांडे होता त्या रेजिमेंटच्या सुभेदारालाही रात्री क्रांतिकारक गुप्तमंडळ्या जमविल्या म्हणून आरोप ठेवून त्याला फाशी देण्यात आलें व १९-वी रेजिमेंट व ३४-वी रेजिमेंट ह्या दोघांनी मिळून सर्व

जिलाखाभर बंड करण्याचा गुप्तकट केल्याचें त्यांच्याजवळ सापडलेल्या कागदपत्रां-वरुन सिद्ध झाल्यामुळे त्यांस निःशस्त्र करुन नोकरीवरुन घालवून देण्याची शिक्षा दिली. सरकारच्या मताने ही 'शिक्षा' होती परंतु त्या दोन्ही रेजिमेंटमधील शिपायांना हा स्वतःचा मोठा 'सन्मान' होत आहे असें वाटलें. ज्या दिवशी त्यांना शस्त्रें खाली ठेवण्याचा हुकूम झाला त्या दिवशी युरोपियन सैन्याची तयारी जय्यत ठेवलेली होती व या नोकरीवरुन घालवून देण्याच्या शिक्षेने शिपायी पश्चात्ताप पावतील अशी अिंग्रजी अधिकाऱ्यांची खात्री होती. परंतु त्या हजारो शिपायांनी अेखाद्या अत्यंत अपवित्र वस्तूप्रमाणे कंपनीच्या दास्यावर थुंकीने लाथ मारली, आपले बूट व युनि-फॉर्म फाडफाडून फेकून दिले व त्या गुलामगिरीचे विटाळास घालविण्याकरिताच की काय, ते शेजारी असलेल्या नदीवर स्नान करु लागले. त्या शिपायांच्या स्वतःच्या पगारातून त्यांना लष्करी टोप्या घ्याव्या लागत होत्या. तेव्हां ही त्यांची खाजगी जिंदगी समजून कंपनीने ती त्यांनी परत न्यावी अशी सवलत दिली होती. परंतु नदीमध्ये स्नान करुन बाहेर पडल्यावर पुन्हा हें गुलामगिरीचें चिन्ह डोक्यावर घालावयाचें की काय? आपल्या झाल्या तरी त्या टोप्यांवर कंपनीचा शिक्का आहेना? खबरदार कोणी त्या दास्यचिन्हांना स्पर्श करील तर! आता दुसऱ्यांनी हिंदुस्थानला टोपी घालण्याचे दिवस गेलेले आहेत. द्या त्या दास्याच्या टोप्या दास्या-कडे फेकून—हजारो टोप्या आकाशात भिरकांडया खाअू लागल्या! परंतु गुरुत्वा-कर्षणाच्या हट्टी स्वभावामुळे त्या पुन्हा हिंदुस्थानचे भूमीवर पडल्या. पुन्हा भूदेवीस दास्याचा विटाळ झाला, धावा शिपायांनो, या दास्यचिन्हांना त्या अिंग्रजी अधि-काऱ्यांसमोर फाडून, तोडून व मग पायाखाली तुडवून धुळीस मिळवून द्या! हजारो शिपाअी त्या दास्यदूषित टोप्यांना तुडवू लागले व आपल्या सत्तेचा मूर्तिमंत धुव्वा ही की काय असा हा भयंकर हिंदी नाच पहात हतवीर्य झालेले अिंग्रजी अधिकारी जागच्या जागी थिजून गेले!![1]

अुत्तर प्रदेशातील अुच्च पुरभय्या ब्राह्मण कुलात जन्मलेल्या मंगल पांड्याचें रक्त फक्त बंगाल्यातच स्वातंत्र्यबीजाला रुजवीत होतें असे नाही तर तिकडे अंबा-ल्याचे अंगातही त्याची विद्युच्चेतना संचरलेली होती. अंबाला हें अिंग्रजी सेनेचें मुख्य स्थान होतें व येथेच कमांडर-अिन-चीफ अँन्सन हा रहात होता. त्या अंबाल्याला शिपायांनी अेक नवीन तऱ्हा काढलेली होती. ती ही की, जो कोणी अधिकारी त्याच्या विरुद्ध जाअील त्याचे घरदार जाळून भस्म करावयाचें! रोज रात्री देशद्रोह्यांचीं व परकीयांचीं घरें पेट घेत. हें काम अितक्या झटक्यात व गुप्ततेने अुरके की, प्रत्यक्ष अग्निनारायणच क्रांतिपक्षाच्या गुप्तमंडळीत सभासद झाला आहे की काय असें वाटे अितक्या आगी लागल्या व जो आगी लावणारांना धरुन देईल त्याला हजारो

[1] Red Pamphlet, Part I, page 34.

त्यांचीं वर्णनेंही त्यानंतर आलीं. पण अेक जण जर बातमी देअील तर शपथ ! अखेर वैतागून जाअून मुद्द कमान्डर-अिन-चीफ अँन्सन गव्हर्नर-जनरलला लिहितो :

"Strange that the incendiaries should never be detected. Everyone is on the alert there, but still no clue to trace the offenders." पुन्हा अेप्रिलचे शेवटी तो लिहितो : "We have not been able to detect any of the incendiaries at Ambala. This appears to me extraordinary; but it shows how close the combination among the miscreants who have recourse to this mode of revenging what they concieve to be their wrongs and how great the dread of retaliation to anyone who would dare to become an informer."

हिंदुस्थानच्या देशद्रोहावर तर अिंग्रजी साम्राज्याची मदार. तेव्हा अंबाल्याला अेकही देशद्रोही न सापडल्याने मुद्द कमान्डर-अिन-चीफ साप बनला व शिपायांच्या गुप्त कटांचें कौतुक करीत, त्याच्यावर दात ओठ चावू लागलों ह्यात काय नवल आहे ?

आता ह्या आगी हिंदुस्थानात ठिकठिकाणीं सुरू झाल्या होत्या. शेवटची थोरली आग भडकण्याचे आधी अिकडेतिकडे बारीक बारीक ठिणग्या अुडू लागाव्या हें साहजिकच आहे. लखनौला नानांच्या भेटीपासून फारच गडबड अुडालेली होती. अंबाल्याप्रमाणेच तिथेही अधिकाऱ्यांची व देशद्रोह्यांची घरें पेटू लागलीं ! ता. ३१ मेला सर्व हिंदुस्थान अेकदम पेटवून द्यावे म्हणजे अिकडे तिकडे जीव लपवीत फिरण्याची संधि न मिळता पारतंत्र्य आगीच्या आत राख होअून जाअील हा ठरलेला बेत लखनौच्या गुप्त मंडळाला जरी ममत होता तरी तेथील तेजस्वी शिपाअीबहादुरांस आपला त्वेष पोटात दाबून धरवेना. त्यातूनही दररोज रात्री गुप्तसभांतून चाललेल्या अुद्दीपक भाषणांनी व जळणाऱ्या घराच्या भयंकर देखाव्यानें शिपायांना थांबता थांबवेना. मेच्या तिसऱ्या तारखेस असेच अनिवार्य झालेले चार शिपाअीबहादुर बळजबरीने लेफ्टनंट मेकॅम याच्या तंबूत घुसले व म्हणाले . "तुझ्याशी जरी आमचा कोणताही प्रकारचा व्यक्तिविषयक द्वेष नाही तरी तू फिरंगी आहेस व म्हणून तुला मेलेंच पाहिजे !"[२] ह्या अचाट विशाळ शिपायांना पाहताच भेदरून गेलेला तो लेफ्टनंट त्यांची विनवणी करू लागला. "आपण मनात आणाल तर मला अेका क्षणात मारू शकाल. पण मज गरिबाचे मरणाने तुम्हास काय मिळेल ? दुसरा अेखादा मनुष्य येअील व हें काम करू लागेल. अपराध माझा नसून ह्या राज्यपद्धतीचा आहे. मग मला जीवदान का देत नाही ?" ह्या वाक्याने ते शिपाअी बहादूर जरा

२. "They informed him that personally they had no quarrel with him but that "he was a Firungee and must die'!!" —Charles Ball's Indian Mutiny Vol I, page 52.

शुद्धीवर आले व सर्व राज्यपद्धतीला अेकदम मारले पाहिजे ह्याची आठवण होऊन परत फिरले. परंतु ही बातमी अधिकाऱ्यांच्या कानावर गेली व लगेच हेन्री लॉरेन्सने तोफखान्याचे मान्यात त्या पलटणीला फमवून अुभें करून मग तिला निःशस्त्र करून टाकली.

परंतु अिकडे मीरतकडे तर डाव ह्याहूनही रंगात येत चाललेला होता काडतुसासंबंधी शिपाओी लोक खरोच तक्रार करतात कीं नाही हे नक्की ठरविण्याची कल्पना काही अिंग्रजी डोक्यात आली व त्यांनी ता. ६ मेला घोडेस्वारांच्या अेका तुकडीला तीं काडतुसें देण्याचा निश्चय केला. त्या परेडीला हजर असलेल्या सुमारे नव्वद शिपायांपैकी पुरते पांचजण देखील ह्या काडतुसाना शिवेनात! तरी तीं काडतुसें 'पुन्हा देण्यात आलीं, पुन्हा मगळघा शिपायांनी त्याना स्पर्श करण्याचें नाकारले व ते आपआपल्या ठाण्याकडे निघून गेले. ही त्यांची वर्तणूक जनरलच्या कानावर जाताच त्याने कोर्टमार्शलपुढे त्या सर्व शिपायाना अुभे करून पंचायशी स्वारांना आठपासून दहा वर्षेंपर्यंत सक्त मजुरी करण्याची शिक्षा ठोठावली !

मेच्या ९-व्या तारखेला हा हृदयद्रावक प्रसंग गुदरला. युरोपियन कपर्नीच्या व तोफखान्याच्या पहाऱ्यात वरील ८५ शिपायांना अुभे केले. बाजूला सर्व नेटिव्ह शिपायाना तो देखावा पाहण्यामाठी मुद्दाम बोलावून आणले, व मग त्या पंचाअैंशी देशभक्त शिपायाना आपले कपडे काढण्याचा हुकूम दिला त्यांच्या हातातील शस्त्रें हिसकावून घेअून व त्यांच्या अगावरील कपडे फेकून देअून मग मोठमोठाल्या लोखंडी बेड्या त्याच्या पायात व हातांत ठोकण्यात आल्या ! शत्रूच्या छातीत घुसणाऱ्या तरवारीशिवाय ज्याच्या हातात अितर काही पडलेले नव्हते त्या आपल्या मर्द स्वदेशभाअींचे हातांत आज फिरंग्याने लोखडी बेड्या ठोकल्या हे पाहताच सर्व हिंदी शिपायाचे अंगात थरारल्यामारखें झाले परंतु समोरच रोखून ठेवलेल्या तोफाकडे पाहून प्रत्येक तरवार म्यानात जळफळत राहिली. नतर त्या ८५ शूर शिपायांना तुम्हास दहा वर्षें सक्तमजुरीची शिक्षा दिलेली आहे असे कळविण्यात आलें व हातापायातील अवजड बेड्यांच्या माराखाली वाकत वाकत ते धर्मवीर तुरुगाकडे जाअू लागले! त्या वेळेम आपल्या धर्माच्या सरक्षणासाठी तुरुगात चाललेल्या त्या शिपायाना त्याच्या स्वदेशबधूंनी काय नेत्रसकेत केले ते भविष्य लवकरच सागेल ! गाओीच्या व डुकराच्या रक्तात मिसळविलेली काडतुसें आपल्यावर बळजबरीने कोंबली जात असता तीं फेकून देणे हा दहा वर्षें सक्त मजूरी करण्याअितका भयकर अपराध ज्या दास्यात होतो त्या फिरगी दास्याच्या नरडीचा आम्ही घोट घेअू व दहा वर्षांसाठी म्हणून तुमच्या पायात घातलेल्या बेड्या व आज शभर वर्षें झालीं आपल्या देशजननीच्या पायात घातलेल्या गुलामगिरीच्या बेड्या ह्या दोन्हींनाही लवकरच तोडून टाकू असा त्या नेत्रसंकेताचा अर्थ असावा !

ही वेळ सकाळची होती. आपल्या प्रियकर देशबंधूना आपल्या डोळ्यादेखत परदेशीय व परधर्मीय लोकांनी बेड्या ठोकून तुरुंगात टाकावें व आपण तें मुकाट्यानें डोळ्यांनी पहावें याची लाज वाटून मनातल्या मनात जळणारे शिपाअी आपल्या बराकींत परत येताच त्यांच्याने धीर निघेना ! शहरांतल्या बाजारात ते गेले असतां तेथील बायका त्यांचा तिरस्कार करून म्हणू लागल्या : "तुमचे बाप तुरुंगात पडले असतां तुम्ही अिथे माशा मारीत फिरत आहां ! थू मेल्यांनो तुमच्या जिण्यावर !"[३] आधींच संतापानें जळणाऱ्या शिपायांना आपल्या जिण्यावर रस्त्यातील बायकांनी देखील थुंकावें हे त्यांना कसें सहन होणार ? त्या दिवशी रात्रीं सर्व लाअीनभर शिपायांच्या छुप्या सभांची गर्दी अुडालेली होती. आता मेच्या ३१-व्या तारखेपर्यंत वाट पहावयाची काय ? अिकडे आपले देशबंधु तुरुंगात कुजत असतांना आपण नामर्दासारखें स्वस्थ बसावयाचें काय ? रस्त्यात बायकापोरें आपल्यावर देशद्रोही म्हणून थुंकू लागली तरी अितरांची वाट पहात स्वस्थ बसावयाचें काय? ता. ३१ अजून किती तरी लांब आहे. तोंपर्यंत या फिरंग्यांच्या निशाणाखाली रहावयाचें ? छे, छे, अुद्याचा रविवार आहे तो रविवारचा सूर्यनारायण अस्तास जाण्याचे आधी त्या तुरुंगातील देशवीरांच्या बेड्या तुटल्याच पाहिजेत. स्वदेशजननीच्या बेड्या तुटल्याच पाहिजेत व स्वातंत्र्याचें निशाण फडकलेंच पाहिजे ! तावडतोब दिल्लीला निरोप गेले की, "आम्ही ता. ११ किंवा १२ ला तिथे येतो. सर्व तयारी जय्यत ठेवा."[४]

ता. १० मेचा रविवार अुजाडला. सत्तावनच्या गुप्त तयारीची अिंग्रजांना अितकी कमी माहिती होती की मीरतच्या शिपायांचा अितराशी तर काय, पण आपआपसांत देखील काहीं अेक सर्वसामान्य बेत चालला आहे ह्याची त्यांना शंका देखील आलेली नव्हती. रविवारच्या सकाळी त्यांचा नित्यक्रम शांत रीतीने सुरू झाला. घोड्यांच्या गाड्या, शीतोपचार, सुवासिक फुलें, हवा खाणें, गाणें बजावणें सर्व प्रकार यथास्थित सुरू झाले. साहेबाचे घरीं असलेले ते नेटिव्ह नोकर अेकाअेकी नोकरी टाकून गेले ह्याबद्दलही क्षणापेक्षा जास्त वेळ आश्चर्य वाटलें नाहीं ! अिकडे शिपायांच्या तळात वाद चाललेला होता की सरसकट कत्तल अुडवावी कीं अुडवू नये. विसावी पलटण व तिसरी घोडेस्वार पलटण यामधील शिपाअी म्हणाले, "चर्चमध्ये फिरंगी गेला की म्हणावा हरहर महादेव ! व मुलकी व लष्करी, बायकापोरें, पुरुष जो सापडेल तो छाटीत चलावे दिल्लीकडे !" हाच बेत शेवटी ठरला.

अिकडे मीरत शहरात शेजारच्याचे खेड्यांतूनही मोडक्या तोडक्या शस्त्रें हातीं घेअून हजारो लोक येअून मिळतच होते. स्वदेशकार्यार्थ आलेल्या त्या गावकऱ्या-प्रमाणे मीरतचे नागरिकही सज्ज होअू लागले तरी अिंग्लिशाना याची काडीचीही

३. J. C. Wilson.

४ Red Pamphlet, Part I.

न्दाद नव्हती ! अखेर रविवारचे संध्याकाळचे पांच वाजले. चर्चची घटा त्या शांत वातावरणात हलके हलके हेलकावे घेऊ लागली व अिंग्रजी लोक आपापल्या स्त्रियांसह न्हमत खेळत चर्चकडे जाअू लागले. परंतु त्या दिवशीच्या चर्चची घंटा ही अिंग्लिशांकरिता प्रार्थना वाजवीत नव्हती, तर त्यांचा मरणसमय वाजवीत होती. कारण तिकडे शिपायांच्या लाअिनीत अेकच गर्जना अुठली व 'मारो फिरंगीको' ह्या ध्वनीने सर्व वातावरण दुमदुमू लागले.

प्रथमत: तुरुंगात पडलेल्या धर्मवीरांच्या बेड्या तोडण्यासाठी घोकडो घोडेस्वार तिकडे गेले. त्या तुरुंगावर ठेवलेले पहारेकरीही क्रांतिपक्षासच अनुकूल असल्याने 'मारो फिरंगीको' हा रणध्वनि अैकताच तो तुरुंग सोडून देअून ते आपल्या स्वदेशबंधूंस जाअून मिळाले. अेका क्षणात त्या दुर्दैवी तुरुंगाच्या भिंती कोमळू लागल्या ! दहा वर्षे सक्त मजुरीकरिता म्हणून फिरंग्यानी घातलेल्या बेड्या चळचळ कापू लागल्या. अेक देशाभिमानी लोहार पुढे आला व त्याने भराभर त्या बेड्यांचे तुकडे पाडले. प्रचंड वीरगर्जनेत ते तुरुंगात पडलेले धर्मवीर बाहेर आले, घोड्यावर चढले व आपल्या मुक्ततेसाठी आलेल्या देशबंधूंसह त्या तुरुंगाला मागे टाकून चर्चकडे भरधाव धावले. अिकडे या अवधीमध्ये पायदळाच्या तुकडीने अेकच दंगल मांडली. अकराव्या पलटणीचा कर्नल फिनीस हा आपल्या घोड्यावर बसून नुकताच तिकडे गेला होता. शिपायांच्या समोर अुभे राहून फिनीस हा नेहमीच्या आढ्यतेने त्यांना धाकदपटशा दाखवू लागतो, तोच शिपाअी त्याच्या अंगावर काळासारखे चवताळून धावले. विसाव्या पलटणीतील अेका शिपायाने आपले पिस्तुल त्याच्यावर झाडले व तो कर्नल त्याच्या घोड्यासुद्धा जमिनीवर ठार होअून पडला ! पायदळ व घोडेस्वार, हिंदु व मुसलमान हे सर्व आता गोऱ्या रक्तासाठी अितके हपापलेले होते की, या फिनीसचे रक्त म्हणजे दर्यामें खसखस होती ! मीरतच्या बाजारात ही बातमी कळताच ते शहरचें शहर अेखाद्या वणव्यासारखे पेटू लागलें व जिये जिये अिंग्रज म्हणून आढळला तिथे तिथे त्याला गारद करण्यात आलें. सदर बाजारातील सर्व लोक हातात तरवारी, भाले, काठ्या, सुऱ्या जें जें सापडेल ते ते शस्त्र घेअून गल्ल्यागल्ल्यातून धावू लागले. ज्या ज्या अिमारतीवर अिंग्लिश मतेचें काही तरी चिन्ह होतें त्या त्या अिमारती—बंगले, ऑफिसे, कचेऱ्या सर्व आगीच्या डोंबात जळू लागल्या. आकाशात धुराचे लोट, अग्नीच्या चित्रविचित्र ज्वाला, हजारो लोकांच्या आरडाओरडीची समिश्र आरोळी व सर्वांचे वरती 'मारो फिरंगीको' हे भयानक ध्वनि ह्यांनी ते मीरतचे आकाश अगदी विकाळ दिसू लागलें ! बंडाला आरंभ होताच पूर्व संकेताप्रमाणे मीरत ते दिल्लीकडे जाणाऱ्या तारा तोडून टाकल्या व त्या रस्त्यावर आपला सक्त पहारा बसविला. ती अंधेरी रात्र असल्याने अिंग्रजाची अत्यंत त्रेधा अुडाली. कोणी तबेल्यात लपला तर कोणी सर्व रात्रभर झाडाखाली दडून राहिला, कोणी घराचे तिसऱ्या मजल्यावर तर कोणी

जमिनीने सक्दाडान, कोणी नोकराच्याने सोंग घेऊं लागला तर कोणी आपल्या बटलराचे पाय धरूं लागला ! बडवाळे शिपाई किंचित् अंधार पडतांच दिल्लीकडे निघून चालले होते. परंतु त्याच्या जुलुमाचा सूड मीरतचे लोकांनी अग्निस्थाचें काम स्वतःच पुरें केलें. अिंग्रजांमधील अितका अनिवार संताप अुत्पन्न झालेला होता कीं अिंग्रजांचा स्पर्श झाल्यामुळे ज्या घरांना आगी लावणें अशक्य झालें अशीं दगडांचीं घरें चूर्ण करून टाकण्यात आलीं ! तेथील कमिशनर ग्रीथेड याच्या बंगल्याला आग लावून दिली तरी तो आगत दडून बसला होता. अितक्यात ती गुणगुण बाहेर पडून मीरतचे लोक त्या बंगल्याभोवती गर्जत होऊन कर्कश गर्जना करीत जमा झाले. तेव्हा तो कमिशनर आपल्या बटलरचे पाय धरूं लागला व पायाखालीं आगीचे डोंब व बाजूला शत्रूंचा गराडा अशा मृत्यूच्या दाढेतून आपल्या कुटुंबास जीवदान द्यावें अशी विनंती करूं लागला. तेव्हा त्या बटलरनें बंडवाल्यांस कमिशनर घरात नसून परोसरच जिकडे लपलेला आहे तिकडे चलण्याविषयी आग्रह धरला व अशा रीतीनें त्यांना लांबवर नेलें. अिकडे कमिशनर तें घर कडाडदिशी कोसळून असता निसटून पार झाला. अिकडे मिसेस चेंबर्सच्या बंगल्यात बंडवाल्यांनी तिला सुऱ्यांनी भोसकून फरफर ओढून फेकून दिली कॅप्टन क्रेजी ह्याने आपल्या बायकोला व मुलांना त्यांचा गोरा रंग झाकण्यासाठी घोड्यांचीं खोगिरें पांघरावयास दिलीं व अशा रीतीनें त्यांना काळ्या करून अेका पडक्या देवळात रात्रभर लपवून ठेवलें. डॉक्टर क्रिस्टे व व्हेटरिनेरी सर्जन फिलिप्स यांना चेचून मारण्यात आलें. लेफ्टेनंट टॅपलर ह्याला मरणोन्मुख करून फेकून दिलें. कॅप्टन टेलर, कप्टन मॅक्डोनल्ड, लेफ्टेनंट हेंडरसन, लेफ्टेनंट पॅट ह्यांना पाठलाग करून करून गारद केलें. आग लावून दिलेल्या घरात कित्येक बायकामुलें जळून मेलीं. जों जों अिंग्रजी रक्ताचा जास्त जास्त सडा पडत चालला तों तों बडवाल्याच्या कर्कश गर्जना व भयानक अट्टहास्य यांना अवसान चढूं लागलें ! रस्तोरस्तीं अिंग्रजी प्रेतें जाणारे येणारे लोक लाथाडून देऊं लागले ! मध्यंतरी कोण्या बडवाल्याला गोऱ्या लोकांवर अेखादा वार करतांना किंचित् दया आल्यासारखी दिसली की अितर हजारो लोक 'मारो फिरंगीको' म्हणून ओरडून धावत येत व त्या तुरुंगात टाकलेल्या ८५ धर्मवीरांपैकी अेखादा तिथे असल्यास त्याच्या निरपराधी हातावरील फिरंगी बेड्यांच्या वळाकडे बोट दाखवून 'ह्याचा सूड पाहिजे' म्हणून वारावर वार करूं लागत ![५]

वास्तविक पाहता हिंदुस्थानात जर कुठे बंड प्रथम अुद्भवण्याचा मुळींच संभव नसेल तर तो मीरतला नव्हता. कारण तिथे नेटिव्ह शिपायांच्या २ पायदळ रेजिमेंटस् व अेक घोडेस्वारांची रेजिमेंट होती परंतु गोऱ्या शिपायांची अेक संबंध रायफलमन बटॅलियन व अेक ड्रॅगून रेजिमेंट असून अत्यंत अुत्तम असा तोफखाना

५. Causes of the Mutiny by a 'Hindu'

सर्वस्वी त्याच्याच ताब्यात होता. अशा स्थितीत शिपायांना पळ घेण्याची मीरतल मुळीच आशा नव्हती. अुठावणी होताच तेथील अिंग्रजांचा सूड घेण्याचें काम मीर शहराकडे सोपवून बंडवाले शिपाअी यासाठीच दिल्लीकडे तावडतोब निघून चाल लेले होते. त्यांचा पाठलाग करून त्यांना अडकविणें किंवा त्यांचा पूर्ण नाश करा हें कामही अत्यंत सुलभ होतें. परंतु अिंग्रजांच्या सैन्यात व त्यांच्या अधिकाऱ्यां त्या वेळेस जें भीरुत्व, अव्यवस्था व विनघोरणीपणा दिसून आला त्याची अिंग्र अितिहासकारांनाही फार शरम वाटत असते! नेटिव्ह घोडेस्वारांचा कर्नल स्मि हा आपली रेजिमेंट अुलटली आहे हें अैकताच तिकडे तोंड न वळविता घूम पळ सुटला. तोफखान्यावरील अमलदार तोफांना सज्ज करून त्याची मिरवणूक काढ तात तों शिपाअी दिल्लीकडे चालूही लागले. त्यातूनही तमेंच पुढे न रेटता अिंग्रज सैन्य घाबरल्यासारखें होअून ठिकच्या ठिकाणी सर्व रात्रभर पडून राहिलें. वास्तवि पाहता मीरत अुठल्याने अिंग्रजांचा विलक्षण घोटाळा झाला. त्यांना हा अभूतपू व अकस्मात् गुदरलेला प्रचंड प्रसंग काय आहे याची दुसरे दिवसापर्यंत कल्पना आली नाहीं! अिकडे शिपायांचा नकाशा अगदीं व्यवस्थित रीतीने रेखाटलेला होता बंड करताच तुरंगातून कैदी सोडवावयाचे व नंतर अिंग्रजी रक्ताचा मनमुरा पाअूस पाडावयाचा! ह्या अकस्मात् पडलेल्या घाल्याने अिंग्रज लोक अितके घाबर की त्या अडक्यात मीरत शहराने अुठून जाळपोळ व हाणामारी चोहोंबाजूने करीत खर खरा दंगा कोणीकडे आहे याची दाद अिंग्रजांना बराच वेळ लागू देणे अशक्य करु टाकलें. ही दाद लावण्यात ते गुतले आहेत तोंच सर्व शिपायांनी दिल्लीकडे निघावे हा दिल्लीकडे जाण्याचा बेत अत्यंत कौशल्याचा होता. दिल्ली पहिल्या घडाक्याल ताब्यात घेअून बंडाला अेका क्षणात राष्ट्रीय जातीचे स्वरूप देण्यात व अिंग्रजांच्य अिभ्रतीवर कुऱ्हाड घालण्यात गुप्त कटवाल्यांनी अप्रतिम चातुर्य दाखविलें या तिळमात्र संदेह नाही. हा बेत जितक्या कौशल्याने रचला गेला तितक्याच तड फेने पारही पाडला गेला. बंड होअून ती बातमी अिंग्रजी अधिकाऱ्यांच्या कानाव जाते न जाते तोंच दिल्लीकडच्या तारा तोडून टाकून, तो रस्ता रोखून ठेवून, तुरुगा तून आपले धर्मवीर मुक्त करून, अिंग्रजांच्या रक्ताचे पाट वाहवून ते दोन हजा हिंदी शिपाअी आरक्त गोऱ्या रक्तात थबथबलेल्या तरवारी अुभारून ओरडू लागरे की, 'दिल्ली! दिल्ली! चलो दिल्ली!!'

* * *

## प्रकरण तिसरें

# दिल्ली

श्रीमंत नानासाहेब पेशवे अेप्रिलच्या शेवटच्या भागात दिल्लीला येअून गेलेले होते. तेव्हा ठरलेल्या बोलीप्रमाणे ता. ३१ मेच्या रविवारची सर्वजण अुत्सुकतेने वाट पहात होते. ता. ३१ ला सर्व हिंदुस्थानभर हरहर महादेव अेकसमयावच्छेदे करून अुठाला असता तर खरोखरच अिंग्लिश साम्राज्याची अितिश्री व्हावयास व स्वातंत्र्यविजयाची ललकारी द्यावयास अितिहासाला जास्त वेळ थांबावें लागतेना. परंतु मीरतच्या अगाअू अुठावणीने शत्रूलाच नव्हे तर अिंग्रजांनाच फार फायदा झाला.[1] मीरतच्या बाजारात ज्या तेजस्वी स्त्रिया शिपायांचे जिव्हारी थुंकल्या व मर्द असाल तर तुरुंगातील वीरांना सोडवून आणा म्हणून म्हणाल्या त्या स्त्रियांच्या ह्या तेजस्वी चेतनेने आपल्या अितिहासात जरी अेका स्फूर्तिदायक कथेची भर टाकली तरी परकीयांना त्यांनी नकळत सावध करून आपल्या स्वदेशीय पुढाऱ्यांना अकल्पित घोटाळ्यात पाडलें! दिल्लीला सर्व शिपाअी नेटिव्हच होते. त्यांनाही श्रीमन्मंगल पांड्याची वातमी अैकल्यापासून दम धरवेनासा झालेला होता. परंतु बादशहाने व बेगम झीनत महालने मोठ्या शिताफीने सर्व दिल्ली शांत ठेविली होती. अितक्यात ता. १० मेला मीरतच्या गुप्तमंडळाकडून दिल्लीच्या गुप्तमंडळाला अेकदम निरोप आला की आम्ही अुद्या येतो, तयारी ठेवा! हा अपूर्व व आकस्मिक संदेश दिल्लीला येतो न येता तोंच मीरतहून दोन हजार शिपाअी दिल्ली ! दिल्ली ! म्हणून गर्जना करीत निघालेही ! त्या रविवारच्या सर्व रात्रीला बिलकूल झोप मिळाली नाही ! हजारो घोडे दौडत आहेत, खिंकाळत आहेत, तरवारींचा व बेयोनेटांचा खणखणाट सुरू आहे, दोन हजार रणावलेल्या वीरांच्या कर्कश आरोळ्या व गुप्त कुजबुजणी हीं

---

१. "It is certain, however, that this sudden rising in all parts of India had found the English unprepared, and few of our people would have escaped the swift destruction. It would then have been the hard task of the British Nation to reconquer India or else to suffer our Eastern Empire to pass into an ignominious tradition."— Malleson, Vol. V. "The calamitous revolt at Meerut was, however, of signal service to us in one respect; in as much as it was a premature outbreak which disarranged the preconcerted plan of simultaneous mutiny of Sepoys all over the country settled to take place on Sunday, the 31st of May 1857."

—White's History, Page 17

सारखीं चाललेलीं आहेत – असा हा भयंकर देखावा पहात ती रात्र जागरण करीत होती. अखेर पहाटचा सुमार झाला व आपला पाठलाग करीत मीरतचा तोफखाना अजून येत नाहीं हें पाहून अुत्साह चढलेले ते शिपाअी सर्व रात्रभर झालेल्या श्रमास विसरून जाअून अेक क्षणही न थांबता तसेच पुढे चालले. मीरतपासून दिल्ली सुमारे ३२ मैल होती. अखेर सकाळचे आठ वाजण्याचे सुमारास त्या सैन्याचे प्रमुख भागाला यमुनेचें पवित्र दर्शन घडलें. स्वातंत्र्याच्या पवित्र कामगिरीवर जाणाऱ्या योद्धयांना आपल्या शीतल जलानें सिंचित करून प्रोत्साहन देणारी भगवती यमुना त्यांच्या दृष्टीस पडताच त्या हजारो योद्धयांनी 'जय जमनाजी' म्हणून तिचें वंदन केलें. यमुनेवरून दिल्ली शहरात जाण्यासाठी असलेल्या नावांच्या पुलावर हिंदी घोडे दौडत चालू लागले. परंतु यमुना नदीला ते कशासाठी दौडत आहेत हे कळले आहे का? हें तिला कळविल्याशिवाय पुढे जाणें अिष्ट नाही. तर धरा तो कोणीसा अिंग्रज पुलावरून चाललेला आहे त्याला व त्याच्या गोऱ्या रक्ताला द्या ह्या काळचा कालिंदीत ओतून! हे रक्त शिपाअी काय म्हणून दौडत चाललेले आहेत याची यथास्थित वार्ता यमुना नदीला कळवील!

तो नावांचा पूल अुतरताच शिपाअी दिल्लीच्या तटाला भिडले. ही गुणगुण कळल्याबरोबर दिल्लीला असलेले अिंग्रजी अधिकारी नेटिव्ह शिपायांना परेडवर बोलावून त्यांना राजनिष्ठेचीं व्याख्यानें देअू लागले. मग ५४-व्या पलटणीला घेअून कर्नल रिप्ले बंडवाल्यांशी सामना देण्यास निघाला. त्या ५४-व्या पलटणीतले नेटिव्ह शिपाअी निघते वेळेस म्हणाले की कर्नलसाहेब त्या मीरतच्या शिपुर्ड्यांना आम्हाला दाखवा तर खरे, म्हणजे मग आम्ही पाहून घेतो! काय पाहून घेतो हें त्या कर्नलला काय ठाअूक! तो मोठ्या फुशारकीने 'शाबास' म्हणून म्हणाला व ती पलटण बंडवाल्यांवर चालून गेली. जरा पुढे जातात तोंच तटाकडे मीरतचे घोडेस्वार दौडत येत असलेले दृष्टीस पडले. संतापाने अुग्रतम झालेल्या व गोऱ्या रक्ताची निकराने मागणी करणाऱ्या त्या घोडेस्वारामागोमाग तांबड्या रंगाच्या पोशाखात सजलेले मीरतचे पायदळही येत होते. अेकमेकास पाहताच त्यांनी परस्परास सलामी दिली व मीरतचे सैन्य दिल्लीच्या सैन्यास भेटू लागले! मीरतच्या सैन्यातून 'फिरंग्याचे राज्याचा नायनाट होवो व बादशहाचा जयजयकार असो' ही गर्जना अुठताच दिल्लीच्या सैन्याने 'मारो फिरंगीको' म्हणत प्रतिगर्जना केली! क्षणार्धात हें काय, हे काय म्हणून म्हणणारा कर्नल रिप्ले गोळ्यांचे पायसाखाली जमिनीवर कोसळला व मग त्या रेजिमेंटबरोबर असणाऱ्या सर्व अिंग्रजांची अेकसहा कत्तल झाली. अशा रीतीने आपल्या स्वदेशप्रेमावर फिरंगी रक्ताचा शिक्कामोर्तब ठोकून दिल्यानंतर मीरतचे घोडेस्वार खाली अुतरले व दिल्लीच्या शिपायांना प्रेमाने भेटू लागले! ही बातमी कळताच शहरचा काश्मीर दरवाजा अुघडू लागला

व त्या अितिहासप्रसिद्ध दरवाज्यातून ही स्वातंत्र्ययोद्ध्यांची सेना 'दीन' 'दीन' म्हणून गर्जना करीत दिल्ली शहरात प्रवेश करती झाली !

मीरतचें सैन्यातील दुसरी तुकडी अिकडच्या कलकत्ता दरवाजानें घुसू लागली. तो दरवाजा प्रथम बंद करण्यात आलेला होता. परंतु हृया शिपायांची भयंकर धाप पडताच तो हळूहळू मागे सरू लागला व लवकरच त्या दरवाज्यावर असलेले पहारेकरी 'दीन' अशी गर्जना करून बंडवाल्यास आत घेते झाले. कलकत्ता दरवाज्यातून आत घुसलेले हे शिपाअी प्रथम दर्यागंजवरील युरोपियन बंगल्यांकडे वळले व त्या अिमारती अेका क्षणात आगीचे डोंबात बुडून गेल्या. त्यांतील जे अिंग्लिश लोक आगीतून बचावले ते तरवारीला बळी पडले. जवळच अिंग्रजी हॉस्पिटल होतें. त्याने विलायती बाटल्यांना आश्रय दिल्याचें अुघडकीस आलें! विलायती माणसांना आत घेतल्याबद्दल दर्यागंजवरील घराना झालेली शिक्षा पहात असताही या हॉस्पिटलने हृया विलायती बाटल्या आत घेण्याचें धाष्टर्य करावें हें पाहून कोणालाही संताप येणें साहजिकच होतें! त्या हॉस्पिटलला बेदम पिटल्यानंतर ही शस्त्रधारी अुग्रता आपल्या असंख्य अवयवांसह दिल्लीच्या घराघरांतून गोऱ्या रक्ताचा सुगावा घेत चालली ! पण निशाणाशिवाय सैन्य तें कसलें ? व असल्या सैन्याला शोभत्या फडक्यांचीं निशाणें तीं काय अुपयोगी? म्हणून जिथे जिथे गोरें डोकें सापडेल तिथेतिथे तें भाल्यावर टोचून त्यांचें भयानक निशाण 'दीन'च्या तालावर नाचवीत नाचवीत ही अपूर्व सेना पुढे घुसत चालली !

अिकडे दिल्लीच्या राजवाड्यात बादशहाचे नांवाने जयघोष करीत शिपाअी व शहरातील शेकडो लोक घुसू लागले. अेका नजीकच्या दारापाशी रस्त्यातून जखमी होअून पळत आलेला कमिशनर फ्रेझर अुभा होता. त्याला पाहताच मुघुलबेग नांवाच्या मनुष्याने त्याच्या गालावर वार केला. हा अिशारा होताच सर्व बंडवाले धावून आले व जिन्याचे पायऱ्यांवर छिन्नभिन्न झालेला कमिशनर फ्रेझर जाणाऱ्या-येणाऱ्यांच्या पायांखाली तुडविला जाअू लागला. परंतु त्याला तुडवीत शिपाअी तिथेच न थांबता वरती चढून गेले व ज्या खोलीत जेनिंग व त्याचें कुटुंब रहात होतें तिथे जाअून ते कर्दनकाळासारखे अुभे राहिले. अितक्यात कोणी त्या खोलीचें दार लावण्याचा प्रयत्न केल्यावरून अेका धापेसरशी ते दार कडाडले व शिपायांच्या तरवारींखाली तो जेनिंग, त्याची तरुण मुलगी, त्याच्या अिथे आलेली अेक अिंग्लिश स्त्री यांचा सप्पा अुडाला! दिल्लीच्या रस्त्यांतून मरता मरता पळालेला कॅप्टन डग्लस कुठे आहे ? द्या त्याला यमसदनाला धाडून! आणि हे हृया कोपऱ्यात दडलेले कलेक्टरसाहेब? त्यानाही काढा आयुष्याच्या पेन्शनात! आता मात्र दिल्लीच्या राजवाड्यात फिरंगी सत्तेचे नावही अवशिष्ट राहिलेलें नाही. आता जरा स्वस्थ बसण्यास कोणती हरकत आहे ? घोडेस्वारांनी आपल्या घोड्यांना राजवाड्यातील

मैदानात बांधावें व सारी रात्र लांब मजला मारीन आलेल्या शिपायांनी दिवाण-नि-खासच्या राजमहालात आपली बिन्हाडें ठेवून जरासा विसावा घ्यावा.

अशा रीतीने दिल्लीचा राजवाडा लोकसैन्याचे हातीं पडला व आता पुढे काय करावयाचें या विषयावर बादशहा, बेगमसाहेब, व शिपाई लोकांचे पुढारी हे खल करू लागले. पूर्वी ठरलेल्या बेताप्रमाणे ३१ मेपर्यंत थांबणें म्हणजे आता मूर्ख-पणा करण्यासारखेंच होतें. तेव्हा थोडयाशा चंचलत्वानंतर बादशहांनी शांतिपक्षास मिळण्याचें नक्की ठरविलें. हें होतें आहे तोंच मीरतहून बंड करून आलेला तोफ-खान्याचा बराच भाग दिल्लीस येऊन पोचला व त्याने बादशहाच्या सन्मानार्थ व स्वातंत्र्यप्रीत्यर्थ राजवाड्यात येऊन २१ तोफांची सलामी दिली. शिपायांच्या व लोकांच्या कोटिनमानतरही जें थोडेसें चंचलत्व बादशहाचे मनात उरलेलें होतें तें ह्या तोफांच्या गडगडाटाने पार वितळून गेलें व त्या राजकीय सलामीच्या घनगर्जने-बरोबर त्या वृद्ध बादशहाचे अंतःकरणातील अनंत राजतेजें खडबडून जागृत झालीं. त्याच्या त्या भव्य व मानार्ह मूर्तीपुढे फिरंग्यांच्या रक्ताने भरलेल्या तरवारी फिर-वीत फिरवीत शिपायांचे पुढारी म्हणाले, " खाविंद, मीरतला अिंग्लिशांचा पराजय झालेला आहे. दिल्ली आपल्या हाती पडली आहे व पेशावरापासून कलकत्त्यापर्यंत सर्व शिपाअी व सर्व लोक आपल्या हुकमाची वाट पहात आहेत. अिंग्रजांच्या गुलाम-गिरीची बेडी तोडून टाकून आपली निसर्गदत्त स्वतंत्रता मिळविण्यासाठी सर्व हिंदु-स्थान अुठलं आहे. अशा वेळेला हें स्वातंत्र्याचें निशाण आपल्या हाती घ्या म्हणजे हिंदुस्थानातील सर्व लढवय्ये त्याचे सन्मानासाठी मरण्यास तयार होतील! हिंदुस्थान आपले स्वराज्य परत घेण्यासाठी लढू लागला आहे व आता त्याचे पुढारीपण जर आपण स्वीकारलेत तर निमिषमात्रात आम्ही ह्या फिरंगी राक्षसास समुद्रात बुडवून तरी टाकू किंवा त्यांच्या प्रेतांची गिधाडांना मेजवानी तरी देऊ.[२] हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही जातींच्या पुढाऱ्यांचें हें अेकवाक्यतेचें व अुद्दीपक वक्तृत्व अैकून त्या बादशहाला स्वातंत्र्यस्फुरण चढू लागलें. त्याच्या कल्पनेसमोर शहाजहानाच्या व अकबराच्या मूर्ति येऊ जाऊ लागल्या व आता गुलामगिरीत रहाण्यापेक्षा स्वदेशाला स्वतंत्र करीत असताना मरणेंच जास्त श्रेयस्कर आहे अशी दैविक स्फूर्ति त्याच्या हृदयात संचरली! पुढे बादशहाने शिपायांना सांगितलें, " मजपाशी खजिना नाही व तुम्हांस पगार मिळणार नाही " तेव्हा ते शिपाअी म्हणाले, " आम्ही अिंग्रजांचा खजिना लुटू व तो आपल्या खजिन्यात भरू.[३] यावर ' तुमचें पुढारीपण मी स्वीका-रतो' असें अभिवचन त्या वृद्ध बादशहाकडून मिळताच राजवाड्यात जमलेल्या त्या प्रचंड जनसमूहाने अेकच गर्जना केली.

२. Charles Ball, Vol. I, page 74.
३. Metcalfe



राजवाड्यात ही गर्व गडबड चालली असताना बाहेर शहरामध्ये अेकच धुमाकूळ माजलेला होता. दिल्लीतील पेकडो लोक आपआपल्या घरात काय ते शस्त्र सापडेल तें घेअून बडवाल्या शिपायांस मिळत होते व युरोपियन लोकांची कत्तल करण्यासाठी यितस्ततः हिंडत होते. बाराचे सुमारास दिल्लीचे बँकेवर हल्ला चढला. त्या बँकेचा मॅनेजर बेरेग फोर्ड, त्याची पत्नी व त्याची पांच मुले यांना ठार मारण्यात आल्यावर त्या अिमारतीचाही नाश केला. नंतर दिल्ली गॅझेटच्या छापखान्याकडे लोक वळले. मीरतची बातमी छापण्यासाठी तेथील कंपॉझिटर खिळे जुळवीत होते तोंच दारानी 'दीन दीन' म्हणून गर्जना अुठली व क्षणार्धात त्या छापखान्यात जितका खिश्चन होता तितका बरबर चिरला गेला! तेथील खिळे अुपटून टाकण्यात आले, तेथील यंत्रे फोडण्यात आलीं व जें जें फिरंग्याच्या स्पर्शाने अपवित्र झालेले दिसले त्याचा त्याचा धुव्वा अुडवून देअून हा क्रांतीचा भयंकर लोंढा पुढे चालला! परंतु अजून तें चर्च अुभें रहावे व आपल्या या धर्मयुद्धाकडे पहात त्याने बसावे हें अगदीच अनुचित आहे! ह्या चर्चमधून हिंदुस्थानचे दास्य कायम राखण्यासाठी देवाकडे प्रार्थना केलेल्या आहेत. हिंदुस्थानात तुमचें राज्य असणें म्हणजे अत्यंत भयंकर पाप होय असें आपल्या अनुयायांस अेक दिवस तरी या चर्चने सांगितले आहे काय? अुलट असल्या पापाच्या अधिकाऱ्यांचें अैहिक व पारलौकिक संरक्षण करण्यासाठी ह्या पक्षपाती चर्चने आपल्या पंखाचा ह्या जुलमी लोकांना आश्रय दिलेला आहे. अशी ही हिंस्रतेची गुहा आपण आपल्या देशात वाढू दिली त्याचे प्रायश्चित्त गाअीच्या व डुकराच्या रक्तातील काडतुसाचे रूपाने आपणांस मिळालेलेच आहे! अजून तरी सावध व्हा व त्या चर्चचा समाचार घेण्यास आधी तिकडे चला! पहाता काय? फोडा ते क्रॉस– भिंतींच्या अगावरील सर्व कलाटी सोलून काढा, त्या व्यासपीठाचें पीठ करा व बोला 'दीन'! रोज चर्चमध्ये येताना ही घंटा वाजत असते आज आता आपण जाताना तिचा घणघणाट केला पाहिजे! वाज, घंटे वाज! आज तू अितकी वाजत आहेस पण कोणी गोरा तुजकडे का बरें येत नाही? तुला ह्या काळ्या हाताचा स्पर्श आवडतो का? हाताचा स्पर्श आवडत नसेल तर पड खाली. ते आमचे बंधु तुला पायाचा स्पर्श करण्यासाठी बोलावीत आहेत! त्या सर्व घंटा तोडून अेकदम खाली पडताच त्यांच्या टोलेजंग आवाजाबरोबर ते शिपाअी विकट हास्य करून परस्परास म्हणू लागले, 'कैसा तमाशा है! क्या मजा है!'

परंतु अिकडे दुसऱ्या बाजूला ह्याहूनही भयंकर तमाशा चाललेला होता. राजवाड्याचे बाजूला अिंग्रजांच्या लष्करासाठी तयार ठेवलेला अेक जंगी दारूखाना होता. ह्या दारूखान्यात लढाअीत अत्यंत अुपयोगी असलेले सर्व सामान खच्चून भरलेलें होतें. त्यात कमीत कमी ९ लक्ष काडतुसें, आठदहा हजार बंदुका, तोफा व सीजट्रेन भरलेल्या होत्या. हा दारूखाना आपल्या ताब्यात घ्यावा असा बंडवाल्याचा

कृतनिश्चय झाला. परंतु हें काम बिलकूल सोपें नव्हतें. त्या दारूखान्यात असलेले अिंग्लिश लोक मनात आणतील तर तेथे लढण्यास जाणाऱ्या सर्वांना सप्पा अुडविण्यास त्यांना अेक क्षणही लागणार नाही. कारण त्या दारूखान्यास अुडवून देण्यासाठी अेक काडी पेटवून फेकली कीं झालें ! अशा ह्या कामास हात घालणें म्हणजे फारच धोक्याचें होतें. तथापि तो दारूखाना ताब्यात घेतल्याशिवाय क्रांतीचें जीवित अेक क्षणभरही सुरक्षित नसल्यानें तें काम पार पाडण्यास हजारो शिपाअी तयार झाले. त्यांनी त्या दारूखान्याच्या अिंग्रजी अधिकाऱ्यास शरण येण्याविषयी बादशहाचे नावानें निरोप धाडला. परंतु असल्या कागदांच्या चिठोऱ्यांना मान देअून काही अिंग्रजांनी राज्यें संपादन केलेलीं नव्हतीं ! लेफ्टेनंट विलोबी ह्यानें त्या चिठ्ठीला अुत्तर देण्याचा देखील मान दिला नाही. हा अपमान पाहताच खवळून गेलेले हजारो शिपाअी त्या दारूखान्याचे तटावर चढू लागले. दारूखान्याचे आत ९ अिंग्लिश लोक व काही हिंदी लोक होते. तटावर दिल्लीच्या बादशहाचें निशाण फडकलेलें पाहताच हे हिंदी लोक भराभर आपल्या स्वदेशबंधूस येअून मिळू लागले व त्या तटाचे आतून ते ९ अिंग्रज निराशेच्या धाडसानें लढू लागले. शिपायांच्या असह्य माऱ्यापुढे त्या मूठभर अिंग्रजांना कितीवेळ धीर निघणार हें अुघड अुघड दिसतच होतें. त्यांनी वेळ येताच दारूखाना अुडवून देण्याचा निश्चय करून ठेवलेलाच होता. कारण जरी दारूखाना आपण होअून स्वाधीन करण्याचें त्यांनी कबूल केलें असतें तरी त्यांचे जीव शिपायांनी सुरक्षित ठेवले असते अशी त्यांना मुळीच खात्री नव्हती. अिकडे शिपाअीही दारूखाना अुडणार व आपल्या बाजूला प्रचंड हानि होणार हें जाणत असताही सुदून पडतच होते अितक्यात दोन्ही पक्षांकडील लोक ज्या आवाजाची मार्गप्रतीक्षा करीत होते असा हजारो तोफा सुटल्यासारखा जंगी आवाज झाला व त्या दारूखान्यातून आगीचा लोळ आकाशाकडे निघून गेला ! त्या अिंग्लिश वीरांनी तो दारूखाना शत्रूचे ताब्यात न देता स्वत:चे प्राणाची आशा सोडून आपल्या हातानें पेटवून दिला व त्या अेका बारासरशी वडवाल्याचे सुमारें २५ शिपाअी व आजूबाजूच्या रस्त्यातील ३०० माणसें आकाशात अुडून गेली!

परंतु क्रांतिपक्षीयांनी ह्या दारूखान्याचे डोंबात जो जाणून बुजून आपला नाश करून घेतला होता तो काही अुगीच नव्हे. कारण जे लोक ह्या दारूच्या भडक्यात बळी पडले, त्यांच्या आत्मयज्ञानें त्या राष्ट्रक्रांतीस अपूर्व सामर्थ्य आलें. जोपर्यंत हा प्रचंड दारूखाना अिंग्रजाचे ताब्यात होता तोपर्यंत मुख्य कॅन्टोन्मेंटमधले नेटिव्ह शिपाअी आपल्या अधिकाऱ्यांच्या ताब्यात होते. ते आपल्या स्वदेशबांधवावर चालून जात नव्हते, परंतु अिंग्रजाविरुद्ध अुठलेलेही नव्हते. दुपारी ४ वाजण्याचे सुमारास सर्व दिल्ली शहर हलवून सोडणारा आवाज झालेला अैकताच तें कॅन्टोन्मेंटमधले शिपाअी अेकदम अेकत्र झाले व 'मारो फिरंगीको' म्हणून गर्जना करीत अिंग्रजावर

सुटून पडले. मेन गार्ड गॉर्डनला अुडवून दिला. स्मिथ व रेव्हले याना ठार करण्यात आले, व गोरा रंग दिसला की घे त्याचा प्राण असा धडाका अुडाला. शतकानंतर जागृत झालेला राष्ट्रक्षोभ आपल्या अुग्र जबडयाखाली पुरुष, बायका, मुले, घरें, दारें, दगड, विटा, पडशाळें, टेबलें, खुर्च्या, रक्त, मांस अस्थि—ज्याला ज्याला म्हणून फिरंगी स्पर्श झालेला होता त्या त्या सचेतन व अचेतन वस्तूंना अेकसहा भरडीत चालला ! दिल्लीचे बादशहा यांनी अत्यंत मनधीचा हुकूम दिल्यावरुन अखेर बरेच अिंग्रज लोक कत्तलीं न करता राजवाड्यातील कैदेत पोचविण्यात आले. परंतु बादशहाच्या या कृत्याला लोकमत अितकें विरुद्ध होऊं की चारपांच दिवस ओढाताण करता करता अखेर आपल्या ताब्यात असणाऱ्या त्या पन्नास फिरंग्यांस लोकांचे हवाली करुन देणें बादशहांना भाग पडले ! ता. १६ मे रोजी अेका सार्वजनिक मैदानावर ते पन्नास फिरंगी लोक नेण्यात आले. तो देखावा पाहण्यास जमलेल्या हजारो नागरिकांनी त्यांच्या समक्ष फिरंगी राज्याची व अिंग्रजांच्या बेअिमानीपणाची यथास्थित विटंबना केली व मग शिपायां लोकाचा हुकूम सुटताच अेका क्षणात त्या पन्नासाचे तुकडे अुडविले. शिपायाच्या तरवारीचा वार चुकविण्यासाटी अेखाद्या अिंग्रज बाअीने किंवा बोवाने हातापाय पडण्यास आरंभ केला की, 'मीरतच्या बेड्याचा सूड !' 'पारतंत्र्याचा सूड', 'दारुखान्याचा सूड' म्हणून कर्कश गर्जना अुठल्या. ह्या सुडावर पाजळलेली तरवार ते नम्र झालेले भुरके डोकें छाटून फेकून देअी ! ता. ११ मेला दिल्लीस अिंग्रजांचे कत्तलीला आरंभ होअून तिची पूर्णाहुति ता. १६ मेला पडली ! मध्यंतरी दोकडों अिंग्रज लोक आपले जीव वाचविण्यासाठीं दिल्लीहून पळून गेले. कोणी तोंडाला काळे रग फासून नेटिव्हांचीं सोंगें घेतली, कोणी रानावनातून लपत छपत जाताना युन्हाचे तापाने मरुन गेले, कोणी फकिराचीं कफनें पाठ करुन व सन्याशाचीं सोंगे घेअून खेडेगावातून सुटून जाण्याचा प्रयत्न करीत असता तें सोंग फुटल्याने त्या त्या गावकऱ्याकडून ठार मारले गेले. कोणी प्रवास करता करता थकून रस्त्यावर बसले असता शेजारच्या गावकऱ्यांनी 'फिरंगी' म्हणून छाटून टाकले व कोणी अेखादें दयाळू खेडेगाव सापडल्याने त्याचे पाहुणचार घेत घेत मीरतच्या अिंग्रजी छावणीत जाअून सुखरुप पोचले.

ह्या दारुखान्याच्या स्फोटात बडवाल्या शिपायांना मुबलक शस्त्रे मिळालीं व त्यामुळे प्रत्येकाच्या वाटणीला चार चार बंदुका मिळाल्या. अिंग्रजांच्या राज्याबद्दल सर्वत्र अितका त्वेष माजलेला होता की, दिल्लीला जी कत्तल झाली तिची बातमी अैकताच शेकडो खेडेगावानी आपआपल्या शिवारात फिरंग्याचा पाय देखील पडू द्यावयाचा नाही असा कृतनिश्चय केला परंतु या गावात किंवा खुद्द दिल्लीच्या प्रक्षोभसमयीं अेकाही अिंग्रजी स्त्रीच्या पातिव्रत्यावर कोणीही घाला घातलेला नव्हता

हें आता अिंग्रजांचेच चौकशीवरून सिद्ध झालेलें आहे.[४] दिल्लीची कत्तल झाल्यानंतर त्या प्रसंगाच्या 'प्रत्यक्ष पाहिलेल्या हकीकती' म्हणून कित्येक अिंग्रजी धर्माधिकाऱ्यांनी जीं भयंकर वर्णनें केलेली आहेत त्यांतून निंद्य, असत्य व फसवेगिरीचीं विधानें करण्यास आजपर्यंत कोणीही धजलेला नसेल! दिल्लीचे रस्त्यातून अिंग्रजी बायांना नागवें करून हिंडविलें, प्रसिद्धपणें त्यांची अब्रू घेण्यात आली, त्यांचे स्तन कापण्यात आले, लहान पोरींवर जुलूम करण्यात आले, वगैरे अमानुष असत्यें ज्या लोकांचे 'धर्मोपदेशक' प्रसिद्ध करतात त्या अिंग्रजी लोकांस सत्याची चाड जितपत्याम तितकीच असली पाहिजे.[५] सत्तावनची राष्ट्रीय क्रांति हिंदुस्थानातील लोकांना गोऱ्या बायका मिळत नव्हत्या म्हणून काहीं झालेली नव्हती! किंबहुना गोऱ्या बाओचा पाढरा पाय पुन्हा आपल्या घरास लागू नये ह्यासाठीं सत्तावन सालीं राष्ट्रक्षोभ अुद्‌भूत झालेला होता!!

अशा रीतीने मीरतच्या स्त्रियांच्या फूत्कारानें अुठलेल्या या भयंकर वादळाच्या सपाट्यात सापडून अेका पांच दिवसांचे आत हिंदुस्थानात जवळजवळ शंभर वर्षे रुतून बसलेला गुलामगिरीचा विषवृक्ष अुन्मळून पडला! ह्या पहिल्या पांच दिवसांत क्रांतिपक्षाच्या पुढाऱ्यांना जें हें अपूर्व यश मिळालें त्याचें मूळ कारण म्हटलें म्हणजे अिंग्रजांच्या गुलामगिरींतून सुटण्याची अुत्कट अिच्छा ही सर्व जनतेत अुत्पन्न झालेली होती. मीरतच्या बायकांपासून तो दिल्लीचे बादशहापर्यंत सर्वांचे अंतःकरणात स्वातंत्र्याची व स्वधर्मरक्षणाची अनिवार्य अिच्छा प्रादुर्भूत झाल्याने वत्या अिच्छेला गुप्तसंघटनेकडून आधीच व्यवस्थित स्वरूप मिळालेलें असल्याने अेका पांच दिवसांचे आत हिंदुस्थानच्या अितिहासप्रसिद्ध राजधानीत स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा झाली. ता. १६ मे रोजी दिल्लीमध्ये फिरंगी सत्तेचें अेकही चिन्ह अवशेष राहिलेले नव्हतें. अिंग्रजी वस्तूंचा दिल्लीला अितका तिटकारा आलेला होता की कोणी अिंग्लिश भाषेचा अेखादा शब्द अुच्चारला की त्याला वेदम चोप मिळे! अिंग्रजांच्या निशाणाचे तुकडे रस्तोरस्ती तुडविले जात होते व आपल्या आजपर्यंतच्या अपमानाचे डाग दास्याच्या अुष्णोष्ण रक्ताने धुअून स्वच्छ झाले ते स्वराज्याच निशाण त्या प्रचंड क्रांतीचे मस्तकावर डुलू लागलें होतें! ही स्वातंत्र्याची अूर्मि अितकी प्रबळ होती की, ह्या पहिल्या पाच दिवसांत देशद्रोहीपणाचा दिल्लीला कोठेही विटाळ झाला नाही. पुरुष व बायका, श्रीमंत व गरीब, तरुण व वृद्ध, शिपाअी व नागरिक, मौलवी व

४. " However much of cruelty and bloodshed there was, the tales, which gained currency, of dishonour to ladies were, so far as my observation and enquiries went, devoid of any satisfactory proof." Hon. Sir Wm Muir, K.C.S.I., Head of the Intelligence Dept.

५. Charles Ball Vol. I, page 105.

पंडित, हिंदु व मुसलमान सर्वजण स्वदेशाच्या निशाणाखाली आपआपलीं शस्त्रास्त्रें अुपसून परसत्ताच्या दास्यावर हल्ला चढवीत होते ! अशी विलक्षण स्वदेशप्रीति व स्वातंत्र्यप्रीति अुचंबळलेली होती व परसत्तेचा असा पक्का तिटकारा अुत्पन्न झालेला होता म्हणूनच मीरतच्या वायकांचे वार्णातून दिल्लीचें सिंहासन प्रादुर्भूत झालें !

हे पांच दिवस हिंदुस्थानच्या अितिहासात भदोदित चिरस्मरणीय असोत ! कारण महमद गिजनीच्या स्वाऱ्यापासून सुरू झालेलें हिंदु व मुसलमान यांचें प्रचंड युद्ध संपल्याची द्वाही ह्या पांच दिवसांनी फिरविली ! हिंदु व मुसलमान यांच्यातील परकेपणा जाअून व त्यांच्यातील अितजेतृत्वभाव नामशेष होअून त्यांचे भावा-भावांचे नातें ह्या दिवशी जगजाहीर झालें ! मुसलमानांच्या पारतंत्र्यातून श्रीशिवराज, प्रतापसिंह, छत्रसाल, प्रतापादित्य, गुरुगोविंदसिंग व महादजी शिंदे यांनी मुक्त केलेल्या भारतमातेने " यापुढे तुम्ही समसमान व सहोदर आहात व मी तुम्हा दोघांची जन्मदात्री आहे " हा दिव्य मंत्र ह्या दिवसांत अुच्चारला ! हिंदुस्थान हा आपला स्वदेश आहे व आपण सर्व सख्खे भाअी आहोत अशी गर्जना करीत हिंदु व मुसलमानांनी समसमानतेने व अेकमताने दिल्लीचे तक्तावर स्वराज्याचे अुभयसंमत निशाण त्या दिवशी अुभारलें ! ते हे पाच दिवस हिंदुस्थानच्या अितिहासात चिरस्मरणीय असोत !

ह्या पांच दिवसात लोकसत्तेचा हिंदुस्थानात प्रथमोदय झाला ! आपल्यावर कोणी राज्य करावे ह्या प्रश्नाचा निर्णय लावण्याचे काम लोकपक्षाचे आहे ह्या संवेदनेचा जन्म हिंदुस्थानात ह्या पाच दिवसात झाला ! लोकपक्षाने फिरंग्यांचे दास्य झुगारून दिले व लोकपक्षानेच स्वसंमत अशा पुरुषार्थाची राज्यसिंहासनावर योजना केली. लोकांना जो पसंत असेल त्यांचेच राज्य स्वदेशावर असावें ही भावना, व राजकारण हें लोकपदाचे कर्तव्य आहे ही चेतना हिंदुस्थानच्या शरीरांत ह्या पाच दिवसात अुदय पावली लोकपदाची ही जयंती हिंदुस्थानचे अितिहासात अविस्मरणीय असो !

* * *

प्रकरण चौथे

# मध्यन्तर व पंजाब

दिल्ली स्वतंत्र झाल्याची बातमी विद्युद्वेगाने पसरत असता तिच्या आकस्मिकतेने सर्व हिंदुस्थानभर स्वकीयास व परकीयास क्षणभर स्तिमित करून सोडलें. अिंग्रजांना तर आपण अैकतो आहोत त्याचा अर्थ काय हेही झटकन ग्रहण करता येअीना सर्व देशभर शांतता नांदत आहे अशा खात्रीने कलकत्त्यास लॉर्ड कॅनिंग

घोरत पडले होते व अिकडे कमान्डर-अिन-चीफ ॲन्सन सिमल्याच्या थंड हवेत जाण्यासाठी सजलेले होते. त्यांना प्रथमतः जेव्हा दिल्ली स्वतंत्र झाल्याची अेक तुटक तार आली तेव्हा त्या तारेचा अर्थही धड त्यांच्या ध्यानात येअीना! ही बातमी अैकून अिंग्रजांची तारांबळ अुडाली तितकीच विस्मयाने स्तिमित झालेल्या सर्व हिंदुस्थानी लोकांचीही अुडालेली होती. कारण दिल्लीच्या या अकल्पनीय अुठावणीने क्रांतिरचनेची सर्व घडी विस्कळीत झाल्यासारखें झालेलें होतें व दिल्लीच्या चढाचे दिवशी अेकदम घाला पडल्याने घाबरून गेलेल्या अिंग्रजांच्या हातून जे लष्करी प्रमाद घडले ते आता पुन्हा घडण्याचा संभव नव्हता. ह्या आकस्मिक धक्क्याने सावध झालेल्या अिंग्रज लोकांना भावी संकटाची सूचना मिळाल्याने त्या संकटांचें परिहरण करण्याची संधि सापडली. अकल्पित घाला पडल्याने दिल्लीचें सिंहासन जसें अेक दोन दिवसांत त्यांच्या हातून हिसकून घेता आलें, तसेंच ता. ३१ मेला पूर्वसंकेताप्रमाणे अेकमभयावच्छेदेकरून जर सार्वत्रिक स्फोट झाला असता तर सर्व हिंदुस्थानचें सिंहासन पहिल्या धडाक्यासरशी हाती घेता आलें असतें. परंतु तो बेत ह्या मीरतच्या अुठावणीने जरी फसला होता, तथापि दिल्ली ताब्यात आल्याने वडाला राज्यक्रांतीचें स्वरूप मिळून सर्व हिंदुस्थानभर या अतर्क्य वार्तेने अेक विलक्षण चेतना अुत्पन्न झालेली होती. आता या चेतनेचा फायदा घेअून अेकदम अुठावें की पूर्व संकेताप्रमाणे ३१ मेपर्यंत वाट पहावी? दिल्लीच्या अुठावणीची वार्ता अैकून अितरत्र काय बेत चाललेला आहे? दिल्लीच्या घाअीमुळे जसा हा घोटाळा झाला तसाच अितर ठिकाणांची संमति घेतल्याशिवाय आपणही अुठावणी केली असता आणखी घोटाळा माजणार नाही कशावरून? अशा अनेक विचारांच्या अनिश्चिततेमुळे क्रांतिकारक पुढाऱ्यांना काय होतें तें पहात ठिकठिकाणी थांबून बसणें भाग पडलें. मंदपणासारखें क्रांतीला प्राणहरण करणारें दुसरें विष नाही. क्रांतीचा विस्तार जितका त्वरित व जितका आकस्मिक होअील तितका तिच्या जयाचा संभव जास्त वाढत असतो. ही विस्ताराची त्वरा शिथिल झाली म्हणजे शत्रूला सरसावण्याची संधि मिळते. जे आधी अुठतात त्यांचा आपल्याबरोबर कोणी येत नाही हें पाहून अुत्साह घटू लागतो व जे मागून येणार त्यांच्या मार्गात मधल्या संधीचा फायदा घेणारा धाणाक्ष शत्रु अनेक विघ्ने रचून ठेवतो. म्हणून अुठावणी व प्रसार यांच्यामध्ये फार वेळ जाअू देणें हें क्रांतियुद्धाला सदोदित अपायकारक होतें. तथापि होता होअील तितकें अेकदम अुठावयाचें ठरलेलें असतानाही मध्येच येअून पडलेल्या दैवामुळे ठिकठिकाणच्या क्रांतिकारक पुढाऱ्यांना धड थांबवताही येअीना वा धड अुठताही येअीना!

क्रांतिकारक पक्षाच्या ह्या अपरिहार्य स्तब्धतेचा अिंग्रजांना फारच फायदा झाला. अिंग्लिशांचा पाय हिंदुस्थानला लागल्यापासून आजपर्यंत त्यांना असो भयंकर वार्ता अैकण्याचा प्रसंग कधीही आलेला नव्हता. ह्या मे महिन्यात बराक-

पूरपासून थेट आग्र्यापर्यंत म्हणजे सुमारे सातशेपन्नास मैलात काय ती अेक गोरी रेजिमेंट होती ! अशल्या स्थितीत क्रांतिकारक पक्षाच्या पूर्वसंकेताप्रमाणे जर हा सर्व प्रदेश अेकदम अुठला असता तर दहा अिंग्लंडें अेकत्र झालीं असती तरी हिंदुस्थान ताब्यात ठेवता येते ना ! ही गोरी रेजिमेंट दानापुरास ठेवलेली होती. तिकडे पंजाबमध्ये मरहद्दीवर बरेच गोरें सैन्य होतें. परंतु तें तिकडेच ठेवणें भाग होतें. अशा स्थितीत लॉर्ड कॅनिंगचा पहिला प्रयत्न म्हणजे गोरें सैन्य जमवेल तितकें जमविणें हा होता. त्याच वेळेस अिंग्रजांचे सुदैवानें अिराणची लढाओ मदली होती. तेव्हा त्या सैन्यास हिंदुस्थानात लवकर येण्याविषयी हुकूम सुटला. अिराणची लढाओ सपताच अिंग्लिशांनी चीनशी कुरापत काढून तिकडे फौज चालविली होती. परंतु हिंदुस्थानात हें भयंकर वादळ सुटताच कॅनिंगने तें चीनवर जाणारें सर्व सैन्य मध्येच ठेवून घेण्याचा निश्चय केला. या दोन सैन्याशिवाय रंगूनकडे असलेली गोरी रेजिमेंटही कलकत्त्यास ठेवून घेतली व मद्रासच्या गव्हर्नरकडे पायदळाची ४३-वी व मद्रास फ्युझिलियर ह्या गोऱ्या फौजा सज्ज राखावयास लिहिलें.

हें गोरें सैन्य सर्व दिशांकडून शक्य तितक्या त्वरेने कलकत्याकडे लोटत असता कॅनिंगने शिपायांचे मनास पुन्हा अेकदा ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न केला. तुमच्या जातिविषयक व वर्णविषयक रीतींत हात घालून हिंदुस्थानातील धर्मास दुखविण्याचा आमचा मुळीच अिरादा नाही. काडतुसें पाहिजे तर ज्या त्या शिपायांनी आपआपल्या हाताने बनवावीं. कंपनीचें मीठ ज्यांनी खाल्लेलें आहे त्यांनीच तिच्यावर अुठणें हें पाप आहे वगैरे बातांनी भरलेला अेक जाहिरनामा काढून तो प्रत्येक प्रांतात, शहरात व खेड्यात लावण्यात आला. परंतु असल्या जाहिरनाम्याकडे कोण बघतो ! हिंदुस्थानात अिंग्रजांना जाहिरनामे काढण्याचा हक्क असावा कीं नसावा हाच जिथे वाद पडला आहे तिथे नवीन जाहिरनामे काढणें म्हणजे तो वाद मिटविणें नसून त्याला चिरडीस नेणे होय. हिंदुस्थानाला आता हे जाहिरनामे वाचण्यास वेळ नाही. कारण दिल्लीकडे त्याच वेळीं निघालेल्या दिव्य जाहिरनाम्याकडे सर्वांचे डोळे लागलेले आहेत ! अेकाच समयी दोन जाहिरनामे निघाले—कलकत्त्यास गुलामगिरीचा व दिल्लीस स्वातंत्र्याचा ! हिंदुस्थानाला त्या वेळीं दिल्लीचा जाहिरनामा आवडला व म्हणून कॅनिंगने लेखणी मोडून टाकून कमान्डर-अिन चीफला दिल्लीवर अत्यंत त्वरेनें तोफा लावण्याचा हुकूम सोडला !

कमान्डर-अिन-चीफ अॅन्सन हा सिमल्यास असताना त्याला दिल्लीच्या अुठावणीची तार मिळाली. ती वाचून पुढे काय करावें ह्या विचारात तो पडला असता कॅनिंगनें त्याला दिल्ली तावडतोब घेण्याचा हुकूम सोडला. बडवाल्याच्या वेताचें किंवा शक्तीचें अिंग्लिशांना अितकें विलक्षण अज्ञान होतें की, दिल्ली अेका आठवड्यात घेता येअील व अेकदा दिल्ली पडली तर त्या महिन्याचे शेवटी बडाचा मोड होअून जाअील अशी त्याना अत्यंत खात्री वाटत होती. पंजाबचा मुख्य अधिकारी

सर जॉन लॉरेन्स ह्यानेही दिल्ली हस्तगत करण्याविषयी ॲन्सनला निकडीचे निरोप धाडले. परंतु दिल्ली घेणें म्हणजे काय याची कॅनिंग व लारेन्स ह्यांच्या पेक्षा थोडीशी जास्त बरोबर कल्पना त्या ॲन्सनला असल्याने योग्य साहित्य जमविल्याशिवाय दिल्लीकडे वळावयाचें नाही असे त्याने धोरण धरलें. सिमल्याची हवा सोडून देऊन अंबाल्यास मुख्य सैन्याचे ठाण्याकडे ॲन्सन आला न आला तोंच तिकडे सिमल्यावर अेक दिवस अेकच गर्दी अुडाली ! गुरख्यांच्या नासिरी बटॅलियनने बंड केल्याचें कळताच सिमल्यावर असलेल्या अिंग्लिशांचा सर्व धीर सुटला. त्या साली सिमल्याला देखील अिंग्लिशांना न सोसवेल अितका अुष्मा सुरु होता ! सिमल्याच्या हवेशीर बांधलेल्या बंगल्यांतून व वृक्षांच्या बागांतून आजपर्यंत वाढलेल्या राजविलासाचें आता मात्र भयंकर भाडें द्यावें लागेल असा रंग दिसू लागला ! गुरखा पल्टण आली रे आली असा अेकच गलका होअून गोरीं बायका व मुलें वाट सापडेल तिकडे पळत सुटली. या शर्यतीत अिंग्लिश पुरुषानी बायकाना अर्धातच हा हां म्हणता मागे टाकले व तेंही आपल्या सामानाची बोचकीं पाठीशी बांधलेली असताना ! अिंग्रजी धैर्याचे हे प्रदर्शन दोन दिवस सारखें अुघडें ठेवलेले असतानाही जेव्हा गुरखे लोक मेजीनात तेव्हा नाजिलाजाने तें बंद करण्यात आलें ! मात्र सुमारास कलकत्यासही रोज असेच प्रसंग घडत असत. कलकत्या-जवळ बराकपूरला असलेल्या नेटिव्ह रेजिमेंटने बंड केल्याची अफवा हरहमेश अुठे व अिंग्लिशांच्या बायका, मुलें व पुरुष रस्त्यांतून पोर्टकडे धावत सुटताना दिसू लागत. कित्येकानी अिंग्लंडचे तिकिट काढून आणावे, कित्येकानी आपली बोचकी अगदी बांधून पोर्टकडे पळण्यासाठी सज्ज ठेवावी व कित्येकानी आफिसातील कामें टाकून कोपऱ्याकोपऱ्यात दडत फिरावें ! असा मीरतचा धाक बसलेला होता, असा दिल्लीचा धाक बसलेला होता – तरी अजून अिंग्लिशांचे कानपूर झालेलेच नव्हतें !

कमांडर-अिन-चीफ ॲन्सन हा अंबाल्याला येताच त्याने दिल्लीला वेढा घालण्यासाठी सीजट्रेन तयार करण्यास आरंभ केला हिंदुस्थानावर आजपर्यंत खरें संकट असें कधींही न आल्यामुळे अिंग्रजांच्या शक्तीची झाकलेली मूठ सव्वा लाखाची वाटे. परंतु आता ती अुघडण्याचा प्रसंग आल्याने तिच्या सव्वा लाखाची दिसून आलेली हलाखी केवळ शोचनीय होती. ॲन्सनला कोणच्याही प्रकारची जलदी करणें अशक्य होअून गेलें अिंग्रजांच्या काळचा शिपायाना चल म्हटलें की, चाल-विता येत असे परंतु आता गोऱ्या शिपायाना तसे तुम्ही चल म्हणून कसें चालणार ! त्यांच्या अेकेकाचा दिमाख व त्याची आजपर्यंत वाढत आलेली मिजास आता अेक-दम कुठली सुटायला ! त्यातही पूर्वीप्रमाणे आता नेटिव्हांकडून प्रत्येक प्रकारचें साह्य मिळणें पूर्ण अशक्य झालेलें ! गाड्या मिळेनात, मजूर मिळेनात, रसद मिळेना जखमी लोकाना डोली मिळेना ! ॲड्ज्युटंट, क्वार्टर मास्तर, कमिसारी, मेडिकल चीफ जो तो आपआपल्या खात्यातील सज्जतेच्या अेवजी नकारघंटेचा घणघणाट करू

लागला. हिंदुस्थानातील लोकांच्या आश्रयाशिवाय अिंग्रजी राजसत्ता कशी धुळीवरचें सारवण आहे! सत्तावन साली या हिंदुस्थानच्या भरडलेल्या धुळीन जरा चैतन्य येअू पाहताच अिंग्रजाना अंबाल्यापासून दिल्लीपर्यंत हलण्याची मारामार पडली. कारण " Natives of all classes stood aloof, waiting and watching the issue of events. From the capitalists to the coolie all shrunk alike from rendering assistance to those whose power might be swept away in a day."[१]

आणि हिंदुस्थानातील ' नेटिव्ह ' जर अशेच स्तब्ध राहिले असते तर वरील लेखक म्हणतो, त्याप्रमाणे खरोखरच अेका दिवसात अिंग्रजांची सत्ता झुगारून देता आली असती. परंतु सत्तावन साली तो दिवस अुजाडणारा नव्हता. सत्तावन साल ही त्या दिवसाच्या पहाटेची रात्र होती. ज्यांना ती भावी पहाट दिसू लागली ते झोपा टाकून अुठले. परतु ज्यांना ती तत्कालीन रात्रच दिसली ते आपलें गुलामगिरीचें हिसकले गेलेलें पांघरुण आणखी जवळ घेअून स्वस्थ झोपी गेले. या झोपाळू लोकांत अगदी कुंभकर्णाचा मान पटकावणारे लोक म्हणजे पतियाळा, नाभा व झिंद हीं तीन संस्थानें होत ! ह्या संस्थानांच्या हातात सत्तावनच्या क्रांतीचें तारण किंवा मारण होतें. हीं संस्थानें दिल्ली व अंबाला ह्यांच्या दरम्यान असल्यानें त्यांच्या आधाराशिवाय अिंग्लिशांची पाठ बिलकूल सुरक्षित राहणारी नव्हती. हीं संस्थानें अितर संस्थानाप्रमाणे जरी नुसती स्तब्ध राहिलीं असतीं तरीही क्रांतीला यश येण्याच्या बराच संभव होता परंतु पतियाळा, झिंद व नाभा ह्या तिघानीही अिंग्रजापेक्षाही जास्त क्रूरतेने सत्तावनच्या राज्यक्रांतीवर घाव घालण्यास जेव्हा आरभ केला तेव्हा पंजाब व दिल्ली ह्या दोन भागाची ही साखळी अेकदम तुटल्याने त्या क्रांतीच्या अवयवातील सगति क्षणार्धात नष्ट झाली. या संस्थानांनी दिल्लीचे बादशहाकडून आलेल्या आमंत्रणाचा धिक्कार केला त्या आमंत्रणासाठी आलेल्या स्वारांना ठार मारले, स्वतःचे खजिन्यातून अिंग्रजावर पैशाची सतत धार धरली, स्वतःचें सैन्य अुभारून ज्या प्रदेशातून अिंग्रजी सैन्य जाणार होतें तो प्रदेश सरक्षण केला, दिल्लीवर अिंग्रजावरोबर चालून गेले व पजाबातील क्रांतिकारक मंडळी जेव्हा दिल्लीच्या स्वदेशी निशाणाला तोलून धरण्यासाठी घरेदारे सोडून धावत आली तेव्हा त्याचा अत्यत क्रूर रीतीनें या शीख संस्थानानी — या गुरु गोविंदाचे चेल्यांनी छळ व वध केला ![२]

---

१. Kaye's Indian Mutiny Vol. II

२. या हकीकतीपेक्षा जास्त हृदयद्रावक हकीकत सत्तावनचे क्रांति युद्धात सापडणें मुष्कील आहे ! ज्या प्रदेशातून अिंग्रजाना संरक्षण मिळे त्याच प्रदेशात स्वधर्म व

(टीप पुढील पानावर चालू)

पतियाळा, नाभा व झिंद यांचें साह्य मिळण्याची खात्री होताच इंग्रजांना विलक्षण धीर आला. पतियाळाचे राजानें आपल्या भावाबरोबर उत्तम लष्कर व तोफा देऊन त्याला ठाणेश्वरचा रस्ता रोखण्यास धाडून दिलें व झिंदचे राजानें पानपतचें ठाणें ताब्यात ठेवलें. हीं दोन अत्यंत महत्त्वाचीं ठाणीं अशा रीतीनें परस्पर रोखलीं गेल्यानें अंबाल्यापासून दिल्लीपर्यंतचे रस्ते व पंजाबचें अव्याहतचें दळणवळण ह्या दोन अत्यंत नाजूक गोष्टी संरक्षण केल्या गेल्या व कमान्डर-अिन-चीफनें ता. २५ मेला अंबाला सोडून दिल्लीकडे येण्यासाठी स्वतः कूच केलें. परंतु दिल्ली स्वतंत्र झाल्याची बातमी अैकल्यापासून त्या धक्क्यानें अॅन्सन हा अगदी हताश झालेला होता. त्यातूनही सिमल्याच्या थंड हवेत आजपर्यंत त्याला कधीही कल्पना आलेली नव्हती, अशा हिंदुस्थानी अुन्हाळ्यात आता त्याला अेकसारखें तळपावें लागत होतें. या मानसिक व शारीरिक चिंतेनें कृश झालेला तो कमान्डर-अिन-चीफ कर्नालपर्यंत येतो न येतो तोच ता. २७ मे रोजीं कॉलऱ्याचे आजारानें मरण पावला! त्याच दिवशी त्याच्या नजीकचा अधिकारी बर्नार्ड ह्यानें कमान्डर-अिन-चीफच्या अधिकाराचा चार्ज घेतला.

अशा रीतीनें जुन्या कमान्डर-अिन-चीफला पुरून टाकून हें अिंग्रजी सैन्य नव्या कमान्डरचे हाताखाली दिल्लीवर कूच करीत निघालें. त्या वेळेस त्या सैन्यांतील अिंग्रजी शिपायांना अितका अुत्साह होता की, आपण सकाळीं लढाओ देऊन सध्याकाळीं दिल्ली शहरात शत्रूचें रक्त घटाघट पिअू अशी बढाओ ते अुघड मारू लागले! हें सैन्य अंबाल्याहून दिल्लीवर येत असता गोऱ्या शिपायांच्या काळ्या अंतःकरणांत किती हालाहल साठविलेलें असते ते सर्व जगास दाखवीत होतें! मीरतच्या नेटिव्ह सैन्याचें काय? ते बोलून चालूनच 'काफीर (Heathen)' होत. त्यांनी काडतुसांच्या बनावटीत हाडें चुरल्याच्या कंड्यावर विश्वास ठेवून मीरतला व दिल्लीला निरपराध अिंग्रजांच्या कत्तली केल्या हें नेटिव्हांच्या देशाच्या व धर्माच्या 'रानटीपणा'चें द्योतक होय हे अुघडच आहे! परंतु ह्या अुघडघासाठी जे झाकलेलें आहे त्याचें आविष्करण मात्र कधीही न होवो कारण नाहीतर काफिरांपेक्षा, ख्रिश्चन कड्याहून विश्वसनीय वार्ता व रानटीपणाहून सुधारणा यांनाच परमेश्वर जास्त धिक्कार करू लागेल व ती घाण धुअून काढण्यासाठी त्याला रक्ताचे पाअूस पाडावे लागतील!

(टीप मागील पानावरून चालू)

स्वराज्य यासाठीं हातावर शिर घेणाऱ्या स्वकीयांना नुसता रस्ताही मिळू नये, अितकेंच नव्हे तर त्यांच्यातील हजारो लोकांना शत्रूहूनही जास्त छळ करीत ठार मारलें जावें! ह्या अमानुष पापाचें प्रायश्चित्त हिंदुस्थानचे अितिहासात कधी घडेल ते घडो! या छळाची हकीगत "Two Native Narratives of the Mutiny in Delhi" मध्ये पहावयास मिळेल.

अंबाल्याहून दिल्लीकडे येताना हजारो खेडेगावांत ज्याच्या ज्याच्यावर हात टाकता येअील तों तों हिंदी माणसें अेकगठ्ठा धरण्यास येत व लगेच अेका अर्ध्या तासात कोर्ट मार्शलपुढे त्यांना रांगेत अुभे करून, गरगच्ट फाशीच्या शिक्षा ठोठावून, नाना प्रकारनें छळ करून ठार मारण्यात येअी! मीरतला देखील नेटिव्हांनी अिंग्रजांना ठार मारलें होतें! पण ते फार रानटीपणानें अेका घावासरशी मारलेलें होते. परन्तु अिंग्रजांनी ती चूक सुधारली हें फार चांगलें केलें! त्यांनी कोर्टमार्शलपुढे नुसत्या दृष्टिपाताबरोबर फाशीची गरगच्ट शिक्षा ठोठावलेल्या शेकडो लोकांचे, त्यांच्या फाशीचे खांब जिकडे अुभारले जात असतानाच अिकडे अनन्वित हाल करू लागावें, त्यांचे हृदयांचे केस तटातट तोडावे, त्यांच्या अंगाला बेयोनेटांच्या टोकांनी आरपार भोंके पाडावीं, व नंतर या सर्व छळाला किंबहुना प्रत्यक्ष मरणालाही ज्यापुढे त्यांनी आनंदानें जवळ केलें असतें तें भयंकर पाप त्यांनी त्यांच्याकडून करवावें. गोऱ्या शिपायांनी त्या गरीब, सात्त्विक व निरपराधी हिंदु लोकांचे तोंडात, ते फाशीवर चढण्यास तयार झालेले असताही, बळजोरीनें गाअीचें कच्चें मांस चेचून चेचून भरावें![३]

पण हो, ते कोर्ट मार्शल म्हणजे काय प्रकरण होतें हें रानटी वाचकांस सांगायचेंच राहिलेंच! खेडेगावातील निरपराधी लोकांना शेकड्यांनी धरून आणलें म्हणजे त्यांचा ' न्याय ' करण्यात येअी. ह्या न्यायाचें बाळकडू युरोपियन राष्ट्रांना पूर्वीपासूनच मिळालेलें आहे. नेदर्लंडमध्ये राज्यक्रांति सुरू असताना अल्व्हानेही अशेच अेक न्यायासन स्थापलेले होते. त्या न्यायासनावरील चौकशी अितकी लक्षपूर्वक चाले की, तेथील न्यायाधीश मध्येच झोपी जाअी व शिक्षेची वेळ येताच त्याला हलवून जागें केलें म्हणजे जितके कैदी पुढे दिसत तितक्याकडे अेक गंभीर नजर टाकून तो म्हणत असे ' चढवा याना फाशी '! ह्या नेदर्लंडच्या अितिहासात ग्रथित असलेल्या ' यमासनाला ' अिंग्रजांनी बरेच सुधारून वाढविलेलें होतें, यात काही शंका नाही. कारण त्यांचे न्यायाधीश झोपी बिल्कूल जात नसत अितकेच नव्हे तर कोर्ट मार्शलवर नेमणूक होण्याचे आधी त्यांना अशी शपथ घ्यावी लागे की, आम्ही निरपराधी वा अपराधी हा भेद न मानता सर्वांना फाशीची शिक्षा देअू![४]

---

3. History of the siege of Delhi.

४. Officers as they went to sit on the court martial swore that they would hang their prisoners, guilty or innocent and, if any dared to lift up his voice against such indiscriminate vengeance he was instantly silenced by the clamours of his angry comrades. Prisoners condemned to death after a hasty trial were mocked at and tortured by ignorant privates before their execution which educated officers looked on and approved."

' History of the Sepoy War ' by Holmes, page 124.

अशी पवित्र शपथ घेऊन अिंग्रजी माणसें निरपराधी नेटिव्हांना फाशीवर चढविण्या-साठी जिथे न्याय करतात त्या स्थलाला अिंग्रजी भाषेत कोर्ट मार्शल असें म्हणतात !

मीरतला व दिल्लीला मारल्या गेलेल्या मूठभर अिंग्रजी लोकांसाठी हजारो निर-पराधी लोकांवर असा राक्षसी सूड अुगवीत अुगवीत कमान्डर बर्नार्ड हा दिल्लीजवळ जाण्याचे आधी मीरतच्या शिल्लक राहिलेल्या गोऱ्या फौजेला मिळण्याची वाट पहात होता. मीरतला अिंग्रजांची पुष्कळ फौज होती हे मागें सांगितलेलेंच आहे. ती फौज अंबाल्याहून निघालेल्या फौजेला मिळण्यासाठी खाली अुतरत होती. परतु ह्या दोन फौजांची भेट होण्याचे आधीच त्याच्याशी दोन हात करण्यास बडवाले दिल्ली-हून पुढे आलेले होते. हिंदन नदीच्या काठी अुभयतांची गाठ ता. ३० मे रोजी पडली. बंडवाल्यांची अुजवी बाजू तोफांनी सुरक्षित होती. तेव्हा त्या बाजूकडे तोंड देण्याचा प्रयत्न करण्यात अिंग्रजांना यश येअीना. अुजवीकडे तोफांचें व बेयोनेटांचें झुंज चांगलेंच जुंपलें आहे अितक्यात अिंग्रजांच्या माऱ्यापुढे बिलकूल अुभे न राहता बंडवाल्यांची डावी बाजू अुघळू लागली. हे पाहताच त्यांच्या रांगात घोटाळा झाला व पाच तोफा शत्रूच्या हाती सोडून देअून ते दिल्लीकडे परत फिरले. या पहिल्या लढाअीत बंडवाल्यांनी केलेल्या पिछेहाटीचें अपयश पाहण्यास जगण्यापेक्षा अकराव्या रेजिमेंटमधल्या अेका शूर शिपायाने तत्काल मरण पत्करलें. अितरा-कडून त्याची कर्तव्यें होवोत वा न होवोत, परंतु आपण मरणाचे आधी जिवाचें काहीतरी सार्थक करावें अशा अुदात्त स्फूर्तीनें त्या अकराव्या रेजिमेंटमधल्या शिपायाने अिंग्रजांच्या हाती तोफ पडणार असें पाहताच जाणून बुजून तोफ व दारू-खान्यात बंदूक झाडली. त्या योगानें त्याचा जगी भडका होअून त्यात कॅप्टन अँड्रयूज व त्याचे सर्व सायीदार जळून खाक झाले व कित्येक अिंग्रज जखमी होअून खाली पडले ! स्वदेशभूमीला अितकी शत्रुशिरकमळें वाहिल्यावर तो देशवीर आपलेंही शिरकमल तिच्या नेवेला अर्पण करता झाला ! दिल्लीमध्ये दारूखाना अुडविल्या-बद्दल कॅप्टन विलोबीच्या स्तुतिस्तोत्रांत जसे अिंग्रजी अितिहासकार रंगून जातात, तसेंच केवळ राष्ट्रकार्यार्थ प्राण देणाऱ्या या शूर शिपायाच्या स्तुतिस्तोत्रात त्याच्या देशबंधूंनी रंगावयास नको काय ? परतु या शहीदाच नावही अितिहासास माहीत नाही ! या देशवीराबद्दल के म्हणतो, " It taught us that among the mutineers there were brave and desperate men, who were ready to court instant death for the sake of the national cause! "५

ह्या पहिल्या लढाअीत अिंग्लिशांचा अितका पूर्ण जय झाल्याने कलकत्त्या-पर्यंत आता दिवसा दोन दिवसात दिल्ली पडणार म्हणून पोस्टानें त्या बातमीची चौकशी होअू लागली; परतु खरा प्रकार किती निराळा होता ! ह्या अभूतपूर्व,

५. Kaye's History of the Indian Mutiny, Vol. II, page 138

आकस्मिक व विस्कळीत आतियुद्धाचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहताच त्याचा धक्का सोसून त्याच्यावर आपला पगडा बसविण्याची सुबी व हिंमतही जरी पहिल्या धडाक्यात अुत्पन्न झालेली नव्हती, तरी आपल्या स्वदेशाला स्वतंत्र केल्याशिवाय आता जीवनात जीव आहे तोपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाही ही अिच्छा मात्र अत्यंत अुत्कटतेनें दिल्लीतील हजारो नागरिकांचे हृदयात अुचंबळलेली होती; व म्हणूनच ता. ३०-चा पराजय मोमल्याबद्दल सारी रात्र नागरिकांनी धिक्कृत केलेले शिपाओी पुन्हा ता. ३१ मेला बाहेर पडले. बंडवाल्यांच्या तोफांचा जबर मारा सुरू होताच अिंग्रजांनीही आपला तोफखाना सुरू केला. बंडवाल्यांच्या तोफा आज चांगल्या शिस्तीनें व निकरानें मारा करीत असल्यामुळे अिंग्रजांकडे प्राणहानिही बरीच होअू लागली. त्यातूनही ते मे महिन्यातील सूर्यकिरण अिंग्रजांना फार असह्य होअू लागले. अिंग्रजांनी कालच्याप्रमाणे हल्ला चढविण्याचाही प्रयत्न केला. पण तो चांगला सफल होअीना. असेर मध्याकाळच्या वेळेला शेवटचा हल्ला करण्यासाठी अिंग्रज निघाले. यापुढे त्यांना अटकाव करणें कठीण जाओीलसें पाहताच बंडवाल्यांनी तोफांची अेक भयंकर फेर झाडली व त्या फैरीनें अिंग्लिशांची विस्कळीत झालेली आघाडी पुन्हा जमवाजमव करते तोंच त्यांनी आपल्या तोफा सभाळीत सभाळीत रणांगण सोडून दिले. काही हरकत नाही; अेका दिवसात काही थोडी सुधारणा झाली असे नाही! अुद्या आणखी असा तिसरा अेक पराजय जरी घेतला तरी देखील अिंग्रजांची धूळधाण अुडेल. कारण आता त्यांच्यात बंडवाल्यांशी लहान झटापट करण्याअितकेही सामर्थ्य अुरलेले नाही! जूनची पहिली तारीख अुजाड-ताच अशा विवंचनेत पडलेल्या अिंग्रजी कँपचे मागून अेक सैन्य चालून येत आहे असे दिसले. आपल्या पिछाडीवर चालून येणारें हे सैन्य काळया रंगाचे आहे असें पाहताच अिंग्रजांची त्रेधा अुडाली; व ते कसेबसे संरक्षणासाठी तयार होतात न होतात तोंच त्यांच्या ध्यानात आले की, ते सैन्य बंडवाल्यांचें नसून मेजर रीडच्या हाताखाली असलेलें गुरखे लोक अिंग्रजांचे बतीनें लढण्याकरिता तिकडे येत होते! अबाल्याहून खाली येणाऱ्या अिंग्रजी फौजेला शिखांचें साह्य व मीरतहून खाली येणाऱ्या फौजेला गुरख्यांचें साह्य! अशा स्थितीत गरीब बिचारे दिल्लीचे बंडवाले काय करणार! ह्या दोन्ही अिंग्रजी फौजा ता. ७ जूनला असेर अेकमेकींस मिळाल्या. याच सुमारास दिल्लीचे वेढ्यासाठी तयार करविलेली सीजट्रेनही नाभाच्या राजाचे मदतीनें सुखरूप येअून पोचली. ही सीजट्रेन अबाल्याकडे पोचताच तिला ताब्यात घेअून बंड करावयासाठी पाचव्या रेजिमेंटचे शिपाओी हे गुरख्यांची शक्य तितकी विनवणी करीत होते. परंतु त्यांच्या म्हणण्याप्रमाणे ती अत्यंत महत्त्वाची संधि साधून दिल्लीकडे सीजट्रेन सुद्धा निघून जाअून स्वदेशसेवा करावयाचे गुर-ख्यांनी साफ नाकारले अशा रीतीनें ह्या सीजट्रेन सुद्धा अिंग्रजांची अेकत्र झालेली ती फौज दिल्ली नजीकच्या अलीपूर गावापर्यंत येअून पोचली.

अिंग्रजी फौज अल्लीपुरास पोचल्याचें कळताच बंडवाले पुन्हा दिल्लीचे बाहेर पडले व त्यांची बुंदेलकी सराअी नांवाच्या ठिकाणाजवळ अिंग्लिश फौजेशी गाठ पडली. या वेळेस अिंग्लिशांची फौज कडेकोट साहित्य, अुत्तम अुत्तम सेनापति, ताज्या दमाचें मुबलक सैन्य व फायद्याची जागा अितक्या गोष्टींनी युक्त असून बंडवाल्यांचे बाजूला त्याच्या सदिच्छेशिवाय दुसरें काहीही सामर्थ्य नव्हतें. ज्यानी रणांगणाचें जन्मातही तोंड पाहिलें नाही असा अेक राजपुत्र त्यांच्यावर सेनापतित्व गाजविणार ! त्यांच्या संख्येत शिपायांपेक्षा बाजारबुणग्यांचाच भरणा जास्त होता, व त्यातही आपले स्वतःचेच देशबधु शीख व गुरखे हे फिरंग्यांचे बाजूस गेल्याने त्यांचें मन निरुत्साही झालेलें होतें ! अशा स्थितीत ही लढाअी म्हणजे अेक भला मोठा तमाशाच होअील अशी अिंग्रजांना खात्री वाटत होती. परंतु अितक्याही विरुद्ध गोष्टींना भीक न घालणारी अशी स्वराज्यानी अेक विलक्षण चेतना त्या शिपायांचे मनांत अुत्पन्न झालेली असल्याने त्यांनी अिंग्रजी सेनेशी टक्कर देण्यासाठी आपली अितकी कमाल केली की, अिंग्लिशांना हा तमाशा नसून खरोखरीच जीव घेणारी किंवा देणारी लढाअी आहे असें लवकरच दिसून आलें. कारण दिल्लीचे सैन्याच्या तोफा अितक्या निकराने मारा करू लागल्या की त्यापुढे अिंग्रजांच्या तोफखान्यांचे काही चालेल असें मुळीच दिसेना. अिंग्रजी तोफखान्यावरील गोलंदाज व अधिकारी हे पटापट मरून पडू लागले तों तों बंडवाल्यांचे तोफखान्याचा जोर जास्त जास्तच होत चालला. हे पाहताच अिंग्रजांनी आपल्या पायदळास तोफांवर चालून जाण्याचा निकराचा हुकूम सोडला. हा अिंग्रजी पायदळाचा हल्ला हा हां म्हणता बंडवाल्यांचे तोफखान्यापाशी येअून भिडला, तरी त्या दिवशी बंडवाले तोफा सोडून अेक तसूभरही अिकडे तिकडे हलेनात. स्वराज्यासाठी व स्वदेशासाठी लढणाऱ्या वीरांना शोभेल अशाच अढळ रीतीने त्यांनी अिंग्रजी बेयोनेटा आपल्या छातीत घुसेतोपर्यंत आपले ठाण सोडले नाही! परंतु असल्या शूर मर्दांना आपल्या कृतीने अुत्तेजन देणारा तर राहोच, परंतु त्यांच्याबरोबर शेवटपर्यंत नुसता अुभा राहील असा देखील सेनापति त्यांना मिळालेला नव्हता. कारण अिंग्रजांच्या बेयोनेटांनी भोसकलें तरी आपलें ठाण सोडून मागे अेक पायही न घेणारे वीर अिकडे स्वदेशार्थ व स्वधर्मार्थ मरत असता त्यांचा कमांडर-अिन-चीफ तोफेचा पहिली फैर झडताच धूम ठोकीत दिल्लीला पळून गेलेला होता. अितक्यात त्या दुर्दैवी सैन्याच्या डाव्या बाजूवर अिंग्रजांचे घोडेस्वार तुटून पडले व त्यांच्या पिछाडीवर होप ग्रँट हा घोड्यावरील तोफखाना घेअून मार देअू लागला अशा रीतीने स्वकीयांकडून व परकीयांकडून अनाथ केलेले ते सैन्य दिवसभर लढलेल्या लढाअीचें काही अेक श्रेय न मिळता फुटून जाअून दिल्लीमध्ये घुसू लागले. जनरल बर्नार्डने हृधा मिळालेल्या जयाचा शक्य तितका फायदा करून घेण्यासाठी त्याच्या फौजेला तसेंच पुढे रेटीत जाण्याचा हुकूम सोडला व ते अिंग्रजी सैन्य त्या दिवशी सध्याकाळचे आत दिल्लीच्या

तटाला येऊन मिटलें. या दिवशीच्या लढाईत बंडवाल्यांचा शहराबाहेरील सर्व ठावा नष्ट झाला व अिंग्रजांना दिल्लीवर मोर्चा लावण्यास अत्यंत अुत्तम अशी जागा पटकावता आली. या दिवशीचे लढाईत अिंग्रजांच्या बाजूला गोंमूरच्या गुरखा पलटणीने अतिशय पराक्रम केला म्हणून त्याला अिंग्रजी अितिहासकार फार शाबासकी देत असतात. हें येथे सांगणें अवश्यच आहे! स्वदेशस्वातंत्र्याचे मानेवर सुरी चालविण्याचे कामात अत्यंत अग्रेसर व अद्वितीय शौर्य दाखविल्याबद्दल त्या गुरख्यांचीं नावें सदासर्वदा शापित झालेलीं आहेत, यांत तिळमात्र संदेह नाहीं.

ह्या देशद्रोही गुरख्यांच्या साह्याने अिंग्रजांनी बुंदेलकी सराअीची लढाअी जिंकली खरी; परंतु ह्या जयाने त्यांच्या मनोराज्याची धूळधाण करून टाकली. कारण दिल्लीच्या बाहेर दुपारी लढाअी देअून त्या दिवशीची रात्र दिल्लीचे वाड्यात रिपुरक्ताचे प्राशन करण्यात घालवू म्हणून जी अिंग्रजी सोजिराची आशा होती ती या लढाअीने ठार मारून टाकली. दिल्लीस केवळ बाजारबुणगेच भरलेले नसून स्वराज्याच्या व स्वधर्माच्या रक्षणार्थ म्यानातून बाहेर काढलेल्या तरवारीही तत्त्वनिष्ठेच्या निर्धाराने त्या तटावर मधून मधून झळकत होत्या हें अप्रिय सत्य अिंग्रजाच्या नजरेस या लढाअीनें आणून दिलें! या लढाअीत अिंग्लिशांकडचे अेकशेचौतीस लोक जखमी झाले व चार ऑफिसर व सत्तेचाळीस लोक मारले गेले. परंतु या सर्व मृत्यूपेक्षा अिंग्रजाच्या लष्करात दुःख व औदासीन्य पसरविणारी गोष्ट म्हटली म्हणजे त्या लष्करातील अॅडज्युटंट जनरल कर्नल चेस्टर याचा लढाअीच्या गर्दीत झालेला मृत्यु ही होय. बंडवाल्याकडील नुकसान देताना अिंग्रजी अितिहासकार कादंबरीकारावरही कशी ताण करतात हे यापुढेही दिसून येअीलच. परंतु ह्या पहिल्या महत्त्वाच्या लढाअींतील गडबडींतही अितकें सांगणें जरूर आहे कीं, ह्या दिवशीं अिंग्रजाच्या हातीं पडलेल्या बंडवाल्यांच्या तोफांची संख्या अेकजण देतो १३ व दुसरा म्हणतो बरोबर सव्वीस! आणि हे दोघेही तिथे हजर असलेले सरकारी अधिकारी आहेत हे विशेष!

अशा रीतीनें ता. ८ जूनच्या दिवशी संध्याकाळी अिंग्रजी सैन्याने दिल्लीचे तटाजवळ येअून ठाण माडलें. अंबाल्याहून व मीरतहून दिल्लीकडे अिंग्रजी सैन्य अबाधित रीतीने आणण्याचें कार्य हें पंजाबच्या हालचालीवर सर्वस्वी अवलंबून असल्याने त्या महत्त्वाच्या प्रांतात मीरतच्या अुठावणीचे काय परिणाम झाले, तेथील स्वदेशीय लोकांनी काय हालचाली केल्या व त्यांचा प्रतिकार करण्यासाठी अिंग्रजांनी योजलेल्या अुपायांना कितपत यश आलें ह्याचे निरीक्षण करणें अत्यंत आवश्यक आहे. शीख लोकांचे साम्राज्य बुडवून टाकून पंजाब प्रांताला ब्रिटिशांचे ताब्यात पूर्णपणे आणल्याबरोबर डलहौसीनें त्या लोकांतील लष्करी बाणा व स्वातंत्र्यप्रेम ह्या दोन सद्गुणांचा नायनाट करील असे तेथील राज्यव्यवस्थेचे धोरण ठेवलें.

सर हेन्री लॉरेन्स व सर जान लॉरेन्स ह्या दोघा अत्यंत प्रमुख मुत्सद्द्यांचे हाती ह्या नवीन मिळविलेल्या प्रांताची राज्यव्यवस्था येताच त्यांनी पंजाबातील लोकास पूर्ण निःशस्त्र करून टाकले, त्याच्यातील बहुतेक शीख शिपायांना आपल्या लष्करात मिळवून घेतलें, शुत्तर हिंदुस्थानातील बहुतेक अिंग्रजी सैन्य वर आणून त्याचे पंजाबभर तळ पाडून ठेवले व सर्व लोकांना शेतकीकडे लक्ष देवून त्यावर आपली शुपजीविका करण्याचें व्यसन लागावें अशा रीतीने सर्व सूत्रें चालविण्यात येअू लागलीं. लोक शेतकरी झाले म्हणजे त्यांचे लष्करी गुण सुटत जातात, ते शांततेचे फार भुकेले होतात व त्यांच्या शेतकीला थडथळा करणाऱ्या राज्यक्रांतींच्या लाटांना त्याचें सहसा अनुमत मिळत नाही. अशा खोल राजनीतीने प्रेरित झालेल्या अिंग्रजी धोरणाचा पंजाबच्या लोकांवर त्वकरच पगडा बसला व रणजितसिंगाचें साम्राज्य व स्वातंत्र्य नष्ट होअून पुरतीं दहा वर्षे लोटतात न लोटतात तों पंजाबमध्ये तरवारीअैवजी जो तो नागर धरू लागला व ज्यांनी नागर स्वतः धरला नाही असा शीख शिपायांनी अिंग्रजी लष्करात शिरून अिंग्रजांकडून तो (नागर) आपल्या मातृभूमीवर फिरविला! अशा स्थितीत पंजाबमध्ये वास्तविक पाहता काही अेक गडबड अुडणार नाही असो त्या प्रांताचा मुख्य अधिकारी सर जॉन लॉरेन्स याची खात्री होती. मे महिन्याला आरंभ होअीतोपर्यंत अितर अिंग्रजी मुत्सद्द्यांप्रमाणेच सर जॉन लॉरेन्सलाही भावी अरिष्टांची काही कल्पना नसल्याने तो अुन्हाळ्यानिमित्त लाहोर सोडून मारीहिल्लच्या गार हवेत जाण्यास निघाला, तोंच ता. १० मेला मीरत अुठल्याची व ता. ११ला दिल्ली स्वतंत्र झाल्याची विद्युत्वार्ता पंजाबवर येअून आदळली. हें अैकताच पंजाबच्या त्या चाणाक्ष चीफ कमिशनरचे ध्यानात त्या बातमीचें भयंकर स्वरूप पूर्णपणे आले व ह्या अिंग्रजी साम्राज्याला अुन्मळून टाकणाऱ्या आघाताशी झुंज देण्यासाठी रावळपिंडीला त्याने आपला तळ कायम केला.

ह्या वेळेस पंजाबमधील सैन्याचा बहुतेक भाग मियानमीर येथे होता. मियानमीरची छावणी लाहोरपासून अगदी जवळ असल्याने लाहोरचे किल्ल्यावर त्याच शिपायांतून निवडलेले शिपाअी सरक्षणार्थ ठेवलेले होते ह्या छावणीत अेतद्देशीय शिपाअी हे युरोपियन सोजिरांपेक्षा चौपटीने अधिक असता त्यांच्याविषयी अिंग्रजी अधिकाऱ्यांना मीरतची बातमी येअीतोपर्यंत महत्त्वाचा संशय बिलकुल आलेला नव्हता व म्हणून ते बंडवाल्यांशी सामील आहेत किंवा कसें हे त्यास अेकदम ठरविणे फार जड जाअू लागलें. त्या वेळेस लाहोरला रॉबर्ट मॉंटगामेरी हा मुख्य अधिकारी होता. हा मॉंटगामेरी व जॉन लॉरेन्स हे दोघेही डलहौसीच्या तालमीत तयार झालेले असल्यामुळे प्रसंगावधानात व अकस्मात् पडलेल्या प्रसंगातून सुटण्यासाठी अत्यंत अवश्य असणाऱ्या हिंमतबाज धाडसीपणात तरबेज झालेले होते. तथापि पंजाबचे शिपाअी लोकांत स्वातंत्र्याची राष्ट्रीय चेतना कितपत अुत्पन्न झालेली आहे, याची बरोबर बातमी काढणे अवश्य होतें. या कामावर अेका ब्राह्मण

हिंदेमिटव्हाची मियानमीरच्या शिपायांचें मन जाणण्यासाठी योजना करण्यात आली. त्या ब्राह्मणाने आपलें देशद्रोहाचें काम अुत्तम रीतीनें सिद्धीस नेअून मौंटगोमरीला निवेदन केलें की, "साहेब, ते सर्व फितुरीनें भरलेले आहेत — ते फितुरीत हे अितके बुडाले आहेत" असें म्हणून त्याने आपला हात आपल्या गळयास लावून दाखविला. ह्या ब्राह्मणाची ही वातमी अैकून अिंग्रजाच्या डोळयावरील भ्रमपटल दूर झालें. बंडाची गुप्त तयारी फक्त अुत्तर हिंदुस्थानातच झालेली नसून त्याची ज्वाला सर्व पंजाबभर योग्य संधीला अुफाळण्यासाठी दबून बसलेली आहे हें त्यांच्या स्पष्ट नजरेस आलें व ही भयानक गुप्तता अुघडकीस आणणाऱ्या त्या मीरतच्या अुठावणीचे आभार मानीत मानीत मौंटगोमरीने मियानमीरच्या नेटिव्ह सैन्यास ताबड-तोब नि:शस्त्र करण्याचा हुकूम सोडला. मे महिन्याच्या तेराव्या तारखेला सकाळच्या सुमारास मियानमीरला अेक जनरल परेड बोलावण्यात आली. त्या सकाळच्या आदल्या दिवशी शिपायांना काहीच अगाअू सूचना मिळू नये म्हणून सर्व अिंग्रजी लोकांना अेक जंगी बॉल देण्यात आला होता. या अिंग्रजाच्या बाह्य स्थालीबुशालीचें मर्म नेटिव्ह शिपायाचे ध्यानात येण्याचे आधीच त्यांना युरोपियन सोजिरांच्या, घोडेस्वारांच्या व तोफखान्याच्या वेढ्यात अचानक रीतीने आणले गेलें व या कपटनाटकाचा याग नेटिव्ह शिपायाना लागण्याचे असक्य असल्याने नेहमीप्रमाणे परेडीच्या हालचाली चालू असताच अेकदम तोफखान्याला वत्ती घेअून सज्ज होण्याचा हुकूम झाला व हा विचित्र हुकूम अैकताच गोंधळू पाहणाऱ्या त्या रेजिमेंट्सना हत्यारे खाली ठेवण्याची आज्ञा करण्यात आली ! मतापाने गुरगुरणाऱ्या परंतु प्रदीप्त तोफखान्यामुळे हताश झालेल्या त्या हजारो नेटिव्ह शिपायानी आपापलीं हत्यारे खाली टाकलीं व ते अेक अक्षरही न अुच्चारता परत आपल्या लाअिनीकडे निघून गेले.

अत्यंत शूर व ज्यांच्या पराक्रमानेच अफगाणिस्थानात अिंग्रजांचा प्राण वाचविला होता त्या पंजाबी सैन्याला मियानमीरकडे नि:शस्त्र करण्याचा हा विधि चाललेला असताच तेथील सैन्यापैकी अेक तुकडी लाहोरचे किल्ल्यावर धाडण्यात आली. त्या तुकडीने लाहोरच्या किल्ल्यातील तोफखान्यावर असलेल्या अिंग्रजी सोजिरांची मदत घेअून तेथील नेटिव्ह शिपायांना नि:शस्त्र करून किल्ल्यातून काढून दिले व किल्ला आपल्या ताब्यात घेतला. त्या मेच्या तेराव्या तारखेला अिंग्रजाच्या ज्या तडफेने हें धाडसाचे कृत्य पार पाडले त्या तडफेत जर का अेक अणुरेणु शिथिलता झालेली असती तर त्या दिवसापासून अेका पंधरवड्याचे आत सर्व पंजाब बंडाचे वणव्यात भडकू लागला असता. कारण पेशावर, अमृतसर, फिल्लूर, जालंदर ह्या निर-निराळ्या ठिकाणी असलेल्या सर्व पलटणी मियानमीरचे शिपाअी लाहोरच्या किल्ल्या-वर कधी तुटून पडतात याची मार्गप्रतीक्षा अुत्सुकतेने करीत होते. मियानमीरच्या

शिपायांना निःशस्त्र करून फिरग्यांनी लाहोरचा किल्ला ताब्यात घेतल्याची बातमी पसरताच पंजाबभर अिंग्रजांचा वचक पुन्हा बसू लागला.[६]

परंतु लाहोरच्या किल्ल्यापेक्षाही अत्यंत महत्त्वाची जागा म्हटली म्हणजे अमृतसरचा गोविंदगड हा होय. अमृतसर शहर हे शीख लोकांचे काशीक्षेत्र असल्याने अिथे कोणत्याही प्रकारची गडबड होताच ते सर्व लोक बिथरले जाण्याचा संभव असून नजीकच असलेल्या गोविंदगडावर शिपायांचा चांगलाच डोळा होता. मियान-मीरचे निःशस्त्र झालेले शिपाअी गोविंदगड घेण्यासाठी अमृतसरकडे येत आहेत अशी अफवा अुठल्याने तर अिंग्रजांना फारच धास्ती पडली व त्यांनी अमृतसरचें रक्षण करण्यासाठी शीख व जाट शेतकऱ्यांना विनती केली! या विनंतीला अर्थातच त्या राजनिष्ठ देशद्रोहघांनी मान दिला व अमृतसरचा किल्ला हा लाहोरचे किल्ल्या-प्रमाणेच अिंग्रजांनी पूर्ण ताब्यात घेतला. अशा रीतीने मेच्या १५-व्या तारखेपूर्वी लाहोर व अमृतसर हीं दोन शहरें-तूर्त तरी बंडाच्या ज्वालांपासून सुरक्षित करण्यात आलीं.

अितकी सुरक्षितता झाल्याबरोबर सर जॉन लॉरेन्स हा फक्त आपल्या ताब्या-तील प्रदेशापुरतीच काळजी वाहत बसला नाही. त्याला दिल्लीची बातमी लागताच तो म्हणाला की, आता हें बंड नसून ही राज्यक्रांति होणार आहे. तथापि त्याची अशी समजूत होती की, दिल्ली जर झटक्यात पडली तर मग अितरत्र कुठे अुठावणी होणार नाही. या समजुतीने त्याने जनरल ॲन्सनला दिल्ली जून महिन्याच्या आधी घेण्याबद्दल नुसतीं पत्रांवर पत्रें लिहिलीं, अितकेंच नव्हे, तर पंजाबमध्ये सर्वत्र शांतता राखण्याचें काम आपल्या अंगावर घेअून दिल्लीवर चालून जाण्यासाठी व अंबाल्या-कडे सैन्याचा तोटा पडलेला होता तोही भरून काढण्यासाठी पंजाबातून लष्कर पाठविण्यास आरंभ केला. या मदतीपैकी पहिला हप्ता डॅलीचे हाताखाली धाडलेली गाअीड कोर रेजिमेंट ही होय जॉन लॉरेन्स याचा डॅलीच्या शौर्यावर फार विश्वास असे व म्हणून दिल्लीवर चालून जाण्यासाठी त्याने त्यालाच निवडले केली. डॅली हा आपली रेजिमेंट घेअून मजल दरमजल दिल्लीकडे चालून गेला व बुंदेल की सराअीच्या लढाअीच्या दुसरे दिवशी तेथील अिंग्लिशांच्या सैन्यास येअून मिळाला. दिल्लीच्या वेढ्यात आता दोन नेटिव्ह रेजिमेंट्स झालेल्या होत्या—अेक गुरख्यांची रीडच्या हाता-खाली असलेली व दुसरी डॅलीचे हाताखालची ही पंजाबातून आलेली. या दोन्हीही

६. "Had the Punjab gone, we must have been ruined. Long before reinforcements could have reached the upper province, the bones of all English men would have been bleaching in the sun. England could never have recovered the calamity and retrieved her power in the East." —Life of Lord Lawrence.

रेजिमेंट्सवर अिंग्रजांची फार मर्जी बसलेली होती व ती अनाठायी होती असें कोण म्हणेल? त्या नेटिव्ह रेजिमेंट्सनी तसाच मर्जी बसण्यासारखा देशद्रोहीपणा केलेला होता!!

हॅलीची रेजिमेंट दिल्लीकडे चालली असताना सर जॉन लॉरेन्सने पंजाबच्या अेकंदर परिस्थितीचें बारीक निरीक्षण केलें होतें. त्या मुलखात हिंदु, शीख व मुसलमान यांचा परस्परांशी अखंड द्वेष सुरू होता. अुत्तर हिंदुस्थानात हिंदु व मुसलमान ह्या दोघांनाही स्वदेशाभिमानाचें चैतन्य जसें मिळालेलें होतें तसें पंजाबातील लोकांना त्या वेळेस मिळालेलें नव्हतें. वास्तविक पाहता त्यांचें स्वातंत्र्य जाअून दहा वर्षेंदेखील पुरीं झालीं नव्हतीं. अिंग्लिशांच्या कंठनालावर १८४९ साली जे शीख शिपाअी कुऱ्हाड घालीत होते तेच १८५७ साली त्यांच्या गळ्यास मिठ्या का मारू लागले, ह्या विलक्षण अैतिहासिक कोड्याचा अुलगडा त्यांचें स्वातंत्र्य जातें न जातें तोंच सत्तावनची क्रांति आली, ह्याच गोष्टीत सापडणारा आहे. मुसलमानांच्या पारतंत्र्याची ज्या शूर व बाणेदार जातीला अितकी चिरड आलेली होती की, शंभर वर्षेंपर्यंत अखंड झगडा करून शेवटी पंजाबचा पंजाब स्वतंत्र केल्याशिवाय त्यांनी तरवार खाली ठेवली नाही, त्या 'खालसा'च्या प्रथित अनुयायांनी अिंग्रजांच्या गुलामगिरीस भीक घातली असती असें मुळीच नाही. परंतु अिंग्रजांचें राज्य म्हणजे गुलामगिरी आहे की नाही हेंच त्या शिपाअीगड्यांच्या डोक्यात पूर्णपणे येण्याअितका काल लोटण्याचे आधीच सत्तावन अुजाडलें. अिंग्रजांचें राज्य हिंदुस्थानावर अशाच वेळेला आलें की, ज्या वेळेस हिंदुस्थानात अेक अैतिहासिक जलप्रलय सुरू झालेला होता. अनेक शतकानंतर ठिकठिकाणी निरनिराळीं मानलेलीं जलसरें आपआपल्या विवक्षित बांधाना फोडून टाकून अेका प्रचंड महानदीत विलीन होत होतीं. ही महानदी म्हणजे हिंदुस्थानची अेकराष्ट्रवृत्ति होय! आज जगावर जीं जीं राष्ट्रें अेकीभूत व संघटित झालेली आहेत त्या सर्वांना तें अेकीभूत व्यक्तित्व येण्याच्या आधी व येण्यासाठीच ह्या बेबंदशाहीच्या व यादवीच्या मुशीत वितळावें लागलें होते. अिटलीतील यादवी, जर्मनीतील यादवी व खुद्द अिंग्लंडमधील रोमसाम्राज्योत्तर यादवी, त्याच्यातील विविध प्रांतांचे व विविध जातींचें निकराचें शत्रुत्व व त्यांनी सूड अुगविण्यासाठी परस्परांचे केलेले अनन्वित छळ याकडे दृष्टि दिली म्हणजे हिंदुस्थानातील यादवी काहीच नव्हती असें वाटू लागतें. परंतु या वरील देशांना या यादवीच्या भयंकर मुशीन गुलामगिरीच्या अत्यंत तीव्र अुष्णतेने वितळावें लागलें म्हणूनच आज त्यांचें संघटित, सुंदर व सबल अेकव्यक्तित्व झालेले आहे हें कोणास नाकबूल करता येणार आहे? तशाच अैतिहासिक अुत्क्रांतीतून भरतभूमीचीही घटना चाललेली होती. गुलामगिरीचा चटका हिंदुस्थानी लोकास पुरता बसल्याने ते संघटित होअू लागले होते. परंतु पंजाबला तो अिंग्रजी गुलामगिरीचा चटका पूर्ण

रीतीने बसण्यास दहा वर्षे फार अपुरीं पडलीं व म्हणून विशेषत: शीख हे सत्तावन्नमध्ये उसळलेल्या राष्ट्रतेजाच्या लाटेत विलीन होऊ शकले नाहीत.[७]

पंजाबच्या अिंग्रजी अधिकार्‍यांच्या लक्षात हें सत्य आलेलें होतें व म्हणून त्यांनी शीख व जाट यांच्यामध्ये मुसलमानांचा द्वेष जास्त जास्त भडकवून देण्याचा क्रम सुरू केला. शीख लोकांमध्ये असलेल्या अेका जुन्या भविष्याची त्यांना आठवण करून देण्यात आली. पूर्वी मोंगल बादशहांनी जिथे आपल्या गुरूला ठार मारलें त्या दिल्लीवर 'खालसा साहेब' अेकदा चालून जाअून तिला धुळीस मिळविणार आहेत असा प्रत्येक शिखाला भविष्य संदेश करून देण्यात आलेला होता, त्या भविष्याची सांगता होण्याचा समय अखेर आला खरा! पण ह्या समयाला क्वचित् फक्त 'खालसा साहेबच' दिल्लीवर चालून गेले व त्यांनी दिल्ली जिंकली तर मग ह्या भविष्याच्या सांगतेपासून 'कंपनी साहेबास' तो फायदा काय? बहादुरशहाचे अैवजी अेखादा रणजितसिंग दिल्लीवर राज्य करू लागेल! हिंदुस्थानात रणजितसिंग व बहादुरशहा हे दोघेहि नसावेत अेतदर्थ ज्यांचे सर्व प्रयत्न चाललेले होते त्यांना ह्या अेकतर्फी भविष्यात थोडीशी सुधारणा करावीशी वाटली हें साहजिकच आहे! ह्या सुधारून वाढविलेल्या भविष्याच्या नव्या आवृत्तीत असें लिहिलेले होतें की दिल्ली धुळीस तेव्हाच मिळणार की जेव्हा खालसासाहेब व कंपनीसाहेब अेक होतील तेव्हा! भविष्य पण भविष्य! अेकच गोष्ट वाअीट आहे, ती ही की आजवीं भविष्यें अुद्या भूत व्हायचींच! पण निदान सध्यातरी त्याचा होअील तितका फायदा करून घेणें शहाणपणाचें आहे! ह्या भविष्याशिवाय शीख लोकांना दिल्लीचा त्वेष आणखी चढविण्यासाठी खोटाच जाहिरनामा काढण्यात आला की, दिल्लीमध्ये बादशहाने पहिला हुकूम असा दिला आहे की सर्व शीख लोकांची अेकसहा कत्तल केली जावी! अरेरे गरीब बिचारा बादशाह! तो याच वेळेला रोज दिल्लीचे रस्त्यातून स्वतः हिंडून प्रसिद्ध करीत होता की, हे युद्ध फक्त 'फिरंग्या' विरुद्ध आहे, सबब स्वदेशी लोकांच्या केसालाही कोणी धक्का लावू नये![८]

परंतु क्रांतिकारक पक्षाने आपली शिकस्त केली तरी शीख लोक हे अिंग्रजांचेच बाजूला वळले. पंजाबमध्ये ज्या ठिकठिकाणी सैन्याच्या रेजिमेंटस् होत्या त्या बहुतेक हिंदुस्थानी लोकांच्या होत्या. त्यामुळे त्या सर्वांनी अिंग्लिशांचेविरुद्ध लढण्या-

७. सर जॉन लॉरेन्स आपल्या अेका पत्रात लिहितो : "Had the Sikhs joined against us, nothing humanly speaking could have saved us. No man could have hoped, much less foreseen, that these people would have, withstood the temptation to avenge their loss of national independence" —October 21st 1857.

८. Two Native Narratives of the Mutiny, by Metcalfe.

साठी कास कमलेली होती व ते आपल्या ठरलेल्या संकेतसमयाची मार्गप्रतीक्षा करीत उभे होते. हे हिंदुस्थानी शिपाओीच काय ते पंजाबात स्वातंत्र्योन्मुख झालेले होते असें बिलकूल नाही. तर लष्कराचे बाहेर असणारे सर्व धंद्यांतील नागरिकही राज्य-क्रांतीचीं बीजें अितस्ततः पेरीत बसलेले होते. मियानमीरच्या शिपायांना निःशस्त्र केल्यावर अिंग्रजांना लवकरच कळून आलें की आपण ज्या पर्वतावर स्वस्थ रीतीनें निजलेले होतो त्यात कोण अुत्क्षोभक द्रव्यें साचलेलीं आहेत ! लाहोर व अमृतसर येथील किल्ले जरी अिंग्रजांनी सुरक्षित केले तरी फिरोजपूरला असलेला दारुगोळ्याचा साठा अजून असुरक्षितच होता. त्या दारुखान्याच्या लालचीनें तेथील नेटिव्ह शिपाओी बंड करण्यास तयार आहेत की नाही हें नक्की अजमाविण्यासाठी ता.१३ मेला अेक परेड करण्यात आली. शिपायांनी परेडीवर वर्तन अितकें बेमालूम ठेवलें की त्याच वेळेस त्यांच्या हृदयात पेटून राहिलेल्या स्वेषाग्नीची अेक ठिणगीही बाहेर पडली नाही. तेव्हा त्यांना निःशस्त्र वगैरे करण्याच्या नादी न लागता फक्त त्या दोन रेजिमेंटस्ना निरनिराळे ठेवण्याचें ठरवून त्यापैकी अेकीला शहराच्या बाजारातून चालविली. परतु कोणत्या देवघेवीसाठी तो फिरोजपूर शहरचा बाजार भरलेला होता ह्याची अिंग्रजांना काय दाद असणार ! शिपाओी लोक त्या बाजारातून चालत जात असता तेथील दुकानदारांनी व गिन्हाअिकांनी स्वराज्याचें वारें विकण्यास आरंभ केला व बाजारातून बाहेर पडेतोपर्यंत शिपायांचे मनातील चलविचल निघून जाअून तिथे निश्चयाचें ठाण बसलें ! अेका क्षणात हरहर महादेव अुडाला, शिपायांच्या हल्ल्यापासून दारुखान्याचें संरक्षण करणे अवघड वाटताच तो अुडवून देण्याशिवाय अिंग्रजांना दुसरा अिलाज नाहीसा झाला, व दारुखान्याचा भडका पाहताच स्वराज्याचें निशाण ज्या तटावर स्वदेशवीरांना पाचारण करीत होतें त्या दिल्लीचे तटाकडे शिपायांनी धाव घेतली ! अिकडे त्याच संधीस फिरोजपूर शहरही अुठलें व युरोपियन लोकांचे बंगले, तंबू, खानावळी, प्रॉटेस्टंट चर्चें, कॅथॉलिक चर्चें, जाळून पोळून लुटून फस्त करीत, लोक युरोपियन कुठे आहेत याची विचारपूस करीत अितस्ततः हिंडू लागले. परतु मीरतच्या तारांनी सावध झालेले सर्व युरोपियन पूर्वीच बराकीच्या बाजूस जाअून सुरक्षित बसलेले होते. शिपायांच्या पाठलागासाठी जें जिंग्रजी सैन्य धाडण्यात आले ते जो जो हाती लागेल त्याचा अेकसारखा सपाटा अुडवीत व नौर्या-बद्दल फुशारकी मारीत परत फिरले.

पंजाबमध्ये अिंग्रजांच्या सत्तेला जसा अंतर्गत असंतोषाचा धाक होता तसाच त्याच्या सरहद्दीपलीकडे असणाऱ्या अफगाणी लोकांच्या लुटारूपणाचाही धाक होता. सत्तावनच्या क्रांतियुद्धाची गुप्त संघटना चाललेली असता लखनौच्या गुप्त मंडळाने काबूलच्या अमीराचें साहाय्य मागण्याचा प्रयत्न केलेला होता. कारण १८५६-च्या ऑगस्टमध्ये मि. फारसिथच्या हाती अेक पत्र लागलें त्यात हें स्पष्ट लिहिलेलें होतें की, "लखनौच्या मुसलमानांनी अमीर दोस्त महमद याजकडे संधान

बांधलेलें आहे. अयोध्येचें राज्य खालसा झालें व आता हैद्राबादेवर अेकच कुन्हाड घातली की मुसलमानी सत्तेचें नांव देखील पुन्हा अंकू येणार नाही. याला वेळीच काही तरी अिलाज केला पाहिजे. जर करता लखनौच्या लोकांनी स्वराज्यासाठी अुठावणी केली तर आपणांकडून—आमच्या दोस्ताकडून—कितपत मदत मिळण्याचा संभव आहे?" लखनौच्या या प्रश्नाला त्या राजकारणपटू अमिराने अस्पष्ट अुत्तर केलें, 'काय होअील तें पाहून घेअू.' परंतु काबूलच्या अमिराशी अिंग्रजाचा नुकताच तह झालेला असल्याने त्यांना अमिरापेक्षा पेशावरचे नजीक असणाऱ्या स्वतंत्र मुसलमान जमातींची फार भीति होती. व मुसलमानी जमातींत कोणी अिंग्रजाच्या बाजूला मिळू नये म्हणून अुपदेश करण्यासाठी कित्येक मुल्ला फिरतीवर निघालेले होते. पेशावरला या वेळेस जे अिंग्लिश अधिकारी होते ते सर्वच धीट, राजकारण-पटू व युद्धविशारद होते यात काही शंका नाही. निकलसन, अेडवर्डस, चेंबरलेन वगैरे अधिकाऱ्यांच्या तडफेमुळे व त्यांना जॉन लॉरेन्ससारख्या वरिष्ठाच्या मिळालेल्या मार्मिक साहाय्याने पेशावरच्या बाजूला फार चिकाटीने हे संकट टाळले गेले. त्यांनी हृया वड कर पाहणाऱ्या मुसलमान जमातींना मिळवून कसें घ्यावयाचें हें पहिल्या धडाक्यात ताडले व पंजाबची आशा लावताच ते सर्व पहाडी लोक भराभर अिंग्रजाच्या सैन्यात नोकऱ्या धरू लागले. पहाडी लोकांना पैशाच्या बळाने विकत घेताच मग जॉन लॉरेन्सने पंजाबमध्ये जिकडे तिकडे घुमसत असलेल्या असंतोषाला ठिकठिकाणी दाबून टाकण्यासाठी अेक फिरते सैन्य निर्माण केलें. या सैन्यात अनुभवी, कसलेले ज्यांच्या अिमानीपणावर अिंग्रजाचा पूर्ण विश्वास होता असेच नेटिव्ह शिपाअी व अिंग्रजी सोजीर घेण्यात येत. या सैन्याची रचना होते न होते तोंच त्याला कामगिरी अुपस्थित झाली. कारण पेशावरकडे असलेल्या हिंदी शिपायांत मियानमीरच्या नि:शस्त्रतेची बातमी अैकताच भयंकर सळवळ अुडालेली होती.

अशा या हिंदी सैन्यावर आपण होअूनच पहिला आघात करावा असा पेशावरचे धीट अिंग्रजानी बेत ठरवून ते त्या सर्व सैन्याला नि:शस्त्र करण्यासाठी तयार झाले. परंतु त्या हिंदी सैन्यावरील अिंग्रजी कमान्डर वगैरे अधिकाऱ्यांना आपल्या शिपायांना होणारा हा अपमान अैकून फारच वाअीट वाटले. सत्तावनसाली जीअेक विलक्षण गुप्तता बहुतेक ठेवण्यात आलेली होती तिच्यामुळे जाळ्यात सापडलेले हे अिंग्रजी लष्करी अधिकारी आपल्या हाताखालील लोक फितूर आहेत हे बिलकूल खरे मानीनात. तथापि कॉटन व निकलसन ह्यांनी त्या नेटिव्ह शिपायांना ता. २१ मेला सकाळचे सुमारास युरोपियन सैन्याला वेढा देअून नि:शस्त्र करण्याचा हुकूम सोडला. हृया अकस्मात् पटेच्या पाण्यातून सुटका होणे अशक्य आहे असे पाहून सर्व शिपायांनी आपली हत्यारें खाली ठेवली व त्या अपमानाचें दृश्य पाहून सताप-

थोड्या वेळाने तुम्हांला आठवेल ना ? सार्वत्रिक भूतदयेसाठी हें क्षणिक शौर्य तुम्ही करता आहा तें ठीकच आहे, पण तिकडे कानपूरला हिंदूंचा नानासाहेब बसलेला आहे याची आपली आठवण असू द्या !

आणखी अेक गोष्ट अिथे सांगितली पाहिजे की, बडवाल्यांनी केलेल्या कत्तलींची हकीकत देताना जे अिंग्रजी अितिहासकार नाटकी वर्णनात कमाल करून सोडतात तेच ब्रिटिशांनी केलेल्या अक्षम्य, अनन्वित व अमानुष अत्याचारांना जाणून बुजून छपवून टाकण्याचा प्रयत्न करू लागतात. वरील दुर्दैवी परंतु स्वाभिमानी रेजिमेंटची कत्तल चाललेली असताना त्यांचे मरणाचे आधी अिंग्रजांच्या राक्षसी द्वेषाने काय काय छळ केलेले असतील ते आता अेका परमेश्वरालाच ठाअूक! कारण या भयंकर हकीगतींना अितिहासातून पुसून टाकण्यासाठी अिंग्रजी अितिहासकारांनी तिचा मागमूसही आता अुरू दिलेला नाही. खुद्द 'के' हा प्रमुख अिंग्रजी लेखक म्हणतो की "जरी मजपुढे अिंग्रजांनी केलेल्या भयंकर व क्रूर जाचांचें वर्णन केलेलीं मुबलक पत्रें पडलेलीं आहेत तरी हा विषय पुन्हा जगापुढे नसावा म्हणून मी त्याबद्दल अेक अक्षरही लिहीत नाही!" यांचें नांव अितिहासकार! ज्या लोकांनी दिल्लीचे वाटेवर अमणाऱ्या गरीब व निरपराध गांवकऱ्यांचे तोंडात मरणाचे आधी गाअीचे मांस कोंबलें त्या लोकांनी या ५५-व्या रेजिमेंटच्या धर्मनिष्ठ शिपायांचे तोंडातही गाअीचें मांस कोंबून मग त्यांना तोफेच्या तोंडी दिलें नसेल म्हणून कशावरून ?

पेशावरच्या बाजूला हे अमानुष प्रकार चाललेले असताना अिकडे जालंदरकडे बंडाची धुमसत असलेली ज्वाला भुफाळू लागली होती. पंजाबमध्ये जॉन लरिन्सने नेटिव्ह शिपायांना अेकसारखे नि:शस्त्र करून सोडण्याचा सपाटा लावलेला होता व त्याच सपाटयात आता जालंदर व पिल्हूर ह्रीही याचे आधीच सापडलीं असती. परंतु पिल्हूरच्या नेटिव्ह शिपायांनी जें आत्मसंयमन व घटनाचातुर्य दाखविलें तें खरोखरच शिताफीचें आहे. पंजाबमध्यें सर्व नेटिव्ह शिपायांची अेकदम अुठाव्याची जशी तयारी झालेली होती तशीच ती जालंदर दुआबमधील नेटिव्ह शिपायांचीही झालेली होती. दिल्ली घेताना त्या लढाअीत जखमी होअून पडलेल्या अेका देशभक्त हवालदारानेच हें स्पष्ट सांगितलें आहे व सरकारी रिपोर्टांत तेच मान्य केलेलें आहे की, सर्व जालंदर दुआबभर अेकदम अुठावणी करण्याचा नक्की निश्चय झालेला होता. जालंदरच्या सैन्याने अेक तुकडी होशियारपूरला धाडली व तिथे ३३-व्या पायदळाने अुठावणी करावी, हें न साधल्यास ३३-व्या पायदळाने तिथेच रहावें (व त्याप्रमाणे तें राहिल्हेंही). नंतर ते नवंजण पिल्हूरकडे येताच पिल्हूरच्या ३-न्या रेजिमेंटने अुठावें व मग सर्वांनी मिळून दिल्लीकडे चालू लागावें. अितरत्रही असेच बेत झालेले होते. परंतु त्याच्या बजावणीची वेळ येण्याच्या आधीच सर्व बिंग फुटून अिंग्रजांना सावध केलें जाअी. पिल्हूरच्या रेजिमेंटने मात्र शेवटपर्यंत आश्चर्यकारक गुप्तता

पाळली. दिल्लीला ज्या वेळेस सीजट्रेन नेण्यात आली त्या वेळेस तिचे तुकडे अुडविणें हे अगदी त्यांच्या हाती होतें. परंतु त्या योगाने सर्व बेत ढासळू नये म्हणून ह्या रेजिमेंटने शेवटपर्यंत वरकरणी गाततेची कमाल केली ! अखेर ता. ९ जूनला जालंदरकडे ठरलेली सूचना दिली गेली—क्वीन्स रेजिमेंटच्या कर्नलचे बंगल्यास आग लावली गेली. ही निशाणी होताच मध्यरात्रीचे अंमलात जालंदरचे शिपाअी वंड करून अुठले. वास्तविक तिथे युरोपियनांचे हातात तोफखाना व अिंग्रजी सैन्य होतें परंतु शिपायांची अुठावणी अितक्या अेकवाक्यतेने व तडफेने झाली की, त्यांचे ते कर्कश रणध्वनि सुरू होताच अिंग्रजांचे अवसान खचून गेलें. अिंग्रजी बायकापोरें, पुरुष आपापल्या जिवाचे रक्षणासाठी धूम पळ काढू लागले. परंतु जालंदरच्या शिपायांना फिरंग्यांच्या कत्तली करावयास आता वेळ नव्हता. तिकडे दिल्लीकडे स्वातंत्र्याच्या निशाणावर अिंग्रजी तोफा रोखलेल्या असल्याने ज्याचें त्याचें अंतःकरण तिकडे ओढत होतें. अॅडजूटंट बागरा हा अुगीच मधे लुडबुडू लागला आहे असें पाहताच अेक घोडेस्वार दौडत आला व त्याने त्याला गोळी घालून ठार केला. परंतु जालंदरचे शिपाअी 'आमच्या पूर्ण विश्वासाचे आहेत, तेव्हा त्यांना निःशस्त्र करू नका' म्हणून तेथील अिंग्रजी लष्करी ऑफिसरांनी शेवटपर्यंत सरकारास कळविलेलें होतें व त्याचा त्या शिपायांवर सरोखरच विश्वास होता. यासाठी शिपायांनीही त्यांची कत्तल बिलकूल अुडू दिली नाही. अितकेंच नव्हे तर जालंदर सोडतानाही त्यांनी त्यांच्या हातात असलेल्या ऑफिसरांना खुशाल जीवदान दिलें. जालंदरच्या सैन्याने आपल्या बेताची किती गुप्तता ठेवली होती, त्या गुप्ततेने फसून ज्या व्यक्तींनी त्यांच्यावर विश्वास टाकला होता त्यांच्या त्या विश्वासाचें फळ म्हणून जीवदान देण्यात शिपायांनी कसे औदार्य दाखविले[१०] व ह्या व्यक्तिविषयक सदयतेला राष्ट्रीय कार्यात बिलकूल आड न येअू देता जरी स्वतःच्या रेजिमेंटवर सरकार खूप होतें तरी स्वदेशस्वातंत्र्याच्या रणांगणाचें शिंग वाजताच त्या अुदात्ततर कर्तव्याला त्यांनी कसें आत्मार्पण केलें हे वरील हकीकतीवरून स्पष्ट रितीने गोचर होत आहे.

---

१०. अिंग्रजांनी खोटेपणाने अेक गप्प अुडवून देअून तिला 'कलकत्त्याची अंधार कोठडी' असें नांव दिलें आणि अिंग्रजांनी आपल्या कुटिल मेंदूतून काढलेल्या या अफाट थोथावर विश्वासून सारें जग सिराजअुद्दौल्याच्या स्मृतीला शिव्याशाप मोजीत आलें आहे. खऱ्या अर्थाने अंधारकोठडी हे नाव ज्याला शोभेल असा अेकून रक्त गोठविणाऱ्या अिंग्रजांच्या अेका क्रूर कृत्याचा वृत्तान्त, त्यात सामील असलेल्या अेका क्रूरकर्म्यानेच आपल्या तोंडाने सांगितलेला आहे तो असा : 'हत्यारें काढून घेतली जातील या सकारण भीतीने पळून जात असता, अिंग्रजांनी ज्यांचेवर मारक होअून गोळीबाराची फैर धरली होती, असे काही शिपाअी पंजाब-

(टीप पुढील पानावर चालू)

केल्या त्यांच्या अिंग्रजी अधिकाऱ्यांनीही आपापलीं शस्त्रें व बिल्ले फेकून देअून ते अिंग्रजी अधिकारी आपल्या शिपायांसह कंपनीचा धिक्कार करू लागले!

पेशावरच्या नेटिव्ह सैन्याला नि:शस्त्र करून टाकल्यानंतर पंजाबसरकारला होतिमर्दान येथे ठेवलेल्या ५५-व्या नेटिव्ह रेजिमेंटकडे लक्ष देण्यास सवड सापडली. ही ५५-वी नेटिव्ह रेजिमेंट फितूर झालेली आहे असाबद्दल सरकारची खात्री झालेली होती. परंतु त्या शिपायांवरचा मुख्य लष्करी अधिकारी कर्नल स्पॉटिसवुड ह्याला सरकारच्या ह्या संशयाबद्दल अत्यंत वाअीट वाटलें. आपले शिपाअी सरकारशी कधीही बेअिमानी करणार नाहीत असें तो जीव तोडतोडून सांगत असताही जेव्हा सरकारचा खुनशीपणा कमी होअीना तेव्हा त्याचें अंत:करण अतिशय व्यग्र झालें. ता. २४ मे रोजी शिपायातील पुढारी लोकांनी या कर्नलच्या जवळ येअून विचारलें की, "अिंग्रजी सैन्य पेशावराहून आमच्यावर चालून येत आहे ही बातमी खरी आहे का?" या प्रश्नास त्या कर्नलने अुडवाअुडवीचें अुत्तर दिलें व शिपाअी लोक समाधान न पावता निघून परत गेले. त्या ५५-व्या नेटिव्ह रेजिमेंटचा पेशावरच्या सैन्याप्रमाणे नायनाट करण्यामाठी अिंग्रजी सैन्य खरोखरच चालून येत होतें. तो दुष्ट प्रकार पहाण्यास बसण्यापेक्षा कर्नल स्पॉटिसवूड ह्याने आपल्या खोलीमध्ये जाअून आत्महत्या करून घेतली. ही बातमी ५५-व्या रेजिमेंटला कळताच त्यांनी खजिन्यावर हल्ला केला व आपआपलीं शस्त्रास्त्रें, निशाणें, व तो खजिना घेअून ते सर्व शिपाअी फिरंग्यांच्या गुलामगिरीला लाथ मारून पुढे चालले. परतु होतिमर्दानपासून दिल्ली काही जवळ नव्हती सर्व पंजाब युरोपियनांच्या सुसज्ज असलेल्या सैन्यासह मध्ये आडवा पडलेला होता व मागे युरोपियन सैन्य पाठलागासाठी चवताळून आलेले होते. अशा स्थितीत मग येणें हे अितके दुरापास्त होतें की, पेशावरच्या शिपायांसारखीं शस्त्रें गुपचूप खाली ठेवून फिरंग्यांना शरण जावें कीं काय असा प्रश्नही त्यांचे कानात गुणगुणू लागला. परतु अंत:पर या फिरंगी दास्याच्या बेड्या पायात अडकविण्यापेक्षा मृत्यूचे पाश गळयात अडकवू देणें त्या वीरांना पसंत झालें व आपल्या मागे लागलेल्या अिंग्रजी सैन्यास त्यांनी गर्जना करून कळविले की 'आता लढत लढतच मरू!' व या ५५-व्या रेजिमेंटने आपल्या स्वदेशस्वातंत्र्यासाठी खरोखरच लढत लढत समरभूमीवर प्राण ठेवले! या ५५-व्या रेजिमेंटची हकीगतही अितकी हृदयद्रावक आहे की तिच्या श्रवणाने 'अपि ग्रावा रोदत्यपि दलति वज्रस्य हृदयम्!' त्याच्या पाठलागासाठी निकल्सन हा अितका तरवारलेला होता की, तो त्या दिवशी २४ तासपर्यंत घोड्यावरून खाली म्हणून अुतरला नाही! शेकडो लोक त्या पाठलागात कापले गेले व बाकीचे लढत लढत सरहद्दीचे बाहेर निघून गेले. परतु तिथे त्यांना कोण आश्रय देणार? तेथील मुसल्मानी जमातींनी त्याचें स्वागत फारच भयकर प्रकाराने करण्यास आरंभ केला. त्यांच्यातील हिंदु लोकाना अेकअेकटें गाठून बळाने मुसलमान करण्यात येअू लागलें. तेव्हा ते

दुर्दैवी शिपाई आपल्या हिंदुत्वाचें संरक्षण करणारा काश्मीरचा हिंदु राजा समर्थ असेल अशा आशेने गुलाबसिंगाचे प्रदेशाकडे आश्रयार्थ, धर्मरक्षणार्थ व देशसेवेप्रीत्यर्थ जाते झाले. वाटेने खडकाळ प्रदेशात अन्न नाही, वस्त्र नाही, विसावा नाही अशा हालअपेष्टांतून ते शेकडो हिंदु शिपाई आपल्या धर्माला आज जगत्त्रयात अेकही त्राता नसावा या दु:खाने अश्रु ढाळीत ढाळीत काश्मीरकडे लोटत असता या अनाथांना कीटमुंगींप्रमाणे चिरडून टाकण्यासाठी अिंग्रजानी दर पावलाला त्याच्या कत्तली करविल्या. परंतु तरीही आपल्या धर्माचा त्राता काश्मीरला आहेच आहे अशा अुत्कटतेने ते हजारो शिपाअी काश्मीरकडे चाललेच होते. धर्माचा त्राता! हाय हाय! काश्मीरच्या रजपूत कुलोत्पन्न गुलाबसिंगाने त्या अनाथ झालेल्या व धर्मरक्षणासाठी मृत्यूचे जवडचातूनही अुडी घेणाऱ्या हिंदु लोकांस ते काश्मीरकडे येत आहेत असें कळताच आपल्या राज्यात पाय टाकण्याला मज्जाव केला! अितकेंच नव्हे, तर या हिंदूंपैकी जो कोणी जिथे म्हणून सापडेल तिथे त्याचा सप्पा अुडविण्याची सक्त ताकीद आपले लष्करास देअून तें आपलें सत्कृत्य अिंग्रजांच्या दरबारी त्याने मोठ्या डौलाने कळविलें! आता अेकतर धर्मांतर करणे किंवा पुन्हा गुलामगिरीला शरण रिघणें किंवा मृत्यूला जाअून मिठी मारणे अेवढेंच पत्करणें त्याना भाग होतें, या तीनपैकी त्या हिंदु शूरांनी तिसरें पत्करले! त्यांची अिंग्रजानी पावली पावली निष्ठुरपणाने अितकी कत्तल चालविलेली होती की, मैदानावर कायमचे अुभारून ठेवलेले वधस्तंभ निरपराधी हिंदु रक्ताने भिजून भिजून कुजू लागले! तरीही अिंग्रजाना त्या रक्तपाताची किळस आली नाही. वधस्तंभ – कायमचे अुभारलेले वधस्तंभ – रात्रंदिवस मारेकऱ्याचें काम करून थकले तेव्हा मग तोफाची तोंडें मोकळीं करण्यात आलीं व ज्या ५५-व्या रेजिमेंटने वास्तविक पाहता अिंग्रजाच्या रक्ताचा अेक थेंबही पाडलेला नव्हता त्याच्यातील अेकूण अेक मनुष्य तोफा लावून अुडवून देण्यात आला. अेक हजार हिंदु चुटकीसरशी गारद केला गेला!! परंतु त्या शेवटच्या क्षणीही त्या हिंदु वीरांनी आपले वीरत्व सोडले नाही. कारण फाशी पाहिजे कीं तोफ पाहिजे ह्या प्रश्नास ते अढळपणाने अुत्तर देते झाले की, "कुत्र्यासारखे आम्ही फाशीवर मरणार नाही! आम्हांला तोफेच्या तोंडाने वीरासारखें मरण अिष्ट आहे."[१]

अत्यंत रानटी मनुष्यालाही शरम वाटेल अशा क्रौर्याने वरील दूर लोकाची कत्तल केल्याबद्दल अिंग्रजी अितिहासकार म्हणतात की, ही शिक्षा क्रूरतम होती यात शंका नाही. परंतु तत्कालीन क्रौर्य हींच सर्वकालीन भूतदया होय! भूतदयेसाठीच ते क्रौर्य करणें अिष्ट होतें! अिंग्रजी अितिहासकारानो, हे तुमचें स्वत:चेंच वाक्य ध्यानात ठेवा बरे! Severity of the hour would be the humanity of all time. ह्या वाक्याचा अर्थ सध्या जसा तुमच्या ध्यानात आलेला आहे तसाच तो आणखी

१. Kaye.

त्या मध्यरात्री बंडाला आरंभ करण्याचे आधींच ती बातमी फिल्हूरच्या देशवीरांना कळविण्यासाठी अेक घोडेस्वार दौडत गेला होता. जालंदरहून हा स्वातंत्र्याचा दूत येताच फिल्हूरच्या शिपायांनी अुठावणी केली. आता फक्त जालंदरचे लोक फिल्हूरला पोंचण्याचा अवकाश होता ! पण अिंग्रजांच्या तोफखान्याला व घोडेस्वारांना टाळून जालंदरने फिल्हूर गांठणें हें काम काहीं सोपें नव्हतें. परतु अिंग्रजामध्ये अितका घोटाळा व गोंधळ माजलेला होता व बंडवाल्यांचा नकाशा अितका चोख होता कीं, अखेर जालंदरचे सर्व शिपाअी आपली *शिस्त बिलकूल मोडू न देता फिल्हूरला येअून पोंचले. या आपल्या हजारो* स्वदेशबधूना आपल्याकडे येतांना पाहून प्रेमाचें भरतें आलेले फिल्हूरचे शिपाअी

---

(टीप मागील पानावरुन चालू)

मध्ये अजनाल्याजवळ अेका बेटात दडून राहिले होते. या सर्व २८२ शिपायांना पकडून कूपरने अजनाला येथे आणलें. तेव्हा या लोकांचें काय करावयाचें हा प्रश्न त्यांचेपुढे येअून पडला. जेथे त्यांची रीतसर चौकशी करावयाची होती, *तेथपर्यंत त्यांना पोंचते करणें वाहनाभावी अशक्य होते. तरी परंतु या लोकांना* जर अेकसहा देहान्ताची अेकच शिक्षा देअून टाकली असती तर अितर तुकडयांना व अुठावणी करणाऱ्या बंडवाल्यांनाही त्यामुळे दहशत बसून, पुढे होणारा संभाव्य रक्तपात अनायासे टळला असता ! म्हणून " आपण ही फार मोठी जोखीम आपल्या शिरावर घेत आहो " याची जाणीव जरी कूपरला होती, तरी त्याने त्या सर्वांना ठार करण्याचाच निर्णय केला. त्याप्रमाणे दुसरे दिवशी सकाळी, दहादहाने बाहेर काढून काही शिखाकडून त्यांचेवर गोळ्या झाडविण्यात आल्या. अशा रीतीने २१६ लोकांची वाट लावली गेली. परंतु तरीही तहशीलच्या गढीत कोंडलेले ६६ लोक अजून तसेच राहिले होते. प्रतिकाराची अपेक्षा असूनही कूपरने दारे अुघडण्यास आज्ञा दिली. परंतु कोठडीतून हालचालीचा ध्वनि काहींच येअी ना ! आत पाहता ६६ पैकी ४५ लोकांचीं प्रेतेंच भूमीवर पडलेलीं दिसलीं; याचे कारण जें कूपरला माहीत नव्हतें ते हें कीं, या कोठडीचीं खिडक्यादारें *अितकीं बंद करुन टाकलेली होती कीं या दुर्दैवी कैदी शिपायांना ही गढी म्हणजे* दुसरी अंधारकोठडीच होअून गेली होती. राहिलेले २१ लोक बाकीच्याप्रमाणेच गोळ्या घालून ठार करण्यात आले. (ता. १–८–१८५७) कूपरने अंगीकारुन पार *पाडलेल्या या महत्त्वाच्या कामगिरीविषयीं अज्ञानी भूतदयाप्रेरित सज्जनांनी* खूपच आरडाओरडा करुन त्याचा निषेध केला. परंतु कूपरच्या या आचरणामुळेच लाहोरच्या तुकडयांत असंतोषाचा प्रसार होण्याचें टळले असे ठासून सांगून रॉबर्ट मॉटगामेरीनें कूपरच निखालस बरोबर होता असें अट्टहासानें प्रतिपादलेलें आहे " —Holmes History of Indian Mutiny, page 393.

आपल्या लायनींतून धावत जाऊन आलिंगन देते झाले व तें अफाट सैन्य आता आपल्या स्वदेशी जमादार सुभेदारांच्या आज्ञेप्रमाणे दिल्लीकडे चालले. वाटेत अेक नदी होती व पलीकडे लुधियाना शहर ह्या देशवीरांच्या चरणधुळीची मार्गप्रतीक्षा करीत होतें !

परंतु लुधियाना शहरी ह्या दिवशीं सकाळीच अिंग्रज अधिकाऱ्यांना जालंदर अुठल्याची तार आलेली होती. पण ती मिळाली तों त्या शहरीं असलेल्या शिपायांना ताब्यात ठेवण्याची सर्व आशा नष्ट झालेली होती. कारण ही सरकारी तार येण्याचे आधीच ह्या शिपायांना आपले बांधव जालंदर सोडून निघाले असल्याची बातमी मिळाली होती ! लुधियाना येथे असलेल्या अिंग्लिश अधिकाऱ्यांनी पिल्हूरहून चालून येणाऱ्या सैन्याला त्या दोन शहरांमध्ये असलेल्या सतलज नदीवर अडविण्याचा निश्चय केला. त्या नदीला असलेला नावांचा पूल तोडून टाकून युरोपियन, शीख व नाभाचे राजाने मदत धाडलेलें लष्कर असे सर्वजण नदीच्या काठाचें संरक्षण करू लागले. बंडवाल्यांना ही पूल पाडण्याची बातमी मिळताच ते तेथून सुमारे चार मैलांवर जाऊन रात्रीचे काळोखात नदी अुतरू लागले. त्यांचे काही सैन्य होडयांतून त्या नदीच्या पार झालेले होतें, काही होत आहे व काही पलीकडच्या तीरावरच अजून अुभें आहे अशी संधि साधून अिंग्लिशांनी व शिखांनी त्यांच्यावर तोफखाना सुरू केला. ही वेळ रात्री सुमारे १० वाजताची असल्याने अिंग्लिशांच्या सैन्याचा बंडवाल्यास थांग लागेना. शिवाय त्यांच्या तोफा अजून नदी अुतरून आलेल्या नव्हत्या. अशा कठीण प्रसंगात सापडलेल्या त्या बंडवाल्यांवर तोफखान्यासुद्धा अिंग्रज व शीख अचानक येअून पडले होते. परंतु त्यांच्या हल्ल्याचा पहिला धडाका सपताच शिपायांनी अेक तसूभरही न हटता फिरंग्यांवर गोळ्यांचा वर्षाव चालविला. अिंग्रजांच्या तोफांपुढे व शिखांच्या माऱ्यापुढे तें नदी अुतरताना फाटाफूट झालेले शिपाओी सुमारे दोन तास आपलें ठाण सभाळीत लढले अितक्यात अिंग्लिशांचा सेनापति विल्यम ह्याचा छातीत अेका शिपायाची अेक गोळी गू गू करीत घुसली व तो मरणोन्मुख होअून जमिनीवर पडला. आता त्या भयंकर रणभूमीवर मध्यरात्रीचा काळोख दूर सारण्यासाठी व स्वातंत्र्ययज्ञाच्या सतप्त मस्तकावर शीतल चंद्रिकेचा वर्षाव करण्यासाठी रजनीनाथ आकाशात अुदय पावलेला होता ह्या चंद्रप्रकाशाने बंडवाल्यांना अिंग्लिशांचा सर्व व्यूह ध्यानात आला व मग ते आपलें ठाण सोडून अिंग्रजांवर निकराने तुटून पडले ह्या हल्ल्यापुढे धीर न धरता तें अिंग्रजी सैन्य शीख राजनिष्ठांसुद्धा आपला जीव घेअून पळत सुटलें !

आपल्या या मध्यरात्रीच्या विजयाने व लवकरच झालेल्या अुष:कालच्या सुंदर प्रभेने वीरश्री अधिकच खुलू लागली आहे असे ते सर्व बंडवाले शिपाओी तुमरे

दिवशीं तुरुंगे मुमारास लुधियाना शहरांत घुमू लागले. या लुधियाना शहरांत अेक मौल्वी अिंग्रजांच्या गुलामगिरींतून मुक्त होअून स्वराज्यसंस्थापना करण्या-साठीं बेरगारचा अुपदेश करीत हिंडत असे. त्या मौल्वींच्या व्याख्यानांनी हें शहर म्हणजे क्रांतिपक्षानें पंजाबमधील अेक प्रचंड केंद्र होअून बसलेलें होतें. आपल्या दास्याच्या बेड्या तोडण्यासाठीं अखेरचा घाव घालण्याचा समय आला आहे अशी सूचना होतांच तें सर्व शहर 'दीन'ची गर्जना करून अुठलें. सरकारी स्टोअर्स लुटून फस्त केले, अमेरिकन मिशनचीं घरें, युरोपियनांचीं घरें, अिंग्रजी पद्धतीचे छापखाने हीं सर्व ठिकाणें जळून खाक झालीं व जेव्हां शिपाअी लोक आंत घुसू लागले तेव्हां त्यांना बरोबर घेअून युरोपियनांचीं टाणीं व विशेषतः सरकारपुढें लांगूलचालन करणारे सर्व नेटिव्ह कुत्रे हुडकून काढण्यासाठीं नागरिकांत अहमहमिका सुरू झाली. तुरुंग फोडले गेले. जें जें सरकारी म्हणून होतें किंवा जें जें अिंग्रजांचें म्हणून होतें तें तें जाळणें अशक्य असलें तर भरडून टाकण्यांत आलें व अशा रीतीनें लुधियाना शहर बंडाच्या ज्वालांत धगधगू लागलें.

परंतु बंडवाल्यांना दिल्लीकडे जाणेंच अिष्ट होतें. लुधियानाच्या किल्ल्यांत राहून तें पंजाबचें नाकें धरून राहणें हेंही अत्यंत जरूर होतें व दिल्लीप्रमाणें जर तें लुधियाना शहरही बंडाचें केंद्र करण्यांत येतें तर त्यापासून अिंग्रजांच्या सत्तेला फारच जोराचा धक्का बसला असता. हें बंडवाल्यांना कळत नव्हतें असें बिलकूल नाहीं; पण लुधियाना संभाळून बसणें हें त्यांच्या परिस्थितींत अगदी असंभव होतें. ते सर्व पटले शिपाअी गडी, नाहीं त्यांना सेनापति, नाहीं त्यांना पुढारी, नाहीं त्यांच्यापाशीं लष्करी सामग्री ! अशा वेळेला जर तिथे अेखादा नानासाहेब, किंवा खानबहादुरखान, किंवा मौल्वी अहमदशाह असता तर लुधियानाला त्यांनी केव्हांही सोडलें नसतें परंतु तदभावीं त्यांना दिल्लीकडे निघून जाण्याशिवाय दुसरा अिलाजच नव्हता व म्हणून स्वराज्य कीं गुलामगिरी याचा शेवटचा निकाल आता दिल्लीचे तटापाशींच लावू अशी गर्जना करीत ते दिल्लीकडे चालते झाले. या वेळेस अिंग्र-जांचा अितका मोड झालेला होता कीं हे शिपाअी दिवसाढवळ्या दिल्लीकडे सिरवत चाललेले असताही त्यांचा पाठलाग करण्याचें नांव काढण्याची देखील कोणास छाती होअीना !!

तेव्हां मीरतच्या अुठावणीनंतर सुमारें तीन आठवडेपर्यंत क्रांतिपक्षाच्या बाजूला जी स्तब्धता धारण करणें भाग पडलें त्या स्तब्धतेचा फायदा अिंग्रजांना पंजाबमध्यें पूर्ण रीतीनें घेतां आला. पंजाबमध्यें युरोपियन सैन्याचा फार जमाव असल्यानें तेथील नेटिव्ह रेजिमेंट्सना अेकतर निःशस्त्र करणें किंवा अकाली व अपरिपक्व स्थितींत बंड करणें भाग पाडून त्यांचा सहज बीमोड करून टाकणें हें फारच सुलभ झालें. राजधानीच्या पक्षाला तीस सस्थानिक व अितर शीख लोक न मिळतां ते आपल्यालाच मिळत आहेत हें पाहतांच सरहद्दीपासून तों सतलजपर्यंत

पंजाबमध्ये जेवढा म्हणून हिंदुस्थानी होता तेवढ्याला हुसकून देऊन पंजाबमधून बंडाचें विषाणें त्यांस वेळीच निर्मूलन करता आलें. या वेळेस लष्करातीलच नव्हे तर गावांतून व शहरांतून सुखवस्तु म्हणून राहिलेले हजारो हिंदुस्थानी लोक पंजाबातून अिंग्लिशांच्या अिच्छामात्रेंकरून हद्दपार केले गेले व अशा रीतीने पंजाब हस्तगत होताच तेथील युरोपियन सैन्याला दिल्लीकडे धाडण्याचा सपाटा सुरु झाला.

पंजाब अिंग्लिशांच्या पूर्ण कह्यात राहण्यास मुख्य दोन कारणें झाली. अेक तर हें की शीख लोकांनी अिंग्रजांचा पक्ष अुचलला. ह्या लोकांनी त्या वेळेस नुसती मुग्धता जरी स्वीकारली असती तरी अिंग्लिशांच्या हातात पंजाब अेक दिवसही राहिला नसता. या शीख लोकांना आपल्या पक्षाला वळविण्यासाठी क्रांतिकारक पुढाऱ्यांनी प्रयत्न केले नाहीत असेही नाही. दिल्ली स्वतंत्र होताच पंजाबमध्ये असलेल्या बादशहांच्या अेका ' अिमानी सेवका 'ने त्यांना पंजाबची सर्व बातमी कळविण्यासाठी अेक लांब, सविस्तर व फारच मार्मिक पत्र धाडलेलें आहे. त्यात तो अिमानी पत्र लेखक ताजुद्दिन लिहितो : " पंजाबातील शीख सरदार हे सर्व नेभळे, भित्रे व हिंदुस्थानी लोकांच्या पक्षास न मिळता फिरंग्यांच्या ताटाखालची मांजरे बनलेलीं आहेत. मी स्वत: खाजगी रीतीने त्यांच्या गाठी घेतल्या, त्यांच्याशी संवाद केले व त्यांना जीव तोडून सांगितले की, फिरंग्यांच्या पक्षास मिळून तुम्ही जो स्वराज्यद्रोह करता आहा तो काय म्हणून ! स्वराज्यात तुमचा स्वत:चा फायदा नाही का ? मग स्वत:च्याच फायद्यासाठी तरी तुम्ही दिल्लीचे बादशहास मिळालें पाहिजे ! यावर ते मज-समोर अुत्तर देतात : हें पहा आम्ही सर्व संधीची वाट पाहत बसलो आहोत. दिल्लीचे बादशहाचा हुकूम आला की या काफिराचे निर्दालन अेका क्षणात करून टाकू ! " अित्यादि. परन्तु जेव्हा दिल्लीचे बादशहाचा हुकूम घेऊन घोडेस्वार शीख राजाकडे आले तेव्हा त्यांनी त्यास ठार मारून टाकले ! पंजाबमध्ये तावा राखण्याग अिंग्लिशांना अगदी सुलभ झाले त्याचे हे प्रथम व विशेष महत्त्वाचे कारण आहे. तथापि शिखांच्या या विरुद्धतेला न जुमानता पंजाबातून अिंग्लिशांना हुसकणेही अगदी शक्यच नव्हते असे मुळीच नाही. अिंग्लिश लोक ज्या विलक्षण ढिले-पणाने मे महिन्यापर्यंत रहात होते त्या ढिलेपणाचा फायदा घेऊन जर पूर्व संकल्पाप्रमाणे सर्वत्र अेकदम अुठावणी झाली असती तर शीख लोकांतही वडवाल्याचा दरारा बसून त्यांच्यात निदान दुफळी खात्रीने पडली असतीच. विशेषत: अिंग्रजांना पंजाबात असलेल्या हजारो नेटिव्ह शिपायांना अेकअेकटे गाठून पूर्ण नरम करता आले तसे बिलकूल करता येतेना. पंजाबात स्वराज्याची अिच्छा नव्हती असे नाही. ठाणेश्वरचे ब्राह्मण लोक व लुधियानाचे मौल्वी, फिरोजपूरचे दुकानदार व पेशावरचे मुसलमान सर्वत्र स्वराज्यासाठी व स्वधर्मासाठी जगी जिहाद करा असा अुपदेश देत हिंडत होते वरील पत्रलेखकही लिहितो की : " बाद-शहाच्या दरबारातून जर अेखादा सरदार सैन्यासह अिकडे धाडता येईल तर

पंजाब धुटकेसरशी स्वतंत्र होईल. सर्व हिंदुस्थानी सैन्य ठिकठिकाणी अुठून त्याच्या ध्वजाखाली येईल, व शिपायांना पळता भुई थोडी होईल व माझी अशी खात्री आहे की सर्व हिंदु व मुसलमान तुमच्या भाग्यशाली सिंहासनाला प्रेमाने मुजरा करतील. शिवाय त्या जून महिन्यातच अुठावणी करणें अिष्ट आहे. कारण अिंग्रजी सोजिरांना अुन्हाचे तापात लढणें अगदी मुष्कील होत असतें. ते लढण्याचे आधीच पटापट मरून पडतात. म्हणून आपण अेखादा सरदार सैन्य देअून पंजाबवर पत्रदर्शनी धाडावा अि. अि. !" पंजाबातील लोकमनाचा ओढा दिल्लीकडे असूनही त्याचा दिल्लीला फायदा घेता आला नाहीं याचें कारण हें होय की, दिल्ली अुठल्या-वर तीन आठवड्यांपर्यंत क्रांतीची लाट थबकून राहणें अपरिहार्य झालेलें होतें. हेच जर पूर्वसंकेताप्रमाणे सर्वत्र साधारण अेका आठवड्यात अुठावण्या झाल्या असत्या तर अिंग्रजांना कोठेही हालचाल करता आली नसती. पंजाबात अेकअेकटी व अनाथ सैन्यें निःशस्त्र करता आलीं नसतीं, क्रांतीची लाट अेकसारखी अुसळत गेल्याने शिखादिकांसारखे अनिश्चित लोकही तिच्यात वाहू लागले असते व आरंभ विजयी झालेला पाहून ज्यांच्या मनात क्रांतीला मिळण्याची अिच्छा होती परंतु जे तसें करण्यास भीत होते त्यांनाही स्फुरण चढलें असतें.

सारांश, शीख लोकांच्या देशद्रोहामुळे व अपक्वकालीन अुठावणीमुळे पंजाबात क्रांतीचीं पाळेमुळें खणून टाकलीं गेली व पंजाब म्हणजे दिल्लीच्या पाठीचा कणा असल्याने दिल्लीला ह्या बातमीनें निरुत्साह अुत्पन्न केला.

ह्या तीन आठवड्यांत अिंग्रजांच्या व बंडवाल्यांच्या पंजाबमधील व दिल्ली-कडील हालचाली वर दिलेल्याच आहेत. दिल्लीचे खाली अिंग्रजांनी या तीन आठवड्यांत चहूकडे शक्य तितका बंदोबस्त करून कलकत्त्यापासून अलाहाबादकडे युरोपियन सैन्याचा अेकसारखा ओघ चालू ठेवलेला होता. मुंबअी व मद्रासकडे, राजपुतान्यात व सिंधप्रांतात बंडाची सहानुभूति बाळगणारे कोणी आहेत कीं नाहीत याचा बारीक तपास करून त्याचा पंजाबप्रमाणे वेळीच पुरता बीमोड करण्याचे सक्त प्रयत्न सुरू झाले होते व ह्या आगाअू सूचनेबद्दल परमेश्वराचे आभार मानीत मानीत आता बंडाच्या ज्वाला आपण ठिकठिकाणी विझवून टाकलेल्या आहेत असा त्यांना भरवसाही वाटू लागला. या तीन आठवड्यात अिंग्रजांच्या ह्या हालचाली चाललेल्या असताना क्रांतिपक्षाकडे तुरळक अुठावण्यांशिवाय जिकडे तिकडे शक्य तितकी गुप्तता राखलेली होती. अशी अुभयपक्षांची ता. ३०-मेपर्यंतची स्थिति होती. ही स्थिति मेच्या ३० तारखेपासून कशी पालटली, अिंग्रजांच्या मनात अुत्पन्न होत चाललेल्या भरवशाचा कसा अेकदम चक्काचूर अुडाला व या तीन आठवड्यात झालेल्या नुकसानीला भीक न घालता क्रांतीच्या ज्वाला कशा अेकदम अुफाळून भडाडल्या अिकडे आता वळलें पाहिजे. राज्यक्रांत्या ह्या काही सूत्रबद्ध नियमांनी चालत नसतात. राज्यक्रांति हे काही घड्याळामारखें अगदी तंतोतंत

चालणारें यंत्र नाही, राज्यक्रांत्या ह्या स्वैरसंचारप्रिय आहेत. त्यांना तत्वाचें बंधन काय तें असू शकतें. बाकी किरकोळ नियम त्यांच्या अपूर्व धक्क्यासरशी कोसळून जातात. राज्यक्रांतीला अेक नियम आहे व तो हा की, तिला मारलेली चिकाटी कायम ठेवली पाहिजे, वाटेल त्या नवीन व अकल्पित परिस्थिति मध्यंतरी अुत्पन्न होतील, परंतु त्यांच्या योगाने न थांबता त्यांना फेटाळून पुढे चाललें पाहिजे. राज्यक्रांति हा अेक विचित्र पक्षी आहे. तो कारा दिवसांनीं पिंजऱ्यातून बाहेर पडला की, अिष्टस्थली जाण्याचे आधी आकाशात अितस्ततः खूप भराऱ्या मारू लागतो. ज्याला त्या गरुडासारख्या पक्ष्यावर बसून अिच्छित स्थलीं जाणें असेल त्याने त्याचे पाठीवर अढळ आसन ठेवलें पाहिजे. भराऱ्या मारून मारून अेकदा त्याचे पंखांची रग जिरली की, मग त्याचे पाठीवर अजूनपर्यंत जर कोणी अढळ राहिलेला असेल तर त्याच्या पूर्ण लगामी तो येअू लागतो.

मीरतच्या लोकांनी ह्या राज्यक्रांतीच्या पक्ष्याला पिंजऱ्यातून किंचित् आधी अुडवून दिलें होतें तरी त्यामुळे गांगरून न जाता श्रीमंत नानासाहेब, लखनौचे मौलवी, झाशीची विजली छबेली वगैरे धुरंधर वस्तादांनी त्या पक्ष्याला कशी विचित्र चिकाटी मारली हें–अितिहासा, आता तू आम्हांला सांग! त्या गरुड पक्ष्याला पकडण्याची चिकाटी हिंदभूच्या सर्व हस्तांनी न मारल्यामुळे तो आकाशात कशी कशी भिरकावून दिली गेली हें, अितिहासा, तू आम्हांला सांग! तू आमच्याबरोबर पहिल्या वर्गासाठी स्तुतिस्तोत्रें गा व तू आमच्या बरोबर दुसऱ्या वर्गासाठी आक्रोश करू लाग!!

* * *

प्रकरण पांचवें

# अलिगड व नसिराबाद

मीरतला अुत्पन्न झालेल्या प्रचंड धरणीकंपाचा धक्का जसा वर अंबाला व पंजाबकडे सर्व प्रदेश अुन्मळवून टाकीत होता तसाच त्या धरणीकंपाच्या धक्क्याची दुसरी लाट मीरतच्या खालच्या प्रदेशातही सर्व भूमीला कंपित करू लागली होती. दिल्लीच्या खालच्या भागात अलिगड शहरी ९-व्या नेटिव्ह पायदळाची अेक रेजिमेंट होती. रेजिमेंटचे काही भाग अलिगडच्या मुख्य ठाण्याला सोडून मिनपुर, अिटावा व बोलंद शहर येथे ठेवण्यात आलेले होते. ह्या ९-व्या रेजिमेंटवर सरकारचा अितका विश्वास बसलेला होता की, हिंदुस्थानच्या सगळ्या शिपायांनी बंड केलें तरी ९-वी रेजिमेंट राजनिष्ठेपासून तिळमात्रही चळणार नाही अशी सरकारची दृढ समजूत

होती. बोलंद शहराच्या याजारातून राज्यक्रांतीचीं गुप्त कारस्थानें सुरु असल्याची अफवा कर्णोपकर्णी आलेली असताना त्या क्रांतीपासून आपले ९-व्या रेजिमेंटचे शिपाओी तरी पाग अलिप्त राहतील असें समजून बोलंद शहराचे अधिकारी लटक्या सुरक्षितेत गुंगून राहिले होते.

मे महिन्याचे सुमारास बोलंद शहरच्या आजूबाजूच्या गांवानी आपल्यातला अेक माननीय, विश्वासू व स्वातंत्र्यप्रिय ब्राह्मण निवडून काढून त्याला तावडतोब बोलंद शहराला धाडून दिलें. अेकीकडे जिच्या राजनिष्ठेन अिंग्रजांनी आपला सर्वस्वी विश्वास ठेवलेला आहे व दुसरीकडे स्वदेशमाता साश्रु नेत्रांनी जिचे टक लावून पाहत आहे अशा त्या बोलंद शहरच्या लष्करी छावणीकडे तो ब्राह्मण भयंकर कल्पनाच्या व त्याच्या भावी यशापयशाच्या वादळात सापडलेले आपले अंत:करण घेऊन झपाझप चालू लागला. स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी व स्वधर्माच्या रक्षणासाठी माझे स्वदेशबांधव माझ्या विनंतीला मान देतील का, स्वराज्याच्या अुच्चतर वातावरणात भराऱ्या मारणारे पण ह्या लष्करी गडयापाशी अमर्लेल का, का माझ्या या भविष्यवादाला धिक्कारून देऊन गुलामगिरीच्या अंधकारातील गाढ झोंपेलाच जवळ करुन सुंदर अुष:काल पाहण्यासाठी त्या झोपेचा भंग मी करीत आहे म्हणून माझे शिरावर माझ्या देशबधूंची सुरीच चालू लागेल ? अशा मनोविकारांचा गोंधळ हृदयात चाललेला असताही ज्याच्या तोंडावर मूर्त शांतता नांदत होती असा तो ब्राह्मण आपला विलक्षण संदेश घेऊन त्या लष्करात प्रवेश करता झाला. त्या शिपायास आपली दीक्षा देताना तो म्हणाला की, लग्नाची अेक प्रचंड वरात काढून या गलबल्यात आपण सर्वांनी अुठावणी करावी व सर्व अिंग्रजांची कत्तल अुडवून दिल्लीकडे निघून चलावें. अिंग्रजाचें राज्य अुलथून पाडण्याच्या तत्त्ववादाला कोणी विरुद्ध नव्हतेच परंतु त्यातूनही त्या तत्त्ववादाची वस्तुस्थिति कशी घडवून आणावी ह्या प्रश्नाचीही ही तोड निघालेली अैकून तिचा ग्राह्याग्राह्य विचार चालला आहे तोंच त्या रेजिमेंटमधील तीन शिपायांनी अिंग्रजाकडे बातमी देववून त्या ब्राह्मणास अेकदम कैद केले. तावडतोब बोलंद शहराहून त्या ब्राह्मणास रेजिमेंटच्या मुख्य ठाण्याकडे रवाना करण्यात आले व त्या सर्व शिपायांसमक्ष फाशीवर चढविण्याची शिक्षा ठोठावण्यात आली. हें वृत्त अलीगडकडे घडत असताना अिकडे बोलंद शहरातल्या तीन राजनिष्ठांची सर्वत्र छी थू चालू झाली. त्याच्या डोक्यावर शापांचे पर्वत आदळून बोलंद शहरातील सर्व लष्कर अधिकाऱ्याची परवानगी न विचारता ज्या ठिकाणीं तो क्रांतिदूत नेलेला होता त्या अलिगड शहराकडे निघून गेलें. ता. २० मेच्या सध्याकाळी त्या ब्राह्मणाला फाशीवर नेण्यात आले. बाजूला सर्व रेजिमेंट अुभी केलेली होती. आता काय करावें ? ता. ३१ मेपर्यंत दम धरावा तर 'ब्राह्मण हातचा चालला' असें अेकमेकांस म्हणून वर दृष्टि फेकतात तो सगळ्याच्या नजरेस आलें की ब्राह्मण हातचा चालला नसून तो निघूनही गेला आहे ! आणि फाशीवर

त्याचा मृण्मय देह मुद्राचें हिंडीस व्याख्यान देत लोंबत राहिलेला आहे ! भयंकर व्याख्यान ! शब्दांनें अेवजी जिथे रक्ताच्या चिरकांड्या अस्खलित रीतीने वाहू लागलेल्या! त्या भयंकर वक्त्याने जिवंतपणी जें वक्तृत्व कधींहि केलें नसते तें आज तो फाशीवरुन अेक शब्दही न बोलता करू शकला ! कारण क्षणार्धात त्या असंख्य शिपायाच्या गर्दीतून अुसळी मारून अेक शिपाअी पुढे आला व आपली तरवार त्या फाशीवर लोंबणाऱ्या ब्राह्मणाकडे रोखून ओरडला " अरे यार, हा शहीद रक्तात न्हातो आहे ना !" दारूच्या ढिगावर पडलेली ठिणगी तरी किंचित् अुशीरा पेट घेत असेल पण त्या शूर शिपायाच्या तोंडातून सुटलेल्या तेजस्वी ठिणग्यांना त्या हजारो शिपायांच्या अंतःकरणात घुसण्यास तितकाही अुशीर लागला नाही ! त्यांनी आपल्या तरवारी अेकदम अुपसल्या व 'फिरंगी राज्याचा नायनाट असो ' अशी गर्जना करीत शोधाने वेडे झालेले ते हजारो शिपाअी नाचू लागले !

हें पाहताच अिंग्रजी कामगार भयाने गोंधळून गेल्यासारखे झाले ह्यात काहीच नवल नाही. 'राजनिष्ठतम' ९-वी रेजिमेंटही बंड करून अुठली, अितकेच नाही तर तिने 'जर अिंग्रजांना आपला जीव वाचवावयाचा असेल तर आताच्या आता अलिगड सोडून चालतें व्हावें' असे कळविलें !! ह्या औदार्याचा फायदा घेअून अलिगडचे सर्व अिंग्रज अधिकारी, त्यांच्या बायका, पोरे, लेडी आअुटरॅम वगैरे सर्व अेकूण अेक अिंग्रज मुकाट्याने त्या शहरातून निघून गेला. रात्री बाराचे आत अलिगडला अिंग्रजी सत्तेचें नांव देखील अुरलें नाही !

अलिगड स्वतंत्र झाल्याची बातमी ता. २२ मेच्या संध्याकाळी मिनपूरला पेअून पोचली. ह्या मिनपूरला वरील ९-व्या रेजिमेंटचा अेक भाग ठेवलेला होता हे वर सांगितलेलेच आहे. ह्या शिपायांच्या मनात काय प्रकार चाललेले होते हें त्यांच्या अलिगडकडे असलेल्या बाधवांच्या हकीकतीवरून स्पष्टच आहे. - मेच्या १० तारखेला मीरत अुठल्यानंतर तिथे अिंग्रजाविरुद्ध लढलेला राजनाथसिंग नावाचा शिपाअी आपल्या जीवती नांवाच्या गावी परत आल्याची वर्दी मिनपूरचे अधिकाऱ्यांस लागल्यावरून त्यांनी तेथील ९-व्या रेजिमेंटच्या काही लोकांस त्याला पकडण्यासाठी धाडलें. परंतु त्या शिपायांनी राजनाथसिंगास पकडण्याचे अेवजी सुरक्षित रीतीने जीवतीबाहेर पोचवून दिलें व अिंग्रजांकडे रिपोर्ट दिला की जीवती येथे राजनाथ सिंगनाथ कोणी राहत नाही. रामदीनसिंग नावाच्या अेका शिपायाने हुकमाविरुद्ध वर्तन केलें म्हणून त्यास कैद करून अिंग्रजी अधिकाऱ्यांनी शिपायांच्या पहाऱ्यात त्यास अलिगडकडे धाडून दिले परंतु अर्ध्या वाटेवर येताच पहाऱ्यावरील शिपायांनी त्या रामदीनसिंगास मुक्त केलें, त्याच्या बेड्या तोडून टाकल्या व गुपचूप रीतीने ते मिनपूरला परत आले.[१]

१. Charles Ball, Vol I, page 134.

असा हिप्पीपर्यंत आलेले हें नेटिव्ह लष्कर पक्कें मतलबसाधूपणासाठी टपून बसलेले होतें व त्या अेकमयोत्थानापूर्वीच दाबून आपले पाय साफून टाकण्याची संधि मिळू नये म्हणून त्यांनी यत्न अितके शांत वर्तन चालविलेलें होतें की, ही ९-वी रेजिमेंट म्हणजे 'राजनिष्ठतम' म्हणून मानली गेली. परंतु वर सांगितलेल्या ब्राह्मणाच्या दोन्यापासून केवळ शिपायांच्याच नव्हे तर अलिगड प्रांतांतील सर्व जनतेचा रोष कलिरेचाला गेलेला होता. ही ९-वी रेजिमेंट अलिगड प्रांतात माजत चाललेल्या असंतोषाला दाबून टाकण्यासाठी जेव्हा नुकतीच धाडण्यात आली होती तेव्हा ती शहरातून चालली असता बाजारच्या साटीक व चमारी लोकांनी त्या शिपायांना युरोपियनांस कधी मारणार व स्वातंत्र्याकरिता कधी अुठणार असे प्रश्न केलेले होते! साटीक व चमारी लोकांनीही ज्याकरिता चार्जी करावी तें कृत्य जास्त लांबणीवर टाकणें शिपाअीगड्यांस कसें रुचेल! अितक्यात अलिगडची बातमी आली. तेव्हा रेजिमेंटमधल्या अितर बंधूंनी अुठावणी केली असता आता आपण तेवढें थांबून बसणें नित्य आहे, असें पाहून मिनपुरचें लष्कर बंड करून अुठलें. त्यांनीही आपल्या अलिगडच्या बांधवांप्रमाणे हातात सापडलेल्या अिंग्रजांस जीवदान दिलें, शस्त्रागारातून शस्त्रें व मुबलक दारूगोळा अुटांवर चढविला व त्या सर्व शिपायांनी ता. २३ मे रोजी दिल्लीकडे तातडतोब कूच केलें.

आता याच वेळेला अिटावा येथे असलेल्या तुकडीमध्येही धनवचनी अुडून राहिलेली होती. ह्या अिटावा शहरावरील मुख्य मॅजिस्ट्रेट व कलेक्टर अॅलन ओ. ह्यूम ह्याला मीरतची बातमी कळताच त्याने असिस्टंट मॅजिस्ट्रेट डॅनियल ह्याच्या साहाय्याने शेजारच्या रस्त्यावर टेहेळणी करण्यासाठी अेक निवडक सैन्य तयार केले. ता. १९ मे रोजी मीरतहून आलेल्या दहापांच शिपायांची व ह्या सैन्याची गाठ पडली. ते मूठभर शिपाअी शरण गेले व त्यांना काही थोड्या लोकांच्या पहाऱ्यात असताना शस्त्रें खाली ठेवण्याचा हुकूम मिळाला. हा हुकूम आपणास शिरसामान्य आहे असे दाखवून त्या मीरतच्या शिपायांनी आपल्या शत्रूंना पूर्ण गैरसावध केलें व मग तीच शस्त्रें घेअून त्यांनी त्या सगळ्यांची कत्तल केली! ही बातमी फुटते न फुटते तोंच ते शिपाअी शेजारच्या अेका हिंदु देवालयात घुसले व आत सशस्त्रतेने टपून बसले. अिटावा शहरचा कलेक्टर मि. अॅलन ओ. ह्यूम ह्याला ही बातमी कळताच तो व मि. डॅनियल ह्यांनी काही नेटिव्ह सैन्य बरोबर घेअून त्या देवळावर हल्ला करण्याकरिता कूच केलें. प्रथम ह्यूम ह्याला अशी खात्री होती की, आपल्या शिपायांनी हल्ला चढविण्याचे आधींच ते बंडखोर देवळात गावकऱ्यांकडून मारले गेले असतील! परंतु देवळाजवळ येताच त्याच्या ध्यानात आले की गावकऱ्यांनी त्या बंडखोरास मारण्याचे अैवजी त्याची प्रशंसा करीत त्या देवळात मुबलक रसद पुरविली होती. गांवकऱ्यांनी आपणास फसविले तरी निदान आपल्याबरोबर आलेले शिपाअी व पोलीस तरी बंडवाल्यांस मिळणार नाहीत असा

विश्वासाने देवळावर समोरुन हल्ला करण्याबद्दल हुकूम देऊन मि. डॅनियल हा स्वतः पुढे धावला. पण मागे काय? फक्त अेक नेटिव्ह काय तो त्या अिंग्रज सेनापतीची सेना होण्यास कबूल झाला! परंतु ह्या गोऱ्या सेनापतीला व त्याच्या त्या काळ्या हस्तकाला अेका निमिषार्धात देवळातील गोळ्यांनी खाली पाडलें व हा भयंकर प्रसंग पाहताच स्वारी चढवून आलेले ते ह्यूमसाहेबही त्या शिपायांना त्यांच्या देवळातच सोडून अिटाव्याकडे रस्ता सुधारते झाले!

त्या दिवशी म्हणजे ता. १९ मेलाच अिटावा येथे असलेले नेटिव्ह सैन्य अुठावयास पाहील असा सर्वत्र बोलवा होता. परंतु त्या सैन्याचें मुख्य ठाणें अलिगडला असल्यामुळे व तिकडून अुठण्याचा अजून हुकूम न मिळाल्यामुळे अिटाव्याचे नेटिव्ह सैन्य अर्थातच स्वस्थ राहिलें असते. परंतु मध्यंतरीच त्या शहीद ब्राह्मणाच्या आत्मयज्ञातील ज्या ज्वाला अेकाअेकी भडकल्या त्यांत अलिगड लागल्याचीही वार्ता अिटाव्याला ता. २२ला आल्याने तेथील शिपायांस अुठणे प्राप्तच झाले. ता. २३ मेला त्या सर्व सैन्याने हरहर महादेवाची गर्जना केली, व अेका हातात तरवार व दुसऱ्या हातात पेटती चूड घेअून शिपायी लोकांनी युरोपियनांचें तळावर हल्ला चढविला! खजिना ताब्यात घेतला, तुरुंग फोडून टाकले व सर्व अिंग्लिशांनी तत्क्षणी जीव घेअून पळून जावें नाहीतर त्यांची सरसहा कत्तल केली जाअील असें त्यांस कळविले गेलें. हा अभूतपूर्व व भयप्रद प्रकार अैकताच गर्भगळीत झालेले अिंग्रज लोक आपल्या बायकामुलांमुद्धा वाट फुटेल तिकडे सैरावैरा धावू लागले! खुद्द अॅलन ओ. ह्यूम ह्याने शिपायांच्या ह्या औदार्याचा फायदा घेअून व अेका नेटिव्ह बाअीचा वेष धारण करुन 'यः पलायते स जीवति' चा आश्रय केला![2] ही ह्यूमबाबी पळून जाताच अिटावा पूर्ण स्वतंत्र झाल्याची ग्वाही फिरविली गेली व नंतर ते सर्व शिपाअी दिल्लीकडे जाणाऱ्या आपल्या रेजिमेंटच्या मुख्य भागास जाअून मिळाले.

अशा रीतीने ही सर्व रेजिमेंट अेका व्यक्तीसारखी अेकदम बंड करुन अुठली. अितकेंच नव्हे, तर खजिना लुटणें, देश स्वतंत्र करणें, परक्यांस ते आपल्या तरवारीचे टोकावर असतानाही जीवदान देणें व मुबलक रसद व दारुगोळा घेअून दिल्लीकडे निघून जाणें या कार्यक्रमाची तालीम अलिगड, बोलंदशहर, मैनपुरी व अिटावा ह्यासारख्या दुरदुरच्या भागांतही बरोबर अुठवून, दिल्लीचे सगळे नेटिव्ह लष्कर अुठले तरी जी अुठणार नाही अशी सरकारची खात्री होती तीच रेजिमेंट सगळे अुठले नाहीत तोंच तरवार अुपसून अुठली, हे वृत्त कळताच अिंग्रजांना आपल्या आयुष्याची शाश्वतता म्हणून अुरली नाही!

---

२. Mr. Hume, the magistrate escaped in the dress of a native woman. —Red Pamphlet, Part II, page 70.

अजमीरपासून सुमारें ६ कोसांवर नसिराबाद नांवाचें गाव आहे. त्या गावी अिंग्रजी शिपायांची छावणी असून तिथे ३०-वी नेटिव्ह पायदळ रेजिमेंट, नेटिव्ह तोफखाना, १-ली मुंबअी लान्सर व नुकतीच मीरतहून तिथे आणविलेली १५-वी रेजिमेंट अितकें सैन्य ठेवलेलें होतें. ह्या मीरतहून नुकत्याच आणविलेल्या रेजिमेंट-मध्ये अिंग्रजी अंमलाचा अत्यंत द्वेष व तो झुगारून टाकण्याची अुत्कट लालसा पूर्ण भरलेली होती. मीरतच्या गुप्त सभांत काय काय ठराव झाले हें सर्व प्रत्यक्ष रीतीनें नसिराबादच्या शिपायांस समजावून सांगण्याची ही आयती दुर्मिळ संधि त्या मीरतच्या अेक हजार राजकीय अुपदेशकारांनी वाया जाअू दिली असती तरच नवल होतें! मुंबअी लान्सरचे काही नेटिव्ह विरहितकरून सर्व नेटिव्ह लष्कराचें अेकमत झालें व ते योग्य संधीची वाट पहात वाकून राहिले. ता. २८ मेला ती संधि आली. कारण त्या दिवशी तोफखान्यावरचा अंमल फारच ढिला झालेला होता. अैवदर्य ठरलेली निशाणी मिळताच मीरतच्या १५-व्या रेजिमेंटने प्रथमतः तोफखाना ताब्यात घेतला. तो परत घेण्याकरिता मुंबअीच्या लान्ससंगह अिंग्रजी अधिकारी त्यावर चालून गेले. परंतु थोड्याच वेळात त्या लान्सर्समधील योद्धे रणांतून पाय काढते झाले व त्याचे अिंग्रजी अधिकारी प्रेतें होअून जमिनीवर आदळले. न्यूबेरी याचा नुसता प्राणान्त झाला अितकेंच नव्हे तर त्याच्या देहाचे तुकडे तुकडे अुडविण्यात आले. कर्नल पेनी, कॅप्टन स्पॉटिसवुड यांचाही त्या लढाअीनें बळी घेतला! तेव्हा त्या शहराची आशा सोडून देअून सर्व अिंग्रज लोक बिस्तरकडे पळून गेले. बंडवाल्यांनी खजिना आपल्या ताब्यात घेतला व त्याच्या-वरील सर्वानुमते निवडलेल्या मुख्य नेटिव्ह सेनापतीनें दिल्लीचे बादशहाचे नांवाने शिपायास नजर नजराणा दिला. युरोपियन घरें जाळण्यात आलीं, नसिराबाद स्वतंत्र झाल्याची द्वाही फिरविण्यात आली व बंडवाल्यांचा तो दोन तीन हजार लोकांचा समुदाय आपलीं शस्त्रास्त्रें चमकवीत, लष्करी थाटानें, आपल्या स्वदेशी नूतन सेनापतीच्या अधिपत्याखाली, लष्करी बँडचें विजय संगीत वाजवीत वाजवीत दिल्लीकडे चालू लागला!

* * *

प्रकरण सहावें

## रोहिलखंड

रोहिलखंड प्रांतातील मुख्य राजधानीचें शहर बरेली हे असून त्या प्रांतात रोहिला जातीच्या पठाणाचें असलेलें राज्य अिंग्लिशांनी जिंकून घेतल्यापासून त्या अपमानाचा सूड घेण्यासाठी टपून बसलेल्या शूर, धिप्पाड व कडव्या मुसलमानांची

पुष्कळ वसती वसलेली होती. सत्तावनचे सुमारास अिंग्लिशांच्या ताब्यातून सुटण्या-साठी बंडाची मसलत ज्या काही प्रांतात रंगात येत चाललेली होती त्यांत रोहिल-खंडाची व त्याच्या राजधानीचीही गणना केली पाहिजे. बरेली येथे ह्या वेळेस ८ वें अिरेग्युलर घोडेस्वार, नेटिव्ह पायदळाची १८-वी व ६८-वी रेजिमेंट व नेटिव्ह तोफखान्याची अेक बॅटरी अितकें नेटिव्ह सैन्य ठेवलेलें असून ह्या सर्व ब्रिगेडवर सिवाल्ड याला ब्रिगेडियर नेमलेलें होते. अेप्रिलच्या सुमारास काही शिपायांनी काडतुसांसंबधी शंका प्रदर्शित केलेली होती. परंतु तिकडे लक्ष न देता सरकारने अेक अेकट्या शिपायाकडून त्या काडतुसांना वापरविलें. पुढे अेकदा दोनदा गडबड अुडून शिपायांमध्ये जरी क्षोभ वाढतच चाललेला होता तरी सरकारास त्याच्या तोंडावर संतोषाशिवाय काही अेक आढळत नव्हतें.

अितक्यात मीरत अुठल्याची बातमी ता. १४ मे रोजी बरेलीला येअून पोचली. ही बातमी येताच अिंग्लिशांनी आपलीं बायकामुलें नैनीतालकडे धाडून देअून शिपायांमध्ये असलेल्या घोडेस्वारांना अगदी सज्ज राहण्याची ताकीद दिली. ही घोडेस्वारांची पलटण नेटिव्हच होती. परंतु ती सरकारच्या पूर्ण विश्वासाची होती. ह्या घोडेस्वाराचे रेजिमेंटसह बरेलीच्या सर्व नेटिव्ह शिपायांना परेडवर बोलावून तेथून मुख्य अिंग्रजी अधिकाऱ्याने ता. १५ मे रोजी त्यास अुत्तम वर्तन ठेवण्याबद्दल अुपदेश केला. नवीन काडतुसें अितःपर वापरण्याचें बंद केलेलें आहे, शिपायांना पसत पडतील तीं जुनीच काडतुसें त्यांनी वापरावीं, फार काय पण नवीन काडतूस परेडी-वर दिसलें तर मी स्वतः त्याचा चुगडा करीन असे स्पष्ट रीतीने सांगून त्याने शिपायांचें काडतुसाबद्दलचें भय दूर करण्याचा प्रयत्न केला. वास्तविक पहाता आता शिपायांचे भयावर व्याख्यान देताना काडतुसाचें विवरण करणें म्हणजे रंगपातर करण्याचा दोष होत आहे. खुद्द कमान्डर-अिन-चीफने सर्व हिंदुस्थानातील शिपायांस लष्करी हुकुमाने जाहीर केलेलें होतें की, अितःपर नवीन काडतुसें प्रयोगात आणण्याचें सरकारने बंद केलेलें आहे[1] मीरतच्या अुठावणीनंतर जेव्हा सरकारने आपण होअून ही माघार घेतली व ज्या काडतुसाबद्दल मे महिन्यापूर्वी अितका हट्ट धरला होता तीं काडतुसें वापरणें आपण होअूनच बंद केलें, तेव्हा या कृत्यात सरकारच्या भ्याडपणाशिवाय व दुर्बलत्वाशिवाय शिपायांना व लोकांना दुसरें काहीच आढळलें नाही. काडतुसामुळे शिपाअी बिथरले आहेत म्हणून सरकारची समज होण्यात जी चुकी झाली तिला पूर्ण स्फोट बरेलीला होण्याचा प्रसंग आला ना. ब्रिगेडियरने शिपायांस 'काडतूस मी स्वतः फोडून चुरा करीन ' असें सांगून त्यांची भीति घालविण्याचा प्रयत्न केला परंतु आता असल्या हुकमाने स्थिरस्थावर होण्याचे दिवस अुरले नव्हते. कारण शिपायांना भीति काडतुसांची नव्हती. नव्हे काडतुसाबद्दल कसलाही हुकूम देण्यात आला नसो त्याचा काय अुपयोग ? अिंग्लिशांना

हुकूम देण्याचा अधिकार असावा की नसावा हान जिथे वाद पडलेला आहे तिथे सर्वांना हुकूम सोडणें म्हणजे तो वाद मिटविणें नसून त्याला जास्तच विकोपास नेणें होय ! आता पाइन्टुगाबद्दल चांगले किंवा वाईट मुळींही व्याख्यान देणें म्हणजे विषयांतर होय !

कारण दिल्लीस स्थापन झालेल्या स्वकीय सिंहासनाकडून हिंदुस्थानचा स्वातंत्र्य ध्वज सोडून धरण्यासाठी रोहिलखंडातील लोकांना आग्रहाचें व निकडीचें निमंत्रण आलेले आहे. आता या निमंत्रणपत्रिकेचा अक्षर करावयाचा काय ?

"दिल्लीच्या फौजबहादुराकडून बरेलीच्या फौज बहादुरास प्रेमालिंगन. भाअी हो, दिल्लीस अिंग्रजाशी लढाअी जुंपलेली आहे. परमेश्वराच्या कृपेने आपला अेक पराजयही त्याचे दहा पराजय झाल्याअितके नुकसान करीत आहे. असंख्य स्वदेशी वीर अिकडे लोटत आहेत. अशा वेळेस आपण तिथे जेवत असाल तर अिथे हात धुवावयास या. शहांचा पादशहा व वैभवाचें आगर असा आपला दिल्लीचा बादशहा तुमचा अुत्तम मानमरातब ठेवील व तुमच्या सेवेला अुत्तम बक्षीस देअील. तुमच्या तोफांच्या गडगडाटासाठी आमचे कान व तुमच्या दर्शनासाठी आमचे नेत्र चातकासारखी मार्गप्रतीक्षा करीत आहेत. या ! जलदीने या, कारण बंधूंनो, मधदागमनाच्या वसंताशिवाय येथे गुलाब कसा फुलेल ? दुधाशिवाय मूल कसे जगेल ? "[1]

अशा या निमंत्रणपत्रिकेचा अक्षर करावयाचा काय ? हीं निमंत्रणें येत असताच रोहिलखंडातील शेवटचा स्वतंत्र रोहिला पुढारी हाफीझ रहमत याचा वंशजही बरेलीस गुप्त कटाचें जाळें विणीत बसलेला होता. खान बहादुरखान हयाला अिंग्रजांकडून तो हाफीज रहमतचा वंशज म्हणून अेक व तो अिंग्रज सरकारच्या जज्जाच्या जागेवर होता म्हणून अेक अशी दोन पेन्शनें मिळत असत. अिंग्रजी अधिकाऱ्यांची मर्जी संपादण्यात खान बहादुरखान म्हणजे पूर्ण वस्ताद आहे अशी त्याची तिकडे फार ख्याति असे. सरकारचाही त्याच्यावर तसाच विश्वास होता ! आणि बरेलीच्या सर्व गुप्तकटाचा हाच प्राण होता !

*बरेलीला असलेले सर्व नेटिव्ह शिपाअी व रोहिलखंडातील स्वातंत्र्यप्रेमी* लोकांना या निमंत्रणपत्रिकेत दिल्लीकडे जलदीने या असे जरी लिहिलें होतें तरी पूर्वीचे बेताप्रमाणे ता. ३१ मेची वाट पहात बरेलीचे सर्व शिपाअी अिंग्रजांच्या लष्करी हुकुमाला काडीअितकेंही न मोडता आपआपलीं कामें करीत होते. थोडेच दिवसात मीरतला बंड केलेले सुमारे १०० शिपाअीही प्रत्यक्ष येअून लाअिनीत चोरून राहिले व तिकडच्या अुत्क्षोभक वार्तांनी क्रांतीचें वारें जास्त भरवून निघून गेले. तरी शिपायांनी वरती सर्व शांत ठेवलेले होते. युरोपियन लोकांनी आपलीं

१. अस्सल पत्र Colin's Narrative, page 33

वायकांनीं परत बोलवावीं म्हणून शिपायांचे सुभेदार साहेबांची विनवणी करूं लागले! परंतु ही विनवणी मान्य होण्याचे आधीच ता. २९ मेला अशी भुमका भुठली की, आज सकाळी नदीवर स्नान करताना त्या दिवशी दुपारी २ वाजता युरोपियनांची कत्तल करण्याच्या शिपायांनी शपथा घेतलेल्या आहेत! ताबडतोब अिंग्रजांनी त्यांच्या खात्रीची घोडेस्वारांची रेजिमेंट सिद्ध केली. तेही जिनचोगाट सिद्ध झाले. परंतु तो सर्व दिवस गेला तरी शिपाओी अुठेनात. ही बातमी जरी खोटी ठरली तरी निदान अेक गोष्ट सिद्ध झाली आहे की, घोडेस्वार अगदी आपल्या हुकुमात आहेत असें अिंग्रज लोक म्हणत रात्री परत फिरले. अितक्यात दुसरी खात्रीलायक बातमी आली की घोडेस्वाराच्या रेजिमेंटने कधीच शपथा घेतलेल्या आहेत की, आम्ही आमच्या देशबंधूंवर हत्यार अुचलणार नाही व फिरंग्याचे बाजूने लढणार नाही! आता विश्वास तरी कशावर ठेवावा हेंच अिंग्रजांना कळेनासें झाले. परंतु तारीख २९ च नव्हे तर तारीख ३० मेही निघून गेली, व त्या दिवशी शिपायांचें वर्तन तर कधीच नव्हतें अितकें राजनिष्ठ झालें. तेव्हा लष्करी व मुलकी अशा सर्व अिंग्रजी अधिकाऱ्यांनी नक्की ठरविलें की, संकट खात्रीने टळलें आहे व आता भिण्याचें बिलकूल कारण नाही!

तारीख ३१ मे अुजाडली. त्या दिवशी पहाटे कॅप्टन ब्राअून लोच्या घराला अेकाअेकी आग लागलेली होती. परंतु अिंग्रजाचे मनात तिची भीति वाटण्याचें विशेषसें कारण नव्हतें. तो दिवस रविवारचा होता. रविवारी व्हावयाची लष्करी हजेरी झाली. नेटिव्ह ऑफिसराचे रिपोर्टही झाले. अिंग्रजी अधिकाऱ्यांना अितकें देखील वाटलें की आज शिपाओी लोकांत विशेष समाधान व संतोष दिसत आहे! चर्चमध्ये अिंग्लिशांनी प्रार्थनाही केली. कुठे अणुरेणू अितकीही गडबड दिसली नाही. घड्याळाने दुपारचे अकरा ठोके दिले.

आणि शिपायांच्या लाअिनीत अेक तोफ सुटली! तोफ सुटली न सुटली तोंच बंदुकांचे आवाज व कर्कश किंकाळ्यांनी आकाश दुमदुमून गेलें! बरेलीचें बंड अितके सूत्रबद्धतेने करण्यात आलेलें होतें की बंड होताच कोणी कोणच्या युरोपियनाचा खून पाडावयाचा हेंही आधीच ठरवून टाकलेलें होतें. अकराचे ठोके पडताच ६८-व्या पायदळाने आपल्या लाअिनीजवळच्या युरोपियनावर हल्ला चढविला. लहान लहान तुकड्या निरनिराळ्या बंगल्याकडे झटकन चालून गेल्या व बाकीच्यांनी अितरत्र पळू पहाणाऱ्या अिंग्रजांचा समाचार घेण्यासाठी, त्यांची घरें लुटण्यासाठी, त्यांना आग लावण्यासाठी धाव ठोकली. हा कर्कश किंकाळ्या अैकताच गर्भगळीत झालेले युरोपियन लोक घोडेस्वाराच्या लाअिनीकडे पळत गेले. तेथे सर्व लष्करी व मुलकी आफिसरांनी आश्रयार्थ मिळावें असा त्यांचा बेत ठरलेला होता. तेथे जाताच नेटिव्ह घोडेस्वारांच्या रेजिमेंटला बंडवाल्यावर चालून जाण्याचा हुकूम देण्यात आला. परंतु त्या रेजिमेंटचा मुख्य नेटिव्ह अंमलदार महमद शफी हा बंडवाल्यात

फितूर असल्यामुळे आपल्या मागे दौडत येण्याचा हुकूम सोडून तो बंडवाल्यांकडे दौडत गेला. त्याने घोडेस्वारांस, स्वधर्माकरिता मरा, चला तें हिरवें निशाण तुम्हांस बोलावीत आहे' असें ओरडून सांगितलें नि सर्व घोडेस्वारही दौडत चालले! तरी जे काही उरले ते घेऊन परेडीकडे अिंग्रजानी अेकदा येण्याचा प्रयत्न केला. परंतु बंडवाल्यांच्या माऱ्यापुढे अेक क्षणही थांबणें शक्य नसल्याने त्यांनी तिकडे पाठ फिरवली व ते सर्वजण नैनीतालकडे पळत सुटले! ब्रिगेडिअर सिबाल्ड हा पहिल्या धडाक्यात ठार झाला. कॅप्टन कर्बी, लेफ्टनंट फ्रेझर, सार्जंट वाल्डन, कर्नल ट्रूप, कॅप्टन राबर्टसन वगैरे जे जे गोरे लोक बंडवाल्यांचे हाती लागले त्याचा त्याचा मप्पा अुडाला. त्या कत्तलीतून सुमारे ३२ अधिकारी काय ते नैनीतालपर्यंत जाअून सुखरूप पोचू शकले. अशा रीतीनें अेका महा तासांत बरेलीला अिंग्रजी अंमलाचा शेवट झाला!

अिंग्रजाचें निशाण अुपटून टाकून बरेलीस स्वातंत्र्याचें निशाण फडकू लागताच तेथील नेटिव्ह तोफखान्यावरचा मुख्य सुभेदार बख्तरखान याने त्या सर्व नेटिव्ह सैन्याचें आधिपत्य स्वीकारलें. बख्तरखानाचें नांव पुढे दिल्लीच्या वेढ्यात आपल्याला अैकण्याचा प्रसंग येअीलच. ह्या सेनापतीनें सर्व नेटिव्ह शिपायांना स्वातंत्र्यानंतर कसे वागलें पाहिजे व नवीन स्थापन होणाऱ्या स्वराज्यात काय काय कर्तव्यें केली पाहिजेत यावर व्याख्यान दिलें व नंतर अिंग्रजी ब्रिगेडियरच्या बग्गीत बसून हा स्वदेशी ब्रिगेडियर बरेलीच्या रस्त्यांतून जाअू लागला.[२] त्याचे भोवती निरनिराळ्या अिंग्रजी लष्करी ऑफिसराच्या गाड्यात बसून आता नवीन नेमलेले अधिकारी मंडळही चालू लागलें! खान बहादुरखान यांच्या नांवाचा जयघोष होअून दिल्लीच्या बादशहाचे सुभेदार म्हणून त्यांनी रोहिलखंडाची सत्ता आपल्या हाती घेतली. बरेलीला असलेल्या युरोपियन घरादारांना जाळून पोळून लुटून भस्म केल्यानंतर मग कैद केलेल्या युरोपियनास खानबहादुरखानानी आपल्यापुढे आणविलें. अिंग्रजी अंमलात जज्जाचें काम केलें असल्याने त्यांना अिंग्रजी न्याय कसा करावा हेंही माहीतच होतें. म्हणून त्यांनी त्या युरोपियन गुन्हेगाराच्या चौकशीसाठी अेक कोर्ट नेमलें. ह्या गुन्हेगारांत वायव्य प्रांताच्या लेफ्टनंट गव्हर्नराचा जावअी डॉक्टर हे हाही होता, बरेलीच्या सरकारी कॉलेजचा प्रिन्सिपॉल डॉक्टर कर्सबच होता, बरेलीचा डिस्ट्रिक्ट जज्जही होता! अेका दिवसापूर्वी ह्याच्या गळ्यात गळा घालून राजनिष्ठ खानबहादुरखान बसलेले होते. आज हे सिंहासनावर व ते गुन्हेगाराच्या पिंजऱ्यात! ज्युरीची शपथ घेअून त्यानी रीतीप्रमाणे न्यायासनावर आरोहण केलें. निरनिराळे आरोप निरनिराळ्या गुन्हेगारावर ठेवण्यात येअून त्यांना फाशीची शिक्षा दिली गेली व ते सहा युरोपियन लगेच फाशीवर चढविण्यात आले! लगेच खानबहादुरखानांचे

२. Charles Ball, Vol. I, page 175.

हुकुमाने जाहिरात लागली की युरोपियन कमिशनर पळून गेला आहे, त्याला जो पकडून आणील किंवा त्याचें शिर कापून आणील त्यास सरकारातून अेक हजार रुपये बक्षीस देण्यात येतील! अशा रीतीनें युरोपियन रक्तात व मांसात आपलें सिंहासन चिणून बसविल्यानंतर खानबहादुरखानानें सर्व रोहिलखंड स्वतंत्र झाल्याची बातमी दिल्लीकडे कळविली! त्या दिवशी दुपारी ११ ला बंड सुरु झालें व संध्याकाळी सूर्य मावळण्याच्या आत तो सर्व प्रांत स्वतंत्र झाल्याची द्वाही दिल्लीला निघून चालली.

व तो सर्व प्रांत स्वतंत्र झाल्याची द्वाही ही केवळ शाब्दिक होती असेंही नाही. तिकडे बरेलीला बंडाच्या तोफा आपल्या गडगडाटानें अिंग्रजी सत्तेला कंपित करीत असताना अिकडे शहाजहानपूरलाही गोऱ्या रक्ताचा सडा पडू लागला होता. बरेलीपासून शहाजहानपूर सुमारें ४० मैलांवर असून तिथे अठ्ठाविसावी नेटिव्ह पायदळ रेजिमेंट ठेवलेली होती. मीरतची बातमी शहाजहानपूरला ता. १५ मेला पोचली. परंतु शिपायांनी आपल्या अिंग्रजी अधिकाऱ्याच्या ध्यानात येअील अशी अेकही अुघड कृति केली नसल्याने मेची ३१-वी तारीख ही अगदी अितर तारखेप्रमाणेच मोठ्या शांत रीतीनें समाधानात व अुल्हासात अुगवली. तो रविवारचा दिवस असल्यानें सर्व गोरे लोक चर्चमध्येही गेले. त्यांची प्रार्थना निम्मी होत आहे तों अेकदम चर्चकडे शिपाअी धावत येअू लागले! त्या चर्चचा चॅप्लेन बाहेर पडतो तों त्याचा हात शिपायांनी तरवारीनें अुडवून दिला व कत्तलीला आरंभ झाला. शहरचा मॅजिस्ट्रेट रिकेट्‌स् ह्याला पळता पळता ठार केला. सर बाडोर याचा वृद्ध चर्चमध्येच बेदामेंदा अुडविला. चर्चवर हल्ला करण्यासाठी शिपायांची अेक टोळी अिकडे आलेली असतानाच दुसरी अेक टोळी कॅंटोनमेंटमध्ये युरोपियनांना मारावयास धाडलेली होती. त्यांनी तिकडे जाळपोळ व रक्तपात सुरु केलेलाच होता. असिस्टंट मॅजिस्ट्रेट जीव घेअून व्हरांड्यात पळतो तों ठार झाला. डॉक्टर बाअुलिंगने शिपायास दोन शब्द मागण्यास आरंभ केला व त्याचे ते शब्दही शिपाअी अैकू लागले. परंतु दुर्दैवानें तो कुठे त्यांस राजद्रोही म्हणून म्हणाला! त्या राजद्रोहाला अुत्तर म्हणून अेक गोळी सूं सूं करीत आली व तो ठार झाला! चर्चकडे जे बडखोर गेले होते ते नुसते तरवारी व काठ्या घेअूनच गेले होते म्हणून आता बंदुका नेण्यास ते लाअिनीकडे आले. अितक्यात जे शील शिपाअी होते ते व बबर्जी वगैरे नोकराच्या साह्यानें अिंग्रजी बाया व काही पुरुष तेथून जवळच असलेल्या अेका राजाचे घरी पळून गेले. पण त्या राजानें आपली असमर्थता दाखवून त्यास काढून दिल्यावर नागडे, अुघडे, अनवाणी स्थितीत ते महंमदीकडे निघून गेले अशा रीतीनें ता. ३१ मेच्या संध्याकाळच्या आत शहाजहानपूरही स्वतंत्र झालें!

बरेलीच्या वायव्य दिशेस सुमारें ४८ मैलांवर मुरादाबाद हें जिल्ह्याचें ठिकाण होतें. तेथे २९-वी नेटिव्ह पायदळ रेजिमेंट व नेटिव्ह तोफखान्याची अर्धी बॅटरी अितके सैन्य ठेवलेले होतें! ह्या सैन्याच्या मनात मीरतची बातमी

आल्यानंतर किती राजनिष्ठा आहे हें पाहण्याची अेक अपूर्व संधि आली. मीरतचे काही शिपाअी ता. १८ मेला मुरादाबादेच्या नजीक अुतरलेले आहेत अशी अिंग्रजी अधिकाऱ्यांना बातमी लागल्यावरुन त्यांच्यावर रातोरात छापा घालण्याचा त्यांनीं ह्या २९-व्या रेजिमेंटला हुकूम सोडला. तो हुकूम शिरसावंद्य करुन त्या शिपायांनी त्या रात्री मीरतचे सैन्य रानात निजलेलें असतांना त्यांच्यावर छापा घालून मोठ्या नेटानें हल्ला चढविला व काय झालें असेल तें असो त्या मीरतच्या, मूठभर सैन्यावर ते निजले असताना अशा अचानक व निकराचा छापा पडला असताही त्यांतील अेकाविरहित सर्व असामी जिवंत पळून गेले. पण त्याला शिपायांनी काय करावें ! त्या रात्री अंधकारच तसा निबिड नव्हता काय? अिंग्रजी अंमलदारही म्हणाले, खरेंच, शिपायांनी हल्ल्याची कमाल केली; परंतु शत्रु अंधकारामुळे जिवंत जाअू शकला. आता असें बाहेर आलें आहे की मीरतच्या लोकांवर मुरादाबादेच्या शिपायांनी केवळ लुटुपुटीचा हल्ला केलेला होता. अितकेंच नव्हे तर त्या रानातून पळालेले मीरतचे काही शिपाअी मुरादाबादेच्या शिपायाच्या लाअिनीतच येअून राहिलेले होते ! परंतु तेव्हा तरी निदान अिंग्लिशाचा ह्या २९-व्या रेजिमेंटवर त्याच्या या तीव्र हल्ल्यानें फार विश्वास बसला व तो अुडविण्यासारखें त्याच्या वर्तनात मे सपेपर्यंत काहीही घडून आलें नाही.

मेची ३१ तारीख अुजाडली व परेडीवर अेकदम शिपाअी शिस्तवार रीतीनें गोळा होअू लागले. हुकमाशिवाय हें तुम्ही काय करीत आहा असें अिंग्रजी अधिकारी जों विचारणार तों त्याच शिपायांनी हुकूम सोडला की, "कपनीचें राज्य संपलें आहे—सबब तुम्ही हा प्रदेश सोडून जावें ! नाहीतर तुमची कत्तल अुडविली जाअील अगदी तावडतोब जाअू नकन नसलात तर घ्या दोन तासांची मुदत ! पण त्याचे आत मुरादाबाद खाली करुन दिलेंच पाहिजे !" शिपायांनी ही नोटीस दिली तों मुरादाबादेच्या पोलिसानीही अिंग्लिशांचे हुकूम यापुढे पाळावयाचे नाहीत असें प्रसिद्ध केलें व शहरातील नागरिकांनीही त्याला संमति दिली ! अेकसमयावच्छेदेकरुन ह्या तिन्ही नोटिसा मिळताच मुरादाबादेचे जज्जसाहेब, कलेक्टर साहेब, मॅजिस्ट्रेट साहेब, सर्जन साहेब, अितर सर्व साहेब आपल्या बायकापोरांना घेअून अेक क्षणभरही घासाधीस न करता मुरादाबादेहून पळून गेले ! जे कोणी युरोपियन वा खिश्चन त्या नोटिशीतील मुदतीनंतरही मुरादाबादेस आढळले त्यांची कत्तल अुडाली ! मि. पावेल वगैरे काहींनी मुसलमानी धर्म स्वीकारला व आपलें जीवित संरक्षित केलें. शिपायांनी खजिना ताब्यात घेतला. सर्व सरकारी मालाचाही ताबा घेण्यात आला व मुरादाबादेवर ता. ३१ मेचे संध्याकाळच्या आत हिरवें निशाण फडफडू लागलें ! [३]

---

३. Charles Ball Vol. I

बरेली व शहाजहानपूर ह्या दोन शहरांमध्ये बुदान नांवाचें जिल्ह्याचें मुख्य शहर होतें. त्या जिल्ह्याचा कलेक्टर व मॅजिस्ट्रेट मि. अेडवर्डस् हा या शहरीच राहत असे. अिंग्रजी राज्य आल्यापासून जुन्या जमिनदाराचे चाललेले हाल व सार्‍यासाठी पटापट लिलाव होत गेलेल्या जमिनी यांच्या योगानें सर्व रोहिलखंड प्रांतातील मोठमोठे जमिनदार व त्यांचीं कुळेंही अगदी असंतुष्ट झालेलीं होतीं. त्यातही या बुदान जिल्ह्यामध्ये तर सारापद्धतीचा अितका जुलूम झाला होता की, तो जिल्हा अिंग्रजांच्या अंमलाला झुगारून देण्यासाठी पहिली संधि साधण्यास सज्ज झालेला आहे, हें खुद्द अेडवर्डस् यांच्याही ध्यानात आलेलें होतें व म्हणून त्यांनी बरेलीतील सैन्याची मदत मागविली. परंतु खुद्द बरेलीला त्या महिन्यात कोण ताण बसलेला होता हें मागे दिलेलेंच आहे. तथापि शेवटी बरेलीहून लिहून आलें की ता. १ जूनला आम्ही युरोपियन अंमलदाराचे हाताखाली सैन्य धाडून देतो. ही बातमी अैकताच अेडवर्डला अतिशय आनंद झाला. तो ता. १ जूनला बरेलीच्या रस्त्याकडे डोळे लावून बसला. त्या रस्त्यावर कोणी सरकारी मनुष्य दौडत येत आहे हेंही त्याला दिसू लागलें. अर्थात बरेलीहून येणार्‍या मदतीचा हा हलकारदारच आहे की काय अशा आशेने त्याला अेडवर्डस्‌ने अुतावीळपणे प्रश्न केले. परंतु प्रश्नाचे अुत्तरात बरेलीहून बुदानकडे सैन्य मदतीसाठी येतें आहे हें कळविण्याचे अेवजी बरेलीला खुद्द अिंग्रजी अंमलाचाच नायनाट झालेला आहे हा निरोप कळविण्यात आला। बुदानला खजिन्याच्या संरक्षणार्थ म्हणून काही शिपाअी ठेवलेले होते. त्यांच्या अधिकार्‍याला अेडवर्डस्‌ने विचारलें की "बरेली स्वतंत्र झाली – बुदानचें काय?" ह्या अधिकार्‍याने सांगितलें, माझ्या हाताखालील शिपाअी राजनिष्ठ आहेत, काही भीति नको. हें त्याचे आश्वासन अुच्चारलें जातें न जातें तों संध्याकाळच्या सुमारास बुदान शहर थंड करून अुठलें! खजिन्यावरले शिपाअी, पोलिस व नागरिक सर्वांनी फिरंगी राज्य बुडाल्याची दवंडी पिटली व तो सर्व जिल्हा खानबहादुरखानाच्या अंमलात आपखुशीने जाता झाला। शिपायांनी खजिना घेअून दिल्लीकडे कूच केले व बुदानचे सर्व अिंग्रजी अंमलदार रानोरान रानावनातून पळू लागले. खावयास अन्न नाही, नेसावयास वस्त्र नाही, अशा अवस्थेत लपत, छपत, केव्हा केव्हा अेखाद्या गावकर्‍याचे घरी गोठ्यामध्ये म्हशीच्या आड, जेथे शेणाच्या ढिगाचीं दुर्गंधि भरलेली आहे अशा सडक्या जागेत आठवडा आठवडा कार्डीन अिंग्रजी स्त्रिया, अिंग्रजी कलेक्टर, अिंग्रजी मॅजिस्ट्रेट आपल्या जिवाच्या भयाने दडून होते. काही मारले गेले, काही मेले, काही नेटिव्हांच्या दयाळू आश्रयाने जीव धरून राहिले।

अशा रीतीने सर्व रोहिलखंडभर अेका दिवसाचे आत थंड करून अुठला. बरेली, शहाजहानपूर, मुरादाबाद, बुदान वगैरे जिल्ह्यांच्या शहरांत असलेल्या लष्करांनी, पोलिसांनी व नागरिकांनी अेकेका नोटिशीसरसी दोन तासांच्या मुदतीत ब्रिटिश सत्तेला हद्दपार करून टाकली. ब्रिटिश सिंहासन पालथें घालून त्यावर

स्वकीय निशाण कुरघोडी करू लागलें, ब्रिटिश निशाणाचा चुरा होऊन त्या जागी हिरवें निशाण झुभारलेलें, ब्रिटिश कोर्टांतून, कचेऱ्यांतून व ठाण्यांतून हिंदुस्थान अधिकारावर चढलेले व अिंग्रज गुन्हेगारांच्या पिंजऱ्यांत ठुभे राहिलेले! असलें हें विलक्षण स्थित्यंतर सर्व प्रांतभर अेका दोन तासांत झालें! रोहिलखंडातील अिंग्रजी सत्ता उन्मूलन करून टाकण्यासाठी स्वदेशी रक्ताचा अेक थेंबही सांडावा लागला नाही हें केवढें आश्चर्य आहे? रोहिलखंड परतंत्र आहे असें म्हणणाऱ्या अिंग्रजांनी तें स्वतंत्र आहे असें सर्वांनी म्हटलें व तें स्वतंत्र झालें! पोलीस शिपाअी, नागरिक सर्वांनी अुठावणी करताच, प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य शहरातील दोनचार युरोपियन अधिकाऱ्यांस मारून देण्यापलीकडे तो देश स्वतंत्र करण्यासाठी काहीही जास्त श्रम पडलेले नाहीत! गुप्त कार्यंत्राची बळकट संघटना व तिची तडफेनें व शिताफीनें झालेली अंमलबजावणी या दोन गोष्टींच्या आधारावर अिंग्रजांच्या ताब्यातून सुटका करून घेताच रोहिलखंडानें खानबहादुरखानाचा अंमल कबूल केला. तेथील सर्व शिपाअी लोक मागे सांगितलेल्या बरेलीच्या तोफखान्यावरील सुभेदार बख्तखान ह्याच्या हाताखाली दिल्लीकडे लढण्यासाठी निघून गेले. नंतर खानबहादुरखानांनी प्रांतात बंदोबस्त ठेवण्यासाठी नवीन सैन्य ठेवण्यास आरंभ केला व खुद्द राजधानींत बहुतेक नागरिकांना शिपाअीपणात तरबेज करण्यात आलें. सर्व मुलकी खात्याचीही व्यवस्था लावण्यात येअून त्यात बहुतेक पूर्वींचे लोक पूर्वींच्याच जागी ठेवले गेले व वरिष्ठ ठिकाणी नवीन स्वदेशी अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली. सरकार सारा दिल्लीच्या बादशहाच्या नावानें वसूल करण्यात येअी. न्याय देण्यासाठी पूर्वींसारखीच कोर्टें अुघडण्यात येअून पूर्वींचेच नोकर कायम करण्यात आले. थोडक्यात म्हणजे जिथे युरोपियन अधिकारी असत तिथे हिंदुस्थानी नेमण्यापलीकडे कोणत्याही खात्यात राज्यक्रांतीच्या धक्क्यानें अितर प्रकारचा खंड पडला नाही. खानबहादुरखानानी आपल्या मुख्याची ही सर्व हकीकत दिल्लीच्या बादशहाकडे स्वतः लिहून धाडली व रोहिलखंडात खालील राजकीय जाहिरनामा लावण्यात आला

"हिंदुस्थान देशातील रहिवाशांनो, स्वराज्याची दुष्प्राप्य पर्वणी तुम्हास लाभलेली आहे, तिचा स्वीकार करणार की अनादर करणार? या अपूर्व व असाधारण संधीचा तुम्ही फायदा घेणार कीं तिला हातातून निसटून जाअू देणार? हिंदु बांधव हो व मुसलमान बंधुहो, हें ध्यानात ठेवा की, जर आपल्या हिंदुस्थान देशात ह्या अिंग्लिशांना तुम्ही राहू दिलेत तर ते तुमच्या देशाचा नायनाट व तुमच्या धर्माचा अुच्छेद केल्याशिवाय राहणार नाहीत! कधीही रहाणार नाहीत.[४] अिंग्लिशांच्या

४. Be it known to all of you that if these English are permitted to remain in India they will butcher all and put an end to your religion....... The English never keep their promises, they are deceiptful imposter, etc." –(The dufter of Khanbahadur Khan translated by Cracsoft Wilson.)

फमवेगिरीमुळे आजपर्यंत हिंदुस्थानातील रहिवाशांनी आपली मान आपल्याच तरवारीने कापली आहे. अेतदर्थ ती गृहभेदाची चुकी आपणांस आता सुधारली पाहिजे. मुसलमानांच्याविरुद्ध अुठण्याची मसलत हिंदूंना देणें व हिंदूंच्या अुलट अुठण्याची मसलत मुसलमानांना देणें, या कपटनाटकाचा प्रयोग अिंग्लिश लोक आताही करू पाहतील. परंतु हिंदु बांधवहो, त्यांच्या फासात तुम्ही अडकू नका. चाणाक्ष हिंदु बांधवांना हें सांगणें नकोच की, अिंग्लिश लोक आपली वचनें कधीही पाळीत नाहीत. भुलथापा देअून फसविणाऱ्या भामटेगिरीत ते वस्ताद आहेत! ते पृथ्वीवर तदितर धर्मीयांचा अुच्छेद करण्यासाठीं आजपर्यंत सतत यत्न करीत आलेले आहेत. त्यांनी दत्तक संतानाचे हक्क झुगारून दिले नाहीत का? नेटिव्ह राजाचे मुलुख व राज्यें गिळंकृत केलीं नाहीत का? नागपूरचें राज्य कोणी बुडविलें? लखनौचें राज्य कोणी बुडविलें? हिंदु व मुसलमान दोघांनाही पायाखाली कोणी तुडविलें? मुसलमानांनो, तुम्हांला कुराणाची पर्वा असेल व हिंदूंनो तुम्हाला गोमातेची पर्वा असेल तर आता आपसांतील भेदभाव विसरून जाअून या जिहादींत सर्वजण सामील व्हा, अेका ध्वजाखाली लढत लढत रणांगणात अुडी घ्या व हिंदुस्थानातून अिंग्रजांचें नाव रक्ताच्या पाटांनी धुवून टाका! हिंदुस्थानातून फिरंग्यांचा नायनाट करण्यास जर हिंदु लोक मुसलमानांबरोबर लढू लागतील, जर स्वदेशाच्या मुक्ततेसाठी ते रणांगण माहतील तर त्याच्या देशाभिमानाचें बक्षीस म्हणून गोमातेचा वध बंद केला जाअील. या धर्मयुद्धात जो स्वतः लढेल किंवा दुसऱ्यास लढविण्यासाठी द्रव्यसाहाय्य करील तो अैहिक व पारमार्थिक स्वातन्त्र्याप्रत पावेल. परंतु जर कोणी ह्या स्वदेशयुद्धाच्या विरुद्ध जाअील तर! तर स्वतःच्या मस्तकावरच तो आघात करून आत्महत्येचा अधिकारी होअील!"

* * *

प्रकरण सातवें

# बनारस व अलाहाबाद

कलकत्त्यापासून सुमारे ४६० मैलावर भागीरथीच्या काठी बनारस शहर हें आपल्या पुरातन वैभवासह निवसत आहे. भागीरथीच्या पवित्र, शीतल व धवल जलप्रवाहात प्रतिबिंबित होण्याचे महद्भाग्य ज्या शहराच्या पदरीं आहे त्या सर्व शहरांची बनारस ही पट्टराणी शोभत आहे. गंगेच्या पाटापासून अेकावर अेक चढत गेलेल्या भुवनराजी, त्याच्या मस्तकावर सोनेरी मुकुटाप्रमाणे लखलखणारे अुंच अुंच देवालयांचे कळस, त्यांवर पर्वांप्रमाणे टाकले जाणारे फलपुष्पभरित दाट वृक्ष निरनिराळ्या देवालयांत वाजणाऱ्या हजारो घटांचे निरनिराळे स्वन अेकमेकात

मिसळून जाऊन त्यांपासून उत्पन्न होणारी मनोमधुर अेकतान व त्या सर्व घाटांवर असलेलें श्रीकाशीविश्वेश्वराचें अधिष्ठान ह्यांमुळे त्या बनारस शहराला अनन्य-साधारण शोभा प्राप्त झालेली आहे. आसक्तांसाठी भोगविलासकांक्षी, भक्तांसाठी भजनलोलुप, विरागतेसाठी वैरागी व मुक्तांसाठी मुमुक्षुतनी या काशीक्षेत्रात आप-आपल्या साध्याची सिद्धता पावत असतात. जगतात वैभवाचा अुपभोग घेअून पूर्णकाम झालेल्या लोकांना काशीक्षेत्र हा वानप्रस्थाश्रम वा संन्यासाश्रम होय. या जगतातील सर्व आशा व अुपभोग दुष्टदुर्जनांच्या मत्सराने वा दैवाने ज्यांच्या छिन्न-भिन्न झालेल्या असतात अशा दुर्दैवी व हतवैभवी लोकांना काशीक्षेत्र व तेथील श्रीभागीरथीचें प्रसन्न जलतुषार हें श्रमपरिहारक शांतिभवन होय.

अशा त्या शांतिभवनात आपले श्रम परिहरण करण्यासाठी येणाऱ्या हत-वैभवी लोकांचा अगदी सन १८५७ साली अपुराचे खोटे मुळीच तोटा नव्हता. दिल्लीची अमिरी बंद झाल्याने अशरण झालेले कित्येक राजपुत्र व अितर कित्येक मुसलमान, शीख व मराठ्यांचीं नष्टवैभव झालेली राजकुले त्या बनारस शहरी आपल्या दुःखांची कहाणी देवळादेवळातून व मशिदीमशिदीतून सांगत बसलेली होतीं. अशा या शहरी हिंदुस्थानात चाललेली स्वधर्माची पायमल्ली व झालेला स्वराज्याचा नायनाट यांची चर्चा हिंदु व मुसलमानांत विशेषच जोराने चालावी यात काहीच नवल नाही. बनारस येथून थोड्याशा अंतरावर असलेल्या सिक्रोली गावी त्या प्रांता-तील लष्कराची छावणी होती. नेटिव्ह पायदळाची ३७-वी रेजिमेंट, लुधियानाची शीख रेजिमेंट, व अेक घोडेस्वारांची पलटण अितकें नेटिव्ह सैन्य असून तेथील तोफ-खाना मात्र मुद्दाम युरोपियनांचे ताब्यात ठेवलेला होता. या लष्करी शिपायात निरनिराळ्या रूपाने स्वराज्यासाठी व स्वधर्मासाठी अुठावणी करण्याची लालसा गुप्त रीतीने अुत्पन्न केलेली होती. जसजसे ५७-चें साल जवळ जवळ येअू लागले तस-तसे बनारसच्या लोकसमुदायात विलक्षण खळबळ चालू असल्याची चिन्हें स्पष्ट होअू लागली. त्या शहराचा मुख्य कमिशनर टकर, जज्ज ग्युबिन, मॅजिस्ट्रेट लिंड वगैरे मुलकी अधिकाऱ्यांनी व कॅप्टन ओलफर्ट, कर्नल गॉर्डन वगैरे लष्करी गोऱ्या अधिकाऱ्यांनी प्रथमपासूनच बनारस येथे असलेल्या अिंग्लिश लोकांचे संरक्षणाची फार काळजी घेतलेली होती. कारण त्या शहरामध्यें लोकक्षोभाची मजल गुप्ततेच्या बाहेर पडू लागून केव्हा केव्हा तर त्याचा जोर अनिवार होअू लागे. पुरमध्ये लोकांनी अुघड अुघड रीतीने 'देवा या फिरंग्यांच्या अंमलातून सोडीव' म्हणून देव-ळात गर्जून अुठावे.[1] अितरत्र चाललेल्या तयारीला किती जोर आलेला आहे ह्याची नक्की बातमी काढण्यासाठी मंडळ्या स्थापण्यात आल्या. मे महिना येताच शिपा-यांच्या छावणीत मुसलमान अुपदेशकांचा सुकाळ माजला, शहरातील भिंतीवर व

---

१. Report of the joint Magistrate Mr. Taylor.

सार्वजनिक चव्हाट्यांवर लोकमवर्तोनीं प्रचंड अुठावणी करावी म्हणून जाहीरनामे लागले व अखेर अितवयावर मजल आली की, हिंदु पंडितांनी स्वराज्याचा विजय व फिरंग्यांचा नायनाट व्हावा अेतदर्थ देवळातून जमून सार्वजनिक प्रार्थना करण्यास आरंभ केला.[२] त्याच सुमारास बाजारात धान्याच्या किमती विलक्षण रीतीने वाढू लागल्या व त्या किमती फार चढविल्या तर त्यात धान्यवाल्याचेंच कमें अंतिम नुकसान होणारें आहे, वगैरे अर्थशास्त्राची प्रमेयें बाजारात हिंडून समजावून देण्यास जेव्हा अिंग्रजी अधिकाऱ्यांनी आरंभ केला तेव्हा लोक तोंडावर त्यांना विचारू लागत की आमचे देशात आपणच महागाई करून फिरून आम्हालाच अुपदेश देण्यास तुम्ही तयार झाला ना? बनारस शहरात हें लोकक्षोभाचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून अिंग्रजांना अितका धाक बसला की, बंड होण्याचे आधीच बनारस सोडून निघून जावें म्हणून खुद्द ओल्फर्ट व कॅप्टन वॉटसन ह्यांनी आग्रह धरला! अखेर ग्युबिनने कळवळून येअून म्हटलें, " I will go on my knees to you not to leave Banaras! " (बनारस सोडू नये यासाठी मी आपल्या पाया पडेन) व या हातापाया पडण्याचा अुपयोग होअून बनारस सोडून देण्याचें तूर्त रहित करण्यात आलें. व तें का न यावें? कारण बनारसमधल्या शीख सरदारानी नुकत्याच अिंग्लिशांचें संरक्षण करण्यासाठी स्वयंसेवकाच्या टोळ्याही अुभारल्या नाहीत काय? व शिवाय वॉरन हेस्टिंग्जने तुडविलेल्या चेतसिंगाचा वंशजही आजच अिंग्लिशाच्या बाजूला मिळालेला नाही काय? अितकी राजनिष्ठा कायम असल्यावर मग अिंग्रजानी बनारस सोडण्याचें काही अेक कारण नाहीं!

परंतु या राजनिष्ठेवर स्वारी करून अिंग्रज लोक बनारसला अढळ आसन ठेवू पहात आहेत तोंच जवळच्याच अझिमगडाकडून भयंकर गडगडाट अैकू येअू लागले. अझिमगड हे गाव बनारसपासून सुमारे ६० मैलावर असून तिथे १७-वी नेटिव्ह रेजिमेंट ठेवलेली होती. ह्या रेजिमेंटमध्ये मेच्या ३१ पासून रोज भयंकर चळवळ सुरु झाली व ती शांत करण्यासाठी तेथील मॅजिस्ट्रेटसाहेब मि. हॉर्न ह्यांनी शिपायास मिठ्ठास व्याख्याने देखील दिलीं! पण असल्या व्याख्यानानी आता निभाव लागण्याचे दिवस अुरलेले नाहीत. तारीख ३१ मे अुजाडली आहे. त्या प्रांतातील शिपायांनी अुठावण्या करण्याची सूचना देण्यासाठी बनारस येथें वराकी पेटवून दिल्या

---

२. Red Pamphlet page 88. "Towards the end of May the symptoms of disaffection amongst the people of Banaras became even more strongly marked. The agents of the King of Delhi were found busy among Sepoys. The Hindus went openly to their temples and prayed for a time to arrive when they may murder us. Placads were posted up calling on the people to rise and everything indicated the approach of a crisis."

आहेत. तेव्हा जूनच्या पहिल्या आठवड्यात ऊठावणी झालीच पाहिजे. आज तारीख ३ जून आहे. हा मुहूर्त काही वाईट नाही. कारण गोपाळपुराहून आलेल्या खजिन्यात अझिमगडच्या खजिन्याची भर टाकून तो सात लक्ष रुपयांचा खजिना बनारस कडे जात आहे, याहून मुहूर्त मुहूर्त तो काय असतो ?

ता. ३ जूनच्या सायंकाळची प्रभा रात्रीमध्ये विलय पावत होती. शिपायांवरील सर्व गोरे अधिकारी आपल्या क्लबमध्ये बसून अेकत्र जेवत बसलेले होते व त्यांची बायकापोरे नजीकच खेळत खिदळत होती. अितक्यात धडाड धडाड आवाज अैकू आले. अचान्या अकस्मात् धडाक्यांचा अर्थ काय असतो हें जूनच्या पहिल्या आठवड्यात अिंग्रजांच्या अगदी तोंडपाठ झालेले होते. त्यांची अेकाअेकी झालेली भयभीत यातना 'शिपायी ऊठले' असे अेकमेकांस सांगू लागली. तोंच नगाऱ्यांचा व दुदुभींचा कडकडाट सुरू झाला! अेक क्षणही गेला नाही तोंच ज्यांच्या हृदयातील भीरतच्या चित्रांची छबी जिवंत झालेली आहे असे गोरे लोक धूम ठोकीत पळू लागले. बायकामुलें, अधिकारी सर्वांची जिवाची आशा सुटली. परंतु अझिमगडच्या शिपायांनी या हतभागी लोकांस याप्रमाणे भेल्याहून मेलेले पाहून जास्त सूड अुगविण्याचे घोर विचार सोडून दिलेले होते. त्यांनी या गोऱ्या लोकांस जिवंत ठेवण्यासाठी आपल्या ताब्यात घेतले व अझिमगड सोडून त्यांनी तावडतोब चालतें व्हावें असे त्यास कळविलें. परंतु काही भीमकाय शिपायांनी अिंग्रजी रक्त चाखावयाच्या भीषण शपथा घेतल्या होत्या त्यांच्या या भीष्मप्रतिज्ञेची वाट काय?[३] तर लेफ्टेनंट हचिन्सनसाहेब व क्वॉर्टरमास्टर लुअीसाहेब निदान तुमच्या शरीरात तरी ह्या आमच्या गोळ्या शिरल्याच पाहिजेत' बस्स, आता पाहिजे तर बाकीच्यांनी जिवंत पळून जावे. त्यांना पळून जाववत नसेल तर त्यांनी गाड्या करून अझिमगड सोडावें तरी देखील आमचें काही म्हणणें नाही! मग युरोपियन ऑफिसर व त्यांच्या बायका म्हणू लागल्या, "पण आम्हास आता गाड्या तरी कोण देणार?" शिपाअी म्हणाले, "त्याची फिकीर नको. गाड्या देखील आम्ही देतो!" असे विलक्षण 'अुदारपण हे पाहुनि याचें कर्ण वाकविल मान' यात बिलकूल संशय नाही. अखेर शिपायांनी स्वतः गाड्या आणविल्या, त्यात त्या कैदी अिंग्रजांना मुक्त करून बसविलें, बरोबर थोडेसे संरक्षक शिपाअीही दिले व अझिमगडच्या अिंग्रजी अमलाच्या नावनिशाणीसुद्धा ते सर्व लटांबर बनारसकडे जावयास निघाले. तिकडे तो सात लक्षाचा खजिना, लष्कराचा अिंग्रजांचे हातात असलेला तोफखाना, अिंग्रजी अमलाचा ज्यावर शिक्का होता तो तुरुंग, कचेऱ्या, रस्ते, वगैरे हीं सर्व शिपायांच्या ताब्यात घेण्यात आली. व या कामी सर्वांत अत्यंत पुढाकार कोणी घेतला होता? तर बंडाची बातमी आपणास मिळावी व शिपाअी लोक अुठल्यास आपलें संरक्षण

३. Narratives by Sir Collın Campbell, page 38.

केलें जावें म्हणून अिंग्रजांनी नेमलेलें अगदीं जिवाचें जें अझिमगडचें पोलीस खातें त्यांतील पोलिसांनी होय! हे पोलीसखातें लष्करी शिपायांप्रमाणेंच पोखरलेलें पण विहितमुख भुयार होतें! संकेतसमय येताच त्यांनी युरोपियन घरांवर व तुरुंगावर स्वराज्याचें निशाण चढविण्यास आरंभ केला! बनारसकडच्या गाड्यांत ज्यांना जागा मिळाली नाही असे कित्येक अिंग्रज लोक त्या रात्रीं गाझीपुराकडे पळून गेले व दुसऱ्या दिवशीचा सूर्य आपल्या गैरहजरीच्या अल्पावधीत झालेल्या ह्या विलक्षण रूपांतराकडे साश्चर्यभरित पाहत पाहत अझिमगडावर फडफडणाऱ्या हिरव्या निशाणाला प्रकाशित करता झाला![४] आपल्या हृदयात आजपर्यंत जें डोलत होतें तें हिंदुस्थानचें हिरवें निशाण आज आपल्या डोक्यावरही डुलू लागलें हें पाहून विजय-रंगात रंगलेल्या सर्व शिपाई लोकांनी अेक मोठी थोरली लष्करी मिरवणूक काढली व लष्करी बँडचे तालावर आपलीं हिरवीं निशाणें नाचवीत नाचवीत ते फैजाबादकडे निघून गेले.

अझिमगड स्वतंत्र झाल्याची बातमी बनारस येथे पोचण्याचे सुमारासच त्या शहरातील अस्वस्थतेने अिंग्रजात अुत्पन्न झालेलें भय निराकरण होण्याचीं चिन्हें दिसू लागलीं. मीरतचे अुठावणीची बातमी अेकताच पंजाबातून जॉन लॉरेन्स व कलकत्त्यापासून लॉर्ड कॅनिंग हे युरोपियन सैन्याचीं बंडाच्या मुख्य ठिकाणांवर रवा-नगी करण्यासाठी अथांत श्रम करीत होते. अुत्तरेकडून धाडलेलें गोरें सैन्य दिल्लीला वेढा देअून बसल्याने दिल्लीच्या खालच्या भागात सर्वत्र असहायता प्राप्त होअून अिंग्रजी अंमलदार कलकत्त्याकडे 'कृपा करून येथे युरोपियन्स धाडा, (For God's sake send us Europeans) अशी मागणी अगदी रडकुंडीस येअून करीत होते. या समयी लॉर्ड कॅनिंगने मद्रास, मुंबअी, व रंगून येथून युरोपियन सैन्यें कशीं माग-विलीं व चीनवर होणारी स्वारी तहकूब करून ते सर्व सैन्य हिंदुस्थानातच कसे थाबवून धरले हें वर सांगितलेलेंच आहे. त्या ठिकठिकाणाहून आणविलेल्या युरो-पियन सैन्यांपैकी मद्रासच्या फ्युसिलियरसह जनरल नील हा या सुमारास बनारसपर्यंत येअून पोचला होता. युरोपियन सैन्याची ही पहिली कुमक व तीही जनरल नील सारख्या हिंमतवान, धाडसी व करड्या सेनापतीचे हाताखाली आल्याने बनारसच्या अिंग्रजाना बराच धीर वाटू लागला. अितक्यात दानापुरला असलेली अिंग्रजी फौज हीही बनारसकडे निघून आली. बनारसच्या लोकातील विलक्षण अस्वस्थता व तेथील शिपायाचें शहरातील लोकाशी सहकारित्व असल्याचे मिळालेले स्पष्ट पुरावे ह्याच्या माहितीने तेथील सर्व अिंग्रजी अधिकाऱ्यांनी बंड त्याच्या गर्भाशयात असतानाच चिरडून टाकावें असा निश्चय केला. जनरल नीलची युरोपियन फौज व बनारसला

४. Narrative by Sir C. Campbell : "the green flag was masted on the night of the 3rd."

असलेले शीख सरदार व शीख शिपाई यांच्या व तोफखान्याच्या आधारावर हा येव सहज सिद्धीस नेता येईल असा पहिल्यापासूनच अधिकाऱ्यांना पूर्ण भरंवसा होता. अझिमगडची बातमी तारीख ४-ला बनारसला पोंचतात बनारस येथील नेटिव्ह शिपाई बंड करून अुठण्याचे आधीच निःशस्त्र करून टाकावे असें बरेच वादविवादानंतर ठरलें व त्याप्रमाणे त्या दिवशीं दुपारी जनरल परेड भरविण्याचा हुकूम सुटला.

हा हुकूम अैकताच पुढे काय होणार हें भविष्य शिपायांचे ध्यानात आलें. अिंग्रजानी तोफखाना सज्ज करून आणविलेला आहे हीं गुप्त बातमीही त्यांना कळली. जेव्हा परेडच्या मैदानावर अिंग्रजी अधिकाऱ्यांनी शस्त्रास्त्रें खालीं ठेवण्याचा हुकूम सोडला तेव्हा आपणास निःशस्त्र करून मग तोफांचे तोंडीं अुडवून दिलें जाणार आहे हें त्यांच्या स्पष्ट रीतीने नजरेस आलें व म्हणून त्यांनी अेकदम शस्त्रें खाली ठेवण्याचे अैवजी अुलट जवळच्या शस्त्रागारावर हल्ला चढविला व कर्कश गर्जना करीत ते अिंग्रजी ऑफिसरांवर तुटून पडले. अितक्यात त्यांच्यावर दाब ठेवण्यासाठी आणलेली शीख रेजिमेंटही तिथे आली. या शीख शिपायांना त्या वेळेस राजनिष्ठेचा अितका पान्हा फुटलेला होता की, त्यांनी कमीही करून हिंदुस्थानी फौजेशी दोन हात होअू देण्याची संधि अेक क्षण तरी आपल्यास मिळावी म्हणून अिंग्रजांची पायधरणी चालविलेली होती. हें पाहताच त्यांच्या कमांडरचे अंगावर अेका हिंदुस्थानी शिपायाने चाल केली व कमांडर ग्युसिस क्षणार्धात ठार होअून खाली पडला. त्याचे जागी ब्रिगेडियर जनरल हाडसन हा येतो न येतो तोंच अेका शीख शिपायास अवसान चढून त्याने त्यावर गोळी घातली. परंतु हा अक्षम्य अपराध सहन न होअून त्याच्या नजीकच्या शिपायांनी त्या अिंग्रजाना मार पाहणाऱ्या शिखास तत्क्षणी छाटून टाकलें! *ह्या राजनिष्ठेच्या कृत्याला काय बक्षीस मिळते हे पाहण्यासाठी शीखलोक* अुत्सुक झाले. तोंच त्या सर्वांवर अिंग्रजी तोफखाना सुरू झाला! शीख शिपायांमध्ये हिंदुस्थानी शिपायांनी माजविलेला गोंधळ पाहून शीख रेजिमेंटच फितुर झालेली आहे असा अिंग्रजी अधिकाऱ्यांचा गैरसमज झाल्यामुळे त्यांनी हिंदुस्थानी रेजिमेंट-बरोबर शीख रेजिमेंटवरही गोळीबार सुरू केल्याने आता त्या दुर्दैवी शिखांना बह-वाल्यास मिळण्याशिवाय दुसरा मार्गच अुरला नाही. त्या सर्व हिंदी लोकांनी मिळून अिंग्रजी तोफांवर तीन हल्ले चढविले. हिंदु, मुसलमान व शीख हे अेकच होअून अिंग्रजी तोफांवर तुटून पडत आहेत असा हा ५७-चे अितिहासात अेवढाच प्रसंग! आनंदाची गोष्ट अितकीच की या प्रसंगाचे पापक्षमनासाठी त्या क्षणीच बनारस शहरात शीख लोक अग्रात खटपट करीत होते. कारण शिपायांची व अिंग्रजांची -दराकीकडे लढाअी जुंपली असताना शहरातील लोकही अुठणार अशा भीतीने अिंग्रज अमलदार, बायकामुले सर्व रस्त्यारस्त्यातून धावत असता त्यांना आश्रय देण्यासाठी शीख सरदार सूरतसिंग पुढे सरसावला. बनारसच्या खजिन्यात लाखो रुपये साठविलेले

असून त्यातच शीख लोकांच्या माजी पट्टराणीचे अिंग्रजांनी ओरबडलेले अत्यंत मूल्यवान् रत्नालंकार भरलेले होते. आणि या खजिन्यावर शिखाचा जम्मत पहारा होता. तेव्हा हा खजिना ताब्यात घेअून अिंग्रजांनी हद्दपार केलेल्या आपल्या राणीचे अलंकार परत घेण्याची अनिवार्य अिच्छा शिखांचे मनात अुत्पन्न न होणें दुरापास्त होतें. परंतु त्यांचा पुढारी राजनिष्ठ सूरतसिग पुढे आला व त्याने त्या खजिन्यातील अेक दमडीही न हलेल असा आपल्या जातभाअींना पळवून पक्का बदोबस्त केला! व लवकरच तो खजिना युरोपियन सेनेचे पहाऱ्यात नेण्यात आला! या समयीं अिंग्रजांचे पक्षाला गोकुलचद नांवाचा अेक मोठा पंडितही मिळाला होता व खुद्द बनारसच्या राजानेही आपलें सर्व वजन, सर्व संपत्ति, सर्व अधिकार सर्वस्व आपल्या प्रभूचे—काशीविश्वेश्वराचें नव्हे! —पायी अर्पण करून दिलें!! शिपाअी लोक तेवढे तोफांपुढेही शरण न रिघता लढत लढत अिंग्रजांचे टप्प्यातून निघून मग सर्व प्रांतभर पसरले.

अिंग्रजी लोकांनी जॉन लॉरेन्सच्या पंजाबी युक्तीची तालीम करुन बनारस शहरातील बंड गर्भावस्थेतच चिरडून टाकले खरें; परतु ह्या चिरडून टाकण्यापेक्षा बनारसला बंड झाले हीच बातमी सर्व हिंदुस्थानात विद्युद्वेगाने पसरत गेली व बनारसच्या निशाणीकडे डोळे लावून बसलेल्या त्या प्रांतातील सर्व शांतिकेंद्रांनी अुठावण्या करण्याचा धडाका अुडविला.

बनारसहून निघालेले सर्व शिपाअी मजल दरमजल जवानपुरास येत आहेत ही बातमी कळताच तेथील अिंग्रजांनी जवानपूरला असलेल्या शीख तुकडीला राजनिष्ठेवर व्याख्याने देण्यास आरंभ केला. परंतु ही व्याख्याने संपत आहेत न संपत आहेत तोंच बनारसच्या शिपायांच्या टापा अैकू येअू लागल्या! जवानपुरास जे थोडेसे शीख शिपाअी होते ते सर्व बनारस येथे असलेल्या शीख रेजिमेंटचेच असल्याने ते भराभर बटवाल्यास मिळाले व त्यामुळे जवानपूरचें सर्व शहर बंडाच्या ज्वालेत पेट घेअू लागलें. हे पाहताच जॉअिन्ट मॅजिस्ट्रेट क्यूपेज पुन्हा अेकदा व्याख्यान देण्यास अुभा राहिला. परंतु आता टाळ्याअैवजी अेक गोळी सूं सूं करीत श्रोत्यातून बाहेर पडली व मॅजिस्ट्रेटसाहेब ठार होअून खाली पडले! कमांडिंग ऑफिसर लेफ्टनंट 'मारा' हाही गोळी घालून पडला. हे पाहताच बंडवाल्यांनी खजिन्यावर हल्ला केला व सर्व युरोपियन लोकांना जवानपुरातून निघून जाण्याची ताकीद दिली. आता बनारसचे घोडेस्वारही शहरात शिरलेले होते. युरोपियन दृष्टीस पडला की, त्याला जिवंत ठेवावयाचा नाही अशा त्यांच्या घनघोर शपथा झालेल्या होत्या. अेक म्हातारा डेप्युटी कलेक्टर पळताना दिसताच हे स्वार त्याच्यावर धावले. जवानपूरचे काही लोक मिष्टाअी करु लागले की, "ह्या गरिबाला जीवदान द्यावें,

तो फार ममताळूपणाने वागे." शिपायांनी उत्तर दिलें, "तें कांहीं नाहीं ! तो युरोपियन आहे व म्हणून त्याला मेलेंच पाहिजे !"५

अशा ह्या अनिवार त्वेषानही बंडवाल्यांनी युरोपियनांना शस्त्रें खाली ठेवून चुपचूप पळून जाण्यास जी परवानगी दिलेली होती, तिचा फायदा घेऊन यवनचारत अिंग्रज लोक जवानपूर खाली करून देऊन पळू लागले. त्यांनी बनारसकडे पळून जाण्यासाठी गंगेच्या काठी नावा केल्या. परंतु मध्यें प्रवाहात येताच नावाड्यांनी त्या सर्व अिंग्रजांना लुटून धाळवंटावर नेऊन सोडून दिलें ! अिकडे जवानपूरला सर्व शहर 'दीन दीन' करीत बाहेर पडलें. त्यांनी सर्व युरोपियन घरांना लुटून व जाळून फस्त केलें. अिंग्रजांच्या मत्तेची, त्याच्या वाहनांच्या रत्नांच्या पाटांशिवाय शाहून सारीं चिन्हें धुळीस मिळवून टाकलीं व नेमकेच नितका खजिना बरोबर घेऊन शिपाअी लोक अयोध्येकडे लोटू लागले ! नंतर शहरातल्या म्हाताऱ्या बाया व जन्मात दमडीही न पाहिलेले गोरगरीब यांच्याजवळ तो राहिलेला खजिना देण्यात आला होता व त्याच्यावर त्यांनी यथेच्छ ताव मारून स्वराज्यावर व दिल्लीचे बादशहावर मनःपूर्वक आभारांचा पर्जन्य पाडला !

अशा रीतीने ता. ३ जूनला अझिमगड, ता. ४-ला बनारस व ता. ५-ला जवानपूर अुठत आहे तोंच बनारसचा सर्व प्रांतचा प्रांत शांतिज्वालांनी भडकून राहिलेला होता. प्रांताचें मुख्य शहर पडलें म्हणजे साधारणतः राज्यक्रांतीला त्या प्रांतात जोर राहात नाही. पण राजधानीच्या शहरावर सर्व प्रांताने राज्यक्रांतीसारख्या अनिश्चित प्रसंगी अवलंबून राहणें हा क्रांतिशास्त्रात फारच नाशकारक दोष समजलेला आहे. मॅझिनी म्हणतो की, "जिथे आमचें निशाण फडफडेल तीच आमची राजधानी. आमची राजधानी जिकडे वड तिकडे नेली पाहिजे. बंडाने राजधानीच्या मागे लागून बिलकूल अुपयोग नाही. राज्यक्रांतीचे नकाशे आधीं कितीही चोख काढलेले असले तरी त्याच्याप्रमाणेच अगदी सूत्रबद्ध गोष्टी घडणें अशक्य असतें. म्हणून क्वचित् राजधान्यात बंड बिघडलें तरी तें प्रांताने सोडून देऊ नये." या नियमाची आवृत्ति बनारस प्रांतामध्ये फारच फक्कड रीतीने निघालेली होती यात काही शंका नाही ! कारण त्या प्रांताची राजधानी खुद्द बनारस शहर हें अिंग्रजांचे

५. They had vowed to murder every European. They came to the deputy Collector, an old East Indian; both Hindus and Mahomedans got him and said, 'Do no harm him, he has always been just and kind to us'—'Cant help it' said the Sowars 'he is an European.' They then repeated this to a Sergeant and his wife though the people pleaded for them. "Cant help it" was the reply, "they are Europeans and shall die!" Charles Ball, Vol. I, page 245.

कह्यात पडलें असतानाही बनारस प्रांतामध्ये अेका चुटकीसरशी राज्यक्रांतीचें वादळ सू सू करीत दशदिशांना धुंद करीत चाललें ! जमिनदार, शेतकरी, शिपाओ सर्व-जणांनी फिरंगी अंमलाला गोमांसाप्रमाणेच आपत्ति मानण्यास आरंभ केला ! लहान लहान खेडींगावें पण त्यांनी आपल्या शिवारात गोरा आल्याचा सुगावा लागला की, लगेच त्यास मारून पिटून हुसकून द्यावें ! [६] विशेष हे की, नुसत्या अिंग्रज लोकांनाच नव्हे तर त्यानी केलेल्या अेकूणअेक कृत्यांचा लोकांना अितका वीट आला होता की, तीं कृत्यें त्यांना डोळयासमोर नकोशीं झालीं ! त्यांनी अिंग्रजांना नेमलेले जमिनदार,—मग ते कसे का असेनात—त्याना काढून टाकून जुन्या पिढी-जात जमिनदाराना तिथे आणून बसवावें. अिंग्रजाची सारापद्धति, त्याचे तुरुंग, त्याचीं न्यायकोर्टें या सर्वांचा अेका आठवड्यात पत्ता नाहीसा झाला ! तारायंत्राचा चुरा झालेला, आगगाडीचे व दळणवळणाचे रस्ते अुखडून दिले गेलेले, प्रत्येक टेकडा-आड व प्रत्येक झुडुपाआड गोऱ्यांच्या रक्ताला व पैशाला चटावलेले गावकरी दबून बसलेले व अिंग्लिशाना रसद तर राहोच परंतु नुसती बातमी देखील मिळू न देण्या-साठी शिवाराशिवारांतून पहारेकरी हिरव्या व जरतारी निशाणांसह गस्त घालीत असलेले ! अशा स्थितीत अिंग्रजाच्या कोंडमाऱ्याला पारावार नाहीसा झाला ! तरी, खुद्द बनारस शहर अिंग्रजाचे ताब्यातून सुटताना फसलेले होतें व सर्व शिपाओ लोक अुठावणी होताच अयोध्येकडे निघून गेले होते ! [७]

बनारस शहराचा ता. ४ जूनचा प्रयत्न फसल्यानंतर तिकडे धरपकड चाललेली असताना अेक महत्वाची गोष्ट अुघडकीस आली. अशाच तुरळक गोष्टींवरून ५७ साली ते रचनाचक्र कसे फिरविले जात होतें हे कळण्याचा संभव आहे. बनारस शहरातील तीन अत्यंत चळवळ्या पुढाऱ्यांना व अेका लक्षाधीश पेढीवाल्याला पकड-ण्यात आलें. त्यांच्या घरात क्रांतिपक्षातील मुख्य केंद्राकडून आलेलीं कित्येक

६. A tevery succeessive stage of the Military revolt the fact of a deep seated and widespread feeling of hatred and unappeasable revengefulnees for an assumed wrong is more plainly developed. The desire for plunder was only a secondary influence in producing the calamities to which European residents of various places were exposed." —Charles Ball's Indian Mutiny Vol. I, page 245.

७ "No sooner had it been known in the districts that their had been an insurrection at Banares, than the whole country rose like one mass. Communications were cut off with the neighbouring stations and it appeared as if the Ryots and the Zamindars were about to attempt the execution of the project which the Sepoys failed to accomplish in Banares."

—Red Pamphlet, page 91

जाळीत परंतु सांकेतिक भाषेत लिहिलेली पत्रे सरकारच्या हातात सापडली. त्यांतील महत्त्वाची पत्रे 'अेक प्रमुख अधिपति' याजकडून आलेली होती; व त्यांचा मथितार्थ असा होता : "*बनारसचे नागरिकांनी शीघ्र अुठावणी करावी. डॉक्टर, गिबन, लिंड व जेवढा युरोपियन तेवढा छाटून टाकावा. या कामासाठी लागणारी रक्कम नवरंगेट रेसिडेन्सी . . . यांजकडून दिली जाअील.*" या पेटीवाल्याच्या घराचा झाडा घेतला तेव्हा सुमारे दोनशे तरवारी व बंदुका साठविलेल्या सापडल्या.[८]

बनारस प्रांतातील अुठावणीची ही मोटक हकीकत झाली. ठिकठिकाणच्या शिपायांनी ह्या प्रांतात मीरत किंवा दिल्ली येथील लोकांप्रमाणे युरोपियनांच्या कत्तली बिलकूल केल्या नव्हत्या. या सर्व प्रांतात अेकही युरोपियन लेडी मारली गेली नाही. अितकेंच नव्हे तर राष्ट्रक्षोभाच्या प्रचंड ज्वाला अंत:करणात 'सूड' म्हणून गर्जना करीत असताही लोकांनी स्वत: गाड्या जोडून जोडून अिंग्लिशांची त्यांच्या अधिकाऱ्यांसुद्धा बोळवण केलेली होती! हें चित्र पहा व आता हें पुढें येणारेंही पहा!

जनरल नील हा बंड होण्याचे वेळीच बनारसला येअून अुतरलेला होता हें मागे सांगितलेंच आहे. बनारस प्रांत आपल्या स्वराज्याकरता अुठला असतां त्याला अुत्तेजन देण्याअितका अुदात्तपणा सापडणें मनुष्य जातींत अगदी तुरळक व अिंग्लिश राष्ट्रांत तर असंभवनीय आहे. परंतु निदान जशास तसें या न्यायाने तरी अिंग्लिशांनी त्यांच्या समजुतीप्रमाणे ठरलेल्या 'बंडवाल्यांना' वागवावयास पाहिजे होतें! बंडवाल्यावर व अतअेव सर्व हिंदुस्थानावर त्यांच्या 'शौर्या'साठी अश्लील शब्दांची व नरकगामी शापांची लाखोली वाहणाऱ्या अिंग्लिशांच्या सुधार-*लेल्या सैन्यावरील अत्यंत क्रूर सेनापतीने बनारस प्रांतातील लोकांना कसें वागविलें* हें प्रसिद्ध केलेल्या माहितीवरून दिलें म्हणजे त्यावर अेक शब्दही लिहिण्याची जरुरी अुरणार नाही.

बनारस प्रांतातील अुठावणीनंतर जनरल नीलने त्या आजूबाजूच्या खेडे-गावात बंदोबस्त करण्यासाठी युरोपियन व शीख लोकांच्या टोळ्या धाडल्या. निराश्रित व शेतकीवर अुपजीविका करणाऱ्या लहान लहान खेडेगावावर ह्या टोळ्यांनी घुसावें, जो कोणी रस्त्याने भेटेल त्यास अेकतर तिथेंच कापून टाकावें किंवा फाशीवर चढवावें. ह्या फाशीवर जाणाऱ्याचा अितका पुरवठा होत होता की अेक फाशी रात्रदिवस चालवून पुरेशी न पडल्याने फाशीच्या खांबांची लांबलचक रांगची रांग कायम अुभारून ठेवावी लागली. ह्या लांब रांगेवर रात्रदिवस अर्धमेले करून लोक फेकून देण्यात आले तरी फाशीवर चढणाऱ्या अुमेदवारांची दाटी झालेली! मग अिंग्रजी अधिकाऱ्यांनी झाडें तोडून खांब करीत बसण्याचा अडाणी नाद सोडून

८. Narrative of the Indian Revolt by Sir C. Campbell, page 64.

दिला व खुद्द झाडांनाच फाशीचे खांब बनविण्यात आले. परंतु अेका झाडाला अेकच मनुष्य फाशी देत बसल्यास परमेश्वराने त्या झाडास अेकाहून अधिक फांद्या विनाकारणच दिल्या असें होअील. अेतदर्थ झाडाच्या प्रत्येक फांदीवर नेटिव्हांना गळे करकचून लोंबकाळून ठेवण्यात येअी! हें 'लष्करी कर्तव्य' व हें 'ख्रिश्चन मिशन' दर रोज व दर रात्री अव्याहतपणे चालविणे त्या शूर अिंग्रजांना कटाळवाणें झालें यांत काही नवल नाही! तेव्हा मग या धार्मिक व अुदार कर्तव्यात असणारा गंभीरपणा थोडासा कमी होअून त्यात करमणुकीसाठी किंचित् नावीन्य मिसळविण्यात आलें. नुसतें अुचल की दे झाडास टांगून, ह्या ओबडधोबड पद्धतीत आता थोडीशी कलाकुशलता करण्यात आली. नेटिव्हांना प्रथम हत्तीवर बसविण्यात येअी. मग ते हत्ती अुंच झाडाच्या फादीपाशी नेण्यात येत व त्यावरील नेटिव्हांच्या मानांना झाडांवरील फासात करकचलें की हत्तीला काढून घेतले जाअी! तथापि हत्ती निघून गेल्यावर तीं अगणित प्रेतें धडपडत मरताच अजागळपणानें लोंबू लागत व त्यायोगाने रस्त्याने जाणाऱ्या अिंग्रजांना अेक प्रकारची कंटाळवाणी साम्यता दिसू लागे. म्हणून मग झाडावर टांगताना नेटिव्हांना नुसते सरळ रीतीने फाशी देण्याचे अैवजी निरनिराळ्या आकृतीने टांगण्यात येअी! कोणी अिंग्रजी आठासारखे (8) बांधून मारण्यात येअी तर कोणी नवासारखे (9)[१]

परंतु ह्या सर्व प्रकारांनी प्रयत्न केले तरी काळे लोक हजारांनी व लाखांनी जिवतचे जिवतच! आता अेवढ्यांना फाशी चढवू म्हटले तर त्यांना बांधण्यास दोर तरी कुठून आणणार! अशा विलक्षण पेचात अिंग्लडचें सुधारलेलें ख्रिश्चन राष्ट्र पडलें! परमेश्वरकृपेने शेवटी अेक युक्ति त्यांना सुचली व तिचा प्रयोग करून पाहता तो अितका यशस्वी झाला की अतःपर फाशीचे अैवजी त्या शास्त्रशुद्ध युक्तीचाच अवलंब करावयाचें ठरले, व अेका तासात सबंध गांवचें गांव फाशी जाअू लागले! विस्तवाच्या ज्वालांनी त्यांच्या माना करकचून बांधल्यावर व भोवती तोफा रोखून ठेवल्यावर मग गरीब नेटिव्हांची हजारे जळून खाक होण्यास काय अुशीर! या खेडेगावांना चोहोबाजूंनी आग लावून कोंडून जिवंत जाळून टाकण्यात कित्येक अिंग्रजांना अितकी मजा वाटे की त्यांनी त्या देखाव्यांची हास्यरसात्मक वर्णनें अिंग्लंडमध्ये लिहून धाडावीं! खेडेगावाला आग अितकी जलद व परिपूर्ण

१. Volunteer hanging parties went out into the districts and amateur executioners were not wanting to the occasion. One gentleman boasted of the numbers he had finished off quite "in an artistic manner," with mango trees to gibbets and elephants as drops. The victims of this wild justice being strung up, as though for pastime, in the form of a figure eight." Kaye and Malleson's History of the Indian Mutiny. Vol. II page 177.

रीतीनें लावली जाणी कीं त्यांतून बाहेर पडण्याचें नांवही घ्यावयास नको ! गरीब शेतकरी, विद्वान ब्राह्मण, निरपराधी मुसलमान, पाळण्यांतील मुलें, बाळंतिणी, कुमार कुमारी, म्हातारे लोक, अर्धपंगु सर्व आगीचे डोंबात जळून खाक ! अंगावर दूध पीत असलेल्या कोवळ्या मुलामुली आया जळून खाक ! अंथरुणाशीं खिळलेल्या म्हाताऱ्या बाया व पुरुष आपल्या भोंवताली कडाडणाऱ्या आगीचे ज्वालांपासून पाऊलभरही पळण्याची शक्ति नसल्यानें अंथरुणावरचे अंथरुणावर जळून खाक ![10] व जर असादुसरा जळून खाक झाला नाही तर? तर अेक इंग्रज आपल्या पत्रात म्हणतो, " We set fire to a large village which was full of them. We surrounded them and as they came rushing out of the flames, shot them. !" आगीच्या भयंकर डोंबातून अर्धेकच्चें भाजलेलें जर कोणी बाहेर पडू लागलें तर आम्ही त्यांना गोळ्या घालून ठार करीत होतो ![11]

आणि असें अेसादुसरेंच मेडें जाळलें जात होतें काय ? इंग्लिशांनी निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या टोळ्या खेडींगावें जाळून फस्त करण्यास धाडलेल्या होत्या. अशाच टोळींपैकी अेका टोळींतील अनेक अंमलदारांपैकी अेक अंमलदार आपल्या अनेक मोहिमेंपैकी अेका मोहिमेबद्दल म्हणतो " You will, however, be gratified to learn that 20 villages are razed to ground.[12] आजच्या मोहिमेत आम्ही २० गावे फस्त करून टाकलेलीं आहेत !" हें अैकून आपणांस समाधान वाटल्याशिवाय राहणार नाही !

व ही वरील राक्षसी हकीकत, "जनरल नीलच्या मुडावद्दल काही न लिहिणेच वरें ", असी धुपड धुपड प्रतिज्ञा करणाऱ्या अिंग्रजी अितिहासकाराच्या नेमस्त अितिहासांतून जी चुकतमाकत बाहेर फुटलेली आहे तिचा फक्त सारांश !!

वस ! याहून अेक अक्षरही जास्त लिहिणें म्हणजे क्रूरपणाचें हें नंगें चित्र विघडविणें होय !

म्हणून इतका नयनांनो, श्रीभागीरथीच्या व कालिंदीच्या प्रीतिसंगमातील प्रेमलहरींकडे आता दृष्टिपात होऊ द्या. अल्लाहाबाद शहर हें बनारसपासून सुमारे ७० मैलांवर वसलेलें आहे. या प्रयागक्षेत्राच्या धार्मिक पावित्र्यास तिथें अकबराचे कारकीर्दीत बांधल्या गेलेल्या विस्तीर्ण किल्ल्यानें अपूर्व भव्यतेची पुरवणी दिलेली आहे. कलकत्त्यापासून पंजाब व दिल्ली वगैरे मोठमोठ्या प्रांतात जाणाऱ्या सर्व महत्त्वाच्या रस्त्यांचे अलाहाबाद हें नाक असल्यानें या सर्व प्रांताच्या हालचालीवर देखरेख करण्यासाठी नेमलेल्या अेखाद्या अुच्च भीमाकृति व अुग्र सेनापतीसारखा हा अलाहाबादचा किल्ला आपल्या गांभीर्यानें शोभत असतो. ५७-च्या क्रांतीसमयी

१० Charles Ball, Indian Mutiny, Vol. I, page 242-43.
११. Charles Ball, Indian Mutiny, Vol. I, page 244.
१२. Charles Ball, Indian Mutiny, Vol. I, page 242.

ज्याच्या हातात हा किल्ला असेल त्याच्या हाती तो सर्व विस्तीर्ण प्रांत शेवटपर्यंत राहणार अशी स्थिति असल्याने हे महत्त्वाचें ठिकाण आपल्या ताब्यात घेण्यासाठी अुभयपक्षांचेही आटोकाट प्रयत्न चाललेले होते. अलाहाबाद येथे जे शिपाओी होते त्यांच्यासह त्या सर्व शहराने अेकसमयावच्छेदें करून अुठावें असा क्रांतिपक्षाचा घाट होता. या कामासाठी गुप्तरचना चाललेली असताना शहरांतील नागरिकांमध्ये स्वराज्यसंपादनार्थ अुठण्याची अतिशय लालसा अुत्पन्न करण्यात हिंदु प्रयागवळांचा अतिशय अुपयोग झाला होता. अलाहाबादच्या हिंदु नागरिकांतच नव्हे तर त्या सर्व प्रांतातील हिंदु लोकांमध्ये हे यजनदार धर्मगुरु स्वातंत्र्ययुद्धाचीं बीजें कित्येक दिवसांपासून अखंड रीतीने पेरीत आलेले होते. हिंदु लोकामध्ये स्नानसंकल्पावरोवरच ह्या धार्मिक व पवित्र राज्यक्रांतीचे संकल्पही जसे सोडले जात होते तसेच त्या शहरातील विस्तीर्ण मुसलमान वस्तीतही मुल्लांचा सुळसुळाट झालेला होता. दीन व देश याच्या मुक्ततेसाठी अंगातील रक्तबिंदूचा समरभूमीवर सडा पाडण्याचा कृतनिश्चय केलेले हजारो मुसलमान सांकेतिक क्षणाची वाट पहात होते. ह्याचें अिंग्रज लोकांस बिलकूल नवल वाटत नाही. शेवटीं हिंदुस्थानी मुसलमान तेवढा आपला शत्रु राहणारच अशी सर्व अिंग्रजी लेखकांची दृढ समजूत झालेली दिसून येते. Red Pamphlet चा प्रसिद्ध लेखक म्हणतो : "The Mahomedans have shown that they cherish in their hearts the proselytising doctrines of their religion and that as Christians, they for ever detest and take advantage of coming opportunity of destroying Europeans. ही गोष्ट सार्वजनिक रीतीने जितकी सत्य आहे त्याहून अधिकच रीतीने ती या विशिष्ट शहरी सत्य झालेली होती. अलाहाबादेस मुसलमानाचें पाअूल हिंदूच्याही पुढे जात होते, अितकेंच नव्हे तर त्या शहरातील क्रांतिकेंद्राच्या चालकात तेच प्रमुख होते. हिंदु व मुसलमान याच्या आपल्या देशजननीच्या मुक्ततेसाठी चाललेल्या प्रयत्नांस अशेर अितकें स्वरूप आले की, खुद्द शहरचे न्यायाधीश व मुल्फ लोक हे गुप्तरीतीने क्रांतिमंडळात सामील झालेले होते ! १३

अलाहाबादेला तेथील किल्ल्याचे संरक्षणासाठी व तें त्या प्रांताचे मुख्य ठाणें असल्याने वास्तविक रीत्या अिंग्रजांनी फार कडेकोट बंदोबस्त ठेवावयास पाहिजे होता परंतु ५७-चे मे महिन्याच्या अगदी आरंभापर्यंतही सर्व देशात काय अनर्गत चळवळी चाललेल्या होत्या हे त्याना माहीत नसल्याने अलाहाबादेला बिलकूल शिपाओी झालेली होती खुद्द अलाहाबादेला दारूच्या ज्या साठा कोठे पेटवीत नेल्यानी अितकी सातुपंपुरत गुप्तता ठेवली होती की, तेथे अेकही युरोपियन मोजीर ठेवण्याची जरूरा जरूरी वाटली नाही! मीरतची बातमी ज्या वेळेस आली त्या वेळेस या अत्यंत महत्त्वाच्या ठिकाणी शिपायाची ६-वी रेजिमेंट व शिखांच्या फिरोजपूर रेजिमेंटचा अेक सुमारे दोनशे लोकांचा भाग अितकेच सैन्य काय तें होते. त्यकरच अयोध्येचे

१३. Charles Ball's Indian Mutiny Vol. I, page 68.

घोडेस्वार आणविण्यात आले व तो किल्ला, त्यातील मुबलक शस्त्रसामग्रीसुद्धा या नेटिव्ह शिपायांच्याच ताब्यात देण्यात आला. या शिपायांवर जे अिंग्रज अधिकारी होते त्यांना आपले शिपाअी म्हणजे राजनिष्ठेचे जिवंत पुतळेच आहेत असें वाटे. विशेषतः ६-व्या रेजिमेंटने तर राजनिष्ठेची कमाल केलेली होती यात बिलकूल शंका नाही ! त्यांनी दिल्लीची वातमी अैकल्यावर अेक दिवस सरकारला निरोप धाडला की ' साविद, आम्हांला त्या बंडखोराच्या नरडीचा घोट घेण्यास दिल्लीकडे जाण्याचा हुकूम द्यावा. या संधीची आम्ही वाट पाहून आहोत !' त्या विलक्षण राजनिष्ठेने जिकडेतिकडे अेकच तारीफ सुरू झाली. खुद्द गव्हर्नर जनरलकडून या "अद्वितीय अभिमानीपणाबद्दल व राजनिष्ठेबद्दल ६-व्या रेजिमेंटला सार्वजनिक आभार देण्याचा हुकूम आला. अितक्यात कुणी नागरिकाने वातमी कळविली की, ६-वी रेजिमेंट आतून नवशिपांत फितूर झालेली आहे. ही वातमी अैकताच राजनिष्ठेचें प्रात्यक्षिक म्हणून ६ व्या रेजिमेंटने दोन शांतिदूतास पकडून अधिकाऱ्यांचे स्वाधीन केले. आता शंका ती कसली ? परंतु सरकारला अजून आपल्या राजनिष्ठेबद्दल संशय येत असेल तर आमचीं अंतःकरणें किती निर्मळ आहेत हें पाहिजे तर अिंग्रजी ऑफिसरांनी आमच्या रेजिमेंटमध्ये प्रत्यक्ष येअून बघावें ! अिंग्रजी ऑफिसर जों ६-व्या रेजिमेंटमध्ये येअून पाहतात तों खरोखरच जिकडे तिकडे राजनिष्ठेचा समुद्र अुफाळून तुडुंब भरला आहे ! फार काय पण त्या अिंग्रजी ऑफिसराच्या जवळ धावत जाअून शिपायांनी मिठ्या मारल्या व प्रेमळ अंतःकरणाने त्याच्या दोन्ही गालाची चुंबनें घेतली.[१४]

—व त्याच दिवशी रात्रीं त्या ६-व्या रेजिमेंटमधील अेकूण अेक शिपाअी ' मारो फिरंगीको ' म्हणून तरवार अुपसून अुठला !

आपल्या बेताचा बनारसप्रमाणे अकालीच विध्वंस होअून आपणांस निःशस्त्र केले जाअू नये म्हणून शिपायांचे गुप्त प्रयत्न चाललेले असता अिंग्रजांनी आपलीं बहुतेक कुटुंबें किल्ल्यात नेअून शिखांची व घोडेस्वारांचीं काही दले त्यांच्या संरक्षणासाठी ठेवलेलीं होतीं. बनारसची वातमी ता. ५ जूनला अलाहाबादेला येअून धडकली. त्या दिवशी शहरात अितकी अपूर्व खळबळ सुरू झाली होती की, अिंग्लिशांनी काही तोफा बनारसच्या बाजूकडील पुलावर रोखून ठेवून दिल्या व किल्ल्याचीं द्वारं बंद करण्यात आलीं. रात्रीचे सुमाराम शिपायांनी नुकतेंच ज्यांचे मुके घेतलेले आहेत ते सर्व अिंग्रजी ऑफिसर खाना घेण्यासाठी नाचत बागडत मेसमध्ये जमतात तोंच लांबवर भयसूचक बिगूल वाजू लागले ! " राजनिष्ठ ६-वी रेजिमेंट बंड करून अुठल्याचे भयंकर वृत्त त्या वाजण्यात होतें की काय कोण जाणे !

१४. Narrative by Sir C. Collins : "Sepoys flung themselves about the necks of their European officers and kissed them on both cheeks."

बनारसचे पुलावर संरक्षणाकरिता ठेवलेल्या तोफा किल्ल्यामध्ये पोचविण्याचा हुकूम त्या दिवशी संध्याकाळी झालेला होता. परंतु अिंग्रजांनी हुकूम करावे व शिपायांनी पाळावे हा आजपर्यंतचा राजनिष्ठ प्रघात त्या संध्याकाळी अेकदम बदलल्यासारखा दिसू लागला. कारण शिपायांनीच दुसरा अेक हुकूम सोडला की, तोफा किल्ल्याकडे न नेता कॅन्टोन्मेंटकडे नेल्या जाव्या ! हा अद्‌भुत प्रकार पाहताच त्या अुद्धट शिपायांना शासन करण्यासाठी अयोध्येचे घोडेस्वार बोलावले गेले. लेफ्टेनंट अलेक्झांडर हा तरुण अिंग्रजी ऑफिसर आपल्या नेटिव्ह घोडेस्वारांना सज्ज करुन लेफ्टेनंट हॉवर्डसह लवकरच त्या शिपायावर धावून गेला. या वेळेस चंद्रप्रकाशाने दिशा अुजळू लागलेल्या होत्या. घोडेस्वारांच्या पलटणीला त्या अुर्मट शिपायांवर चालून जाण्याचा अिंग्रजी अमलदारांनी हुकूम सोडला, व आता आपल्यामागे हजारो घोडे दौडत येअून या मूठभर शिपायांना तुडवून टाकतील अशा खात्रीने अिंग्रजी अमलदार स्वतः अुडधा घेत तुटून पडले ! —पण काय आश्चर्य ! मागे सर्व घोडेस्वार आपल्या स्वदेशबंधूंवर शस्त्र अुचलण्याचे नाकारुन जेथल्या तेथे अुभे होते ! हे पाहताच शिपायांत अेकच जयजयकार झाला ! खुद्द कर्नल अलेक्झांडर छातीत गोळी लागून खाली पडला. त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे केले गेले व ते सर्व हिंदी शिपाअी परस्परांस मिठधा मारुन त्या तोफासुद्धा कँपकडे चालू लागले. याच सुमारास आधीच दौडत आलेले दोन घोडेस्वार कँपवर ही वातमी आपल्या भाअींना कळवूनही चुकलेले होते. मग काय, परेडच्या जागेवर जो प्रसंग गुदरला तो अश्रुतपूर्व होय ! अिंग्रजी ऑफिसरानी हुकमाचा शब्द अुच्चारला की, खालीच गोळी मू सू करीत ! प्लॅंकेट ठार, अडज्युटट स्टयूअर्ड ठार, क्वार्टर मास्टर हावम् ठार, बिंगले ठार, मनरो ठार, बर्च ठार, लेफ्टेनंट अिन्नेस ठार ! परेडच्या जागेपासून तो खवळलेला सैंन्यासमूह आता आग लावीत जिकडे तिकडे पसरलेला होता. मेस हाअूसमध्ये खाण्यापिण्यासाठी बरेच अिंग्रज आलेले आहेत असे कळताच त्या मेस हाअूसवर हल्ला चढला व त्यातील अेकूणअेक अिंग्रज कापून निकाल झाला ! मागे सांगितलेच आहे की, अलाहाबादेला मुख्य गोष्ट म्हणजे किल्ल्ला ताव्यात घेणे ही होती. त्या किल्ल्यात अिंग्रजी बायकामुलें व मुबलक दारुगोळा असून या क्षणी तिथे सर्वस्वी शीख शिपायाच्या हातीच तो रक्षणाकरिता सोपवून दिलेला होता व ते शीख शिपाअी हिंदुस्थानी लोकांप्रमाणे ठरल्याप्रमाणे अुठलेलेच असतील व किल्ल्यातून फिरंगी हाकून दिल्याची सुवार्ता देणारी तोफ लवकरच कडाडेल अशी सर्व शिपायांना अुत्सुकता वाटू लागली.

परंतु किल्ल्यात शीख लोकानी मात्र खरी खरी राजनिष्ठा दाखविली ! त्यानी किल्ल्यातून फिरंग्यांचे निशाण अुखडून काढण्याचे नुसते नाकारले अितकेंच नव्हे, तर अुलटपक्षी त्या किल्ल्यामध्ये असलेल्या नेटिव्ह शिपायाना निःशस्त्र करुन बाहेर हुसकून देण्यासाठी अिंग्रजी अंमलदारास पूर्ण साहाय्य दिले. या वेळेस शीख लोक आपल्या

बाजूला चिकटून राहिले तरी कसे याचें अिंग्रजांना अजून आश्चर्य वाटत आहे ! [१५] अशा अर्ध्या भागात अलाहाबादचा तो विस्तीर्ण किल्ला बंडवाल्यांच्या ताब्यात पडला असता ! म्हणजे अेका अर्ध्या भागात अिंग्रजाच्या अंगच्या पाटीचा कणाच भरडून टाकला जाता, परंतु शिपायांनी तो अर्धा भाग आपल्या स्वदेश-बांधवांच्या व आपल्या देशमातेच्या देहालाच भरडून टाकण्यात खर्च केला. किल्ल्यामध्ये अस-लेल्या हिंदी शिपायांनी वारंवार अुचल केली असताही त्यांना न मिळता अिंग्रजी अंमलदाराने हुकमावरून त्यांना नि:शस्त्र करून शिख शिपायांनी किल्ल्याबाहेर हुस-कून दिले, व अशा रीतीने किल्ला अिंग्रजांचे हातीं पडला.

परंतु या ४०० शिपायांनीच काही तें अलाहाबाद शहर भरलेलें नव्हतें ! शिपायांची अुठावणी होण्याचा समय होतो न होतो तोंच अगदी त्याच सुमारास अलाहाबाद शहर अुठलें. तिकडे परेडकडे भयानक गर्जना चालल्या असता त्यांची प्रत्युत्तरें अलाहाबाद शहराच्या त्या घनघोर कंठातून निघू लागली. प्रथमत: शहरातील नाकेबंदी करून युरोपियन लोकांच्या घरादारांचें वाटोळें करण्यात आले व मग शिपाओी व नागरिक अेकत्र होअून त्यांनी तुरुंग फोडून टाकला. त्या तुरुंगातील कैद्यांनी मनात अिंग्रजांचा जितका द्वेष बाळगलेला होता तितका कोणाच्याच हृदयात नसेल ! त्यांनी तुरुंगातून सुटताच वर्षंश आरोळ्या व किंकाळ्या ठोकीत आधी युरोपियनांचे वसतीकडे धाव टोकली. विशेषत: तारायंत्र व रेल्वे याच्यावर बंड-वाल्यांचा फार कटाक्ष होता. रेल्वेचीं ऑफिसें, रूळ, तारा, खांब, अिंजिनें सर्व चिरडून पार ! अिंग्लिशांनी आपली बहुतेक पोरेंबाळें जरी किल्ल्यात ठेवलेलीं होतीं तरी काही अखेर बंडवाल्यांचे हाती लागलींच ! त्यांनी अेकेका सपाट्यात जो जो गोरा म्हणून भेटे त्याचा त्याचा निकाल लावीत चलावें. मग जे गोरेही नव्हते किंवा ख्रिश्चनही नव्हते परंतु ज्यांना अिंग्लिशांपुढे लांगूलचालन करण्याची चटक लागलेली होती अशा निमगोऱ्यास मार बसू लागला. बंड करण्यास जे अुत्सुक नव्हते त्या सर्वांच्या घरावर हल्ले चढले व ज्यांनी 'आम्ही दिल्लीचे बादशहाशी राजनिष्ठ राहू व फिरंग्यांचे विरुद्ध लढू' अशा शपथा घेतल्या त्यांसच काय ते प्राणदान देण्यात आलें. ता ७ जूनचे सकाळी अलाहाबादचा खजिना बंडवाल्यांनी ताब्यात घेतला. या खजिन्यात जवळ जवळ ३० लक्ष रुपये होते. नंतर दुपारचे सुमारास अेक थोरलें हिरवें निशाण मिरवत नेअून शहराच्या मुख्य कोतवालीवर अुभारलें गेलें व त्याला सर्व नागरिकांनी मुजरा केला !

शहर व किल्ला अशा रीतीने बंडाचे जाळ्यात पेटत असता त्याच दिवसांच्या सुमारास सर्व अलाहाबाद प्रांत अेका व्यक्तीसारखा बंड करून अुठला ! जिकडे

---

१५. खुद्द नील म्हणतो : "How the plan has not taken, by the Sikhs, is a wonder !"

तिकडे अेका क्षणात फिरंग्यांचें राज्य होतें कीं नव्हतें असें झालें! ज्या त्या खेडे गावाने अेक हिरवें किंवा जरतारी निशाण फडकवून दिलें व जवळपास असलेल्या-अेखाद दुसऱ्या गोऱ्या अंमलदारास पिटाळून दिलें किंवा बहुधा मारून टाकलें की, तेथें फिरंग्यांच्या गुलामगिरीचीं पाळेंमुळें सगळीं अुपटून टाकल्यासारखेंच होअी! अरेरे, शंभर वर्षें जीं मुळें खोलखोल रुतलीं जावीं म्हणून प्रयत्न करण्यात येतो तीं गुलामगिरीचीं पाळेंमुळें अितकी वरवरच पसरलेली असतात ना! खरोखर केवळ तरवारीने नांगरलेल्या जमिनीत काहीही पीक येत नाही हे निःसंशय आहे व त्यात गुलामगिरीसारखें अनैसर्गिक बीज तर कधीही रुजले जात नाही! हें जगा, हा धडा तू अजून तरी शिकशील काय?

अलाहाबाद प्रांतात बहुतेक तालुकदार मुसलमान असून त्यांची कुळें हिंदु होतीं अशा परस्परविरुद्ध असलेल्या दोन्ही जातींमध्ये अेकी होअून आपल्याविरुद्ध सामान्य लोकसमाजात पुंडावा माजेल हें अिंग्रजांना अशक्य वाटत होतें. परंतु जूनच्या पहिल्या आठवड्यात अशा कित्येक तरी अशक्यता शक्य झालेल्या होत्या! अलाहाबादेची शुद्धवणी अैकण्यासाठीही न थांबता त्या प्रांतातील झाडून सारी खेडीगावें अेकसमयावच्छेदेकरून स्वतंत्र झालीं! मुसलमान व हिंदु स्वदेशमातेच्या अेकाच दुधावर आपण पोसले जात आहो, याची काहीतरी प्रतिक्रिया म्हणून अुभयता वड करून अुठले व ते सर्वजण फिरंग्यांच्या अंमलावर घाव घालण्यास सिद्ध झाले. नौकरीवर असलेले धडधाकट शिपाअीच नव्हेत, तर लष्करी पेन्शनदार म्हातारेही स्वयंसेवक होअू लागले. त्यांनी आपल्या शुभ्र मिशावर पीळ भरीत तरुणांच्या सेना तयार कराव्या व जे कोणचीही प्रत्यक्ष कृति करण्यास वार्धक्याने असमर्थ होते त्यांनी आपल्या अयरुणावरून पडल्या पडल्या लढाअीचे डावपेच समजावून सांगावे व निकराच्या गोष्टीत सल्लामसलती द्याव्या। १६

पेन्शनदार शिपायांना देखील ज्या साध्याने वार्धक्यात तारुण्याचा बहर येअू लागतो त्या स्वराज्य व स्वधर्माच्या दिव्य चेतनेचें वारें अितरत्र लोकांत भरलेलें होतें यात काहीच नवल नाही. दुकानदार, मारवाडी व बनिये यांना देखील त्या भयंकर लोकक्षोभात अितके अवमान आलेले होते की, त्यांच्या द्वेषाविषयीचा अुल्लेख जनरल नील याने आपल्या रिपोर्टात विशेष रीतीने केलेला आहे " The!

१६. "And with them went on not only the Sepoys, who, a day before, had licked our hands, but the superannuated pensioners of the Company's native army who, though feeble for action, were earnest in their efforts to stimulate others to deeds of cowardice and cruelty." Kaye's Indian Mutiny, Vol II, page 193. See also Red Pamphlet.

majority of the chief merchants and others have shown the worst spirit towards us. Many of them have taken active part against us." ( Neill's Second Despatch )

परंतु अितकें जरी झालें तरी शेतकरी लोक तरी आपल्या बाजूला येणार अशी अजून अिंग्लिश लोक बडाअी मारीत होते ! पण अलाहाबादेनें ह्या भ्रमाच्या भोपळ्याच्या आपटून ठिकऱ्या अुडविल्या. हिंदुस्थानात आजपर्यंत कोणच्याही प्रकारच्या चळवळीत जितका पुढाकार कधीही कोणी घेतलेला नसेल अितका पुढाकार शेतकरी लोकांनी या ५७-च्या क्रांतियुद्धात घेतलेला होता ! आपल्या जुन्या तालुकदारांच्या—अिंग्रजांनी नेमलेल्या नव्हेत !—झेंडयाखाली, हातातले नांगर जेथल्या तेथे टाकून, हे शेतकरी वाऱ्यासारखे स्वातंत्र्ययुद्धार्थ धावत आले. त्यांनी आपल्या पूर्वीच्या राजांशी अिंग्लिश कंपनीशी तुलना करून पाहिलेली होती, व तीत त्यांना अिंग्लिश कंपनीपेक्षा आपले वेडेवाकडें, पण स्वराज्य हे अत्यंत श्रेयस्कर आहे असें पक्कें आढळून आलेलें होतें. म्हणून त्यांनी ठरलेल्या वेळी आजपर्यंतच्या अपमानाचा भयंकर सूड अुगविण्यास आरंभ केला ! जिकडे तिकडे स्वराज्याचा जयजयकार होअून गुलामगिरीचे तोंडावर रस्तोरस्ती मुलेंही थुकू लागलीं ! खरोखरच मुलेंही थुकलीं—कारण बारा चौदा वर्षांच्या मुलानी स्वराज्याचीं हिरवीं व जरतारी निशाणे अुभारलीं व त्यांच्या त्यांनी ताशे वाजवीत मिरवणुकीही काढल्या. अशाच अेका मिरवणुकीला पकडून अिंग्लिशानी त्यातील तरुण अर्भकाना फाशीची शिक्षा दिली ! ही शिक्षा दिल्याचे अैकून अेका अिंग्रज अधिकाऱ्यालाच अितकी लाज वाटली की तो डोळ्यात अश्रु आणून मुख्य कमांडरकडे त्या बालकांना सोडून द्यावें म्हणून विनंती करू लागला. परंतु त्याचा काही अुपयोग न होता स्वतंत्रतेच्या निशाणाना अुभारणारीं तीं तरुण मुले राजरोस रीतीने फाशी देण्यात आली ! या तरुण देवदूताचा हा छळ छळकाच्याच डोक्यावर आदळल्याशिवाय स्वस्थ कसा बसेल ? सर्व सृष्टि कंपित झाल्यासारखी हलमळू लागली. शेतकरी व तालुकदार, हिंदु व मुसलमान, वृद्ध व तरुण, पुरुष व स्त्रिया, सर्वजण राजकीय दास्याचा अुच्छेद करण्यासाठी हरहर म्हणून अुठला. "For not only in the districts beyond the Ganges but in those lying between the two rivers, the rural population had risen . . and soon there was scarcely a man of either faith who was not arrayed against us !" (Kaye's Indian Mutiny, Vol. II) ह्या बहुजन समाजाच्या प्रचंड प्रयत्नाना यश येण्यासाठी व श्रीमती हिंदभू स्वराज्ययुक्त होण्यासाठी प्रयागवळ व मुल्ला हे आपले आपले पवित्र आशीर्वाद त्या क्रांतीचे मस्तकावर वर्षू लागले !

हिंदुस्थानचे अितिहासात अितकी अुत्क्षोभक विद्रोही, भयानक व सर्वसामान्य अशी दुसरी अेखादी राज्यक्रांति आढळून येणे दुर्घट आहे ! लोकशक्ति जिच्यामध्ये

खडबडून जाग्या होतात व आपल्या देशस्वातंत्र्यासाठी अेकदम कडाडणाऱ्या मेघाप्रमाणे रक्ताचे वर्षाव कोसळवू लागतात असी सत्तावनसारखी प्रचंड राज्यक्रांति ही हिंदुस्थानचे अितिहासात अभूतपूर्व गोष्ट होती. त्यांतूनही हिंदु व मुसलमान आपले सवधुरवाचें नाते ओळखून हिंदुस्थानाकरिता अेकत्र होअून लढू लागावेत हा देखावा अगदीच अपूर्व व आश्चर्यकारक होता. अशा अपरिचित प्रचंड वावटळीला आरंभ केल्यानंतर त्यावर दाव ठेवताना हिंदुस्थान फसले यात काय नवल आहे? नवल आहे तें हें की ज्यावर दोप ठेवता येणार नाही असलें प्रचंड वावटळ हिंदुस्थानने निर्माण केलें ! कारण राज्यक्रांतीवर दाब ठेवणे हें कोणत्याही राष्ट्राला अेकदम माघलेलें नाही. फार काय, पण फ्रेंच राज्यक्रांतीशी जर तुलना करून पाहिलें तर अंदाधुंदी, गोंधळ, अत्याचार, आपस्वार्थीपणा, लुटालूट अित्यादि क्रांतीसारख्या अनिवार्य प्रलयात हटकून घडणारे प्रकार ५७ साली वरेच कमी घडलेले आहेत असें आढळून येअील. हिंदभूचा तो पहिला प्रयत्न—नव्हे प्रयोग होता व म्हणूनच त्या प्रयोगाचा ज्या अलाहाबादेच्या प्रांतात अितका विजय झालेला होता तिथे काही फसगती किंवा चुक्या किंवा अदाधुंदी झाल्यास काही आश्चर्य करण्याचे कारण नाही. जमिनदारांची पिढीजात भांडणे, गुलामगिरीने आलेल्या दारिद्र्याचा अतिरेक व शतकोशतकें अमलेलें हिंदुमुसल्मानाचे हाडवैर अेकदम नामशेष होण्याच्या प्रयत्नांत नैसर्गिक रीतीनेच अेकदम अुत्पन्न झालेले गैरसमज यांच्या योगाने अुठावणीचा पहिला धडाका अुडताच जिकडे तिकडे बेबंदशाही सुरू न होणें अत्यंत दुष्कर होतें ! सृष्टीचे आधी प्रलय झालाच पाहिजे. तो न होअू देणें अीश्वरास देखील अशक्य होतें ! ज्याला राज्यक्रांत्या हव्या असतील त्याला ही संकटें वाटेत बहुधा गाठावयाचीच !

परंतु लुटालूटीचा व जाळपोळीचा हा पहिला आठवडा संपताच ही अंदाधुंदीची गर्द संकटे वितळत जाअून अलाहाबादेच्या क्रांतीला व्यवस्थित आकार येअू लागला. त्या प्रांतातच काय, परंतु लोकशीमातून जिथे जिथे क्रांत्या होतात तिथे तिथे प्रतिक्षणानंतर पहिली अडचण म्हणजे पुढाऱ्याची पडते. ही अडचण अलाहाबाद शहरात लवकरच टाळली गेली. कारण मौलवी लियाकत अल्ली नांवाचा अेक अत्यंत कट्टा स्वातंत्र्यभक्त लवकरच त्या क्रांतीचा धुरीण बनला. ह्या पुरुषाची जी त्रोटक हकीगत मिळते ती जितकीच की, हा विणकरी लोकाचा प्रमुख धर्मगुरु होता. बंडाचे पूर्वी त्याने विद्यालयातून अध्यापकाचे काम केलेले होतें याच्या धर्मशील स्वाविम्याने याचेवर लोकांची पूज्यबुद्धि बसलेली होती. अुठावणी होअून लोकांनी अलाहाबाद स्वतंत्र केल्यानंतर थोड्याच दिवसात चोवीस परगण्यांचे जमिनदारांनी ह्या मौलवीला अलाहाबादेला आणून त्याग त्या प्रांताचे मुख्य अधिकारी नेमले व मोठ्या समारंभाने दिल्लीचे बादशहाने प्रतिनिधि म्हणून त्याची द्वाही फिरविली गेली. ह्या पुरुषाने आपलें मुख्य ठाणें खुश्रुबाग नांवाच्या अेका सटवदी बागेमध्ये स्थापून त्या सर्व प्रांतांतील बंडखोरांना संघटित करण्याला आरंभ केला. त्याने लवकरच सर्व

सरकारी कामें व कारखानें व्यवस्थित पद्धतीनें सुरु करविलीं. दिल्लीचे बादशाहीचे आपण सुभेदार आहो असें सुनतें सांगून तो राहिला नाही तर त्यानें अलाहाबादच्या सर्व हकीगतीचे सरकारी रिपोर्ट अगदी शेवटपर्यंत दिल्लीचे बादशहाकडे धाडीत असावें.

मौलवी लियाकत अल्ली ह्यांना पहिली गोष्ट जी करावयाची होती ती अलाहाबादेचा किल्ला हस्तगत करणें ही होय. त्यांच्या हाताखाली जें सैन्य गोळा झालेलें होतें त्यांना किल्ल्यावर हल्ला चढविण्यासाठी सज्ज करण्याचे प्रयत्न व जुळवाजुळव त्यांनी चालविलेली होती, तोंच बनारसहून जनरल नील अलाहाबादेकडे वळल्याची वातमी येऊन धडकली. तथापि अजूनही जर त्या किल्ल्यांत असलेल्या चारशे शिखांच्या मनात आलें असतें तर तोफा, दारुगोळा ह्यांसुद्धा तो प्रचंड किल्ला अेक बारही न काढता बंडवाल्याचे हाती पडला असता! जनरल नीलच्या अंतःकरणाला ही गोष्ट अेकसारखी सोंचत होती व म्हणून त्यानें रात्रीचा दिवस करून अलाहाबादेकडे युरोपियन सैन्यासह कूच केले. ता. ११ जूनला नील अलाहाबादेला पोचला. आपण येथीतोंपर्यंत नीम लोक किल्ला व त्यातील अिंग्रजी लोक यांचें संरक्षण करतील याची नीलला विलकूल आशा नसल्यानें ज्या वेळेस त्यानें किल्ल्यावर अिंग्रजी निशाण अजूनपर्यंत फडकत असलेलें पाहिलें त्या वेळेस त्याला फारच आनंद झाला. त्यानें आपल्यावरोबरच्या युरोपियन सैन्यास तावडतोब किल्ल्याचें संरक्षण करण्यास ठेवून दिलें व त्या राजनिष्ठ शिखांना किल्ल्याचे बाहेर काढून लढाओीच्या कामगिरीवर नेमलें. नीलचा शिखांवर किती थोडा विश्वास होता हे यावरून स्पष्ट दिसत आहे. नीलचा जरी शिखांवर विलकूल विश्वास नव्हता तरी शिखांचा मात्र त्याच्यावर पूर्ण विश्वास होता. कारण त्यांनी त्या अपमानानंतरही बंडवाल्यांस मिळण्याचें नाकारलें व नीलबरोबर आजूबाजूच्या खेडेगांवांची राखरांगोळी करण्यास तें अेका पायावर तयार झाले. ता. १७ जून रोजी अिंग्रजी सैन्य शहरात घुसू लागलें. त्या वेळेच्या हकीकतीबद्दल आपल्या बादशहाला धाडलेल्या रिपोर्टांत मौलवी म्हणतात, ' जे देशद्रोही पापी त्या फिरंग्यांना मिळाले आहेत, त्यापैकी काहींनी शहरात अशी कंडी पिकविली आहे की सर्व शहर अिंग्रज लोक तोफेच्या तोंडी देणार आहेत. हें सर्वांस खरें वाटविण्यासाठी त्यांनी आपली घरें सोडून देअून आपण जीव वचावण्यास निघून चाललो असें जाहीर केलें ' त्या योगानें सर्व शहर भयभीत होअून व मी संरक्षणाचीं आश्वासनें देत असताही तिकडे दुर्दशा करून अोसाड पडत आहे." मौलवीचा हा दुर्दैवी रिपोर्ट तयार होअून दिल्लीकडे जात आहे तोंच खुश्रूबागेवर अिंग्रजांचा हल्ला चढू लागला होता. त्या दिवशीचा हल्ला बंडवाल्यांनी परत फिरविला. परंतु किल्ला शत्रूच्या हाती असताना अेका पडक्या बागेत बसून अलाहाबाद धरू पाहणें हा शुद्ध वेडेपणा आहे असें पाहून मौलवी आपल्या अनुयायांसुद्धा कानपूरकडे ता. १७ जूनच्या रात्री निघून गेले. ता. १८ जूनला अिंग्रजांनी अलाहाबाद शहरात आपल्या शीख राजनिष्ठांसह पुन्हा प्रवेश केला.

बनारसप्रमाणेच अलाहाबाद शहर अिंग्रजांच्या हाती फिरून पडलें. तथापि त्या योगाने बंडवाल्यांचा धीर तिळमात्रही सुटला नाही. मुख्य किल्ल्यात अिंग्रज सुरक्षित झालेले पाहून त्या प्रांतातील कडव्या लोकांना अधिकच स्फुरण चढू लागलें व प्रत्येक खेडें हें आपआपल्या गढीचा अेकेक किल्ला करून तो लढविण्याच्या तयारीला लागलें. अशा या कृतनिश्चयी लोकास आता लाचलुचपतीने फसविण्याचे दिवस थुरलेले नव्हते. तें युद्ध तत्वासाठी जुंपलेलें होतें व म्हणून लहान लहान पुढारी धरून देणारास नीलने हजारो रुपयांचीं बक्षिसें लावलीं तरी कंगाल शेतकरीही तीं कृत्यें करण्यास नाखूष होते. लोकाच्या या अपूर्व तत्वनिष्ठेबद्दल त्या वेळच्या अिंग्रजी अधिकाऱ्यांनी पत्रांतही मोठें आश्चर्य प्रदर्शित केलेलें आहे. अेका, खेडेगावासंबंधाने अेक अधिकारी लिहितो : " The magistrate offered a reward of 1000 rupees for the head or the person of the leader of rebels who is well known to the natives, yet such is their hatred towards us that not one would give him up !" (Charles Ball, Vol. I) पुढारी पकडून देणे तर काय अिंग्रजाना पैसे घेअून माल विकणेंही त्या वेळेस अत्यंत घोर पातक मानलें जाअी. जर अेखाद्याने हा गुन्हा केलाच तर त्याला समाजाकडून भयंकर शिक्षा तावडतोब दिली जाअी. "Any one who had worked for the Europeans these murderers Killed. So if the population is to a man against us we should stand but a bad chance. A Poor baker was found with his both hands cut off and his nose slit because he had sent in bread to us." असें २३ जूनचा हा रिपोर्ट म्हणतो ! अिंग्रजाना नुसती भाकर (ब्रेड) दिली म्हणून गावकऱ्यांनी त्या भाकरीवाल्याचे दोन्ही हात व नाक कापून टाकले ! असा राष्ट्रीय व शास्त्रीय बहिष्कार पडल्यावर मग अिंग्रजाच्या हालाला पारावार नाहीसा झाला. अलाहाबादेला किल्ला घेतला खरा; परंतु तेथून पुढे मागे पाअूल टाकणें अिंग्रजांना अशक्य होअून गेले. त्यांना बैल मिळेनात, त्याना गाड्या मिळेनात, त्यांना औषधें देखील मिळेनात. आजारी सोजिरांना डोल्या नाहीत, डोल्या अुचलावयास माणसें नाहीत ! अशा कारणाने ठिकठिकाणी पडून राहिलेल्या आजारी लोकाच्या कर्कश आरोळ्या अितक्या भयंकर होत्या की त्या अैकूनच अिंग्रजी बाया पटापट मरू लागल्या. ते दिवस अुन्हाचे होते व जून महिन्यातच बडअुभारण्यात अिंग्रजाना नुसते आमच्या देशातील अुन्हाने मारून टाकू असा जो बडवाल्याचा कावा होता तो आता प्रत्ययास येअू लागला. डोश्याला ओल्या पट्ट्यावर पट्ट्या चढविण्यात जो तो अिंग्रज चूर झालेला. त्यातून अन्न पा पुरवठा बिलकूल पडेना धान्याचा अेक कणही अिंग्रजाना विकावयास कोणी तयार होअीनात. Up today we have had little to eat; indeed I would not have fed a dog with my yesterday's breakfast." म्हणून

अेक अधिकारी अलाहाबादेहून लिहितो. माझ्या कुऱ्याला देशील जें अन्न मी घालतें नसतें तें घास मी स्वतः खात होतो. ह्या अुपासमारीनें व ह्या अुपासमारीनें अिंग्रजी मंडळात कॉलरा सुरू झाला व त्यानंतर अिंग्रजी सोजिरांनी दारू पिअून पिअून पडण्याचा सारखा सपाटा लावला. सर्व शिस्त मोडून गेली. नीलच्या हुकमाला ह्या दारूड्यांनी जितकें धिक्कारून टाकावें की आता मी त्यांच्यापैकी अेका दोघांना फाशी देण्याचा निश्चय केलेला आहे असें कॅनिंगला कळविण्यापर्यंत मजल येअून ठेपली ! या अनंत संकटांनी येअून टाकलेली ती अिंग्रजी सेना ठिकठिकाणी गिळून गेली. कानपूरकडून फत्तेह मदत धाडण्याचे निर्णयावर निरोप येत असतानाही जनरल नीलसारख्या धाडसी योद्ध्यालाही अलाहाबादेला जुलैची पहिली तारीख खपणें भाग पडलें !

जनरल नील व त्याचे फ्युजिलिअर सैन्य हें मद्रासकडून आणविलेलें होतें ही गोष्ट महत्त्वाची आहे. जर का या वेळेस मद्रासकडे बंडाची ठिणगी हूल अुठली असती तरी देखील अिंग्रजांना अेक दिवसही तो ताण सहन करणें अशक्य झालें असतें. परंतु अलाहाबादच्या पुननिश्चयी हिंदुस्थानी लोकांनी जरी अिंग्रजी योद्ध्यांना नुसतें कोंडून मारावयाचा अितका यशस्वी घाट घालून तो सिद्धीस नेत आणला होता तरी त्यांनी अिंग्रजांना भीति पडण्याचें तरें कारण नव्हतें. कारण मद्रास, मुंबअी, राजपुताना, पंजाब, नेपाळ वगैरे सर्व हिंदुस्थान अजूनपर्यंत मढ्यासारखें निश्चल पडलेलें होतें – जेव्हा त्यातील काही भाग चलित झाले तेव्हा ते पिशाच्चासारखे बंडवाल्यांवरच तुटून पडले. खुद्द अलाहाबादेला व बनारसला अिंग्रजांबरोबर हजारो शीख शिपाअी नव्हते काय? मग घाबरणें कशाला! अितरांनी काहीही केलें तरी अलाहाबादच्या प्रयागवाळ्यांनी व मुल्लांनी, तालुकदारांनी व शेतकऱ्यांनी, विद्यार्थ्यांनी व शिक्षकांनी, दुकानदारांनी व शिपाअांनी अनंत अडचणी दत्त म्हणून पुढे अुभ्या असता, सर्वांना अेका छत्राखाली आकर्षून घेअील असा करामतीचा कोणीही पुढारी नसता व अपजयानें लोकांत निरुत्साहता व अंदाधुंदी माजली असताही गुलामगिरीचा जो दीर्घ द्वेष दाखविला व त्या स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या अुच्च ध्येयासाठी जो स्वार्थत्याग – स्वप्राणत्याग केला त्या योगानें त्या सर्व देशभक्तांबद्दल अितिहासास सदोदित भूषणच वाटेल !

* कारण त्या सर्व देशभक्तांना अिंग्रजांच्या दास्याविरुद्ध अुठण्याबद्दल फार कडक किंमत द्यावी लागत होती.[१७] *बनारस व अलाहाबाद ह्या प्रांतांत नीलनें जें क्रूर*

---

१७. खालील पत्र पहा : "*One trip I enjoyed amazingly We got on* board a steamer with a gun, while the Sikhs and the fussiliers marched up to the city We steamed up throwing shots right and left till we got up to the bad places, when we went on the shore

(टीप पुढील पानावर चालू)

वर्तन केलें त्याला रानटी अितिहासातही खरोखरच तोड सापडणें मुष्कील आहे! हें मी अलंकारिक भाषेत लिहीत नाही. अिंग्रजांच्याच हकीगती वाचून ही माझ्या आत्म्याची खात्री झालेली आहे. नीलने वृद्ध लोकांना जाळलें, नीलने मध्यमवयातील लोकांना जाळलें, नीलने तरुण लोकांना जाळले, नीलने कुमाराना जाळले, नीलने अर्भकांना जाळलें, नीलने पाळण्यातील मुलांना त्यांच्या पाळण्यात व अंगावर पिणाऱ्या तान्हुल्यांस त्यांच्या आअीचे अंगावर भाजून काढले ! शेकडो स्त्रियांना, कुमारींना मातांना व मुलींना त्यांची संख्याही न मोजताना नीलने जिवंत पेटवून दिलेलें आहे. परमेश्वरासमक्ष व मनुष्य जातीसमक्ष मी हे विधान करीत आहे ! ह्यातील अेक अक्षरही खोडण्याची कोणाची छाती असेल तर त्यांनी समोर अेक क्षणभर तरी येअून अुभें रहावें !

—व या सर्वांचा अपराध काय होता ? तर ते आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी ह्या सर्व हालअपेष्टा भोगण्यास तयार झालेले होते !

तरी अजून कानपूरची कत्तल झालेली नव्हती. कानपूरच्या कत्तलीचा सूड म्हणून नीलच्या कत्तली घडल्या नव्हत्या तर नीलच्या कत्तलींचा सूड म्हणून कानपूरच्या कत्तली झाल्या !

---

(टीप मागील पानावरुन चालू)

and peppered away with our guns, my old double barrel bringing down several niggers. So thirsty for vengeance I was. We fired the places right and left and the flames shot up to the heaven as they spread, fanned by the breeze showing that the day of vengeance had fallen on the treacherous villains. Everyday, we had expeditions to burn and destory disaffected villages and, we have taken our revenge. I have been appointed the chief of a commision for the trial of all natives, charged with offences against the Government and persons. Day by day, we have strung up eight and ten men. We have the power of life in our hands and, I assure you, we spare not. A very summary trial is all that takes place. The condemned culprit is placed under a tree, with a rope round his neck, on the top of a carriage and when it is pulled off he swings." —Charles Ball, Vol. I, page 257. य असें किती दिवस चालले होते ! "For three months eight dead carts daily went their rounds from sunrise to sunset to take down the corpes which hung at their own roads and market places and that six thousnd beings had been thus summarily disposed of and launched into iternity .' —Kaye, Vol. II, page 203.

वरील अुताऱ्यात निःपक्षपाती अितिहासाला व खऱ्या खऱ्या परमेश्वराला—नीलच्या परमेश्वराला नव्हे! —जर कोणाच्या कत्तलींचें याथार्थ्य व न्याय्यता वाटत असेल तर ती अिंग्रजांनी केलेल्या कत्तलींची नसून बंडवाल्यानी केलेल्या कत्तलींचीच होय! स्वातंत्र्यासाठी कत्तली क्षम्य आहेत की नाही ह्या प्रश्नाचा निकाल 'परमेश्वरावर सोपविला पाहिजे.' परमेश्वर मला क्षमा करो. कारण मी जें करीत आहे तें माझ्या देशाचें नैसर्गिक स्वराज्य मिळविण्यासाठी होय, हे वाक्य नीलपेक्षा नानाचे तोंडीच शोभते! स्वदेशासाठी बंडवाले लढत होते—अिंग्रज नव्हेत! व म्हणूनच क्रूर कत्तलींत जर कोणी 'पवित्र कर्तव्य' करीत असतील तर ते स्वधर्म व स्वराज्य या अुदात्त मार्ग्यासाठी झगडणारे व शंभर वर्षें छळलेल्या मायभूचा सूड अुगविण्यासाठी सवकलेले क्षुब्ध बंडवालेच होत!!

परंतु आता हें तत्त्वज्ञान काय अुपयोगी! नीलने अलाहाबादेला भयंकर क्रौर्याचीं जीं बीजें पेरलीं त्याची पिके तिकडे कानपूरच्या शेतात भरभराटून राहिलेलीं आहेत! अशा हंगामात त्या पिकाच्या कापणीसाठी जलदीने कानपूरकडे निघून जाणेंच योग्य होय!

* * *

प्रकरण आठवें

# कानपूर व झांशी

गुलामगिरीच्या नरकात पिचपत पडलेल्या पितराना अुद्धारण्याच्या पवित्र हेतूसाठी धो धो वाहू लागलेल्या या क्रांति-भागीरथीच्या रक्तप्रवाहास अुत्तर हिंदुस्थानच्या अफाट मैदानावर थागडधिगा घालण्यास सोडून देअून आता क्षणभर आपण त्या क्रांति-भागीरथीच्या मुख्य हरिद्वारी काय प्रकार चाललेले आहेत हें पाहिले पाहिजे. श्रीमंत नानासाहेबाच्या राजवाड्यात मीरत अुठावणीचे सुमारास जितकी निरनिराळी कार्यकर्ती माणसे जुळलेलीं होतीं तितकी त्या वेळेस लखनौच्या राजमंदिरात, बरेलीच्या मुख्यात किंवा खुद्द दिल्लीच्या दिवाण-अी-खासातही सापडणें मुष्कील होते. या ब्रह्मावर्ताच्या महालात सत्तावनच्या क्रांतीचा गर्भसंभव झाला व तिथेच तो गर्भ वाढीसही लागला. तिथेच त्या विचारगर्भाच्या द्रवीभूत रमाम सघटना येअू लागली व त्या पूर्ण गर्भाचा अुद्भवही यथाकाली जर ब्रह्मावर्तातच झाला असता तर तो बाधीने अल्पायुषी होता ना! परंतु मध्ये पूर्ण मासाचे आधीच मीरतच्या गडगडाटाने तो क्रांतिगर्भ जेव्हा अुन्मळून बाहेर पडला तेव्हा त्या

अथवा गर्भाचा परित्याग न करता तत्र वर्धीष्ण परिस्थितीनेही त्यांची योग्य ती अभिवृद्धि करण्यासाठी त्रिकडे ब्रह्मावर्तांच्या वाड्यात गोंगीची जय्यत तयारी चालू झालेली होती.

त्या वाड्यात नानासाहेबाचे बंधु श्री. रावसाहेब व श्री. बाळासाहेब व त्याने पुतणे श्री. रावसाहेब हे मालकाच्या क्रांतीच्या उदात्त हेतूना यशस्वी करण्यासाठी तनमनधनासह स्वात्मार्पण करण्यास सजलेले होते. तसेच नानाचे गुरु ज्यानी खिदमतगारीच्या अत्यंत कनिष्ठ स्थितीतून आपल्या दक्षतेने व हुशारीने आपल्यास राजमान्यतेला पात्र करून घेतले, ज्याने युरोपखंडातील राजकारणाचा व संग्रामभूमीचा अभ्यास करून आपल्या स्वदेशभूमीला गुलामगिरीतून मुक्त करण्याच्या धर्मयुद्धाला त्याचा सम्यक उपयोग करून घेता येईल हे धूर्ततेने प्रत्यक्ष अवलोकन केलेले होते, ज्यांनी त्या अवाढव्य क्रांतीचा नकाशा सर्वाचे आधी आपल्या मनःपटावर रेखाटून ठेवलेला होता व ज्यांनी स्वतः मुसलमान असूनही आपल्या हिंदमातेच्या स्वातंत्र्यासाठी अेका हिंदुराजाच्या अभ्युदयार्थ आयुष्य वाहून 'परैस्तु विग्रहे प्राप्ते वयं पंचशतोत्तरम्' ह्या महाभारतीय अुपदेशाची सार्थकता स्वाचरणाने केलेली होती, ते देशभक्त अझीमुल्लाखानही फिरंग्याचे गुलामगिरीवर सोडण्यासाठी तिथे हातात तिलांजलि घेअून अुभे होते. त्याच वाड्यात झाशीची विजलीही आपल्या तेजःपुंजतेने त्या गर्द अंधकारावर अेकसारख्या चमका मारीत होती.

परंतु अशा या अितिहासप्रसिद्ध वाड्यात तिकडे शस्त्रागाराकडे 'निकषाच्या पाषाणावर तरवारीची धार पाजळण्यात कोणता योद्धा दंग होअून गेलेला आहे बरे?

वाचकहो, तो शस्त्रागाराकडे समशेरीला पाणी चढवीत असलेला सतेज मराठा तात्या टोपे हा होय! शिवछत्रपतींच्या आराडघातील हा शेवटचा जवानमर्द मराठा गडी आहे. जवानमर्दी ज्याच्या अंगात आहे असे पुष्कळ लोक असतात. परंतु या शेवटच्या मराठ्याची जवानमर्दी ही आपल्या स्वातंत्र्यासाठी आपल्या हिंददेवीने अुपसलेली तरवार होती. तरवार मेली पण तिचा वार मेला नाही–तो कधीही मरणारा नाही! तात्या टोप्यासारखी तरवार जिला, कालाने जीर्ण व शत्रूनी विदीर्ण केलेल्या म्यानातूनही स्वेच्छामात्रेकरून काढता येते त्या हिंदभूमीच्या अक्षय्य कुमव्याला नमस्कार असो!

हिंदभूमीच्या या नमस्काराई कुमव्यात अि. स. १८१४ सालच्या सुमारास वीरवर तात्या टोपे याचा जन्म झाला.[१] त्याच्या वडिलांचे नांव पांडुरंग भट असे

१. अि. स. १८५९ साली श्री. तात्याच्या जबानीत ते म्हणतात :

"My name is Tatya Topi. My father's name is Pandurang, inhabitant of Yeola, Paraganha, Paloda, zillah Nagar. I am a resident of Bithur. I am about forty-five years of age, in the service of Nanasahib in the grade of companion or aide-de-camp."

होतें. पांडुरंग भट्टास अेकंदर आठ मुलगें असून त्यांतील दुसऱ्या मुलाचें नाव रघुनाथ असे होतें. हाच रघुनाथ हिंदुस्थानच्या अितिहासांतील तारामालिकेमध्ये 'तात्या' या नांवाने चमकणारा स्वातंत्र्याचा दिव्य तारा होय!

पांडुरंगराव टोपे हे देशस्थ ब्राह्मण असून शेवटचे बाजीरावाजवळ ब्रह्मावर्तास ते दानाध्यक्षाचे कामावर असत. त्या ब्रह्मावर्तास अेक वेळ केवढा अलभ्य लाभ झालेला होता! तेथील पठाणात नानासाहेब, झाशीची छबेली, तात्या टोपे यांच्या समकालीन स्नेहलीला झालेल्या आहेत! लहानपणापासूनच श्रीमंत नानांचा व तात्यांचा अत्यंत स्नेह जुळलेला होता. ज्या महत्कार्यात पुढे त्यांना वीरचरित्रें करावयाचीं होती त्या महनीय कृत्याचें शिक्षण बालवयापासूनच या दोघा विभूतींना सृष्टिदेवीकडून अेकाच शाळेत दिले जात होतें. रामायण-महाभारताची पारायणे ज्यानी अेकत्र केलेली, मराठ्याच्या जवानमर्दीचे अितिहास ज्यानी अेकत्र वाचलेले व त्या वीररसाच्या घुटक्यानी ज्यांचे बालबाहू अेकत्र स्फुरलेले होते, त्याच या दोन छाव्यांनी आपल्या देशमातेसाठी अेकत्र लढावें! अेकेका शतकात अशी अेखादीच शाळा अुघडली जाते की, तिच्यात नाना, तात्या, राव व छबेली ही बालकें अेकत्र शिक्षण घेतात, अेकत्र हसतात, अेकत्र खेळतात! अेकेका शतकात अशी अेखादीच परीक्षा होते की जिच्यात हीं सर्व महानुभाव बालकें संग्रामपत्रिकेवर अद्भुत वीरचरित्रे अेकमताने लिहू लागतात! अशा या असाधारण शाळेचा व अशा या असाधारण परीक्षेचा मान त्या सत्तावनसाली ब्रह्मावर्ताच्या राजवाड्यास मिळालेला होता!

अेप्रिलचे शेवटी क्रांतिपक्षाचे संघटनेस अेकवाक्यता देण्यासाठी अुत्तर हिंदुस्थानातील मुख्य मुख्य शहरी स्वतः प्रवास केल्यानंतर अझीमुल्लाखान व नानासाहेब हे संकेतसमयाची मार्गप्रतीक्षा करीत मोठ्या शिताफीने थांबलेले होते. अितक्यात १८ मेच्या सुमारास मीरतच्या अुठावणीची व दिल्ली स्वतंत्र झाल्याची बातमी कानपूरला येअून थडकली. या अकाली अुठावणीची वार्ता अैकताच ब्रह्मावर्ताचे राजवाड्यात कोणत्याही प्रकारची दृश्य चलबिचल बिलकूल अुडाली नाही. राज्यक्रांत्यांत सहस्रशः निरनिराळ्या भागांचे चलन चालू होत असल्याने त्यांतील काही भाग जलदीने तर काही मदगतीने, काही पूर्व संकेताने तर काही आकस्मिक तेजाने गति घेअू लागावयाचेच! ब्रह्मावर्ताच्या राजवाड्याचे लक्षात हे तावडतोब आले व त्याने मीरतच्या अुठावणीचा पूर्ण फायदा घेण्याचा निश्चय केला परंतु तो फायदा घेण्यासाठी घाअीने दिल्लीचे मागोमाग अुठाव करावा किंवा जुनच्या पहिल्या आठवड्यातच पूर्वी ठरल्याप्रमाणे अुठावें? या दोहोंपैकी दुसराच मार्ग अिष्ट ठरून त्याप्रमाणे मेच्या अुत्तरार्धात ब्रह्मावर्ताची अंतर्बाह्य कारस्थानें चालू लागलीं. ब्रह्मावर्तापासून कानपूर हें अगदी जवळ आहे या शहरात बरेच दिवसापासून अिंग्रजी सैन्याचें महत्त्वाचें ठाणे ठेवलेलें असे. सत्तावनच्या मे महिन्यात त्या ठाण्यामध्ये १-ली, ५३-वी, व ५६-वी शिपायाचीं पायदळ पलटणे व शिपाअी घोडेस्वारांची दुसरी पलटण

असे अेकंदर तीन हजार नेटिव्ह सैन्य ठेवलेलें होतें. तेथील तोफखाना अिंग्रजांचे ताब्यात असून त्यावर सुमारे ६० अिंग्रजी व अितर दोगवाले सोजीर अितके गोरे रहात होते. या सर्व सैन्यावर सर ह्यु व्हीलर हे कमांडर असत. सर ह्यु व्हीलर हे वयाने वृद्ध व शिपायांमध्ये अत्यंत लोकप्रिय झालेले अंमलदार होते. या वृद्ध अंमलदाराने वीस युद्धांत व अफगाणिस्थानातील मोहिमांत चांगली नोकरी केलेली होती. कानपूर येथील नेटिव्ह सैन्याची या अंमलदारावर फार मर्जी आहे हें अिंग्रज सरकारला पूर्णपणे अवगत असल्याने कानपूरच्या शिपायांचे रागेत काही गलबतें चाललेली असावीत ही शंका कोणाच्याच मनास शिवली देखील नव्हती.

मे महिन्यात सुमारे ता. १५ ला कानपूर शहरात जिकडे तिकडे अेक प्रकारची विशेष चळवळ अुडालेली दिसू लागली. मीरतच्या अुठावणीची बातमी पोचल्याने शिपायांचे रागांतील ती पूर्वीची स्तिमितता जाअून त्या जागी चांचल्य आलेलें होतें. परंतु शिपायांना कधीच कळलेली ही बातमी अिंग्रजी अधिकाऱ्यांना ता. १८ मे पर्यंत कळलेली नव्हती. दिल्लीची बातमी आणणारी तारायंत्रें तोडून मोडून पडलेलीं असल्याने सर ह्यु व्हीलर यांनी ती बातमी काढण्याकरिता काही दूत धाडले. त्यास रस्त्यावर दिल्लीकडून येणारा अेक शिपाअी भेटला. परंतु फिरंग्यांस बातमी देण्याचें त्याने साफ नाकारलें! सत्तावन सालीं लांब लांब अंतरावरील बातम्या नेटिव्ह लोकांना क्षणार्धात कशा कळत व तारायंत्रें कानाशी लावून धरलेल्या अिंग्रजांना त्याचें कसे पूर्ण अज्ञान असे, या गोष्टीचें अिंग्रजी अधिकाऱ्यांना मोठें कोडें पडलेलें आहे![२] कानपूरच्या नेटिव्ह शिपायांना मीरतची अित्थंभूत हकीगत ही काही अुठावणी झाल्यानंतर पाठविलेल्या तारांनी कळण्याची जरुरी नव्हती. कारण ती अुठावणीचे अेक दिवस आधीच जिवंत तारांनी कळून आलेली असे. कानपूरच्या अिंग्रजी अधिकाऱ्यांना अखेर जेव्हा बातमी कळली तेव्हा मग कानपूर शहरच्या व शिपायांच्या रागेतल्या चळवळी म्हणजे काय आहेत याची त्यांना कल्पना येअू लागली. परंतु अद्भुत वार्ताश्रवणाने आलेली ही चंचलता जनमनातून लवकरच निघून जाअील अशा आशेने सर ह्यु व्हीलर यांना अजून पछाडलेलें होतेच. अिकडे कानपूर शहरात व शिपायात अिंग्रजांच्या अंमलाचा खेळखंडोबा करण्याचा समय जवळ आला असें प्रत्येकास स्पष्ट दिसू लागले व हिंदु व मुसलमान यांच्या मोठमोठ्या सभा, शिपायांच्या गुप्त बैठका, शाळांतील विद्यार्थ्यांत व त्यांच्या शिक्षकांत चाललेले संवाद व

२. Indeed, one of the most remarkable features of the Mutiny has been the certainty and rapidity with which the natives were made aware of all important movements in distant places. The means of communication is chiefly by runners who forwarded messages from station to station with extraordinary celerity." —Narative, page 23

बाजारात व दुकानांदुकानांतून चाललेल्या चर्चा ह्या सर्व वार्तांतून लोकक्षोभाची आतापर्यंत दाबून ठेवलेली ज्वाला भडका देऊन अुठू लागली. रस्त्यांतून अुघड रीतीने फिरंग्याना मारण्याचीं खलवतें लोक करीत व सालच्या दर्जाचे शिपाअी आपल्या स्वदेशी सुभेदारांच्या हुकमाशिवाय अितर कोणाचेच हुकूम जुमानीत नसत.[२] बाजारात अेक अिंग्रजी बाअी काही पदार्थ खरेदी करण्यास नेहमीच्या दौलात चालली असता समोरून कोणी वाटसरू कपाळाला आठ्या घालीत तिच्याकडे आला व तिला म्हणाला : "आता पुरे हा डौल! हिंदुस्थानच्या बाजारांतून आता आपली लवकरच अुचलबांगडी होणार आहे समजलात." अमली कडवी वाक्यें अैकण्याचा अिंग्रज लोकांवर हा पहिलाच प्रसंग! अशा या प्रसंगात आता स्वस्थ बसून अुपयोग नाही असें पाहून कमांडर सर व्हीलर ह्याने वडाच्या आधीच संरक्षणाची तयारी करावयास आरंभ केला.

प्रथमतः त्याने वेळप्रसंगी अेक आसऱ्याची जागा जय्यत असावी म्हणून गंगेच्या दक्षिण बाजूस व शिपायांच्या रांगानजीक अेक जागा निवडून काढली. त्या जागेला बळकटी आणण्यासाठी अुत्तम तटबंदी करून व तोफा रोखण्याच्या जागा ठिकठिकाणी रचून सर व्हीलरने तिथे अन्नाचा पुरवठा करण्याचाही हुकूम सोडला. परंतु नेटिव्ह काँट्रॅक्टरने धान्यादि सामग्री व्हीलरची दृष्टि चुकवून हुकमापेक्षा पुष्कळ कमी करून ठेवली होती असा बोलवा आहे! ह्या तटबंदीच्या जागेचा अुपयोग शिपायानी जरी बंड केले तरी देखील आपणास फारसा करावा लागणार नाही असा व्हीलर व अितर अिंग्रजी अधिकारी याना भरवसा होता. कारण अितर ठिकाणांप्रमाणेच कानपूरचे शिपाअीही ठायी ठायी लाडगेतोड न करता मारामारी करीत दिल्लीकडेच निघून जातील व ते दिल्लीकडे चालते की, आपणही गंगेतून अुतरून अलाहाबादेला अिलिदा सैन्यास जाअून मिळू असा त्याचा बेत होता! कानपूर येथील अिंग्रजी लोकांच्या संरक्षणासाठी ही लष्करी तटबंदीची मजबूत जागा अुभारूनच व्हीलर स्वस्थ बसला नाही, तर त्याने लखनौला सर हेन्री लॉरेन्स याजकडे मदत धाडून देण्याबद्दल निकडीची पत्रे लिहिलीं. परंतु लखनौला क्रांतीची क्षुब्धता अितकी भडकलेली होती की, गर हेन्री लॉरेन्सच मदत पाहिजे म्हणून ओरडत होता! तथापि ८४ गोरे सोजीर, लैफ्टेनंट अॅशेच्या हाताखालील गोरा तोफखाना व काही घोडेस्वार अितकें सैन्य कानपूरकडे त्याने तावडतोब रवाना केलें.

अिंग्रज लोकांचें सरक्षण करण्यासाठी सर व्हीलरने ह्या दोन तजविजा करून ठेवल्या यात काहीच विशेष नव्हते. परंतु अिंग्रजांच्या हिंदुस्थानावरील राज्यावर आलेली धाड टाळण्यासाठी जी तिसरी अेक तजवीज त्याने योजली होती तिच्याअितकी आता अद्भुत वाटणारी, परंतु त्या वेळेच्या जातिरचनेतील कौशल्याची यथार्थ

२. Nanakchand's Diary.

कल्पना देणारी अशी दुसरी विलक्षण गोष्ट या अितिहासात नमूद झालेली नाही ! सर व्हीलरची तिसरी तजवीज म्हणजे कानपूरचे संरक्षणार्थ येण्याची त्याने ब्रह्मावर्ताच्या राजाकडे केलेली विनंती होय ! मीरतच्या आकस्मिक वार्ता अेकताच लष्करातील खालच्या शिपायांत व बाजारातील साधारण लोकांत अेकदम चंचलता व विस्कळीत क्षुब्धता अुत्पन्न झालेली होती. परंतु ब्रह्मावर्तांचा समुद्र पूर्वी जितका शांत, गंभीर व सहनशील दिसत होता तितकाच तो आताही होता. त्याच्या हृदयात जमत असलेल्या प्रचंड वादळाचा मागमूस त्याच्या जलपृष्ठावर अेक लवलेशही दिसणें अशक्य होतें. कानपूरच्या सैन्यातील या चंचलतेने सर व्हीलर सावध झाला तरी त्याला ब्रह्मावर्तांचा राजा आपल्याविरुद्ध आहे याची तिळमात्र शंका येअीना. ज्याच्या मस्तकावरील मुकुट आता अेका क्षणापूर्वी आपण पायाखाली तुडविलेला आहे, नेपटीवर जाणूनबुजून पाय देअून ज्या नानाला आपण अेका क्षणापूर्वी चिरडीस नेलेले आहे त्याच नानाला अिंग्रजाने आपल्या संरक्षणासाठी कानपूरला येण्याची विनंती केली ! नाना हा सहनशील हिंदु आहे, तो मनात डाव धरणारा विषारी नाग नाही, असें अिंग्रजांना जें वाटले ते काही अगदीच चुकलेले नव्हतें. कारण आजपर्यंत अिंग्रजाचे पायाखाली तुडविलेलीं निर्जीव, निरुपद्रवी व नेभळीं गांडुळें हिंदुस्थानात काय थोडीं थोडकी होती ? असल्याच गांडुळांपैकी नानाही अेक गांडूळच असेल अशा भ्रमाने सर व्हीलरने ब्रह्मावर्ताचे वारुळात आपला हात खुपसला होता. ब्रह्मावर्ताच्या वारुळातील नागाला याहून दुसरे काय पाहिजे होतें ! त्याने दोन तोफा, तीनशे खाजगी शिपाअी, पायदळ व घोडेस्वार यासह ता. २२ मे-ला कानपूरमध्ये प्रवेश केला ! कानपूरला अिंग्रजी लष्करी व मुल्की अधिकाऱ्यांची वस्ती फार मोठी होती. तिच्या मधोमध जाअून नानांनी आपला तळ दिला. कानपूरला बंड झालें तर पहिल्याने खजिन्यावर हल्ला होणार हें खास, तेव्हा त्याच्या संरक्षणाची काय तजवीज करावी ? तर तो खजिना द्या नानाचे ताब्यात ! दारुखाना व शस्त्रागारें यांचें संरक्षण ? राहू द्या नानांचे देखरेखीखाली ! लवकरच या देखरेखीसाठी तिथे त्याच्या दोनशे शिपायांचा पहारा बसला ! कलेक्टर हिलवर्डन ह्याने नानाचे व तात्याचे फार आभार मानले व सर्व अिंग्रजी स्त्रियांनी व मुलांनी पाहिजे असल्यास ब्रह्मावर्ताचे राजवाड्यात आश्रयास जावें असाही बूट निघण्यापर्यंत वेळ आली !

यांचें नांव मराठी कावा ! अिंग्रजाचे संरक्षणासाठी व स्वदेश-स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या आपल्या सख्ख्या भावाशी लढण्यासाठी फौज-तोफखान्यासुद्धा नानाला कानपूरला बोलावून आणलें जावें, अिंग्रजाचे वस्तीत त्याचा तळ पडावा, अिंग्रजानी लाखो रुपयांचा खजिना त्याच्या ताब्यात द्यावा व अशा रीतीने मदत दिल्याबद्दल नानाचे आभार मानले जावेत यांचेंच नाव मराठी कावा ! व या गोष्टी त्या प्रचंड स्फोटापूर्वी फक्त अेक आठवडा आधी ! यावरून सत्तावन साली अिंग्रज सरकारला

अेकमताने अुठण्यास सज्ज झालेले आहेत व आपण म्हणाल तें करण्यास तयार आहेत" अशी सुभेदारांनी खातरजमा केल्यावर बाकीचे किरकोळ मुद्दे ठरविण्यासाठी दुसरी जास्त सावधगिरीची व सावकाश भेट घेण्याचें ठरवून सुभेदार परत फिरले. जूनच्या पहिल्या तारखेला संध्याकाळचे सुमारास श्रीमंत नाना हे आपले बधु बाळासाहेब व मंत्री अझीमुल्लाखान यांजसुद्धा गंगेच्या तीरावर आले. तिकडून सुभेदार टीकासिंग, त्याचें केंद्र मंडळासुद्धा तिथे आलेलेच होते. ही सर्व मडळी अेका नावेत बसून गंगेच्या त्या सुधाधवल जलाशयात शिरली. आपल्या स्वदेशरक्षणासाठी घनघोर संग्राम करण्याची प्रतिज्ञा त्या गंगाजलालाच हाती घेअून करण्यात आल्यानंतर सुमारे दोन तीन तास त्यांचे संवाद चालले. भावी कार्यक्रमाचा नक्की निश्चय झाल्यावर ती मंडळी परत फिरली ते त्यांचे संवाद काय झाले हें गगानदीच्या पात्रालाच काय तें ठाअूक आहे ! अितकें मात्र खरें की, दुसरे दिवशी शमसुद्दीन ह्याने आपली प्रियकरीण अझीझनचे घरीयेअून तिला नक्की वचन दिले की, दोन दिवसाचे आत फिरंग्याचा नायनाट होअून हिंदुस्थान स्वतंत्र होणार ! शमसुद्दीन ह्याने त्याच्या या प्रिय पात्रास ही स्वातंत्र्याची वार्ता काही अुगीच कळविली नव्हती. कारण स्वराज्यासाठी शमसुद्दीन याचा आत्मा जितका तळमळत होता तितकाच या सुंदरीचाही तळमळत होता. अझीझन ही शिपायांच्या अत्यंत प्रीतीतील अेक वेश्या होती. परंतु तिने आपले प्रेम साध्या बाजारात पैशावर विकण्याचे अैवजी तें स्वातंत्र्य-संग्रामाचे बाजारात देशप्रेमाचें बक्षीस म्हणून लावलेले होतें. सुंदर मुखावरील व तिच्या भोवयावरील अेकेका आढीने पळून आलेल्या भ्याडाना परत रणाकडे दवडलेलें आहे हें पुढे लवकरच सांगण्यात येअील.

क्रांतिपक्षाचे बेत अिकडे या थराला पोचत असता तिकडे अिंग्रजी लोकांची दरकणी जी भेधा अुडत होती ती काही पुसावयास नको ! लखनौहून मदत आल्यावर व श्रीमंत नानासाहेबांचें सरक्षणाखाली खजिना व दारूखाना गेल्यावर सर व्हीलरचें मनाला धीर आलेला होता. परंतु अिंग्रजाच्या लोकवस्तीला मात्र काही केल्या धीर निघेना. मेच्या २४-व्या तारखेला मुसलमान लोकाचा ओदचा जगी सण होता. या दिवशी सर्वत्र बडें अुठणार अशी हर अेक शहरी अिंग्रजाना धास्ती पडलेली होती. परतु अशा सहज ध्यानात येणाऱ्या दिवशी बडाचा सार्वत्रिक अुठाव करण्याअितके काही सत्तावनचे क्रांतिनायक वेडगळ नव्हते. ज्या दिवशी बंड होणार असें सहज वाटावें त्या दिवशी हटकून शांतता धरणें व ज्या दिवशी बंड होण्याचा मुळीच संभव न वाटेल अशाच दिवशी अुनळी मारणें, हे डावपेच तर बडाच्या यशाचीं मुख्य कारणें आहेत. म्हणून कानपूरलाही ओदचे महोत्सवात किंचितही गडबड अुडू दिली नाही. त्या दिवशी सकाळी अिंग्रज अितका घाबरला होता की, सर व्हीलरने लखनौला तार दिली "आज बंड होणें काही झाले तरी थांबणे नाही." परंतु त्या महोत्सवाच्या दिवशी सध्याकाळी जेव्हा सर्व मुसलमानांनी शिरस्त्याप्रमाणे साहेबाच्या भेटी

प्रतिभेटी घेतल्या तेव्हा सर व्हीलरला पुन्हा अेकदा अत्यंत घोर आल्यासारखें झालें. राणीच्या जन्मदिवशी अिंग्रजी तोफांची सलामी रीतीप्रमाणे व्हावयाची; परंतु क्वचित् त्या आवाजाने शिपायात नसती गडबड अुडेल म्हणून ती सलामीही देण्यात आली नाही!! अिंग्लिशांच्या महाराणीच्या जन्मदिवशी खुद्द तिच्या लष्करातही तिला सलामी देण्याची ताकद नसावी याबद्दल कित्येक अिंग्रजी अंमलदारांस भरपूर दुःख झालें, पण करतात काय बिचारे! बंड झाल्यास जी सरक्षणासाठी तटबंदीची जागा अुभारली होती म्हणून मागे सांगितले आहे त्या जागेकडे लक्ष दिलें तर अिंग्रजाची कोण अशरण स्थिति झालेली होती हें तत्काल ध्यानात येअील. 'लांडगा आला रे आला' अशी कुणीतरी मुद्दाम कंडी पिकविली की रस्त्यारस्त्यातून अिंग्रजांची लटांबरेंची लटांबरें लागली सैरावैरा पळावयास! अेक अिंग्रजी अंमलदार लिहितो :

"While I was there, baggies, palkis, gharris, vehecles of all sorts drove up and discharged cargoes of writers, tradesmen, ladies, women, suckling infants, ayahs and children—and officers too!—all the terror of an imaginary foe! In short if any insurrection took or takes place, we shall have no one to thank but ourselves, because we have shown to the natives how very easily we can be frightened and when frightened, utterly helpless!"

अिंग्रजांनी आपल्या वर्तनाने दाखविलेला त्यांचा हा भित्रेपणा, वरील अधिकारी म्हणतो त्याप्रमाणे, नेटिव्हांच्या खरोखरच ध्यानात आलेला होता. परंतु तो काही आताच नव्हे. ही तटबंदीची जागा बांधण्यास आरंभ झाला तेव्हाच अझीमुल्लाखानाने अेका लेफ्टनंटला हसत हसत हेंच नव्हते का कळविले? त्या लेफ्टनंटला अझीमुल्लाखान आपल्या नेहमीच्या मिठ्ठास वाणीने विचारतात, "का साहेब, ही अिकडे जी तुम्ही नवी अिमारत बांधीत आहा तिचें नाव काय ठेवणार?" साहेब म्हणाले, "खरेंच, मला ते अजून नक्की सुचलेलें नाही." डोळे मिचकावीत तो धूर्त अझीमुल्लाखान म्हणतो, "ठेवा झाले 'निराशेचा किल्ला' हे नांव!"

मेच्या शेवटी अेक दिवस अेका अिंग्रजी तरुण बाडाने दारूच्या अंमलात अेका शिपायावर गोळी झाडली. ती गोळी हुकली व शिपायाने त्या सोजिरावर फिर्याद केली. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे ह्या घोर अपराधातून त्या सोजिराची निरपराधी म्हणून सुटका झाली व कारण असे देण्यात आले की, "दारूच्या भरात बंदूक चुकून झडाली!" हा निकाल नेहमीचाच होता. परंतु आता मनु मात्र नेहमीचा नव्हता.[५]

५ ट्रेव्हेलिन म्हणतो : "The Sepoys, familiar as they were with the brutality of low Europeans and the vagaries of Military justice, would at less critical season have expressed small surprise either at the outrage or the decision. But, now their blood was up and their pride awake and they were not inclined to overrate the privileges of an Anglo-saxon or the sagacity of the Military Tribunal."—Cawnpore, Page 93.

या अपमानाची वार्ता येताच सर्व लष्कर गुरगुरू लागलें की, "ठीक आहे! आमच्याही बंदुका आता लवरच चुकून उडतील!" हें वाक्य शिपायाशिपायांतून अेक अुद्क्षोभक नारसिंह मंत्रच झालेलें होतें. अेकमेकांस भेटताच "आता बंदुका चुकून उडणार ना" असा अपरोक्ष मलाम्या फौजेत झडू लागल्या. तथापि मीरतप्रमाणेच घाअी न करता संकेतघटी येअीतों त्यानी सर्व राग मनातल्या मनात गिळून टाकण्याचा निश्चय केला.

या भयाणतेला आणखी भयाण करण्यासाठीच कीं काय, त्याच वेळेला अेका अिंग्रज गृहस्थाचें व त्याच्या बायकोचें अशीं दोन प्रेतें गंगेच्या पात्रातून वहात वहात कानपूरला आलीं! वर कोठरया तरी शहरातील बंडवाल्यानी केलेल्या कत्तलीची ती साक्ष कानपूरशी काय काय भयंकर संवाद करीत असेल? गंगेला अजून अशीं कितीतरी ओझीं वहावयाचीं होतीं!

'लांडगा आलारे लांडगा' अशी कंडी पिकवून पिकवून आता अिंग्रजाना अितके वेळ फसविलेलें होतें की, ज्या वेळेस लांडगा खराच येणार त्या वेळेस ते खुशाल घोरत पडू लागले होते. जूनच्या पहिल्या तारखेला खुद्द सर ह्यू व्हीलर लॉर्ड कॅनिंगला लिहितो, "क्षुब्धता व भय अुरलेलें नाही. कानपूर सुरक्षित झालें. अितकेच नव्हे तर खुद्द लखनौलाही मी लवकरच मदत धाडून देतो!!" व अलाहाबादेहून आलेली गोरी फौज खरोखरच लखनौकडे जाण्यास निघाली! आणि ती केव्हा? तर तारीख तीन जूनला! ज्या कटामध्ये तीन हजार शिपाअी व वेश्यासुद्धा कानपूरचें सर्व शहर गुंतलेलें होतें त्या कटाची बातमी अिंग्रजापासून व त्याना मदत करणाऱ्या नानकचंदासारख्या कुऱ्हाडीच्या दांड्यापासून अितकी मोहरबंद राखली जावी हें केवढें आश्चर्य आहे!

ही मोहोर ता. ४ जूनचे रात्री अखेर फुटली, सार्वत्रिक कार्यक्रमानुरूप रात्रीचे अंधारात काही बार झाले व ठरलेल्या अिमारतीस आग लागली! रक्तपात, नाश व मृत्यु यांची शर्यत सुरू झाल्याची ती टाळीच होती. सर्वांचे आधी टीकासिंगाचा घोडा कर्कश रीतीने किंचाळला व त्याबरोबर हजारो घोडे अेका क्षणात फेंकी घेत दौडत निघाले. काही अिंग्रजी पागाना व घरांना आगी लावण्यास निघाले, काहीं अितर रेजिमेंटस्ना आणावयास निघाले व काही लष्करी निशाणाना व पताकाना ताब्यात घेण्यास निघाले या पताका ज्याच्या ताब्यात होत्या तो वृद्ध सुभेदार मेजर नेटिव्ह असताही बंडवाल्याविरुद्ध जातोसा दिसू लागताच अेक तरवारीचा रपाटा त्याचें मस्तकावर बसला व त्यासरशी त्याचें धड धडाडत खाली कोसळलें. "पहिल्या पायदळ रेजिमेंटच्या सुभेदाराला सुभेदार टीकासिंगाचा सलाम आहे व तो विचारीत आहे की घोडेस्वार फिरंग्याविरुद्ध निघाले असता पायदळाचा विलंब का?" असे दोन घोडेस्वारांनी सुचविताच पहिली पायदळ रेजिमेंट 'दीन व देश' म्हणत बाहेर पडली. हें पाहताच त्याच्या वरील कर्नल अेवर्ट म्हणू लागला "हा हा! माझ्या

लाडक्या मुलांनो (बाबा लोकांनो) हे काय! हे तुमच्या राजनिष्ठ शीलास शोभत नाही. थांबा, बच्चांनो थांबा!" कसले थांबा नि बिंबा! क्षणार्धात ती सर्व रेजिमेंट मिलिटरी शिस्तीने घोडेस्वारांना जाऊन मिळाली व मग तें सर्व सैन्य नवाबगंजच्या नानांचे छावणीकडे युद्धगीतें गात निघून चालले! नवाबगंजला खजिन्यावर नानाचे शिपाई तयार होते. त्यांनी या ममोहन भेशान्या स्वदेशबंधूंस मिठ्या मारल्या व त्यासरशी तो लाखो रुपयांचा खजिना व तो लाखो शस्त्रास्त्रांनी भरलेला दारूखाना जातिपक्षाच्या हातात पडला! नवाबगंजला त्या रात्रीत हा प्रकार चालला आहे तों जिकडे अजून दोन रेजिमेंट्स् निश्चल राहिलेल्या होत्या त्याना तरी ताब्यात ठेवावें म्हणून अिंग्रजानी तावडतोब त्यांना परेडीवर घेतले. अिंग्रजाचे हाती तोफखाना असल्याने ह्या दोन रेजिमेंट्स् त्या सर्व रात्रभर परेडीवर त्यांच्या युरोपियन ऑफिसरांसुद्धा सशस्त्र अुभ्या होत्या. सूर्योदय होताच युरोपियन ऑफिसरांची खात्री झाली की शिपाई तरी बदखोर नाहीत. म्हणून त्यांना परत लाअिनीमध्ये जाण्याची परवानगी देण्यात आली. व युरोपियन ऑफिसरही निघून जाअू लागले. आता खरी संधि आली असें पाहून त्या रेजिमेंटमध्ये अेका कोपऱ्यात अेक दोन अधिकारी काही बोलू लागले तों लगेच त्यातून अेक पुढे सरसावून ओरडला, "ओीश्वर सत्याकडे आहे! भाअी हो, चला अुठा!" हा हुकूम सुटताच जिकडे तिकडे तरवारी खणखणू लागल्या.व निर्वाणीची वेळ आली असें पाहताच अिंग्लिशाची तोफ बार करू लागली. परंतु शिपाअी आता तिच्या माऱ्याच्या टप्प्यातून पारही झालेले होते! या वेळेस अिंग्रजी ऑफिसरांचा मुख्य अुद्देश शक्य असूनही शिपायांनी त्याना न दुखविता ते संधि मिळताच आपल्या देशबांधवाकडे निघून चालते झाले. अशा रीतीने ता. ५ जूनला कानपूरच्या तीन हजार शिपायांनी अिंग्रजाच्या गुलामगिरीला झुगारून देअून नवाबगंजला नानाचे ठाण्यापुढे आपला तळ दिला. ही बातमी अैकून सर व्हीलरला अेक प्रकारे समाधान वाटले की अेकही अिंग्रज मेलेला नाही. आता रीतीप्रमाणे हे शिपाअी दिल्लीकडे निघून गेले म्हणजे कानपूरच्या जिवावरचे संकटही टळून जाओील.

—व अितर ठिकाणाप्रमाणेच जर योग्य व कर्त्या पुढाऱ्याची कानपूरला वाण असती तर सर व्हीलरच्या अजमासाप्रमाणेच शिपाअी दिल्लीकडे निघून जाते. परंतु त्या वेळेस नवाबगंजला कर्तुमकर्तुम् समर्थ असणाऱ्या पुढाऱ्यांची काडीअितकीही वाण नव्हती. तिथे श्रीमंत नाना होते, तिथे श्री. बाबासाहेब, बाळासाहेब व रावसाहेब पेशवे होते, तिथे तात्या टोपे होते, तिथे अझीमुल्लाखान होते. अितक्या निरनिराळ्या शक्ति सुदैवाने अेक असल्यावर मग शिपायानी पुढाऱ्याच्या शोधात दिल्लीकडे ते कशाला जावयास पाहिजे! बंडाच्या आरंभी सर्व फौज अेका दिल्लीसच कोंडीत गेल्याने खरा कार्यक्रम सिद्धीस जाणारा नव्हता. ठिकठिकाणी अिंग्रजांना ताण देण्यातच खरी खुबी होती. त्यातूनही कानपूर हे पंजाब, कलकत्ता व दिल्ली या

प्रांतांमधील सावळी असल्याने तिच्यावर आधान करुन अिंग्रजी दळणवळणाचे तुकडे तुडविणे अत्यंत अवश्य होतें. हें सर्व शिपायांस त्याच्या सुभेदारांनी व नानांच्या मंत्र्यांनी समजावून सांगितल्यावर कानपूरकडेच परत फिरण्याचा सर्वानुमतें बेत ठरला. त्या तीन हजार शिपायांनी श्रीमंत नानांस आपला राजा निवडलें व त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाची अुत्कट अिच्छा दर्शविली. श्रीमंत नानांना पाहताच त्यांच्या नांवाने सर्वत्र जयघोष झाला व सर्वांनी त्या स्वयंवृर्णीत महाराजाला भक्तिपुरस्सर मुजरे केले. श्रेष्ठाची निवडणूक होताच शिपायांनी नानांच्या संमतीने आपले लष्करी अंमलदार निवडण्यास लगेच आरंभ केला.

लष्कराचे सर्व नवीन नियम प्रसिद्ध करण्यात आले. सुभेदार टीकासिंग— कानपूरच्या क्रांतिकेंद्राचा केवळ प्राण – याना 'जनरल' ही पदवी मिळाली. तसेच जमादार दलगजनसिंग यांची ५३-व्या रेजिमेंटच्या कर्नलच्या पदावर व सुभेदार गंगादीन यांना ५६-व्या रेजिमेंटचे कर्नलच्या पदवीवर नेमण्यात आलें. नंतर अेका हत्तीच्या पाठीवर अेक प्रचंड स्वातंत्र्यध्वज अुभारुन त्याची जंगी मिरवणूक निघाली व त्या दिवसापासून श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या कारकिर्दीला आरंभ झाल्याची द्वाही फिरविण्यात आली.

परंतु ह्या निवडणुका होताच श्रीमंत नानांनी अेक क्षणही व्यर्थ दवडला नाही. बंडवाले शिपाअी दिल्लीकडे न जाता मध्येच थांबले आहेत ही बातमी कळताच जनरल व्हीलरसह सर्व अिंग्रज लोक आपल्या त्या तटबंदीच्या किल्ल्यात जाअून व तोफा रोखून बसलेले होते. त्यांची पुरुष, बायका मुले मिळून अेकंदर संख्या सुमारे १००० पर्यंत होती. ती तटबंदीची जागा काबीज करुन घेणें हें सर्वांत मुख्य कर्तव्य असल्याने श्रीमंत नानांनी सर्व सैन्यास तिकडे चलण्याचा हुकूम दिला. बंडवाले आपल्यावर चालून येतील ही अिंग्रजांना फारशी खात्री नव्हती. परंतु ता. ६ जूनचे पहाटेच्या सुमारास सर व्हीलर याला अेक चिठ्ठी आली. ती चिठ्ठी श्रीमंत नानांनीच धाडलेली असून ती अशी होती – "आम्ही लवकरच हल्ल्यास सुरवात करणार आहोत. आपणांस त्याची ही आगाअू सूचना मुद्दाम धाडलेली आहे." हें लढाअीचें आव्हान पावताच सर व्हीलरने सर्व ऑफिसरांना व भोजिरांना ठिकठिकाणी सज्ज करुन अुभें केले. तोफांवर गोलंदाज वर्तीसह बसले व अिंग्रजांच्या हातून शक्य तितकी लढाअीची सिद्धता करण्यात आली.

लढाअीला आरंभ करण्यापूर्वी श्रीमंत नानांनी अिंग्रजास, कोणच्याही प्रकारची विशेष जरुरी नसतानाही, आगाअू लेखी सूचना दिलेली होती ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. अितके औदार्य अिंग्रज जर नानांच्या ठिकाणी असते तर त्यांनी खचित दाखविले नसतें. श्रीमंत नानांच्या नावावर अमानुषतेचा बट्टा लावू पाहणाऱ्यांनी त्यांच्या हृदयाची ही नैसर्गिक वीरता पाहून लज्जेनें मान खाली घातली पाहिजे ! कानपूरच्या युद्धवर्णाचे वेळी अिंग्रजी ऑफिसरांना शिपायांनी दिलेले

जीवदान व हल्ला चढविण्याच्या आधी बारा तासाची नानांनीं दिलेली लेखी सूचना ह्या आरंभींच्या दोन गोष्टी ध्यानात ठेवून मग शेवटची धामधूम वाचली असता कानपूरची खरी स्थिति ध्यानात येणार आहे.

अिंग्रजांना लढाअीची सुरवात झाल्याची सूचना धाडताच सुभेदार टीकासिंग –आता जनरल टीकासिंग–यांनी दारुखान्याकडे जाअून तिथे संकाळभर शस्त्रास्त्रांची व्यवस्था पाहिली. हल्ल्याचे ठिकाणी त्यांची रवानगी करण्यात ते दंग होते. त्या शस्त्रागारातून तोफा व दारुगोळा नदीतून व जमिनीवरून अिंग्रजांच्या तटबंदीकडे वाहून नेण्यात आला व तिथे त्याची लष्करी कौशल्याने रचनाही झाली. याच वेळेस कानपूर शहरातही दंगल अुडाली होती. शिपाई, शिकलगार, बाजारातील मुसलमानांपासून तो रुप्याचा धंदा करणाऱ्या वजनदार लोकांपर्यंत सर्वजण हातात जें काय सापडेल तें घेअून युरोपियनांचा सुगावा काढीत भटकत होते. कचेऱ्या, कोर्टें व त्याच्यातील सर्व अिंग्रजी जुनीं नवीं दप्तरें जाळून टाकण्यात आलीं. व तटबंदीत जाण्यास जे युरोपियन लोक विसरले त्यांची अेकसहा शिकार करण्यात आली. या वेळेस दुपारचे बारा अुलटलेले होते. अेक वाजण्याच्या सुमारास अिंग्रजाचे तटबंदीला वेढा पडू लागला व संध्याकाळच्या सुमारास तोफांचे गडगडाट सुरू होअून त्या भयंकर रणांगणास निश्चयतेने आरंभ झाला.

अिंग्रजांजवळ सुमारे ८ तोफा असून मुबलक दारुगोळाही त्यानी त्या तटबंदीत आधीच पुरून ठेवलेला होता. बंडवाल्याच्या हातीं तर सर्व दारुखाना, शस्त्रागारे व मोठमोठ्या तोफा लागलेल्या असल्याने त्यांनाही सामग्रीची तूट नव्हती. जनरल टीकासिंग ह्यानीं प्रथमपासूनच तोफखान्याची व्यवस्था अत्यंत अुत्तम ठेवलेली होती. त्यांच्या तोफातून सुटणाऱ्या गोळ्यांच्या जबर माराने अिंग्लिशांकडील तटबंदीतील अिमारतींच्या अिमारती धडाधड कोसळून पडत. ता. ७ जूनला जेव्हा बंडवाल्यांकडून भराभर गोळे येअून पडू लागले तेव्हा त्या भयंकर स्थितीचा कधीही अनुभव नसलेल्या अिंग्रजी स्त्रिया व मुले मोठमोठ्याने आक्रोश करीत अितस्ततः धावू लागत. परंतु परिचयाने मृत्यूचीही अुग्रता नाहीशी झाली व पश्याच्या अिकडून तिकडे बागडण्यात जशी काही विलक्षणता वाटत नाही तशीच तोफेचे लाल लाल गोळे मस्तकावरून भरारत जात येत असताना त्यांत काहीच अद्भुतता किंवा भयानकता वाटेनाशी झाली.

अिंग्लिशांना वेढा पडून दोन दिवस झाले नाहीत तोंच त्याना पाण्याची टंचाअी पडली. त्या तटबंदीच्या टप्प्यात अेक विहीर काय ती अुपयोगी पडण्यासारखी होती. परंतु बंडवाल्यांचा त्या विहिरीवर अिंग्रजाच्या सोजिरापेक्षाही जास्तच डोळा होता. अुन्हाचा व अुष्म्याचा तापही अितका प्रखर होता की, सोजीर लोक अुष्म्या अुष्म्याच तिरीप लागून ठार होत. सर्वांचीं अंतःकरणे दगडासारखीं कठोर झाली. स्त्रीपुरुषांमधील सर्व भेदाभेद व जनलज्जा सुटून गेली. दुधावाचून तडफडत मुलें व

मुलांवाचून तडफडत आया पटापट मरू लागल्या. मेलेल्यांना पुरण्याची तर राहोच पण कोण मेलें आहे किंवा कोण हयात आहे यांचीही दाद लावणें अशक्य झालें. कारण जिवंत असणाऱ्यांच्या यादींत नांव लिहिता लिहिता तें खोडण्याची पाळी येई! असल्या प्रसंगाचीं वर्णनें यथार्थ रीतीनें देणारा अेकच अुपाय तो म्हणजे त्यांतील अेका तासाचें चित्र जसेंचें तसेंच रेखाटणें! कॅप्टन थॉमस स्वत:च्या अनुभवात लिहितो, "आर्मस्ट्रागला जखम होअून तो पडला असता त्याचा समाचार घेण्यासाठी लेफ्टेनंट प्रोल तिथे आला. तो समाधानाचे दोनचार शब्द बोलतो न बोलतो तों समोरून येणारी बंदुकीची गोळी त्याच्या मांडीत घुसून तो खाली धडाडला. त्याचा अेक हात माझ्या खांद्यावर ठेवून व त्याच्या कमरेला विळखा मारून मी त्याला सर्जनकडे नेण्यास सुचलू लागलो, अेकदोन पावलें मी चाललो तों अितक्यात गुंग आवाज होअून माझ्या खांद्यात गोळी घुसली व मी व प्रोल दोघेही जमिनीवर आसन्नमरण होअून पडलो. हें पाहताच गिलबर्ट बक्न आम्हाकडे धावत आला. परंतु त्याच्या बरोबरच धावत येणारी शत्रूची गोळी त्याच्या शरिरात आरपार घुसून तो जमिनीवर मृत्यूच्या जबड्यात कोसळला." हा अेक तासाचा अितिहास त्या अेकवीस दिवसांच्या अितिहासाची बरोबर कल्पना आणू शकतो. जनरल सर हो व्हीलरचा मुलगा जखमी झाला म्हणून खोलीत त्याच्या खाटेशेजारी त्याच्या दोन बहिणी व आओ त्याला औषधोपचार करीत होत्या. परंतु तें औषध पोटात जाण्याच्या आधींच धडाडकन आवाज होअून तोफेच्या गोळ्याने त्या मुलाचे शिर अुडवून नेलें. मॅजिस्ट्रेट हिलर्स्टन याच्या बायकोचा भयाने गर्भपात झाला, निच्याशी पडवीत अेकदोन शब्द बोलत तो अुभा होता तों २० पौंडांचा गोळा त्याच्या डोक्यावर कोसळून त्याचा चेंदामेंदा झाला. दोनचार दिवस लोटतात न लोटतात तोंच जिवा टेकून ही नूतन विधवा अुभी होती ती भिंत कोसळल्याने तिच्याखाली तीही आपल्या नवऱ्याच्या देहाप्रमाणे चेचून मेली तटाजवळच्या खदकात सात गोऱ्या बायका बसल्या होत्या. अेक बांब वरतून आदळला व त्यासरशी त्या सातींच्या सातीं बाया ठार झाल्या. अितकेच नव्हे तर ज्याने वडाचे आधी शिपायावर गोळी झाडली होती व जो निरपराध म्हणून सुटला होता तो गोरा मोजीरही ठार झाला! अखेर शिपायांच्या बंदुकाही चुकून अुडाल्या तर! व जेव्हा अुडाल्या तेव्हा अशा अुडाल्या की पुन्हा यावच्चंद्र दिवाकरौ त्यांचीं तीं भयंकर अुड्डाणें दारूच्या धुंदींतही अिंग्लिश लोक विसरणार नाहींत!

या भयंकर वेढ्यात अिंग्लिशांशी अिमानीपणाने राहणें हे ज्यांना आपले कर्तव्य वाटत होतें असे कितीक नेटिव्हही त्या तटबंदीत केवळ राजनिष्ठेसाठी मृत्यूच्या दाढेत हात खुपसून अुभे होते. अिंग्लिशांच्या मुलांना पाजीत असलेल्या अेका नेटिव्ह दाअीचे दोन्ही हात अेका बांबने अुडवून नेले. आपल्या धन्याला अून अून अन्न मिळावे म्हणून गोळ्यांच्या पावसातूनही नेटिव्ह बटलर अिकडे तिकडे धावत असताना

ापट मरून पडत. अिंग्रजांना पाण्याचा पुरवठा करण्यासाठी नेटिव्ह भिस्त्यांनी ले प्राण खर्चीत असावें. पाणी अितकें दुर्मिळ होतें की मुलांनी पखालीची कातडी ोल चघळीत बमावें! कालरा, आजार व त्रिदोष यानींही अिंग्लिशावर सूड विण्यास कमी केलें नाही. सर जार्ज पार्कर, कर्नल विल्यमस्, लेफ्टेनंट हुनी अेका त अेक कुजून कुजून मेले. जे दुखण्यांनी किंवा गोळ्यांनी मेले नाहीत ते या ांत स्मशानातील भयानकतेला भेदरून वेडे झाले! व या सर्व अनर्थांहूनही जास्त प्रद अनर्थ करण्यासाठी आता दुष्काळाचा अंमल सुरू झाला! असा कहर अुसळला. र वर्षे केलेल्या अन्यायाचा मूर्तिमंत सूड त्या कानपूरचे तटवदीत आपल्या ाळ विकाळ दाढेत जो सापडेल त्याला भरडीत अेकवीस दिवसपर्यंत अट्टहास्य त नाचत होता!!

अिंग्लिशाच्या तटबंदीच्या आत असा कहर अुसळलेला असताना त्या तटबंदीचे र रोखून ठेवलेल्या त्याच्या तोफांनी लढाअीची शर्थ केलेली होती. तोफखान्या- ा मुख्य अमलदार अॅशे, कॅप्टन मूर, कॅप्टन थॉमसन वगैरे अिंग्लिश लढवय्यांनी साची व पराक्रमाची शर्थ केली. लखनौहून किंवा अलाहाबादेहून आपल्यास रच मदत येअील ही अिंग्लिशांना अत्यंत आशा होती. बंडवाल्यांच्या कडेकोट रस्तातून कोठेही पत्रव्यवहार करणे अशक्य झालेलें होतें. तथापि अेकदोन वेळा ल व्हीलरनें पत्रांचे पंखात चेपून ठेवलेले व काही फ्रेंच, काही लॅटिन व काही ्म अशा भाषेत धाडलेलें अेक पत्र नेटिव्ह हेराने लखनौपर्यंत पोचविलें होतें. " मदत, मदत, मदत, ! मदत द्या नाहीतर मरतो ! मदत आल्यास आम्ही लखनौला मुक्त करू " असा मजकूर होता. परंतु बंडवाल्यांचा बंदोबस्त ा अुत्तम होता की अिंग्लिशाकडून आलेला काळा किंवा गोरा दूत क्वचितच जाअी, व अेखादा गेलाच तर त्याचें नाक कान छाटलेले असावयाचेच! बंड- ाच्या तळात फितूर पाडण्यासाठी अिंग्लिशांनी लाखो रुपयांची बक्षिसें देण्याचा ार देअून वरचेवर हेर लोकांस धाडीत असावें. परतु परत निरोप पोचवि- अेकजण जगला असेल तर शपथ! अुदाहरणार्थ, अेका हेराची त्यानेच लिहि- हकीकत देतो : " मिस्म ग्रेफर्ड याची बायको व मुलगी मेली. तेव्हा त्याने बंड- ाकडची बातमी आणण्याचे व कानपुरात फितूर करण्याचें काम पत्करलें. अेका ्‌ मेथराच्या वेष घेअून तो बाहेर पडला थोड्या अंतरावर हा येतो न येतो यास चतुर्भुज करून नानाचे समोर अुभें करण्यात आलें. त्यास अिंग्लिशाच्या बद्दल बरेच प्रश्न विचारले आधी पढविल्याप्रमाणे त्याने खोटी व भपकेदार देण्यास आरंभ केला. परंतु त्याचेच आधी पकडलेल्या दोन बायांनी अिंग्लि- सरीं नी हलाखीची हकीकत कळविलेली आहे असें पाहताच तो गांगरू लागला. प्रथम अटकेत ठेवण्यात आलें. नंतर त्याची ता. १२ जुलैला कोर्टात चौकशी त्याला तीन वर्षे सक्तमजुरीची शिक्षा देण्यात आली या शिक्षेवरून नानानी

त्या रणांगणाच्या घनगर्जनेनेही न्यायमनगुवा करण्यासाठी किती दक्षता बाळगलेली होती हें दिसून येईल. अिंग्लिशांच्या हेरांची जरी अशी फजिती अुडत होती तरी बंडवाल्यांचे हेरांनी मात्र आपलीं कामें अुत्तम बजावावीं. अेक दिवस अेक नेटिव्ह भिस्ती अिंग्रजी तटबंदीजवळच्या अेका अुंचवटयावर अुभे राहून ओरडला : "माझ्या मनांत बसत असलेल्या साहेब लोकांच्या प्रीतीमुळे मृत्यूचे भयासही न जुमानता मी अिथे अेक आनंदाची बातमी कळविण्यास आलेलो आहे. गंगेच्या पैलथडीवर साहेब लोकांचें अेक सैन्य तोफांसह आलेलें असून तें अुद्या तुमच्या मुक्ततेसाठी निघणार आहेत. त्या योगाने या हरामखोर बंडवाल्यांच्या तळांत अेकच धांदल व गोंधळ झाला असून आसपासचे सर्व राजनिष्ठ लोक अिंग्लिशांना मिळण्यास सिद्ध झालेले आहेत !" हे अैकून अिंग्लिशांना वाटलें की, आपण धाडलेल्या दूताचा विजय होअून बंडवाल्यांत दुफळी माजलेली असावी व अिनक्यात लखनौहून युरोपियनही येअून अुतरले असावेत ! दुसरे दिवशी पुन्हा तोच भिस्ती वर आला व ओरडला " साहेबांचा सदोदित विजय असो ! गंगेच्या पुरामुळे युरोपियन सैन्यास येण्यास अुशीर लागला होता. परंतु आता सर्व सिद्धता होअून ते निघाले आहेत. या दिवसाचे आत धन्याचा जयजयकार होअील !" तो दिवस गेला, दुसरा गेला. परंतु अिंग्रजांच्या ताणलेल्या दृष्टीत युरोपियन सैन्यही येअीना किंवा तो राजनिष्ठ भिस्तीही येअीना ! अझीमुल्लाखानांना पाहिजे होती तितकी अिंग्रजी लष्कराची अव्यवस्था केल्यामुळे पुन्हा जीव धोक्यात घालण्याचें त्या भिस्त्यास कारणच नव्हते ! शत्रूकडील हेरांच्या अशा या नव्या नव्या फसवणुकीने अिंग्रज वारंवार हिरमुसले होत असत !

जूनच्या सहाव्या तारखेला अिंग्रजांना वेढ्याची आगाअू सूचना दिल्यानंतर श्रीमंत नानासाहेबांनी आपला तळ वेढ्याचे अगदी नजीक आणून ठेवलेला होता. तटबंदीजवळच त्याचा तंबू दिलेला असून जवळच जनरल टीकासिंग याचाही तंबू पडलेला असे. कानपूर स्वतंत्र झाल्याचें अैकून त्या सर्व प्रांतात जिकडे तिकडे शांतीची अेकच लाट अुसळली होती. रोज नवे नवे जमिनदार व संस्थानिक आपआपल्या लवाजम्यानिशी नानांचे लष्कराला येअून मिळू लागले. मीर नवाब नावाचे संस्थानिक ज्या दिवशी सयुक्त धर्मध्वजाला मिरवीत नानास दोन हजार सैन्यासह येअून मिळाले, त्या दिवशी नागरिकांनी आनंदाचा अुत्सव केला व कानपूरच्या हलवायांनी त्या स्वदेशरक्षकात मेवामिठाअी वाटली. श्रीमंताच्या निशाणाखाली सुमारे चार हजार सैन्य या वेळेस जमलेले होते. परंतु त्यांपैकी तोफखान्यावरील अंमलदार मात्र आपले कर्तव्य नेटाने पार पाडीत असत. या तोफखान्यांपैकी अेका भागावर हिरवें निशाण फडकत असून तिथे नन्हीं नवाब हे आपल्या भव्य तबूत अहोरात्र बसलेले होते. या नवाबाच्या घरावर बंडाचे आरंभी जप्ती नेण्यात आलेली होती. परंतु लवकरच समजूत निघून त्या धर्मरक्षक रणांगणात या नवाबाचे नांवाचा जिकडे तिकडे धन्यवाद सुरू झाला. त्याच्या हाताखालील तोफखान्यावर

त्या प्रांतातील सर्व म्हातारे पेन्दानर गोलंदाज जमा झालेले होते. अिंग्रजाच्या तट-बंदीतील अिमारतीना आग लावण्यासाठी बंदथाल्याचे प्रयत्न चालले असता या नवाबाचे देखरेखीखाली अेका नवशिक्या गोलंदाजांने अेका नवीन ज्यालाग्राही समिश्रणाचा शोध लावला व त्याचा प्रयोग अितका विजयी झाला की अिंग्रजांच्या अत्यंत अुपयोगी पडणाऱ्या बराकी तत्क्षणी भस्मीभूत केल्या गेल्या ! या तोफखान्याचे बॅटरीवर स्वराज्यसंपादनार्थ अितकी अहमहमिका सुरू होती की, पुरुषांबरोबर स्त्रिया व तरुणांबरोबर वृद्ध लोक अेकसारखे खपत होते. त्या अुदात्त चैतन्याच्या हंगामात लोकशक्ति कशा खवळलेल्या होत्या हें त्या वेळच्या अेका वाक्याने ध्यानात येण्यासारखें आहे. अेक नेटिव्ह खिश्चन म्हणतो : " मुसल-मानांचें सोंग घेअून अेका चढाअीवर मी बसलो असता लढणाऱ्या वीरांना पाण्याचा पुरवठा करींत लोक धावत चाललेले मला दिसले. अितक्यात अेकजण मजजवळ आला व म्हणाला " तिकडे आपले देशबांधव रडत असता तुम्हासारख्या तरुणबाड मुसलमानाने असे माशा मारीत फिरणें लज्जास्पद आहे ! चल तिकडे, तोफखान्यावर स्वयंसेवा करावयास !" त्याने मला असेही सांगितले की, "करीमअल्ली ह्या अेक-डोळ्या पेन्शनर सुभेदाराच्या तरुण मुलाने आज मोठा पराक्रम केला आहे. त्याने अेक शोध लावून अिंग्रजाच्या अिमारतींना आग लावली. या त्याच्या शौर्याबद्दल त्याला नव्वद रुपये व अेक शाल बक्षीस देण्यात आली !" स्वदेशासाठी लढण्याचे अेवजी माशा मारीत बसणें हें मुसतें तरुणासच अत्यंत लज्जास्पद मानलें जात होतें असें नव्हे तर त्या कानपूरच्या बायकांनी देखील आपले जनानी स्वरूप बाजूस सारून रणांगणात अुड्या घेतलेल्या होत्या. परंतु त्या सर्व तरुण पुरुषांना व मर्दानी स्त्रियांवर अेक विजली आपल्या चमकानी लाज आणीत होती ती विजली दुसरी कोणी नसून मागे सांगितलेली वेश्या अझीझन हींच होय ! तिने आता आपल्या मापुक वेशाला लष्करी पेशाची भर टाकलेली होती ! गालावर लाली चढलेली होती ! ओठावर हास्य चढलेले होते व ती घोड्यावर चढलेली होती ती सशस्त्र असून तोफखान्यावरील शिपायी तिच्या मुद्रेकडे पाहून आपले श्रम विसरून जात. नानकचद आपल्या डायरीत म्हणतो : " सशस्त्र होअून अझीझन विजेसारखी तळपत आहे. केव्हा केव्हा दमलेल्या व जखमी शिपायांना मिठाअी वाटीत ती रस्त्यावर अुभी असते ।१"

लढाअींचे तोंड अिकडे अशा रीतीने लागलेले असताही श्रीमंत नानांनी राज्य-व्यवस्थेच्या रचनेची शक्य तितकी घटना चालविलेली होती. राज्यक्रांतींसारख्या अशाश्वत व अद्भुत प्रसंगी मुलकी व्यवस्था व शिस्तवार करणें अत्यंत कठीण असताही नानांनी प्रथमत शहरातील नागरिकांचे यथान्याय संरक्षण करण्यासाठी राज्यव्यवस्था करण्यास आरंभ केला. कानपूर शहरातील प्रमुख नागरिकांना अेकत्र बोलावून त्यांच्या बहुमताने निवडलेल्या हुलासिंग नांवाच्या गृहस्थास मुख्य

मॅजिस्ट्रेटना अधिकार देण्यात आला. ह्या होळासमिगाने गैरशिस्त शिपायांच्या किंवा लुटारु खेडवळांच्या जाचापासून नागरिकांचें संरक्षण करावें असा नानांचा सक्त हुकूम असे. लष्कराला अन्नाचा पुरवठा करण्याचें काम मुल्की नांवाच्या नागरिकाकडे सोपविलेलें असे. मुल्की व लष्करी खटल्याचे न्याय करण्याकरिता स्थापन केलेल्या न्यायासनावर ज्वालाप्रसाद, अझीमुल्लाखान व अितर मंत्रि-मंडळाची नेमणूक होअून त्यानें अध्यक्षत्व श्री. बाबासाहेब याना देण्यात आलें. या न्यायासनासमोरील खटल्याचे जे थोडेबहुत कागदपत्र सापडले आहेत त्यावरून नाहक छळ किंवा अंदाधुंदी करणाऱ्यांना कडक शिक्षा देअून प्रजेत शांतता करण्या-विषयी कशी काळजी घेतली जात होती हें लक्षात येतें. अेकाने चोरी केल्याचें साबीत झाल्यावरुन त्याचा अुजवा हात कापून टाकण्यात आला. गाअीचा वध केल्याबद्दल अेका मुसलमानी कसायासही अशीच कडक शिक्षा देण्यात आली. अुडाणटप्पूचे सदराखाली आलेल्या व गावात किरकोळ गुन्हे करीत हिंडणाऱ्या अपराध्यांस शहरातून गाढवावर बसवून हिंडविण्यात येअी. फ्रेंच राज्यक्रांतीमध्ये स्थापन झालेल्या " The Committee of Public Safety " प्रमाणे या कोर्टाचा अधिकार हलके हलके सर्व खात्यांवर चालू लागला. दारूचा तुटवडा पडला असता त्याची भरपाअी करणें, सैन्यास कपड्यांचा पुरवठा करणें, अिंग्लिश लोकांच्या पकडलेल्या हेरांची चौकशी करणें किंवा परागंदा होअू पाहणाऱ्या गनिमास शासन करणें वगैरे कामें याच कोर्टात केली जात व जो कोणी गोऱ्या लोकांस हुडकून काढून कोर्टात हजर करील त्यालाही येथेच बक्षिसें देण्यात येत.

ता. १२ जूनला अिंग्रजांच्या तटबंदीवर बंडवाल्यांनी पहिला हल्ला चढविला. अिंग्रजांची तटबंदी हल्ला करुन सर करण्यापेक्षा त्यांना चहूबाजूंनी कोंडून व तोफांच्या माऱ्यानें भाजून काढूनच नरम करावें असा बंडवाल्यांचा साधारण घाट होता. परंतु मधून मधून मरसक्त हल्ला चढविण्याचाही त्यानी प्रघात ठेवलेला होता. अुभय पक्षांतील काही लोक ठार झाले म्हणजे बंडवाले परत फिरत असत. बंडवाल्यांच्या तोफखान्याने जितका नेट व धाडस या युद्धात दाखविलें तितके पायदळांनी व घोडे-स्वारांनी दाखविलें नाही, हा दोष ध्यानात ठेवण्यासारखा आहे. दिल्ली व लखनौ-कडील वेढ्यात ह्या दोषाचें आविष्करण प्रामुख्यानेच दिसून येअील. परंतु कान-पूरच्या वेढ्यानही तोफांवर सर्व भार टाकून शिपाअी लोक हातघाअीच्या युद्धाला फारसे तयार नसत हें सत्य दृग्गोचर होत आहे. सर्वच शिपाअी मरणाला भीत असें मात्र मुळीच नाही. ता. १८ जूनला अयोध्येच्या शिपायानी अिंग्रजाचे तटबंदीवर जो हल्ला चढविला तसीं अवमानाची व शौर्याचीं कृत्यें अितिहासाला भूषणभूतच होत. ह्या दिवशी शिपायानी तोफेचा गोळाही मागे टाकीत तीरासारखी सनूचे छाव-णीवर नीट चाल केली, त्या तटबंदीवर ते चढले, अिंग्रजाची अेक तोफ दाबून टाकून अुलट फिरविली व क्षणभर असा रंग दिसला की तें संयुक्त धर्माचे निशाण म तो

स्वराज्याचा भगवा झेंडा आता कांहीं केल्या परत येत नाही. परंतु अशा शूर शिपायांस साह्य करण्याचें तर दूरच टाकून अुलट कारण नसताना अेकदम पळापळ करून सर्वत्र गोंधळ माजविण्याचा काही शिपायांनी जसा मक्ताच अुचललेला होता ! त्यांच्या या अवसानघाताने अितरांनाही परत फिरणें भाग पडे. वरील अयोध्येच्या शूर शिपयाप्रमाणेच कित्येक अुदात्त अंतःकरणांनी, मस्तकांनी व बाहूंनी अितराची वाट न पाहता स्वत: जी करवेल ती देशसेवा करून वीरमुक्ति मिळवीत असावें. अेके दिवशी हल्ला परतला असताही अेक शिपाओी मेल्याचें सोंग घेअून तसाच पडून राहिला. अिंग्रजाचे सैन्यात अत्यंत शूर म्हणून नावाजलेला व वेढ्यात अनेक वेळा तुटून पडणारा कॅप्टन जेन्किन्स हा दौडत निर्भयतेने चालला असता त्या मध्यावर ह्या मेलेल्या शिपायाने धाडकन अुडी मारली व त्या कॅप्टनचे मानेत गोळी घालून त्याला क्षणार्धात चीत केलें !

आता जूनची २३-वी तारीख आलेली होती. शंभर वर्षापूर्वी ह्या जूनचे २३-वे तारखेलाच अिंग्रजांनी प्लासीचे मैदानावर आपल्या राज्याचा पाया सणला होता. जूनच्या २३-व्या तारखेलाच हिंदुस्थानवर अिंग्रजांच्या तरवारीचा पहिला वार लागू झाला. आपले स्वातंत्र्याचें मंगळसूत्र तुटल्याने या २३ जूनलाच हिंदभू प्लासीचे मैदानावर ओक्साबोक्शी रडू लागली होती. त्या १७५७-च्या २३-वे जूनच्या अमंगल दिवशी झालेल्या या अपमानाचा चटका हिंदुस्थानचे अंतःकरणाला अितका जाळीत आहे की, शंभर वर्षें अुलटून गेलीं तरी तो अभद्र दिवस व त्याची ती अभद्र आठवण हिंदुभूमीच्या अंत.करणात ताजीच्या ताजी आहे ! परदास्याची ती २३-वे जूनला झालेली भयकर जखम शंभर वर्षे लोटलीं तरी अजून बुजली नाही. तिला बुजविण्यास समर्थ असें मलम अजून अुपलब्ध नाही ! शमप्रधान व क्षमाशील हिंदभूमीचा हा केवढा द्वेष ! ही केवढी अढी ! शंभर वर्षें लोटून गेली तरी अजून प्लासीचा सूड ती विसरलेली नाही ! मरणाऱ्या प्रत्येक पिढीचा शेवटचा निश्वास जन्मणाऱ्या प्रत्येक नवीन पिढीच्या पहिल्या अुच्छ्वासात प्लासीचा सूड मिसळवीत असतो ! ही गुरुपरंपरा आज शंभर वर्षे चालत येअून आज १८५७-ची २३-वी जून अुगाडली ! या दिवशीं तुझा सूड अुगविला जाओील म्हणून हिंदभूमीला भविष्य-वाद्यांनी आश्वासने दिलेलीं आहेत. नानासाहेब, ती परिपूर्ण करणें किंवा न करणें हें जरी अीश्वराचे अधीन आहे तरी तदर्थक तुमचे जें कर्तव्य ते तुम्ही बजावणार आहात नॉ ?

व हें कर्तव्य बजावण्याची शुभसंधि न दवडण्यासाठीच या दिवशी नानाचे लष्करात अेकच गर्दी अुसळलेली होती. आजपर्यंत कधीही केलेला नाही असा मात-बर हल्ला चढविण्याचा निश्चय करून लष्करातील अेकूण अेक लोक जरी नसला तरी अेकूण अेक भाग सज्ज झालेला होता तोफखाना, घोडेस्वार व पायदळ असें सर्व लष्कर त्या अैतिहासिक दिवसाच्या स्मरणाने स्फूर्तिमान् होअून रणांगणावर अुतरलें. त्यात

जे अत्यंत शूर होते त्यांनी अेकीकडे जाअून गंगेच्या पाण्यावर व कुराणावर शपथा घेतल्या की आज स्वातंत्र्य तरी मिळवावयाचें किंवा मारीत मारीत मरून तरी जावयाचें ! घोडेस्वारांनी अशी दौड ठोकली की शत्रूचे गोळ्यांस न जुमानता ते तटाला जाअून भिडले. पायदळाने मोठमोठाल्या कापसाच्या गठ्ठ्यांना ढकलीत ढकलीत त्या आधाराने अितर बाजूंनी तटबंदीवर गोळ्यांचा मारा चालविला. बंडवाल्यांच्या सैन्याला आजूबाजूचे गावकरीही येअून मिळाले होते. अिकडे तटबंदीतून अिंग्रजांनी गोळ्यांचा व तोफांचा सतत मारा चालू ठेवलेला होता. बंडवाल्यांचे सैन्याला अटकाव करणें जरी त्यांस अशक्य झालें तरी त्यांनी त्यांस तटबंदीवर येअू दिलें नाही. शेवटी लढाअीच्या अवमानाला लवकरच अुतरती कळा लागली व प्लासीच्या दिवसाचा अर्धांच मूड अुगवून बंडवाले आपणच परत फिरले.

परंतु कानपूरला चढविलेला हा शेवटचा हल्ला अगदीच व्यर्थ गेला नाही. त्या दिवशीच्या झटापटीनंतर अिंग्रजांच्या सर्व आशा विनष्ट झाल्या. त्यांचा सर्व धीर सुटून गेला व यापुढे नानांच्या हातून बचावून सुटणें अशक्य आहे असें त्यांस स्पष्ट दिसून आलें. ता. २३ जूनला जरी नसले तरी ता. २५ जून रोजी अिंग्रजांनी आपल्या तटावर तहाचें निशाण अुभारलें ![६] हे निशाण पाहताच श्रीमंतांनी युद्ध तहकूब करण्याचा हुकूम दिला व कैदेतील अिंग्रजांपैकी अेका बाअीबरोबर जनरल व्हीलर याला खालील चिठ्ठी धाडली : " दवीन व्हिक्टोरिया हिच्या प्रजाजनास– डलहौसीच्या राजकारणात ज्यांचा कोणच्याही प्रकारचा संबंध नसेल व जे शस्त्रें खाली ठेवून शरण येण्यास तयार असतील–त्यांना त्यांना अलाहाबादेला सुरक्षित रीतीने पोचविण्यात येअील." ही चिठ्ठी अझीमुल्लाखानाच्या हस्ताक्षरात असून ती नानाचे हुकमावरून लिहिलेली होती.

ही चिठ्ठी येताच जनरल व्हीलरने तिचा विचार करण्याचा सर्व अधिकार कॅप्टन मूर व व्हाअिटिंग याना दिला व त्या दोघा अधिकाऱ्यानी नानाना शरण रिघण्याचा निश्चय कायम केला. दुसरे दिवशी सकाळी ज्वालाप्रसाद व अझीमुल्लाखान हे नानाचे वतीने व मूर, व्हाअिटिंग व रोचे हे अिंग्रजांचे वतीने ता. २६ जूनला तटापाशी भेटले. अिंग्रजानी सर्व तोफा, खजिना, दारुगोळा व शस्त्रास्त्रें नानाचे स्वाधीन करावीत व नानानी त्याना खाण्यापिण्यास देअून अलाहाबादेस पोचवून द्यावें असें ठरले. त्या अटी अेका कागदावर लिहिल्या गेल्या व श्रीमंत नानांची सही घेण्यासाठी अझीमुल्लाखान वगैरे परत आले. या भेटीत पहिल्याने भाषण अिंग्रजीत झाल्यावर

६ बहुतेक अिंग्रजी अितिहासकार ही गोष्ट वगळतात, हे ध्यानात ठेवण्यासारखें आहे. श्री लाल्या टोपे याच्या जबानीत या गोष्टीचा स्पष्ट अुल्लेख केला आहे. " General Wheeler raised the flag of peace and then the fighting ceased."

मग बाकीचें आपणें हिंदुस्थानीत झालीं.[७] दुपारचे सुमाराम अिंग्रजानी त्याच रात्री निघावें किंवा सकाळी निघावें याबद्दल जरा बोलाचाली होअून असें ठरलें की, त्या रात्री सर्व ताबा नानांचे हाती दिला जावा व अिंग्रजानी दुसरे दिवशी पहाटे निघण्याची तयारी करावी. अशा रीतीने अुभयसमत ठरलेल्या त्या तहास घेअून मि. टॉड (नानांच्या वाड्यातील अिंग्रजी वाचक) हा श्रीमंतांकडे आला. त्यास नानांनी फार आदरातिथ्याने वागविले व अिकडचे तिकडचे कुशल प्रश्नही केले. त्याच रात्री अिंग्रजानी आपली शस्त्रें खाली ठेवली, तोफा नानांचे स्वाधीन करण्यात आल्या व ब्रिगेडियर ज्वालाप्रसाद आपल्या दोन अनुचरांसह येअून त्या तटबंदीत आपलें ठाणें देते झाले ! त्या रात्री कानपूरचे मॅजिस्ट्रेट होलासिंग व श्री. तात्या टोपे या दोघांनी नावाड्यांना रक्कम देअून सुमारे ४० नावा तयार केल्या. त्यांचे पाहुणीसाठी अिंग्रजांनी धाडलेले जे अधिकारी हत्तीवर बसून तेथे आलेले होते त्यांनी तक्रार केल्यावरून शंभर मजूर तावडतोब लावून नावावर आच्छादनें व बांबूची तक्तपोशी तयार करण्यात आली. धान्य व अितर जरूर ती सामग्रीही त्यावर चढविली गेली.

परंतु अिकडे ही अिंग्रजांची जावयाची तयारी चाललेली असताना तिकडे कानपुरास कोण कोण येअू लागले होते, हें पाहिल्याशिवाय व त्या जावक बाजू प्रमाणेच या आवक बाजूचेही टिपण दिल्याशिवाय हिशोब बरोबर ध्यानात येणार नाही. श्रीमंत नानासाहेबांनी स्वातंत्र्यध्वजाची गुढी कानपूरला अुभारल्याची वार्ता चहूकडे पसरल्यापासून तिकडे सर्व धर्मवीरांचा व देशवीरांचा पूर वाहू लागलेला होता. गावोगावाहून तरणबांड स्वयंसेवक तिकडे लोटत होते. ज्या गावाहून सैन्य धाडणें शक्य नव्हतें त्या गावाहून पैशाची मदत येत होती. परंतु या स्वयंसेवकाचीच गर्दी कानपूरकडे लोटत होती असे नसून ज्याना यशस्वी अुठावणीत यश आलेले नव्हतें असे अनाथ व अिंग्रजाच्या दास्याला कटाळलेले लोकही नानाचे निशाणाभोवती ' फिरंग्यांवर सूड पाहिजे आहे ' अशी गर्जना करीत रात्रंदिवस लोटत होते. जाळलेल्या गावाचे धूर तिथे आले, मृताच्या आत्म्याची हिडीस भुते तिथे आलेली होतीं. अलाहाबाद व काशी येथील शिपायावर व त्यांच्या बायकापोरावर क्रूर सूड अुगविल्याच्या वार्तासह तिकडून हजारो शिपाअी गेल्या आठवड्यात कानपूरला येत होते. ज्याचे ज्याचे म्हातारे बाप झाडाना अिंग्रजी आठाच्या (8) आकड्याने अिंग्रजांनी टांगलेले होते असे शेकडो हिंदी तरुण पुत्र तिथे आले. ज्याच्या तरुण पत्नींना त्यांच्या पाळण्यातील मुलांसुद्धा नीलने जिवंत जाळलेले होते ते भ्रतार तेथे आले. ज्याच्या मुलींच्या कुरळ केसाना व कपड्याना आग लावून ते पेटले असता तिकडे पाहून सोजीर टाळ्या पिटीत होते असे बाप तिथे जमा झालेले होते. ज्याचा देश बेचिराख झालेला होता, ज्याचा धर्म पायाखाली तुडविला जात होता व

७ Red Pamphlet Part I.

ज्याच्या राष्ट्रस्वातंत्र्याचें निर्दालन केलेलें होतें असे तळमळणारे आत्मे " ह्याचा सूड पाहिजे आहे ! ह्याचा सूड पाहिजे आहे !" म्हणून त्या राष्ट्रध्वजाभोंवती गोंधळ घालीत होते !

व आता हा विजयाचा दिवस आला असताही जेव्हा श्रीमंत नानासाहेब अिंग्रजांना अलाहाबादेस पोचवून देण्याचें वचन देअू लागले तेव्हा त्या शिपायांच्या व लोकांच्या मनात आशाभंगाचीं अभ्रें गडगडाट करूं लागलीं. नदीवर बोटींची तयारी पाहण्यास आलेल्या अिंग्रजी अधिकाऱ्यांना भागीरथीचे तीरावर जिकडेतिकडे पडलेल्या शिपायात ' कत्तल कत्तल ' अशी चाललेली कुजबूज स्पष्ट अैकू येत होती !!! असें सांगतात की राजवाड्यातल्या अेका पंडिताने राष्ट्राच्या विश्वासघातकऱ्यांचा व हत्याऱ्यांचा शिरच्छेद करण्यास धर्माची कसी आडकाठी नाही हेंही शिपायांस समजावून दिलें होतें !![८]

.... व अशा या भयानक वातावरणात जूनच्या २७-वे तारखेचा सूर्य अुगवला. सतीचौडा घाटावरून अिंग्रजांना निरोप देण्यात येणार होता. त्या घाटाचे आजूबाजूंना तोफा रोखलेल्या असून घोडेस्वार व पायदळ शिपाअीही जमावानें अुभे राहिलेले होते. कानपूर शहरातील हजारो नागरिक गंगेच्या काठी आज काय देखावा दिसेल याची आपआपल्या मनात भिन्न भिन्न चित्रें रंगवीत सकाळ होताच त्या घाटाकडे लोटू लागले. अझीमुल्लाखान, श्रीमंत बाबासाहेब व सेनापति तात्या टोपे हेही त्या घाटाजवळ अेका देवळाचे चबुतऱ्यावर जाअून अुभे राहिले. त्या देवळाचें नावही त्या प्रलयकालाला साजेल असेंच असल्याने तेथील सर्व प्रदेशावरचें अधिपतित्वच ह्या देवळाकडे दिलेलें होतें कीं काय असा भास होअी. कारण ह्या देवळात ' हरदेवा'ची मूर्ति स्थापलेली होती !

तटबंदीची जागा सोडून गंगेच्या काठी अिंग्रजांना आणण्यासाठीं अुत्तम प्रकारचीं वाहनें नानांनी धाडून दिलीं. सर हो व्हीलर ह्याच्यासाठी तर अेक अुत्तम शृंगारलेला हत्ती खुद्द नानांचे मातृतामह तटबंदीचे दाराशी येअून अुभा राहिला. त्या हत्तीवर आपली मिरवणूक काढविण्याचें सर व्हीलरचे मनात कसेंसेंच वाटल्याने त्याने आपलीं मुलें मागसे त्या हत्तीवर चढविली व आपण अेका पालखींतच बसला. अिंग्रजांचे स्त्रियानाही पालख्या देण्यात आलेल्या होत्या. अशा थाटामाटानें ही मिरवणूक निघाली कानपूरचे तटबंदीवरील अिंग्रजी निशाण खाली आलें व तिथे सद्धर्माचे सयुक्त ध्वज व स्वराज्याचा झेंडा डोलू लागला ! ह्या अिंग्रजी अिभ्रतीच्या झालेल्या अपमानानें अंतःकरण करपून आप्याचे अंवजी मृत्यूच्या क्रूर जबड्यातून अेकदम सुटल्याबद्दल अिंग्रजांना आनंदच झालेला होता. त्या आनंदाच्या भरात ते सर्वजण लगबगीने तटबंदी मागे टाकून जावयास सिद्ध झाले—पण कुठे ? व आता

८. ट्रेव्हेल्यिअन कृत ' कानपूर. '

आपल्यास सुरक्षित रीतीने वागविण्यात येईल अशी त्याची खात्री झाली – पण " डलहौसीच्या राजकारणाशी ज्याचा अर्थाअर्थी संबंध नाही " असा मनुष्य या तांड्यात अेखादा तरी आहे का ?

तथापि या प्रश्नाची चौकशी सध्याच करीत बसण्यात अर्थ नाही गंगेचा घाट अजून दीड मैल लांब आहे! दीड मैल चालत जाणारी ही मिरवणूक गंगेच्या वाळवंटावर अुतरताच तिच्या मागोमाग शिपायांच्या रांगांनी रस्ता अडवून टाकला पालखीतून अुतरताना किंवा हत्तीवरून नावावर चढताना अिंग्रजांना त्या दिवशी हात देण्यास कोणीही नेटिव्ह तयार होअीना. हो, पण चुकले! अेक दोन महत्वाच्या ठिकाणी पालखीतून अुतरण्यास मदत मिळाली; परंतु ती हात देण्याचे अैवजी शिपाओी हात दाखवीत असताना होय? कर्नल अेवर्ट घायाळ झाल्यामुळे त्याला अेका डोलीत घालून नेण्यात येत होते. त्याची ती डोली मध्येच हटकवून अेक शिपायी म्हणाला. "का कर्नल साहेब! ही परेड कशी काय आपणाला पसत आहे? रेजिमेंटचा पोषाख कसा काय आहे?" असे म्हणून त्याने त्याला खाली ओढला व तरवारीने त्याचे तुकडे तुकडे केले! त्या कर्नलची स्त्री शेजारीच होती, तिला काही जण म्हणू लागले "तू स्त्री आहेस म्हणून जा घे तुला जीवदान!" पण अेक विशाळ गडी ओरडला, "अरे हटजाव! स्त्री! पण ती गोरी आहे ना? मग अुडव तुकडा!" हें वाक्य संपण्याचे आधीच त्यातील भयानक अर्थाची पूर्तता झालेली होती!

नदीवर सर्व बोटी धान्यसामग्रीसुद्धा सज्ज होत्या हे अिंग्रजाच्या कमेटीनेच शोधाअंती सिद्ध केलेले आहे. त्या बोटींमध्ये पाण्यातून चालत किंवा लंगडत जाअून अिंग्रज लोक बसू लागले. जिकडे तिकडे स्तिमितता व स्तब्धता नांदत होती. नावा जवळ जवळ भरल्या होत्या. होडीवाले वल्ही घेअून सिद्ध होते. शेवटी नावा निघण्यासाठी श्रीमंत तात्या टोप्यांनी आपला हात हवेत पुढे मागे फिरवून हुकूम सोडला. अितक्यात अेका कोपऱ्यातून त्या भयप्रद शांततेचा भंग करण्यासाठी कोणी अेकाने अेक बिगूल जोराने फुंकले! त्या घाटावरील श्री हरदेवाने ते प्रलयकालीन डमरू तर डमडमले नसेल ना! कारण तो बिगुलाचा कर्कश हुंकार होताच तोफा बंदुका, तरवारी, कट्यारी, बेयोनेटा अेकदम कडाडू लागल्या. नावाड्यानी नावातून अुड्या घेअून ते जमिनीवर आले व जमिनीवरून शिपायानी अुड्या घेअून ते पाण्यात धावू लागले! 'मारो फिरंगीको' 'छाटो गनीमको' खाशिवाय अेक शब्द कोणी अुच्चारील तर शपथ! अितक्यात सर्व नावाना आग लागली अिंग्रजांचे पुरुष, बायका, मुले सर्व गंगेमध्ये पटापट अुड्या घेअू लागले. कोणी पोहू लागले, कोणी बुडू लागले, कोणी जळू लागले व सर्वजण लवकर किंवा अुशिरा गोळ्या लागून चीत झाले! मांसाचे गोळे, छाटलेली डोकी, सोडलेले केस, छिन्न झालेले हात, तुटलेले पाय, रक्ताचा पूर! सर्व गंगेचे पाणी लाल भडक! पाण्यातून कोणी

अिग्रजाने टोकें वर काडलें की गोळी यावी ! पाण्यात डोकें लपतलें की, गुदमरून प्राण जावा ! असा हरदेवाचा कोप झाला ! असा प्लासीचा वार्पिकोत्सव झाला !!

ही मकाळी दहाची वेळ होती. श्रीमंत नाना ह्या दिवशी ह्या वेळेस आपले दिवाणखान्यात अेकटेच फेऱ्या मारीत होते असें म्हणतात. भागीरथीचे तीरावर श्रीहरदेवाचे अध्यक्षत्वाखाली मनुष्यप्राण्यांतील त्या दोन भिन्न जातींतील शंभर वर्षांच्या हिशोबाची ती तोंडमिळवणी चालली असताना श्रीमंत नाना दिवाणखान्यात चंचल झालेले होते यात काय नवल आहे ! असले क्षण म्हणजे अितिहासातील अेकेका भागाचीं शेवटचीं अक्षरें असतात ! अेकेका युगाची ती समालोचना असते. असल्या क्षणाचें कर्तृत्व ज्याच्याकडे आलेले होते तो नाना त्या वेळेस दिवाणखान्यात हिंडताना त्याच्या मनात काय विचार चाललेले असतील ते असोत ! परंतु त्यांना फार वेळ विचार करावयास वेळ मिळाला नाही. कारण तितक्यात अेक घोडेस्वार दौडत आला व त्याने सतीचौडा घाटावर शिग्रजांची शिपायांनी सरसकट कत्तल चालविलेली आहे अशी वर्दी दिली. ही बातमी अैकताच नानांनी त्याल्लाच परत दवडलें व त्याच्याबरोबर सक्तीचा हुकूम धाडला की "गोरा पुरुष तेवढा कापून टाकावा व गोऱ्या बायका-मुलांना बिलकूल धक्का लावू नये."[९] नानाच्या हुकुमातील हा दुसरा भाग नीलच्या हुकमात अभावानेच आढळणारा आहे, हें जाता जाता सांगितलें पाहिजे !

नानांचा हुकूम परत सतीचौड्यावर पोचतो आहे तों शिपायांची शिकार भर रंगात आलेली होती. बोटींच्या कडकडत खाली कोसळणाऱ्या छिपाऱ्यात कित्येक गोरे लोक जळत होते तर कित्येक पोहत पोहत पार जाण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांच्यामागे शिकारी कुत्र्याप्रमाणे चवताळून व क्रोधाने सखोल गुरगुरत शिपाअीही पोहूं लागले दातात तरवारी धरून व हातात पिस्तुलें घेअून शिपायांनी पाण्यात त्या भयंकर मृगयेला आरंभ केला जनरल व्हीलर पहिल्या धडाक्यात ठार झाला, हेंडरसन ठार झाला–परंतु ठार किती झाले यांची यादी देण्यापेक्षा अशा ठिकाणी ठार कोण झाले नाहीत त्यांचीच यादी देणें बरें ! नानांचा निरोप येताच सर्व कत्तल बंद झाली व हुकमाप्रमाणे सुमारे १२५ स्त्रिया व मुलें जिवंत बाहेर काढण्यात आलीं. त्याना सवदा कोठीकडे कैद करून नेले व राहिलेल्या सर्व युरोपियन पुरुषाना अेका रांगेत अुभे करून त्यांचा शिरच्छेद करण्याची शिक्षा त्यांना वाचून दाखविण्यात आली. त्यांच्यापैकी अेकाने प्रार्थनेस वेळ मागितल्यावरून तो देण्यात आला. त्यानी सर्वांनी प्रार्थना केली व ती सपताच शिपायांच्या तरवारींनी त्यांचीं शिरें सपासप तुटवून

९. Forrest State Papers : "Almost all historians admit that Nana sent this order as soon as he heard the report." Also see Kaye and Malleson's Mutiny, Vol. II, page 258.

टाकली ! त्या ४० बोटींपैकी अेक बोट काय ती निसटली व त्या बोटीतील अिंग्रजांपैकी वाटेवरील खेडेगावांच्या हल्ल्यातून दोन चार अिंग्रज काय ते बचावले–व तेही दुर्विजयसिंग नावाच्या जमिनदाराच्या मनात करुणा आल्याने ! ह्या जमिनदाराने त्या नागव्या झालेल्या व मरत असलेल्या साहेबाना आपल्या घरी तूप रोटी चारून व अेक महिनाभर पाहुणचार देअून मग त्यांना अलाहाबादेस पाठवून दिलें.

सारांश, कानपूरला ता. ७ जून रोजी जीं अेक हजार अिंग्रजी माणसें हयात होतीं त्यांपैकी ४ पुरुष व १२५ बायकामुलें काय तीं ता. ३० जूनला हयात होतीं. त्यांतून ही १२५ बायकामुलें नानाचे कैदेत होती व ते ४ पुरुष अर्ध मेलेले होअून दुर्विजयसिंगाच्या दिवाणखान्यात औषधोपचार घेत होते ! परंतु ही यादी अजून नक्की झालेली नाही—ह्याच्यातही अजून बेरीज वजाबाकी व्हावयाची आहे ! ती वजाबाकी होअीतोंपर्यंत अिंग्रजी स्त्रियांना व मुलाना नानानी कैदेत टाकल्यानंतर त्यांचा बंदोबस्त कसा काय ठेवलेला होता हेंही थोडक्यात सांगण्यासारखें आहे. या बायांवर बळजोरी करण्यात आली, त्यांचे रस्त्यातून अुरभंग करण्यात आले, खुद्द नानांनी त्यांच्यावर जबरदस्तीचा संभोग करण्याचा प्रयत्न केला वगैरे बेशरमपणाचे आरोप व 'खात्रीलायक माहिती' मोठमोठाल्या अिंग्रजी लोकांनी प्रसिद्ध केलेल्या नसत्या व ही अत्यंत निंद्य व नरकगामी खोटीं विधानें जाणून बुजून करणाऱ्याना वर्षोनवर्षे सत्य प्रमाणें मानण्याअितकी जर अिंग्रजी राष्ट्राची दृष्टि अधळी व दुष्ट झालेली नसती तर ह्या गोष्टीचा अुल्लेखही करण्याचें प्रयोजन नव्हते ! अिंग्रजानी ह्या सर्व आरोपाची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या कमिशनच्या रिपोर्टांत ही सर्व विधानें झाडून खोटीं आहेत हें स्पष्ट लिहिलेलेच आहे.[१०] तथापि अितक्याने ही हकीकत संपत नाही त्या स्त्रियाना नानानी कत्तलींतून वाचवून नील, रेनाल्ड हॅवलॉक ह्या सर्वांना लाज आणली, अितकेच नव्हे, तर त्या बायकांना कैदेत घातल्यानंतर त्यांचे अमानुष हाल केले नाहीत, येवढेंच नव्हे तर अिंग्रजानी हिंदुस्थानात किंवा ऑस्ट्रियाने अिटलीत किंवा रशियाने पोलिश लोकांना किंवा ग्रीसने तुर्की लोकाना अशाच प्रकारच्या परिस्थितीत जितक्या कडकपणाने वागविलेले आहे त्याच्या शतांशाने कडकपणा नानानी त्या त्यांच्या व्यक्तिविषयक, राष्ट्रविषयक व धर्मविषयक कृतघ्न शत्रूंच्या जातीला त्या ५७-च्या अुग्रप्रलयातही दाखविलेला नाही ! व हे अिंग्रजांच्याच अितिहासावरून सिद्ध आहे.

कानपूरच्या हत्याकांडाच्या या पहिल्या गडबडीत, काही स्वारांनी चार अिंग्रज स्त्रिया आणि काही अर्धवाटच्या स्त्रिया पळवून नेल्या होत्या. नानासाहेबाना ही बातमी कळताच त्या स्वाराना नानांनी पकडून आणून त्यांची निर्भर्त्सना केली आणि

१०. Muir's Report and Wilson's Report, see also Kaye and Malleson's Indian Mutiny, Vol. II, page 267.

पळविलेल्या स्त्रियांची मुटका करण्याची आज्ञा केली.[११] कैदेतील स्त्रिया व मुलें यांना चपात्या व मांस मधून मधून देण्यात येत असे.[१२] कोणत्याही प्रकारचें कष्टाचें काम बळाने कैद्यांवर लादण्यात येत नसे. मुलांना दूधही दिलें जात असे. त्यांच्यावर देखरेखीसाठी बेगम नांवाची बाओी ठेवलेली होती. तुरुंगात कॉलरा नि हगवण सुरू झाल्यावर बंद्यांना शुद्ध हवा मिळावी म्हणून दररोज तीन वेळ अुघड्यावर आणलें जाअी.[१३] तथापि फिरंग्यांच्या विषयी लोकांत कसा भयंकर क्षोभ होता हें दर्शविण्यासाठी पुढील गोष्ट येथे सादर करीत आहे. तुरुंगाच्या भिंतीवरून अेक ब्राह्मण डोकावून पहात असता त्याला आजवर ज्या अिंग्रज स्त्रिया पालखीशिवाय अेक पाअूलही अुचलत नसत त्या स्वतःचे कपडे धूत असलेल्या दिसल्या. ब्राह्मणास त्यांचा कळवळा येअून तो शेजान्यास म्हणाला, " त्यांचे कपडे धोब्याकडे कां दिले जात नाहीत ?" त्या ब्राह्मणाने अस्थानी दाखविलेल्या माणुसकीचा तिटकारा म्हणून त्या शेजान्याने त्या ब्राह्मणाच्या थोबाडात हाणलें. कैदेतील अगदी थोड्या स्त्रियांना दळण देण्यात येअी व त्याचें बक्षीस म्हणून प्रत्येकीला अेका चपातीचें पीठ देण्यात येअी. स्वतःस जगण्यासाठी काय कष्ट पडतात त्याचा धडाच त्यांना मिळाला ! असा या कैदेचा शेवट काय झाला व त्याला कारण काय झालें याचा अुलगडा यथाप्रसंगी होअीपर्यंत या बायांना व मुलांना त्या कैदेतच सोडून देअून जास्त महत्त्वाच्या हकीकतीकडे वळूं.

ता. २८ जूनला कानपूरला असलेल्या अिंग्रजी सत्तेचे निर्मूलन पूर्ण झाल्यानंतर सुमारें ५ वाजण्याचे सुमारास श्री. नानांनी अेक टोलेजंग राजदरबार भरविला. त्या राजदरबाराचे सन्मानार्थ त्या वेळेस हजर असणान्या सर्व लष्कराचीही परेड बोलाविण्यात आली. पायदळाच्या सहा सबंध रेजिमेंटस् व घोडेस्वारांच्या दोन रेजिमेंटस् त्या समारंभास हजर असून शिवाय गावोगांवाहून या स्वदेशीय युद्धात आलेल्या स्वयंसेवकांच्या टोळ्याही आपआपल्या निशाणासह अुभ्या होत्या. ज्याच्या पराक्रमाने कानपूर जिंकता आले त्या मूठभर परंतु शौर्ययुक्त तोफखान्याचा मान या दिवशी यथार्थत्वाने पहिला ठेवलेला होता. बाळासाहेब हे सैन्यामध्ये प्रथमपासूनच प्रिय असल्यामुळे ते येताच सर्वांनी खडी तालीम दिली. प्रथमतः दिल्लीचे बादशहाचे नावाने १०१ तोफा सोडण्यात आल्या. सत्तावनसाली हिंदुमुसलमानांनी किती आदराने व बंधुभावाने अेकमेकांस शेवटपर्यंत वागविलें हें येथे ध्यानात ठेवण्यासारखें आहे नंतर श्रीमंत नानासाहेबांची स्वारी मैदानावर आली. हें पाहताच सर्वांनी महाराजाचा

११ ट्रेव्हेलियन कृत कानपूर पृ. २९९.

१२ नॅरेटिव्ह पृ. ११३

१३. Neill himself says in his report: "At first they were badly fed but afterwards they got better food and clean clothing and servants to wait upon."

जयजयकार केला व त्याना २१ तोफांनी सलामी दिली. वेदांतील २१ दिव-गांच्या वद्दल ह्या २१ तोफा होत्या असें विशेष म्हणतात. ह्या मानावद्दल महाराजांनी त्या विस्तृत सैन्याचे आभार मानले व ते म्हणाले : "हा आजचा विजय आपल्या गर्वांचा आहे. त्यांत आपल्या गर्वांचा यारसाच सन्मान आहे."[१४] नंतर संयुक्त धर्मयुद्धातील या विजयावद्दल नानांनी अेक लक्ष रुपये त्या लष्करास बक्षिसादाखल देण्याचा हुकूम दिला आहे हें प्रसिद्ध करण्यात येताच आणखी २१ तोफांची सलामी झडली. नंतर नानांचे पुतणे रावसाहेब व बंधु बाबासाहेब व बाळासाहेब यांस प्रत्येकी १७ तोफांची सलामी मिळाली. ब्रिगेडियर ज्वालाप्रसाद व सेनापति तात्या टोपे यानाही प्रत्येकी ११ तोफांचा सन्मान मिळाला. अशा रीतीनें त्या दिवशीच्या सूर्य-नारायणाला स्वातन्त्र्यसमरातील विजयगीतें तोफांच्या गडगडाटातून अैकविण्यात आल्यावर सर्व लष्कर परत आपल्या तंबूकडे धाडून देण्यांत आलें.

ही लष्करानी राजकीय पहाणी झाल्यानंतर श्रीमंत नानासाहेब हे श्रीमंत बाळासाहेबासह ब्रह्मावर्ताच्या त्या अितिहासप्रसिद्ध वाड्याकडे चालू लागले. ता. १ जुलै ही राज्यारोहणाकरिता मुकर करण्यात आलेली होती. त्या दिवशी त्या वाड्यात काय शोभा असेल ! पेशव्यांचें तें पुरातन सिंहासन समारंभाने व सुमंत्रित करून दरबारात आणण्यात आलें. श्रीमंत नानासाहेबांच्या भालावर राजतिलक लाव-ण्यात आला व हजारो नागरिकांच्या व तोफांच्या जयघोषात श्रीमंत नानासाहेब पेशवे हे अेका स्वतंत्र व स्वकर्त्याजित, स्वदेशसंमत व स्वधर्मप्रतिपालक सिंहासनावर आरोहण करते झाले ! त्या दिवशी कानपुराहून हजारो लोकांनी नानांस नजराणे व भेटी धाडलेल्या होत्या.[१५] हिंदु लोक अुघड अुघड म्हणू लागले की, आजपासून आता राजा रामचंद्राचा विजय होणार ![१६] स्वधर्माचा व स्वराज्याचा मंगल सुगंध फार दिवसांनी दशदिशाना वाहू लागला ! रायगडावरून ज्या मराठ्यांचे गादीला अिंग्रजानी कडेलोट केला होता तीच ही गादी अिंग्रजांच्या रक्तातून व मांसातून ब्रह्मावर्तात पुनरुद्भूत झाली !

आज तिच्या करपलेल्या वृक्षाला स्वराज्याचें फळ लागलेलें पाहून श्रीमंत नानांस काय वाटलें असेल बरें ?

परंतु नानाची बालपणीची मैत्रीण छबेली तिकडे काय करीत आहे ? नाना घोड्यावर बसले म्हणजे बालपणी जी आपणही घोड्यावर बसत असे, नाना हत्तीवर बसले म्हणजे जी आपणही हत्तीवर बसल्याशिवाय रहात नसे ती आताची झांशीची राणी, कानपुराकडे नाना स्वातंत्र्य तिलकांकित सिंहासनावर आरोहण करीत

---

१४. ट्रेव्हेलियन कृत कानपूर

१५. ट्रेव्हेलियन कृत कानपूर पृ. २१४

१६ सर कॉलिन यांचे 'नॅरेटिव्ह'

असताना आपणही झाशीकडे स्वकीय सिंहासनारोहण केल्याशिवाय भुअीवर थोडीच बसणार आहे ! स्वातंत्र्य रणपटावर सिंहासनांची भयंकर जुगार सुरू करण्यासाठी नानासाहेबांनी ज्या दिवशी आपला फासा कानपूरला फेकला त्याच दिवशी राणीनेही आपला फासा झाशीलाही फेकला ! याचें नाव सवंगडी ! ता. ४ जून रोजी अिकडे कानपूरचा स्वातंत्र्यघोषणेचा भयानक गडगडाट होअू लागला तों त्याच वेळेला तिकडे झाशीची चपलाही समराकाशात कडाडू लागली !

झाशीला सत्तावनचे मे महिन्यात नेटिव्ह पायदळाची १२-वी रेजिमेंट, १४-वी घोडेस्वाराची व अेक तोफखाना अितकें सैन्य ठेवलेलें होतें व ह्या सैन्यावरील मुख्य लष्करी अंमलदार कॅप्टन डन्लॉप हा होता. मे महिन्याचे सुमारास त्या सैन्यामध्ये काही गुप्त बेत चालत असल्याची अुडत वातमी अिंग्लिश अधिकाऱ्याचे कानावर येअू लागली. झाशीचे मुख्य कमिशनर स्कीन व डेप्युटी कमिशनर गॉर्डन यांच्या हाती शिपायांची काही पत्रें लागून त्यावरून असे अुघड दिसू लागलें की, राणीच्या नोकरीत असलेल्या कुणी लक्ष्मणराव नांवाच्या ब्राह्मणाने १२-व्या रेजिमेंटशी कारस्थान बांधलेलें असून शिपायांनी बंड करून आपल्या अधिकाऱ्यांना गारद करावे म्हणून त्याचे अव्याहत प्रयत्न चालले आहेत.[१७] हा ब्राह्मण म्हणजे स्वतंत्र झाशीचा पुढे झालेला दिवाण लक्ष्मणराव पांडे हा होय ! झाशीमधील धनवान ठाकूर लोकांत अेक प्रकारची खळबळ सुरू आहे व ते अिंग्रजी राज्याला अुलथून पाडण्याच्या यत्नांना करीत आहेत ही गोष्टही काहीं फारशी महत्वाची नाही. कारण हे ठाकूर कधी कोण्या सरकारशी राजनिष्ठेनें राहिलेले आहेत ?

तथापि झाशीचें सैन्य राजनिष्ठ राहील अशी अिंग्रजांची दृढ समजूत असे. सैन्याच्या राजनिष्ठेप्रमाणेच राणीच्या राजनिष्ठेबद्दलही काही संशय घेण्याचें कारण नव्हते. कारण नुकतेच तिने अिंग्रजांना वेळ पडल्यास शक्य तितकी मदत देण्याचें मुखनें कबूल केले आहे, अितकेंच नव्हे तर ती मदत आपल्यास करता यावी म्हणून आपल्या पदरचें सैन्य वाढविण्याची तिने परवानगी मागितलेली आहे ! अशा स्थितीत झाशी वडवाग्नीच्या ज्वालांपासून निर्भय आहे. मे महिन्याचे ३१ तारखेसही वरिष्ठ अधिकाऱ्याकडे झांशीच्या अिंग्रजांनी रिपोर्ट करण्यास काय हरकत आहे ?

ता. १ जून रोजी झाशीमध्ये काही अिंग्रजी अधिकाऱ्यांचे बंगल्यांना आग लागली ! ही आग जूनच्या पहिल्या आठवड्याला अितका निरोप देअून निघून गेली. ज्या दिवशी तिकडे कानपूर अुठले त्याच दिवशी ता. ४ जूनला झांशीही बंड करून अुठली. शिपायाच्या अेका टोळीने आपल्या हवालदाराचे अिशाऱ्यावरोबर अकस्मात् हल्ला करून स्टार फोर्ट त्यांतील दारूखान्यासुद्धा व शस्त्रागारासुद्धा हस्तगत करून घेतला ! कॅप्टन डनलॉपने घोडेस्वारांना व अुरलेल्या पायदळाना व तोफखान्याला

१७. चार्लस बॉल, खंड १, पृ. २७१

परेडीवर घेऊन झालेला प्रकार माळविताच त्या सर्व नेटिव्ह शिपायांनी राजनिष्ठेचा व कंपनीचा जयजयकार करुन सांगितलें की आम्ही कंपनीसाठी जीव देण्यासही मागे पुढे पाहणार नाही ! हें राजनिष्ठाप्रदर्शन अिकडे चाललेलें असतानाच तिकडे अिंग्रजानी झाशींच्या किल्ल्यांत आपली बायकामुलें नेअून ठेवून त्या किल्ल्याला लढविण्याची तयारी चालविली व मदतीसाठी नागावच्या अिंग्रजी छावणीकडे व अितर प्रांतांकडे निकडीचीं पत्रेंही लिहिली. ही पत्रें टाकण्यास पोस्ट ऑफिसकडे डनलॉप साहेब जों जातात तों त्यांस परेडीच्या मैदानावर १२-व्या पायदळातील शिपायांनी गोळी घालून ठार केलें. अेनसाअींन टेलरही ठार झाला ! तेव्हा सर्व अिंग्रज भयाने पळ काढून किल्ल्याकडे निघून गेले. त्या किल्ल्यात अिंग्रजानी सरक्षणा-साठी तोफा रोखून व दारुगोळा नेअून व्यवस्था केलेलीच होती व त्यांचा असा निश्चय होता की बाहेरुन मदत येअीतोंपर्यंत सुमारें अेक आठवडाभर आपण किल्ला सहज लढवू शकू. शिपायानी छावणीमध्ये जे युरोपियन सापडले त्यांना ठार करुन मग किल्ल्यावर चाल केली. अिंग्रजांनी राणीचें साह्य मागण्यासाठी स्कॉट व पर्सेल बंधू असे तीन अिसम धाडले होते. त्यांना वाटेतच गाठून ठार करण्यात आले. ता. ७ जून रोजी किल्ल्यावर बंडवाल्यानी निकराचा हल्ला चढविला. त्यांच्यापाशी चांगल्या तोफा नसल्याने त्याना किल्ला सर करण्यास फार अडथळा येअू लागला. तरी त्यांची सख्या जबरदस्त असल्याने ते तसेच पुढे रेटीत चालले. किल्ल्यामध्ये अिंग्रजांबरोबर काही 'विश्वासू' नेटिव्ह शिरलेले होते. त्याच्यापैकी अेक खिद-मतगार किल्ल्याचे दरवाज्याला बंद करण्यासाठी रचलेली दगडाची भित गुपचूप घडघडून देअू लागला. हें लेफ्टनंट पॉवसचे ध्यानात येताच त्याने त्या खिदमत-गाराला गोळी घालून ठार केले. तोंच दुसऱ्या खिदमतगाराने लेफ्टनंट पॉवसला तरवारीने छाटून टाकलें ! लेफ्टनंट गर्गसने त्याला लुडवून दिलें. अिंग्रजानी किल्ल्या-तून तोफांचा व बंदुकींचा मारा स्वत स छपून करण्याचा सपाटा चालविला होता. कमिशनर गार्डन हा असाच चोरमारा करता करता अेका खिडकीतून निशाण रोखू लागला तोंच त्याचा चेहरा नक्की माहीत असणाऱ्या अेका बंडवाल्याने अचूक तीर मारुन गार्डनला त्याच्या निशाणासुद्धा ठार केला ! गार्डन साहेब पडताच किल्ल्या-तील अिंग्लिशाचा धीर गळून गेला व बाहेर बंडवाल्यात अेकच अवसान भरलें. अिंग्रजाच्या गोळीबाराला न जुमानता घोडेस्वाराचा रिसालदार कालाखान व झाशीचा तहशीलदार अहमद हुसेन या दोघा शूर योद्धयानी बंडाचे निशाण किल्ल्याचे तटाला नेअून भिडविलें व बंडवाले किल्ल्यात क्षणा दो क्षणात घुसणार असा रग दिसू लागला. तेव्हा अिंग्लिशानी किल्ल्यावर तहाचे निशाण अुभारले व लढाअी बंद झाली. दुसरे दिवशी विजयी बंडवाल्याचा प्रतिनिधि झाशीतील प्रसिद्ध हकीम साले महमद ह्याच्याशी बंडवाल्यानी आपणास जीवदान देण्याचे अभयवचन द्यावें असें अिंग्र-जांनी बोलणे लावलें. ही अट मान्य करण्याने साले महंमदाने कुराणावर हात ठेवून

कबूल केलें व लगेच अिंग्रज लोकांनी किल्ल्याचीं दारें खुलीं केलीं. अिंग्रजांना शस्त्रें खाली ठेवण्याचा हुकूम झाला. त्यांनी शस्त्रें खाली ठेवलीं व ते दुर्दैवी गोरे लोक बाहेर येअू लागले. आणि शिपायी त्यांना पाहताच 'मारो फिरंगीको' म्हणून त्याच्यावर तुटून पडले !! ता. ८ जूनला अिंग्रजी पुरुषांच्या मुसक्या बांधण्यात येअून शिपायांनी त्या सर्व गोऱ्या लोकांची शहरातून जंगी मिरवणूक काढली. त्या मिरवणुकींतच झाशीचा मुख्य कमिशनर स्कीन हा अधोमुख होअून चाललेला होता ! जोगन बागेपर्यंत ही मिरवणूक येताच रिसालदार साहेबांचा हुकूम सुटला की, अेकूण अेक गोरा छाटला जावा ! झाशीच्या तुरुंगावरील मुसलमान दरोग्याने स्कीन साहेबाचें डोकें अुडविलें व तत्क्षणीं पुरुष, बायका व मुलें मिळून साठ गोऱ्या लोकांची शिरें चेंडूसारखीं अुसळून जमिनीवर आदळली ! बायकांनी लहान मुलें आपल्या कडेवर घेतलेलीं होतीं व मोठीं त्यांच्या शेजारी चिकटून अुभीं होतीं ! त्या बायका, त्या त्यांच्या कडेवरील लहान मुलें व तीं शेजारचीं मोठीं मुलें गोऱ्या रंगाच्या अपराधासाठी काळ्या रंगाच्या तरवारीने सपकन छाटलीं गेलीं ! अेका क्षणात रक्ताचा पाट धो धो करीत अुसळला ! झाशीच्या घनीभूत अन्यायाचें असें हे द्रवीभवन झालें !

झाशीच्या क्षुब्ध जबड्यात ७५ पुरुष, १२ स्त्रिया व २३ मुलें अितक्या अिंग्रजी लोकांचें बंडवाल्यांनी शिरकाण केलें ! झाशी ता. ४ जूनला अुठली व ता. ८ जूनला अिंग्रजी राजसत्तेचा झाशीतून अंत झाला ! आणि अिंग्रजांचा वारसा मागणारी औरस व दत्तक संतति तेथे जिवंत न अुरल्यामुळे बंडवाल्या शिपायांनी श्रीमती राणीसाहेब लक्ष्मीबाअीसाहेब याना झांशीच्या स्वातंत्र्यसिंहासनावर प्रतिष्ठित केलें आणि वीर लक्ष्मीराणीच्या नावाने द्वाही फिरविली कीं "खुल्क खुदाका, मुल्क बादशाहका, और अमल राणी लक्ष्मीबाअी का !"[१६]

---

१६. मराठीमध्ये श्री पारसनीस ह्यानी झाशीच्या रणलक्ष्मी राणीच्या चरित्रावर साधार असा ग्रंथ लिहिलेला आहे. त्यामध्ये त्या विद्वान् ग्रंथकाराने शेकडो पुरावे देअून असें सिद्ध करुन दाखविले आहे की, झांशीच्या अिंग्लिशांच्या हत्याकांडाला ह्या तरुण राणी लक्ष्मीने अेवढी सुद्धा चिथावणी दिलेली नव्हती. श्री. पारसनीस याचा ग्रंथ मराठी वाचकांच्या चांगल्याच परिचयाचा झालेला असून हिंदुस्थानातील अितर अनेक भाषातूनही या ग्रंथाचे भाषांतर झालेलें आहे आणि म्हणूनच त्या ग्रंथातील प्रस्तुतविषयक भाग केवळ पुनरुक्तीचा दोष टाळण्यासाठी आम्ही येथे दिलेला नाही.

* * *

प्रकरण नववें

# अयोध्या प्रांतातील रण

अयोध्येचें राज्य डलहौसीनें खालसा केल्यापासून त्या प्रांतातील प्रजेची दिवसे-दिवस जास्त जास्तच दुर्दशा होत चाललेली होती. अयोध्येचें स्वातंत्र्य नष्ट झाल्याने नवाबाचे राज्यांत ज्या मोठमोठ्या मानाच्या, अधिकाराच्या व वैभवाच्या जागा होत्या त्यांवर अिंग्रजी अधिकाऱ्याची नेमणूक होअून सर्व स्वदेशी लोकांना पदच्युतता भोगावी लागली. त्या नबाबाचें सैन्य काढून देण्यात आले, त्याचे सरदार दारिद्र्यात ढकलण्यात आले, त्याचे मानकरी व मुत्सद्दी हतवैभव झाल्याने अुपजीविकेच्या कनिष्ठ स्थितीला पोचले. सर्वांचे मनात ज्या गुलामगिरीने ही दुर्दशा अुत्पन्न केलेली होती तिचा दीर्घ द्वेष अुत्पन्न होअूं लागला. राजधानीत व राजदरबारातच हे दास्याचे चटके बसत होते असें नसून त्या सर्व प्रांतात मोठमोठाल्या जमिनदारांचे व राजाचे पिढीजात हक्क, वतनें व अिनामें अिंग्रजानी हिसकून घेतलेलीं असल्याने त्या सर्व थोर थोर राजाना व जहागिरदाराना अत्यंत कनिष्ठ स्वराज्य व अत्यंत श्रेष्ठ गुलामगिरी यामध्येही पहिलेंच किती श्रेयस्कर, मानार्ह व अभिनंदनीय असते याची पूर्ण ओळख पटूं लागली. सारा वाढल्याने शेतकरी नाखूष झाले. अिंग्रजी लष्करात जे हिंदुस्थानी शिपाअी असत ते बहुतेक अयोध्येतीलच असल्याने त्यांच्यातही मातृभूमीच्या या दुर्दशेने व दास्याने जबरदस्त असंतोष माजत चालला. तरुण वजीदअल्लीशाह यांना अिंग्रजानी किती अधोर विश्वासघाताने वागविलें हें आठवून जो तो आपल्या तरवारीला हात घालून ओठ करकर चावूं लागला.

अयोध्येतील मोठमोठे जमिनदार शौर्य, औदार्य, कृतज्ञता ह्या गुणाचें भाजन असलेल्या रजपूत वंशांत अुत्पन्न झालेले होते त्याना आपल्या राजाचा अिंग्रजानी केलेला छळ अैकून अनिवार कोप अुत्पन्न झालेला होता. अयोध्या खालसा केल्यावर अिंग्रजानी आपल्या नोकरीत रहाण्याविषयी त्यास जेव्हा विचारले तेव्हा त्या स्वातंत्र्य-निष्ठ लोकांतील शेकडो करारी पुरुषानी स्पष्ट अुत्तरें दिलीं : "आम्ही स्वराज्याचें अन्न खाल्लेलें आहे व अेतदर्थ परक्याच्या अन्नाला शिवणेंही होणार नाही!"

अयोध्येचे राज्य खालसा केल्यानंतर त्या प्रांताचे मुख्य अंमलदारीवर सर हेन्री लॉरेन्स याची योजना करण्यात आली. ज्याच्या तडफेने व कारस्थानीपणाने पंजाबात बंडाची बीजें अंकुरित होण्याचे आधीच तुडवून टाकलेलीं होतीं, त्या सर जॉन लॉरेन्सचा सर हेन्री लॉरेन्स हा वडील बंधु होता. पंजाबच्या चीफ कमिशनरने जसा पंजाब संरक्षण केला, तसाच अयोध्येच्या चीफ कमिशनरानेही अयोध्या प्रांत संरक्षण करण्यासाठी फार आधीपासूनच आरंभ केलेला होता. सत्तावनच्या आपत्तीतून हिंदुस्थानात ब्रिटिश राजसत्ता जिवंत राहिल्याचें श्रेय जर कोणाला देणें असेल

तर तें या लॉरेन्सच्या कुटुंबाकडेच होय ! सर हेन्री लॉरेन्स ह्याने अयोध्येत पाय टाकताच तेथील परिस्थितीचें बरोबर परीक्षण केलें व हिंदुस्थानात कोणच्याही अिंग्रजानें लक्षात घेण्याचे आधीच त्याने बंड होण्याची भीति प्रदर्शित केलेली होती. अयोध्येची मुख्य राजधानी लखनौ शहर असल्याने सर हेन्री तिथेच रहात असे. त्याने असंतुष्ट झालेल्या जमिनदारांना गोड बोलून शांत करण्याचा प्रयत्न सुरू केला. लखनौला दरबार भरवून व त्यात निरनिराळे मान, पदव्या व बक्षिसें देऊन जनतेला स्वराज्याची विस्मृति पडण्यासाठी त्याने पुष्कळ श्रम घेतले. परंतु रयतेला संतुष्ट करण्याचे हे श्रम घेत असतानाच संकटसमयीं गैरसावध रहाण्याअितका तो कमी धूर्त नसल्याने त्याने दुसरीकडे लोकांच्या अुठावणीपासून बचाव करण्यासाठी निरनिराळे बेत योजण्यास आरंभ केला!

कारण सर हेन्री लॉरेन्स ह्याचा अंमल हा पूर्वीच्या अिंग्रजी अधिकाऱ्याचे अंमलाहून जरी चांगला होता तरी अयोध्येतील लोकांना आता अिंग्रजाच्या चांगल्या अमलाचा वाअीट अमलाअितकाच तिटकारा आलेला होता. स्वराज्य परत मिळून वजीर अल्लीशहाला त्यावर पुन्हा प्रस्थापित केल्याशिवाय त्याची महत्त्वाकांक्षा दुसऱ्या कशानेही शांत होणारी नव्हती. अिंग्रजी राजसत्तेच्या साखळ्यांना तोडून टाकून सर्व हिंदुस्थान पुन्हा अेकदा स्वतंत्र करण्याशिवाय त्यांना केव्हाही सुचत नव्हतें. त्यांचा धर्म काल श्रेष्ठपदावर आरूढ झालेला होता. काल तो धर्म राजधर्माच्या प्रतिष्ठेला पावलेला होता. परंतु आज तो सेवाधर्माच्या कनिष्ठतेला आलेला होता. ह्या त्यांच्या मुख्य तक्रारी होत्या व त्याचे समाधान करण्यास चांगला अंमल हा अुपाय नसून अमलाचा नायनाट हाच काय तो अुपाय होता. मानसिंगासारखे प्रबल हिंदु राजे व शिकदरशाहसारखे मुसलमानाचे अधिकारी असल्या असल्या अुभय धर्माच्या देशभक्त पुढाऱ्यांनी या स्वातंत्र्य जिहादीला आपले सर्वस्व वाहण्याचा निश्चय केला होता. हजारो मौलवी व पंडित ह्या जिहादीचा गुप्त व अुघड उपदेश करीत सर्व अयोध्येत हिंडू लागले. लष्कर शपथबद्ध, पोलीस शपथबद्ध, जमिनदार शपथबद्ध, सर्व जनता अिंग्रजाविरुद्ध लढाअी करण्यासाठी शपथबद्ध करण्याचा प्रचंड कट अुभारला जाअून जिकडे तिकडे लोकक्षोभाचा अग्नि प्रज्वलित होअू लागला. ह्या अग्नीच्या ठिणग्या मधूनच चुकून कशा अुडत हे मागे सांगितलेच आहे. खुद्द मौलवी शिकदरशाह याना राजद्रोहाचे अपराधावरून प्रथम फाशीची व नंतर कैदेची शिक्षा देण्यात आली व ७-व्या रेजिमेंटला निःशस्त्र करण्यात आले. सर हेन्री लॉरेन्सने लष्कराला शक्यतोपर्यंत राज्यात ठेवण्यासाठी मेच्या १२-व्या तारखेला अेक मोठा दरबार भरविला. त्यात स्वतः हिंदुस्थानी भाषेत अेक वक्तृत्वपूर्ण व्याख्यान दिले, राजनिष्ठेचें महत्त्व, महाराजा रणजितसिंगाने केलेले मुसलमानी धर्माचे अपमान व औरंगजेबाने केलेले हिंदुधर्माचे अपमान ह्यांचे स्पष्ट प्रतिपादनानंतर अिंग्रज सरकारने ह्या परस्पर द्वेषापासून

हिंदु मुसलमानांचें केलेलें संरक्षण या मुद्द्याचें सांगोपांग विवेचन केलें व नंतर ज्या ज्या शिपायांनी ७-व्या रेजिमेंटच्या निःशस्त्रविधीत उत्तम राजनिष्ठा दाखविलेली होती त्यांना तरवारी, शाली, पागोटी वगैरेंचीं बक्षिसें स्वतः लॉरेन्सचे हाताने देण्यात आली. किती विलक्षण विरोधाभास! या बक्षिसे मिळविलेल्या राजनिष्ठानाच थोड्याशा अवकाशाने बंडाच्या कटात सामील असल्याच्या माहितीवरून फाशी देण्याचा प्रसंग आला ! !

हा राजनिष्ठेचा दरबार भरला तारीख १२ मेला व तारीख १३ मेला बातमी आली की, मीरत शहर बंड करून अुठले आहे. तारीख १४ मेला बातमी आली की दिल्ली बंडवाल्यांचे हाती पडून तिथे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा जाहिर-नामा लागला आहे ! !

ह्या बातम्या येताच सर हेन्री लॉरेन्सने लखनौ शहराच्या नजीकचीं मच्छी-भवन व रेसिडेन्सी हीं दोन ठिकाणें अिंग्रजांच्या आश्रयासाठी निवडून काढून त्यांचा बंदोबस्त करण्याला आरंभ केला. अिंग्रजांची सर्व बायकामुलेंही तिथे नेण्यात येअून कारकून, मुलकी अधिकारी, व्यापारी वगैरे जेवढा मोठा पुरुष म्हणून होता तेवढ्याना लष्करी कवायतीचें, शिस्तीचें व शस्त्रांचें शिक्षण देअून तयार करण्यात आलें. मीरतकडे ही अुठावणी झाल्यानंतर तेथील मुलकी अिंग्रजांना असेंच तत्काल लष्करी शिक्षण देण्यात येअून सुमारे १० दिवसात युद्धासाठी सज्ज करण्यात आलें होतें. सर हेन्री लॉरेन्स यालाच त्या सर्व प्रांताचा मुख्य लष्करी अंमलदार करण्यात आलें. अयोध्येचा प्रांत हा नेपाळला खेटून असल्याने नेपाळच्या सैन्याला घेअून जंगबहादुराने खाली अुतरावें अशी तिकडेही लॉरेन्सने मदतीची याचना केली. हे सर्व बंदोबस्त चालले असताना मेच्या विसाव्या तारखेपासून सर हेन्रीला रोज खात्रीलायक बातमी मिळे की आज बंड होणार. ही बातमी आली की लॉरेन्सने विशेष बंदोबस्त व सावधगिरी करण्यास आरंभ करावा परंतु दुसरा दिवस अुजाडला तरी बंड काही होअू नये! असा बरेच वेळा फसगत झाली. तारीख ३० मेलाही लॉरेन्सला कोणी अधिकाऱ्याने बातमी दिली की, आज रात्री ९ वाजता बंड होणार.

तारीख ३० मेला सूर्य मावळला हेन्री लॉरेन्स आपल्या अनुचरांसह जेवाव-यास बसला असता रात्रीचे ९ ची तोफही सुटली ज्याने या वेळेस बंड होणार अशी नक्की बातमी आणलेली होती त्याची पूर्वीच्या बातम्याप्रमाणेच फसवणूक झाली असल्याने हेन्री लॉरेन्स चेष्टा करण्यासाठी पुढे लवून त्याला म्हणाला, "तुमचे मित्र काही वक्तशीर वागत नाहीत।"

वक्तशीर वागत नाहीत? हेन्री लॉरेन्स हें वाक्य अुच्चारतो न अुच्चारतो तों ७१-व्या पायदळ पलटणीच्या बंदुकांचे धडाड धडाड आवाज त्याच्या कानावर येअून आदळले! या रेजिमेंटने पूर्वी ठरवून ठेवल्याप्रमाणे ९-ची तोफ होताच तिच्या निरनिराळ्या टोळ्या युरोपियनांचे बंगल्यावर तुटून पडल्या. ७१-व्या

रेजिमेंटच्या मेस हाउसला आग लावून त्यांनी युरोपियनांवर बंदुकाच्या फैरी झाडण्यास प्रारंभ केला. त्यांना लेफ्टेनंट ग्रँट हा पळत असता अेकाने त्याला आपल्या खाटेखाली लपविला. परंतु दुसऱ्या अेकाने ती वातमी शिपायांस देताच त्यांनी त्याला खाटेखालून ओढून गारद केला. लेफ्टेनंट हार्डिंग हा काही घोडेस्वारासह रस्त्यांना रोखून धरीत असता त्यालाही तरवारीचा रट्टा बसला. सर्व कँन्टोन्मेंट पेटू लागलें. ब्रिगेडियर हॅन्डस्कोम हाही ठार झाला. रात्रभर अिंग्रजी निशाणास धरून राहिलेले नेटिव्ह व गोरे शोजीर हे सशस्त्र राहून शक्य तितका बंडाचा प्रसार थांबवीत होते. सकाळी म्हणजे तारीख ३१ मेला हेन्री लॉरेन्सने बंडवाल्यावर आपल्या हाताखालील युरोपियन व अजून राजनिष्ठ राहिलेल्या नेटिव्ह फौजेसुद्धा चाल केली. परंतु वाटेतच त्याच्या बरोबर असलेल्या ७-व्या घोडेस्वाराच्या रेजिमेंटने बंड केल्याने त्या घोडेस्वारासह सर्व बंडवाल्या शिपायास मोडून देअून सर हेन्री परत फिरला लखनौला युरोपियन लोकाची ३२-वी सबंध गोरी रेजिमेंट, असताही व गोऱ्या तोफगाड्यांचे साह्य असताही तारीख ३१ मेचे सध्याकाळचे आधी नेटिव्ह लोकांची ७१-वी पायदळ रेजिमेंट, ४८-वी पायदळ रेजिमेंट, ७-वी घोडेस्वारांची रेजिमेंट, व बहुतेक अिरेग्युलर सैन्य बंडाचा झेंडा अुभारते झाले.

लखनौपासून ५१ मैलावर सीतापूर नामे अयोध्येतील वायव्य भागाचें मुख्य शहर आहे. या शहरी ५७ साली ४१-वें पायदळ, ९-वें व १०-वे अिरेग्युलर पायदळ अशा तीन नेटिव्ह रेजिमेंट्स् ठेवलेल्या होत्या. तिथे त्या भागाचा कमिशनर व अितर वडेवडे युरोपियन अधिकारीही राहत असत. तारीख २७ मेला अिंग्रजाची काही वस्ती पेटवून देण्यात आली होती. परंतु ह्या आगी म्हणजे बंडाच्या आगामी पताका असाव्यात असा अनुभव युरोपियनांस अजून आलेला नसल्याने त्यांना त्याचे काहीच विशेष वाटले नाही. फार काय पण खुद्द शिपायानीच त्या आगी विझविण्यासाठी अश्रात श्रम केले होते! ह्या अगाअू सूचनेने दोन कार्ये केली. अेक गुप्त कटवाल्यांस समय आल्याची सूचना व दुसरे अिंग्रजी अधिकाऱ्याच्या भोळसरपणाची चाचणी पाहणे. जूनच्या दुसऱ्या तारखेस अेक नवीनच प्रकार घडला. शिपायाना दिलेली पिठाची पोती त्यांत हाडाचा चुरा आहे म्हणून त्यानी ती घेण्याचे नाकारले. अितकेंच नव्हे तर ती आताच्या आता गंगेत ओतून द्यावी असा त्यानी हट्ट घेतला. अिंग्रजानी मग ती पोती नदीत फेकून दिली! आता तर जास्तच मजा त्या दिवशीच दुपारचे सुमारास युरोपियन लोकाच्या बागात शिपाअी अेकदम घुसले व ज्यांना पाहिजे त्याने पाहिजे त्या झाडावर चढून पाहिजे तितकीं फळे खाण्यास आरभ केला! अिंग्रजी अधिकारी मारे ओरडतच होते; परतु शिपायाचा हा फलाहार काही केल्याने आहारात येअीना!

व हा भयकर फलाहार झाल्यानंतर त्याला पचविण्यासाठी आता तितक्याच भयंकर व्यायामाला आरभ झाला. तारीख २ जून रोजी शिपायातील अेक टोळी

सजिन्यावर चालून जाऊन त्याला ताब्यात घेती झाली व बाकीचे लोक कमिशनरचे बंगल्यावर चाल करुन गेले. वाटेत कर्नल बर्च व लेफ्टेनंट ग्रेव्हस् हे भेटताच ते ठार झाले. अेका अिरेगुलरतेही आपले अिंग्रजी अधिकारी छाटून टाकले व अेकूण अेक शिपाओ 'युरोपियनांच्या राज्याचा शेवट झाला' असें ओरडत आरडत गोऱ्या लोकावर तुटून पडला. अेका नदीच्या आश्रयाने कमिशनर आपल्या बायकोला घेअून पळू लागला. त्याला, त्याच्या बायकोला व अेका मुलाला नदीपार होता होता मारलें गेलें. थॉर्नहिल व त्याची बायको हेही गोळ्या लागून पडले. शिपायांच्या शौर्यान्तीत पुरुष, बायका व मुलें मिळून सुमारे चोवीस गोऱ्या लोकांची आहुति पडली. बाकीचे पुष्कळ जण रामकोटच्या मिरवली वगैरे जमिनदारांकडे पळून गेल्याने आठ आठ दहा दहा महिने सुरक्षित रीतीने पाहुणचार खाअून लखनौला जिवंत पोचविण्यात आले. सीतापूरचे ते सर्व शिपाओ नंतर फरुकाबादेकडे निघून गेले. तिथे असलेल्या युरोपियन लोकानी ज्या किल्ल्यात आश्रय केलेला होता तो किल्ला बऱ्याच झटापटी-नंतर जिंकल्यावर त्यांनी हाती पडलेल्या युरोपियनांची कत्तल अुडविली. नबाब तफुझर हुसेनखान यांना अिंग्रजांनी सालना केलेल्या त्यांच्या गादीवर पुन्हा स्थापण्यात आलें. या नबाबानीही आपल्या प्रांतातील जेवढा युरोपियन सापडला तेवढा धरुन आणून त्याला मारुन टाकलें. अशा रीतीने फरुकाबाद प्रांतात अेकही अिंग्रज जुलैच्या पहिल्या तारखेला अुरला नाही.

सीतापूरच्या अुतरेस ४४ मैलावर असलेल्या मलान नावाचे शहरी जे ब्रिटिश अधिकारी होते त्यानी शिपायांचा व नागरिकांचा कट झाल्याचें समजताच व सीतापूरची बातमी अैकताच घोड्यावर बसून यःपलायन केलें व तो जिल्हा रक्ताचा अेक थेंबही न पडता स्वतंत्र झाला.

तिसरा जिल्हा महमदी हा होय. येथे असलेल्या युरोपियन लोकानी आपल्या बायका मिटौलीच्या राजाकडे धाडून दिलेल्या होत्या. त्या राजाने त्यांची भेट घेअून त्यांना सांगितले की तुम्ही माझ्या जंगलात गुप्त रीतीनें राहिलें पाहिजे. तुमचें अुघड संरक्षण करण्याची मजमध्ये ताकद नाही. कारण अयोध्येतील प्रांतभरच्या शिपायानी बंड करुन अुठण्याच्या शपथा घेतल्या आहेत. त्या राजाकडे आपल्या बायकाना पोचते केल्यानंतर महमदीच्या अिंग्रजी ऑफिसरानी तेथील किल्ल्याचा आश्रय केला त्याच दिवशी मागे सांगितल्याप्रमाणे रोहिलखंडातून शहाजहानपूरचे अिंग्रज लोक पळत पळत महमदीला येअून पोचले. परंतु महमदीला क्षणार्धही सुरक्षितता नसल्याने तेथील अधिकाऱ्यांनी त्या अनाथ अिंग्रजाना तुम्ही तुमच्या तिकडे घेअून जावे म्हणून सीतापूरला निरोप धाडला. सीतापूर या वेळेस अुठलें नसल्यामुळे तिकडून शिपायाच्या अेका टोळीला गाड्यागुड्या महमदीकडे त्या अनाथ अिंग्रजाना आणण्याकरिता धाडण्यात आलें. परंतु त्या सीतापूरच्या शिपायानी महमदीस बंडाचें विष आणलेले होतें. त्यांनी त्या सर्व अिंग्रजी लोकांना गाड्यात भरले, सीतापूरच्या अर्ध्या वाटे-पर्यंत सुरक्षित रीतीने आणलें. परंतु तेथे अेकदम त्यास गाड्यातून अुतरण्यास सांगून

त्यांची तरकाळ कत्तल उडविली. या कत्तलींत बाग आठ स्त्रिया, चार मुलें, आठ लेफ्टनंट, चार कॅप्टन व अितर शिपेक पुरुष लोक होते. अिकडे महंमदीहून बाकी राहिलेले अिंग्रजी अधिकारी तावडतोब पळून गेले व अशा रीतीने त्या सर्व जिल्ह्यांत ब्रिटिश राजसत्तेचें चिन्ह जुनच्या चौथ्या तारखेस मुळीच अुरलें नाही!

अयोध्या प्रांतातील सीतापूर भागाच्या लगतचा दुसरा भाग बन्हाअिच होय. ह्या भागाचा कमिशनर विंगफील्डस् असून त्या भागात मुख्य चार शहरें अधिकाराचीं केंद्रें होतीं. सिकोरा, मल्लापूर, गोंडा व बन्हाअिच. यापैकी सिकोराला दोन पायदळ रेजिमेंटस् व अेक तोफखाना अितकें नेटिव्ह सैन्य होतें. त्या ठिकाणी बंड होण्याचीं चिन्हें दिसू लागतात अिंग्रजी धावपळीमुळे लखनौचा घाडण्यात आली. तारीख ९ जूनला सकाळी अिंग्रजांपैकी बरेच अधिकारी घोड्यावर बसून आपखुशीने बालारामपूरच्या राजाकडे पळून गेले. फक्त तोफखान्याचा अधिकारी बोन्हॅम हा आपल्या हाताखालील शिपायांवर पूर्ण भरंवसा ठेवून राहिला. परंतु संध्याकाळी त्याला शिपायांनी स्पष्ट सांगितलें कीं, आम्ही तुझ्या केसाला जरी हात लावणार नाही तरी अितःपर अिंग्रजांची सत्ता आम्ही मुळीच कबूल करणार नाही व आम्ही आमच्या देशबांधवांवर कधीही गोळ्या सोडणार नाही. हें अैकताच निरुपायाने तो साहेब तें ठाणें सोडून निघाला. त्याला शिपायांनी सुरक्षित वाट कोणची हें कळविलें व त्या वाटेने तो लखनौला सुरक्षित पोंचला. सिकोरा स्वतंत्र झाल्याची बातमी गोंडा येथे येतांच तें शहरही बंड करून अुठलें. हें पाहताच खुद्द कमिशनर विंगफील्डसह सर्व अिंग्रज लोक बालारामपूरच्या राजाकडे पळून गेले. या राजाने जवळ जवळ २५ अिंग्रजी शरणागत लोकांचें संरक्षण करून नंतर योग्य संधीस त्यास ब्रिटिशांच्या छावणीत पोचते केले

सिकोरा व गोंडा स्वतंत्र झाल्याची बातमी बन्हाअिचला कळताच तिथे असलेल्या अिंग्रजी अधिकाऱ्यांनी बंड होण्याची वाट न पाहता तें त्या भागाचें मुख्य शहर सोडून देअून लखनौकडे तारीख १० जूनला पळ काढला. परंतु या सुमारास सर्व अयोध्या प्रांतात बंडवाल्यांचीं ठिकठिकाणी नाकीं बसलेली असल्याने त्यांनी नेटिव्ह लोकांचीं सोंगें घेतलीं व अेका होडींत बसून ते घोग्रा नदी ओलांडू लागले प्रथम त्यांच्याकडे कोणाचे लक्ष गेले नाही. परंतु निम्मी नदी अुतरताहेत तोंच 'फिरंगी फिरंगी' अशी आरोळी अुठली! नावाड्यांनी नावा टाकून दिल्या व ते अिंग्रजी अधिकारी ठार मारले गेले. या अधिकाऱ्यांबरोबरच त्या बन्हाअिच प्रांतातील ब्रिटिश सत्तेची समाप्ति झाली.

मल्लापूर शहरी यद्यपि लष्करी छावणी नव्हती; तथापिही तो जिल्हा सोडून देअून पळून जाणें अिंग्रजी अधिकाऱ्यांना तेथील लोकक्षोभाने भाग पाडलें. ते पळून जात असता अेका राजाने त्यांचें शक्य तितकें संरक्षण केलें. परंतु लवकरच बंडवाल्यांच्या तरवारीने किंवा वनवासाच्या हालअपेष्टांनी त्यांचे बळी घेतले.

अयोध्या प्रांताच्या पूर्वेकडील भागामें फैझाबाद हें मुख्य शहर असून त्या भागाचा कमिशनर गोल्डने हाही तेथेच राहत होता. फैझाबाद भागात सुलतानपूर, सलोनी व फैझाबाद असे तीन जिल्हे केलेले होते. फैझाबाद शहरी या वेळेस २२-वीं पायदळ व ६-वीं अिरेग्युलर पायदळ रेजिमेंट, काही घोडेस्वार व तोफखाना अितकें नेटिव्ह लष्कर ठेवलेले होतें. त्या सर्वांवर कर्नल लेनाक्स याचें सेनापत्य होतें. फैझाबाद भागामध्ये सरकारच्या जुलुमाचा अगदी कळसच झाला होता. सर हेन्री स्वत: लिहितो : "तालुकदारांनाही क्रूरतेने वागविण्यात आलेलें आहे. फैझाबाद प्रांतात तर त्यांचीं निम्मी गावें हिसकावलेलीं आहेत व काहींची तर सारींची सारीं गावें!" अशा या जुलमाचा सूड लवकरच निघणार ही भीति फैझाबादच्या अिंग्रजी अंमलदारास मीरतची बातमी अैकताच वाटू लागली व त्या संकटातून कसें संरक्षण करावें ही विंता त्यांना काही सुचू देअीनाशी झाली. त्यांची बायकामुलें लखनौकडे धाडून द्यावीं तर लखनौच्या रस्त्यावर बंडवाल्यांची कडेकोट नाकेबंदी असल्याने तिकडे जाणें अशक्य झालेले होतें. फैझाबाद शहरी दोन हात करण्याची तयारी करावी तर तिथे सर्व लष्कर नेटिव्ह पडलेले! अशा कोंडमान्यात सापडलेले फैझाबादचे अिंग्रजी अधिकारी अखेर राजा मानसिंगाला शरण गेले. अयोध्या प्रांतातील सर्व हिंदु लोकांचा राजा मानसिंग हा अत्यंत प्रमुख पुढारी होता. नबाबाच्या कारकिर्दीतही हिंदुधर्माची कुठेही पायमल्ली न होअू देण्यासाठी मानसिंगाची तरवार नेहमी अुपसलेली असे. सत्तावनचे मे महिन्यात या मानी राजाला काही वसुलाचे बाबतीवरून अिंग्रजांनी कैदेत टाकलेले होतें. परंतु आता मीरतच्या अुठावणीने अिंग्रजाची कंबर बरीचशी लचकल्याने त्यांनी राजा मानसिंगाची मर्जी सभाळण्याकरिता त्याला कैदेतून मुक्त केले. त्याने अिंग्रजाच्या बायकाना व मुलाना आपल्या किल्ल्यात आश्रय देण्याचें मोठ्या प्रयासाने कबूल केले. तरी त्याना पुन्हा बजाविले की मी तुम्हास आश्रय देतो ही गोष्ट लोकास बिलकूल रुचणार नाही. अितकेच नव्हे तर त्याबद्दल मजवरही प्रहार करण्यास ते चुकणार नाहीत. तारीख ७ जून रोजी मानसिंगाकडे अिंग्रजी अधिकाऱ्यांची सर्व कुटुंबें आश्रयार्थ गेली व त्याच्या शहागज किल्ल्यामध्ये सुरक्षित रीतीने राहू लागली.

अिंग्रज लोक आपल्या सरक्षणार्थ ही तयारी करीत असताना फैजाबादेला बडाचा विस्तव जाळ घेअून भडकू लागला. या फैजाबादेला जे अनेक तालुकदार होते त्यांपैकी अेका तालुकदाराचे नाव मौलवी महमदशाह हे होतें. हें नाव अितिहासात अजरामर होणारे होत. हे नाव देशभक्ताच्या व देशवीराच्या मालिकेत गुंफलें जाणार होते. ह्या नावाने आपल्या तालुक्याची तालुकदारीच नव्हे तर आपल्या देशाची देशदारी करण्यासाठी हातात कंकण बाधलेले होतें. देशाचे दारावर त्यानी पहारा करण्यासाठी जागरणें केलेली होती व त्या दारातून देशात घुसणाऱ्या परसत्तेचे निराकरण करण्यासाठी त्याने आता तरवार अुपसलेली होती अयोध्येचें राज्य

अिंग्रजांनी गाळणा केल्यापासून तालुकदार अहमदशहाने आपलें सर्वस्व स्वदेशाला व स्वधर्माला अर्पण केलें व तो मौल्वी स्वतः होअून हिंदुस्थानभर राज्यक्रांतीचा अुपदेश देत पर्यटन करण्यास निघाला. हा राजकीय संन्यासी ज्या ज्या प्रदेशात आपली चरणधूलि झाडीत गेला तेथे तेथे लोकमतांमध्ये काही विलक्षण चेतनेचा संचार होत चालला. क्रांतिपक्षाच्या मोठमोठ्या पुढाऱ्यांच्या त्यांनी प्रत्यक्ष गाठी घेतल्या. अयोध्येच्या राजकुटुंबात त्याच्या सल्ल्याशिवाय पानही हलत नसे. त्याने आग्र्याला गुप्त मंडळाची संघटना केली. त्याने लवकरच ब्रिटिश सत्तेचा अुच्छेद करण्याचा अुघड अुपदेश दिला. अयोध्या प्रांतात जानपदांची त्याच्यावर अत्यंत निष्ठा बसली. शरीराने, मनाने, वाचेने व बुद्धीने स्वदेश-स्वातंत्र्याच्या अुपदेशाचा व गुप्त मंडळाचें जाळें विणण्याचा अर्थात क्रम चालविल्यावर मग त्याने आपली लेखणी हाती घेतली व राज्यक्रांतिकारक लेखांना लिहून ते लेख सर्व अयोध्याप्रांतात तो प्रसृत करू लागला. अेका हातात तरवार व अेका हातात लेखणी! अशा ह्या लोकोत्तर पुरुषाच्या तेजाने स्वराज्याची ज्वाला भडकू लागलेली पाहताच अिंग्रजांनी त्याला पकडण्याचा हुकूम सोडला. परंतु अयोध्येतील पोलिसांनी त्या लोकनायकाला पकडलें नाही. तेव्हा लष्करी सैन्य धाडण्यात येअून त्याला पकडण्यात आलें. त्याची राजद्रोहाचे आरोपावरून चौकशी झाली व त्याला फाशीची शिक्षा देण्यात येअून फैजाबादच्या तुरुंगात ठेवण्यात आलें.

मौल्वीची व अिंग्रजी सत्तेची अेकमेकास फाशी देण्याची जंगी शर्यत सुरू झाली! मौल्वी अिंग्रजी राजसत्तेला फाशी देण्यासाठी तयारी करीत होते तर अिंग्रजी सत्ता मौल्वीस फाशीवर चढविण्यासाठी स्थान अुभारण्याची घाअी करीत होती! परंतु त्या घाअीत त्यांनी मौल्वींना फैजाबादच्या कैदेत ठेवल्याने आपल्या स्वतःचेच फाशीचे स्थान अुभारले! कारण मौल्वींच्या कैदेने क्रांतीच्या दारूने गच्च भरलेल्या फैजाबाद शहराच्या गुप्त भुयारावर ही ठिणगीच टाकली. तें शहर त्यातील लष्करासुद्धा धडाक्यात हरहर म्हणून बंड करून अुठलें. शिपायाना ताब्यात ठेवण्यासाठी अिंग्रजी अंमलदार जो परेडीवर जातात तो शिपायांनी त्यास स्पष्ट कळविलें की अितःपर आम्ही स्वदेशी अमलदाराच्या हुकमात आहोत व आमचा पुढारी सुभेदार धुलीपसिंग हा आहे. सुभेदार धुलीपसिंगाने सर्व अिंग्रजी ऑफिसरांच्या घरावर शिपायांचे पहारे बसविले व त्यास वारा पावलावर अिकडे तिकडे हलण्याची सक्त बंदी केली. आणि नंतर नागरिकांनी व शिपायांनी त्या लोकनायकाच्या चरणानी पुनीत झालेल्या कारागृहाकडे धाव घेतली. कारागृहाचे दार कडाडलें व मौल्वी अहमदशाह तुकडे अुडविलेल्या शृंखलाना फेकून देअून लोकांच्या प्रेममय जयजयकारात येअून मिळते झाले! मौल्वींचा हा पुनर्जन्म होता! त्याना अिंग्रजी सत्ता फाशीवर चढविणार होती तिलाच त्यांनी अखेर फाशीवर चढविलें! त्यांनी आपली मुक्तता होताच धुरीणत्व स्वीकारलें व अिंग्रजांनी दिलेल्या फाशीच्या शिक्षेचा सूड

म्हणून पहिलें कृत्य जें केलें तें हें की पहाऱ्यात टाकलेल्या मुख्य अिंग्रजी अधिकारी कर्नल लेनाक्स ह्याला, 'मी कैदेत असताना आपण मला हुक्का देण्याची मेहेरबानी केल्याबद्दल मी आपला फार आभारी आहे' असा निरोप धाडला.[1] वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि । लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥'

फाशीची शिक्षा ज्याने दिली त्याचे आपल्यास हुक्का दिल्याबद्दल आभार मानल्यानंतर मग त्या महंमदशाह मौलवींनी अिंग्रजी अधिकाऱ्यांस फैजाबाद सोडून निघून जाण्याची ताकीद दिली. फैजाबाद शहरात अुठावणी होताच जितरत्र जी लुटालूट सुरू होत असे ती न व्हावी म्हणून शिपायांनी टोळ्या धाडून नाकेबंदी केली. सार्वजनिक अिमारती व दारुखाना यांवर पहारे बसविण्यात आले. १५-व्या रेजिमेंटच्या शिपायांनी अेक युद्धमंडळ नेमून असे ठरविलें की, अिंग्रजी अधिकाऱ्यांना ठार मारावें. परंतु पूर्व वचनाप्रमाणे तसें करणें अिष्ट नाही असें मुख्य अधिकाऱ्यांनी ठरवून अिंग्रजांना जिवंत सोडून दिले. त्याना कळविण्यात आलें की, "तुमच्यापैकी ज्याची मर्जी असेल त्यांनी पाहिजे तर आपली खाजगी मालमत्ता घेवून जावें. परंतु सार्वजनिक मालापैकी सुतळीचा तोडाही तुम्हांस नेऊ देण्यात येणार नाही. कारण त्यावर आता अयोध्येचा राजा वजीरअल्ली शाह याची मालकी आहे!"[2] ह्या नंतर बंडवाल्यांनी अिंग्रजाना स्वतः नावा करून दिल्या, त्यांचे बरोबर पैसे दिले व मग शिपायांची रजा घेवून ते सर्व अधिकारी बोटींत बसून घाग्रा नदीने चालू लागले तारीख ९ जून रोजी सकाळी फैजाबाद स्वतंत्र झालें व तिथे कंपनीचें राज्य बुडून वजीरअल्ली शहाचा अंमल सुरू झाल्याची द्वाही फिरली!

अिकडे अिंग्रज लोक ४ बोटींत बसून चालले असता त्यांच्यावर १७-व्या रेजिमेंटचे शिपायांची दृष्टि पडली. ह्या रेजिमेंटला फैजाबादेहून शिपायांनी पत्र धाडलेले होतें की येथून येणाऱ्या फिरंग्याचा वध करावा! त्याप्रमाणे ह्या बोटींवर मारा सुरू झाला. फैजाबादचा मुख्य कमिशनर गोल्डने ठार झाला, लेफ्टेनंट थामस ठार झाला, रिचे, मिल, अेडवर्डस्, करी वगैरे सर्व अिंग्लिशांची कत्तल झाली. मोहावा गांवी जे होते त्याना तेथील खुद्द पोलीस लोकांनी मरणाचे दारीत ढकललें. अेक बोट काय ती तिच्यातील साहेब भुयात शेवटपर्यंत दडून राहिल्याने व नावाड्याचे प्रीतीने अिंग्रजी पलटणीत सुरक्षित पोचली. राजा मानसिंगाचे घरी गेलेली अिंग्रजांची बायकामुले कशीं रक्षण करावी अशा फिकिरीत तो असता तिकडे पुष्कळ अिंग्रजी पुरुषही आश्रयार्थ आले. मानसिंग

---

१. चार्लस बॉल, खंड २ रा, पृ.३९४.

२. "Might take with them all private property but no public property, as that all belongs to the King of Oudh." —Charles Ball, Vol. II, p. 394

त्या वेळेस अयोध्येला होता. त्याने लिहून धाडलें की, मी बंडवाल्यांची अशी समजूत पाडली आहे की, अिंग्रजी बायकामुलांना ठेवण्याची तुम्ही मला परवानगी द्याल तर अिंग्रजी पुरुषाना मी आश्रय देणार नाही. दुसरे दिवशी या शर्तीप्रमाणे मानसिंग वागतो की नाही, हें बघण्यास त्याचे घराचा झाडा घेण्याचेही ठरले. तेव्हा त्याचे किल्ल्यातील अिंग्रजी पुरुष आपल्या बायकामुलांसह धोग्रा ओलांडून जाण्यास निघाले. वाटेत कित्येक जिवावरची संकटें भोगल्यानंतर त्यातून जे जगले ते गोपाळपूरच्या राजाकडे येअून पोचले. त्या २९ अिंग्रजाना अत्यंत सत्काराने बरेच दिवस ठेवून त्या राजाने त्याना अिंग्रजी ठाण्यात सुखरूप पोचवून दिले. या सत्तावनसाली जे अिंग्रज मरता मरता वाचले त्यांपैकी बहुतेकांनी आपल्या हजारो पानांची वृत्तें लिहून ठेवलेली आहेत. ती सर्वच अुपदेशपर आहेत, व ती आपल्या राष्ट्रातील अुदात्त मनोवृत्तींची जिवत स्मारकें आहेत. अयोध्येमध्ये अिंग्रजाविरुद्ध अितका द्वेष माजलेला असतानाही बंडवाल्यांच्या वर्तनाने लढत असलेल्या राजाचे घरी शरण आलेले अिंग्रज पाहुणचार घेत होते. अशी हजारो अुदाहरणे घडलेली आहेत. बुशर लिहितो, " आज मी अेकटा काय तो जिवंत अुरलो. मी पळता पळता अेक खेडेगाव लागले. त्यामध्ये शिरताच पहिला मनुष्य भेटला तो ब्राह्मण होता. मी प्यावयास पाणी मागितले. माझे हाल पाहून त्याला दया आली व त्याने सांगितले की, हे खेडें सर्व ब्राह्मणाचेच असल्याने तुला कोणी मारणार नाही........बुलीसिंग पाठलाग करीत आला. मी अेका गल्लीत पळालो, तों अेक म्हातारी मला भेटली. तिने मला अेका झोपडीकडे बोट दाखविल्यावरून मी तिथे गेलो. व तेथे असलेल्या भुशात लपलो. थोडयाच वेळात बुलीसिंगाचे लोक आत आले व तरवारीचीं टोकें अिकडे तिकडे भोसकू लागले. लवकरच त्याना मी सापडलो. त्यांनी मला केस धरून फरफर ओढून बाहेर फेकले. खेडेगावातील लोकानी फिरग्याना शिव्यांची लाखोली ओतण्यास आरंभ केला! नंतर माझी हुर्यो करणाऱ्या गावकऱ्यांच्या जमातीतून मला बुलीसिंगाने दुसरीकडे चालविले. दर गावी मी गुडघे टेकून शरणागतत्व दाखवियावर पुन्हा शिरच्छेद तहकूब करण्यात येअी. असे करता करता मला बुलीसिंगाचे वाड्यात नेण्यात आले. " नंतर तिथून त्याला बरेच दिवसानी अिंग्रजांकडे पोचवून देण्यात आले. कर्नल मेनाक्स लिहितो, " पळता पळता आम्हास नाझीर हुसेनखान याच्या लोकांनी धरले. त्यापैकी अेक आपले पिस्तूल काढून दात ओठ खात म्हणाला, फिरग्याना चुटकीसरसे गारद करण्यासाठी माझे हात कसे शिवशिवत आहेत ? पण काय करावें त्यानी आम्हास त्या नाझिमाकडे नेले. तो दरबारात लोडाशी टेकून बसला होता. त्याने आम्हांस सांगितले की तुम्ही विसावा घ्या व थोडें शरबत प्या. तुम्ही भिअू नका. आम्हाला रहावयास कोणती जागा द्यावी म्हणून प्रश्न निघाला असता अेक रागीट नौकर म्हणाला, शेजारचा घोडयाचा तबेला काही वाअीट नाही. त्याच्या या वाक्याबद्दल नाझीम त्याला रागे भरला. परंतु अितक्यात दुसरा म्हणाला, अेवढी

मानगड कनाला. मी या फिरंगी कुत्र्यांना मारूनच टाकतो! यावर नाझीमाने दरडावून त्या सर्वांना गप्प बसविलें व आम्हास अभयवचन दिलें. बंडखोरांच्या धाकाने आम्ही ह्ननान्याजवळ लपलो. आम्हांस सुग्रास अन्न, वस्त्र व आराम मिळत होता.' नंतर त्या सर्वांना नेटिव्हांच्या वेषात नाझिमाने अिंग्रजी ठाण्यात सुरक्षित पोचवून दिलें.

फैजाबाद शहरातून अिंग्रजी अधिकारी निघून जाताच त्या प्रांतातील अितर जिल्ह्यांनीही बंडाचें निशाण अुभारलें. सुलतानपूर त्याच दिवशी म्हणजे तारीख ९ जूनलाच अुठलें! तिसरें जिल्ह्याचें शहर सिलोनी हें तारीख १० जूनला अुठलें. येथील अधिकारी पळत असता त्यांपैकी काहींचे जीव रुस्तमशहा नांवाच्या सरदाराने व काहींचे राजा हनुमंतसिंग ह्याने वचावले. अिंग्रजी लोक शरणागत असल्याने त्यांना नुसतें जीवदान देअूनच हे अयोध्येतील शूर व अुदार राजे थांबले नाहीत तर त्यांचें यथायोग्य आदरातिथ्य ठेवण्यासही ते तयार होते. वास्तविक या प्रत्येक राजाची व जमिनदाराची अिंग्रजांनी अत्यंत हानि केली होती व त्यांचा अपमान केलेला होता. त्यांचें देवराज्य नामशेष झालेलें होतें व त्यांच्या धर्माची पायमल्ली केलेली होती. या गोष्टी जमिनदार व राजे विसरले होते असेंही नाही. आपआपल्या अनुयायांना घेअून त्यांनी अुघडपणे रणांगण मांडलें व अिंग्रजांना हिंदुस्थानातून घालवून दिल्याशिवाय स्वस्थ बसावयाचें नाही अशा शपथा त्यांनी घेतल्या. परंतु या वीरोचित स्वातंत्र्यप्राप्ती-बरोबरच त्यांनी वीरोचित औदार्यही दाखविण्यास कमी केलें नाही. लोकसमाज अनावर रोषाने सरसहा कत्तली करीत असता त्यांनी अिंग्लिश बायकामुलांना आदरातिथ्याने वागवून अपूर्व दयाशीलता प्रदर्शित केली. त्यांना ज्या अिंग्रजी अधिकाऱ्यांनी नुकतेंच छळलेले होते त्यांना देखील कित्येकदा अशरण म्हणून जीवदान दिलेलें आहे! हेच अधिकारी पुढे पुन्हा त्यांच्याशी लढावयास येतील वास्तव त्यांना सोडणें श्रेयस्कर नाही असा सर्व जनतेचा निश्चून हट्ट असताही त्यांनी हे औदार्य दाखविलें! हिंदुस्थानाव्यतिरिक्त ही वीरता व हे अुदात्तत्व असलेल्या प्रचंड राज्य-क्रांतिकारक व लोकक्षोभक कालात अितर किती देशात आढळणार आहे?

परंतु अयोध्येतील लोकांचा ह्या अुदारपणा हतबलतेचा द्योतक नव्हता. मेच्या ३१ तारखेपासून तों जूनचा पहिला आठवडा संपतो न संपतो तों सर्व अयोध्या प्रांत अेका घडकीसारखा वर करून अुठला! त्या अयोध्या प्रांतातील अनेक जमिनदार राजे, ते अिंग्रजी अमलाखाली असलेले हजारो नेटिव्ह शिपाअी -पायदळ, घोडेस्वार व तोफखाना; सरकारी व मुलकी खात्यातले सर्व नोकर, शेतकरी व व्यापारी व विद्यार्थी, हिंदु असोत या मुसलमान असोत ते हातात हात घालून अेका देश-भूमीच्या दास्यमोचनासाठी तरवार अुपसून अुठले. खाजगी वैर, धर्मभेद, जातिभेद, मानापमान सर्व स्वदेशाच्या प्रीतीत लीन झाले! ज्याला त्याला आपण कोणत्या तरी अेका पवित्र ध्येयासाठी न्याय्य युद्धात अुडी घेत आहोत असे अवगान चढू

लागले. दहा दिवसांचे आत अयोध्या प्रांतावर वजीदअली शाह यांची कारकीर्द लोकपक्षांनी आपण होअून प्रस्थापित केली! अयोध्येतील लोकांच्या कल्याणासाठी मी वजीदअली शहाला सिंहासनावरून भूमीवर पाडले असे जे डलहौसीने कारण दिले होते त्याला हे येवढे मुद्देसूद अुत्तर! जूनच्या पहिल्या आठवड्याचे शेवटी त्या सर्व प्रांतात असे येक गोठे अुरले नव्हते की, ज्याने डल्हौसीला मुद्देसूद अुत्तर देण्यासाठी ब्रिटिश निशाणाचे फाडून तुकडे केले नाहीत!

या सर्व स्थितीचे मार्मिक चित्र देअून प्रसिद्ध अितिहाससंशोधक फॉरेस्ट हा आपल्या प्रस्तावनेत म्हणतो, " अशा रीतीने अेका दहा दिवसाचे आत अिंग्रजी राजसत्ता अेखाद्या स्वप्नासारखी होती का नव्हती असे झाले! तिचा मागमूससुद्धा अुरला नाही! लष्कराने बंड केले, लोकांनी जू झुगारून दिले. परन्तु त्यात सूड किंवा क्रूरता यांना वाव मिळाला नाही. त्या शूर आणि अुत्क्षोभक लोकांनी काही अपवाद सोडून करून राजपक्षातील शरणागत लोकांना फारच दयाळुत्वाने वागविले. ज्यांनी आपल्या सत्तेच्या काळात सदाध बुद्धीने अयोध्येतील या सरदारांना अत्यंत जबर जखम केलेली होती तोच सत्ताधारी वर्ग आज पदच्युत झालेला असताना, त्याला त्या सरदारांनी वीरोचित सत्काराने वागविले.[१] अयोध्येतील ह्या वीरौदार्याने मोठमोठाले अनुभवी व वगलेले अिंग्रजी अधिकारी जर जिवंत सुटले नसते तर अयोध्येला परत जिंकण्यासाठी अिंग्रजाचे नवशिके लोक किती अुपयोगी पडते?

जूनच्या १०-व्या तारखेपर्यंत अयोध्या प्रांत स्वतंत्र होताच त्या जिल्ह्यातील ठिकठिकाणी असलेले सर्व लढवय्ये लोक व लष्करी शिपाअी लखनौकडे लोटू लागले. लखनौ शहरामध्ये अिंग्रजांचा धुरंधर अधिकारी हेन्री लॉरेन्स हा मरणोन्मुख झालेल्या ब्रिटिश सत्तेमध्ये चैतन्य भरण्यासाठी नेटाने झटत होता. सर्व प्रांत हातचा निसटला तरी त्याने राजधानीवरचा आपला तावा ढिला होअू दिला नव्हता. बंडाचा वास त्याला फार अंतरावरून कधीच आलेला असल्याने त्याने त्या राजधानीत मच्छीभवन व रेसिडेन्सी ही दोन ठिकाणे सज्ज करून, बळकट करून, लष्करी

---

१. "Thus in the course of ten days the English administration in Oudh vanished like a dream and not a wreck was left behind. The troops mutinised, the people threw off their allegiance but there was no revenge, no cruelty The brave and turbulent population, with a few exceptions, treated the fugitives of the ruling race with marked kindness and the high courtesy and chivlary of the Barons of Oudh was conspicuous in their dealings with the fallen masters who, in the days of their power, had from the best of motives inflicted on many of them grave wrong."
—Forrest's introduction, Vol, II, page 37.

सामर्थ्याने पूर्ण केलेलीं होतीं हें पूर्वीच सांगितलेलें आहे. लखनौचें नेटिव्ह सैन्य तारीख ३१ मे रोजी बंड करून निघून गेल्यानंतर सर हेन्रीने शीख लोकांची अेक उत्तम रेजिमेंट तयार केली व अगदी राजनिष्ठ राहिलेल्या नेटिव्ह लोकांची मिळून आणखी अेक रेजिमेंट अुभारली. याशिवाय जे जे नेटिव्ह लष्कराचे भाग अजूनपर्यंत राजनिष्ठ राहिलेले होते ते ते सर्व जून तारीख १२-चे आत बंड करून निघून गेले. या बंडाने सर हेन्रीला अेक प्रकारे समाधान वाटले. कारण आता त्याच्या तळात युरोपियन सैन्याची रेजिमेंट, युरोपियनांचा तोफखाना व वरील तावून सुलाखून राजनिष्ठ ठरलेल्या शीख व हिंदुस्थानी रेजिमेंटस् असें निवडक व विश्वासपात्र लष्कर शिल्लक राहिलें. सर हेन्री आता लढाअीच्या तयारीने सज्ज होअून राहिलेला होता.

लखनौच्या आजूबाजूला अयोध्या प्रांतातील बंड करून अुठलेले शिपाअी व लढवय्ये लोक गोळा होत चालले होते. त्यांचें व अिंग्रजांचें तोंड लागण्याचे आधी दोघेही अेका निराळ्याच डावाची वाट पहात होते. तिकडे कानपूरचा वेढा भर रंगात येत असल्याने लखनौचे अिंग्रज किंवा आजूबाजूचे बंडवाले ह्यांपैकी कोणीच कानपूरची शेवटची बातमी आल्याशिवाय अेकमेकांना तोंड देअीनात. प्रत्येक पक्षाची कानपूरच्या जय किंवा पराजयावर भावी आशा वा निराशा अवलंबून होती. "जर कानपूर नेट धरून राहील तर लखनौला वेढा पडेल किंवा नाही याची शंकाच आहे" असें सर हेन्रीने लॉर्ड कॅनिंगला साश्रु अंतःकरणाने तारीख २३ जूनला कळविले होतें. तारीख २८ जूनला लखनौत बातमी आली की, कानपूरला अेकही अिंग्रज जिवंत नाही! विजयाने अुत्साहित झालेले बंडवाले अिंग्रजांवर चढाअी करून चिनहटपर्यंत येअून धडकले.

अिंग्लिश लोकांच्या कानपूरला झालेल्या या भयंकर पराजयाने जिकडे तिकडे अिंग्रजी सत्ता आमूलात् डळमळू लागली होती. अशा या पराजयाचें काही तरी अुट्टें काढल्याशिवाय केवळ लखनौच्या रेसिडेन्सीचेच नव्हे तर खुद्द कलकत्त्याच्या फोर्ट विल्यमचेंही जीवित सुरक्षित राहणें दुर्धर आहे असें पाहून सर हेन्री लॉरेन्सने कानपूरचा अपमान बंडवाल्यांच्या रक्ताने धुवून टाकण्याचा निश्चय केला. अिंग्रजी लष्कर तारीख ३० जूनच्या सकाळी लोखंडी पुलाजवळ जमले. सुमारे चारशे अिंग्रजी सोजीर, चारशे नेटिव्ह राजनिष्ठ शिपाअी व दहा तोफा अितकें निवडक सैन्य घेअून सर हेन्री लखनौ सोडून निघाला. चालत चालत कित्ती तरी पुढे आला तरी शत्रू दृष्टीस पडेना. परंतु अखेर शत्रूची आघाडी दिसू लागली. बंडवाल्यांची आघाडी पाहताच आपल्या अुजव्या हाताला असलेलें अेक अत्यंत महत्त्वाचें खेडें जिंकून घेण्यासाठी सर हेन्रीने नेटिव्ह लष्करास हुकूम दिला. त्याप्रमाणे त्यांनी हल्ला चढविला व ते महत्त्वाचें खेडें अिंग्रजांचे हाती पडलें. अिकडे डाव्या हाताला असलेलें अिस्माअिलगंज नावाचें गाव हेंही अिंग्रजी सोजिरांनी ताब्यात घेतलें.

चंडवाल्यांच्या तोफांवरही अिंग्रजी तोफखान्यावरच्या नेटिव्ह व अिंग्रजी अंमलदारांनं असा मारा केला की त्या व्यवहारत बंद पडू लागल्या. चिनहटाची लढाअी अिंग्रजांनी जिंकीत आणली. अितक्यात त्या डाव्या बाजूवरच्या गावात लपून छपून दडून बंड-वाल्यांनी प्रवेश केल्याची बातमी अुठली तोंच अिंग्रजी गोंजिरांवर अेकाअेकी भिडपा जोराचा हल्ला झाला की त्यांना त्या गांवातून पिटाळून देअून बंडवाल्यांनी त्याचा ताबा घेतला, व तेथून अिंग्रजी पार्श्वभागावर व मध्यावर निकराचा मारा चालविला. अिंग्रज गोजीर जों जों हटत तों तों बंडवाल्या घेरीत चालल्या. अिंग्रजांची सेना अुधळू लागली व आता अुभे राहिलें असता अेकूण अेक मनुष्य कापला जाअील असें पाह-ताच सर हेन्रीने पिछेहाटीचें बिगूल फुंकलें! पिछेहाटीत त्या दिवशी अिंग्रजाचें अप-रिमित हाल होअू लागले. कारण गुंगत्या चिनहटाच्या विजयानंतरच न थांबता बंड-वाल्यांनी आता अिंग्रजांमागे लढत चालण्याचा अुपक्रम केला. अिंग्रजांच्या बाजूला तोफखान्यावर जे नेटिव्ह होते ते आता लढण्यात कुचराअी करू लागले. परंतु बाकीचे नेटिव्ह घोडेस्वार व पायदळ यांनी तर अिंग्रजी गोंजिरापेक्षाही जास्त शौर्याने पिछाडीचें रक्षण चालू ठेवलें. थोड्याच वेळात पिछेहाट सपून पळाला आरंभ झाला! अिंग्रजी सेना हताश होअून आपल्या अपमानासुद्धा लखनौकडे अुधळू लागली. चारशें सोजिरापैकी जवळ जवळ दीडशे सोजीर त्या दिवशी कामास आले! नेटिव्ह राजनिष्ठांना तर मोजावयासच नको. दोन तोफा व अेक थोरली हाविट्झर रणां-गणावर अिंग्रजांनी टाकून दिली! कानपूरचा सूडही त्यांना रणांगणावर गोडावा लागला! अशा रीतीने मार खात खात सर हेन्री लॉरेन्स लखनौच्या रेसिडेन्सीत घुसू लागला, तरी शत्रु मागे होतेच. रेसिडेन्सीच्या बंदोबस्तासाठी रोवलेल्या तोफांचे संरक्षणात जेव्हा अिंग्रज राजनिष्ठ शिपाअी नेटिव्हांसुद्धा आला तेव्हा चिनहटची लढाअी संपली!!

परंतु त्याचा परिणाम अजून संपला नव्हता. आता रेसिडेन्सी व मच्छीभवन ह्या दोन्ही ठिकाणांना बंडवाल्यांनी सहज दिलेला असल्याने सर हेन्रीने मच्छीभवनही सोडून देण्याचा निश्चय केला. त्यात साठविलेल्या मुबलक दारूगोळ्यासुद्धा तेथील शस्त्रागार आग लावून अुडवून देण्यात आलें. सर्व अिंग्रज लोक आता रेसिडेन्सीत येअून सज्ज राहिले. रेसिडेन्सीत सर हेन्रीने वेढ्यात तग धरण्यासाठी फारच अुत्तम तयारी, रसद, शस्त्रास्त्रें, दारूगोळा साठवण करून ठेवलेली होती. त्या जागेत आता जवळ जवळ अेक हजार युरोपियन व आठशे नेटिव्ह शिपाअी अितकें सैन्य बाहेर जमत चाललेल्या बंडाच्या अुग्र ज्वालाकल्लोळाचा प्रतिकार करण्यासाठी सज्ज झालेले होते. चिनहटची लढाअी हरल्यावर मच्छीभवन हातून सुटताच त्या अिंग्रजी योद्धयाने ही रेसिडेन्सी लढविण्याचा हुरूप धरून तिथे ठाण मांडलेले आहे, हें पाहताच बंडवाल्यांनी तिला वेढा देण्यास आरंभ केला.

अशा रीतीने अयोध्या प्रांतातून अिंग्रजी सत्तेला हुसकीत हुसकीत अखेर या अेका चिमुकल्या रेसिडेन्सीत आपण कोंडून टाकली।[४] शहरात अयोध्येच्या वजीद-अल्ली शहाचे नांवाने त्याची बेगम राजसूत्रें चालवू लागली. लखनौच्या वेढ्यात अिंग्रजांशी लढण्यासाठी अनेक शूर पुढारी आपआपल्या अनुयायासह तिकडे लोटू लागले. ज्यांनी अिंग्रजी लोकांना ते शरणागत व अनाथ स्थितीत पळत असतांना जीवदान दिलेले होते, ते सर्व जमिनदार, जहागिरदार व राजेही या वेळी आपलें औदार्य झटकून टाकून स्वदेशाच्या मुक्ततेसाठी लखनौकडे लोटू लागले. राजा मान-सिंग, अितर पुढारी व मौलवी अहमदशाहसह झाडून मुसलमान पुढारी हातात हात घालून अिंग्रजी निशाणावर तुटून पडले. राजा हनुमंतसिंग, शरण आलेल्या अिंग्र-जांना वडवाल्यापासून संरक्षण करण्यात जितक्या अत्यंत प्रमुखत्वाने झटत होता तितक्याच प्रमुखत्वाने आता स्वदेशमोचनासाठीही झटून वडवाल्यासहच अिंग्रजांशी लढू लागला.

* * *

## प्रकरण दहावें

# संकलन

दिल्ली, कानपूर, लखनौ, बरेली वगैरे मृतप्राय झालेल्या राजसिंहासनात पुन्हा स्वातंत्र्याचा पवन संचरविणाऱ्या ह्या अद्भुत क्रांतिस्फोटाचा थोड्याबहुत प्रमाणाने जीव धरून राहिलेल्या त्या बाजूच्या अितर संस्थानावर काय व किती परिणाम झाला ?

सत्तावन साली लोकमनाला हे कळून चुकलेले होतें की, आपल्या देशावर जों-पर्यंत परकी सत्ता कायम आहे तोंपर्यंत नसलेलीं संस्थानें जितकीं मृतवत् आहेत तितकींच असलेलीं संस्थानेंही मृतवत् झालेली असणार. हिंदुस्थान ह्या पवित्रतम

४. The well known writer of the Red Pamphlet says, "All Oudh had been in arms against us – not only the regular troops but sixty thousand men of the army of the ex-king The Zamindars and their retainers, the two hundred and fifty forts – most of them heavily armed with guns – have been working against us. They have balanced the rule of the company with sovereignity of their Kings and have pronounced, almost unanimously, in favour of the latter. The very pensioners who have served in the army have declared definitely against us and joined in the insurrection."

-य महत्तम ध्येयाने उद्दीपित झालेले जनजलधि ह्या किंवा त्या रंकासाठी वा राजासाठी खवळून फोफावलेले नव्हते. व्यक्ति – रंक व राजा – जगो वा मरो, देश व राज्य न मरावें, मरू देणें नाही. गुलामगिरीच्या कालपाशाला तोडून देशाचें स्वातंत्र्य प्रतिष्ठापन करणें – मग त्या लोकहेतूचे प्राप्तीसाठी वाटेल तितक्या झोपड्यांच्या व सिंहासनाच्या राखेच्या ढिगान्यावरून चालत जावें लागो, अशी लोकपक्षाची रणघंटा घणघणली! अेक राजा – जो देशाला स्वातंत्र्य देअील तो! अितर सर्व राजे असून नसून सारखेच!

अेतदर्थ ग्वालेर, अिंदोर, राजपुताना, भरतपूर वगैरे जीव धरून राहिलेल्या संस्थानातील लोकपक्षाला संपूर्ण स्वतंत्र प्रदेशाप्रमाणेच क्रांतिसमराची चेतना झालेली होती. आपला राजा व आपलें संस्थान कायम आहे, मग अितरासाठी आपण का धोक्यात पडावें, हा अमंगल विचार कोणासही शिवेना. अितर? अेका मातेच्या, अेका पुत्राला दुसरा पुत्र अितर? सत्तावन आलेले आहे! आता भारतमाता तितकी अेक – अितरत्वाची हद्द तिच्या हद्दीबाहेर!

तर ग्वालेरकर शिंदे, तुम्ही आता आम्हांस अिंग्रजांविरुद्ध लढण्याचा हुकूम द्या. नुसता हुकूमच नव्हे तर तुम्ही आमचे धुरेचे धुरीण व्हा, रणागणावर स्वदेश व स्वधर्म ही मंत्रगर्जना करा, व चला ससैन्य महादजींचा अपूर्ण हेतु पूर्ण करण्यासाठी रणांगणाकडे. सर्व देश अेका जयाजींचे शब्दावर अवलंबून आहे. तुम्ही युद्ध म्हणा की आग्रा पडला, दिल्ली मोकळी झाली, दक्षिण घनगर्जना करीत अुठली, गनीम देशपार झाला, देश स्वतंत्र आणि तुम्ही त्याचे स्वातंत्र्यदाते! द्विदशकोटी लोकांचें आयुष्य अेका जिभेच्या अेका हलण्यावर अवलंबून आहे! असा क्षण जगात अन्य प्रसंगी आलेला नव्हता!

परंतु शिंद्यांची ती अेक जीभ पहिल्याने मुळीच हलेना आणि जेव्हा हलली तेव्हा ' युद्ध ' म्हणण्याचे अैवजी ' स्नेह ' म्हणून म्हणाली! शिंद्यांनी ' स्नेह ' – देशाशी नव्हे – अिंग्रजाशी ठेवण्याचे ठरविलें. हे पाहताच शिंदे युद्ध करीत नाही तर आम्हीं करू! देशमातेच्या मुक्ततेला तू धावत नसशील तर तुझ्यावाचून – तुझ्या विरुद्ध आम्हीं धावू व तिची मुक्तता करू! आज तारीख १४ जून रविवार आहे. आजपर्यंत आपण शिंद्यांची वाट पाहिली. आजच्या रविवारी फक्त सूर्यनारायणाचीच काय ती वाट पाहणार–सूर्य अस्तास गेला की ' हर हर महादेव '! गाडीमध्ये बसून कोण चालले आहे? कूपलंड, मेमसाहेब! खबरदार कोणी त्यांना सलाम करील तर. गोऱ्याला सलाम? आज जूनच्या १४ तारखेला? ह्या गोऱ्यालाच काय पण तो पुढे खुद्द ब्रिगेडियर साहेब आलेला आहे – पण मान बिलकूल कोणी लववितां किंवा हात हलविता कामा नाही. ब्रिगेडियर? कोणी केला याला ब्रिगेडियर? प्रासादशिखरस्थोऽपि काको न गरुडायते। तर आपली टोळी त्या ब्रिगेडियरच्या छातीवरून छाती पुढे करून पुढे चालवा.[१] व त्याप्रमाणे ते ग्वालेर कॉटिन्जंटचे शिपाअी

१. Mrs. Coopland's Narratives.

गेडियरला सलाम न करता पुढे गेले. हृदयगुहेत जागृत झालेल्या आर्यत्वाचा ह आता अभिजाततेचे अुद्दाम चाळे असे करू लागला ! तरी सध्याकाळपर्यंत दी गडबड कोणी न करावी. संध्याकाळ झाली व अेका बंगल्याला आग लागली. आता आली गडबडीची खरी वेळ. तोफखान्या, अूठ बंड करून, पायदळही, अेका ात जळत्या चुडीचे जाळ व दुसऱ्या हातात लकाकणाऱ्या तरवारींची पातीं न धावा भुताटकीसारखे किंकाळत खिदळत दश दिशांना ! जो जो वाटेत भेटेल चा त्याचा रंग पहा. काळा असल्यास प्रेमाची मिठी, गोरा असल्यास घाला वार कंठी ! मारो फिरंगीको ! घरात लपला काय–लावा आग घराला. भागतो , जाळाचे चटके बसताच घराबाहेर पटापट. हे कोण ? गोरा–छाटा त्याचें :; हें कोण–गोरी ? 'मत मारो मत मारो ' जा, घे जीवदान. आम्ही मेम व काही मारणार नाही !' त्या भयंकर भुताटकीचा नाच थयथयत आहे ! ्वेरला शिंद्याच्या राजवाड्यातही कोणी गोरा अुरला न पाहिजे. गोरे सर्व ांच्या राज्याबाहेर आग्र्यापर्यंत पिटाळून दिले. गोऱ्या बायका अेकत्र जमवून केल्या. पण त्यांच्याशी थोडें बोलणें चालणें न करणें हें अिष्ट नाही. अुन्हात रळत ही बाअी समोर आहे. तिच्याशी बोलण्यास आरंभ करू या. म्हणून अेक विचारतो, " कां मेमसाहेब, तुम्हांला अिकडचें अुन्ह कसं काय आवडते ? ाशी फारच चटके बसू लागलेत नाही ? तुम्ही तुमच्या थंड देशात राहिला ा तर ह्या खाष्ट अुष्णतेचा चटका कशाला बसता बरें ! " ह्या बाअीला अितका मिचकावीत Devilish अुपदेश देअून आता ही दुसरी बाअी. तिला हा काय तो हे अेका ! " काय तुम्हाला आग्र्याला धाडावें म्हणता. आग्रा ? आग्र्याला च तुमच्या गोऱ्या पुरुषाची कत्तल अुडाली व आग्रा आता दिल्लीच्या बादशहा- आहे. मग जाता तिकडे ?" म्हणून ते खिदळत अेकच हशा पिकवू लागले ! ला अेखाद्या बाहुल्याअितके निर्जीव करून ग्वालेरच्या कॉंटिन्जट फौजेने बंड शिंग्रजांच्या रक्ताचा मनसोक्त सडा पाडला, गोऱ्या बायाना, गोऱ्या निशा- ा व गोऱ्या सत्तेला ग्वालेर संस्थानचे हद्दीबाहेर हुसकून दिले व ग्वालेर संस्थान तऱ्हेने संपूर्ण स्वतंत्र करून ते शिंद्याला जोराने हुकूम देअू लागले की, आता यान देश स्वतंत्र करण्यास आग्रा, कानपूर व दिल्लीकडे ससैन्य तू आमचा ति होअून बाहेर पड ? शिंद्यानी त्याना आज बाहेर पडेन, अुद्या बाहेर पडेन

२. "It was a most favourable moment for recovering his authority. It was merely necessary to accede to the proposal the mutinious contingents and to revenge himself on the- ish. Had he so acceded and put himself at their head and, mpanied likewise by his trusty Mahrattas and proceeded to-

(टीप पुढील पानावर चालू)

अशा थापाथापीवर भुलवून आणखी काही दिवस निश्चल ठेवलें. तात्या टोपेंनें गुप्त रूपानें ग्वाल्हेरला येऊन त्याची ती भूल पाडीपर्यंत शिंद्यांची फौज अशीच निश्चल राहणार.

आणि म्हणूनच आग्र्यानें अिंग्रजांच्या जिवात अजून जीव आहे. कारण आग्र्याला वायव्य प्रांताचा मुख्य लेफ्टेनंट गव्हर्नर मर कॉल्व्हिन हा मृत्यूची दर क्षणी वाट पहात थरकापत अुभा राहिलेला आहे. मागे मीरतच्या अुठावणीने बिथरलेल्या शिपायांस त्यानें अेक राजनिष्ठेवर व्याख्यान दिलेलें होतें व अेक माफीचा जाहिरनामाही काढला होता. माफीचा जाहिरनामा ! त्याची माफी मागण्यास येण्याअितका अेकही नेभळा शिपाअी निघाला नाही. अितकेंच नव्हे तर त्या 'माफी'ला अुत्तर म्हणून त्यांनी ता. ५ जुलैला आग्र्यावर स्वारी केली ! नसिराबाद व नीमच येथील बंड केलेल्या रेजिमेंटस् आग्र्यावर चालून गेलेल्या आहेत तर करौली व भरतपूर येथल्या संस्थानिकांच्या राजनिष्ठ फौजांस त्यांच्यावर धाडून द्या. त्या संस्थानांनी धाडलेल्या फौजा अिंग्रजांना म्हणाल्या की "आमच्या संस्थानचा हुकूम म्हणून तुमच्या विरुद्ध अुठणें नाही. पण म्हणून आम्ही आमच्या स्वदेशबांधवांवर हत्यार बिल्कूल अुचलणार नाही !" कोटा कॉन्टिंजंटने तर बंडच केले. अशी फजगत झाली. नेटिव्ह संस्थानें राजनिष्ठ, पण त्यांचे लोकपद व सैन्य सर्व स्वदेश बंधूंवर शस्त्र अुचलण्यास तयार नाही ! तेव्हा शिल्लक अुरलेल्या गोऱ्या फौजेसह ब्रिगेडियर पॉलव्हेल हा आग्र्यावर येणाऱ्या बंडवाल्यांवर चालून गेला. तो दिवसभर अुभय दलांची सिमीअा येथे घनघोर लढाअी झाली. शेवटी बंडवाल्यांच्या माऱ्यापुढे टिकाव धरणे अशक्य होअून अिंग्रजी फौज मागे परतली. हे पाहताच विजयानंदाने धुंद झालेले बंडवाले त्यांच्या पाठीवर लांडगेतोड करीत पुढे चालले. आग्र्यात ते पराभूत अिंग्रज सैन्य येताच व त्यांच्या मागे बंडवाल्यांचे विजयध्वनि शिरताच आग्र्याला मिळाली पाहिजे होती ती संधि मिळाली ! हा ता. ६ जुलैचा दिवस होता. तेव्हा आग्रा बंड करून अुठला. आणि त्यात मुख्य पुढारीपण पोलिसांनी घेतलेलें ! हे सर्व पोलीस गुप्त तयारीने तत्पर झालेले होते. त्यांनी, नागरिकांनी

(टीप मागील पानावरून चालू)

the scene of action, the consiquences would have been most disastrous to ourselves. He would have brought at least twenty thousand troops — and half of them drilled and disciplined by Europeon officers — on our weak points. Agra and Lucknow would have at once fallen. Havelock would have been shut up, in Allahabad, and either that fortress would have been besieged or the rebels giving it a wide berth, would have marched through Banaras on to Calcutta. There were no troops — no fortification to stop them." —Red Pamphlet page 194.

धर्मनिष्ठ हिंदूंची व मुसलमानांची अेक टोलेजंग मिरवणूक निघाली. खुद्द शहराचा कोतवाल व पोलिसांचे अधिकारी त्या मिरवणुकीच्या पुढे चालले, त्यांनी स्वधर्माचा व स्वराज्याचा जयजयकार करीत द्वाही फिरविली की फिरंगी राज्याचा अंत झालेला आहे व दिल्लीचे बादशहास आम्ही आमचें राजत्व दिलेलें आहे!

असा आग्रा स्वतंत्र होताच, तेथील अिंग्रजासुद्धा, पराजयाने शरमिंदा व भावी चिंतेने अुद्विग्नमानस मर कोल्व्हिन हा किल्ल्यामध्ये जाअून बसला. त्याला आता अेक धास्ती होती की शिंदा काय करतो? शिंदा बंडवाल्यास मिळाला ह्या नुसत्या बातमीने तो प्रचंड किल्ला बंडवाल्यांच्या हातीं पडला असता! परंतु शिंदा विरुद्ध नाही हें तो धाडीत असलेल्या राजनिष्ठ पत्रावरून व कुमकेवरून स्पष्ट होताच आम्याला अिंग्रजी निशाण पुन्हा जरा सजीव दिसू लागले. परंतु त्या निशाणाच्या भाराने खचलेला मर कोल्व्हिन मात्र अिंग्रजी राजसत्तेला दुःसात लोटून ता. ९ सप्टेंबर १८५७ ला मरण पावला!

लोकपदाची ग्वालेरला झालेली ही क्रांतिचेतना अिंदोरलाही अशीच भयंकर स्फोट पावलेली होती. अिंदोरपासून नजीक असलेल्या महूच्या छावणीमध्ये असलेल्या सर्व फौजेत व अिंदूरच्या राजसत्तेंत गुप्त दळणवळण सतत चालू राहून अखेर बंडाचा विचार ठरला व ता. १ जुलैला अिंदोर दरबारातला सादतखान या मुसलमान सरदाराने रेसिडेन्सीच्या फिरंग्यावर तुटून पडा म्हणून सैन्यास हुकूम सोडला. महाराजांची मला अशीच आज्ञा आहे असेंही त्याने प्रसिद्ध केलें. पण या प्रसिद्धीची फारशी जरूर नगणाऱ्या अिंदोर फौजेने बंडाचे निशाण सावडतोब अुभारले व रेसिडेन्सीवर तोफासह चाल केली. रेसिडेन्सीत असलेल्या नेटिव्ह फौजेने अिंग्रजाचे वतीने स्वदेशबांधवांवर गोळी सोडण्याचें नाकारलें. अिंग्रज हतबल झाले, व त्यांनी मुकाट्याने आपले गाठोडे बांधले व अिंदोरहून चतुराईने अुचलून जीव बचावून पळ काढला. त्यांचे जीव मात्र सरक्षण करण्याची त्यांच्या नेटिव्ह फौजेने हमी दिलेली होती व त्याप्रमाणे, शेवटपर्यंत त्यांनी त्यांचें सरक्षण केले. महाराज होळकर अिंग्रजांना अनुकूल होते की बंडवाल्यास होते हें नक्की सिद्ध करण्याची अिंग्रजी प्रंथकार फार धडपड करतात परंतु मसलतांची स्थिति व तत्कालीन अितिहास जरा सूक्ष्म रीतीने पाहणाराच्या हे सहज ध्यानात येअील की, त्या काळात बहुतेक नेटिव्ह संस्थानांनी अशी नरमात्मक वर्तणूक मुद्दामच ठेवलेली होती. मनुष्याच्या हृदयात नैसर्गिक असलेली स्वातंत्र्यलालसा त्यांच्यात मनुष्यत्वाबरोबरच होती. तेव्हा सदर्व त्यांनी वाटे विजयी झाल्यास आपलेंही पर्व साधून घेता यावी म्हणून घड अिंग्रजांनाही मिळू नये व अुलट परिणाम झाल्यास आपले हातचें न सुटावे, म्हणून घड बंडवाल्यांनाही मिळू नये, असा डाव बहुतेक संस्थानांनी मांडलेला होता. आपल्या रेसिडेन्सीतून अिंग्रजांना लोक व फौज हुसकून देण्यास तयार झालेली पाहताच त्यांना तसे करू द्यावें म्हणजे संस्थान स्वतंत्र होअील, परंतु आपण

इंग्रजांशी सख्यत्वाचीं बोलणीं रात्रींतच करावें की त्यांचा जय झाल्यास निदान हानी होतें तें तरी जाऊं नये. कच्छ, ग्वालेर, अिंदोर, बुंदेले, राजपुताना वगैरे बहुतेक संस्थानांत हेंच राजवर्तन रासलेलें दिसून येअील.

आणि ह्या अल्पलपोटेपणाच्या राजवर्तनांनीच क्रांतीचा नाश झाला. त्यांनी स्वातंत्र्य वा मरण अशी करारी गर्जना केली असती तर स्वातंत्र्यच मिळतें–स्वातंत्र्य वा स्वार्थ अशी अर्धी कच्ची, अुदातानुदात्त, अुच्चनीच लपंडावी केल्याने अुच्चता तितकी विफळ झाली, नीचता तितकी प्रत्ययास आली ! स्वदेशाशी त्यांनी पतियाळा वगैरे संस्थानांसारखा प्रत्यक्ष द्रोह केला नाही—परंतु हा अप्रत्यक्ष द्रोह केला, केवळ स्वातंत्र्याच्या अुच्च अस्तित्वाचे आशेतही स्वार्थाचे नीचत्व मनास शिवू दिलें, अेतदर्थ तें शिपायांचें बंड व देश पराजयाचा अधिकारी झाला.

राजवर्तनाच्या ह्या अुच्चनीचतेने या नीच अुच्चतेने लोकवर्तनाला मात्र स्पर्श केला नाही व त्या लोकवर्तनाच्या तेजस्वी आघातानेच पेशावरपासून कलकत्त्यापर्यंत रक्ताचा सडा पडू लागला. आगीचे डोंब धगधगले, ज्वालामुखीच्या भयंकर धडधडाटासरशी अिंग्रजी सत्तामंदिर कोसळून चूर्ण झालें ! [३]

परंतु असा हा प्रलयकालीन धक्का बसणार याची कलकत्त्याला व अिंग्लंडला किती अपुरती कल्पना होती ! मीरतच्या बातमीचे आधी सरकारच्या मताने हिंदुस्थानात पूर्ण शांतता नांदत होती. हें तर राहोच परंतु मीरत अुठून दिल्लीला नवीन साम्राज्याची द्वाही फिरली तरीही ह्या स्फोटाचा वास्तविक अर्थ कलकत्त्याच्या ध्यानात अुतरेना. मीरतच्या १० मेपासून तों सार्वजनिक स्फोटाच्या ३१ मेपर्यंत बंडाची लाट कुठेही अुठली नाही हें पाहताच हिंदुस्थानात काहीही गडबड नाही हीच कल्पना कलकत्त्याच्या डोक्यात जास्त बळावली. ता. २५ मेला होम सेक्रेटरीने प्रसिद्धपणें जाहीर केले की, " कलकत्त्यापासून ६०० मैलांपर्यंत प्रत्येक स्थली पूर्ण

३. Wherever the chiefs of the native states hesitated to join the revolution, the people of the states became uncontrollable and tried to throw off the yoke even of their own chief, if he would not join the nation's war. Seeing this extraordinary upheaval of the populace Malleson says, – "Here too as at Gwalior, as at Indore it was plainly shown that, when the fanaticism of the oriental people is thoroughly roused, not even their Kings, their Raja – their father, as all consider him, their God as some delight to style him – not even their Raja can bend them against their convictions." The Sepoys of the Rajas of Jaypur and Jodhpur refused point blank to raise their hands against their countrymen who were fighting for the nation, even when asked by their Rajas to do so " —Malleson's Vol III, P. 172.

शांतता नांदत आहे. मध्यंतरी वाटलेला क्षणिक व तुरळक धोका आता नष्ट झाला असून थोडेच दिवसांचे आत शांतता व निर्भयता नांदू लागेल अशी आशा आहे."

हे ' थोडे दिवस ' अुलटले, ता. ३१-मे अुजाडली — जिकडे तिकडे शांतता व निर्भयता नांदू लागली ! लखनौच्या रेसिडेन्सीभोवती, कानपूरच्या मैदानात, झांशीच्या जोगन बागेत, अलाहाबादच्या बाजारात, बनारसचे घाटावर जिकडे तिकडे ' शांतता व निर्भयता ! ' तारायंत्रांचे राओीराओीअेवढे तुकडे, आगगाड्या व लोखंडी रूळ व रेल्वेचे पूल चिरडून भरडून धुळीस मिळविलेले, नद्यानद्यांतून युरोपियनाचीं मढीं वहात चाललेलीं, रस्त्यारस्त्यातून रक्ताचीं तळी थिजलेलीं,—जिकडे तिकडे ' शांतता व निर्भयता '!

तेव्हा कलकत्याचे मोहपटल भंग पावलें. ता. १२ जूनला सर्व युरोपियन नागरिकानी स्वयंसैनिकांचें पथक तयार करण्यास आरंभ केला. युरोपियन दुकानदार क्लार्क, लेखक, मुलकी अधिकारी वगैरे सर्व गोऱ्यांना भराभर लष्करी यादीत नोंदवून टाकून त्यांना कवाओीत शिकविण्यास आरंभ झाला व तें काम अितक्या शपाट्याने व अुत्साहाने पार पडलें की, तीन आठवड्याचे आत त्या नूतन शिक्षित स्वयंसेवकांची अेक ब्रिगेडची ब्रिगेड तयार झाली. घोडेस्वार, पायदळ व तोफखाना अशा सामर्थ्यासह कलकत्ता शहराचें संरक्षण करण्याची त्यांना पूर्ण शक्ति आल्यामुळे त्यांना तें काम देण्यात आलें, व तेथील युरोपियन लष्करी सोजिरांना बाहेर बंडाचे प्रदेशाकडे धाडण्याची सरकारला सवड सापडली.

ता. १३ जून रोजी कायदेकौन्सिलात स्वतः जाअून लॉर्ड कॅनिंगने नेटिव्ह वर्तमानपत्रकाराच्या विरुद्ध अत्यंत कडक व भयंकर कायदा पास करून घेतला. कारण बंड सुरू होताच बंगालचीं नेटिव्ह पत्रें अुघड अुघड रीतीने बंडवाल्यास सहानुभूतिप्रदर्शक व अुत्साहदायक लेख लिहू लागलीं होतीं.

ता. १४ रविवार रोजी मात्र कलकत्याला ' शांततेचा व निर्भयतेचा ' खरा-खरा महोत्सव करण्यात आला. त्या दिवसाचें वर्णन अिंग्रजी लेखणीनेच करावें. " जिकडे तिकडे भयभीतता, धास्ती, गोंधळ व पळापळ ' अत्यंत विचित्र वातम्या! सर्वांची अशी खात्री झाली की बराकपूरचे शिपाओी कलकत्यावर चालून येत आहेत, वाटेवरचे सर्व गांवकरी बंडवाल्याना मिळत आहेत, अयोध्येचा नबाब व त्याचे अनुयायी गार्डन रीचच्या बागेतून सुरामारी करीत अुठले आहेत ! जे मुख्य अधिकारी होते तेच सगळ्यांमध्ये प्रथम घाबरले होते. गव्हर्मेंटचे सेक्रेटरी कौन्सिलचे सभासदाकडे धावत आहेत, पिस्तुलं भरताहेत, दारादारात अडगळी भुमारताहेत, कौन्सिलचे सभासद बुद्रुवामुद्रा घरेदारें टाकताहेत, धूम ठोकीत आहेत, तारवांवर जाअून जीव रक्षीत आहेत ! त्यांपेक्षा कमी दर्जाचे अधिकारीही वरील महाजनाचा पंथ अनुसरून आपापली चीजवस्तु गोळा करून किल्ल्यामध्ये घुसून तोफांच्या आश्रयाखाली निजण्याची भिक्षा मागू लागले ! गोरे लोक घोडे, गाड्या, पालख्या,

शरीर तन्हेचीं व प्रकारचीं वाहनें भरभरून जीव वचावून अनिश्चत: पळत होते. शहराभोंवतालचे खिश्चन वसतीनें घर न घर मोठ्यें पटलेलें होतें, अग्नि इमन निश्चयी धर्मवेड्यानी शहराचा तीन चतुर्थांश भाग जाळून फस्त केला असता !"[४]

अिंग्रज सरकारच्या खुद्द राजधानीत नुसत्या अेका बाजारगप्पेने अितकी 'यातना व निर्भयता' नांदू लागली ! त्या शांत निर्भयतेचे अुत्पादक बराकपूरचे शिपाअी व अयोध्येच्या नवाबाचा कलकत्यात राहणारा वजीर अल्ली नकीखान यांचें अुच्चाटन करण्यासाठी सरकारने कंबर बांधली. ता. १४ जून रोजी रात्री बराकपूरचे शिपाअी बंड करून अुठणार अशा आशयाची खबर त्यांच्यातीलच अेका-कडून मिळाल्यावरून ता. १४ जूनला बंड होण्याचे आधीच यांना तोफखान्यासमोर आणवून नि:शस्त्र केलें व ता. १५ जूनला अयोध्येचे नवाबांनाच व त्याच्या वजी-राला अेकदम जाअून 'राज्याचे सुरक्षिततेसाठी' म्हणून पकडलें, त्याच्या जनान-खान्यासुद्धा सर्व स्थलांचे झाडे झाले, त्यात काही अेक पुरावा सापडला नाही; तरी नवाब व त्याच्या वजिरांना कलकत्त्याचे किल्ल्यात कैदेत टाकण्यात आलें. अशा रीतीने खुद्द कलकत्ता शहरात साचत आलेलें दारूचें भुयार ठिणगी पडण्याचे आधीच रिकामें करण्यात आलें.

बंगालप्रांतभर असलेल्या शिपायांत क्रांतिरचनेची गुप्त तयारी करणारा व कलकत्त्याच्या अेका निरुपद्रवी बागेत बसून अयोध्येच्या राजसिंहासनाचें पुन:प्रस्थापन करण्यासाठी हें बंडाचे भयंकर जाळें विणणारा हा वजीर अल्ली नकीखान किल्ल्यात कैदेत पडताच बंगाल प्रांतातील क्रांतीचें मस्तकच कापल्यासारखें झालें. किल्ल्यात असताना बंडवाल्यांस दोष देणाऱ्या अिंग्रजाना तो वजीर अेकदा स्पष्टपणे म्हणाला, 'हिंदुस्थानने अुभारलेले हे भयंकर बंड माझ्या मताने न्याय्य आहे. अयोध्येच्या स्वातंत्र्यहरणाचा तो यथातथ्य सूड आहे. न्यायाचा राजमार्ग सोडून तुम्ही फसवे-गिरीच्या व स्वार्थसाधूपणाच्या काटेरी मार्गात जाणून बुजून जर शिरलेले आहात तर आता त्याच काट्यांनी तुमचे पाय रक्तबंबाळ होऊं लागले असता त्यात आश्चर्य ते काय आहे ? सुडाचीं बीजें पेरलीत तेव्हा तुम्ही हसत होतात—आता त्याचा हंगाम आलेला आहे, याचा दोष लोकांवर का टाकता ?"[५]

कलकत्त्याला सत्तावनच्या अत्युग्र अुठावाची जर अस्फुट अंधुक, व अर्धे र' कल्पना होती तर त्या कलकत्त्याच्या टपाली रिपोर्टावर सर्वस्वी अवलंबून असणाऱ्या अिंग्लंड देशाची कल्पना प्रथम किती अज्ञानजनक सुरक्षिततेत निद्रिस्त वा मागून अेकदमच कळल्याने किती भूतबाधा झाल्यासारखी पिसाळलेली झाली असावी ही कल्पना सहज करता येणारी आहे. पार्लमेंटमध्ये बराकपूर, रामपूर, डमडम वगैरे

४. Red Pamphlet Page 105

५. Red Pamphlet

लुब्धतेची बातमी आल्यानंतर हिंदुस्थानाकडे सगळयाचे डोळे लागून राहिले होते. परंतु मध्यंतरी काही अेक महत्त्वाचा वृत्तान्त न घडल्याने पुन्हा सर्वत्र सुरक्षितता वाटू लागली. ता. ११ जून रोजी पार्लमेंटात हाअुस ऑफ कॉमन्समध्ये काही सभासदांनी प्रश्न विचारल्यावरून प्रेसिडेंट ऑफ दि बोर्ड ऑफ कॉमर्सचे प्रमुख अधिकारी म्हणाले : " बंगालमधल्या अलीकडील असंतोषाने लोकांनी भेदरून जाण्याचें आता मुळीच प्रयोजन अुरलें नाही. कारण आपले सन्मान्य व अभिजात मित्र लॉर्ड कॅनिंग यानी दाखविलेल्या तत्परतेने, करारीपणाने व तडफीने सैन्यामध्ये दिमून आलेल्या असंतोषाचीं बीजें पूर्णपणे निर्मूलन पावलेलीं आहेत. (have been completely put an end to) हीं वाक्यें पार्लमेंटात ता. ११ जूनने अैकलीं ! ता. ११ जून ! याच वेळेस हिंदुस्थानात घोडेस्वारांच्या ११ रेजिमेंटस्, तोफखान्याच्या ५ फील्ड बॅटरीज, पायदळाच्या कमीत कमी ५० रेजिमेंटस्, व जवळजवळ सर्व सॅपर्स व मायनर्स हे अुघड बंड करून अुठलेले होते. संपूर्ण अयोध्या बडवाल्याचे ताब्यात पडलेली होती! कानपूर व लखनौ हीं शहरें वेढयात कोंडलेलीं होतीं! सरकारच्या खजिन्यातून अेक कोटी रुपयांहून जास्त रक्कम बंडवाल्यांनी हस्तगत केलेली होती ! — ज्या क्षणी पार्लमेंटात ' लॉर्ड कॅनिंगच्या तत्परतेने, करारीपणाने व तडफीने सैन्यात दिसून आलेलीं असंतोषाची बीजें " have been commpletely put an end to "!!! पुढे लवकरच त्या विषारी बीजांची अकल्पित झालेली वाढ अिंग्लंडच्या मध्यरात्रीनाही झोप येअू देअीना ! तरी कानपूरची तुटक बातमी येताच अत्यंत दुःखी, भयग्रस्त व संक्षुब्ध झालेल्या अिंग्लिश जनसमूहाने पार्लमेंटमध्ये जेव्हा प्रश्न विचारले की कानपूरची गुणगुण खरी आहे काय? तेव्हा अर्ल ग्रॅनव्हिल या श्रेष्ठवर सरदाराने अुत्तर दिले की, ' सर पेट्रिक ग्रॅंट ह्या लष्करी प्रमुखाकडून मला त्याचें स्वतःचें पत्र आलेलें आहे की, कानपूरच्या कत्तलीची ही अुठलेली बातमी सर्वस्वी असत्य असून ती केवळ ' Vile fabrication ' आहे ! अेका शिपायाने ती बाजारगप्प प्रथम अुठविली आणि त्याच्या या नीचतेचा नुमता परिस्फोट झालेला आहे, अितकेच नसून या भयंकर कडीबद्दल त्याला फासावरही चढविण्यात आलें आहे."[६] पार्लमेंट सभेतील हाअुस ऑफ लॉर्डस् मध्येही कानपूरच्या कत्तलीची ' वस्तुस्थिति ' नरखतमणीच्या नरमामपत्रावर हिडीस अक्षरानी खोदून टाकण्यास पुरेपूर अेक महिनाही अुलटून गेलेला होता ! हाअुस ऑफ लॉर्डस्च्या सभेत या कडीला तिच्या त्या काल्पनिक अुत्पादक शिपायासह फासावर चढवून अिंग्लिश मुत्सद्दी जरा निर्भयतेचा आराम घेत शांत होतात न होतात तों अिंग्लंडच्या किनाऱ्याला ती वस्तुस्थिति येअून धडकली – आणि सर्व अिंग्लंड देश दुःखाने, त्वेषाने, अभिमानभंगाने बेशुद्ध, बेडापिसा होअून पिसाळलेला थयथयाट करू लागला ! त्याचा तो थयथयाट

६. चार्लस बॉल, खंड १ ला.

अजूनपर्यंत चालू आहे ! यंदाच्या बंडवाल्यांनी केलेल्या कत्तलींनी मनुष्यजातीच्या निर्मल मनावर कायमचा राक्षसी कालिमा चढविला असा त्याचा शुभ्रस्वर तरी त्यांनी लिहिलेल्या अितिहासाच्या ओळीओळींतून आर्तस्वाने आजतागायत ओरडत आहे !

आणि या भयंकर आरडाओरडीच्या अखंड गलबलाने जगाचीही कायमची कानठाळी बसून गेली. ५७-चें नांव घेताच ज्याच्या त्याच्या अंगावर भयाचा कांटा व तोंडावर लज्जेची छटा ! बंडवाल्यांच्या नांवाचा अुल्लेख-त्यांच्या शत्रूंनाच नव्हे, वेडगळ निष्ठाअितागस नव्हे तर ज्यांच्यासाठी त्या बंडवाल्यांनी रक्त ओतलें, त्या त्यांच्या स्वकीयांनाही त्याज्य वाटतो, निंद्य वाटतो, पापकारक वाटतो. त्यांचे शत्रू त्यांना राक्षस, पिशाच्च, रक्तप्रिय, नरकृमि म्हणतात. त्यांचे निष्ठावंत त्यांना अज्ञाण, अमानुष, रानटी, अघोरी म्हणतात व त्यांचे देशबंधु त्यांना स्वकीयत्व देण्या-सही लाजू लागतात ! असा भयंकर गलका जिकडे तिकडे आजतागायत चाललेला आहे! सत्याचा स्वर अेकण्याचा अितःपर श्रवणक्षमता नसावी म्हणून जगाच्या श्रवणाची ह्या अखंड गलबलाने अेकसारखी कानठाळी बसवून टाकली आहे ! बंडवाले राक्षस आहेत, बालहत्यारी आहेत, रक्तप्रिय आहेत, नरकृमि आहेत, अमानुष आहेत—खबरदार जगा दुसरें काही अेकशील तर!

कारण? कारण की बंडवाल्यांनी स्वदेशासाठी व स्वधर्मासाठी आम्हा अिंग्रजांच्या विरुद्ध शस्त्र अुचललें व 'मूड मूड' अशी गर्जना करीत आमच्या सरसकट कत्तली अुडविल्या !

सरसकट कत्तली अुडविणें हें भयंकर पाप आहे ! मनुष्यजाति तिच्या अति सौंदर्याला अीश्वरावतारानी, देवदूतानी, व धर्मगुरुंनी प्रवर्तिलेल्या अत्युच्च भविष्यात वर्तमानत्व येअून ज्या वेळेस न्यायावस्थेला जाअून पोचेल जेव्हा सत्याला 'अ' हा निषेधप्रत्यय कधीही लावणार नाही व जेव्हा अेका गालात मारलें असता दुसरा पुढे कर' ह्या ख्रिस्टच्या शांतिबोधाला, पहिल्या गालात मारणाराच कोणी न अुरल्याने असंभाव्यत्व येअील, त्या स्पृहणीय दैवी युगात जर कोणी बंड केले, जर कोणी रक्तबिंदु पाडला व जर कोणी मूड हा शब्द अुच्चारला तर तत्काळ त्या कृतीनेच व त्या अुच्चारानेच तो पापी अधमत्वाला पात्र होअील. कारण जिकडे तिकडे सत्याचें राज्य प्रत्येक अंतःकरणात नांदत असता 'बंड' पापच असलें पाहिजे, जिकडे तिकडे अहिंसेची समता प्रत्येक अंतःकरणात अुमटत असता रक्तबिंदु पाडणें हें पापच असलें पाहिजे, व जिकडे तिकडे न्यायाच्या चंद्रिकेने प्रत्येक अंतःकरणात शीतलत्व आणलें असता 'मूड' हा शब्द अुच्चारणें हें पापच असलें पाहिजे. अशा अबाधित न्यायकालात असा अन्यायमूलक अुच्चार अेकताच कोणतीही जास्त चौकशी न करता त्या अुच्चारानेच तत्कार्याला अधमत्वाच्या शिक्षेचें शासन करणें हें सर्वस्वी अदूषणीय आहे.

परंतु तें दैविक युग जोपर्यंत आलेलें नाही, जोपर्यंत त्या परममंगल साध्याचें अस्तित्व हे सत्कवींच्या प्रतिभेत व ओव्हरी प्रेषितांच्या भविष्यातच काय ते वसत आहे व जोपर्यंत ती न्यायैकभाजन अवस्थाप्राप्ति शक्य करण्यासाठीं तद्विरोधी अन्यायमूलक प्रवृत्तींचें निर्मूलन करण्यात मानवी मन गुंतलेलें आहे तोंपर्यंत बंड, रक्तपात व सूड हे शब्द केवळ अधमत्वाचेच अधिकारी होणारे नाहीत. राज्य हा शब्द जोंपर्यंत अन्यायमूलक वा न्यायमूलक अशा दोन्ही सत्ताना लागत आहे, तोंपर्यंत तद्-विरोधक 'बंड' हा शब्दही जसा अन्यायमूलक तसा न्यायमूलकही असू शकेल. आणि तोंपर्यंत बंड, रक्तपात, व सूड ह्यांच्या कथानकांची व कथानायकाची शिक्षेच्या आधी तत्काल विवरणात्मक चौकशी झालीच पाहिजे. बंड, रक्तपात व सूड हीं कृत्यें जशी स्वयमेव अन्यायस्वरूपी आहेत तशींच तीं केव्हा केव्हा न्यायाच्या संवर्धनासाठी निसर्गानें अुत्पन्न केलेलीं न्यायशस्त्रेंही झालेलीं आहेत.

आणि जेव्हा ह्या भयकर साधनानी न्यायमूर्ति 'शत्रुरुधिरदग्धपाणि मुख विकट प्रकट भैरवशी ' अशी झालेली असते तेव्हा तेव्हा त्या भयंकरत्वाचा दोष त्या न्यायमूर्तीवर नसून ज्या मत्तमदाने तो क्रूर प्रसंग ओढावून आणला त्या प्रबल अन्यायावरच तो लादलेला असतो. म्हणूनच फाशीची शिक्षा देणारा न्यायाधीश रक्तपाताचा अधिकारी नसून फाशीवर जाणारा अन्याय त्या पापाचा जबाबदार होय. म्हणूनच ब्रूटसचा खंजीर पवित्र होय! म्हणूनच शिवाजीचीं वाघनखें पुण्यपावन होत! म्हणूनच अिटलीच्या राज्यक्रांतीतील रक्तपात हा यशोधवल आहे! म्हणूनच पहिल्या चार्लसचा खून हा वध आहे! म्हणूनच वुअिल्यम टेलचा बाण हा मार्गण आहे! आणि त्या सर्व कृत्यांतील भयंकरत्वाचें अघोर पाप हे तत्तदाधिकारी अन्यायाचेच शिरावर वज्राघाताने कोसळणारें आहे!

किंबहुना बंडाचें, रक्तपाताचें व सुडाचे भय नसते तर आजला जुलमाच्या व अन्यायाच्या अप्रतिहत भयंकर भूतवर्तनानेच ही वसुंधरा करकर वाकत राहिलेली असती! लवकर किंवा अुशिरा, पण अशा या क्षणिक विजयी अन्यायाचा सूड न्यायी निसर्ग घेअीलच घेअील, ह्या चिंतेपासून जर जुलमाची झोप सुरक्षित असती तर अकुतोभयतेने झाराचा व चोराचा आज सर्वत्र सुळसुळाट झालेला असता! परंतु प्रत्येक हिरण्यकश्यपूला नारसिंहाचा सूड, प्रत्येक दुःशासनाला भीमसेनाचा सूड व प्रत्येक मदमलिन गडस्थलाला हरिनखराचा सूड हा आपल्या रक्ताने थबथबलेल्या व विक्राळतेने लवलवणाऱ्या जिव्हेने भेडसावीत आहे. म्हणूनच अन्यायप्रवृत्तींचें अुच्चाटन होण्याची काहीतरी आशा हृदयात अुत्पन्न होते. असला सूड हें अन्यायाचें निसर्गोद्‌भूत शासन असते व म्हणून त्याच्यातील क्रूरतेचें, अमानुषतेचें पाप हे अन्यायप्रवर्तकावरच अुलटून जाते!

व अशाच युद्धाची भयंकर ज्वाला सत्तावन साली हिंदुस्थानच्या अंतःकरणात भडकलेली होती. त्यांचीं सिंहासनें मोडलेलीं, त्यांचे मुकुट फोडलेले, त्यांचा देश हिसकलेला, त्यांचा धर्म बुडविलेला, त्यांच्या जहागिऱ्या जप्त झालेल्या, अिनामें बुडविलेलीं, कायदे धिक्कारलेले, वचनें मोडलेलीं, अपमानाचा, मानभंगांचा, जीवित-विपत्तींचा कळस झालेला! विनवण्या व्यर्थ, अर्जं व्यर्थ, तक्रारी व्यर्थ, रडणें व्यर्थ, ओरडणें व्यर्थ! तेव्हा निसर्गाची प्रतिक्रिया सुरू झाली व जिकडे तिकडे सूड सूड अशी कुजबूज ऐकू लागली. वरीलपैकी अनेक प्रसंगानें युद्धाची यथार्थता भासविलेली असते असे अनंत जुलमी प्रसंग त्यांच्यावर गुदरलेले होते. अशाही प्रसंगी बंड न होतें तर हिंदुस्थान मेलें असेंच म्हणावें लागलें! व अेतदर्थ तो सूड ही अन्यायाची अपरिहार्य प्रतिक्रिया होती आणि अेकदा सर्व राष्ट्र खळबळून अुठलें म्हणजे मग अेखादे दुसरे ठिकाणी संतप्त जनसमूहांनी सरसकट कत्तली केल्या हें नवल नसून तशा कत्तली प्रत्येक ठिकाणी कशा झाल्या नाहीत हेंच नवल आहे. कारण जेथे कत्तली झाल्या व ज्यानी त्या केल्या त्यांचें संतप्त तर्कशास्त्र सहजच अुद्गारू लागलें की 'शठे शाठ्यं समाचरेत्!' काली नदीच्या लढाअीत पकडलेल्या शिपायास फाशीवर लटकविण्याच्या आधी अिंग्रजानी विचारलें की, "तुम्ही आमच्या बायका-मुलांना का मारलें?" तेव्हा त्यांनी अेकदम प्रत्युत्तर दिले "साहेब, सापाला मारताना त्याचीं पिलें कोणी जिवंत ठेवतात काय?" कानपूरला शिपाअी म्हणत, "विस्तव विझविणें व ठिणगी ठेवणें, सापाला मारणें व पिलें वाढविणें हें शहाण्याचें लक्षण नव्हे।"[७]

साहेब, सापाला मारताना त्याची पिलें कोणी जिवंत ठेवतात काय? काली नदीच्या शिपायानी विचारलेल्या या अडाणी शंकेचें समाधान साहेब लोक कसें करणार आहेत?

आणि ही अडाणी शंका केवळ हिंदुस्थानातील जनतेने किंवा काही अिंग्रजी लेखकांनीं कल्पिल्याप्रमाणे केवळ अेशियाटिक लोकांच्याच मनानें अुत्पन्न केलेली नाहीत. जेथे जेथे अन्यायाच्या परमावधीने राष्ट्रेंची राष्ट्रें पेटू लागली, जेथे जेथे राष्ट्रीय युद्धे जुंपलेली असतात तिथे तिथे राष्ट्रीय अन्यायाचे सूड राष्ट्रीय वधानेंच अुगविले जातात! जेव्हा स्पेन देशाने मूर लोकांपासून आपले स्वातंत्र्य हिसकावून परत मिळविलें तेव्हा मूर लोकांची त्यानी काय दशा केली? स्पॅनिश लोक तर अेशियाटिक नव्हते किंवा हिंदीही नव्हते. मग त्यांच्या देशात जवळ जवळ पाच पाचशे वर्षांवर वास्तव्य करणाऱ्या त्या मूर मुस्लिमांच्या अनाथ कुटुंबांची, पुरुष बायकामुलांसह त्यानी केवळ विशिष्ट धर्म-जातित्वाच्या अपराधाबद्दल भयंकर कत्तल का अुडविली? ग्रीस देशानें १८२१ साली जवळ जवळ अेकवीस हजार तुर्की

---

७. "To extinguish the fire and to leave spark, to kill a snake and preserve its young is not the wisdom of the wise."

शेतकऱ्यांची पुरुषवायकांमुलांसह अत्यंत अघोर कत्तल कां उडविली ? युरोपमध्ये ज्या गुप्त संस्थेला पवित्र मानिली जाते त्या 'हिटेरिया'ने या कत्तलींचें काय समर्थन दिले ? ग्रीस देशांतील तुर्की सख्या थोडी असून ती आमचें शत्रुत्व सोडणारी नाही म्हणून त्या सर्वांना ठार मारणें ही तोडच काय ती "a necessary measure of wise policy" (शहाणपणाच्या धोरणाचा आवश्यक अुपाय) आहे असेंच त्यांनी सांगितले कीं नाही ? सापाला मारताना त्याचीं पिले कोणी जिवत ठेवतो का, हीच अडाणी शंका त्यांच्या मनातील नैसर्गिक दयाशीलतेला जाळून भस्म करीत होती ! आणि त्या भयकर ज्वलनाचा सपूर्ण दोष त्या जहरी सापाच्या कालकूट विषाकडेच असला पाहिजे. किंबहुना विषदंशाच्या विरुद्ध असली भयंकर सूडबुद्धि मानवी निसर्गात वसत नसतीं व ह्या हिडीस शासनाचा जर जहरी सापास धाक नसता तर त्यांची ती कालकूट जिव्हा आजच्या अितकी देखील विळाविळातून दडत फिरतीच ना ![८]

अेतदर्थ अन्यायाच्या अतिरेकाने मानवी मनात सुडाची प्रतिक्रिया जेव्हा जेव्हा अपरिहार्य वेगाने अुसळू लागते तेव्हा तेव्हा पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांमध्ये तसमकट कत्तली, सूड व रक्तपात हे अमानुष क्रौर्याने हटकून मुरू होतातच होतात, ही अितिहासाची साक्ष अंकली असता हिंदुस्थानात सत्तावन साली चारपाच ठिकाणीच असले क्रूर प्रकार घडले ह्या गोष्टीचें नवल वाटणें संपून जिथें खरें खरेंच नवल

८. Sir W. Russell, the famous correspondent of the London Times remarks :— We, who suffered from it, think that there never was such wickedness in the world; and the incessant efforts of a gang of forgers and utterly base scoundrels have surrounded it with horrors that have been vainly invented in the hope of adding to the indignation and burning desire for vengeance which hatred failed to arouse. Helpless garrisons surrendering without condition have been massacred ere now The history of Mediaeval Europe affords many instances of crimes as great as those of Cawnpore. The History of the more civilised periods could afford some parallel to them in more modern times and amid most civilised nations. In fact, the peculiar aggravation of the Cawnpore Massacre was this—that the deed was done by a subject race, by black men who dared to shed the blood of their masters and that of poor helpless ladies and children. Here we had not only a Servile War and a sort of Jacquerie combined, but we had a war of religion, a war of race and a war of revenge, of hope, of national determination to shake off the yoke of a stranger and to reestablish the full power of native chiefs and the full sway of native religions " Russell's Diary, page 164.

वाटतो ती गोष्ट ही होय की चार पांच ठिकाणी ह्या क्रूर कत्तली झाल्या तितक्या थोड्या प्रमाणावर घडण्याचे ऐवजी सर्व ठिकाणी ह्याहून विस्तृत रीतीने ही युद्धाची अघोरता कशी दिसून गेली नाही?

वरील ग्रीस व स्पेनमधली न्याय्य संतापमय अुदाहरणें तर राहोतच, पण हिंदुस्थान तर अन्यायाच्या जाळ्याने होरपळलेला होता व कत्तलींना ज्या अेका परिस्थितीमध्ये न्यायदंडाचें स्वरुप येतें त्या दुर्जनपीडाप्रस्ततेचा हिंदुस्थानवर अमीम मारा झालेला होता. परंतु क्रॉमवेल जेव्हा आयर्लंडांत ससैन्य शिरला, जेव्हा तेथील लोकांच्या यथार्थ देशाभिमानाने तो जाम्नच खवळून गेला. जेव्हा त्यातील लढवय्यांवरच नव्हे तर अशरण गरिबांवर त्याची तरवार सरसरत आदळली, जेव्हा त्या दुर्दैवी देशात रक्ताची नदी फोफावत वाहू लागली व जेव्हा त्या रक्तात क्रॉमवेलच्या तरवारीने अनेक अनाथ बायका आपल्या कडेवरील मुलांसुद्धा परचर कापल्या जाअून तरंगू लागल्या, तेव्हा, आयर्लंड जिंकण्याचा मूलहेतु पापकारी असताही त्या क्रॉमवेलने आपल्या स्वधर्मीयावर जितका क्रूर जुलूम केला, क्रूरतर सूड अुगविला व क्रूरतम रक्तपात कोसळविला तितका देखील हिंदुस्थानाने सत्तावन साली त्याच्या परधर्मी, परवर्णीयांवर रक्तपात कोसळविलेला नाही, जुलूम केलेला नाही, सूड अुगविलेला नाही! अिंग्रजांच्या बायकांना वाचविण्याचा नानासाहेबांनी, दिल्लीच्या बादशहानी व अयोध्येच्या बेगमेने शेवटपर्यंत प्रयत्न केला. परतु कानपूरला नानांच्या ह्या जीवदानाची फेड अिंग्रजी बायानी कशी केली? फितुरी करण्यात! जेव्हा जेव्हा अिंग्रजी ऑफिसरांना शिपायांनी वड होनाच जीवदान दिले तेव्हा तेव्हा त्या ऑफिसरानी त्या अुपकाराची फेड कशी केली? तर नवीन आलेल्या अिंग्रजी सेनेला प्रदेशाची अुत्तम माहिती देण्यात, त्यांचें सेनाधुरीणत्व पत्करण्यात व जो हात शिपायानी जिवंत सोडला त्याच हातात तरवार धरून त्या प्राणदात्याच्या गळ्यावर ती सपकन चालविण्यात! तरी अतवयं नवल हे की, अशल्या कृतघ्नतेतही निसर्गशात हिंदी लोकानी आपली शांति या प्रलयकालातही डगमगू दिली नाही. किती अिंग्रजी पळपुट्याचे जीव शेनातील कुणब्याने संरक्षिलेले आहेत! कितीक अिंग्रजी बायकाना आपले पोपाख देअून खेडवळ बायानी त्यांचे प्राण वाचविलेले आहेत! कितीक गोरी ऑफिसरे पळण्याची शक्ति सपल्याने रस्त्यावर निश्चेष्ट पडलेली असताना जवळून जाणाऱ्या ब्राह्मणाने दूध पाजून शुद्धीवर आणलेली आहेत! फारेस्टने कबूल केलेले नाही काय की, अयोध्येने—ज्या अयोध्येच्या अत करणात अिंग्रजानी आपली *जुलमाची कट्यार निर्घृणतेने खुपसलेली होती—त्या अयोध्येने अिंग्रजी लोकाना* आपल्यावर झालेले अत्याचार विसरून जाअून त्याच्या पलयनात अतुल्य अुदारत्वाने वागविले! वडवाल्याच्या जाहिरनाम्यात त्याच्या पुढाऱ्यानी ठिकठिकाणी 'स्त्रीवधाने व बालहत्येने आपल्या पवित्र कामाला अपयश येअील' असें आपल्या सतप्त अनुयायाग सागितलें नाही काय? नीमच, नसिराबाद येथील बंडवाल्यानी प्राणदान

दिल्यानंतर, पळून चाललेल्या गोऱ्यांना पाहून वाटेतील गावकरी जेव्हा ओरडू लागले, 'मारो फिरंगीको' तेव्हा तेथील अेका कुटुंबाने पुढे येअून सांगितले की, "ते आमच्या बरोबर नुकतेच जेवलेले आहेत. तेव्हा ते कट्टे शत्रु असले तरी आता त्यांना कसें मारता येअील?"[१] ज्यांच्या यत्किंचित् गावकऱ्यांमध्ये ही अुदात्त वीरता नांदत आहे तो शांत हिंदुस्थान सत्तावनसारख्या जितक्या क्रूर कत्तली करील तितक्यांनी त्याच्या धवल नीतीला तिळमात्र लघुतमत्व येत नाही तर कत्तल झालेल्या अन्यायाच्या दुष्ट अत्याचाराचा हिडीसपणा मात्र पर्वतप्राय वृद्धि पावतो! आणि अशाच प्रसंगी मेकॉलेचें तें प्रथित वाक्य यथार्थत्व पावतें की "The more violent the outrage, the most assured we feel that a revolution was necessary." (अत्याचार जितका भयंकर, तितकीच त्याची प्रतिक्रियाही अटळ!)

आणि सत्याचा हा यथार्थ स्वर अैकण्यास जगाचे कर्णांना श्रवणक्षमता नसावी म्हणून हिंदुस्थानातील लोकांच्या क्रूरतेबद्दल बंब दिसाना प्रथन करणारा गलका कोणी अिंग्लिश लोकानी करावा? असा गलका करण्याचा हक्क देवदूतांनीही स्वीकारलेला नाही मग मनुष्य जातीना तो हक्क कुठून मिळणार! परंतु त्या मनुष्य जातीत जर कोणाला तो हक्क काडीमात्रही मिळणारा नसेल तर तो अिंग्लिश लोकाना होय! हिंदुस्थानाने निरपराध्यांची शेकड्यांनी कत्तल केली, हें कोण अिंग्लंड सांगणार? नीलला जन्म देणारे व नीलची स्तुति करणारें अिंग्लंड? ज्या अयोध्येने त्यांना प्राणदान दिलें त्या अयोध्येतील गावेंची गावें बायकामुलांसुद्धा जाळून पोळून फस्त करणारें अिंग्लंड? कोणीही अेटीने चालताना पाहिला की, त्याला बडवाला समजून फाशीवर देणारें अिंग्लंड? फाशीही कमी वाटून त्या स्वदेशासाठी झगडणाऱ्या पांढ्य सैनिकांना अक्षरशः जिवंत भाजून काढणारे अिंग्लंड? फाशीला किंवा या जिवंत भाजण्यालाही ज्याच्या धाकाने त्यांनी प्रेमाने मिठी मारली असती असा धर्मच्छल करण्यासाठी गरीब हिंदु गावकऱ्यांना पकडून त्यांना फाशीची शिक्षा देअून, त्यांना बेयोनेटानी भोसकणारे व मरण्याचे आधी त्याच्या तोंडात गाअीचें रक्तबंबाळ मांस तरवारीने भोसकणारें अिंग्लंड? फरुकाबादच्या नवाबाचे वंशजास फाशीवर चढविण्याचे आधी तो मुसलमान असल्याने त्याच्या सर्व देहाला डुकराची चर्बी चोळून व नंतर त्याला डुकराचे कातड्यात गुंडाळून, भग्यानकडून चाबूक मारवून मग फाशी देणारे व हे सर्व कृत्य खुद्द कमान्डर-अिन-चीफ सर कोलिन्सच्या डोळ्यादेखत चालू ठेवणारें अिंग्लंड? हॉडसनला वीर म्हणणारे, आअुटरामची स्तुति करणारे, व हीं सर्व कृत्यें बडवाल्याच्या वरचा यथार्थ सूड म्हणून त्याचें कौतुक करणारें अिंग्लंड? कानपूरच्या भितीवर निर्गल नीचता स्वहस्ताने लिहून तीं वाक्यें मेलेल्या स्त्रियांनी लिहिलीं आहेत असा मूलभूत चोरटेपणा करणारें अिंग्लंड? "यथार्थ सूड"! कोणाचा? शंभर वर्षें भरडून गेलेल्या देशासाठी संतप्त

१. Charles Ball's Indian Mutiny, Vol I.

झालेल्या पांडय पक्षाचा की त्या अन्यायाच्या घरकावर देरारेस करणाऱ्या आंग्ल पक्षाचा ? कोणाचा मूढ यथार्थ ?

अन्यायाच्या अशा भयंकर दारुसान्धानिवाय ह्या रामप्रधान हिंदुस्थानचा हा असला भयंकर स्फोट शांत झाला नसता ! त्या अन्यायांनी त्याच्या अंत:करणाची लाही लाही केली. हिंदु व मुसलमान आपले अज्ञानजन्य वैर विसरून देशमातेच्या स्तन्यरसाने अेकरंग झाले. जितका हिंदी तितका अेक्या विलक्षण चेतनेच्या वाऱ्याने थयथयाट करू लागला. व्यक्तिविषयक स्वार्थांची, सुखाची, आयुष्याची तुच्छ आशा नष्टप्राय झाली व अेका धुदात्त ध्येयात सर्व हिंदुस्थान अपूर्व अेकता पावू लागले. देशसेवेसाठी ह्या भयंकर स्थितीने दगडालाही पाझर फुटू लागला.

कोण भयंकर स्फोट ! व किती अकस्मात् तडित् वेगाने ! अेका क्षणामध्ये हा शांत दिसणारा ज्वालामुखी दिग्गजांची कानठाळी बसेल असा कडकडाटाने तडाडकन फुटून दुभग, शतभंग, सहस्रभंग झाला ! शत्रु जिथे पाय ठेवील तिथे त्याचे भस्म. अेक अिंग्रजी अितिहासकार लिहितो की, “ज्यांच्या जिवावर आमची सुरक्षितता अवलंबून होती ते सरकारी नौकरच अेकसमयावच्छेदाने आमच्यावर अेखाद्या नागासारखे अुलटत चालले. फितूर झालेल्या सरकारी नौकरांची यादी देअीन म्हटले तर बंड करून अुठलेल्या विस्तीर्ण प्रदेशातील सरकारी नौकरांची सर्व नांवनिशी मला मागावी लागेल. अपवाद असा तुरळक. त्या सरकारी नौकरांतील अत्यंत प्रमुख काजी अब्दुल कुद्दुस, नॉर्थवेस्टर्न प्रांताचा मुख्य अधिकारी, आग्र्याचा प्रिन्सिपल सदर अमीन, आग्र्याचा मुनसफ, तेथील कोतवाल, दिल्लीचा प्रिन्सिपाल सदर अमीन, कानपूरचा प्रिन्सिपल सदर अमीन, कानपूरचा डेप्युटी कलेक्टर, फत्तेपूरचा डेप्युटी कलेक्टर, ज्याने राबर्ट टकरचा प्राण घेतला, फत्तेपूरचे बाकीचे नेटिव्ह अधिकारी, अलाहाबादचा मुनसफ, त्याच प्रांतातील आणखी अेक मुनसफ; बरेलीचा प्रिन्सिपल सदर अमीन, अलिगडचा डेप्युटी कलेक्टर; J–येथील प्रिन्सिपल सदर अमीन; G येथील प्रिन्सिपल सदर अमीन !! आणि ही यादी अत्यंत अपुरी— केवळ दिग्दर्शनासाठी दिलेली ! ” [१०] असा प्रलयस्फोट कडाडला ! पोलीस बंड करून अुठले. शिपायी बंड करून अुठले ! गावकरी बंड करून अुठले ! अिंग्रजांशी अिमानदारी म्हणजे धर्मद्रोह व देशद्रोह होय अशी अेका निमिषमात्रात जेथे तेथे धर्मसमजूत होअून गेली. जो कोणी अिंग्रजांकडे राहील त्याला भराभर जातिबहिष्कार पडू लागले. त्याचे पंक्तीला कोणी बसणार नाही, त्याला कन्या कोणी देणार नाही, त्याच्या पूजेला ब्राह्मण नाही, त्याच्या चितेला अग्नि देणारा नाही ! सर्वांत अत्यंत अपमानास्पद व अर्थात् शिवी म्हणजे ‘फिरंग्याचा नौकर’ ही होय !

अेक इंग्रजी लेखक म्हणतो, “Revolt had, in consequence swept before it, in many cases, all regard to personal interest and all

१०. Rev. Kennedy M. G. page 43.

attachment to the former master. The imputations of remaining faithful to government, in such circumstances has been intolerable. It is well known that the few sepoys who have remained in our services are deemed out-castes, not only by their comrades but their caste people in general. These even say they cannot venture to go to their homes; for, not only would they be reproached and denied brotherly offices, but their very lives would be in danger." —Rev. Kennedy.

अशी परिस्थिति असल्यामुळे, वरून अगदी शांत भासणारा तो ज्वालामुखी इतका प्रज्वलित झालेला होता की, कोणत्याही क्षणी त्याचा स्फोट व्हावा! क्रांति-दूत आकाशातून भराऱ्या मारीत लवकरच साजऱ्या होणाऱ्या रणसमारंभाला हजर रहाण्याचे निमंत्रण प्रत्येकाला देत होते. त्या आमंत्रणाचा स्वीकार करून, तें पवित्र ध्येय साध्य करण्यासाठी दश दिशांतील युद्धदेवता लगबगीने निघाल्या. रण-वाद्यें, युद्धघोष, समरगर्जना आदि आवश्यक सर्व साधनें योग्य ठिकाणी मांडून मंडप सज्ज करण्यात आला आहे. ज्वालामुखीच्या पार्श्वभागी जुलमाचा कहर निर्भयपणे अुन्मळत आहे, परंतु शांतीचा क्षण जसजसा जवळ येत चालला आणि वरून हिरव्यागार दिसणाऱ्या पर्वताच्या अंतर्भागात जुलमाचा कहर कोसळला त्याबरोबर ज्वालामुखीचा स्फोट झाला! हां आता सावधान, शांतीचा अुद्रेक झाला आहे! शांतीच्या ज्वाला बाहेर पडू लागल्या आहेत.—रक्ताचा वर्षाव होअू लागला आहे—कानठळ्या बसविणाऱ्या किंकाळ्या, तरवारींचा खणखणाट—भुतें बेहोष नाचत आहेत—योद्धे वीर गर्जना करीत आहेत! वरून थंड व हिरवा दिसणारा ज्वालामुखीचा पर्वत दुभंगला—त्याचे शतशः तुकडे अुडले—अरे, हजारो जागी तो पेटून भडकला आहे—सर्व पृथ्वी अग्नीने व तरवारींच्या खणखणाटाने व्यापून टाकली!

काठेवाडातील काही भागात विठरू नावाचा अेक चमत्कारिक जलप्रवाह आहे. त्याचा पृष्ठभाग कठीण भूमीगारसा भासतो. त्यासंबधी माहिती नसलेले तिऱ्हाअीत त्यावर सहज विश्वासाने पाअूल ठेवतात तो वरून कठीण दिसलेला पृष्ठभाग थोडासा हलू लागताच ते तिऱ्हाअीत त्या पृष्ठभागावर अधिक स्थीरपणे अुभे राहण्याचा प्रयत्न करू लागतात. ते असे करतात तोंच तो पृष्ठभाग हलू लागतो व ते गरीब पांथस्थ तिऱ्हाअीत खोल पाण्यात बुडून जातात आणि विठरूप्रमाणेच हा शांतिप्रवाह सर्व हिंदुस्थान व्यापून राहिलेला आहे! वरून दिसणारा काळा रंग पाहून जुलूम करणाऱ्यांना असा भास झाला की, याहीही कुरबूर किंवा तक्रार न करिता अन्याय सहन करील अशा हा देहसीना साधन भूपृष्ठभाग शांत आहे. म्हणून जुलमाने आनंदे पाअूल त्यावर निर्धास्तपणे ठेवले—तोंच काळा पृष्ठभाग हलू लागला! तेव्हा जुलमी जरासा गर्वभराने त्या काळ्या भूपृष्ठावर जोराने पाअूल रोवले! आणि आता लक्षपूर्वक पहा! तो भूपृष्ठभाग सळसळत पहा आणि

तिच्याखाली असलेला लाटांवर लाटा उसळणारा, फेसाळलेला रुधिराचा अमर्याद सागर उफाळून वर आला ! जुलमी अन्याय त्यात बुडून गेला ! जुलमी अन्याया ! तू कोठेही पाऊल टाक, पण कठीण पृष्ठभाग तुला सापडणारच नाही. आता, अंतःकाळी तरी आता तुला कळून येईल की, वरून काळ्या दिसणाऱ्या भूपृष्ठाखाली रक्ताचे—लालभडक रक्ताचे प्रवाह असतात. आणि ऐका कानठळ्या बसविणाऱ्या ज्वालामुखीच्या प्रस्फोटाचे ते प्रचंड आवाज अजून तरी ऐका !

---

# भाग ३ रा

# अग्निकल्लोळ

### प्रकरण पहिलें

## दिल्ली लढते

ता. ११ मे या दिवशी आपलें स्वातंत्र्य घोषित केल्यानंतर दिल्ली शहर
प्रचंड लढ्याची सिद्धता करण्यात व माजलेल्या अंदाधुंदीस शिस्त लावण्यात
होतें. दिल्लीच्या परंपरागत तख्तावर मोंगल बादशहाला बसवून क्रांतिकारक
जे अेक शक्तिकेंद्र निर्माण केलें तें अितकें सामर्थ्यशाली होतें की, त्याच्या पे
नांवाच्या प्रभावानेच लोकांचा स्वातंत्र्यलढा स्थिर झाला. परंतु जुन्या मोंगलां
तख्तारोहण जुनी मोगली सत्ता पुन्हा स्थापण्यासाठी नव्हतें किंवा जुन्या रानटी
परा चालविण्यासाठीही नव्हतें. हिंदुस्थानच्या बादशाही पदावर म्हातार्‍या बहा
शहारा बसविणें म्हणजे संकुचित अर्थानें जरी परंपरागत तख्तावर त्याला स्था
करणें असे भासत असलें तरी विशाल अर्थानें व सत्यार्थानें तशा प्रकारचें तें आरो
नव्हतें! जुनी मोंगली राजसत्ता काही या देशातील लोकांनी आपण होअून निव
नव्हती; तर हिंदुस्थानावर जेतेपणाच्या भावनेने व आक्रमक वृत्तीने नि स्वाभिम
शून्य देशद्रोही कारवायांमुळे ती मोंगलीसत्ता बळाने लादली गेलेली होती. बहा
शहाला आज काही अशा बळाने बादशाही पदावर आरूढ केले नव्हते, नव्हे
करणें अशक्यच होतें, कारण अशी सिंहासनें जिंकावीं लागतात—तीं स्वागत
मानलीं जात नाहीत. तसें करणें आत्मघातकच ठरलें असतें, कारण तसें करणें म्हा
गेलीं तीन चार शतकें ज्या हिंदु शहीदांनी—हुतात्म्यांनी आपल्या स्वातंत्र्यार्थ र
सांडलेले होतें ते व्यर्थ गेलें असे ठरलें असते. अरबस्तानातील रानटी टोळ्य
अिस्लामचा स्वीकार करताच त्या आक्रमक वृत्तीने पूर्वेस व पश्चिमेस आक्रमणें क
प्रदेश पादाक्रांत करीत सुटल्या. त्याना प्रतिकार असा कोठेच झाला नाही, त्या
देशामागून देश, मानव जातीमागून अनेक मानव जाति जबरदस्तीने मुसल
करीत अिस्लामी सत्ता दौडत चालली. या अविरोध वावटळीला पहिल्या प्रथ
कोणतीही तडजोड न करता महान् पराक्रमाने व निर्भय निश्चयाने कोणी वि

या परकीय आक्रमकांशी स्वतःच्या जन्मसिद्ध अधिकारासाठी हिंदूंनी पांच शतकाहून अधिक वर्षें संरक्षणात्मक युद्ध चालू ठेवलेलें होतें. पृथ्वीराजाच्या मृत्यूपासून औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत तहांचीं–संधींची क्षमा न याचतां युद्धामागून युद्ध चाललें, आणि असंख्य वर्षें चाललेल्या या देदीप्यमान झुंजीत भारताच्या पश्चिम घाटांत सह्याद्रीवर अेका नवीन शक्तीचा उदय होऊन, आपल्या जातीच्या मानरक्षणासाठीं ज्या सहस्रावधि हिंदूंनी प्राणत्याग केला, त्या मानाची परिपूर्तता करण्याचें कंकण त्या नव्या हिंदु सत्तेनें हातीं बांधलें. पुण्याहून अेक हिंदुवीर भाऊसाहेब पेशवे समर्थ सैन्यासह आक्रमण करीत बाहेर पडून त्यांनीं दिल्लीचें तख्त – सिंहासन – बळकावलें आणि हिंदु संस्कृतीला लागलेला पारतंत्र्याचा कलंक धुऊन टाकला. जेताच जिंकला गेला आणि हिंदुस्थान गुलामगिरी झुगारून देऊन व पराजय पुसून टाकून पुन्हा स्वतंत्र झाला. हिंदूंच्या भूमीचे हिंदुच पुन्हा मालक झाले–धनी झाले !

म्हणून अगदीं खऱ्या अर्थानें बोलावयाचें झाल्यास तर आम्ही असें म्हणतो कीं, हिंदुस्थानच्या तख्तावर–सिंहासनावर बहादुरशहाला जें बसविलें गेलें ती जुन्या मोगली सत्तेची पुनःस्थापना नव्हती. परंतु दीर्घकालपर्यंत या देशांत जें हिंदु मुसलमान यांच्यामध्यें अेक प्रकारें युद्ध चालू होतें तें युद्ध संपल्याच्या घोषणेचें प्रतीक, जुलूम–अत्याचार संपुष्टांत आल्याची निशाणी, या देशाच्या मातींतच जन्मलेल्या देशबांधवांना आपला राजा कोण असावा हें निवडण्याचें स्वातंत्र्य या सर्वांचें प्रतीक म्हणून तें राज्यारोहण होतें. कारण हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही जमातींनी, नागरिकांनी, सैन्यानें अेकमतानें बहादुरशहास बादशाही तख्तावर ह्या वेळीं आरूढ केलेलें होतें व या स्वातंत्र्यसमराचें नेतृत्वही त्यालाच दिलेलें होतें. म्हणून ता. ११ मेला दिल्लीच्या सिंहासनावर बहादुरशहानें जें आरोहण केलें तें जुन्या मोंगली परंपरेतील अकबर किंवा औरंगजेबाप्रमाणें आरोहण नव्हतें – कारण तें मोंगली तख्त वीर मराठे बहादुरांच्या हातोड्याच्या घावांनीं केव्हांच छिन्नविच्छिन्न झालेलें होतें – परंतु परकीय आक्रमकांशीं स्वातंत्र्याचें युद्ध चालविण्यासाठीं लोकांनीं त्याला राजा म्हणून निवडलेलें होतें. म्हणून आतां हिंदु मुसलमान जनतेनें खऱ्या जाणिवेनें मनःपूर्वक आणि निष्ठापूर्वक ता. ११ मे १८५७ या दिवशीं आपल्या मातृभूमीच्या बादशाही पदावर बसविलेल्या बहादुरशहास सर्वांनीं मानवंदना देण्यास पुढें यावें अशी द्वाही फिरविण्यात आली.

या द्वाहीप्रमाणें जवळच्या व दूरच्या स्थानाहून, अनेक राजाकडून, अनेक सैनिकी पथकाकडून व हिंदुस्थानांतील अनेक प्रमुख शहरांतून – नगरांतून दिल्लीच्या राजाकडे नजराणे (भेटी) येऊं लागले. पंजाबमधील ब्रिटिशांविरुद्ध अुठाव केलेल्या नेटिव्ह शिपायांच्या पलटणी अयोध्या, नीमच, रोहिलखंड आणि अन्यत्र ठिकाणचे बंडवाले आपापले ध्वज व पताका घेऊन दिल्लीकडे चालू लागले व क्रांतीचें धुरीणत्व स्वीकारलेल्या बहादुरशहाशीं आपली निष्ठा व्यक्त करूं लागले. अनेक सैनिकी

पथकांनी दिल्लीकडे येत असता वाटेने त्यांनी अिंग्रजी खजिने लुटलेले होते ती संपत्ति त्यांनी बादशहाच्या कोषागारात–खजिन्यात प्रामाणिकपणे भरणा केली. अितकी सालकृत सिद्धता होताच सर्व हिंदुस्थान देशाला अुद्देशून अेक घोषणापत्र–जाहीरनामा प्रसिद्ध करण्यात येअून त्यात प्रकटपणे घोषित केलें की, " अित.पर परकीयाचें साम्राज्य व फिरंग्यांच्या राजसत्तेचा अंत झालेला आहे व सर्व देश आता स्वतंत्र व परदास्यमुक्त झाला आहे. प्रारंभीच अितकी यशस्वी ठरलेली ही क्रांति पूर्ण करण्यासाठी, प्रत्येकाने या क्रांतियुद्धात आपलें अेक अीश्वरी कर्तव्य म्हणून, खोटा व्यक्तिविषयक अभिमान विसरून, दैवी प्रेरणेने सहभागी व्हावें असे आवाहन लोकाना करण्यात आलें. त्यात म्हटले आहे की, "प्रत्येकाने हें ध्यानात घ्यावें की, आपली ही अुठावणी केवळ स्वधर्मरक्षणासाठीच आहे, दुसरें कोणतेंही आमिष त्यामागे नाही. ज्यांना ज्याना परमेश्वराकडून निश्चय व अिच्छाशक्तीचें वरदान मिळालें असेल त्या सर्वांनी अैहिक लाभाची व क्षणभंगुर देहाची आशा सोडून आपल्या प्राचीन धर्माचें रक्षण करण्यासाठीं आमच्याशीं सहकार्य करावें. सार्वजनिक हितासाठी लोकांनी स्वार्थाला तिलांजलि द्यायचें ठरविलें तर ह्या आपल्या पवित्र भूमीवर अेकही अिंग्रजी मनुष्य राहू शकणार नाही. प्रत्येकानें हें ध्यानात ठेवावें की, आपल्या आयुष्याची दोरी तुटल्याशिवाय कोणीही मरत नाही आणि जेव्हा काळाची घडी पडते तेव्हा कोणीही आपले प्राण वाचवू शकत नाही. पटकीच्या साथीने व अितर अनेक रोगांनी माणसे मरत असतात, पण स्वधर्मयुद्धात प्राण अर्पण करणारा शहीद होतो–हुतात्मा होतो. आणि म्हणून हिंदुस्थानच्या पवित्र भूमीवरून प्रत्येक फिरंग्यास हाकलून देणे किंवा त्याला ठार मारणें हें प्रत्येक स्त्रीपुरुषाचें पवित्र कर्तव्य आहे. अैहिक लाभाची कोणतीही आशा न धरता जे धार्मिक कर्तव्यभावनेने प्रेरित झालेले असतील त्यांनी आम्हांला येअून मिळावें."

वरील अुतारे येळोवेळी अयोध्या व दिल्ली येथून समानार्थाने जे जाहिरनामे –(घोषणापत्रें) प्रसिद्ध केले गेले होते त्यांतूनच घेतलेले आहेत. आणखी अेक जाहिरनामा स्वुद्द दिल्लीच्या बादशहाने प्रसिद्ध केलेला होता व त्याची प्रसिद्धि सर्व हिंदुस्थानभर मोठ्या प्रमाणावर झालेली होती. देशाच्या अगदी दक्षिण टोकापर्यंत त्याच्या प्रती हातोहात बाजारातून व सैन्यातसुद्धा पोचलेल्या होत्या. त्यात म्हटले होतें, "हे हिंदु व मुसलमान बांधवहो! आपले पवित्र धार्मिक कर्तव्य पार पाडण्यासाठी आम्ही जनतेशी हातमिळवणी केली आहे. अशा वेळी कोणी भित्रेपणा दाखवील किंवा कोणी अिंग्लिशांच्या फसव्या आश्वासनावर विश्वास ठेवील त्याच्या तोंडाला थोड्याच काळात काळें फासले जाअील आणि अिंग्लंडचें स्वामित्व पत्करून त्याच्याशी मैत्री जोडणाऱ्या लखनौच्या नबाबाला जशी शिक्षा मिळाली तशीच त्यांनाही मिळेल. म्हणून ह्यापुढे सर्व हिंदु व मुसलमानांनी ह्या अिंग्रजांशी चाललेल्या झगड्यात अेकत्र येअून आणि आपल्या कोणत्याही आदरणीय नेत्याच्या धोरणाने वागण्यास

सिद्ध व्हावें. अशा प्रकारें देशात शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्यास आम्हांस साहाय्य करा. गरीब लोकांना संतुष्ट ठेवण्यास झटा व त्यांना वरचे अधिकार नि प्रतिष्ठा प्राप्त करण्याची संधि द्या. ज्यांना ज्यांना शक्य होईल त्यांनी त्यांनी हा जाहीरनाम्याच्या प्रती करून गांवातील शहरवाच्या स्थानी त्या चिकटाव्या. असें करताना योग्य ते शहाणपण वापरून आणि पकडले जाऊ नये याची दक्षता घ्यावी आणि त्याचा प्रचार होवो न होवो तोंच आपापल्या तरवारी उपसून फिरंग्यावर प्रहार करावा !"

अिंग्रजी सत्तेविरुद्ध स्वातंत्र्ययुद्ध पुकारताच थोड्याच अवधींत तें युद्ध चालू ठेवण्यासाठी दिल्लीच्या क्रांतिकारकांनी शस्त्रास्त्रें व दारुगोळ्याची निर्मिति करण्यास प्रारंभ केला. तोफा, बदुका व छोटीं हत्यारें बनविण्यासाठी अेक मोठा कारखाना चालू करण्यात आला आणि या शस्त्रास्त्र निर्मितीवर देखरेख ठेवण्यासाठी काही फ्रेंचांना नोकरीवर ठेवून घेतले. दारुगोळा ठेवण्यासाठी दोन तीन मोठाली गुदामें बाधण्यात आली आणि रात्रंदिवस काम चालू ठेवून कामगारांकडून भरपूर दारुगोळा निर्माण करण्याची सोय केली. सर्व देशभर कायद्याने – निर्बंधाने – गोवधास बंदी करण्यात आली आणि अेकदा काही माथेफिरू मुसलमानांनी हिंदूंचाच अपमान करण्यासाठी त्याचे विरुद्ध जिहादची घोषणा केली तेव्हा त्या वृद्ध बादशहाने आपल्या लवाजम्यासुद्धा हत्तीवर बसून सर्व शहरातून अेक भव्य मिरवणूक काढून असे जाहीर केले – प्रकट केले की आपला हा जिहाद केवळ परकीय फिरंग्याविरुद्ध आहे, हिंदू विरुद्ध नाही! जो कोणी गाअीचा वध करणारा आढळेल त्याला तोफेच्या तोंडी देण्यात येअील किंवा त्याचा हात छाटला जाअील ! निरनिराळ्या शिपायांच्या रेजिमेंटस्ना – पथकाना राजवाड्यातील निरनिराळ्या राजपुत्रांची नांवे देण्यात आलीं. अिंग्रजी राजसत्तेविरुद्ध क्रांतिकारकांच्या बाजूने लढणारे काही युरोपियन सुद्धा आढळून येत.

बुंदेल की सराअीच्या लढाअीनंतर अिंग्रजी सैन्याला पुढील सैनिकी हालचाली करण्यास अतिशय सोअिस्कर ठाणी मिळालेली होती. दिल्लीच्या तटबंदीच्या जवळ जवळ अेका टोकापर्यंत येअून पोचलेली आणि यमुना नदीच्या पुढे चार मैलपर्यंत दूर पसरलेली टेकड्याची रांग – अिंग्रज जिला Ridge म्हणतात – त्या टेकड्याचा नैसर्गिक अुंचवटा युद्धाच्या दृष्टीने फारच लाभदायक होणारा होता आसपासच्या सपाट प्रदेशापेक्षा हा अुंचवट्याचा भाग ५०–६० फूट अुंच असल्यामुळे त्यावरून तोफांचा सतत व परिणामकारक मारा करण्यास त्या स्थानाचा चांगला अुपयोग होणारा होता. पुन्हा ह्या अुंचवट्याच्या प्रदेशामागून लगतच यमुनेचा अेक रुंद कालवा वहात असून त्यावर्षी जोराचा पाअूस पडल्यामुळे जून महिन्यात सुद्धा त्या कालव्यात भरपूर पाणी होते. तो कालवा पाठीमागच्या बाजूस असल्याने अिंग्लिशांच्या शत्रूपासूनही त्या कालव्यास धोका पोचण्याचा संभव नव्हता. मात्र, समोरच्या बाजूने

दिल्लीतून क्रांतीकारकांकडून जशा प्रकारचे हल्ले होत असत, तशाच प्रकारे मागच्या बाजूने पंजाबकडूनही अिंग्लिशांवर जर हल्ले झाले असते तर मात्र अिंग्लिशांची धडगत नव्हती; अिंग्लिशांच्या सुदैवाने पंजाबने त्यांच्या बाजूनेच लढण्याचें ठरविलें. नाभा, झिंद व पतियाळाच्या राजांनी पंजाबकडील राजमार्गाचें संरक्षण करून अिंग्लिशांची बहुमोल सेवा बजावली व अशा प्रकारे अिंग्लिशांना धान्य, माणसे व दारुगोळा यांचा भरपूर पुरवठा बिनधोक होऊ शकला. ही सर्व घटना अशा प्रकारे जुळून आल्याने, हिंदुस्थानच्या दुर्दैवाने अिंग्लिशांना अत्यंत अनुकूल अशी परिस्थिति मिळाली. दिल्लीवर मारा होऊ शकेल असा अुचवटा, शत्रूच्या माऱ्यापासून सुरक्षित राहील असा अिंग्लिश सैन्याच्या तळाला मिळालेला सपाट प्रदेश, शत्रूच्या हेरांनाही प्रवेश मिळू शकणार नाही अशी तटबंदी, जवळच ताजे व भरपूर पाणी मिळण्याची सोय, पंजाबकडून येणारे मोठे रस्ते — मार्ग निष्ठावान् संस्थानिकांनी पदरच्या भाकरी खाऊन सुरक्षित आणि खुले ठेवलेले, अित्यादि सर्व अनुकूल परिस्थितीने ब्रिटिश कमांडर बर्नार्ड व त्याच्या हाताखालील अधिकारी यांचा आत्मविश्वास वाढला व ते गर्वभराने म्हणू लागले की, "आता दिल्ली जिंकायला अेक दिवसही लागणार नाही!"

आणि मग जी दिल्ली जिंकणें हें अेक दिवसाचेही काम नाही त्याला दोन दिवस कशाला थांबा? आता ह्याच क्षणाला तें पापी व देशद्रोही शहर–नगर चोहोबाजूनी चढाओी करून धुळीस मिळवून टाकण्याची आज्ञा आपण आपल्या अिंग्रजी शिपायांस का देऊ नये? पंजाब हा आपल्या सैन्याचा पाठीचा कणा आहे व तो स्वामिनिष्ठेने आपल्या पाठीशी असताना दिल्ली जिंकण्यासाठी दीर्घकाळ वेढा घालून बसण्याचा दुर्बलांचा मार्ग कशाला अनुसरावयाचा? त्या नादान शहरावर सरळ चढाओी करून अेका धडाक्यातच तें भुओीसपाट करून टाकणें अधिक शहाणपणाचें नाही का? आता आपल्या सैन्याचे दोन भाग करून अेका भागाने लाहोर वेशीवर चढाओी करून जावे तर दुसऱ्या भागाने काबूल वेस अुद्ध्वस्त करावी आणि बाकीच्या सर्वांनी अेकाच वेळी दिल्लीत घुसून वाटेतील सर्व ठाणीं अेका पाठोपाठ जिंकीत, वाटेत अेका क्षणाचीही अुसंत न घेता थेट राजवाड्यावरच चढाओी करावी! विल्बर फोर्स, ग्रेटहेड व हॉडसन यांच्यासारखे वीराग्रणी असली साहसी व धडाकेबंद चढाओी करण्यास फार आतुर झालेले असून ती विजयी करण्याची जबाबदारी–(दायित्व) त्यांनी स्वीकारली आहे. मग आता वाट कशाची पहाता? त्याप्रमाणे ता. १२ जूनला जनरल बर्नार्डने चढाओी करण्याची गुप्त आज्ञा सोडली. कोणी जमवाजमव करावयाची, कुठे जमावयाचें, रात्रीच्या काळोखात तुकड्यांनी कुठून व केव्हा निघावें, डावी अुजवीचे नेतृत्व कोणी कोणी करावें, हे सर्व बेत आधीच ठरविलेले होते. या सर्व अितर चढाओीच्या योजना निश्चित करण्यात आल्या आणि आता पहाटे दोन वाजता अिंग्रजी सैन्य पूर्वी ठरविलेल्या

रेड मैदानावर गोळा होऊं लागलें. अुद्या रात्री आपल्याला बादशाही राजवाड्यातच ोगाश्रयास मिळण्याची त्यांनी खात्री असल्याने आज रात्री आपणांस झोप मिळणार ाही अशी कुरकूर करण्याशिवाय ते काही मूर्ख थोडेच होते ? निश्चयाने असंभवनीय ण अिंग्रजांच्या दुर्दैवाने अंत मोक्याच्या वेळी त्यांच्या सैन्याला काही विभाग पत्ता झाल्याचें आढळून आलें. अशा धोकादायक स्थितीत दिल्लीवर चढाओी करणें ुतावीळपणाचे होअील असें ब्रिगेडियर ग्रेव्हज़ला वाटलें आणि अितर काही अधि-ाऱ्यांनीही असें सुचविलें की अशी अुतावळी सर्व हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेला ारक ठरेल. म्हणून सरळ चढाओीची व झटपट विजयाची ब्रिटिश सैन्यास जीं स्वप्नें पडत होतीं तीं दिल्लीच्या राजवाड्यात खरीं न ठरता, त्या रात्री आपल्या ळावरील बिछान्यातच विरून गेलीं !

दुसऱ्या दिवशी सकाळी विल्बरफोर्स व ग्रेटहेड यांनी पुढील चढाओीची योजना आखून ती सेनापति बर्नार्ड याच्या विचारासाठी त्याचेकडे धाडली. सेनापति बर्नार्ड हा क्रिमियन युद्धात अेक नामांकित योद्धा म्हणून गाजलेला होता. परंतु या वेळी मात्र तो फार घिम्मा व कचखाअू वृत्तीचा होता असी शंका येते. ता. १४ जूनला त्याने युद्धमंडळाची, वॉर कौन्सिलची बैठक भरवून आपल्या अधिकाऱ्यांशी हल्ल्याच्या विषयावर विचारविनिमय केला. हल्ल्याच्या योजनेचें जोरदार भाषेत ग्रेटहेडने समर्थन केलें असताही अितर अधिकाऱ्यांना विजयाची खात्री वाटेना, आणि त्यापुढे जाअून त्यांनी असेंही प्रतिपादन केलें की, जरी हल्ला करून आपणांस विजय मिळाला तरी त्यामध्ये प्रत्यक्ष पराभवाअितकीच आपल्या शक्तीची व प्रतिष्ठेची हानि होणारी आहे. सरळ चढाओी करून दिल्ली जिंकली तरी तिचें रक्षण कसें करावयाचें ? रस्त्यारस्त्यांतून व घराघरांतून छुप्या बंडवाल्यांच्याकडून होणाऱ्या सततच्या गोळीबारातून किती अिंग्रज सोजीर वाचू शकतील ? याविषयी स्वतःचें असें ठाम मत बर्नार्डलाही सांगता येअीना ! या सर्व चर्चेनंतर चढाओीविषयी भिन्न मत होण्यातच त्या युद्धमंडळाचें अेकमत झालें ! आणि अशा प्रकारे १२ जूनला त्यांना पडलेल्या रात्रिस्वप्नाप्रमाणेच ता. १५ जूनलाही चढाओीचे वेत सोडून देअून तात्त्विक मतें मात्र पक्की धरून त्याची दिवास्वप्नेंही हवेत विरून गेली. ता. १६ जूनला युद्धमंडळाची बैठक पुन्हा भरली. पण मतभिन्नता होण्यात व मनोधैर्य खचण्यातच तिचा शेवट झाला.

कारण अिंग्रजी अधिकारी अेकीकडे जोरदार व सरळ चढाओीच्या योजना आखीत होते त्याच वेळी दुसरीकडे दिल्ली शहरात नव्या तरुण रक्ताची, नवीन खजिन्याची-संपत्तीची. व नवीन अुत्साहाची भर पडत होती. आणि क्रांतिकारकांनी आजवर अवलंबिलेलें केवळ संरक्षणात्मक बचावाचें धोरण टाकून देअून प्रसंगी आक्रमणाच्या धोरणाचा अवलंब करून भिन्न भिन्न ठिकाणी अधून मधून ब्रिटिश सैन्यावर छापे घातले व प्रसंगी त्यात त्यांना यशही मिळालें. सर्व हिंदुस्थानभर ज्या

शिपायांनी ब्रिटिशांविरुद्ध उठावणी केल्या होत्या त्या शिपायांची, त्यांनी आपल्या बरोबर आणलेले खजिने, शस्त्रास्त्रें व दारुगोळा यांसह दिल्लीमध्ये अेकसारखी रीघ लागलेली होती. यामुळे क्रांतिकारकांना युद्धसामग्रीची किंवा लढाऊ शिपायांची वाणच भासत नव्हती. आणि अशा परिस्थितीत साहजिकपणे त्यांनी आक्रमक धोरण अवलंबिले आणि अिंग्रजी सैन्याला अेक पाऊलही पुढे टाकू दिलें नाही. मध्येच अेखादा धाडसी हल्ला शत्रूवर करावा, लहानमोठ्या चकमकींत शत्रूचें थोडें फार रक्त सांडावें व स्वतःची फारशी हानि होऊ न देता शहरात परत यावें, असें शत्रूला सतावणारें धोरण क्रांतिकारकांनी स्वीकारल्यामुळे अिंग्रजी सैन्यावर त्यांनी आपली दहशत बसविली व त्याना आक्रमक धोरण सोडण्यास भाग पाडलें! ता. १२ जूनला काही क्रांतिकारक शहराबाहेर पडले, झाडाझुडपांच्या व खाचखळग्यांच्या आश्रयाने अिंग्रजांच्या आघाडीचा भेद करुन ५० यार्डांहून अधिक आत घुसले आणि अिंग्रजाना चाहूल लागण्यापूर्वीच त्यानी त्यांचेवर हल्ला चढविला. अिंग्रजी तोफखान्या-वरचे बरेच लोक गारद झाले आणि अेका शिपायाने अचूक गोळी झाडून नॉक्सला ठार केले. त्यान वेळी क्रांतिकारकांच्या दुसऱ्या तुकडीने अिंग्रजांच्या पिछाडीवरही हल्ला चढविला. तेथे त्यांना मोठ्या प्रतिकारास तोंड द्यावें लागलें. 'हिंदुरावाचें घर' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अिंग्रजी सैन्याच्या अुजव्या बगलेवरही शिपायांनी मोठी जोराची चढाओ केली. "ज्यांच्या राजनिष्ठेवर अिंग्रजांचा पूर्ण विश्वास होता अशी नेटिव्ह पायदळाची अेक तुकडी शत्रूवर चालून गेली. पण त्यांनी विश्वासघात केलेला अुघड होताच त्यांच्या पुढील हालचाली अितक्या जलद घडून आल्या की, आम्ही त्यांच्यावर गोळीबार चालू केला असताही ते त्यातून सुखरूपपणे पसार झाले." [१] त्या ठिकाणी नेमण्यात आलेला मेजर रीड म्हणतो की, "ते शिपाओ जणू काही शत्रूवर चढाओ करण्यास चालले आहेत असें वाटत होतें पण शत्रूशी भिडताच ते त्यानाच जाअून मिळून त्याचेबरोबर चालू लागल्यामुळे मला धडकीच भरली मी हें पाहताच त्यांचेवर तोफा डागण्याचा हुकूम सोडला. पण तेवढ्या अवकाशात ते विश्वासघातकी अितके दूर गेले होते की त्यांच्यापैकी फारतर पाच सहाच शिपाओ मारले गेले असावेत असें मला वाटतें"

ह्या हल्ल्यानंतर बडवाले शत्रूवर हल्ला करण्यासाठी शहराबाहेर पडत आहेत हें प्रत्येक दिवस पाहू लागला आणि हल्ला संपवून शहरात ते परत येत आहेत हें प्रत्येक सध्याकाळ पाहू लागली. शिपायांचे जें जे पथक बडवाल्याना मिळण्यासाठी दिल्लीत प्रवेश करी तें ते पथक लगेच दुसऱ्या दिवशी बाहेर पडून शत्रूवर धाड घालण्यास बाहेर पडे. ता. १३ जूनला हिंदुरावाच्या घरावर पुन्हा हल्ला करण्यात आला. ता. १२-ला बडवाल्यांना जी ६०-वी रेजिमेंट मेरठून मिळाली होती तिनेच

१. Kaye's Indian Mutiny, Vol. II, page 411.

हा हल्ला चढविलेला होता. मेजर रीड लिहितो की, "ग्रँड ट्रंक या मार्गाविरुन ते शिपाअी सरळ मुकद्दमांनी ममल्न भर्तीत येत होते. त्या पलटणीने नैपण सरदार बहादुर याने येले होते. आपल्या डाव्या बगलेवर यळण्याचा त्यांचा हेतु असल्याने आपल्या लोकांस मागे राहण्यास सांगून तो स्वतः आघाडीवर राहत असे. त्या दिवशी ते शिपाअी शिवावर युदार होअून लढत होते. परंतु सरदार बहादुर त्याचा ऑर्डर्ली लालसिंग याजकडूनच मारला गेला. त्याच्या छातीवरील हिंदुस्थानी सैन्याची निशाणीची पीन काढून घेअून ती त्याने माझ्या मालकाकडे पाठवून दिली."
ता. १७ जूनला हिंदी सैन्याने अिदगा अिमारतीवर तोफांचे मोर्चे बांधण्याचा प्रयत्न केला. कारण येथून अिंग्रजांच्या रिजवर–आघाडीवर चांगला भडिमार करता आला असता. हे पाहताच मेजर रीड व हेन्री टॉम्ब यांनी बंडवाल्यांवर दोन्ही बाजूंनी हल्ला चढविला व प्रतिकार होअू शकणार नाही अशा नक्शीने त्यांची कोंडी करण्याचा प्रयत्न केला. पण अिदगा अिमारतीत कोंडले गेलेले ते मूठभर बंडवाले काही मुळीच शरण गेले नाहीत. जेव्हा त्यांच्याजवळचा दारुगोळा संपला तेव्हा त्यांनी बंदुका फेकून देअून आपल्या तरवारी अुपसल्या व आपल्या ब्रिटिश शत्रूवर ते प्राणपणाने तुटून पडले. आपला शेवटचा सैनिक आपापल्या जागी लढाअी देत मरेपर्यंत त्यांनी अिदगा घरात शत्रूला प्रवेश करू दिला नाही!!

ता. १८ जूनला नसिराबादला सुटावणी केलेले शिपाअी दिल्लीला येअून पोचले आणि आपल्याबरोबर आणलेला खजिना त्यांनी शाही अधिकाऱ्याचे स्वाधीन केला; त्याच्या प्रतिनिधींनी बादशहाने आपल्या राजवाड्यात स्वागत केले व त्यांचा योग्य तो आदर व मानमरातब ठेवला. भर दरबारात त्या पलटणीतील शिपायांच्या प्रतिनिधींनी ता. २०ला अिंग्रजी सैन्यावर हल्ला करण्याच्या शपथा घेतल्या. ठरल्याप्रमाणे २० जूनला सकाळी, शत्रूवर चढाअी करून जाण्यासाठी बंडवाल्यांच्या सेना शहराच्या वेशीतून बाहेर पडलेल्या दिसल्या. अिंग्लिशांच्या तळावर पिछाडीच्या बाजूने हल्ला करण्याच्या हेतूने शिपाअी सब्जीमंडीमधून लपत-छपत चालले व अिंग्लिशांना कल्पना येण्यापूर्वीच त्याचेवर अचानक गोळ्यांचा वर्षाव चालू केला व अिंग्रजांवर जोराची चाल केली. स्कॉट, मनी, टोम्ब्स् आणि अितर अिंग्रज अधिकाऱ्यांनी तोफखान्याचा भडिमार करून ही चढाअी थांबविण्याचा प्रयत्न केला; परंतु हिंदी सैन्य अितक्या चिकाटीने चढाअी करीत होते की, त्यांचा प्रतिकार करणें कठीण होतें. नसिराबादच्या त्या पलटणीने चढविलेला हल्ला अितका प्रभावी व भयानक होता की, शूरवीर टोम्ब्स् हाही अगदी रडकुंडीस येअून ओरडला, "धाव, डॅली धाव! नाहीतर माझ्या तोफा शत्रूच्या हातीं पडल्याच म्हणून समज!" पंजाबी नेटिव्ह शिपायांसह डॅली धावूनही आला, पण थोड्याच वेळात बंडवाल्यांकडून झाडलेल्या अेका गोळीने त्याच्या खांद्याला जखम झाल्याने त्याला मागे फिरावें लागले. मध्याकाळ होत आली व शिपायांची सरशी झाल्याचें



१८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धाचें रणशिंग फुंकणारे दिल्लीचे
बादशहा बहादुरशहा व बेगम झिनतमहल



१८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धाचे सूत्रधार
श्रीमंत नानासाहेब पेशवे

स्पष्ट दिसत होतें. त्यांनी पुन्हा चढाओी केली आणि ब्रिटिशांच्या तोफा जवळ जवळ हस्तगत केल्या. ९-वी भालाओीत (Lancer) तुकडी व राजनिष्ठ पंजाबी फौज पुन:पुन्हा पुढे घुसण्याचा प्रयत्न करीत आणि पराभव पावून मागे हटत. रात्र पडली तरी लढाओीचा रंग अधिकच भीषण होत होता. अिंग्लिशांनीही पराक्रमाची शर्थ केली तरी आपल्या तोफा वाचविण्यापलीकडे त्यांना काही करता आलें नाही. लॉर्ड रॉबर्टस् लिहितो : "बंडवाल्यांनी आमची दाणादाण अुडविली." (The mutineers routed us.) होप ग्रँटच्या मांडीखालचा घोडा ठार झाला, तो स्वत:ही भयंकर घायाळ झाला व त्याचे बाजूमच राजनिष्ठ मुसलमान घोडेस्वार अुभा नसता तर तो क्षणार्धात ठार झाला असता. मध्यरात्रीपर्यंत अशा झटापटी चालू राहिल्या, परंतु शिपायांच्या चढाओीला अटकाव करणे अशक्य झाल्याने शेवटी अिंग्लिशानी युद्धक्षेत्रातून गाघार घेतली व ब्रिटिश तळाच्या पिछाडीवरील अेक प्रमुख ठाणें बंडवाल्याच्या हाती पडले.

त्या रात्री ब्रिटिश कमांडरला चिंतेमुळे झोप येणें शक्यच नव्हतें. क्रांतिकारकांनी पराक्रमाची शर्थ करून जिंकून घेतलेले ठाणे त्यांच्या ताब्यात राहिले असते तर ब्रिटिशांचें पंजाबकडील दळणवळण तुटलें असतें. हें संकट टाळण्यासाठी त्या विजयी स्वदेशी सैन्याला प्रतिकार करण्याच्या सिद्धतेला ब्रिटिशांनी भल्या पहाटेपासूनच सुरवात केली. परंतु दारुगोळ्याच्या अभावी व सैन्याची अधिक मदत मिळविण्यासाठी ते शिपाओी शहरात परतले होते, त्यामुळे ब्रिटिशांना गोडावे लागलेले ठाणें पुन्हा व्यापताही आलें. या लढाओीतील विजयाची व शिपायांनी मारलेल्या मुसंडीची बातमी अैकून दिल्लीवासीयांचा अुत्साह वाढला आणि त्या अुत्साहाच्या भरात किल्ल्याच्या तटावर त्यांनी लाव पल्ल्याची तोफही चढवून तीमधून ब्रिटिश सैन्यावर सतत गोळ्याचा भडिमार चालू केला. दिल्लीतील सैन्याच्या या प्रभावी आक्रमक धोरणामुळे ब्रिटिश सैन्याच्या चढाओीला पायबंद बसला व आपलें संरक्षण कसें करता येओील या चिंतेनेच त्यांना व्यग्र व्हावें लागलें. आपल्या ताब्यात असलेलीं ठाणी कशीं टिकवावीत या चिंतेत असलेल्या अिंग्लिशांना पंजाबमधून नवीन कुमक मिळाल्याशिवाय अेक पाअूलही चढाओी करणें अशक्य होअून बसलें आणि अशा अडचणीत भर पडण्यासाठीच की काय—ता. २३ जून १८५७-चा दिवस अुजाडला !

२३ जून १८५७ हाच प्लासीच्या लढाओीचा शतसावत्सारिक दिवस होय ! शंभर वर्षापूर्वी बरोबर याच दिवशी साम्राज्यसत्तेच्या जुगारात प्लासीच्या रणक्षेत्रावर हिंदुस्थानचा फासा दुर्दैवाने अुलटा पडला. नवीन नवीन अपमानात नवीन नवीन मानहानीत भर पडत पडत शंभर वर्षे अुलटलीं. त्या शंभर वर्षात साठलेल्या अपमानांचे अुट्टे काढावे, राष्ट्राचा अपमान धुवून काढावा व राष्ट्राची चालतेली विटंबना रक्तपाताने पुसून टाकावी अशा ब्रिटिशांवर भयानक सूड

धुर्गविस्ताच्या लालसेने दिल्ली शहरातील सर्व शिपायांचे डोळे जणू काही आग ओकू लागले. धान्याच्या प्रत्येक मूठपेतून, सूर्याच्या प्रत्येक किरणातून, तोफेच्या धुमधडाक्याच्या गर्जनेतून, व तरवारीच्या प्रत्येक खणखणाटातून 'प्लासीचा सूड! प्लासीचा सूड!' असा अेकच घनघोर ध्वनि घुमत होता! प्लासीच्या दुःखदायक रणक्षेत्राचा हा शतसांवत्सरिक दिवस अुजाडतान क्रांतिकारकांच्या तुकड्या शहराच्या लाहोर वेशीतून बाहेर पडू लागल्या. अिंग्लिशानाही ह्या दिवशी आपणाला ज्या भयानक संकटाला तोंड द्यावे लागणार आहे, त्याची पुरेपूर जाणीव होती व म्हणून तेही रात्रीपासूनच युद्धाच्या सिद्धतेत गर्क होते व त्यांनी आपला सैनिकी व्यूह पुरा रचून ठेवला. अितकेच नाही तर या भयानक संकटाची जाणीव त्यांना आधीपूर्वीच झाल्याने त्यांनी काही दिवसांपूर्वीच पंजाब सरकारकडे सैन्याची कुमक मागविली होती आणि त्यांच्या सुदैवाने पहाटेसच नवी सेना येअून पोचली. पंजाबहून नवे सैन्य आल्याच्या बातमीसरशी अिंग्लिशांना अेकदम मनस्वी आत्मविश्वास वाटू लागला. अिंग्लिशाना सैन्याची नवीन कुमक मिळाली ही, बातमी असो किंवा अिंग्लिशानी आपल्या पिछाडीचा अेक पूल अुडवून दिल्याची बातमी असो, क्रांतिकारकांच्या अुत्साहावर त्याचा काहीही परिणाम घडून आला नाही. सब्जीमंडीमधून ते सरळ पुढे घुसले व ब्रिटिशावर बंदुकांच्या गोळ्यांचा मारा करू लागले. ब्रिटिश पायदळाने हल्ल्यामागून हल्ले चढविले; पण ते जसे पुढे सरकत तसे क्रांतिकारकही त्यास प्रत्येक वेळी मागे पिटाळीत. किल्ल्याच्या तटावरील तोफखानाही आपले काम चोखपणाने बजावीत होता. 'हिंदुरावच्या घराचाही' क्रांतिकारक योग्य तो परामर्ष घेत होते. दुपारी १२ वाजता लढाअी अैन रंगात आली पंजाबी तुकड्यांवर, गुरखा पलटणीवर, व ब्रिटिशांच्या गोऱ्या सैन्यावर क्रांतिकारकांनी अेकामागून अेक हल्ले चढविले. मेजर रीड म्हणतो : "माझ्या सर्व ठाण्यावर बंडवाल्यानी अतिशय निकराची चढाअी केली. ह्यापेक्षा अधिक शौर्याने कोणीही लढू शकणार नाही. रायफलधारी शिपायांवर, बाटाड्या-वर व खास माझ्याजवळच्या माणसावर त्यांनी पुन्हा पुन्हा हल्ले चढविले व अेकदा तर मला असे वाटले की आज आपण हरलो। "

प्रत्यक्ष त्या रणक्षेत्रावर लढत असलेल्या अेका शूर ब्रिटिश अधिकाऱ्याने अशा शब्दांत लिहिणे म्हणजेच क्रांतिकारकाचे हल्ले किती प्रखर असतील याचे तें प्रत्यंतर आहे. त्यातही अग्नीसारख्या प्रज्वलित व शक्तिशाली विखुरलेल्या घटकाना केंद्रित करू शकेल असा प्रबल नेता क्रांतिकारकाना लाभला नव्हता. स्वदेशाला पुन्हा स्वतंत्र करण्याची दुर्दम्य अिच्छा व प्लासीच्या राष्ट्रीय अपमानाची चीड ह्या दोन समान बंधनानीच काय ते ते क्रांतिकारक अेकत्र झाले होते. हिंदी सैन्याच्या हातात प्रत्यक्ष अिंग्लिशाचा तोफखाना पडण्याचा धोका निर्माण झाला होता आणि शेवटी आपल्या सैन्यास अुत्साह देत असलेला मुख्य अधिकारी कर्नल येल्लामन हाही

मारला गेला. सबंध दिवसभर अिंग्रजी छावणीतील प्रत्येक मनुष्य निकराने लढत राहिला व थकत चालला आणि आता ते तग धरू शकणार नाहीत असे वाटू लागलें. असें असले तरीही ब्रिटिश सेनापतीने आशा सोडण्याचें कारण नाही. कारण त्याच सकाळी तेथे येअून पोचलेल्या ताज्या दमाच्या स्वामिनिष्ठ पंजाबी तुकड्या आपणास आघाडीवर जाण्याची संधि केव्हा मिळेल याविषयी अत्यंत अुत्सुक किंवा अुतावीळ झालेल्या आहेत! त्याना आघाडीवर चालून जाण्याची आज्ञा त्वरित सोडण्यात आली आणि ह्या ताज्या दमाच्या शिपायांच्या नव्या हल्ल्यास सर्व दिवसभर अविरत लढत असलेल्या क्रांतिकारकांना असमान लढत देणें प्राप्त झालें. तथापि तशा त्या विषम परिस्थितीतही रात्र पडेपर्यंत क्रांतिकारक अेकसारखे लढतच राहिले. आणि नंतर आपलाच विजय झाला आहे असें म्हणत अुभय पक्षांची सैन्यें रणक्षेत्रावरून आपापल्या तळावर परत फिरलीं. अशा प्रकारे कोणाचाही म्हणण्यासारखा पराभव न होता तो प्लासीचा शतसांवत्सरिक दिवस संपला आणि अुभय पक्षांची सैन्यें आपापल्या शौर्याची व धैर्याची वाखाणणी करीत आपापल्या तळावर परत लोटलीं.

जसजसे दिवसामागून दिवस लोटत तसतसे नवीन सैनिकी पथके दोन्ही पक्षांना मिळत होतीं. पंजाबकडून सतत सैनिक भरती होत राहिल्यामुळे या घटकेस अिंग्लिशांचेकडे सात हजारांहून अधिक सैनिकांची संख्या झाली होती; तर दुसऱ्या बाजूस रोहिलखंडात बंड करून अुठलेली शिपायांची पलटण बख्तखानाचे नेतृत्वाखाली दिल्लीत येअून पोचली होती. लॉर्ड रॉबर्टस् म्हणतो : "रोहिलखंडाचें बंडखोर सैन्य नावांचा पूल ओलांडून कलकत्ता वेशीतून शहरात प्रवेश करू लागलें. हातात मोठमोठे झेंडे व फलक फडकावीत, ढढाभू घोषणा करीत व अत्यंत शिस्तीने व सचलन करीत शहरात प्रवेश करीत असलेले हजारो शिपाओ आम्हाला आमच्या छावणीच्या टेहळणी टेकडीवरून दिसत होते" दिल्लीत असलेल्या भिन्नभिन्न सैनिक पथकांना अैक्य आणणारी जी अेक शक्ति होती ती म्हणजे त्याचें तत्त्वप्रेम! तें नसते तर भिन्नभिन्न भागातील भिन्नभिन्न जातीच्या व धर्मांच्या पूर्वी अेकमेकांची तोंडेही कधी न पाहिलेल्या आणि केवळ योगायोगाने व क्षोभाच्या वादळामुळे अेके ठिकाणी आलेल्या ह्या सहस्रावधि शिपायांना अैक्य राहताच आले नसते शहरातील लूटमार व बेबंदशाही यावविषयास स्वत. बादशहा व त्याचें सल्लागार मंत्रिगण जरी अेकसारखी खटपट करीत असत व अुपदेश करीत होते तरीही प्रत्येक दिवशी काहीतरी शिपायांच्या लूटमारीची, दडपशाहीची व दंगल माजल्याची वातमी येतच होती. क्रांतिकारकांत हें घडणे स्वाभाविकच असते अशा परिस्थितीत, ह्या असंख्य व भिन्नभिन्न सैनिकी पथकांना संघटित करून अेकरूपता निर्माण करू शकेल अशा अेखाद्या पुढाऱ्याची गरज–आवश्यकता होती. या वेळी, क्रांतिकालात साहजिकपणेच प्रकट होणाऱ्या लोकांच्या दुष्ट प्रवृत्तींना व वाममार्गी मनोवृत्तींना जरी भयंकर अूत आलेला होता तथापि अशाही परिस्थितीत दिल्ली शहराने अिंग्रजी सैन्यावर हल्ल्यावर

हल्ले करून त्यांच्यात आपल्याविषयी भय निर्माण करुन त्यांना आपल्या काबूत ठेवले होते. परकीय शत्रूला देशाबाहेर हाकलून देण्याची जी उत्कट अिच्छा सैनिकांत व सर्वसामान्य नागरिकांत निर्माण झालेली होती तिच्या बळावर हे हल्ले चालले होते. परंतु अंतिम विजय मिळवावयाचा तर केवळ प्रबळ अिच्छाशक्तीने काम भागत नाही. तर त्यासाठी संघटन व पद्धतशीर प्रयत्न आणि कर्तृत्ववान नेतृत्व यांची आवश्यकता असते. त्यामुळे आपल्या सैन्यासह व अपार संपत्तीसह रोहिलखंडाचा दूर बख्तरखान दिल्लीस पोचला तेव्हा त्याला देवानेच धाडले आहे असे वाटू लागले. बख्तरखान येथून पोचला त्या वेळी दिल्लीतील लोकांची मनःस्थिति कशी होती त्याचे वर्णन त्याच वेळी दिल्लीमध्येच वास्तव्य करणाऱ्या अेका गृहस्थाने आपल्या रोजनिशीत—दैनिकीत लिहून ठेवले आहे. त्या काळचे दिल्लीतील केवळ दर्शन घडविणारा म्हणून नव्हे तर अेकंदर लोकांच्या विचारसरणीवर व घटनांवर प्रकाश टाकणारा त्या रोजनिशीतील अेक अुतारा पुढे देत आहोत. "रोहिलखंडातून अुठाव केलेल्या तुकडया लवकरच येणार आहेत अशा अपेक्षेने यमुनानदीवरील पूल दुरुस्त करण्यात आला. रोहिलखंडचे सैन्य दूर होते तेव्हापासूनच बादशहा त्याकडे दुर्बिणीतून पहात होता. ता. २ जुलैच्या सकाळी नबाब अहमद कुलीखान आपल्या सरदारांसह व नागरिकांसह रोहिलखंडच्या सैन्याचे स्वागत करण्यास सामोरा झाला त्या वेळी हकीम अहसन अुल्लाखान, सेनापति मनदखान, अिब्राहिम अलीखान, गुलाम कुलीखान व अितर प्रतिष्ठित पुढारीसुद्धा हजर होते— रोहिलखंडच्या सैन्याचा सेनापति असलेला महमद बख्तरखान याने बादशहाला आपली सेवा मान्य करुन घेण्याची विनती केली. बादशहाला त्याची काय अिच्छा आहे हे सांगण्याचा बख्तरखानाने जेव्हा आग्रह धरला तेव्हा बादशहा म्हणाला, "लोकांना संपूर्ण संरक्षण मिळावे, त्याच्या जीविताची व वित्ताची शाश्वती मिळावी, आणि ब्रिटिश शत्रूचे निर्दालन करण्याचे कार्य यशस्वीपणे पार पाडावे हीच माझी तीव्र अिच्छा आहे." त्यावर सेनापति म्हणाला की, बादशहाची अिच्छा असेल तर क्रांतिकारक सैन्याचा सर सेनापति म्हणून काम करण्यास मी तयार आहे त्या वेळी बादशहाने प्रेमभराने सेनापतींना हात दावला तसेच भिन्नभिन्न पलटणींच्या प्रमुखांना अेकत्र बोलावून विचारण्यात आले की बख्तरखान यांची सर्व सैन्याचे सर सेनापति म्हणून निवड करण्यास ते तयार आहेत का? सर्व अेका आवाजात 'हो हो' म्हणून म्हणाले व सर सेनापतीच्या आज्ञा मानण्याची लष्करी किंवा सैनिकी शपथही सर्वांनी घेतली. हा शपथविधि आटोपल्यावर बादशहाने पुन्हा बख्तरखानाची खाजगी भेट घेतली. सर्व शहरात दवंडी पिटण्यात आली की, सरदार बख्तरखान यांची सर सेनापति म्हणून नेमणूक करण्यात आली आहे. तरवार, अेक पदक आणि सेनापति ही पदवी त्यांना अर्पण करण्यात येअून त्यांचा सन्मान करण्यात आला. राजपुत्र मिर्झा मोगल यास अुप-सरसेनापतिपद देण्यात आले. त्याने बादशहास कळविले की, "शहरात

लुटालूट किंवा रक्तपात करताना प्रत्यक्ष राजपुत्रही आढळला तर तत्काळ त्याचे कान व नाक कापण्यास आपण मागेपुढे पाहणार नाही." बादशहाने उत्तर दिलें "आपणाला सर्व अधिकार दिलेले आहेत. जराही कुचराओ न करता आपणाला योग्य वाटेल तें करा." शहराच्या कोतवालालाही दटावण्यात आलें की, त्याच्या हलगर्जीपणामुळे जर गावात लुटालूट किंवा दगाधोपा झाला तर त्यालाही फाशी दिले जाओल. बख्तखानाने सांगितलें की, त्याने आपल्या समवेत चार पायदळाच्या तुकड्या, सातशें घोडेस्वार, सहा घोड्यावरील तोफा, तीन भुओ तोफा, अित्यादि लष्करी साहित्य आणलेलें आहे. त्याच्या बरोबर आलेल्या शिपायांचा सहा महिन्यांचा पगार आधीच दिलेला असून त्याशिवाय चार लक्ष रुपयांची रोकड त्यानेपाशी असल्याने शिपायांच्या पगाराविषयी किंवा पैशाच्या नडीविषयी बादशहाने काळजी करण्याचें कारण नाही असेंही बख्तखानाने सांगितलें. अितकेंच काय पण जी काही पैसा लढाओत त्याच्या हाती पडेल तोही बादशहाच्या खजिन्यात तात्काळच भरला जाओल. त्यानंतर बादशहाने चार हजार रुपये किंमतीची मेवामिठाओ सर्व सैन्यात वाटली. आग्र्याचे शिपाओ, नसिराबाद व जालंदरच्या पलटणी या सर्वांवर सरसेनापति बख्तखान याचा अधिकार होता. शहरातील प्रत्येक नागरिकाने शस्त्र धारण केलेंच पाहिजे अशी पहिली आज्ञा सरसेनापति या नात्याने सोडली गेली. प्रत्येक गृहस्थाने व दुकानदारानेही शस्त्र बाळगलें पाहिजे. ज्याच्यापाशी शस्त्र नसेल त्याने वरिष्ठ ठाण्यावर जाअून विचारणा केल्यास तत्काल त्यास हत्यार पुरविलें जाओल, पण कोणीही निःशस्त्र असता कामा नये. अेखादा शिपाओ लुटालूट करताना आढळून येओल तर त्याचा हात तोडला जाओल. बख्तखान शस्त्रास्त्रांच्या कोठारात गेला व त्याने पाहणी करून शस्त्रांची व दारूगोळा निर्मितीची शिस्त लावली. रात्रीः आठ वाजता सरसेनापति राजवाड्यावर गेला. बादशहाने बेगम झीनत महल, हकीम अहसनुल्लाखान व अहमद कुलीखान यांचे बरोबर राज्यातील घडामोडी-बद्दल विचारविनिमय केला. ता. ३ जुलै या दिवशी झालेल्या सर्वसाधारण परेडचे संचलनाचे वेळीं जवळजवळ वीस हजार शिपाओ हजर होते."[२]

बख्तखानाच्या आगमनामुळे दिल्लीतील क्रांतिकारक पक्षाला काही संघटनात्मक रूप देण्यास त्याने ज्या वेळीं सुरवात केली होती त्याच वेळीं दुसरीकडे अिंग्रजी पक्षालाही पंजाबच्या बाजूने व अन्यमार्गातूनही अुत्साही व धडाडीची नवीन कुमक मिळत होती. पंजाबमधून नुकताच येअून पोचलेला ब्रिगेडियर जनरल चेंबर्लेन याची शौर्याने, अुत्साहात व कल्पनासामर्थ्यात बरोबरी करू शकतील असे अगदी थोडेच माणसे अिंग्रज सरकारजवळ होते. प्रख्यात लष्करी अिंजिनीयर बेअर्ड स्मिथ हाही त्याना येअून मिळाला. शिखांच्या बरोबर युद्धाय झालेल्या लढाओत ज्यानी नांव

२ Native Naratives by Metcalfe, page 60.

कमावले होते असे सर्व शिपाओ जॉन लॉरेन्सने दिल्लीच्या अिंग्रजांच्या मदतीस पाठून दिले. नंतर सेनापति बर्नार्डने पूर्वी अनेक वेळा दिल्लीवर चढाओ करण्याचा बेत ठरविला होता पण तो अंमलात आणला गेला नव्हता; आता नवीन कुमक मिळाल्यामुळे त्याने दिल्लीवर सरळ व धाडसी चढाओ करण्याचा निश्चय केला. पूर्वी प्रमाणेच ह्याही हल्ल्याची संपूर्ण योजना आखण्यात आली. आणि ता. ३ जुलैला चढाओच्या तयारीने सज्ज असलेलें अिंग्रजी सैन्य कूच करून निघालेंही. पण काय ? फौजी तरी अशी बातमी आणली की, सरसेनापति बख्तरखानाने अिंग्रजांचे दिल्लीवर चालून जाण्याचे श्रम वाचविले आहेत ! कारण तो स्वतःच त्याचेवर चालून येत आहे. ता. ४ जुलैला बख्तरखान पुन्हा चढाओ करून आला व अिंग्रजांना त्याने अलिपूरपर्यंत मागे रेटले ! !

दिल्लीला गेलो, दिल्लीशहरावर नुसती नजर गेली–दृष्टि गेली की ती सहज आपण जिंकलीच, अशी प्रौढि दिल्लीला वेढा घालण्यापूर्वी जे अिंग्रज करीत असत त्या अिंग्रजांना पंजाब भागातून नव्या प्रबल पलटणी येअून मिळाल्यावरसुद्धा अेक संपूर्ण महिन्यात अेक पाअूलही पुढे टाकता आले नाही, हे पाहून तीव्रभावनेच्या सेनापति बर्नार्डला अतिशय दुःख व लाज वाटू लागली. अिंग्रज दिल्ली जिंकावयाला जितके अुत्सुक होते त्याहून अधिकतर असणारा दिल्ली सहज जिंकण्याचा त्याचा आत्मविश्वास होता. अितका की मुबंअी, कलकत्ता व मद्रासपर्यंत दिल्ली पडल्याची बातमी पसरली ! आणि ह्या बातम्या निराधार आहेत असे अिंग्रजांना जेव्हा वारंवार दिसून येअू लागलें तेव्हा सर्व हिंदुस्थानातील लोक अेकमेकास विचारू लागले की "दिल्लीला अिंग्रज सैन्ये करीत तरी काय आहेत?" हीच चिंता व शरम— लज्जा बर्नार्डच्या मनात घर करून राहिली होती आणि पूर्वीच्या ह्या अंधकारमय परिस्थितीपेक्षा पुढील काळ काही वेगळा येअील असे त्याला वाटेना. अुलट भावी काळाचा विचार करताना त्याला तो अधिकच अंधकारमय वाटू लागे. शिपायांच्या अेकसारख्या होत राहिलेल्या हल्ल्यामुळे त्याला क्षणभरही अुसत मिळेना, अेवढेंच नव्हे तर क्रांतिकारकांच्या त्या राजधानीवर सरळ व धाडसी चढाओ करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा नवीन अुगवणाऱ्या प्रत्येक दिवशी अेकसारखी विरून जाते आहे असे त्याला दिसे. सरते शेवटी शरीराने थकलेला, मानसिक चिंतेने ग्रासून गेलेला, व निराशेने खचलेला ब्रिटिश सेनानी बर्नार्ड ता ५ जुलैला पटकीच्या साथीला बळी पडला ! ह्या बातमीने अिंग्रजाच्या तळावरील सैन्यास दुःखाचा प्रचंड धक्काच बसला. दिल्लीत प्रवेश करण्याचा प्रयत्न करणारा हा दुसरा अिंग्रज सेनापतिही दिल्लीत नव्हे पण यमपुरीत प्रवेश करण्यात यशस्वी ठरला ! त्यानंतर सेनापति रीडने सैन्याचीं अधिकारसूत्रें हाती घेतली. तो अिंग्रजी सैन्याचा तिसरा सेनापति झाला !

ब्रिटिशांच्या ठाण्यावर चढाओ करण्याचे असे बेत चाललेले असतानाच दिल्लीतील नागरिक ते प्रत्यक्ष कृतीत अुतरवीत होते. स्थलाभावी त्या सर्वांचे वर्णन येथे

करता येत नाही. असें असले तरी ता. ९ जुलै व पुन्हा ता. १४ जुलै या दिवशी ज्या सर्वांनी क्रांतिकारक लढले व अिंग्रजांप्रमाणेच क्रांतिकारकांनीही शौर्याची कमाल केली ते प्रसंग महत्त्वाचे व स्फूर्तिदायक असल्याने वगळता येत नाहीत. पहिल्या दिवशी अिंग्रजी घोडदळाला पाडाव करून त्याना पिटाळण्यात आलें. अिंग्रजी तोफखाना बंद पाडण्यात आला. अेका शूर शिपायानें हिल व त्याचा घोडा या दोघांना गारद केलें. हिल्ने मरता मरता स्वत:ला सावरून आपली तरवार अुपसली तोंच त्याच्यावर तीन शिपायानी धाव घेतली. हिल्ने दोनदा गोळी झाडण्याचा केलेला प्रयत्न फसला. परतु अेक शिपाअी आपली तरवार अुपसण्यात यशस्वी झाला. अुभयतांची हातघाअीची झुंज जुंपली, त्याची झटापट झाली आणि दोघे खाली कोसळले. हिल जमिनीवर अुताणा पडलेला होता व त्याच्या छातीवर अेक पाय देअून व हातीं तरवार धरून अेक शिपाअी अुभा होता. मेजर टॉम्बस्ने तीस फूट अंतरावरून हें दृश्य पाहिलें, व त्याने नेम धरून शिपायावर गोळी झाडून त्याला ठार केलें. मेजर टॉम्बस्ने हिलला जमिनीवरून अुचललें व त्याला हालवू लागला असताना त्याच वेळी दुसरा शिपाअी हिल्चे पिस्तुल हाती धरून त्याचेवर चाल करून येत असल्याचे पाहून तो आश्चर्यचकित झाला. तो शिपाअी दोन किंवा तीन अिंग्लिशांशी अेकाकी लढत असताना, अेकाला त्याने आपल्या तरवारीनें जखमी केलें, दुसऱ्याला ठार केलें आणि तिसऱ्याच्या तरवारीचा तो स्वत:च बळी ठरला. टॉम्बस् व हिल या दोघानाही त्यानी दाखविलेल्या शौर्याबद्दल 'व्हिक्टोरिया पदके' देण्यात आलीं. आणि सर जॉन के म्हणतो की त्या शूर शिपायालाही 'बहादुरशहा पदक' मिळावयास हवें होतें ! त्या स्वातंत्र्ययुद्धात शहीद झालेले, हुतात्मा झालेले कितीतरी वीर 'बहादुरशहा पदक' मिळविण्यास पात्र होते ! पण शूर स्वार्थत्यागी शिपायाना बहादुरशहा पदकें मिळत नसलीं तरी त्याहूनही अधिक गौरवाहं शहीद होण्याचें — हुतात्मा होण्याचें कर्तव्यपदक प्रत्यक्ष मृत्युदेवतेकडून मिळण्याचे भाग्य त्याना लाभतें अेवढें मात्र खरें ! त्या दिवशीं अिंग्रज शिपायाचा अपमानास्पद असा पराभव झाला पण याचा सूड क्रांतिकारकावर अुगवता न आल्याने ते शूर (?) अिंग्रज आपल्या ठाण्यात परतले व तो सूड त्याच्या चाकरीत असलेल्या निरपराध भिस्त्यावर व अन्य हिंदी लोकावर त्याचे रक्ताच्या थारोळ्यात तुकडे अुडवून ठार करण्यात अुगविला ! १

१. " It is related that in the absence of tangible enemies, some of our soldiery, who turned out on this occasion, butchered a number of unoffending camp-followers, servants and others who were huddling together, in vague alarm near the Christian Church Yard. No loyalty, no fidelity, no patient, good service on the part of these good people could extinguish, for a moment, the-

(टीप पुढील पानावर चालू)

आणि खरोखर पहाता ह्याच मिस्त्यानी व अितरानी अिंग्लिश सैन्याला त्यांची चोख सेवाचाकरी करून लढण्याच्या स्थितीत ठेवलेलें होतें ! पण ता. १४ जुलैच्या हल्ल्यात ह्यानिंशाही अधिक वाअीट स्थिति झाली. कारण ह्याच दिवशी शूर चेंबर्लेनला अेका शिपायाने गोळी घालून ठार केलें. त्याच्या ह्या मृत्यूमुळे झालेल्या राष्ट्रीय हानीचें व दुःखाचें वर्णन अिंग्रजी अितिहासकार पुढील शब्दांत करतात : "आमच्या पक्षातील पहिला योद्धा, कीर्तीने पहिला व सन्मानांत पहिला ! चेंबर्लेनचें प्रेत ज्या दिवशी आमच्या तळावर परत आणलें गेलें तो आमच्या अितिहासातील अेक अत्यंत दुःखदायक दिवस होय ! "

अशा प्रकारे ता. १५ जुलै अुलटून गेली तरी दिल्लीतील प्रासादशिखरें, आपल्या मस्तकांवर सूर्यकिरणांनी चमकणारे ध्वज, पताका, गुढ्या अुभारून जगाला ओरडून सांगत होतीं की, दिल्ली शहर हें आता स्वातंत्र्याचें निवासस्थान झालेलें आहे. आणि शेवटी आपलें मरण डोळ्यांसमोर स्पष्ट दिसत असल्यामुळे स्वतः रीडने राजिनामा दिला, अधिकारत्याग केला व हिमालयाच्या टेकड्यांत जाअून तेथे निवास केला ! अिंग्रजी सैन्याचा हा तिसरा सेनापति होता. दोघांना यमस्थांत गाडले गेले व तिसऱ्याने आपला अधिकार सोडल्यानेच केवळ त्याचे प्राण वाचले! अितकें झाले तरीही दिल्ली अजिंक्यच राहिली ! क्वॉर्टर मास्टर जनरल बेचर व अॅड्ज्यूटंट जनरल चेंबर्लेन आपल्या तळावरच मृत्यूची घटका मोजीत पडले होते — तरी दिल्ली जिंकता येअीना! अितकेच नाही तर क्रांतिकारकांकडून होणाऱ्या सतत व त्रासदायक हल्ल्यापासून स्वसंरक्षण तरी कसें करावें हा प्रश्न अिंग्रजांना पडला. कारण क्रांतिकारकांची संख्या या घटकेला वीस हजारपर्यंत झाली होती ! क्रांतिकारकांनी चढविलेल्या प्रत्येक हल्ल्यात त्याचें बरेंच मनुष्यबळ खर्ची पडत असले तरी त्याचा अिंग्रजांना काहीच लाभ होत नव्हता. पण त्यांचे मूठभर सैनिक प्रत्यही मरत गेल्याने अिंग्रजांचें संख्याबळ घटत होतें. म्हणून अिंग्लिशांनी आता केवळ संरक्षणात्मक धोरण स्वीकारलें. कारण हल्ल्यामध्ये होणाऱ्या मृत्यूने क्रांतिकारकांची शक्ति विशेष दुर्बळ होत नसे वा त्यांच्या हल्ल्यानही खंड पडत नसे. अुलट ते अधिक निश्चयी व निर्भय होअून अभिमानाने अुघड सांगू लागले की, " अिंग्लिशांच्या विजयाचें मूल्य पराभवाअितकेच आहे ! " सर्व हिंदुस्थानात पसरलेले अिंग्रजही टीका करू लागले, गान्हाणी करू लागले व अुघडपणे लिहू लागले की, " वेढा घालणारेच वेढ्यात अडकले गेले आहेत ! " आणि जेव्हा अशा परिस्थितीत तिसरा सेनापति निवृत्त झाला तेव्हा ग्रेटहेड, चेंबर्लेन

(टीप मागील पानावरून चालू)

fierce hatred which possessed our white soldiers against all who wore the dusky livery of the East ". Kaye and Malleson's Indian Mutiny, Vol. II, P. 438.

व रॉझन यांसारख्या लढवय्यांना दिल्लीवर हल्ला करण्याची आशा सोडून द्यावी लागली. प्रत्यक्ष हेडक्वॉर्टर्समध्ये मुख्य छावणीतच दिल्लीचा वेढा अुठविण्याची भाषा व चर्चा चालू झाली. जेव्हा तिसरा सेनापति रीडने राजिनामा दिला व त्याचे जागी चौथा सेनापति ब्रिगेडियर जनरल विल्सन आला. तेव्हा दिल्लीच्या वेढ्याची ही करुणास्पद स्थिति झालेली होती !

* * *

प्रकरण दुसरें

# हॅवलॉक

जेव्हा शीख शिपायांनी अलाहाबादचा किल्ला क्रांतिकारकांच्या हाती सोपविण्याअैवजी अिंग्लिशांचे हाती सोपविला तेव्हापासून अिंग्लिशांनी तो आपल्या हालचालींचा मुख्य तळ बनविला. अुत्तर हिंदुस्थानांतील मुलकी व लष्करी हालचाली कलकत्त्यासारख्या दूरच्या केंद्रावरून ज्या कराव्या लागत त्यांतील धोका या नव्या केंद्रामुळे अुरला नाही. बंडाचा बीमोड होअीपर्यंत अलाहाबादेलाच राजधानी हलविण्याचा लॉर्ड कॅनिंगने निर्णय घेतला व त्याप्रमाणे थोडयाच दिवसात तो अलाहाबादेसच स्वतः वास्तव्याम आला. पण तेवढ्यात कानपूरला अिंग्लिशांच्या पळापळीच्या बातम्या व त्यांनी मदतीसाठी फोडलेल्या आर्त किंकाळ्या अैकू येअू लागल्या म्हणून जनरल नीलने अलाहाबादच्या संरक्षणासाठी थोडेसे सैन्य ठेवून बाकीचे सर्व सैन्य मेजर रेनॉडचे नेतृत्वाखाली कानपूरचा वेढा अुठविण्यासाठी धाडून दिले. हें सैन्य वाटेतील खेडेगावांना मन मानेल तशा आगी लावीत चाललें. त्याच सुमारास कानपूरच्या अिंग्लिश सैन्याचा सेनापति म्हणून नीलच्या जागी हॅवलॉक याची नेमणूक झाली. तो जून महिन्याचे शेवटी अलाहाबादला येअून पोचला. तो सैनिकी हालचालींत पारंगत व अनुभवी अधिकारी होता. अिंग्लिशांच्या सुदैवानें अिकडे बंडाची प्रत्यक्ष अुठावणी होण्याचे वेळीच अिंग्लिशांचे अिराणशी चाललेले युद्ध आटोपलें होते व त्या स्वारीत गुंतलेलें सर्व युरोपियन सैन्य हॅवलॉकसारख्या अुत्तम सेनानीसुद्धा हिंदुस्थानात अगदी आणीबाणीच्या वेळेलाच येअून पोचले. हॅवलॉक अलाहाबादेस मुख्य अमलदारीवर आल्यामुळें आपल्याला त्याचे हाताखाली राहावें लागणार हे पाहून नीलला मनात जरी पुष्कळ मत्सर वाटू लागला तथापि त्याने सार्वजनिक कर्तव्यामध्ये मत्सराने वा खेदाने यत्किंचितही शिथिलता पडू दिली नाही. हॅवलॉकच्या हाताखाली जाणाऱ्या सैन्याची त्याने स्वतःच्या सैन्याअितकी अुत्तम,

व्यवस्था लावली, त्यांना दाणावैरणीची मदत केली व हॅवलॉक येताच त्याच्या स्वाधीन आपला चार्ज विनबोभाट रीतीने करून दिला. हें सैन्य कानपूरच्या अिंग्रजांचे मदतीसाठी जाण्याचीही सिद्धता होअून हॅवलॉक मोठ्या अुत्साहाने तिकडे जाण्यास जों निघणार तों त्यास बातमी कळली कीं कानपूरच्या सर ह्यू व्हीलर पराजय पावून बंडवाल्यांस शरण गेला व त्याच्या सुद्धा अिंग्रजी पुरुषमात्राची गंगेच्या काठावर भयंकर कत्तल अुडाली !

जिवतपणी ज्याचें संरक्षण करण्यास आपण असमर्थ झालो त्याच्या मरणाचा तरी आता निष्ठुर सूड अुगविला पाहिजे अशा प्रबळ अिच्छेने हॅवलॉक अलाहाबादेहून कानपूरकडे त्वरेने निघाला. त्याच्याबरोबर अेक हजार निवडक युरोपियन पायदळ, शंभर दीडशें शीख, अेक युरोपियन घोडेस्वारांची छोटीशी तुकडी व सहा तोफा अितकी सेना त्वेषाने जिवावर अुदार होअून निघालेली होती. नवीन अधिकाऱ्यांना व सोजिरांना त्या प्रदेशाची माहिती देण्यासाठी, लढाअीत स्वतः लढण्यासाठी व लढाअीनंतर क्रूर सूड अुगविण्यासाठी, बंड केलेल्या शिपायांच्या रेजिमेंटमधून किंवा बडखोर नागरिकांनी दयेमुळे जाणून बुजून जिवंत सोडलेले किंवा हयगयीने जिवंत सुटलेले कित्येक लष्करी अधिकारी व मुलकी अमलदार, त्या सेनेबरोबरच चाललेले होते; व जे जे अेकेकटे हाती सापडले असता अेका शब्दाबरोबर बंडवाल्यांकडून राख झाले असते तेच हे अिंग्रज लोक आज पुन्हा अेकत्र होताच त्यांच्यापुढे गावेंची गावें अग्नीमध्ये राख होअू लागली!

रीडच्या हाताखाली असलेली अिंग्रजांची तुकडी फत्तेगडाकडे चालून येत आहे ही वार्ता कानपूरला कळताच नानासाहेबांनी बंडवाल्यांपैकी बरेचसे सैन्य तिकडे धाडून दिले. ज्वालाप्रसाद, टीकासिंग व अलाहाबादचा मौल्वी यांचे नेतृत्वाखाली रीडच्या मूठभर अिंग्रजांना पहिल्या धडाक्यातच चीत करून कानपूरला विजयश्रीसह शीघ्रतेने परत फिरू अशा अवसानात निघालेलें बंडवाल्यांचें सैन्य फत्तेगडजवळ येअून पोचले. त्याच वेळीं आकस्मिक रीतीने रीडच्या तुकडीला हॅवलॉकचें सैन्य येअून मिळालेलें होतें व ह्या मिळाफ झालेल्या अिंग्रजी सेनेने बंडवाल्यांची फौज आली आहे असें कळताच आपल्या तोफांना बत्ती दिली. ही लढाअी ता. १२ जुलैला झाली. आता रीडच्या तुकडीला बोल बोलता गारद करू अशा विश्वासाने बंडवाले जों अिंग्रजी सेनेवर चाल करून येतात तों मूठभर लोकांचे अैवजी तोफखान्यासुद्धा सर्वांगपूर्ण असलेलें हॅवलॉकचे गोरे सैन्य रणांगणात अुडी घेअून ठाकलें. ही फसवणूक अेकाअेकी अुघडकीस येअून बंडवाल्यांना जोराची दहशत बसली व ते आपल्या तोफा रणांगणावर टाकून धूम ठोकीत पळू लागले! त्यांचा पाठलाग करणें शक्य नसल्यामुळे त्या नादी न लागता अिंग्रजी सेनेने फत्तेपूर शहरात प्रवेश केला. ह्या फत्तेपूर शहरानें जेव्हा बंड केलें होतें तेव्हा तेथील पुढारीपण अिंग्रज सरकारच्या नोकरीत डेप्युटी मॅजिस्ट्रेटच्या अधिकारावर असलेल्या हिकमत अुल्ला नांवाच्या

अेका मुसलमानाने पकरलेलें होतें व ह्या शहरात युरोपियन अधिकाऱ्यांचें रक्तही चंदवाल्या नागरिकांची तरवार प्यालेली होती, त्या या रक्तप्रिय शहरावर आता सुडाची तरवार पडली! वड हॅनाम लोकांनी न मारता सोडून दिलेला त्या शहराचा पूर्वीचा मॅजिस्ट्रेट शेरर हा त्या विजयी सैन्याबरोबर आलेला असून फार दिवस तुटून राहिलेली त्याची मॅजिस्ट्रेटी गाजविण्यास तो आता अुत्सुक झालेला होता! म्हणून प्रथम लष्करी लुटीचा हुकूम सुटला. त्या शहरात आता लुटण्यास काहीही अुरलेले नाही अितकी खात्री झाल्यावर तें शहर पेटवून देण्याचा दुसरा हुकूम सुटला. परंतु ह्या हुकमाचा मान फक्त शीख शिपायांनाच देण्यात आलेला असल्याने गोरे सैन्य फत्तेगडाहून निघनाच निम्यांनी आपली विशिष्ट कामगिरी बजावून तें शहर आग लावून पेटवून दिलें व नंतर पुढे मुख्य सैन्यास जाअुन मिळालें.

फत्तेपूर शहराला अिंग्रजी सैन्य जिवंत भाजून काढीत असता त्याच्या ज्वालांचे लोट पसरत पसरत लवकरच कानपूरला चटका देअू लागले. मेजर रीडच्या तुकडीला मारण्यासाठी आपले सैन्य तुटून पडले असता हॅवलॉकच्या सैन्याने त्याना अकस्मात् छापा घालून पिटाळून लावले, फत्तेपूर शहरात अिंग्रजांनी प्रवेश केला व तेथील मालमत्तेचे लुटीने व माणसांचे आगीने भस्म करून टाकले, ह्या वार्ता नानाच्या दरबारात येअून सतापाच्या, निराशेच्या व द्वेषाच्या लाटांनी तो सर्व दरबार खवळून गेला. कानपूरवर चालून येणाऱ्या अिंग्रजांना पाडू नदीवर अडकविण्यासाठी नानासाहेबाच्या हाताखाली आणखी अेक सैन्य धाडून देअून नानाचा दरबार जो परत फिरतो तों अिंग्रजाकडे गेलेले काही फितुरी हेर पकडण्यात आल्याची वर्दी मिळाली. या फितुरी हेराची चौकशी करताना असे सिद्ध झाले की, त्याच्यापैकी काहींजणाबरोबर नानाच्या कैदेत असलेल्या गोऱ्या बायकांनी अलाहाबादेच्या अिंग्रजाकडे फितुरीची पत्रें लिहिली आहेत! [१] शिपायांच्या कत्तलीतून ज्याचा अबला म्हणून नानांनी बचाव केला त्याच्या ह्या गुप्त कारस्थानाचा बभ्रा होताच ह्या

१. " After the defeat of Nana Sahib's forces at Fattehpur, some reputed spies were brought to Nana Sahib They were accused of being the bearers of letters supposed to have been written to distant stations by the helpless women in prison. In the correspondence some of the Mahajans and Babboos of the city were believed to be complicated. It was, therefore, resolved that the said spies together with the women and children, as also the few gentlemen whose lives had been spared should all be put to death. "—Narration of the Revolt page 113 One of the Christian prisioners in the prison of Nana Sahib tells the same account and one of the Ayahs (nurses) deposes to the same effect.

कृष्णकारस्थानी गोर स्त्रियांचे काय करावें हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला. फत्तेगड अग्निशांनी जाळला तसा हा 'बिबीगड'ही आपण कां जाळू नये ? त्या दिवशीच्या खाजगी सभेत टीकासिंग म्हणाले की, "ह्या बाया कानपूरच्या बिबीगडात अशाच राहिल्या तर आपला पराजय झाला असता कानपूर शहराची अिंग्रज राख करावयास सोडणार नाहीत. त्याच्या पुराव्याच्या आधारावरच हजारो लोक अिंग्रजांच्या द्वेपाला खान वळी पडतील. म्हणून माझ्या मतानें कानपूरास अिंग्रज भिडण्याच्या आधी येथील अंतर्गत बातमी देण्यास अेकही गोरें कारटें न अुरावें.[२]

बिबीगडात ज्या बाया होत्या त्यांतील कित्येक तर कानपुरात दहा दहा वर्षे राहिलेल्या होत्या—अिंग्रजाविरुद्ध लढलेले कित्येक नागरिक त्याना नांवनिशीसुद्धा माहीत होते. तेव्हा त्यांच्या अस्तित्वाचा विषमय पेला भंगून न टाकल्यास तोच कानपूरच्या जीविताला अपायकारक होण्यास चुकणार नाही असा त्या सभेत सर्वांचा विचार ठरला ! त्या कैदखान्याला जरी बिबीगड म्हणत तरी त्यात नानांच्या हुकुमाने वाचलेले काही पुरुषही होते. त्या सर्वांना त्यांचीं फितुरीचीं पत्रें नेणाऱ्या हेरांसुद्धा ठार मारावें असा सर्वसंमत निश्चय ठरवून त्या घोर रात्रीचीही घोरतर सभा विसर्जन पावली! दुसरे दिवशी प्रथमतः त्या हेरांना व कैदेतील गोऱ्या पुरुषाना बाहेर ओढण्यात आलें, अेका रांगेत ते अुभे राहिले व स्वतः नानासाहेबांच्या समोर प्रथमतः त्या हेरांची डोकी सपासप अुडविण्यात आली व नंतर कैदेतील गोऱ्या पुरुषांना पुढे आणून गोळीसरसें ठार करण्यात आलें. नानासाहेब येथून अुठून जाताच त्या गोऱ्या पुरुषाच्या प्रेताजवळ येअून लोक चेष्टा करू लागले की, "हा मद्रासचा गव्हर्नर, हा मुंबअीचा, हा बंगालचा! ! !"

व ही हिडीस चेष्टा अिकडे चाललेली असताना तिकडे बिबीगडावर असलेल्या पहारेकरी शिपायांस आत घुसून कत्तल करण्याचा हुकूम सुटला! पहारेकरी असा कत्तली करण्यास धजेनात तेव्हा असल्या शिपायापेक्षा जास्त योग्यतेचाच कार्यकर्ता मनुष्य पाहिजे असें पाहून त्या बिबीगडाची मुख्य अमलदारीण बेगमसाहेब हिने कानपूर शहरातील खाटिक वाड्याकडे तो हुकूम धाडला. थोड्याच वेळात हातात नंग्या तरवारी व तीक्ष्ण सुरे पाजळणारे खाटीक लोक त्या बिबीगडात दात करकरा चावीत सध्याकाळचे सुमारास आत घुसले व रात्री वाळोखाचे सुमारास ते बाहेर निघाले. त्यांच्या या घुसण्याच्या व निघण्याच्या दरम्यान गोऱ्या रक्ताचा लालभडक समुद्र पसरलेला होता! बिबिगडात घुसताच त्यांनी हातातील तरवारींनी व सुऱ्यानी भोसभोसकून सुमारे दीडशे गोऱ्या स्त्रिया व गोरी मुले कापून काढलीं! त्या खोलीत रक्ताचे तळें साचलें व त्या रक्तात नरमांसाचीं खांडोळीं तरगू लागलीं.

---

२. Forrest's Introduction ह्यामध्ये फॉरेस्टही म्हणतो, 'पुढे पुरावा मिळू नये म्हणून कत्तलीचा आग्रह—पहिलें प्रयोजन म्हणून टीकासिंगाने केला.'

यात घुसते वेळेस ते लाटीक लोक जमिनीवरुन चालत गेले परंतु बाहेर निघते वेळेस त्यांना रक्ताचा जलप्रवास करावा लागला. रात्री विबीगडात अर्धमेलेल्याच्या किंकाळ्या, मरणोन्मुखांचीं खोल कण्हणीं व सरमकट भोसकाभोसकीत तनुलघुत्वाने वचावलेल्या अेक दोन अर्भकांचीं केविलवाणीं रडणीं अैकू येत होतीं! पहाटेच्या सुमारास विबीगडात त्या दुर्दैवी प्राण्यांना फराफर बाहेर ओढण्यात आलें व शेजारी असलेल्या अेका विहिरीत ढकलून देण्यास प्रारंभ झाला! प्रेतांचे ढिगांतून वरील भार हलका होताच अेक दोन मुलें वर निघालीं व त्या विहिरीचे काठाने पळू लागलीं अितक्यात अेकेक धक्का बसून तींही मेलेल्यांच्या थरावर कोसळलीं. ती मेलेल्यांच्या थरावर व लगेच पुन्हा मेलेल्याचा थर त्यांवर! आजपर्यंत मनुष्यें विहिरींचें पाणी पीत आलीं, परतु आज विहिरीने मनुष्याचें रक्त पिण्यास आरंभ केला! फत्तेगडातील जळणाऱ्या किंकाळ्या अिग्रज लोक आकाशात भिरकावीत असता विबीगडातील रक्तबंबाळणाऱ्या गोऱ्या किंकाळ्या पांडे पाताळात भिरकावीत होते! मनुष्यप्राण्यांच्या ह्या भिन्न जातींमधील शंभर वर्षें तुंबलेल्या रकमा हिशोबात असा बाद होअू लागल्या.[३] कानपूरची विहीर! हिला बुजविण्याचा जो जो प्रयत्न चालला तो तो विफल झाला. बंगालचा अुपसागरही कालप्रवाहात बुजून जाअील परंतु ही कानपूरची विहीर अत:पर बुजणें नाही!

याच सुमारास तिकडे पांडुनदीवर धाडलेल्या नानाच्या सेनेचा पराभव करीत करीत हॅवलॉक पुढे घुसत चालला. नानांच्या सेनेचे सेनापति बाळासाहेब पेशवे याच्या खाद्यात गोळी लागून ते परत कानपूरला येताच नानानी तावडतोब अेक युद्धसभा बोलाविली. लढाअी न देता कानपूर सोडावें कीं, कानपूर सोडण्याचे आधी रणावर अेक निकराची टक्कर घेअून पहावी या दोन क्रमाचा त्या युद्धसभेत बराच खल होअून शेवटी दुसऱ्या मार्गाचेच अनुसरण करण्याचें ठरले. ता. १६ जुलै रोजी अिंग्रजी फौज कानपूरच्या नजीक येअू लागली. कानपूरच्या विहिरीची कथा त्यांना अद्यापि समजली नसल्याने व्हीलरचा गड जरी हातातून निसटला तरी निदान विबीगडास वडवाल्याच्या कचाटीतून सोडवू अशी अीर्षा त्यांना अुन्हातून, श्रमातून व लढाअीतून अेक क्षणभरही विसावा घेअू देत नव्हती कानपूर शहराची शिखरें

३. The refinements of cruelty—the unutterable shame—with which, in some chronicles of the day, this hideous massacre was attended, were but fictions of an excited imagination, too readily believed without inquiry, and circulated without thought. None was mutilated, none were dishonoured.... This is stated, in the most unqualified manners, by the official functionaries, who made the most deligent inquries into all the circumstances of the massacres in June and July".—Kaye and Malleson's Indian Mutiuy Vol. II, page 281.

दिसू लागताच हॅवलॉकला ह्या ओघेने अिष्ट समय आल्याचा अुत्साह चढू लागला. त्याने पांढऱ्यांच्या सैन्याची नीट तपासणी चालविली. तें सैन्य कानपूरचे रणावर अितक्या अुत्तम रीतीने व्यूहबद्ध झालेलें होतें की, रणांगणावर सर्व जन्म घालविलेल्या त्या योद्ध्याला बंडवाल्यांत अपेक्षेपेक्षा तरी अप्रतिम लष्करी चातुर्य भरलेलें आहे असें वाटू लागलें. त्याने आपले अधिकारी अेकत्र केले व त्यांना हातातील तरवारीचे टोकाने धुळीवर लष्करी हल्ल्याचा आपला नकाशा रेखाटून दाखविला. बंडवाल्यांवर समोरुन चालून जाण्याचे अैवजी त्याच्या डावीवर प्रथम मारा केला पाहिजे, हें हॅवलॉक आपल्या सैन्याला समजावून देत असताना तिकडे व्यूहबद्धतेने बंडवाल्यांच्या सैन्याला, रचलेल्या सैन्यामध्ये अेका पांढऱ्या शुभ्र घोड्यावर स्वार होअून श्रीमंत नानासाहेब येअून मिळाले. शिपायांना अुत्तेजन देत या टोकापासून त्या टोकापर्यंत नानासाहेब घोडा फेकीत फिरत असताना अिंग्लिशांच्या तळावरुन स्पष्ट दिसत होते. दुपारचे सुमारास अिंग्लिशांचा हल्ला नानांच्या डाव्या बाजूवर चढला. या अेकदम व अनपेक्षित भागी आलेल्या अिंग्रजांच्या निकराच्या माऱ्याला रोखून धरण्यासाठी बंडवाल्यांच्या तोफा गडगडाट करु लागल्या. अिंग्रजांचा तोफखाना येण्यास अुशीर लागल्यामुळे तर बंडवाले जास्तच जोर धरु लागले. परंतु बंडवाल्यांची सरशी पाहून जास्तीच खवळलेला हॅवलॉक जेव्हा पुन्हा अेकदा चढाअी करु लागला, जेव्हा अिंग्रजी हायलॅंडर्स तोंडें फिरवून देअून नीट तोफांवर धावून गेले व जेव्हा अेक पाअूलही मागे न फिरता मरण वा विजय असा कृतनिश्चय करुन अिंग्रजी रणगर्जना विजेसारखी तुटून पडली तेव्हा त्यांच्या त्या अेकीकृत, शिस्तबाज व अनपेक्षित माऱ्याला सहन करण्यास पूर्णत: असमर्थ झालेली बंडवाल्यांची डावी-बाजू तोफा टाकून चुथळू लागली. डावी बाजू अुधळते तों तिकडे अिंग्लिशांच्या पायदळाने बंडवाल्यांची अुजवी बाजूही पराभूत केली. अिंग्रजी सैन्य विजयी झालेलें पाहताच बंडवाले कानपूरच्या रस्त्याने मागे फिरु लागले. परंतु आता निराशेचें अवसान भरलेले असल्याने पुन्हा अेकदा त्यांना नानांनी अेकत्र केलें व राखून ठेव-लेल्या तोफांचे मदतीने पुन्हा रण माजविण्याचा घाट घातला. या वेळेस नानांनी अुत्तेजन देण्याची व स्वत: पुढाकार घेअून अवसान चढविण्याची पराकाष्ठा केली. तथापि हताश झालेले शिपायी व विजयाने धुंद झालेले अिंग्रजी सोजीर यांच्यातील अंतर काटणे फार दुष्कर होते. अिंग्रजांचा आणखी अेक हल्ला चढण्याला अवकाश तों ही निराशेची टक्करही विफल झाली व कानपूरचे रणावर विजयश्री टाकून देअून बंडवाले ब्रह्मावर्ताकडे पळू लागले.[४]

४. रेड पॅम्फ्लेटचा प्रसिद्ध लेखक म्हणतो, " अशी कानपूरची लढाअी झाली. बंडवाल्यांनी चांगलीच झुंज घेतली. त्यांच्यापैकी कित्येकांनी तरवारीस तरवार भिडविली तरी हटले नाहींत. तोफा नेटाने समाळल्या व त्यांची गोलंदाजीही अचूक नेमाची होती.

ता. १७ जुलै रोजी सकाळी हॅवलॉकचें विजयी सैन्य कानपूर शहरांत प्रवेश करूं लागलें. अस्तगत झालेल्या ब्रिटिश अिभ्रतीला पुनरुज्जीवन येणारी ही यशाची पहिली लाट कानपूरच्या रेटीत आणणाऱ्या हॅवलॉकचें व त्याच्या सैन्याचें हिंदुस्थानात व अिंग्लंडात जिथे जिथे म्हणून गोरे रहात होते तिथे तिथे धन्यवाद सुरू झाले. अिंग्लंडातील प्रत्येक रस्त्याच्या कोपऱ्यावर, दुकानांच्या पाटयांवर, गुत्त्यांच्या भिंतीवर जिकडे तिकडे हॅवलॉकचें नाव खोदलेलें !.

कानपूर शहर लुटण्याची परवानगी मिळताच हजारो अिंग्रजी सोजीर, अधिकारी व शीख शिपाअी त्या शहराचे गिधाडागारले लचके तोडू लागले. बिबीगडात अिंग्रजी बायकाचें रक्त सांचलेलें पाहून ते धुवून काढण्यासाठी हॅवलॉकने शहरांतील ज्यांच्यावर वडात सामील असल्याचा वहीम होता अशा ब्राह्मण लोकांना धरून आणलें. प्रथम त्यांना फाशीची शिक्षा देअून फासावर चढविण्याचे आधी तें सांचलेलें रक्त जिभेने चाटावयास लावून नंतर तो भाग हातात झाडू घेअून धुवून टाकावा लागे. ज्याना अेका क्षणानंतर ठार मारावयाचें आहे त्यांचेवर ही अप्रतिम शिक्षा देण्याचें कारण अिंग्रजी अधिकारी देतात, " फिरंगी रक्ताला स्पर्श करणें व तें भंग्याच्या झाडूने धुवून काढणें ही गोष्ट अुच्च जातीच्या हिंदूना धर्मभ्रष्ट करणारी आहे हें मला माहीत आहे. अितकेंच नव्हे तर माहीत आहे म्हणूनच मी तें त्याचेकडून करवीत आहे. आपल्या स्वधर्मात मेल्याचे अल्प समाधानही त्यांना न अुरावें म्हणून त्यांच्या धर्मसमजुतींना जाणून बुजून पायाखाली तुडवून मग त्याना फाशी चढविल्याशिवाय खरा सूड अुगविला जाणार नाही." अिंग्रज लोकाच्या झालेल्या कत्तलीत वडवाल्यांनी त्यांचे धर्मविषयक हाल यत्किंचितही केलेले नाहीत. अितकेंच नव्हे तर जेव्हा जेव्हा अिंग्रजांनी मरणाचे पूर्वी बायबल वाचावयास परवानगी मागितली तेव्हा तेव्हा ती त्याना देण्यात आली होती. परंतु दिल्लीकडे व कानपूरकडे मरणाऱ्या लोकांना स्वधर्मात मरण पावण्याचेंही समाधान अिंग्रजानी अुरू दिले नाही.

तथापि असल्या दुर्दशेतही ज्यांनी मरणाला तत्त्वनिष्ठेच्या धैर्याने हसत हसत मिठी मारली अशा धीर जनांनीही कानपूरच्या फाशीला काही थोडया प्रसंगीच अलङ्कृतता दिली होती असे नाही चार्लस बॉल लिहितो. " जनरल हॅवलॉकने सर ह्यु व्हीलरच्या मृत्यूबद्दल भयंकर सूड अुगविण्यास आरंभ केला. नेटिव्हांचे ताडेचे ताडे फाशीवर चढू लागले या वडवाल्यापैकी काही लोकानी मरणकाली जी मानसिक अचलता व धीरोदात्तता प्रदर्शित केली ती अेखाद्या तत्त्वनिष्ठेसाठी आत्मयज्ञ करणाऱ्याना भूषणभूत होणारी होती. कानपूरच्या स्वदेशी मॅजिस्ट्रेटापैकी ज्यांनी वडामध्ये नानाना अत्यंत साह्य केलेले होते व जो फिरंग्याचा कट्टा द्वेष्टा होता अशा अेका मॅजिस्ट्रेटाची चौकशी चालली असताना व त्याला अधम, नीच जनोचित मृत्यूची शिक्षा ठोठावण्यात येत असता तो अितका बेफिकीर दिसत होता की जणू

काय ती मरणाची शिक्षा त्याला दिली जात नसून दुसऱ्याच कोणाला दिली जात आहे ! प्रशांत स्थिरतेने अुठून त्याने जज्जाकडे पाठ फिरविली. त्याच्यासाठी अुभारलेल्या फाशीकडे तो दृढपदन्यासाने चालत गेला, मांग लोक फाशीची शेवटची तयारी करीत असता लवलेशही चलविचल न झालेल्या निश्चल मुद्रेने तो मांगाच्या हालचालींकडे सहजगत पहावें तसें पहात राहिला व यत्किंचितही चुकवाचुकव न करता योगी समाधींत शिरतात तसा तो आपल्या समाधान युक्ततेने फासांत शिरता झाला ! त्याच्या धर्मनिष्ठेने त्याला मरणाची भीति अुरलेली नव्हती. फिरंग्याच्या दुष्ट संसर्गापासून सुटका करून परलोकाचें अढळ सुख देणारा मार्ग म्हणजे मरण होय. अशी ज्याच्या धर्माची निष्ठा होती त्याला मरणाचें भय ते कसें स्पर्श करणार !"[५]

कानपूर शहरामध्ये ब्रिटिश सैन्याचा असा मनमुराद सूड अुगविला जात असताना, मूठभर अिंग्रज सैन्याने व राजनिष्ठ शीख शिपायांनी अलाहाबादेपासून चाल केल्यानंतर जी व्यवस्थित, शिस्तवाज, संघटित व निर्धारयुक्त लष्करी शूरता दाखविली होती तिची यथार्थ स्तुति करून आपल्या सैन्याला अुत्तेजन देण्यासाठी हॅवलॉकने पुढील लष्करी ऑर्डर प्रसिद्ध केली, "सोल्जर्स, तुमच्या सेनापतींला तुमच्या वर्तनाने संतोष—अतिशय संतोष झालेला आहे. निष्ठेत व निर्धारात निपुणतर असणारी अशी दुसरी सेना त्याने पाहिलेली नाही. ७-व्या व १६-व्या तारखेच्या मध्यंतरात, अुन्हाच्या तीव्र सूर्याला न जुमानता तुम्ही अेकशेवीस मैल चाल केलीत व चार लढाया मारल्यात." परन्तु हातीं घेतलेलें कार्य पूर्ण संपल्याशिवाय खोटें समाधान मानीत हॅवलॉक स्वस्थ बसणारा जनरल नव्हता. समाप्तीशिवाय सपणें नाही हा त्याचा बाणा असे. त्याने सैन्यास वरील अुत्तेजन देअून पुढे सांगितलें, "तुमचे लोक लखनौला संकटग्रस्त आहेत. आग्न्याला वेढा पडला आहे. बंडाच्या जातीच्या हातात दिल्ली अद्यापही वेढलेली आहे. तुम्हास महत् यशाची प्राप्ति हवी असेल तर तुम्हास महत्स्वार्थत्यागच केले पाहिजेत, तीन शहरे सरक्षावयाचीं आहेत—दोन वधमुक्त करावयाचीं आहेत. ही सर्व कामगिरी निश्चिततेने पूर्ण कराल, याची तुमच्या सेनापतीला बालंबाल खात्री आहे. फक्त तुम्ही तितक्याच अुत्साहभराने त्याला साह्य व्हावे, व तुमच्या शौर्याप्रमाणेच तुमची शिस्तही अचलप्रतिष्ठ असावी !!"

---

५. Fortified by the assurances of his creed, death to him was but a transition from the hated association of the infidel Feringhies to the blissful enjoyment of paradise ".

—Charles Ball's Indian Mutiny Vol. I, page 388.

हॅवलॉकचे मागोमाग जनरल नीलही अलाहाबादेला संरक्षण करण्यापुरते अिंग्रजी सैन्य ठेवून बाकीच्या फौजेसह कानपूरला येअून पोहोंचला. समानाधिकाराचे हे दोन ऑफिसर अेकत्र येताच दोघानाही आपले श्रेष्ठत्वाखाली सर्व फौज असावी अशी महत्त्वाकांक्षा अुत्पन्न होअून आधीच अत्यंत बेशिस्त झालेल्या अिंग्रजी सेनेत जास्तच बेबंदशाही माजण्याचा संभव आहे असे पाहून हॅवलॉकने नीलला भेटताच स्पष्ट सांगितलें, "जनरल नील, आता अेकमेकांस आपण स्पष्ट ओळखून रहाणेंच बरें. जोपर्यंत मी येथे आहे तोपर्यंत सर्व सत्ता माझीच असेल. तुम्ही कोणताही हुकूम सोडता कामा नये !" ह्या सार्वजनिक कार्यात व्यक्तिविषयक मत्सराला स्थान नसावें, अेतदर्थ त्या दोघा अंमलदारांनी यापेक्षा जास्त थराला गोष्टी न पोचू देता कानपूरला नीलने सभाळावें व लखनौच्या मुक्ततेकरिता निघणाऱ्या सेनेवरील सेनापतित्व घेअून हॅवलॉक अयोध्येकडे कूच करू लागला. नीलने कानपूरच्या रक्षणाकरिता अेक नवीनच तोड काढली. ती ही की, तेथील महारांची अेक सेना तयार करून तिच्या बंदोबस्तात सर्व शहर सोपवून दिलें. त्या शहरातील अुच्च जातींविरुद्ध अतिशूद्रांना चढवून देणें ही तोड अर्थातच अुत्तम रीतीनें सिद्धीस गेली. मुसलमान व हिंदु यांच्यात फूट पाडता आली नाही, तेव्हा जातिभेदाचें नवेंच भूत अुभें करण्यात आलें व ते यशस्वीही झालें !

## हिंदुधर्माकरिता व हिंदुराज्याकरिता पुन्हा अेकदा झुंजलें पाहिजे !

कानपूरला पराभव झाल्यानंतर श्री. नानासाहेब पेशवे ब्रह्मावर्ताहून खजिना, शस्त्रास्त्रें व सैन्य घेअून गंगापार झाले होते. १८५७-चे स्वातंत्र्ययुद्ध ते क्रांतिवीर केवळ स्वधर्म व स्वराज्य यासाठींच कसे लढत होते हें सिद्ध करण्यासाठी त्याच काली त्याच प्रदेशात त्या वेळचे युद्धप्रसंग ज्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले असे वरसअीकर वे. शा. सपन्न विष्णुभट गोडसे यानी आपले प्रवासवर्णन त्या वेळेसच लिहून ठेवलें आहे. ते प्रवासवर्णन, 'माझा प्रवास अथवा सन १८५७ सालच्या बंडाची हकीकत' या नावाने श्री. चिं. वि. वैद्य यानी छापवून प्रसिद्ध केले आहे. त्या पुस्तकात श्री. गोडसे भटजींनी कानपूर सोडतेवेळचा प्रसंग मोठ्या हृद्य भाषेत दिलेला आहे. "अंधार पडल्यावर नावा सज्ज करून त्यांत वर अुल्लेखिलेले सामान भरल्यानंतर बाळासाहेब अित्यादिकाना निरोप देण्यासाठी जे सहस्रावधि नागरिक गंगेच्या तीरावर जमले होते, त्या सर्वांना नौका हाकारण्यापूर्वी नम्रपणानें नमस्कार करून किंचित् सद्गदित होअून श्रीमंत बाळासाहेब म्हणाले की, "कानपुरावर आमचा मोड झाला त्या प्रसंगात तात्या टोपी, जळका रामभाअू व लालपुरी बावा गोसावी अित्यादि आमचे सरदार कोठे गेले त्याचा आम्हास पत्ता नाही, असो. ते दूर आहेत, त्याबद्दल आम्हास बिलकूल काळजी नाही. तुम्हास सोडून जाणे मात्र आमचे

जिवावर आलें आहे. परंतु अिलाज नाही. हिंदुधर्माकरिता व हिंदुराज्याकरिता पुन्हा अेकदा झटलें पाहिजे ! याजकरिता हें जें संकट अीश्वरानें आमचे हातून तुमच्यावर ओढविलें त्याजबद्दल कृपा करून आम्हांस क्षमा करा." १

नानांचा गंगा अुतरल्यानंतर पहिला मुक्काम फत्तेगडास जनताना अिंग्रजी सैन्यानें ब्रह्मावर्तांचा राजवाडा धुळीस मिळवून पुढे अयोध्येकडे मोर्चा फिरविला. नानांच्या पुढील हालचालींची काहीच बातमी न कळल्यामुळे हॅवलॉक लखनौकडे चळला. जून महिन्याच्या शेवटीं शेवटीं सर्व अयोध्या प्रांत हें बंडाचें अेक शिबिर मोहोळच होअून बसलेलें असल्यानें त्या प्रांतातून मार्ग काढीत लखनौला पोचणें व तेथील वेढा अुठवून सर हेन्री लॉरेन्सला मुक्त करणें हें कृत्य फार दुर्घट असताही विजयाच्या पहिल्या आवेशात कानपूरपासून गंगानदी अुतरून लखनौला मिळणें हें हॅवलॉकला व त्याच्या सैन्याला अत्यंत सुलभ वाटू लागलें. दिल्लीला जाणें म्हणजे दिल्ली जिंकणें होय, ही समजूत जशी पंजाबातून अुतरणाऱ्या अिंग्रजी सेनानींना पछाडीत होती तशीच गंगा अुतरणें म्हणजे लखनौ घेणें ही समजूत अलाहाबादेकडून येणाऱ्या हॅवलॉकला आता पछाडू लागली. कानपूरपासून लखनौ शहर हें फार लांब नव्हतें हें खरें आहे. हेंही खरें आहे कीं, अलाहाबादेहून कानपूरपर्यंत येताना हॅवलॉकनें जी नेटाची तडफ दाखविली ती वाटेल तें दुष्कर कार्य करविण्याची स्फूर्ति आपणारी होती. परंतु अयोध्येमध्ये जिथे बंडाची ज्वाला पेटलेली नव्हती अशी अेक पाअूलभरही जागा या वेळेस मुळीच नव्हती. हिंदुस्थानात ज्या पुरभय्या शिपायांनी बंडाचा आरंभ केला त्या पुरभय्यांचा अयोध्या हा पाळणा असल्यामुळे तेथील खेड्याखेड्यातून, झोपडीझोपडीतून त्या पुरभय्यांचे आअीबाप, मुलेबाळें, सगेसोयरे, अिष्टमित्र सर्व राज्यक्रांतीच्या अनिवार्य चेतनेनें पेट घेत होते. तथापि विजयानें फुरफुरलेल्या आग्लसेनानीला ही परिस्थिति भिवबू शकली नाही. अुलट त्याचा अुत्साह अितका वाढला की, मी दृष्टिपाताबरोबर लखनौ जिंकून घेअून मगच दिल्लीला जाअीन व दिल्लीही घेअून पुन्हा आग्र्याला मुक्त करीन, अशा हिमतीनें तो हॅवलॉक सुमारें २००० अितिरक्षाचें गोरें सैन्य व १० तोफांसह, ता. २५ जुलैला गंगानदी अुतरता झाला. कानपूरला जनरल नील राहिला आहे व लखनौला हॅवलॉक चालला आहे असा तऱ्हेची अिंग्रज सैन्याची स्थिति जुलैच्या शेवटच्या दिवसानें पाहिली होती.

* * *

१ माझा प्रवास, ले. विष्णुभट गोडसे, पृष्ठ ३७.

## प्रकरण तिसरें

# बिहार

वायव्य प्रांत, अलाहाबाद, आग्रा येथील भूमीमध्ये जें स्वातंत्र्याचें वारें भरलें होतें त्याच्या संचारापासून बहार प्रांत (बिहार) व त्याची राजधानी पाटणा शहर अलिप्त राहिलें नव्हतें. पाटणा भागामध्यें असलेल्या निरनिराळ्या जिल्ह्यांपैकी गया, अरा, चप्रा (छप्रा) मोतिहारी व मुझफरपूर हीं प्रत्येकी मुख्य शहरें असून त्या भागाच्या. बंदोबस्तासाठी ठेवलेलें लष्कर पाटणा शहरापासून नजीकच असलेल्या दानापूर शहरीं छावणी देऊन राहत असे. ७-वी, ८-वी व ४०-वी नेटिव्ह पायदळ रेजिमेंट व नेटिव्ह सैन्याला दावांत ठेवण्यासाठीं युरोपियन तोफखाना व अेक युरोपियन रेजिमेंट अितके सैन्य खुद्द दानापूरला मेजर जनरल लाअिडच्या हाताखालीं व नेटिव्ह घोडेस्वाराची १२-वी रेजिमेंट सिगवली सिहारी या शहरीं मेजर होम्सच्या हाताखालीं होती.

पाटणा शहर हें मुसलमानी धर्मांतील वहाबी नावाच्या अत्यंत कडव्या जातीचें अितिहासप्रसिद्ध केंद्र असल्यामुळें त्या शहराला सत्तावनचें वारें पछाडल्यावाचून राहणार नाहीं अशी तेथील अिंग्रजी कमिशनर टेलर याची पूर्ण समजूत असल्यामुळें त्या जातीच्या पुढाऱ्यांवर त्यानें अेकनारला डोळा ठेवलेला होता. अिंग्लिशांचें जोखड अत्यंत अप्रिय असलेल्या त्या पाटणा शहरानें अिंग्रजांचें राज्य अुलथून पाडण्यासाठीं गुप्त मडळाची स्थापना केलेली होती. ह्या गुप्त मंडळात मोठमोठाले श्रीमान् व्यापारी, पेढीवाले, जमिनदार असले असले लोक सामील झालेले असल्यामुळें राज्यक्रांतीच्या कार्यसिद्धीसाठीं त्या मंडळाचा द्रव्यनिधीहि भरपूर जमलेला होता. मोठमोठे मौलवी त्या मंडळाचें प्रमुखत्व स्वीकारीत असल्यामुळें त्याच्या प्रयत्नांना धर्माचें पावित्र्य व गांभीर्य प्राप्त झालें होतें लखनौच्या क्रांतिमंडळाशीं व दानापूर वगैरे शहरीं असलेल्या शिपायांशीं त्यांचें दळणवळण व पत्रव्यवहार सुरू होते. पाटणा शहरांतील पोलिसांपासून तों पुस्तकविक्या दुकानदारापर्यंत ते सर्व शहर स्वराज्य मिळविण्यासाठीं अिंग्रजी सत्तेवर पहिला घाव केव्हा पडतो अशी वाट पहात अुत्सुकलेलें होतें.

ह्या गुप्त मंडळाचें पाटणा हें मुख्य ठिकाण असून तेथील विस्तीर्ण वस्तीच्या कोनाकोपऱ्यापर्यंत क्रांतिकारक मंडळाची जाळी पसरलेली होती. शहरांतील प्रख्यात मौलवी त्या मंडळाचें नेतृत्व स्वीकारीत असल्यानें त्याच्या राज्यक्रांतिकारक अुपदेशांना व प्रयत्नांना धार्मिक ओज, पावित्र्य व गांभीर्य प्राप्त होअून लोकलढ्याचा अंगीकार करणाराना फिरंगी हें नाव हालाहल विषारासारखें जाळू लागलें. मोठमोठाले श्रीमान् व्यापारी, पेढीवाले, जमिनदार असले असले लोक त्या गुप्त मंडळाचे सभासद

झाल्याने राज्यक्रांतीच्या कार्यसिद्धीसाठी द्रव्यबळाची कोणतीही जुणीव न ठुरून सरहद्दीसारख्या दूरच्या प्रदेशातही अिंग्रजी राज्याविरुद्ध बंड अुपस्थित करण्यासाठी पैसे घाडता येतील अितका जबरदस्त धननिधि साचत गेला.[1] या क्रांतिकटात पोलिसांचे लोकही सामील झालेले असल्याने रात्रीच्या गुप्त बैठकी बिनबोभाट पार पडू लागल्या. अंतस्थरी अिंग्रजाविरुद्ध लढण्यास तयार असलेल्या शेकडो लोकांना आपल्या सभासदांच्या निरनिराळ्या नावावर नोकरीस ठेवून त्या गुप्त लष्कराचा पगार क्रांतिमंडळातून देण्यात येअी. पोलिसापासून तों पुस्तकविक्या दुकानदारापर्यंत पाटणा शहर अिंग्लिशाच्या द्वेषाने व स्वराज्याच्या चेतनेने आतल्या आत पेट घेअून भडकून राहिलेलें असता त्याच्या ज्वाला त्या विस्तीर्ण प्रांतात दशदिशांना गुप्त चेतना देत धावत चालल्या. मोठमोठाल्या जमिनदाराशी व त्या भागातील जिल्ह्यांच्या प्रमुख शहरांशी पाटण्याच्या क्रांतिमंडळाने दळणवळण सुरू करून त्या भागात संरक्षणार्थ ठेवलेल्या नेटिव्ह लष्कराच्या छावण्या आपल्या कटामध्ये पूर्ण सामील करून घेतल्या. त्या प्रांतातील दानापूरच्या शिपायांची छावणी रात्रीच्या काळोखात झाडाखाली गुप्तसभा भरवू लागली. अिंग्रजी टोळी आपल्या टेहळणीस आलीशी वाटली की तिला अंधकारात गारद करून टाकण्यासही आरंभ झाला!! पाटणा प्रांतातील निरनिराळ्या लोकशक्ति अशा रीतीने क्रांत्युत्सुक होताच त्यांची लखनौच्या, दिल्लीच्या व अितर शहरांच्या क्रांतिमंडळाशी गुप्त खलबतें चालू झालीं.

असे हें राज्यक्रांतीचें, आंग्लद्रोहाचें व असंतोषाचें भयंकर भुयार आपल्या अुदरात सांचविलेल्या दारूचा भडका होअून केव्हा फुटावयाचें याचा खल अखेर करीत असता पाटणा शहराचा आंग्ल कमिशनर टेलर याच्या कानीं मीरतची वार्ता येअून आदळली. या वार्तेच्या मागोमाग दानापूरास असलेल्या शिपायातही चलबिचल चालल्याची वातमी त्याला लागली. तो कमिशनर धूर्त होता. सर्व हिंदुस्थान राजद्रोही बनू लागले तरी शीख लोक अजून अस्सल राजनिष्ठ होते. अेतदर्थ रॅटरेच्या हाताखालील सुमारें २०० शीख शिपाअी पाटणा शहराच्या संरक्षणासाठीं टेलरने तातडीनेच बोलावले व त्या बोलावण्याप्रमाणे ते पाटण्याकडे यावयास निघाले.

---

१. Sir William Hunter proved that 5 years before 1857 there existed at Patna a great treasonable organisation, supplying *men and money to the fanatical camp on the frontier,* that this organisation was the organisation of the Wahabis, and that one of the wahabis arrested by Mr. Taylor, was the determined and resolute leader He was subsequently tried, convicted of treason and transported to the Andaman. "

परंतु वाटेमध्ये सर्व प्रांतभर त्यांची अहोरात्र छीथू चालू झाली ! स्वदेशाशी निमक-हरामपणा करीत असल्याचा त्यांच्यावर आरोप करण्यात येअी, वाटेची गावें त्याना चक्रोक्तीने विचारीत "तुम्ही अस्सल शीख आहात की वाटे फिरंगी आहात ?" गुप्त च अुघड रीतीने त्याना अुपदेश देण्यात येअी की वेळ येताच तुम्ही स्वदेशीयाच्या वतीने लढावें ! त्या सर्व प्रांताचे शिव्याशाप मस्तकावर घेत घेत हे राजनिष्ठ शीख शिपाअी जेव्हा पाटणा शहरात घुसू लागले तेव्हा तर लोकद्वेषाच्या ज्वाला रस्त्या-रस्त्यांतून त्यांना चाटीत जाअू लागल्या. त्याना पाहताच त्या मानी शहरातील प्रत्येक नागरिक त्याची सावलीही आपल्या अंगावर पडू देअीना ! फार काय, पण त्या स्वातंत्र्यप्रिय नगरीतील मुख्य शीख अुपाध्यायानेही आपल्या शीख मंदिरात त्या स्वधर्मद्रोही अनुयायांना येअू देण्याचें साफ नाकारले ! परकयांच्या सत्तेला प्रणाम करणारे प्राणी डोक्यावर केसांची चुंबळ ठेवली तरी गुरु गोविंदसिंगाच्या शीख धर्माचे ते खरे भक्त होत नाहीत अशी त्या शीख गुरूचीही समज झालेली होती. अशीच मुसलमानी मौलवींची समज, हिंदु प्रयागवळाची हिंदु समाजाविषयी समज झालेली होती. ह्यावरून स्वधर्म व स्वराज्य ह्या तत्त्वद्वयांची किती यथार्थ अेक-वाक्यता झालेली होती ह्याचे पाटणा शहर हें अुत्कृष्ट अुदाहरण होय ! [१]

शीख लोकांचें सैन्य पाटणा शहरात येताच मग टेलरने बडाची ठिणगी चिरडून टाकण्यासाठी कंबर बांधली. पाटणा भागापैकी तिरहूत जिल्ह्यामध्ये असलेल्या पोलिसाचा जमादार वारीस अल्ली ह्याच्या वर्तनाविषयी तेथील अधिकाऱ्यांस शंका आल्याने त्यानी त्याच्या घरावर अेकदम छापा घालून त्यास पकडून आणलें. हा अिंग्रजी नोकरीतल्या पोलिसाचा जमादार गयेच्या अल्ली करीम नावाच्या क्रांति-कारक पुढाऱ्याला नुकतेच अेक पत्र लिहीत होता ! त्याच्या घरी सापडलेल्या बंडखोर पत्रव्यवहारावरून त्याला लवकरच देहान्ताची शिक्षा देण्यात येअून जेव्हा फाशी-जवळ आणलें तेव्हा तो अेकदम जमलेल्या लोकाकडे वळून ओरडला, "स्वराज्याचा चर अिथे कोणी खराखुरा भक्त असेल तर तो माझी येथून मुक्तता करो !" त्याची ही विनवणी स्वराज्याच्या भक्ताना अेकू जाण्यापूर्वीच त्याचा निर्जीव देह फाशीवर लोंबत होता !

या वारीम अल्लीच्या पत्रामध्ये सापडलेल्या पुराव्यावरून वरील मुसलमानी पुढारी अल्ली करीम यालाही पकडण्याचा हुकूम सुटून त्या कामावर अेक युरोपियन टोळी धाडण्यात आली. मि. लुअी हा समोर दिसतो न दिसतो तों अल्ली करीम आपल्या हत्तीवर चढला व तो पुढे व लुअी पाठीमागे अशी जंगी शर्यत सुरु झाली.

---

१. As soon as the Sikhs entered the town, a wild fakir rushed into the road and with savage menaces and threatening gestures reviled them as traitors and accursed. "—Patna Crisis by Taylor.

परंतु लवकरच पर्यंतीच्या वेळेस जमलेल्या प्रेक्षकांनी मात्र आपले प्रेक्षकत्वाचे अधिकार अुल्लंघन करून पक्षपातीपणास आरंभ केला. आजूबाजूच्या गावकऱ्यांनी आपल्या स्वदेशबंधूवर हा फिरंगी मनुष्य तुटून पडतोसा पाहताच त्याला त्रास देण्यास सुरवात केली. त्याची वाट चुकविली गेली व त्याच्यापाशी असलेले अेक छोटेसें तट्टूही पळवून नेण्यात आले! 'श्रमाने व निराशेने सिजलेला' तो अिंग्रजी अंमलदार आपल्या नेटिव्ह हस्तकाकडे त्या चपल करीमाचा पाठलाग करण्याचें सोपवून देअून दुसरे दिवशी हात हलवीत परत आला. त्याचा नेटिव्ह हस्तकही फिरंग्यांचा कट्टा द्वेष्टा असल्यामुळे त्याने करीमास खुशाल सोडून दिलें व आपल्या गोऱ्या धन्याकडे गोरेमोरें तोंड करीत परत आला.

पाटणा प्रांतामध्ये ही धराधरी चालली असता पाटणा शहरातील कित्येक पुढाऱ्यांचीं नांवें टेलरला निरनिराळ्या मार्गांनि कळण्यात येअून त्याने त्याच्यावरही आकस्मिक घाला घालण्याचा निर्धार केला. क्रांतिपक्षाच्या प्रमुख पुढाऱ्याच्या घरी क्रांतिकारकांच्या बैठकी रात्रीच्या अंमलात भरत असताही त्यातील गुप्ततेने सभासदांची नांवनिशी किंवा कार्यक्रमाचा साधार सुगावा जरी टेलरच्या हाती नव्हता तरी त्या शहरच्या तीन अत्यंत वजनदार मौलवींच्या कारस्थानाबद्दल मात्र मुळीच शंका नसल्याने त्याना प्रथम वदीत टाकणे टेलरला जरूर वाटलें. पण जर अुघड रीतीने त्यांना धरावें तर क्वचित् दग्याधोप्याला तेथूनच आरंभ होअील अशा भीतीमुळे त्या अिंग्रजी अमलदाराने अेक दुसरीच युक्ति योजली. अेके दिवशी त्या शहरातील निवडक लोकांना राज्यव्यवस्थेबद्दल पोक्त सल्ला देण्यासाठी टेलर साहेबाच्या घरी आदरातिथ्यपूर्वक आमंत्रणे देण्यात आलीं. त्याप्रमाणे सर्व लोक टेलरच्या बंगल्यावर येताच शिपायांच्या तरवारीसह टेलर तेथे आला व काहीं सभाषण झाल्यावर आमंत्रित पाहुण्याना निरोपही देण्यात आला. परंतु ते तीन मौलवी जाअू लागताच त्याना टेलरने थोपवून धरलें व हसत हसत कळविलें की, " प्रस्तुतच्या क्षुब्ध स्थितीमध्ये आपल्याला स्वतंत्र राहू देणें हें राज्यास अपायकारक असल्याने तुम्हास कैद करण्यात आलें आहे " अशा या ब्रिटिश कायद्याबद्दल 'के' हा अितिहासकार म्हणतो "परंतु कोणत्याही सत्यवादी मनुष्याच्या हे ध्यानात येअील की ब्रिटिशानी केलें असता जें कृत्य 'कारस्थानीपणा' होअू शकतें तेच कृत्य जर अेखाद्या मुसलमानाने ब्रिटिशांविरुद्ध केलें असतें तर फार निराळ्या नावाखाली मोडलें जातें. स्नेहाच्या नात्याने काहीं गृहस्थास बोलाविणें, ब्रिटिश सरकारचे पाहुणे म्हणून त्यांना निमंत्रण देणें व नंतर ते विश्वासाने आपल्या घरी आले असता त्याना कैद करणे हें कृत्य जवळजवळ विश्वासघात आहे, असे नसून प्रत्यक्ष विश्वासघात आहे. त्या मौलवींनी जर किंचित्ही प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला असता तर त्यास ठारही मारण्यात येतें!" तथापि राज्याला अत्यंत हितकारक अशा सबबीवर त्या कृत्याचा सुर्वत्र गौरवच झाला व टेलरच्या तर्फेचे सर्व अिंग्रज कौतुक करू लागले.

राज्यक्रांतिकारक पुढाऱ्यांना असें रक्ताचा अेक बिंदुही पाडल्याशिवाय पकडल्याबरोबर या आकस्मिक घातानें स्तिमित झालेल्या पाटणा शहराला त्याची ही धीरावस्था संपण्यापूर्वीच आणखी दोन टोले मारुन निश्चेष्टित करुन पाडावें म्हणून टेलरने नागरिकांना नि:शस्त्र करण्याचा व रात्री ९ चे नंतर घरातून कोणीही बाहेर न पडण्याचा हुकूम सोडला. या हुकमामुळे क्रांतिपक्षाच्या रात्रीच्या गुप्त बैठकीही अशक्य झाल्या. शस्त्रसंचयाचीही बंदी झाली. अितके वेळपर्यंत पाटण्याचे क्रांतिमंडळ अुठावणीची निशाणी दानापूरचे शिपायाकडून येण्याची वाट पाहत होते. परंतु त्याच्या आधीच हे प्राणघातक प्रहार सुरू झाल्यामुळे आता धाडसाने त्यासाली चिरडून जाण्यापेक्षा अुठावणीच करावी असा त्यांतील पुढाऱ्यांचा बेत ठरला. जुलैच्या तारीख ३-ला पाटणा शहरातील पीरअल्ली नावाच्या पुढाऱ्याच्या घराकडे मुसलमान लोटू लागले. थोडक्याच वेळात त्या घरातून अेकामागून अेक हिरवे ध्वज बाहेर पडून 'दीन बोलो दीन' म्हणून गर्जना अुठली! सुमारे दोनशे जिहादी लोकांनी त्या हिरव्या ध्वजाना मिरवीत मिरवीत चर्चवर हल्ला केला. अितक्यात अेक लायल नांवाचा गोरा काही शिखांसुद्धा चालून येताना दिमताच पीर अल्लीने त्याला गोळी घालून पाडले व मग त्या गोऱ्या रक्ताचा पहिला बळी पडल्याबरोबर बाकीच्या मुसलमानांनी त्या गोऱ्यावर अितके वार केले की त्याचें तोंड ओळखणेंही मुष्कील झालें. परतु जेव्हा रॅटरे आपल्या शिखासुद्धा चालून आला, जेव्हा त्या राजनिष्ठ शिखानी त्या स्वदेशबांधवावर निकराचा हल्ला केला, जेव्हा आपल्या हिंदुस्थानच्या पोटात शिखानी आपली तरवार खुपसली व जेव्हा शिखाचीं शरीरें हिंदमातेच्या रक्ताने लाल होअून थोभू लागली तेव्हा त्या निकराच्या माऱ्यापुढे त्या मूठभर क्रांतिकारकाचा जमाव फुटून छिन्नभिन्न झाला. अिंग्रजानी दंगेखोराच्या पुढाऱ्याना भराभर कैद केलें. त्यातच लायलला मारणारा पीरअल्ली हाही त्याच्या हाती पडला.

पीरअल्ली हा मूळ लखनौचा रहिवासी असून तो अलीकडे पाटणा शहरी पुस्तक-विक्रीचा धंदा करीत होता. विक्रीच्या पुस्तकाना वाचता वाचताच त्याला देशस्वात-त्र्याची गोडी लागू लागली. त्याला स्वधर्मप्रतिष्ठापनेची महत्त्वाकांक्षा आली. त्याच्या मनाला पारतंत्र्याची जखम व त्याच्या पायाला गुलामगिरीची बेडी असह्य होअू लागली. दिल्ली व लखनौ शहरातील क्रांतिमंडळाशी त्याने दळणवळण पाडून अिंग्र-जांच्या राज्याविषयी त्याच्या हृदयात सलत असलेल्या लज्जाशल्याचें तो अितराच्या हृदयातही रोपण करु लागला. तो जातीने पुस्तकविक्रेता होता परतु पाटण्याच्या क्रांतिमंडळात त्याचें अितके वजन वाढले की त्याच्या पदरी अनेक सशस्त्र नौकर मंडळातील श्रीमंत लोकाच्या द्रव्यसाहाय्यानें ठेवले जाअून त्या सर्वांना आज्ञा मिळताच अिंग्रजी राज्याविरुद्ध युद्ध करण्याची शपथ दिलेली असे. पाटण्याच्या अिंग्रजी अधि-काऱ्याने भयकर जुलुमाला व जाचाला आरंभ करताच पीरअल्लीच्या कडक स्वभा-वाला मुळीच स्वस्थ बसवेना. तो वर्तनाने अत्यत करारी, बाणेदार व शूर होता.

त्याला स्वदेशाचे हाल पहावेनात म्हणून त्यानेच मागितल्याप्रमाणे "अपवित्र स्थितीची अुठावणी केली !" फाशीची शिक्षा देण्यात आल्यानंतर ज्याच्या हातांत जड जड बेड्या आहेत, अंगावर झालेल्या जखमांनी ज्याची वस्त्रें रक्तबंबाळ झालेली आहेत व मरणाच्या यमयातनेला आपल्या मुद्रेवरील वीर स्मिताने जो धिक्कारीत आहे असा तो पीरअल्ली फाशापुढे अुभा राहिला. त्याच्या प्रियकर मुलाचें नांव घेताना त्याचा कंठ सद्गदित झाला. अितक्यात अिंग्लिश अधिकाऱ्यांनी विचारलें "पीरअल्ली, तू अितरांची नावे सांगत असशील तर तुला जीवदान मिळण्याचा संभव आहे." शांत रीतीने त्या अिंग्रजाकडे वळून तो धीरोदात्त स्वरात म्हणाला, "आयुष्यात काही प्रसंग असे असतात की त्या क्षणीं आपले रक्षण करणें हें अिष्ट असतें—पण काही असे असतात की त्या क्षणी प्राणांची आहुति देणें हेंच अिष्टतर असतें—हा क्षण आयुष्यांतील त्या प्रसंगापैकी अेक आहे की ज्या प्रसंगी चिरंजीवनाचें अुत्तम साधन म्हणजे सत्काल मरणाला मिठी मारणें हेंच होय !" नंतर अिंग्लिशांनी केलेल्या अनंत अन्यायांची निर्भीड भाषेने निंदा करून तो लोकोपकारार्थ आत्मार्पण करणारा शहीद म्हणाला "मला तुम्ही फाशावर चढवाल, माझ्यासारखे अितर लोक फाशावर चढवाल परंतु तुम्हाला आमचें ध्येय फाशावर चढविता येणें शक्य नाही. मी मेलो तरी माझ्या रक्तातून हजारो नवीन कार्यकर्ते अुत्पन्न होतील व तुमच्या अंमलाचा अुच्छेद करतील !"[3]

अशी भविष्यवाणी बोलून हा देशवीर आपल्या अस्तित्वाने स्वदेशावर यत्किंचितहि लज्जेची छाया न टाकता आपल्या मरणाने स्वदेशाच्या देशवीर मंडलाच्या तेजोमय प्रभावळींत प्रतिष्ठा पावता झाला ! !

"माझ्या रक्तातून हजारो नवीन कार्यकर्ते अुत्पन्न होतील" हा त्या शहीदाचा जो शेवटचा वर्णोच्चार होता तो काही खोटा होणारा नाही—वा तो काहीं खोटा झालेला नाही ! त्याच्या वधाची बातमी कळताच अत्यंत राजनिष्ठ म्हणून गणलेली दानापूरची नेटिव्ह फौज ता.२५ जुलै रोजी बंड करून अुठली. दानापूरला युरोपियन तोफखाना व गोरी रेजिमेंट असताही ह्या तीन नेटिव्ह रेजिमेंटस् आपल्या शस्त्रांसुद्धा–

---

३. Kaye Vol. III, page 86

Commissioner Taylor himself says : " Peer Ali himself was a model of a desperate and determined fanatic. Repulsive in appearance with a brutal and sullen countenance, he was calm, self-possessed, almost dignified in language, and demeanour. He is the type of a class of men whose unconquerable fanaticism renders them dangerous enemies and whose stern resolution entitles them in some respects, to admiration and respect.".

कंपनीने मुनिफापंत् लिररराराने फेकून देऊन शोण नदीकडे निघून गेल्या. त्या ठिकाणचा मुख्य अधिकारी मेजर जनरल लाॅईड याच्या भयग्रस्ततेमुळे व वार्धक्यामुळे त्याला शिपायांचा तात्काळ पाठलाग करण्याची छाती झाली नाही.

अिंग्लिशांचा मेजर जनरल आपल्या वार्धक्यामुळे जरी असा पंगु झालेला होता तरी ज्या दिशेला त्या नेटिव्ह रेजिमेंटस् चाललेल्या होत्या त्या दिशेकडे ज्याच्या तरवारीत व ज्याच्या भुजदंडात अजून तारुण्याचें तेज खेळत होते असा अेक अप्रतिम वृद्धयुवा आपल्या वार्धक्याला न जुमानता जगदीशपूरच्या राजवाड्यात मिनां-वर पीठ भरीत अुभा राहिलेला होता—व त्याच्याच ध्वजाकडे हे शिपाअी दौडत चाललेले होते!

अिंग्रजांच्या अमलाचें जोखड अुगारून दिल्यानंतर ज्या अेका न्यूनतेने आजपर्यंत स्वातंत्र्याच्या शिपायाचे व लोकांचे सर्व परिश्रम विफल होत होते ती धुरंधरत्वाची न्यूनता ह्या शहाबाद जिल्ह्यात तरी जगदीशपूरच्या वाड्याने अुभ्या दिलेली नसल्या-मुळे त्या जगदीशपूरच्या हिंदुराजाच्या ध्वजाकडे शोण नदी अुतरून हे शिपाअी दौडत चाललेले आहेत! कारण स्वराज्यसंग्रामाला साजेल असा अेक धुरीण असेर त्या सैनिकांना जगदीशपूरकडेच लाभणार होता! रजपूत पूतवंशदानीतच ह्या स्वातंत्र्य-प्रिय धुरीणाचा जन्म झालेला असून कुंवरसिंह हे त्याचे नाव होतें! शहाबाद तालुक्यातील विस्तीर्ण भूमीचें स्वामित्व ह्या कुंवरसिंहाच्या अुदारचरित वंशांत सुप्र-तिष्ठ झालेलें होतें व त्या राजवंशावर तेथील लोकपदाची निसर्गस्फुरित प्रीति जडलेली होती. मोठमोठ्या बादशाहांचीं तुफानें हिंदुस्थानच्या राजकारणसमुद्रात अुठून ह्या प्रदेशात आकाशातून गडगडत जात येत असता परम कारुणिक रजपूत राज-छत्राखाली तो प्रदेश स्वराज्यसुखाचा व स्वातंत्र्यचैतन्याचा अखंडित लाभ घेत आलेला होता. राजकारणातील शतींचे ऋतु बदलत असता त्याच्या आतप-वृष्टि-शीत्यादींचे असह्य आघात आपल्या शिरावर तोलून धरून कुंवरसिंहाच्या ह्या स्थिर वनवृक्षाने आपल्या छायेखालील प्रजारूपी पाखरांना स्वराज्य वसतात प्रतिपाळिलेलें होते व त्या प्रजेची त्या राज्यावर व राजवंशावर अकृत्रिम राजनिष्ठा वसत होती, व त्या राजाच्या आपल्या प्रजेवरील वत्सलतेला सीमा नव्हती!! परंतु परवशतेच्या हालाहलहृदयाला, नव्हे तिच्या हृदयभावाला ही स्वराज्य-राजनिष्ठेची जोडी शल्या-सारखी सलू लागली. तिने आपल्या भात्यातील भीषण वादळातून अेक प्रबळ मत्सराची वीज बाहेर काढली व ह्या राजवंशावर तिचा निष्ठुर आघात कडकडत येअून कोस-ळला! स्वराज्यछत्र मोडून जाअून तो देश अुघडा बोडका झाला—स्वराज्याच्या विरहाने ते झाड जळून खाक होअून त्याच्या छायेखालील पाखरें विस्तवात फडफडू लागलीं! —आणि स्वदेशाची ही दुर्धर अवस्था झालेली पाहून मनात अुत्पन्न झालेल्या क्रोधाग्नीमुळेच तो वृद्ध कुंवरसिंह आपल्या जगदीशपूरच्या वाड्यात मिनावर पीळ भरीत अुभा राहिलेला होता!

वृद्धयुवा—होय तो वृद्धयुवा होता. कारण आजपर्यंत जवळजवळ अंशी शरदृतु त्याच्या अंगावरून गेलेले असूनही त्याच्या आत्म्याचें तेज अजून जिवंत निखाऱ्यासारखें धडधडत आहे! आजपर्यंत जवळ जवळ अंशी ग्रीष्म ऋतु आपल्या प्रखर अुन्हामुळा तळपलेले असताही त्याची भुजलता ही अजून तरणवी सरळ आहे!! अंशी वर्षांचा कुंवरसिंह—अंशी वर्षांचा कुमार! आणि त्यांतूनही सिंह! त्याला त्याच्या देशाचें अिंग्रजांनी केलेलें अपहरण कसलें खपावयाचें! अयोध्येचे राज्य डलहौसीने गिळंकृत केल्यानंतर सर्व हिंदुस्थान 'सपाट' करण्यासाठीं जेव्हा अिंग्रजी तरवार भरतभूमींतील अुंचवटयांना छाटून फेकून देत चालली तेव्हाच त्या प्रख्यात कुंवरसिंहाच्या देशालाही अिंग्रजी तरवारीने घायाळ केलें होतें. आपल्या स्वदेशाचा व आपल्या स्वराज्याचा अघोर व अन्यायी अपहार करणाऱ्या त्या अिंग्रजी तरवारीचे तुकडे अुडवीन म्हणून कुंवरसिंहाने गर्जना केली व तो श्रीमंत नानासाहेबांशी चालू बोलू लागला! भयंकर चाल व भयंकर बोल! हरहर महादेवाचा बोल—अफजुलखान वधावरील पोवाडयाची चाल!

आणि त्या चालीवर हे भीषण रणगीत चालू होतें. कुंवरसिंहाच्या मनात राज्यक्रांतीचे विचार घोळत आहेत, स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी त्याने सर्व हिंदुस्थानातील क्रांतिकेंद्राशी दळणवळण सुरू ठेवलेलें आहे, त्या पाटणा भागातील हजारो शिपाअी गुप्त रीतीने त्याला सामील झालेले आहेत, अशा निरनिराळया वार्ता पाटण्याचा कमिशनर टेलर याला कळू लागल्या तरी हा अंशी वर्षांचा वृद्ध राजा सरणाचे अैवजी सु-रणाकडे धावत जाअू शकेल ही कल्पनाच मुळी टेलरचे मनाला असंभवनीय वाटू लागली. तथापि त्या टेलरने कुंवरसिंगास कळविलें कीं, "आपण फार वृद्ध आहा, आपली प्रकृति फार अस्वस्थ आहे! तेव्हा आपल्या अवशिष्ट राहिलेल्या सान्निध्याचा लाभ मला घडावा अशी माझी प्रबळ अिच्छा असल्याने आपण पाटण्याला माझे पाहुणचारासाठी याल तर मी आपला फार आभारी होअीन. हे आमंत्रण अस्वीकृत होणार नाही अशी आशा असलेला आपला—टेलर." मागे अफजुलखानाने शिवाजीस असेच भेटीचे आमंत्रण दिलेले होतें! त्या धूर्त रजपुताने तेव्हाच ताडले की, पाटण्याच्या चीफ कमिशनरचे हे प्रेमनिमंत्रण म्हणजे तुरुंगाचे दार बिलकूल प्रतिकार करावयास न देता हळूच अुघडणे होय! म्हणून त्यानेही अुत्तर लिहिलें, "आभार आभार! माझी प्रकृति—मी फार अस्वस्थ आहे हें आपण लिहिता ते सत्य होय व म्हणूनच सध्या मला पाटण्याकडे येता येत नाही! मी बरा होताच तिकडे तावडतोब निघून येतो!" कुंवरसिंहा, तुझी प्रकृति अस्वस्थ खरीच आणि ती रणांगणातील रक्तप्राशनाने जरा बरी होताच तू पाटण्याकडे तावडतोब जाणार आहेस हेंही खरेंच आहे! कशाला? हा मात्र प्रश्न वेगळा!

अितक्यात ही 'अस्वस्थ प्रकृति' सुधारावयास जी औषधि पाहिजे होती तीच घेअून दानापूरचे बंड केलेले शिपाअी जगदीशपुरास येअून धडकले! मग

आता थावतोस कशाला ? तुझ्या देशमातेची शपथ आहे, तुझ्या स्वधर्माची शपथ आहे, तुझ्या मानभंगाची शपथ आहे कुवरसिंगा, म्यान फेकून दे व स्वातंत्र्यासाठी तरवार उपस ! तू आमचा राजा, तू आमचा नेता. तू आमचा सेनानी आहेस ! रजपूत वंशाच्या शिरोभूषणा, तुझा हा उदात्तचरित देह 'शय्येवरि न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय!' असें ते स्वराज्यासाठी हपापलेले शिपाईगडी ओरडू लागले. असेच कुंवारसिंहाचे कुलोपाध्याय सुचिव्रत ब्राह्मण उपदेशू लागले.[४] *असेच त्याची तरवारलेली तरवार त्याला साद्‌ लागली ! तेव्हा पाटणा शहरी* अंधारीत बसून जाणे अशक्य होण्याइतकी ज्याची प्रकृति अस्वस्थ, तो ऐंशी वर्षांचा वृद्ध रजपूत कुवरसिंग खाडकन उठून उभा राहिला—व रुग्णशय्येवरून त्याने जी उमळी घेतली ती एकदम रणक्षितीवरच !!

शहाबाद जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असलेल्या आरा ह्या गांवाच्या शहरी जगदीशपुराहून निघालेले शिपायी धावत गेले व त्यांनी तेथील ब्रिटिश खजिना, निशाण, तुरुंग, कचेऱ्या यांचा जुलात करून टाकून शेवटी एका लहानशा तटबंदीवर आपला मोर्चा फिरविला. बंड झाल्यास वेळप्रसंगी स्वसंरक्षण करता यावे म्हणून त्या शहराच्या धूर्त आंग्लजनांनी या तटबंदीत दारुगोळा, शस्त्रे, अन्नवस्त्र इत्यादि सामग्री ठेवलेली होती. शिवाय त्या शहरच्या मूठभर इंग्रजांना मदत देण्यासाठी पाटण्याहून ५० शिखांची तुकडीही आलेली होती. अशा तयारीने हे शिखांसुद्धा सुमारे ७५ लोक त्या तटबंदीत बंदोबस्ताने रहात असता ज्या प्रसंगाची ते मार्ग-प्रतीक्षा करीत होते तो प्रसंग येऊन गुदरला व त्या तटबंदीला बंडखोर शिपायांनी वेढा दिला.

त्या छोट्याशा तटबंदीत हे २५ इंग्रज व ५० शीख लोक हटातटाने आपलें संरक्षण करीत असता बाहेर शिपायांचे शेकडे त्या तटबंदीवर एकदम चढाव करून जाण्याचे ऐवजी आजूबाजूने शत्रूचा कोंडमारा करण्याच्या नादी लागलेले होते. क्वचित् असेही असेल की, तटबंदी हातात आल्यासारखीच असल्याने तिच्यावर हल्ले करण्यात व्यर्थ कालक्षेप वा मनुष्यहानि करण्यापेक्षा आजूबाजूच्या मुलखाचा व इतर इंग्रजी ठाण्यांचा बंदोबस्त करणे बंडवाल्यांना जास्त फायदेशीर वाटले असेल. काही अंशी त्यामुळे व काही अंशी तटबंदीतील लोकांच्या जबर गोळीबारामुळे शिपायांनी त्या तटबंदीवर प्रत्यक्ष हल्ला करण्याचे ऐवजी तोफा चढवून मारा चाल-विण्यास आरंभ केला. एक दोनदा गुप्त भुयारे खणून तटबंदीचे खाली सुरुंगही लावण्यात आले. आतील लोकांना थोडेच दिवसात पाण्याचा लवलेशही मिळेनासा

---

४. The Brahmins have incited him to mutiny and rebellion !"
—Major Eyre's Official Despatch.

झाला. परंतु आपल्या गोऱ्या अंमलदाराचे हे हाल पहात स्वस्थ बसण्याअितके काही शीख लोक नामर्द झालेले नव्हते! त्यांनी अेका चोवीस तासात त्या तटबंदीत नवीन विहीर खणली! व हे विहिरीचे काम चालत असतानाच ते राक्षसाकारचे अव्याहत रीतीने लढतही राहिलेले होते! तटबंदीत जे लोक लढत आहेत ते केवळ युरोपियन नसून त्यांच्यात बहुतेक शीखच आहेत असे जेव्हा अुपळ्यांस आले तेव्हा बंडवाल्यांना अत्यंत खेद झाला. कारण हा वेढा अिंग्लिशाना हिंदुस्थानीयाने दिलेला नसून गुरु गोविंदाच्या कुवरसिंहाने दिलेला होता! जे अिंग्लिशाच्या बाजूने अितक्या विलक्षण शौर्याने परंतु असल्या नीच देशद्रोहाने लढत आहेत त्या शिखाना आपल्या बाजूस वळविण्यासाठी रोज सध्याकाळी बंडवाल्याचे दूत अेका खांबामागे अुभे राहून मोठ्याने अुपदेशू लागत की हे शिखांनो, तुम्ही फिरंग्यांच्या बाजूने लढून कोणत्या नरकाचे साधन करीत आहा? ज्यांनी आपले राज्य बुडविले, जे आपल्या देशमातेवर बळजबरी करू पहात आहेत, ज्यांनी आपला धर्म पोरका केलेला आहे त्यांच्या बाजूने लढून तुम्ही कोणत्या नरकाचे साधन करीत आहा? परंतु बंडवाल्यानी स्वधर्माची स्वदेशाची, स्वहिताची, स्वातंत्र्याची वाटेल ती शपथ घालून अिंग्लिशाचा पक्ष सोडण्याविषयी केलेल्या हृदयद्रावक विनंत्याना किंवा तुम्ही असा देशद्रोह अितःपरही करू लागल्यास तुम्हास आम्ही ठार मारण्याला सोडणार नाही अशा त्यांनी दाखविलेल्या धमक्यांचा शीख लोकावर तिळमात्रही परिणाम झाला नाही. अुलट स्वकीयांच्या या दूताने केलेल्या विनतीला अुत्तर म्हणून त्यानी गोळ्याचा पाअूस पाडावा – व हे पाहताच भले! भले! भले! म्हणून युरोपियनानी त्याची पाठ थोपटावी! अशा स्थितीत त्या वेढ्याचे तीन दिवस लोटले. तिसऱ्या दिवशी म्हणजे ता. २९ जुलैचे रात्री त्या तटबंदीतील ती छोटीशी अिंग्रजी सेना लांबवरून अैकू येणाऱ्या तोफांच्या आकस्मिक गडगडाटाने दचकून अुठली! आनंदाने त्यांची तोंडे प्रमुदित झाली. अखेर बंडवाल्याना ठार मारून वेढा अुठविण्यासाठी हे विजयी ब्रिटिश सैन्य तर चालून येत नसेल ना?

होय, ते ब्रिटिश सैन्यच वेढा अुठविण्यासाठी अखेर चालून येत आहे. दानापूरला जी गोरी रेजिमेंट होती त्यापैकी दोनशे युरोपियन गोरे लढवय्ये व शंभर काळेकुट्ट लढवय्ये असे कप्तान डनबार ह्या धाडसी योद्ध्याचे हाताखाली अेकत्र होअून आराला पडलेला वेढा अुठविण्यासाठी शोण नदाच्या काठावर आले. ह्या अिंग्रजी सेनेच्या मुखश्रीमध्ये जो अुत्साह व विजयनिश्चितता दिसत आहे तशी कधीही दिसलेली नसेल. त्याना पोचविण्यासाठी आलेल्या आप्त नरनारींनी हसत हसत त्याना निरोप दिले. शोण नदात नावा चालू लागल्या व सध्याकाळी सातचे सुमारास आरा शहरचे तीराला ती सेना स्पर्श करती झाली. शुक्लपक्षाचे मनोहर शशिबिंब त्या भूगीवरील विजयी सेनेच्या विजयोत्साहाने भागीदार होण्यासाठी आकाशातून त्याच्याबरोबर चालू लागले. कप्तान डनबार, ह्या शुभ्र चांदण्यात

आपल्या सेनेचा व्यूह वेळेवर अुत्तम रीतीने रचून घे. कारण पुढे चादणें पडेल की काळोख पडेल याची काय शाश्वती आहे! ह्या व्यूहात निरयक्रमाप्रमाणे हे राजनिष्ठ शीख लोकच पुढे आघाडीला अुभे केले पाहिजेत. आपल्या शौर्योत्कर्षाचा हा मूर्तिमंत सन्मानच की काय म्हणून तेही आघाडीला राहण्यास अेका पायावर तयार आहेत. आराच्या दाट जंगलात आपणांस नेणारा काळा वाटाड्या कुठे आहे? त्याला पुढे करा व चला विजयी सैनिकांचे रणरंगासाठी अुत्सुकलेल्या आपल्या तरवारी ह्या चादण्यात चमकावीत पुढे चला. झाडामागून झाड चालले, जमिनीमागून जमीन चालली, मैलामागून मैल मार्ग पडत चालले व हा आरा शहराच्या नजीकचा पूलही लागला. पण हे काय? शत्रु कोठे आहेत? अजून तर अेकही पाड्या आपल्या तृषित तरवारीला तर राहोच पण दीर्घदृष्टि बंदुकीलाही आढळत नाही हे कसें? पळाले म्याड! नुसते उनवार येतो आहे हें अैकूनच ते नामर्द लोक सर्व पळून गेले! शिकंदराचा देखील त्याच्या शत्रूंना जितका दरारा नसेल! हे चंद्रा, रणसमराच्या आशेने तू जितका वेळ अंडीवाल्याल कुडकुडत अुभा राहिलास. पण ह्या म्याड वडवाइयांचे हे पलायनचातुर्य काय ते तुला पहावयास मिळाले! तर आता जास्त निराशा करून घेण्यापेक्षा तू सुखराग्या करण्यासाठी आपल्या विश्वमंदिरावर रात्रीचा पडदा सोडून शय्यागृहात परत जा. परंतु चंद्र परत फिरला तरी डनवार, तू मात्र परत फिरू नकोस. चंद्र बोलून काढून गशलाञ्छन! पण तुझे यशाला सिंहानेदेखील लाञ्छन लावण्यास न धजले पाहिजे, म्हणून तू परत फिरू नकोस आता ही आवराअी लागली आहे व ते म्याड पाडे आपल्या हाती लागण्याचा संभव अुरला नाही. पण हा आवाज कसला? आवराअींतील पानें तर सळसळत नाहीत ना? सू सू सू! अरे बापरे, सावध आंग्ल सैनिकांनो सावध! गोळ्यांचा पाअूस चार दिशांनी झोड देत अुठला! आवराअींचे प्रत्येक झाड आपल्या अनंत शाखाहस्तात बंदुका घेअून त्या आंग्ल सैन्यावर तुटून पडले! आला कुवरसिंग आला! अैशी वर्षांचा हा योद्धा व तू तरुण वाड! चल वधू या कोण हटतो! अिंग्लिशांच्या सैन्याने लढण्याची शिकस्त केली, पण लढणार कोणाशी? मनूकडील अेकही मनुष्य दिसेल तर शपथ! आंब्यांच्या त्या गर्द झाडीत, मध्यरात्रीच्या या घन अंधकारात, त्या अुंचसखल प्रदेशाच्या आडवळणात दबून बसलेल्या कुवरसिंहाच्या सेनेतील अेक मनुष्यही अिंग्रजी सैनिकांस दिसेना! आकाशातील तारे व भूमीवरील झाडें ह्यांशिवाय काही दिसेना व ह्या दोहोंवरही बंदुका चालवून त्यांना जिंकणे शक्य होअीना. वायुदेवतेचा कोप होअून तिने आपल्या झंझावाताने लालेलाल गोळ्यांचे वादळ फुत्कारीत धावत हिंडावें तसें ह्या अिंग्लिश सैन्यावर कोण्यातरी अदेहधारी देवतेचा मारा होअू लागला. डावीकडून मारा, अुजवीकडून मारा, समोरून मारा, पाठीमागून मारा!

अिंग्लिशांचे पोषाख पांढऱ्या रंगाचे असल्याने कुवरसिंहाला ते दिसत होते. परंतु कुवरसिंहाचे लोक काळे, त्यांचे पोषाख काळे व ती रात्र काळी! सगळ्या

काळ्या पक्ष्यांचा असा अेकदम हल्ला झाल्यावर त्या काळदेहापुढे अिंग्लिशांचे पांढरे पाय पाय कसे धरू शकणार! अिंग्रजांचे पांढरे आणि शिपायांचे काळे—दोन्ही पायांनी रणांतून पळ काढला! त्यांचा कमान्डर डनलाप हा पहिल्या वाराबरोबर ठार झालेला होता. आपले जीव घेअून पळत असता जवळच्या दलदलीत ते आंग्ल सैन्य कोसळले, तिथे त्यांनी किंचित् वेळ दम धरून लढण्याचा प्रयत्न करून पहाटेचे सुमारास, त्या घोर रात्री रणांगणावर आपले मेलेले नव्हेत तर जखमी बांधवांना रणांगणावर सोडून देअून, आपल्या कमांडरचे प्रेत तसेच टाकून, अुपाशी, तान्हेले, रक्तबंबाळ झालेले, लज्जेने काळे ठिक्कर पडलेले ते ब्रिटिश सैन्य जिवाच्या आशेने शोण नदाकडे धावू लागले!

परंतु कुंवरसिंहापुढे धावणे म्हणजे काही साधी गोष्ट नव्हती. प्रत्येक पावलाला त्यांचे रक्त गळत चालले! अेखादे रानडुक्कर शिकारींच्या भाल्याने भोसकले जात असता अंगातून रक्ताच्या धारा अखंड वहात असता शक्तिक्षयाने या वा त्या बाजूला वारंवार कोलमडत असावा, रक्ताच्या विरळलेल्या मेघाप्रमाणे लाल शोणिताचा सडा घालीत धावत पळत ती ब्रिटिश फौज शोणनदापर्यंत धावत आली. पण तिथे तर विनाशाची परमावधि झाली! बोटी सापडेनात, सापडल्या त्या वाळूत रुतून बसल्या, ज्या रुतून बसल्या नाहीत त्यांना पाड्यांनी आग लावून दिली!! शेवटी अेक दोन बोटी जिवंत सुटल्या! आराचा वेढा अुठवून तेथील शूर लोकसुद्धा विजय गीते गात आंग्ल सैन्य परत आलेले असेल म्हणून दिनापूरच्या आंग्ल नरनारी जो नदीकिनाऱ्यावर येतात तो त्यास नावांतून अेकही अुत्तेजक हसणे अैकू येअीना. निशाण नाही, बँड नाही, कोणी वर तोंड काढीत नाही, सर्वांची छाती धडधडू लागली. माझा मुलगा, माझा भाअू, माझा बाप, माझा नवरा कालच येअून हसत हसत मोहिमेत गेला होता आणि आज—देवा कृपा कर व अिडा पिडा टाळ!! हा टाळण्याचा आवाज देवाकडे मिळण्याचे आधीच ते अपयशी ब्रिटिश लोक दिनापूरच्या घाटावर येअून धडकले व लवकरच ही भयंकर वार्ता जिकडे तिकडे पसरली की चारशे पंधरा लोकांपैकी फक्त सुमारे पन्नास लोकच कुंवरसिंहाच्या तावडीतून जिवंत परतलेले आहेत. अेक अिंग्रज लेखक लिहितो, “त्या वेळी स्त्रीजनांनी मांडलेल्या शोकाचा विलाप ज्यांनी अैकलेला असेल ते तो आजन्मान विसरणार नाहीत. काहीजणी कर्कश किंकाळ्या देत आपली छाती बडवू लागल्या, काही आत्मावेशी ओरडत आपले केस तटातट तोडू लागल्या. त्यांच्या या शोकभरात जर का जनरल लाॅअिड त्यांच्या दृष्टीस पडता तर या नाशाच्या मूल अुत्पादकाला त्यांनी जिवंत फाडून टाकले असते यात काही शंका नाही.

परंतु या आंग्ल स्त्रियांच्या रोदनस्वराने दिनापूरचे आकाश अिकडे दुमदुमत होत असताच त्यांच्या दुःखाचा सूड घेण्यासाठी मेजर आयर तिकडे आराकडे चाललेला होता. त्याला अशा पराजयाची जरी अजून बातमी मिळालेली नव्हती तथापि

आराला अिंग्रजी सैन्य वेढलेलें आहे हें अैकताच तो तिकडे धावत चालला. ता. २९ व ता. ३० जुलैला डनवारच्या फौजेची दाणादाण करून कुंवरसिंहाचे शिपाअी जों परत फिरतात तों आयर ससैन्य तिकडे येत असल्याची बातमी त्या वृद्ध सेनानीला लागली. क्षणाचाही विसावा न घेतां त्याने आपलें सैन्य गोळा केलें. मेजर आयर जिरटून येत होता तिकडच्या वाटेतील प्रत्येक अडथळ्याचा फायदा घेत घेत त्याने लढाअीचें तोंड थांबविलें व शेवटी ऑगस्ट ता. २-ला बिबीगंज गावाजवळ लढाअीची टक्कर घेतली. समोरच्या अेका झाडीकडे ह्या दोन्ही फौजा आपापल्या ताब्यात घेण्या-साठीं दौडत होत्या. त्या वृद्ध-तरुणाच्या भयंकर शर्यतीत अखेर तो वृद्ध कुंवरसिंहच त्या झाडीमध्ये पहिल्याने घुसून पोचला व त्याने आयरचा हा डाव हाणून ओगचा मारा चालविला. आयरपाशी तीन उत्तम तोफा होत्या व त्यांच्या आधारावर तो पुढे दरदीत चाललेला असल्याने त्या तोफांवर कुंवरसिंहाचे शिपाअी तीनदा तुटून पडले. तिन्ही वेळा त्या अग्निवर्षावी तोफांनी तोंडापर्यंत त्यांचे हल्ले पोचले, परंतु अिंग्लिशांनी तोफांचा मारा जवळ जवळ अखंड चालविला. अितक्यात कॅप्टन हेस्टिंग्ज हा अिंग्रजी योद्धा आयरकडे धावा घेत आला व म्हणाला, "आयर, आपले अिंग्रजी पायदळ हटू लागले! आपल्या हातून विजय निसटला आहे!" ही निर्वा-णीची स्थिति आणखी अर्धा तास तशीच राहती की कुंवरसिंहाने ती लढाअी जिंकलीच म्हणून समजावे! आता असे केलें तरी विजय निसटतोच आहे तेव्हा धाडसाची तरी परीक्षा अेकदा का न पहावी? असे म्हणून आयरनें अिंग्रजी फौजेस हुकूम सोडला की बेयोनेटस् घेऊन हातघाअी करावी. ताबडतोब अिंग्रजी सैन्य बेयोनेटा रोखून चढवाल्या-वर तीरासारखें चालून गेलें. तोफांच्या तोंडावर देखील जे शिपाअी लोक तुटून पड-ताना डगमगत नसत, ते बदलले शिपाअी ब्रिटिश लोकांच्या बेयोनेटांच्या हल्ल्यापुढे अुभे राहण्यास का कोण जाणे पण नेहमीच धजत नसत व येथेही ते धजले नाहीत. आयर त्यांना त्या झाडीतून हुसकून देऊन पुढे घुसला, आराच्या तटबंदीकडे चालून गेला. त्या जागेत कोंडून पडलेल्या ब्रिटिश फौजेची त्याने मुक्तता केली व अशा रीतीने आरा शहर पुन्हा अिंग्लिशांच्या ताब्यात आले.

आरा शहराचा वेढा सुमारें आठ दिवसच काय तो चाललेला होता. त्या आठ दिवसांत हा वेढा सभाळून जगदीशपूरच्या त्या शूर रजपुताला दोन लढाया लढाव्या लागल्या. त्याच्या अंगातील हिमतीला, धाडसाला व शौर्याला जरी पारावार नव्हता तरी त्याच्या बाजारबुणग्या अनुयायांमध्ये तोडीस तोड देणारें धाष्टर्याचें तितकेसें वास्तव्य नसल्याने आयरच्या हातून पराजय पावताच कुंवरसिंह जगदीशपुराकडे निघून गेला होता. अिंग्रजांना आल्याच्या सैन्याची व अितर नवीन कुमक मिळून ते सैन्य फुगत चालल्याचें कळताच कुंवरसिंहाने जगदीशपुरापाशी शक्य तितके लोक गोळा करण्यास आरंभ केला. अिंग्रजी सैनिकांना कुंवरसिंहाच्या कर्तृत्वाची काही थोडीशीच ओळख झालेली नसल्याने त्याच्या या हालचालीवरून क्वचित् तो पुन्हा

आरा शहरावर चालून यावयास कमी करणार नाही असें वाटून आयर जगदीशपुरा-कडे ससैन्य चालू लागला. आरास वेढा अुठल्यामुळे त्यास अुत्साहभंग झालेला आहे असा अनुमानासह अिन्फिल्डच्या शिपायांनी, अेनफिल्डनें व विजयानें मस्त बनलेल्या शत्रूशी राजधानीच्या अेका शहराचा अुघड झुंज देण्यात सर्वस्वी नुकसानी करून न घेता गनिमी काव्याचा आश्रय करावा असा धोरणानें अिंग्रजी फौजेशी दोन चांगल्याच चकमकी झाल्यानंतर कुंवरसिंह जगदीशपुराहून बाहेर पडला व अिंग्रजी सैन्यासह आयर ता. १४ ऑगस्ट रोजी कुंवरसिंहाच्या वाड्यांत आपला तंबू ठोकून अुतरला !

अशा रीतीनें जगदीशपूर जरी अिंग्रजांचे ताब्यात पडलें, त्यांनी जगदीशपूरचे राजवाड्याचा, हिंदु देवळांचा व अिमारतींचा जरी नाश केला तरी त्या वाड्याचा राजा, त्या देवळांचा देव, व त्या अिमारतींचा मालक योद्धा कुंवरसिंह हा लढाअीचे पूर्वी जितका अजिंक्य होता तितकाच लढाअीनंतरही अजून अजिंक्यच होता! राज-धानी पडताच अितर राजे पड घेवोत, परंतु ह्या जगदीशपूरच्या वाड्याची गोष्ट काही तशी नव्हती. जेथे तो तेथे त्याचें जगदीशपूर — अशी त्याची प्रतिज्ञा असल्यामुळे त्याला धरल्याशिवाय नुसतें जगदीशपूर धरून बसणे म्हणजे केवळ व्यर्थ प्रयास होत! त्यानें घर गमावलें होतें, पण रणांगण हेंच आता त्याचें घर झालें होतें!

* * *

प्रकरण चौथें

# दिल्ली पडते

दिल्लीसमोरील अिंग्लिश फौजेच्या तिसऱ्या मुख्य कमान्डरने तें शहर घेण्याची निराशा होअून राजीनामा दिल्यानंतर ब्रिगेडियर विल्सनने मुख्य कमांडरचा जेव्हा चार्ज घेतला तेव्हा बंडवाल्यांच्या हल्ल्यांनी वेडावून गेलेलें ब्रिटिश सैन्य दिल्लीचा वेढा अुठवून मागे फिरवावें की काय असा हताश विचार अिंग्लिश अधिकाऱ्यांमध्ये चालू झाला. हा वेढा अुठविण्याचा विचार जर कायम ठरला असता तर सत्तावनचा अितिहास कसा पालटत गेला असता हें नक्की सांगणे जरी कठीण आहे तथापि बंड-वाल्यांच्या हजारो हल्ल्यांनी अिंग्लिशांचे जितकें नुकसान होणारें नव्हतें तितकें पिछे-हाट घेअून अिंग्लिश लोक आपल्या हातानेच करून घेते अितके अगदी साफ दिसणारें आहे. दिल्लीला वेढा देण्यात शत्रूचें शहर काबीज करून घेण्यापेक्षा दुसरा अेक जो लष्करी फायदा अिंग्रजास सहजगत्या मिळत होता, तो बंडवाल्यांचा सेना समुद्र दिल्ली-

चारस्या शहरी अेकत्र तुंबण्याअैवजी जर मोठ्या प्रदेशावर पसरत गेले असता व ते लहान लहान सैन्यपथकांच्या निरनिराळ्या भागांनी चहूबाजूंनी भुंग घेत रहाते तर असल्या या वृकयुद्धाने वंडवाल्यांना अिंग्रजांवर चोहोबाजूनी कठीण हल्ले चढविता येअून त्यांच्या मूठभर सैन्याची लांडगेतोड करणें सुलभ जाहले असते. परंतु दिल्लीला वेढा दिल्यानें ही विस्तीर्ण रणधुमाळी सपुष्टात आणल्यासारखी होअून अिंग्रजांना असह्य ताण न बसता सर्व बंडवाले अेका गहरात जमा होअून आयतेच खाटीकखात आलेले होते. अशा स्थितीत दिल्लीचा वेढा अुठविणें म्हणजे हा अफाट सेनासागर आपण होअूनच सर्व प्रदेशावर धागडधिंगा घालण्यास बधारा फोडून मोकळा सोडणें होतें. दिल्ली जिंकून घेतली असताही ते सर्व शिपाअी आजूबाजूस पसरणारच होते. परंतु त्याना अपयशाने निग्रहाही करुन मग दिल्लीतून हुसकून देण्यात व अिंग्रजांना वेढा अुठविण्याम आपण भाग पाडले असा यशाने प्रस्फुरित करुन अंगावर चढवून घेण्यात फार भयंकर अंतर होतें ! अिंग्रज कमांडरच्या ध्यानात हें अंतर येत असताही दुनासतेने, निरुत्साहाने व बंडवाल्यानी केलेल्या कोंडमान्याने जेव्हा तो दिल्लीचा वेढा अुटवून परत फिरण्याचा निश्चय करु लागला तेव्हा त्या क्षणी अिंग्रजी साम्राज्याचें सर्व निदान त्याच्या वर्तनावर अवलंबून होतें. अशा समयीं दिल्लीच्या अिंग्रजी तळांत बेअर्डस्मिथसारखा धाडसी ऑफिसर वसत होता हें त्याचें खरोखरच सुदैव होय ! अितर सर्व अिंग्लिश अधिकारी पळ काढण्याच्या विचारात असता त्याने त्या सर्वांस निक्षून सांगितलें की, " दिल्लीवरची पकड अेक अणुमात्रही ढिली करणें अिष्ट नाही. निष्ठुर काळपाशाप्रमाणें निग्या कंठात पडलेला हा आपला पाश असाच व असाच राहिला पाहिजे. दिल्लीचा वेढा आपण अुठविला की पंजाब हातचा सुटणार, हिंदुस्थान हातचें सुटणार, साम्राज्य हातचें सुटणार ! ! "

बेअर्ड स्मिथच्या या करारी अुपदेशानें सुत्साहित होअून दिल्ली घेतल्याशिवाय परत फिरावयाचें नाही असा दृढ निश्चय अिंग्रजांचा कमांडर ब्रिगेडियर विल्सन हा करीत असता बंडवाल्यांनी अिंग्लिशांना मार देण्याचें काम विलकूल ढिलें पडू दिलें नाही. अिंग्रजांच्या अुजव्या किंवा डाव्या बाजूवर हल्ला करुन, मारवतील तितके लोक मारुन, अिंग्रज जोरावून अुठले की, बंडवाले अशा काही धाअीने मागे फिरत की, त्यांचा पाठलाग करण्याची अपरिहार्य अिच्छा अिंग्रजांचे मनात अुत्पन्न होअी व अिंग्रजी सैन्याला अशा रीतीने तटाजवळ आणले न आणलें की, तोफांचा भयंकर मारा सुरू होअी. या नव्या युक्तीने बंडवाल्यांनी अिंग्लिशांना अितक्या वेळा अचूक रीतीने फसविलें व त्यांची अितकी नुकसानी केली की, काही झालें तरी शिपा-यांचा पाठलाग करता कामा नये असा अिंग्रजी कमांडरला विशेष हुकूम सोडावा लागला ! बंडवाल्यांच्या हया नव्या युक्तीनें अिंग्रजी सेना जो जों सपत चालली तो तों त्यांच्या कमांडरचे पंजाबकडून येणाऱ्या नव्या मजबुतीकडे चातकासारखे डोळे लागू लागले. दिल्लीचे दक्षिणेस अिंग्रजी सैन्याची काय अवस्था आहे, कल-

करयाहून निघालेलें अिंग्रजी सैन्य पुढारपेंत येअून पोंचलेलें आहे, लखनौ, कानपूर व बनारस वगैरे शहरांची पार हालहवाल आहे, अित्यादि वार्ता, अुत्तर हिंदुस्थानांतील दळणवळणाचे सर्व मार्ग, तारा, रेल्वे, पोस्ट वगैरे समूळ नष्ट करून टाकलेले अस-ल्याने, दिल्लीला वेढून पडलेल्या आंग्लांच्या छावणीत अितके कळेनासें झालें होतें. तर ही खबर कीं शिर त्यांच्या धडापासून कायमचें वेगळें होअून अेक महिना लोटल्यानंतर दिल्लीच्या कॅम्पमध्ये अिंग्रजांना त्याबद्दलची बातमी लागली की, मद्रास हो ... सैन्यागह आपल्या मदतीस धावून येत आहे! कलकत्त्याच्या बाजूने मदत येण्याची अशी निराशा झालेली असल्याने दिल्लीच्या अिंग्रजांचा सर्व भार पंजाबवर पडलेला होता व आजपर्यंत गोऱ्या व काळ्या सैन्याची वारंवार नवीन नवीन कुमक धाडून जॉन लॉरेन्सने तो भार शक्य तितका संभाळलेलाही होता. तरीही दिल्लीकडून आलेल्या सीजट्रेनच्या व कुमकेच्या नवीन मागणीचा अनादर न करता जॉन लॉरेन्सने पंजाबातून सुमारें २००० निवडक सैन्य निकल्सनच्या हाता-खाली धाडून दिलें. हें सैन्य आल्याची बातमी अिंग्रजी छावणीत पसरताच जिकडे तिकडे आनंदाचें, अुत्साहाचें व आशेचें तेज सैनिकांच्या मुद्रेवर झळकूं लागलें. त्या तेजांत २००० सैन्य आल्याचा फारसा भाग नव्हता तर त्या सैन्याचें आधिपत्य ज्याच्याकडे होतें तो निकल्सन आल्यामुळें हें तेज विशेष झळकूं लागलेलें होतें. निकल्सन सारखा अेक पुढारी म्हणजे हजारो सैनिकांचा केवळ शौर्यांक असतो! निरुत्साही झालेल्या अिंग्रजी फौजेंत जो तो म्हणूं लागला " निकल्सन आला आहे, आतां विजयाची शंका नको! "

परंतु वरील अधिपति लाभत गेल्याने विजयाची शंका अिंग्रजी सेनेंत जों जों कमी होत चालली तों तों दिल्लीच्या तटांमध्यें अपजयाची खात्री दृढतर होत चालली. कारण त्यांची मुख्य अुणीव ही चांगल्या पुढाऱ्याचीच होती. त्यांनी नूतनोद्धृत सिंहा-सनावर ज्याला प्रस्थापित केलेलें होतें तो बादशहा शांतकालांत दयाशीलतेंत जरी कितीही स्तुत्यचरित्र असला तरी युद्धकालांत अत्यंत आवश्यक असणाऱ्या रण-पटुत्वांत व नेतृत्वांत असमर्थ व पूर्ण अनभ्यस्त होता. रणपटु सैनिकांचा दिल्लीला तोटा होता असें नाहीं. अिंग्रजांच्या निकराच्या युद्धामध्यें ज्यांनी आंग्ल सेनेलाही लाजविलेलें होतें, अिंग्रजांच्या हाताखालींच ज्यांचें शस्त्रास्त्रांचें, कवायतीचें व शिस्तीचें शिक्षण पूर्ण झालेलें होतें, ज्यांच्या तरवारींनीच अिंग्रजांसाठीं अफगाणिस्तानापर्यंत साम्राज्याची रेषा आखीत नेलेली होती, असे जवळजवळ पन्नास हजार योद्धे त्या दिल्लीच्या तटांमधून आजपर्यंत मी मी म्हणत असणाऱ्या अिंग्रजांना ठिकच्या ठिकाणीं पाशबद्ध करून वेढावीत राहिलेले होते. परंतु त्या पन्नास हजार डोक्यांना अेकीभूत करणारें असें अेक तरी डोकें दिल्लीला पाहिजे होतें. ह्या अितक्या निर-निराळ्या मण्यांची स्वातंत्र्योत्सुकतेच्या सूत्रांत ओंवती झाली होती. परंतु शेवटच्या सूत्रमण्याचें बंधन मिळालेलें नसल्यानें ही बंधनरहित माला अेका हिमनगासारखी

आजपर्यंत ओघळून गेली नाहीं हेंच आश्चर्य होतें. स्वातंत्र्याच्या वाऱ्याने हे वाळूचे कण अेका ढगात मिसळून गेले होते; परंतु वाऱ्याने अुत्पन्न केलेल्या ढगाअितकीच असंघटित्ता राहिलेली होती. अशा स्थितीत त्याना अेक कर्ता मनुष्य पाहिजे होता. त्यांनी ज्याला मुख्यस्थानाधिष्ठित केलें होतें तो वृद्ध बादशहा देखील कोणा तरी कर्त्या मनुष्यासाठी त्या हजारो शिपायांअितकाच हपापलेला होता. त्याने बख्तरखानाचे हाती सर्व सत्ता देअून पाहिली. नंतर त्याने तीन जनरल नेमून त्यांचे हाती पुढारीपण देअून पाहिले. नंतर पुन्हा तीन दिल्लीचे नागरिक व तीन शिपायांचे प्रतिनिधि अशा सहा जणांच्या प्रतिनिधिमंडळाने मुख्य कारभार संघटित रीतीने व अेकवाक्यतेने करावा असें ठरविलें व ते प्रतिनिधिमंडळही जेव्हा निष्फळ झाले तेव्हा मग त्या अुदार व देशाभिमानी बादशहाने आपल्यामाठी राज्यक्रांतीचा नाश होत असेल व आपल्या राज्यछत्राच्या भयाने कर्ते लोक अिंग्लिशांकडे जात असतील तर आपली सत्ता सोडून देण्यासही आपण तयार असल्याचें त्याने जाहीर केलें ! हिंदुस्थान देश अिंग्रजाच्या अमलाखाली असण्यापेक्षा, हिंदुस्तानात परकयांचें स्मरण चालू राहण्यापेक्षा व हिंदुस्थान कोणत्याही प्रकारच्या राजकीय गुलामगिरीत खितपत पडण्यापेक्षा स्वदेशस्वातंत्र्य मिळवून देणारा कोणताही स्वदेशीय अधिपति पुढे येअील तर आपणास शतपट जास्त आनंद वाटेल असें त्या वृद्ध मोंगलाने सर्वांस कळविलें व स्वदस्तुरच्या सहीने जयपूर, जोधपूर, बिकानेर, अलवार वगैरे प्रमुख राज्यांना पत्रें धाडलीं. " अिंग्लिशाच्या वेड्याचे तुकडे अुडविलेले पहावे व हिंदुस्थान कसेंही करून स्वतंत्र व्हावें ही माझी अत्युत्कट अिच्छा आहे. परंतु ह्या निर्वाणिचे प्रसगात जो सर्व राष्ट्राची धुरा धारण करण्यास समर्थ आहे, राष्ट्रीय शक्तीला जो संघटना देअू शकेल व ज्याचेमध्ये सर्व राष्ट्र अेकवाक्यता पावू शकेल असा कोणता तरी कार्यधुरंधर पुढारी पुढे आल्याशिवाय ही राज्यक्रांति सफल होणारी नाही. हिंदुस्थानला अिंग्लिशाच्या अमलातून स्वतंत्र करून त्यावर माझेच अधिराज्य सत्ता स्थापन करावी अशी माझी व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षा अुरलेली नाही. स्वदेशस्वातंत्र्याच्या युद्धकार्यी सज्जखड्ग होअून अिंग्लिशांना हद्दपार करण्यास जर आपण सर्व संस्थानिक तयार असाल तर हिंदुस्थानातील संस्थानिकांनी स्थापिलेल्या कोणत्याही राजमंडळाचें अधिपतित्व मान्य करून माझे साम्राज्याधीश्वरत्वाचे सर्व हक्क मी त्याचे हातात देण्यास आपखुषीने व आनंदाने तयार आहे." [१]

हें पत्र मुसलमानी धर्माचा पुरस्कर्ता दिल्लीचा बादशहा हिंदुस्थानातील हिंदुधर्माच्या मांडलिक राजास धाडीत आहे! सत्तावन साली स्वातंत्र्य, स्वराज्य, व स्वदेश व स्वधर्म ह्या अुदात्त शब्दाचा किती यथार्थ बोध हिंदुस्थानातील लोकास झालेला होता हें हे अद्‌भुत पत्र स्पष्ट सागते आहे. हिंदु व मुसलमानांची धर्मभिन्नता

१. Two Native Narratives by Metcalfe, P. 226.

ही स्वदेशाच्या अेकतेने जितकी मलीन झालेली पाहून चार्लस् बॉल म्हणतो " अनपेक्षित, आश्चर्यकारक व विलक्षण स्थित्यंतर जगाच्या अितिहासात क्वचितच आढळेल."

परंतु हे विलक्षण स्थित्यंतर हिंदुस्थान देशाच्या क्षेत्रातील अेका आकुंचित प्रांतातच प्राय तें पूर्णांशाने घडून आलें असल्यामुळे त्याचा तात्कालिक परिणाम यशस्वी होअू शकला नाही. दिल्लीच्या तटासमोर गुलामगिरीचा व देशस्वातंत्र्याचा सामना सुरू होता हें अेका अर्थी व प्रमुखत्वाने जरी खरें आहे, तरी दुसऱ्या व आनुषंगिक दिशेने पाहिलें असता तिथे स्वपरपक्षाकडांना खरा सामना जुंपलाच नव्हता असें दिसून येअील. 'दिल्लीचा वेढा' ह्या प्रसिद्ध ग्रंथाचा कर्ता म्हणतो की, " आमच्या तळावर अेका युरोपियनामागे १० नेटिव्ह होते. जितके युरोपियन तोफखान्यावर असत त्यांच्यापेक्षा चौपटीने जास्त नेटिव्ह लोक व पायदळामागे दोन नेटिव्ह घोडेस्वारात होते. नेटिव्हांच्या मदतीशिवाय अेक पाअूलही पुढे टाकणें शक्य नव्हतें." देशाच्या अेका भागातील जनता देशाच्या दुसऱ्या भागातील जनतेने हाणून टाकली होती. अशा स्थितीत बंडवाल्यांनी आगस्ट उलटत आला तरी अिंग्रजांना आपणावर मार देण्याची संधि न देता आघातक पद्धतीचा केलेला अवलंब अजूनपर्यंत ठेवून ते अिंग्रजी तळावर अखंड जोमाने हल्ले चढवीतच होते हें त्यांच्या तत्त्वनिष्ठेचें काही सामान्य द्योतक नाही !

तोफखान्यानी अिंग्रजांचे सर्व मेन्यावर अशा मारा करण्यास आरंभ केला की सर कोलिनला तळ सोडून गंग्याची पुन्हळशी हालचाल व अिंग्रजी तोफांतून बराच वेळ गोळा फेकणें बंद करणे भाग पडलें. बंडवाल्यानी ही धिटाअीची केलेली रणाव्हानें आजपर्यंत मुकाट्याने अैकण्याची सर कोलिनला जी पाळी आलेली होती ती ह्या ५-व्या तारखेनंतर मात्र येणारी नव्हती. कारण आता त्याने त्याच्या सैन्याची अुत्तम अेकबद्धता करून मार्गातील सर्व अडचणी दूर केलेल्या होत्या. व म्हणून दिवसेंदिवस प्रत्यक्ष अिंग्लिश कमान्डर-अिन-चीफचे तंबूवर गोळीबाराची चेंडूफळी खेळत बसणाऱ्या हट्टी, धीट व अुद्दाम बंडवाल्याशी ता. ६ रोजी आपण होअूनच निकर करण्याचा त्याने निश्चय केला. या वेळेस बंडवाल्याकडे सुमारे अठरहा हजार लष्करी शिक्षण मिळालेले शिपाअी असून त्याच्या डाव्या बाजूकडे खुद्द नानासाहेब, अुजवीकडे ग्वाल्हेरचें सैन्य व त्या सर्वांवर तात्या टोपे हे सेनापति झालेले होते. अिंग्लिशाकडे अेकंदर गोरी व काळी मिळून पांच हजार पायदळ, सहाशे घोडेस्वार व ३५ तोफा मिळून सुमारे ६००० लोक अितकी फौज सज्ज झालेली होती. चार्लस बॉल म्हणतो ७५०० फौज होती व त्या सर्वांवर खुद्द कमान्डर-अिन-चीफ सर कोलिन हे सेनापतित्व करीत होते.

अशा या तत्त्वनिष्ठेला स्तुत्याचें बल देणारा अेखादा नेता बंडवाल्याकडे येण्याचे अैवजी अिंग्रजी छावणीलाच निक्सनच्या आगमनप्रसंगाने तो लाभ

मिळाल्याने दिल्लीत निराशेची छाया पडू लागली. नीमचचें सैन्य व बरेलीचें सैन्य हे अेकमेकांच्या डोक्यावर निराशेचें खापर फोडू लागलें व वारंवार पगार मिळाला असताही बदफैली शिपाअी पुन पुन्हा पगाराचा तगादा करुन तो मिळेनासा झाला म्हणजे शहरातील श्रीमान् लोकांवर बळजबरी करण्याचा धाक घालू लागले. तेव्हा बख्तखानाने बादशहाच्या अिच्छेवरुन सर्व पुढारी, सर्व सैन्य व निवडक नागरिक अेकत्र करुन त्यांना प्रश्न केला की 'लढाअी चालवावयाची की शरण जावयाचें ?' आकाश दुमदुमून जाअील अशी गर्जना अुठून सर्वांनी अुत्तर केलें, 'लढाअी, लढाअी, लढाअी ! !' दिल्लीचा हा अढळ निश्चय पाहून पुन्हा सर्वत्र जोर आल्यासारखा दिसला व बरेलीच्या व नीमचच्या सैन्याला बरोबर घेअून अिंग्रजाच्या सीजट्रेनवर हल्ला करण्यासाठी नजफगडकडे बंडवाल्यांची सेना चालू लागली. नजफगडपर्यंत पोचल्यावर बरेलीच्या ब्रिगेडने जिथे तळ दिला तिथे तळ देण्याचे अैवजी व अेकत्र मिळून शत्रूवर तुटून पडण्याचे अैवजी नीमचचें सैन्य बख्तखानाचा हुकूम न जुमानता अेका शेजारच्या गावी जाअून अुतरतें झालें. अिंग्लिशांच्या कानावर ही बातमी जाताच त्यांचा ताज्या दमाचा सेनापति निकल्सन हा निवडक व भरपूर सैन्यासह अत्यंत त्वरेने नजफगडचे बाजूवर चाल करुन गेला व बख्तखानाची आज्ञा न जुमानता अेकीकडे अुतरलेल्या नीमचच्या ब्रिगेडवर त्याने अकस्मात् छापा घातला. बंडवाले असावध, अेकाकी व अव्यवस्थित तर तो आलेला छापा सावध, सनायक, व्यवस्थित निकल्सनच्या सेनापतित्वाखाली ! मग बंडवाल्यांच्या दुर्दशेला सीमा अुरली नाही. ते लढले, पुष्कळ शूरत्वाने लढले, शत्रूनी स्तुति करावी अितक्या शूरतेने लढलें ! पण ती निष्फळ शूरता ! बुंदेल की सराअीच्या लढाअी-पासून बंडवाल्यांचा असा पराजय झाला नव्हता. नीमचची सबंध ब्रिगेड या दिवशी पार गारद झाली ! आपणच ज्याला अधिकारस्थित केले होतें त्याच्या हुकुमा-खाली न राहता स्वयमन्यतेने केलेल्या आचरणाचें हें असें फल मिळालें ! बेहुकमी शूरता ही शौर्याभावाअितकीच निष्फल असते !

ता. २५ ऑगस्ट रोजी मिळालेल्या ह्या विजयाने अिंग्रजी छावणीत आज-पर्यंत वसत असलेलें निराशापटल पार विरळून गेलें. जून महिन्यापासून खरा विजय असा त्यांना आज मिळाला ! दिल्लीला कधी धडक देअू असें ज्याला त्याला होअून गेलें. कमांडर विल्सनने शेवटच्या हल्ल्याचा नकाशा तयार करण्यास बेअर्डस्मिथला हुकूम दिला. अिंग्रज लोक निराशेच्या भरात दिल्लीहून परत फिरत असता ज्याने केवळ आपल्याच नेटाने त्यांना थोपवून धरलेलें होतें त्या बेअर्डने तो नकाशाही तयार केला. पंजाबमधून येणारी नवीन सीजट्रेनही हल्ल्याची अप्रतिम साधनसामग्री घेअून अिंग्रजी छावणीला सुखरुप पोचली व ज्या शहराने अिंग्लिशांच्या अत्युत्कृष्ट सेनेला, सेनापतित्वाला व समरपटुत्वाला आज तीन महिने रणांगणात खडे चारलेले होते त्या दिल्लीला धुळीस मिळवून आजपर्यंत सोसलेल्या तुमच्या

श्रमांचे साफल्य होण्याचा समय अखेर निश्चिततेने नजीक आलेला आहे, असा अुत्साहक संदेशलेखही अिंग्रजी सेनेच्या कमांडरने लष्करात प्रसिद्ध केला.

पंजाबची नवीन मदत आल्यानंतर आता अिंग्रजांचें अेकंदर सैन्य साडेतीन हजार युरोपियन, पांच हजार नेटिव्ह शीख पंजाबी वगैरे शिपाओी व अडीच हजार काश्मिरी फौज मिळून सुमारें अकरा हजार लोक असून शिवाय आपले शेकडो शिपाओी घेअून खुद्द झिंद संस्थानचा राजाही "दिल्लीच्या विजयाची पर्वणी साधण्यासाठी" अिंग्लिशांना येअून मिळाला होता. सप्टेंबरच्या पूर्वार्धात अिंग्रजी कमांडरने विघातक पद्धतीने आक्रमण करून नवीन नवीन बॅटरी बांधण्यास सुरवात केली आहे जसें पाहताच दिल्लीमध्ये वडवाल्यात भयभीतता अुत्पन्न झाली व तटाचे बाहेर अिंग्रज लोक अेवढ्या व्यक्तीमारखे हुकुमवद शिस्तीनें रेटीत चाललेले असताना तटाचे आत घेट्टुकमी, येलगामी व गैरशिस्त वर्तनाचा कळसही होअू लागला. अिंग्रजांकडे जे नेटिव्ह होते ते तोफांचे मान्यात बॅटरी बांधण्याचे कामात अिनक्या नेटाने झटत की फारेस्ट लिहितो, "नेटिव्ह लोकांमध्ये अुत्कर्षाने वसत असलेल्या निश्चल शौर्याची त्यांनी कमाल केली. अेकामागून अेक मनुष्यें ठार होअू लागलीं असता त्यांनी आपले काम अढळ चालू ठेवलें. गोळघाने पुढचा मनुष्य ठार झाला की त्यांनी अेक क्षणभर थांबावें, मृतासाठी अेक दोन अश्रू ढाळावे, प्रेतांच्या रांगेत हें नवें प्रेत ठेवावें व पुन्हा त्या भयंकर स्थलीं काम सुरू करावें !! " अिंग्रजांच्या हाताखाली नेटिव्हांनी अशी अढळ शिस्त दाखवावी व दिल्ली शहरातील नेटिव्हांनी कामाची अेकमेकांवर ढकलाढकली करावी, ह्या भिन्नतेपासून पुष्कळ बोध घेणें अवश्य आहे. अधिकाऱ्याचा योग्य सन्मान व हुकमाच्या शब्दाला योग्य मान हें शिस्तीचें मुख्य बीज आहे. परंतु दिल्लीमध्ये ह्या बीजाला सर्वत्र पायांखाली तुडविलें जात होतें. बहुतेक दोष असमर्थ अधिकाऱ्यांकडे व बाकीचा बेबंद वर्तनी अनुयायांकडे व आता त्यात निराशेच्या अवमानघाताची भर !

दिल्लीबाहेरील वाढत चाललेला नेट व दिल्लीचे आत मावळत चाललेला हा अुत्साह या दोहोंचेही पर्यवसान करण्यासाठी अखेर सप्टेंबरची चौदावी तारीख अुजाडली. अिंग्रजी सैन्याचे चार विभाग करून त्यांपैकी पहिले तीन विभाग निकल्सनच्या हाताखाली काश्मीर दरवाज्यातून घुसण्यासाठी धाडण्यात आले व काबूल दरवाजातून घुसण्यासाठी चौथा भाग मेजर रीडच्या हाताखाली अिंग्रजांच्या अुजवीकडे अुभा राहिला. ह्या दोन ठिकाणी तटाला भोकें पाडण्याचे कार्य चालू झाले. सूर्योदय होतांच अिंग्रजांच्या तट फोडणाऱ्या तोफा अेकदम बंद पडल्या. अिंग्रजांच्या तळात अेक क्षणभर अंतिम समयाची निःशब्दता होअून लगेच निकल्सनसह तो तळ अेखाद्या जिवंत भिंतीसारखा अेकदम पुढे धावत निघाला. त्याच्या पहिल्या नंबरच्या कॉलमने काश्मीर बेस्टनपाशी तटाला जें भोक पाडलेले होतें तिकडे धडक घेतली. आतून गोळघाचा मारा सुरू झाला. खंदकात

अिंग्रजांचीं प्रेतें धडाड धडाड कोसळता कोसळता भाहीं तटापर्यंत आलें. तटास शिडी लागली. शिडीवर चढला की खाली पडला. अशा निकराच्या मान्यातून अिंग्रजी फौज पुनःपुन्हा तट चढू लागली. अिंग्रजी फौज त्या तटाच्या भोकातून आत घुसली. तटाचा तो भाग भर झाला—विजयाचें शिंग फुंकलें गेलें!

ह्या काश्मीर बेस्टनप्रमाणेच वॉटर बेस्टनच्या भोकाकडेही भयंकर हातघाअी होअून मरता मरता व मारता मारता अिंग्लिनाच्या दुसऱ्या नंबरच्या कॉलमनें तें भोक भर करून तटात अुडी घेतली.

तिसऱ्या नंबरचा कॉलम काश्मीर दरवाज्याकडे चालला होता. लेफ्टेनंट होम व सालकेल्ड हे तो दरवाजा सुरुंग लावून अुडवून देण्यासाठीं त्या दरवाजा-समोर येतात भिंतीवरून, खिडकीतून तटावरून गोळ्यांचा पाअूस पडू लागला. काश्मीर दरवाज्यासमोरचा खंदकावरील पूल पाडलेला आहे. फक्त अेक तुळअी काय ती शिल्लक राहिलेली दिसते बस्स, चला तिच्याच वरून पुढे. सार्जंट मेला. हा महादू पडला—पण चल होम पुढें चल. होमनें पुढें धावून हातातील सुरुंग अखेर दरवाज्यात ठेवला. तेव्हा आग लावणारी दुसरी टोळी तुळअीवर घुसू लागली. लेफ्टेनंट सालकेल्ट गोळी लागून पडला, कॉरपोरल तू पुढें घूस—तुलाही गोळी लागली? पण कुछ पर्वा नहीं. मरता मरता दारूनें ठिणगी तर दिली टाकून! धडाड धडाड धडाड! काश्मीर दरवाजा त्या भयंकर सुरुंगानें धडाडून गेला. परंतु हा आवाज काश्मीर दरवाजा अुघडण्याची वाट पहात असलेल्या अिंग्रजी सेनापतीला त्या रणनिकराच्या घनगर्जनेत स्पष्ट अैकू गेला नाही. तेव्हा त्यानें पुढें यावें कीं न यावें? व का न यावें? विजयाचें शिंग जरी मध्या अैकू आलें नाही तरी ते पुढें गेलेले अिंग्रजी वीर आणि ते अपयशी झाले असतील हें शक्य नाही. आता बराच वेळ झाला आहे. तेव्हा आपण पुढें तर चलावेच, अशा निग्रहाच्या आत्मविश्वासानें कम्पबेलनें हल्ल्याचा हुकूम दिला. खंदकाला ते भिडले. त्यांनी खंदकात पडलेल्या आपल्या विजयी मरणोन्मुखांना पाहिलें व त्यांनी घेमार करीत काश्मीर दरवाज्यातील मोडलेल्या भागातून दिल्लीत अुडी घेतली. तों त्याच वेळेस तिकडे आपआपलीं कामें यशस्वी रीतीनें बजावून दिल्लीत घुसलेले ते पहिले दोन कॉलमही त्यांना मिळाले. निकल्सनच्या हाताखालील हे तिन्ही भाग युद्धभूमीतील कामें रणभूमीवरील पाश्चात्त्यांचितक्या टापटिपीनें करून सैन्याचा चौथा कॉलम कुठे आहे असें अेकमेकास पुसू लागले.

अिंग्रजी सैन्याचा चौथा भाग मेजर रीडच्या हाताखाली काबूल दरवाज्यातून हल्ला करण्यासाठीं अिंग्रजाच्या अुजव्या बाजूनें निघाला होता. सब्जीमंडीपर्यंत तो चालून येतो न येतो तों त्याला अडथळा करण्यासाठीं दिल्लीतून बाहेर पडलेल्या शिपायांची त्याची गाठ पडली. पहिल्या सामन्यातच मेजर रीड खाली आल्यानें अिंग्रजी फौज किंचित् दबून तिच्यात हुकमाचा घोटाळा अुडून व बडवाल्यांना स्फुरण

घडून अिंग्रजांची बाजू अुचलती की काय असा रंग दिसू लागला. परंतु होप ग्रँट अचूक रीतीने आपल्या घोडेस्वारांसह तिकडे दौडत आल्याने पुन्हा दोन्ही पक्षांचें रण अटळ मांडलें गेलें. अिंग्रजांनी तोफांचा मारा जबर चालू केला असताही किशन-गंजच्या बागेतून, घराघरातून बंदुकवाल्यांच्या गोळ्या सू सू करीत रक्ताचा पाअूस पाडीत होत्या. अिंग्रजांचे घोडेस्वारांना पुढे हल्ला रेटणें अशक्य झालें–तोफा बंड-वाले जिंकून घेतील या भयाने मागे फिरणें अशक्य झालें. ते अिंग्रजी घोडेस्वार ठिकच्या ठिकाणी पटापट मरण्यासाठी खिळून गेले. अेक मनुष्यही खाली पडल्या-शिवाय मरणाला भिअून अिकडे तिकडे हलेना. अिंग्रजांकडील नेटिव्ह घोडेस्वारांच्या या अपूर्व शूरतेच्या व हुडमर्दीच्या अपूर्व निश्चयाबद्दल त्यांचा कमांडर होप ग्रँट म्हणतो, "नेटिव्ह घोडेस्वार अटळ राहिले, त्यांच्या शिपाअीगिरीचा गर्व आहे. मी त्यांना अुत्तेजन देअू लागलो तों ते म्हणाले "चिंता नको, या जागी आम्ही आपण सांगाल तितका वेळ अुभे राहू !"

ह्या अिंग्रजांचे बाजूस मिळालेल्या नेटिव्ह वीरांच्या शौर्यास तोड देणारें शौर्य स्वातंत्र्याच्या बाजूस मिळालेल्या नेटिव्हांनीही प्रकट केलेलें होतें. हटतांना पेटलेले ते बंडवाले तसू तसू जमीन लढवीत लढवीत आता अिदग्यावर हाणामारीचा कळस करू लागले. पुनःपुन्हा चवताळून हल्ल्यावर हल्ले ! अिदगा ताब्यात घेअू पहाणारी अिंग्रजी फौज लागली डगमगावयास–चढवा पुन्हा हल्ला; अिंग्रजी फौज हटली—चढवा पुन्हा हल्ला; अिदग्यापासून मार खात खात अिंग्रजी फौज वरील शूर घोडेस्वारांच्या व अिंग्रजी तोफांच्या आश्रयास आली—तरी चढवा पुन्हा हल्ला. आता मात्र अीश्वर संभाळो. तें ठाण मोडून ह्या अिंग्रजी फौजा परत चालल्या ! शाबास बंडवाल्यांनो ! भली केलीत अुज ! जर तुमच्यापैकी सगळ्यांनी असेंच केलें असतें— !

ह्या चौथ्या भागाचा असा मनोभंग होत असताना अिंग्लिशांचे शहरात घुसलेले तीन भाग काश्मीर दरवाज्यापाशी थोडा वेळ थांबून मग शहर काबीज करण्यासाठी अुसळी मारून निघाले. कॅम्बेल, जोन्स व योद्धा निकल्सन हे तीन प्रमुख सेनापति आपल्या निधड्या फौजेला "चला, मर्दांनो चला" या युद्धगीताने आव्हान देत काबूल दरवाजाकडे लढत निघाले. जी जी तोफ वाटेत सापडेल ती ती काबीज झाली. जो जो अुचवटा वाटेत लागेल त्यावर पुन्हा ब्रिटिश निशाणें चढू लागलीं व हाणमार होत होत ब्रिटिश सेना बर्नबेस्टन ह्या ठाण्यापर्यंत जाअून धडकली. परंतु येथून आता रिकाम्या तोफा, निर्जीव अुचवटे व शूरशून्य रण ह्याच्या अैवजी 'दीन बोलो दीन 'ची भयंकर 'किंकाळी भेटली व बंदुकवाल्यांच्या गोळ्यांचा मारा अुठला, निकराचा रक्तपात अुठला, मृत्यूची धेमार अुठली, विजयाने धडक घेत आलेली अिंग्रजी फौज नामोहरम होअून हटली. समोरून हें हटणें पाहताच तो हट्टी वीर निकल्सन वाघासारखा चवताळून धावला. 'शूरवीराला जगात काहीही असाध्य नाही' हा ज्याचा बाणा होता तो 'निकल्सन वॉटर बेस्टनवर झालेल्या अपमानाने चिडून जाअून पुन्हा त्या गल्लीत

जेव्हा घुमू लागला तेव्हा पुन्हा रणधुमाळी माजण्यास आरंभ झाला. या २०० यार्ड लांबीच्या गल्लीत त्या दिवशी जी धुमश्चक्री माजली ती पानपतवारच्या रणाची अेक संक्षिप्त आवृत्तीच होती. जो अिंग्रज पाऊल पुढे टाकी त्याला त्या स्वातंत्र्यार्थी जिहादींनी समरावर कोसळून दिलाच म्हणून समजावें. छपरावरून, खिडकीतून, दरवाजांतून, ओटयावरून ती स्वातंत्र्याभिमानी हट्टी गल्ली आपल्या सहस्रावधि बंदुकांतून गोळयांच्या ज्वाला ओकू लागली, व त्या हट्टी निकल्सनलाही हटवू लागली—शूर मेजर जेकबलाही तिने दाताखाली भरडून टाकलें ! वीर निकल्सन, आता तूच पुढे हो ! तुझ्याशिवाय अिंग्रजी सेनेतला अेकूण अेक पुढारी ह्या गल्लीने गारद केलेला आहे. आला, हे स्वातंत्र्याभिमानी गल्ली, हे वीरतेच्या गुहे, आला हा निकल्सन तुझ्यावर धावून ! आता खरी परीक्षेची वेळ आहे ! निकल्सन त्या गल्लीवर व ती गल्ली निकल्सनवर ! बेसुमार झुंजू लागलां ! अितक्यात अिंग्रजी सेनेत विद्युल्लता पडल्याप्रमाणे अेकच हाहाकार उडाला. निकल्सन ? निकल्सन ? आता कसला निकल्सन ! कोण्या शूर शिपायाने त्या अिंग्रजी महारथ्याला अचूक नेमाने जमिनीवर घायाळ करून धडाडून दिलें, अेकच हाहाकार झाला. 'हटा, हटा' म्हणून अिंग्रज सेनेत व 'छाटा, छाटा' म्हणून त्या गल्लीत अेकच आरोळा उठला ! जिची नसे निकल्सनच्या रक्ताने भरली ती ही भयंकर गल्ली ! जिच्या जमिनीचा तसू तसू कोण्या तरी अिंग्रजाचें थडगें झालेला !

ह्या वीर्यवान् गल्लीतून दुसऱ्याकडे पळून चाललेल्या या अिंग्रजी सेनेचा भाग काबूल दरवाजापर्यंत जेमतेम पोचतो न पोचतो तों जुम्मा मशिदीपाशी येताच तिच्यात घुसलेल्या जिहादाची रणगर्जना अैकू आली. त्याचा कमांडर कॅम्पबेल जखमी झाला व त्या सैन्यविभागाने पिछेहाटीचे बिगूल फुंकले.

दिल्लीवरील हल्ल्याचा पहिला दिवस येथेच संपला. असा भयंकर दिवस अिंग्रजांच्या राज्यावर हिंदुस्थानात कधी अुगवलेला नव्हता. त्यांच्या चार भागांपैकी तीन भागांचे प्रमुख कमांडर जायबंदी झाले, ६६ ऑफिसर समरावर पडले, ११०४ लोक कामास आले ! सध्याकाळी या विलक्षण मृत्युसख्येने काय मिळविलें हे पाहू लागता जनरल विल्सनला समजले की, दिल्लीच्या तटाचा चतकोर भाग काय तो हातात आहे ! भयाने, चिंतेने व निराशेने वेडा झालेला तो अिंग्लिश कमांडर म्हणाला, "दिल्ली सोडून आताच्या आता पिछेहाट केली पाहिजे. सर्व शहर अजून अजेयचे अजिंक्य आहे माझ्या हाताखालील शूर लोकांनी ह्या अेक गल्लीने रक्षा केली आहे व जे मूठभर लोक अजून जिवंत आहेत त्यांना हजारो बंडवाले घरांतून पुढे येण्याविषयी अैटीने आव्हान देत आहेत अशा स्थितीत अेकूण अेक मनुष्य गारद करणार की पीछेहाटीने अपयश पदरी घेणार." अिंग्लिशांचा मुख्य कमांडर जनरल विल्सन म्हणाला, म्हणून आता पिछेहाटच केली पाहिजे.

पिछेहाट केली पाहिजे? मरणोन्मुख झालेल्या निकल्सनला हॉस्पिटलमध्ये

ही यातमी मळताच तो वीर म्हणाला, "पिछेहाट ? त्या पिछेहाटीच्या विल्सनला गोळी घालण्याजिततीं शक्ति देवाचे दयेने मजमध्ये अजून शिल्लक आहे !" या मरणान्मुख वीराप्रमाणेच सर्व जिवंत अिंग्रजांचेंही म्हणणें पडून व सप्टेंबरच्या १४-व्या रात्री काबीज केलेला भाग संभाळून अिंग्रजी फौज अढळ राहिली.

जनरल विल्सनच्या पिछेहाटीचे वेताला अिंग्रजी योद्धयांनी जितकें हाणून पाडलें त्याहीपेक्षाही जास्त रीतीने त्या रात्रीपासून बंडवाल्यांच्या तळामध्ये चाललेल्या हालचालीनें विल्सनच्या भयाचें वैयर्थ्य अुघड करण्यास आरंभ केला. दिल्ली जास्त वेळ न लढविता आपण बाहेर प्रदेशात युद्ध चालविण्यास निघून जावें हें अेका पक्षाचें मत पडलें व दुसऱ्या पक्षानें मरण आलें तरी दिल्लीने मरण जाअू नये असा आग्रह धरला. अिंग्रजांकडे दिनीही मतांतरें झालीं तरी त्यांपैकीं बहुमताला मान मिळून शेवटीं भिन्नतेची अेकवाक्यता करण्याचा जो अमोल सद्गुण तो शिपायांच्या चजबजपुरीत आपल्या अभावानेच वमन असल्यामुळे वरील दोन्हीं पक्ष अेका दिशेत विलीन न पावता निरनिराळ्या मार्गांनी चालू लागले. काही शिपायी लोक दिल्ली सोडून बाहेर पडले, काही शेवटपर्यंत दिल्लीच्या भूमींवरून अेकही पाय मागे न घेण्याचा निश्चय करून रणांगणात अचल राहिले. ता. १५ सप्टेंबरपासून ता. २४ सप्टेंबरपर्यंत दिल्लीला ह्या पक्षाने लढविलें आणि ते अिनक्या निश्चयानें, शौर्यानें व दृढतेने की, मशिदीत वा राजवाड्यांत अिंग्रजी फौज घुसत असता त्या सर्व फौजे-पुढे अेकेक पहारेकरी आपल्या बंदुकीस हात घालून अुभा राही. अिंग्रज लोक जवळ येताच नावकामीनें बंदूक रोखून धरी, हातांशी हात भिडताच शत्रूवर बंदुकीचा शेवटचा वार सोडी व स्वदेशासाठीं जिवंतपणाची ही अंतिम सेवा करून नंतर मरणाच्या सेवेला वाहून घेअी. अिंग्रज अितिहासकार म्हणतात, "ज्या वेळेला वाड्यात अिंग्रजी सेना घुसू लागली तेव्हा तिथे फक्त काही जिहादी लोक अुभे राहिलेले आढळले. त्यांनी रागही धरली नाही, कारण राग करण्याअितकीही त्यांची संख्या बिलकूल नव्हती. तथापि ज्या शत्रूशीं आज तीन महिनेंपर्यंत हुटाटटाने त्यांनी झुंज घेतली त्या फिरंग्याचे हाडवैर आयुष्याच्या अंतिम क्षणापर्यंतही ढिलें झालेलें नाही हें सिद्ध करण्यासाठी ते शिपाअी विजयाची काडीअितकीही पर्वा न धरता ते अचाट-कर्मी लोक आम्हाला वेडावीत अढळपणे राहिलेले होते !"

अिंग्रजांचे हाती दिल्लीचा तीन चतुर्थांश भाग गेल्यानंतर कमांडर-अिन-चीफ बख्तखान हे दिल्लीच्या बादशहाकडे गेले व म्हणाले, "दिल्ली तर आपल्या हातातून निसटली आहे. परंतु म्हणून जयाचा सर्व संभवही आपल्या हातातून निसटलेला आहे असे नाही. कोंडलेल्या ठिकाणचें रक्षण करण्यापेक्षा मोकळ्या प्रदेशात शत्रूला पिसाळून मोडण्याचा डाव अजूनही निश्चित विजयी होणारा आहे. आपल्या फौजेपैकी जे ह्या स्वातंत्र्ययुद्धात मरेतोपर्यंत तरवार अुपसलेली ठेवण्यास सिद्ध आहेत अशा योद्ध्यांना निवडून मी त्यांच्यासह दिल्लीहून लढाअी घेत दुसरीकडे

निघून जात आहे. शत्रूला शरण रिघण्यापेक्षां लढाओी घेत बाहेर पडणेच मला अिष्ट वाटत आहे. अशा वेळेला आपणही आम्हांबरोबर चलावें व आपल्या ध्वजाच्या आश्रयाखाली आम्ही स्वराज्यासाठी असेच लढत राहू." बाबराच्या, हुमायुनाच्या, किंवा अकबराच्या तेजातील शतांश जरी ह्या वृद्ध मोंगलाचे अंगात असता तरी त्याने हें शूरत्वाचें आमंत्रण मान्य करून त्या धाडसी बख्तरखाना-बरोबर दिल्लीहून कूच केले असते. परंतु वार्धक्याने हताश, राजविलासाने मति-मंद, व पराजयाने भयभीत झालेल्या त्या बादशहाने शेवटच्या क्षणापर्यंत आपली अनिश्चितता व चचलता कायम ठेवली. शेवटच्या दिवशी हुमायुनाचे कबरीत तो बादशहा लपून बसला व बख्तखानाचें आमंत्रण नाकारून अिलाहीबक्ष मिर्झा याच्या अुपदेशाप्रमाणे अिंग्रजास शरण रिघण्याचें ठरवू लागला. हा अिलाहीबक्ष म्हणजे अस्सल फितुरी होता ! त्याने ही बातमी अिंग्लिशांना दिली. अिंग्लिशांनी तावडतोब कॅप्टन हॉडसनला तिकडे धाडले. जीवदानाचें वचन घेअून बादशहा स्वाधीन झाला. त्याला बाडघापर्यंत आणून अिंग्लिशांनी कैदेत टाकलें. अितक्यात पुन्हा ते फितुरी कुत्रे अिलाहीबक्ष व मुनशी रजबअली धावत येअून म्हणाले ' पण राजपुत्र अजून हुमायुनाचे कबरीतच दडलेले आहेत." पुन्हा हॉडसन धावला, राजपुत्र त्याला शरण आले व त्यांना त्यांनी गाडीत घालून दिल्लीकडे चालविलें. त्या शहरात पाय टाकताच हॉडसन त्या राजपुत्राच्या गाडीकडे दौडत गेला व ओरडून म्हणाला, "अिंग्लिशाच्या बायकामुलांचा वध करणाऱ्यांना देहान्त शिक्षाच दिली पाहिजे !" थरकाप भरलेले, गाडीतून खाली ओढलेले व ज्यांच्या अंगावरील सर्व वस्त्रें हिरावून घेतलेली आहेत अशा त्या शरणागत राजपुत्राकडे हॉडसनने तोंड फिरविले व तीन गोळ्यासरशी त्या तीन राजपुत्राने त्याने भराभर खून पाडले ! तैमूरवंशवृक्षाची ही शेवटची पालवी हॉडसनने खुडून टाकली ! परंतु त्याच्या क्रूरतेचें समाधान ह्या प्रथित राजवंशीय कुमाराना नुसते गोळ्या घालून ठार मारण्याने मुळीच होअीना. मरणापर्यंत तर रानटी मनुष्यें देखील सूड अुगवितात. मग सुधारलेल्या मुशात अमानुषता ती कोठे राहिली ? म्हणून त्या राजपुत्राच्या प्रेताना अुचलून नेअून दिल्लीच्या कोतवालीकडे फेकण्यात आलें गिधाडांना त्या तैमूरच्या वंशजां-वर यथेच्छ मेजवानी दिल्यावर त्या कुजलेल्या प्रेताना फरफर ओढीत नेअून नदीत झोकून दिले. अकबराच्या वंशाला मूठमाती देण्यासही कोणी नसावे हें, कालचक्रा, तुझे कोणखेळ आहेत ! आता शिखाना खरेखरेच वाटलें की त्यांच्या ग्रंथातील भविष्य पूर्ण झाले ! पण तें कोणत्या अर्थाने ? कोणत्या प्रकारे ? व काय परिणाम होअून ?

नतर दिल्लीमध्ये भयंकर कत्तलीला व लुटीला आरभ झाला. त्याची हकीगत अैकूनच लार्ड अेल्फिन्स्टन जॉन लॉरेन्सला लिहितो, "दिल्लीचा वेढा सपल्यानंतर आपल्या सैन्याने दिल्लीचे केलेले हाल हृदयद्रावक आहेत. शत्रू व मित्र

यांचा भेद न पाहता सरसकट लूट अुडविली जाते आहे. लुटीत तर आपण परोपरस नादिरशहावरही मात केली. ![२] जनरल औट्रम दिल्ली जाळावी म्हणून म्हणतो.

युरोपियन व नेटिव्ह शिपायांसुद्धा अिंग्रजांनी दिल्लीच्या वेढ्यात गुंतलेली फौज जवळ जवळ दहा हजार पर्यंत वाढलेली होती व त्यांपैकी मृत्युमुखात पडलेले व जायबंदी झालेले सुमारे चार हजार लोक त्या युद्धात कामाला आले. त्रिगियन वॉरसारख्या प्रचंड युद्धातही मनुष्यहानीने असले भयंकर प्रमाण आढळत नाही.[३] बंडवाल्यांच्या बाजूकडे जी मनुष्यहानि झालेली असेल तिचे विश्वसनीय प्रमाण काढणे हे अिंग्रजी लेखांवरून जरी अशक्य आहे तरी कमीत कमी पांचपासून सहा हजारांपर्यंत तरी त्यांचे नुकसान झाले असलेच पाहिजे.[४]

अशा रीतीने हे अितिहासप्रसिद्ध शहर स्वदेशस्वातंत्र्याच्या व स्वधर्मरक्षणाच्या दिव्य चेतनेने संचारित होअून सुमारे १३४ दिवसपर्यंत अिंग्रजासारख्या सबळ रिपूच्या समरकौशल्याचा धिक्कार करीत करीत अहोरात्र झुंजत राहिले. *अेकदरीत तत्त्वनिष्ठेला शोभेल अशीच निकराची ही झुंज झाली !* आपल्या तटावरील फिरंगी निशाण झुगारून देअून स्वकीय निशाणाची द्वाही दिल्लीने ज्या दिवशी फिरविली, गुलामगिरीचे मायाजाळ फाडून टाकून स्वातंत्र्यप्रथनाचे धाडसी कृत्य दिल्ली ज्या दिवशी करती झाली, सर्व हिंदुस्थानच्या नांवाने स्वधर्मप्रतिष्ठेचा राष्ट्रीय ध्वज अुभारून त्या विस्तृत देशाच्या अैक्य संवेदनेचा दिल्लीने ज्या दिवशी प्रथमोच्चार केला त्या दिवसापासून तों बहादुरशहाच्या राजवाड्यात अिंग्रजी तरवारीने शेवटचा स्वदेशी रक्तबिंदु पाडीतोंपर्यंत ह्या शहराने स्वदेशस्वातंत्र्याच्या जिहादीला शोभेल अशी वीरताप्रचुर, स्वार्थनिवृत्तिमय व अुदारचरित कृत्यें काही थोडी केली नाहीत ! पुढारी नसता, संघटना नसता, अिंग्रजासारख्या कसलेल्या शत्रूशी गाठ असता व विशेषता अस्सल फिरंगी तरवारीपेक्षा कमअस्सल स्वकीयाच्याच तरवारी आपले प्राण घेण्यासाठी दिल्लीवर तुटून पडत असता पहिल्या अडचणीपासून अनाथता, दुसरीपासून विस्कळितता, तिसरीपासून असह्यता व चौथीपासून अुत्पन्न होणारी अुद्विग्नता ह्या सर्व संकटांना न जुमानता रणभूमीवर देशवीरासारखे व धर्मवीरासारखे अचल मरण वरणारे लोक दिल्लीच्या वेढ्याचा अितिहास निष्फळ होअू देणार नाहीत ! त्याच्या हातून झालेले दोष व त्याच्या हातून घडलेली सत्कृत्यें हीं दोन्हीही भावी पिढीच्या अभिमानार्हतेला पात्र

---

२. Life of Lawrence, Vol, II, page 262

३. Forrests' Introduction to Vol. II.

४. Rotten सारखा ग्रंथकारही म्हणतो :The casualties of the mutineers were often manifested beyond all due bounds." page 195.

होतील ! म्हणून लज्जास्पद नव्हे त्या दोषांच्या व त्या सत्कृत्यांच्या ओळीत एका अद्‌भुत तत्त्वनिष्ठेचें तेज, स्वधर्माभिमानाचे तेज, स्वदेशस्वातंत्र्याचे तेज तळपत असल्याने तीं उभयकृत्यें हीं नैतिक शिक्षणाची मूर्त व्याख्याने आहेत !

हे दिल्ली नगरी, तू पडलीस त्यात लज्जा कसली ! कारण तू स्वराज्याकरितां – स्वधर्माकरितां – स्वदेशाकरिता लढत होतीस ! तेव्हा "दन्तछेदो हि नागाना श्लाघ्यो गिरिविदारणे !" पर्वताशी झुज घेताना चूर्ण झालेला दातच गजश्रेष्ठाला भूषणभूत असतो !

* * *

प्रकरण पांचवें

# लखनौ

अव्यवस्थित राज्यपद्धतीपासून प्रजेचें संरक्षण करण्यासाठी अयोध्येच्या घरातील कोनाकोपऱ्यापर्यंत वापर चालीत असलेली ब्रिटिशसत्ता जून महिन्यामध्ये क्रांतिकारकानी मारीत झोडीत अयोध्येच्या एका लहानशा रेसिडेन्सीत नेऊन कोंडून टाकल्यानंतर तिथे तिला सर हेन्री लॉरेन्सने धीर देण्यास आरंभ केला. चिनहतच्या लढाईत पराभव पावून सर हेन्रीने जेव्हा रेसिडेन्सीत पाय टाकला व त्या ठिकाणी अयोध्येतील अधिराज्यत्वाचा प्रश्न सोडविण्याचा जेव्हा घाट घातला तेव्हा त्याच्याजवळ त्या रेसिडेन्सीत सुमारे १००० युरोपियन्स व ८०० नेटिव्ह लोक जमलेले होते; व या लष्करी लोकांबरोबरच अितरही गोरे व काळे ख्रिश्चन लोक जे आलेले होते त्यांसुद्धा अेकदर माणसें ३००० पर्यंत होती. चिनहतच्या पराजयानंतर हें सैन्य जेव्हा प्रथमतः रेसिडेन्सीत कोंडले गेलें तेव्हा त्या धाअीमध्ये व अकस्मात् आलेल्या सकटामध्ये रेसिडेन्सीची जागा, भिंती व कोट ही सर्व अत्यंत दुर्बल स्थितीत पडलेली होती. ह्या अिग्रजाच्या असहायतेचा तेव्हाच फायदा घेअून व त्यांच्यावर जोराचा हल्ला चढवून ती रेसिडेन्सी सर करण्याची बडवाल्यांना फार सुसंधि आलेली होती. परंतु ह्या संधीचा फायदा घेण्यासाठी अवश्य असणारी जूट शिपायांमध्ये मुळीच नसल्याने लखनौला कोंडमारा झाल्यानंतर सुमारे दोन आठवडे आपल्या भोवती तटबंदी व अुत्तम संरक्षक लष्करी बंदोबस्त करण्यात अिग्रजाना सवडता आले

बंडवाल्यांच्या फौजेला चिनहत येथील लढाअीत ज्या दिवशी विजय मिळाला त्या दिवशीच अयोध्येतील ब्रिटिश राजसत्तेचा शेवट होअून बटाला राज्यक्रांतीचे स्वरूप प्राप्त झालेले असल्यामुळे शिपायानी, संस्थानिकानी व नागरिकानी प्रथमतः

लखनौच्या रिक्त सिंहासनावर स्वमंत सत्तेची प्रस्थापना करण्यास आरंभ केला. चिनहटच्या रणानंतर पहिल्या आठवड्यात जिकडे तिकडे माजलेल्या अराजकतेची धंदाधुंदी मोडल्याशिवाय पुढील युद्धकार्यास संघटना येणारी नसल्याने त्या आठवड्यात अिंग्रजांना आपल्या सदर्दीची बंदोबस्ती बळकट करण्याची सवलत देऊनही बंडवाले प्रथम लखनौच्या राज्यरचनेच्या कार्यास लागले. लखनौचे माजी नवाब वर्जीद अल्लीशाह हे कलकत्त्यास अिंग्रजांच्या कैदेत असल्यामुळे त्यांनी त्या वृद्ध नवाबाचा पुत्र युवराज बर्जिस कादर यालाच लखनौच्या गादीवर सर्वसंमताने बसविले. बर्जिस कादर हा अल्पवयी असल्याने अयोध्येच्या राज्याचा सर्व अधिकार राजमाता हजरत महल हिच्या हाती देण्यात आला होता. दिल्लीच्या राजवाड्यातील बादशाह अत्यंत वृद्ध असल्याने त्याच्या नावाने बहुतेक चालकत्वाची सूत्रे बेगम झिनत महाल हीच चालवीत असे तर लखनौच्या राजवाड्यातही तेथील नवाब अल्पवयी असल्यामुळे तेथील राजप्रतिनिधित्व बेगम हजरत महल हिच्या कर्तृत्वावर अवलंबून असे. ही अयोध्येची बेगम सत्तावनची दुसरी लक्ष्मीबाआी जरी नसली तरी पराकाष्ठेची कर्तृत्ववती, स्वातंत्र्यकरमा व साहसगंकल्पा होती यात काही शंका नाही. तिच्या दरबारात मम्मूखान नावाच्या सरदारावर तिची फार प्रीति असे. शिपायांच्या निवडक प्रतिनिधींना, मम्मूखानादिक सरदारांच्या पुढीलांना व अयोध्या प्रांतातील निरनिराळ्या ठिकाणांहून लखनौकडे स्वातंत्र्ययुद्धासाठी धावत आलेल्या सर्व लोकांना संमत असलेले असे निरनिराळे पुरुष बेगम हजरत महल हिने न्याय, वसूल, लष्कर, पोलीस वगैरे खात्यातील अधिकारावर नेमून टाकले. दररोज निरनिराळ्या राजकारणाची चर्चा करण्यासाठी दरबार भरविण्यात येत असून तेथे स्वतः बेगमसाहेब आपल्या अल्पवयी नवाबाच्या नावाने सर्व राजत्वाधिकार चालवीत असे. अयोध्याप्रांत स्वतंत्र होऊन अिंग्लिश राजसत्तेचा येथे लवलेशही उरलेला नाही ही वार्ता बेगमेच्या सहीशिक्यानिशी दिल्लीचे बादशहाकडे नजर नजराण्यासह धाडण्यात आली. आजूबाजूचे सर्व जमिनदार मांडलिक राजास तर लखनौला निघून येण्याविषयी पत्रे गेली. निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या झालेल्या नेमणुका, राज्यव्यवस्थेच्या सर्वांगाची केलेली व्यवस्था, दररोज राजसभेचे भरणारे दरबार वगैरे प्रकारावरून अयोध्येतील बंडाचे बंडखोरपण नष्ट होऊन त्याला राजकत्वाचे संघटन प्राप्त झाले असे सर्वत्र दिसू लागले.

पण फक्त दिसू लागले आहे — कारण हे अधिकारी व ही व्यवस्था व हे दरबार तावडतोब नेमण्यात जितकी शास्त्रशुद्धता बंडवाल्यांनी दाखविली तितकी त्यांनी वरील नेमणुकांचे आज्ञापालनात बिलकूल दाखविलेली नव्हती. राज्यक्रांतीमध्ये सामान्यतः हाच दोष घडण्यात येऊन तिच्या आरंभातच तिच्या नाशाची बीजें पेरण्यात येतात. ज्याचे राज्य उलथून टाकावयाचे असेल त्याच्या कायद्यांना तरवारीने चिरून टाकणे म्हणजे राज्यक्रांति होय! परंतु अेकदा परक्यांच्या कायद्याला

तरवारीने चिरडण्याची सवय लागली की मग त्या धुंदीमध्ये त्या सवयीचें पर्यवसान वाटेल त्या कायद्याला स्वतःच्या लहरीप्रमाणे तुडविण्याची चोट लागू लागते. दुष्ट कायद्याचा नाश करण्याचे कामी चटावलेली तरवार कायद्याचाच नाश करू लागते. परकयांच्या अंमलाचा निःपात करू निघालेले वीर शेवटी अंमलाचाच निःपात करू पाहतात. परराज्याचीं बंधनें छेदून टाकण्याच्या रणमदात त्याना राजबंधनेच नकोशी होतात. आणि अशा रीतीने राज्यक्रांतीचें पर्यवसान अराजकतेत, सद्गुणाचें पर्यवसान दुर्गुणात व हितप्रयत्नाचें पर्यवसान अहितात होऊ लागतें. अराजकता ही परराज्याइतकीच व बंधनरहितता दुष्ट बंधनाइतकीच व्यक्तीच्या, समाजाच्या व राष्ट्राच्या नाशाला कारणीभूत होणारी आहे. ह्या समाजसत्याचें विस्मरण ज्या ज्या क्रांतीत घडू लागले त्या त्या क्रांतीचा तिच्या क्रांतित्वामुळेच विनाश झालेला आहे! काही रोगांचा परिहार करण्यासाठी मद्यसेवनास आरंभ केला असता साध्याची भूल पडून साधनामुळे तो रोग गेला तरी हलके हलके तें मद्य पिण्याची सवय जशी जात नाही तशीच दुष्टबंधनपरिहरणासाठी घेतलेलें बंधनच्छेदनाचें मद्य दुष्टत्व गेल्यानतरही व्यसनी लोकांस अंदाधुंद व बेशुद्ध करू लागते. जी राज्यक्रांति अन्यायाचें व जुलमाचें उच्छेदन करणारी आहे तीच राज्यक्रांति पवित्र होय! परंतु अेका अन्यायाचें व जुलमाचें उच्छेदन करून त्याच्या जागी ज्या क्षणी राज्यक्रांति ही दुसऱ्या अेखाद्या अन्यायाचें व जुलमाचें बीजारोपण करू लागते त्याच क्षणी ती राज्यक्रांति अपवित्र ठरू पाहते व अपवित्रतेच्या मागोमाग असणारीं विनाशकतेचीं विषबीजे लवकरच तिचे प्राण हरण करतात!

अेतदर्थ, पारतंत्र्यरोगाचें परिहरण करण्यासाठी ज्याना राज्यक्रांतीचें मद्य प्यावयाचें असेल त्यानी त्या मद्याचें व्यसन आपणास न लागेल अशी नेहमी दक्षता ठेवलीच पाहिजे. परकीय सत्तेचा धिक्कार करीत असतानाच स्वकीयसत्तेला सन्मान देण्याची मनाला दृढ शिक्षा देत जावी. दुष्ट बंधनाचा उच्छेद करताना बेबंदशाहीची चटक न लागेल अशी खबरदारी घ्यावी. परराज्याचा व परनिर्मित अधिकाराचा निःपात करताना स्वराज्याला व स्वनिर्मित अधिकाराला अत्यंत पूज्यतेने वद्य मानीत जावें. परसत्तेचा उच्छेद होताक्षणीच स्वदेशाचे समाजात अराजकतेचे नाशकारक परिणाम घडू नयेत म्हणून तत्क्षणीं बहुमतमतीनें जी राज्यघटना निर्माण होईल तिला सर्वांनी वद्य मानली पाहिजे. त्या राज्यघटनेकडून जे अधिकारी नेमण्यात येतील त्याच्या आज्ञाना शिरसामान्य केलें पाहिजे. त्याच्या हुकमाप्रमाणे वर्तन ठेवलें पाहिजे. व्यक्तीची लहर विसरून जाऊन समष्टीच्या तत्त्वाशी तन्मयता केली पाहिजे व ह्या बहुमतनिर्मित स्वराज्यघटनेत जर काही बदल करणें आपल्या विवेकबुद्धीला न्याय्य वाटलें तर तें बहुमत नियमानुसार असणाऱ्या कायदेशीर मार्गानेच घडवून आणले पाहिजे. साराश बाहेर परकयांशी राज्यक्रांति, परंतु आत जगनिर्मिति, बाहेर तरवार परंतु आत कायदा!

राज्यक्रांतीच्या यशसिद्धीसाठी अत्यंत आवश्यक असणारी ही राज्यघटनेची तत्त्वें सत्तावनसालीं पूर्णांशानें पुष्कळ भागांच्या रीतीनें पाळली गेलीं होतीं. बंड होतां-क्षणींच शक्य तितक्या त्वरेनें दिल्ली, लखनौ, कानपूर वगैरे शहरीं व्यवस्थित राज्य-घटनेशीं संबंधें करण्याकडे लक्ष देण्यात आलें. व्यक्तिविषयक अन्यायी असहिष्णुतेनें ह्या सर्व प्रमुख शहरीं कोणीही लोकया शेवटपर्यंत भुमा राहिला नाहीं. निर्विवादसिद्ध अशाच राजपुरुषांची सत्तापरंपरागत मोंगलांच्या सिंहासनावर सर्वत्र योजना झालेली होती. ह्या सर्व राजपुरुषांनीं ह्या दानांचा फाजील फायदा घेऊन आपले पूर्वार्जित हक्क वाढविण्याचा कुणाही हेतु दर्शविला नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट आपल्या स्वपोषासाठी देशस्वातंत्र्याच्या त्या विशाल समराला संमत देण्याचा समय येईल तर पूर्वीचे हक्क सोडून देण्याकरितां ते तयार झाल्याचे कैसे पुरावे प्रसिद्ध आहेत.

येथपर्यंत राज्यघटनेचा पूर्वार्ध भूषणीय उदारतेनें सत्तावन सालानें पाळीत आणला. परंतु ही घटना करण्यामध्यें अत्यंत प्रमुख भाग लष्करी आडदांड लोकांचा असल्यानें परराज्यबंधनें तोडताच त्यांना कोणतींच बंधनें सहन करवेनाशीं झालीं व राज्यक्रांतीच्या या गर्दीमध्यें त्यांची सर्व शिस्त बिघडून गेली. त्यामुळें स्वराज्य-घटनेच्या पहिल्या पवित्र लाटेमध्यें त्यानींच नेमलेल्या अधिकाऱ्यांचा पुढें तेच अपमान व अवज्ञा व उपहासही करू लागले व राज्यक्रांतीचें पर्यवसान अराजकतेंत होऊं लागलें. अशा स्थितींत त्यांच्या स्वार्थानें दूषित झालेल्या तत्त्वनिष्ठेला आपल्या व्यक्तिनिष्ठेच्या ऐश्वर्यानें शुद्धता देऊन स्वपरात्र माथें दिव्यत्वानें त्यांचें मनोहरण करून जो त्यांना पुन्हा स्वराज्यघटनेच्या नियमांत आणून बसवील असे अपूर्व पुढारीही— काही दिव्य अपवाद खेरीज करून — ह्या अधिकाऱ्यांत पैदा झाले नाहींत. त्यामुळें बरेच ठिकाणीं क्रांतिपक्षाच्या छावणींत सघटित संख्येचे ऐवजीं बाजारबुणगेच अधिक भरलेले असत. हे जे बाजारबुणगे होते त्यानींच ह्या क्रांतियुद्धाला अपजयाचे वाटेकरी केलें. क्रांतिकारकांत जे शूर, स्वार्थत्यागी व स्वातंत्र्ययुद्धाच्या समरांत पदन्यास करण्यासारखेच पवित्रचरित होते त्यांनीं हें प्रचंड युद्ध तीन वर्षेपर्यंत लढविलें.

लखनौच्या छावणीमध्यें या दुसऱ्या वर्गापेक्षा पहिल्या वर्गाचाच म्हणजे बाजारबुणग्यांचा फार भरणा असल्यामुळें बेगम हजरत महल हिच्या दरबारांतून नेमलेल्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांचे हुकूम कधींही मान्य होत नसत व शिपाई लोक बेमुर्वतीनें, जुलमानें व बेशिस्तीनें स्वच्छंद वर्तन करीत असत. या पहिल्या वर्गाची संख्या जरी मोठी होती तरी त्या दुसऱ्या वर्गातील जे थोडे लोक त्यांच्यांत वसत होते त्यांच्या अंगातील शूरत्वाच्या व उदात्त विचारांच्या नैसर्गिक तेजानें त्यांचाच पगडा शिपायांवर जास्त बसलेला असे व अशा करारी लोकांच्या आग्रहाप्रमाणें आज ता. २० जुलैला रेसिडेन्सींत कोंडलेल्या इंग्रजांवर पहिला टोलेजंग हल्ला करावयाचा बेत निश्चित झाला आहे

ता. २० जुलैला सकाळचे सुमारास अिंग्रजांवर चालू असणाऱ्या बंडवाल्यांच्या तोफा अेकदम बंद झाल्या. सकाळचे ८ चे सुमारास अिंग्रजी रेसिडेन्सीचे नजीक बंड-वाल्यांनी लावलेला सुरुंग धडाडून फुटताच बंडवाल्यांच्या फौजा पुढे हल्ला घेअून अुसळल्या. त्याच वेळेस त्यांच्या तोफांचाही अिंग्रजांवर जबर मारा सुरू झाला. रेडनवर, अिनेसच्या घराचे बाजूवर, अिंग्रजांच्या कानपूर बॅटरीवर अशा निरनिराळ्या दिशांनी बंडवाल्यांची सेना अिंग्लिशांवर तुटून पडली. त्या सेनेमध्ये जो भाग कानपूर बॅटरीवर चालून गेला होता त्यातील आवडीने अिंग्रजांच्या तोफांवर निधड्या छातीचा हल्ला केला. "चलो बहादुर चलो! चलो बहादुर चलो!" अशा घोषणा देत ते पुनः पुन्हा त्या तोफांवर अुसळून जात. ज्याच्या हाती त्यांचा ,स्वराज्यध्वज फडकत होता त्या त्यांच्या शौर्यवंत नायकाने स्वतः तो ध्वज अुभारीत धावत जाअून त्या तोफखान्यातील खंदकात अुडी घेतली व अितरांना 'चलो आगे बढो!' म्हणून आव्हान देत तो खंदक ओलांडून अिंग्रजी तोफेवर आपल्या हातातील क्रांतिध्वज रोवू लागला! परंतु ह्या विलक्षण धाडसी पुरुषाला अिंग्रजांच्या गोळीने तत्क्षणी चीत केलें. अशा वेळेस त्या अेकाचे प्रेतावरून लगट करून हजारांनी पुढे रेटण्याचे अैवजी व ज्यासाठी तो धर्मवीर पडला त्या रिपुरक्तभाजन त्याच्या मरणाचें सार्थक करावयाचे अैवजी त्याला मरताना पाहताच बंडवाले पुढे रेटण्याचे अैवजी मागे रेटू लागले. तरी शाबास रे शिडीवाल्यांनो! ह्या बाजारबुणग्याप्रमाणे मागे न रेटता तुम्ही पुढेच धावत आलात. रोवा ह्या शिड्या त्या खंदकात! फिरंगी गोळ्यांचा वर्षाव चाललेला असताही चढा पटापट त्या शिड्यांवर—पहिले शिडीदार पडले—चला दुसरे पुढे घुसा—पण दुसरे कोण पुढे घुसणार? हाच तर अिंग्रजी सेनेत व बंडवाल्यात भेद! अिंग्रजी मृतांचें रक्त त्यांचे अनुयायी कधीही वाया जाअू देत नाहीत. अेक पडला की दहा पुढे, ही त्यांची रीत—अेक पडला की दहा मागे ही आमची रीत! मागे येणारे कशातही पटीत पण पुढे जाअून मरणाऱ्यांनो—तुम्ही मात्र खात्रीने स्वर्गात चढाल! स्वराज्याचा झेंडा भ्याड लोकांच्या जिवंत मृत्यूने विटाळू नये म्हणून त्याला हातात घेअून ज्यांनी शत्रूच्या आग ओकणाऱ्या तोफांवर त्याला रोवण्यास आरंभ केला त्या दिव्य भीमकर्म्यांनो, तुमच्या रक्ताने तो झेंडा सदोदित शुद्ध, सतेज व पवित्र तेजासह लकाकत राहो! असल्या रक्तवंबाळ भुजलतांतच स्वतंत्रतेचा झेंडा खराखुरा खुलू लागतो! ज्यांच्यापाशी रक्तबंबाळ होणारीं मनगटें नसतील त्यांचे हात अशा स्वतंत्रतेच्या ध्वजाला स्पर्श करून विजयाचे अैवजी त्या ध्वजाला विटाळ मात्र करतात!

हा पहिला हल्ला परतल्यानंतर अिंग्रजी सेनेशी बंडवाल्यांनी दररोज लहान लहान चकमकी करीत असावे. त्यांनी रेसिडेन्सीतल्या घरांना सुरुंग लावून अुड-विण्याची मात्र निकराने शर्थ चालविली होती. वरून तोफांचा विलक्षण मारा व खालून सुरुंगाच्या ज्वाला, स्फोट. आपल्या पायाखालील जमीन केव्हा आ वासून

आपणांस गिळून टाकील याची अिंग्रजी मनुष्यास काही अेक रात्री नसे. अिंजिनियर अिन्नेस याच्या स्वतःच्या कोष्टकाप्रमाणे बंडवाल्यांनी अेकंदर ३७ वेळा सुरुंग लावलेले होते. बंडवाल्यांच्या तोफांचा माराही अखंड रीतीने चालला होता. आजूबाजूच्या अडगळीचे आधाराने शिपायांच्या बंदुकांतून सुटणाऱ्या अचूक गोळ्या, त्यांना अिंग्रजांची मिळणारी प्रत्युत्तरें, अेकमेकाच्या तळातील गुप्त बातमी आणण्यासाठी रात्रीचे काळोखात निघालेल्या दोघांच्या प्राणनाशक झुम्बा, तटबंदीचे आत व बाहेर कुजबुजत असलेल्या लोकांची भाषणें, दुसऱ्या बाजूला दडलेल्या परपक्षाने अेकली आहेत हें कळताच त्यांचा होणारा पाणउतारा, अिंग्रजांच्या निशाणावर अचूक गोळा फेकून त्याचा चुरा करण्यात बंडवाल्यांनी चालवलेली करमणूक, व त्या निशाणाला वारंवार चिरडून टाकलें जात असताही रात्र पडताच पुन्हा नवें निशाण रेसिडेन्सीवर अचूक फडकवीत ठेवण्याची अिंग्रजांनी मांडलेली हाय, ह्या युद्धातील भीषण विनोदांनी आपला अक्राळविक्राळ जबडा विचकून लखनौची समरभूमि केव्हा केव्हा खदखद हसतही असे!

परंतु अिंग्लिशाकडे असणाऱ्या नेटिव्ह शिपायांनी अत्यंत प्रकर्षाने जें शौर्य दाखविलें त्याला पाहून रणांगणातील भूतपिशाच्चें जितकीं हसलीं तितका बीभत्स हास्यरस कोणीही पिकविला नसेल. दररोज रात्री बंडवाल्यांचे दूत शीख लोकांच्या किंवा अितर नेटिव्ह लोकांच्या हाताखाली असणाऱ्या तटबंदीच्या भागाकडे लपत जात व त्याना प्रश्न करीत कीं, तुम्ही स्वदेशाशी निमकहरामपणा करून फिरंग्यांच्या तरवारीला आपल्या आअीच्या पोटात का खुपसता? बंडवाल्यांच्या या प्रश्नांची अेखादे रात्री जर फारच निकड लागू लागली तर मधून थोडीशी मजा करण्यासाठी तटबंदीतील राजनिष्ठ नेटिव्ह म्हणत, 'किंचित् जवळ या, म्हणजे आम्हांस बोलता येअील!' व ते जवळ येअू लागले की अेखाद्या लपविलेल्या गोऱ्या साहेबाला समोर अुभा करीत! त्या फितुरीला पाहताच बंडवाले हिरमुसले होअून निघून जात. बंडवाल्यांचे जे अचूक व अविश्रांत बंदुकबाज होते त्या सर्वांत अयोध्येच्या, माजी नबाबाचे पदरचा अेक आफ्रिकन खोजा अिंग्रजांच्या रेसिडेन्सीत अत्यंत भयभीतता अुत्पन्न करीत असे. त्याला अिंग्लिश लोक 'अथेल्लो' म्हणून म्हणत असत. चार्लस बॉल लिहितो, "जोहान्सच्या घरावर बसून ह्या आफ्रिकन खोजाने अिंग्लिशांवर अहोरात्र मारा सुरू ठेवला होता. त्याच्या अचूक नेमाने व त्याच्या प्राणहारक गोळ्यांनी युरोपियन लोकाना पटापट ठार करावें. बंडवाल्याकडल्या कोणत्याही व्यक्तीपेक्षा या खोजाने जास्त युरोपियनाचे प्राण घेतलेले आहेत!"

सर हेन्री लॉरेन्स ठार झाल्यानतर अयोध्येच्या चीफ कमिशनरच्या कामाचा ज्याने चार्ज घेतला होता त्या मेजर बँक्सला याच सुमारास बंडवाल्यांच्या गोळीने ठार करून टाकले. हा अिंग्लिशाचा दुसरा चीफ कमिशनर लखनौच्या वेढ्यात ठार झाला! परंतु त्याच्या सैन्याची वेढ्यासारख्या अनिश्चित भयंकरतेतही असलेल्या

पायाशुद्ध, नियमबद्ध व शिस्तवार रचनेमुळे अेखादा सोजीर मरणें किंवा पुढारी मरणें व्यवस्थेच्या दृष्टीने जवळ जवळ सारखेंच असे. हा दुसरा कमिशनर पडताच सर्व अधिकारांचा चार्ज ब्रिगेडियर अिंग्लिस ह्याने घेतला व वेढ्याचें काम जसेंच्या तसेंच चालू झालें. आतापर्यंत झालेल्या नुकसानीने, मृत्युसंख्येने, कर्त्या लोकांच्या देहान्ताने, अन्नाच्या तुटीमुळे व शत्रूच्या पेचामुळे अिंग्रज लोक निराश जरी नसले तरी हताश होत आलेले होते.

अितक्यात कानपूरहून अंगद परत आला. हा अंगद नांवाचा नेटिव्ह गडी पूर्वी अिंग्रजी लष्करात नौकरीस असून हल्ली पेन्शनदार झालेला होता. लखनौला वेढा पडल्यापासून बाहेरची काहीही खबर आणणें हें कोणत्याही गोऱ्या दूताला अशक्य झालेलें होतें. त्याची गोरी कातडी, त्याचे भुरके केस, किंवा त्याचे घारे डोळे हे त्याला शिपायांच्या तरवारींतून कधींही जिवंत परत जाऊं देतेना. म्हणून ह्या आंग्लदौत्या-वर कोण्यातरी काळ्याचीच योजना करणें भाग असल्याने पुष्कळ राजनिष्ठ काळे अिंग्रजांनी आजपर्यंत लखनौंहून बाहेर प्रदेशी धाडलेले होते. परंतु त्या सर्वांत हा अेकटा अंगद काय तो जिवंत परत फिरला. बंडवाल्यांच्या धास्तीने त्याने बरोबर पत्रबित्र जरी काही आणलेलें नव्हते तरी अिंग्रजी फौज कानपुराहून लखनौच्या मदतीला निघालेली आहे ही प्रत्यक्ष पाहिलेली हकीगत त्याने कमान्डर अिंग्लिस याला कळविली. या वार्तेने थुल्हासित झालेले अिंग्रज लोक त्या अंगदाला म्हणाले, 'तू पुन्हा परत जा व हॅवलॉकचा लेखी जबाब घेअून ये.' ता.२२ ला लखनौ सोडून तो अंगद ता.२५ ला रात्री ११ चे सुमाराम पुन्हा परत आला. त्याच्याबरोबर हॅवलॉकचें पत्र होतें की "वाटेल त्या अडचणींचा समाचार घेण्याअितक्या सबळ सेनेसह हॅवलॉक येत आहे पांच सहा दिवसात लखनौ मुक्त होअील" आपल्या मुक्ततेस्तव येणाऱ्या या शूर हॅवलॉकला लखनौची अित्यंभूत माहिती मिळावी म्हणून लष्करी नकाशे हाती देअून अिंग्रज अंगदाला म्हणाला, तू पुन्हा हॅवलॉककडे जा. तो विलक्षण दूत पुन्हा हॅवलॉकचे तळाकडे जाअून त्याना लखनौचे सर्व लष्करी नकाशे देता झाला. आता हॅवलॉकच्या विजयी सैन्याचे ध्वज लखनौच्या मध्यावरुन केव्हा चालत येतील अिकडे अिंग्रजांचे डोळे लागले. दूर अंतरावरुन तोफांचे बार चाललेले आहेत असाही त्याना भास होअू लागला ह्या हॅवलॉकच्या तोफा तर नसतील ना!

अशा आशेने तोफांचे बार जों अिंग्रज लक्ष देअून अैकूं लागतात तों त्याच्या ध्यानात आले की आज आपल्या शत्रूचा हा दुसरा हल्ला चालून येत आहे! कानपुरी बॅटरी जोहान्स हाअूस, बेगम कोठी वगैरे ठिकाणावर बंडवाल्यानी मारा चालविला. त्या दिवशी बंडवाल्याचा सुरुंग तर फारच अुत्तम काम करुन अुडाला. सबंर रेजिमेंटची रेजिमेंट शिस्तबाज रीतीने आत शिरेल अेवढें भगदाड अिंग्रजांच्या तटबंदीत फुटून निघालें! परंतु त्या भगदाडात शिरणारी रेजिमेंट कोठें आहे? अिंग्रजांच्या सैन्याने

शत्रूने तटान जर असें भगदाड पाडलें असतें तर त्यांनी अेका अर्ध्या तासात त्या रेजिमेंटचा चुरा करून टाकला असता! दुपारी दोन वाजेपर्यंत बंडवाल्यांपैकी काही निर्धारी वीरांनी जोराची झुंज घेतली. अिंग्लिशांकडे असलेल्या नेटिव्हांनी मात्र शौर्याची, शिस्तीची व मरणतुच्छतेची कमाल करावी! हा कोण दैवदुर्विलास! देश-द्रोहांत हें शौर्य व देशभक्तांच्या पक्षाला हें भीरुत्व असावें हा कोण दैवदुर्विलास! धावा, कोणी तरी या दैवदुर्विलासाचा शिरच्छेद करण्यास धावा! दुपारचे पाच वाजले आहेत व हल्ला बहुतेक परतला आहे. तथापि तत्कालीन विजयासाठी नसलें तरी सर्वकालीन यशासाठी कोणी तरी धावा! कॅप्टन संडर्स, संभाळ आता या तरव-निष्ठेच्या धावेपुढे! आणि ही खवळलेल्या वृतांताची टोळी नीट चालून आली. अिंग्लिशांच्या गोळ्यांना न जुमानता ती तशीच पुढें घालली—ती त्यांच्या तटाला भिडून प्रत्यक्ष छातीने धडक मारू लागली—अिंग्रजांनी बंदुका टाकून या हातघाअीच्या वेळी बेयोनेटा घेतल्या—जय स्वतंत्रते!—वारे वीर!—त्याने स्वत:च्या हाताने तटबंदीचेवरून मारा करणाऱ्या त्या बाकु बेयोनेटेला दाबून हिसकावून घेतली! वारे वीर—शत्रूच्या गोळीने पडला शेवटी! स्वदेशाची काही तरी लाज राखण्या-साठी, समरामध्ये परपक्षांनी देखील तोंडात बोट घालावें असें हें शौर्य गाजवून महाद-तीच्या रक्ततीर्थात रक्तसमाधि घेता झाला! तो पडला, दुसरा पडला, तिसरा पडला ठीक झुंज झाली! आपल्या तटबंदीवरील बेयोनेटशी स्वत:च्या हाताने हिसका-हिसक करणाऱ्या व मरेतोंपर्यंत बेहोश लढणाऱ्या या वीरांचीं रम्यचित्रें अिंग्रजी अितिहासकारांनी कौतुकाने द्यावी, अशी झुंज झाली![८]

ता. १८ ऑगस्ट रोजी बंडवाल्यांनी अिंग्रजांवर आणखी अेक हल्ला चढविला. या दिवशीही नेहमीप्रमाणेच प्रथमत: सुरुंगाने भगदाड पाडण्यात येअून त्या आवाजा-बरोबर बंडवाले तुटून पडले. मॅलेसन लिहितो, "शत्रूंनी हें भगदाड पाहताच अत्यंत आवेशाने त्याचा फायदा घेण्यास आरंभ केला. त्यांच्यापैकी अेका अत्यंत शौर्यशाली अंमलदाराने त्या भगदाडाचे भागात त्वरेने अुडी घेतली व आपली समशेर फिरवीत आपल्या अनुयायांना 'चलो! चलो!' म्हणून आव्हान देअू लागला. त्याच्या आव्हानाला अुत्तर देण्याचे आधीच अेका गोळीने त्याला खाली पाडलें. परंतु तत्क्षणी त्याचे जागेवर दुसऱ्याने अुडी मारली—त्यालाही गोळीने खाली पाडलें. त्या तुकडीचा पुढारीही गोळीने पडला. हें पहाताच बाकीचे शिपाअी दबकून मागे सरले." वरील तीन वीरांचे परकीयांनीच वर्णिलेले शौर्य निकल्सनच्या दिल्लीकडील धाडसाच्या तोडीस तोड होतें. परंतु अनुयायांच्या भ्याडपणाने असलें शौर्य विफल व्हावें व तीन जिमम पडताच जास्त खवळून पुढे मुसंडी मारण्याचे अैवजी हजारो लोकांनी मागे परतावें ह्या लज्जास्पद गोष्टीत फार तात्पर्य भरलेले आहे!!

---

८. Charles Ball, Vol. II.

वारंवार जरी ते परत फिरविले गेले तरी वारंवार होणारे हल्ले व त्यांशिवाय दररोज चाललेल्या वंडवाल्यांच्या तोफांचा व वंदुकांचा अखंड मारा ह्यांच्या जाचापुढे आता शिंग्लिशांना, त्यांच्या राजनिष्ठ नेटिव्हांची अत्यंत मदत असताही. टिकाव धरणें असह्य होत चाललें होतें. अितक्यात अंगद पुन्हा लखनौला परत आला! मागे दिलेल्या वचनाप्रमाणे हॅवलॉक किती जवळ आला आहे असें अत्यंत अुत्सुकतेने अिंग्रजी कमान्डर त्याला जों विचारू लागतो तों अंगदाने हॅवलॉकचें पत्र दिलें. " आणखी निदान २५ दिवस तरी मला लखनौकडे येता येणार नाही ! " आशेनंतर आलेल्या निराशेसारखें या जगात काहीही विषमय नाही. आज अुद्या हॅवलॉक येणार म्हणून लागलेल्या अुत्सुकतेला हें दुर्दैवी अुत्तर ! मरणारे रोगी, रोडावलेल्या स्त्रियाच नव्हेत तर लढणारे सोजीर व अधिकारावरील कमान्डर यांनाही अत्यंत खेद, अुदासीनता व भयभीतता अुत्पन्न झाली. वेढ्यातील सर्व आंग्ल सेनेवर मृत्यूची कळा चढूं लागली. अन्नाची महर्गता झाली व सर्वांना अर्धपोटी राहण्याचा हुकूम सुटला ! लखनौच्या मुक्ततेच्या महत्कार्यी हॅवलॉकसारख्या योद्ध्यालाही हा विलंब कां वरें करावा लागत आहे !

लखनौला कोंडून टाकलेल्या आपल्या देशवांधवांची मुक्तता करण्यास क्षणाचाही विलंब लावू नये म्हणून ता. २९ जुलैलाच हॅवलॉक कानपूर सोडून गंगापार झालेला होता. त्याच्याबरोबर १५०० लोक व १३ तोफा असून ह्या सैन्यासह मी पांचसहा दिवसात तुमची मुक्तता करीन असें त्याने लखनौला आश्वासक पत्रही धाडलेलें होते. परंतु गंगानदी अुतरून अयोध्येत पहिला पाय ठेवताच हॅवलॉकची ती काल्पनिक सुलभता धुक्याप्रमाणे वितळून जाअू लागली ! अयोध्येच्या मार्गातील प्रत्येक अिंच बंड करून अुठलेला ! प्रत्येक जमिनदार हाताखाली पांचसहाशे लोक जमवून स्वदेशाचें स्वातंत्र्य झुजवीत असलेला ! प्रत्येक खेडेगाव बंडवाल्यांच्या ध्वजाची गढी झालेले ! अशा भयंकर स्थितीला पाहणारा हॅवलॉक मनात अुद्विग्न झाला. अुद्विग्न झाला परंतु तो निराश मात्र झाला नाही. त्याने तरीच पुढे कूच केले. अुनाव गावापाशी वंडवाल्यांनी त्याला पहिली धडक दिली व धडक देताच ते पुढे पळाले. ही अुनावची लढाअी लढून थकलेल्या त्याच्या सैनिकास हॅवलॉकने फक्त जेवणापुरता विसावा दिला. जेवण अुरकताच पुन्हा पुढे कूच ! पुन्हा बशिरतगंजला बंडवाल्यांनी दुसरी धडक मारली व धडक देताच ते पुन्हा पुढे पळाले ! हॅवलॉकच्या तरवारीने अेका ता. २९ रोजी अशा दोन लढाया लढल्या व असे दोन विजय मिळविले !

परंतु हे विजयच आहेत काय ? या अेका दिवसात त्याच्या मूठभर सैन्यातील अेक पष्ठांश लोक मारण्यात आलेले आहेत ! व बंडवाल्यांचा ह्या जयाने अेका काडीअितकाही मोड झालेला नाही! फार काय, पण लढाअी जुंपताच हाणमार करून ते जे पळून जात ते त्यांचा खराच पराजय झाल्यामुळे कीं अिंग्रजी सेनेला थोड्या

वर्गात पिसाळून सोडण्याची ही सुलभ युक्तीच असल्यामुळे, हें देशांत संग्रामात्मकच आहे ! आणि त्यांतूनही दानापूरचे शिपाई बंड करून अुठल्याची बातमी आलेली. ही भयंकर परिस्थिति पाहूनच दमलेला हॅवलॉक ता. ३० रोजी पुढे जाण्याचे अैवजी मागे परत आला !

हॅवलॉकचें सैन्य कानपूरहून निघालें आहे असें अैकताच नानासाहेब पेशव्यांनी फिरून कानपूरभोंवती गर्दी अुडविली होती. हॅवलॉक कानपूरला गंगा अुतरून अयोध्येत घुसताच नाना अयोध्येला गंगा अुतरून कानपूरकडे घुसत होते ! ह्या नानांच्या लष्करी पेंचात आपण अडकतो कीं काय अशा चितेंने हॅवलॉक मंगलवडला ता. ४ ऑगस्टपर्यंत खिळून पडला गेला. पाच सहा दिवसांत लखनौला जाअून गोमतीचे पाणी बंडवाल्यास पाजण्याचे अैवजी त्याला अजून गंगेचे तीरावरच नाना पाणी पाजीत होते ! अितक्यांत त्याच्या आघाडीवरचे बंडवालेही पुन्हा बशीरगंजला धावून आले. तेव्हा त्यांच्या या अुद्दामपणाने संतापलेला हॅवलॉक जिवावर अुदार होअून व आलेली नवीन कुमक घेअून लखनौकडे निघाला व त्याने बशिरगंजला बंडवाल्यांशी कुस्ती खेळून त्यांना तेथून पिटाळून लावलें. परंतु त्यात पुन्हा हा अपजय की जय हा प्रश्न अुपस्थित झालाच. कारण या कुस्तीने हॅवलॉकचे ३०० लोक कामास आले—अशीं हाडें खिळखिळी झालीं की, लखनौकडे पुढे रेटण्याचे अैवजी आंग्ल सेना मागे गंगेकडे हटत चालली ! त्या दिवशी संध्याकाळी त्याने बरोबर निघालेल्या १५०० लोकांपैकी फक्त ८५० लोक कायते शिल्लक राहिले !

हॅवलॉक ता. ५ ऑगस्टला मागे हटून मंगलवडला पुनरपि परतला हें अैकताच बडवाले पुन्हा बशिरगंजला ताब्यात घेअून बसले. बंडवाल्याच्या या सेनेत बहुतेक सभ्य जमिनदार लोकांचाच भरणा असे. "कालच्या लढाईत पडलेले बहुतेक जमिनदारच होते." [१] आपल्या स्वातंत्र्यासाठी व आपल्या स्वराज्यासाठी मअूमअू बिछान्याना सोडून देअून कंटककातारातील रणशिर्तीचा आश्रय या जमिनदारांनी केलेला होता. त्याच्या या अवसानाला पाहून अिंग्रजी अितिहासकार अिन्नेस म्हणतो, " निदान अयोध्येतील लोकांच्या प्रयत्नास तरी ' स्वातंत्र्ययुद्धाचेच ' स्वरूप आलेलें होते ! " हॅवलॉकच्या भोंवती बडवाल्यांचें सैन्याचे क्षितिजासारखे डावपेच चाललेले होते. आपण जों जों पुढे जावें तों तों क्षितिज मागे मागे हटत जाते; परतु ते मागे हटले असे समजून आपण जों आपल्या मूळ ठिकाणी परत यावे तों क्षितिजही त्याच्या मूळ ठिकाणी चालून आलेलें असतें ! हॅवलॉकची मंगलवडातून पिछेहाट झाली की बडवाल्यांची बशिरगजला पुन्हा चाल झालीच' म्हणून ता. ११ ऑगस्टला हॅवलॉक तिसऱ्यांदा बशिरगंजवर चढाअी करीत निघाला—तिसऱ्यांदा बशिरगंज पडले—तिसऱ्यांदा बडवाले पळून गेले—पण पुन्हा हॅवलॉक मनास विचारू लागला, हा विजय की पराजय ?'

१. Kaye and Malleson's Indian Mutiny, Vol. III, page 340.

तो केवळ विजयही नव्हता किंवा केवळ पराजयही नव्हता — तर तो पराजयाचा विजय किंवा विजयाचा पराजय होता! आणि म्हणून हॅवलॉक पुढे जाण्याचे अैवजी पुन्हा मगलवारास परतला. मध्यंतरी नानांचा पडणारा पेच पूर्ण रंगात येत चाललेला होता. सागरचे बंडवाले, ग्वालेरचे बंडवाले व अितर स्वयंसेवक लोकांच्या टोळ्या अशा सैन्यांसह नाना बिठूरवर चालून जाअून कानपूरच्या आसपास लढाअीचा धाक देअू लागले. त्यांच्यावर चालून जाण्याची शक्ति कानपूरला असलेल्या जनरल नीलचे अंगात नसल्याने त्याने हॅवलॉकला ही निकडीची वार्ता कळविली. आता लखनौकडे जाण्याचें नांव घेणेंही अशक्य होतें. म्हणून ता. १२ ऑगस्ट रोजी हॅवलॉक गंगा अुतरून परत कानपूरला आला! ब्रिटिश सैन्याच्या या भयंकर पिछेहाटीचा बिगुल जेव्हा अयोध्येला अैकू येअू लागला तेव्हा जिकडे तिकडे स्वदेशमुक्ततेचा हा जयदुंदुभीच कडाडत आहे कीं काय असा हर्षध्वनींचा जयनाद होअू लागला! अयोध्येच्या दारात घुसू पाहणाऱ्या परवशतेला अशी गंगेच्या पार हुसकीत नेअून धारातीर्थात स्वतसमाधि घेतलेल्या विश्वासू जमिनदारांनो, तुम्ही स्वदेशाच्या जमिनीची भली जमिनदारी केलीत! अिन्नेस लिहितो: "ह्या पिछेहाटीचा अतर्क्य परिणाम घडून आला. अयोध्येतील फिरंगी अमल संपल्याची ही अिंग्लिशांनी दिलेली कबुलीच आहे असें स्पष्ट बोलू लागून तेथील तालुकदारांनी लखनौच्या दरबारचा प्रस्थापित राज्यसत्तेचा हक्क मान्य केला. त्यांचे हुकूम ते पाळू लागले. आजपर्यंतची बेबंदशाही संपू लागली व लखनौच्या मागणीप्रमाणे निरनिराळ्या मांडलिक राजांचीं सैन्यें तिकडे युद्धभूमीकडे लोटू लागलीं!" १०

परंतु बंडवाल्यांना मिळालेला हा विजय हा प्रत्यक्ष विजय नसून अप्रत्यक्ष विजय होता. हॅवलॉकच्या सैन्याने केलेल्या चारपाच लढायांत त्याचा प्रत्यक्ष पराजय होअून जर तो कानपूरला परतला असता तर त्याला कोंडमारीने हुसकून दिल्यानंतर बंडवाल्यांना जो अुत्साह आला त्याहून जास्त दृढतर आत्मविश्वास त्यांच्या सैन्यात व धैर्यच्युतीचा अंमल अिंग्रजी सैन्यात अुत्पन्न झाला असता. कानपूरला जरी पिछेहाट घेणें भाग पडले तरी त्या अपमानाचे कारण शौर्याभाव हे नसून सैन्याभाव हे आहे असें समजल्यामुळे अिंग्रजी सेनेची आशा जरी विफल झाली तथापि आत्मनिष्ठा, जोम व करारीपणा हीं काही ह्या अप्रत्यक्ष पराजयाने कमी झालेली नव्हती. व म्हणून गोऱ्या सैन्याची नवी कुमक येताच लखनौ सोडविण्यास मी पुन्हा लवकरच निघेन अशा हिंमतीने हॅवलॉक कानपूरला ताळ देअून अुतरला. या प्रसंगी नीलमध्ये व हॅवलॉकमध्ये व्यक्तिविषयक मत्सराने किती वितुष्ट माजलेले होतें हें हॅवलॉकने नीलला लिहिलेल्या पुढील पत्रावरून स्पष्ट रीतीने दिसून येते: "असल्या प्रकारची वर्तणूक ह्यापुढे मुळीच खपावयाची नाही. आपण मला निंदेचे, धाकाचे व अुपदेशाचे पत्र

१०. Sepoys' Revolt by Innes, page 174.

पाठविता ! पण त्यांपैकी अेकही गोष्ट माझ्या हाताखालच्या अेका ऑफिसराने मला सांगावी हें सहन करणारा मनुष्य मी नाही ! हें तुम्ही जाणून ठेवावें ! जर सार्वजनिक हिताला कांहीही बाध येणारा नसता तर मी तुम्हास आताच्या आता कैद करावयास कधीही सोडलें नसतें. सध्या तुम्हांला सुमतें बजावून ठेवतो. पुन्हा असला लब्धप्रतिष्ठितपणा बिल्कूल चालणार नाही. अि." ह्या पत्रामध्ये अेक वाक्य आत्मजनांच्या हाडीमासी मुरलेल्या राष्ट्रकर्तव्याचें अत्युत्तम द्योतक आहे. संतापाच्या भरातही हॅवलॉक म्हणतो : " सार्वजनिक हिताला कांहीही बाध येणारा नसता " तर मी माझ्या अपमानाचा सूड आता अुगवला असता ! नील शिवा हॅवलॉक ह्या रणपटु योद्ध्यांमध्ये अेन निकराच्या प्रसंगी अुत्पन्न झालेल्या या भिरडीनें त्या दोघांनीही शत्रूच्या ध्यानात येअील किंवा त्याला फायदा मिळेल अशी अेकही कुचराअीची गोष्ट केली नाही अितकेच नव्हे तर लष्करी नात्याप्रमाणे पूर्ण हुकूमबंदीनें राहून परस्परांस साह्यही दिलेले होतें. व्यक्तिगजाच्या मदमलिन गंडस्थलावर राष्ट्रत्वाचा हा तीक्ष्ण अंकुश जेथे असा रोवलेला असतो त्याच समाजात श्री, धी, धृति, कीर्ति स्वतंत्रता याचे वास्तव्य असणार !

कानपूरला येताच हॅवलॉकला पहिली बातमी जी कळली ती ही होय की नानासाहेबांचे सैन्याने पुन्हा ब्रह्मावर्त शहर पुन्हा ताब्यात घेतलेले आहे. कानपूरला असलेल्या अिंग्रजी फौजेच्या अगदी नाकाशी त्यांचा भिडवून बंडवाल्यांनी दिलेला भयंकर शह पाहताच हॅवलॉक ससैन्य तिकडे चालून गेला. ह्या दिवशी ब्रह्मावर्तास झालेल्या लढाअीत बंडवाल्यांकडील ४२-व्या रेजिमेंटने अिंग्रजी फौज लढत लढत २० यार्डांच्या अंतरावर येताच बेयोनेटा रोखून हातघाअीला आरंभ केला. आजपर्यंत अिंग्रज लोक बंडवाल्यांना भेदरविण्याचें बेयोनेटा हें अंतिम साधन समजत असत. परंतु आज त्या शूर स्वातंत्र्यवीरांनी आपण होअूनच फिरंग्यांवर बेयोनेटा रोखून रणधुमाळी माडली ! याच वेळेस बंडवाल्यांच्या घोडेस्वारांनी अिंग्रजांचे पिछाडीवर तुटून पडून त्याची रसद मारून नेली ! असा मागून व पुढून अिंग्रजी फौजेला बंडवाल्यातील शूर लोकांनी मारा केला. अिंग्रजी कमान्डरच्याही हें लक्षात आलें की दिवसेंदिवस बंडवाल्यांचे समरधाष्टर्य वाढतच चाललेले आहे. परंतु त्या धाष्टर्याला व शौर्याला अिंग्रजांसारख्या पायाशुद्ध संघटनेचें साह्य नसल्याने ब्रह्मावर्ताच्या लढाअीत या सर्व पराक्रमानंतरही बंडवाल्यांस पराजय घेअून हटणे भाग पडले. ऑगस्ट ता. १७ रोजी बंडवाल्यांचा हा पराजय करून हॅवलॉक जो मागे कानपूरला येतो तो त्याच्या लक्षात आले की, ब्रह्मावर्तास नानांची सर्व फौज ठेवलेली नसून यमुनातीरी काल्पी शहरामध्येही त्यांनी जय्यत सेना अुभारलेली आहे. काल्पीकडून ताण, ब्रह्मावर्ताकडून ताण, अयोध्येतून ताण, – गंगेच्या या थडीला ताण, त्या थडीला ताण !! असा चोहो बाजूंनी ताणलेला तो ' विजयी ' हॅवलॉक कलकत्त्याला लिहू लागला की : भयंकर पेच पडला आहे. नवीन कुमक न येअील तर कानपूर

अप्रतिम शौर्य गाजविलेलें आहे त्या पुरुषाकडेच तें मुक्त करण्याचें श्रेय मिळणें योग्य, न्याय्य आहे. अेतदर्थ माझे सेनापतित्वाचे सर्व अधिकार जनरल हॅवलॉकला अर्पण करून लखनौ मुक्त होअीपर्यंत मी स्वयंसेवक शिपायाचें काम करणार आहे!!" कमाण्डरचा हा पहिला ' हुकूम ' पाहताच त्या आंग्लसेनेला केवढें नैतिक शिक्षण मिळालें असेल ! क्वचित राष्ट्रांत वसा विलीन झाल्या असतील ! पहिल्या हुकुमासरशी आअुटरामने आपलें मुख्य सेनापतित्व हॅवलॉकला देअून टाकण्यांत आअुटरामने जें अद्वितीय अुदारत्व, स्वार्थपराङ्मुखत्व व राष्ट्रहिततत्परत्व दाखविलें तें पाहताच " वदल्या जगत्त्रयीं तंिअ ' वीरवरा, साधु, साधु ! ' साधुतती ! "

ह्या वीर साधुत्वाच्या नैतिक शिक्षणानें प्रस्फुरित झालेले व नवीन ताज्या दमाची आंग्ल सेना कलकत्त्याहून आयर, आअुटराम, कूपर असल्या असल्या योद्धयांसह मदतीस आल्यामुळे द्विगुणित अुत्साह पावलेली ती कानपूरची आंग्ल सेना सप्टेंबरच्या २०-व्या तारखेस लखनौच्या मुक्ततेसाठी पुन्हा गंगानदी अुतरू लागली. "पांच सहा दिवसांत लखनौ मुक्त करण्यासाठी," – ता. २५ जुलैचा अुतावळा हॅवलॉक, पांच दिवसांत लखनौकडे पुढे जाणें तर सोडाच परंतु अयोध्येत अढळ पाय ठेवणेंही मुष्कील झाल्याने कानपूरला पिछेहाट करणारा ता. १२ ऑगस्टचा दुर्दैवी हॅवलॉक, व आता सप्टेंबरच्या ता. २० ला हा दृढनिश्चयी वीरश्रीने मुसमुसलेला हॅवलॉक!! हॅवलॉकच्या या तीन फोटोंत केवढा भेद होता! त्याच्यापाशीं आता अडीच हजारांवर निधड्या छातीचें गोरें सैन्य असून शीखलोकांमुद्धा अेकंदर सेना सव्वातीन हजारांपर्यंत सजलेली होती निवडक घोडेस्वार, अत्युत्कृष्ट तोफखाना व नील, आयर, आअुटराममारखे लष्करी अमलदार हे आता त्याच्याबरोबर होते. आता तो अयोध्येतील वंडवाल्यांच्या अडथळ्याला कसचा दाद देतो! स्वदेशाला फिरंगी स्पर्शापासून अदूषित ठेवण्यासाठी जो जो जमिनदार रणात आला तो तो ठार झाला. आपण जिवंत असता आपल्या भूमातेवर परकी घोडे दौडत चाललेले पाहून ज्या ज्या मानधनी खेडेगावांनी समर निकर केला त्यांची त्यांची राख झाली. जो जो रस्ता, जें जें शेत, जी जी नदी आपल्या स्वातंत्र्यासाठी रणात झुजू लागली तिच्या तिच्यावर अयोध्येच्या वीरपुत्राचा रक्तपर्जन्य धो धो करीत कोसळू लागला! अशी ही बलवती अिंग्रजी सेना त्या अयोध्येंत जबरीने घुमू लागली! लढाअी मागून लढाअी घेत व वंडवाल्यांना पुढेपुढे पळवीत सप्टेंबरच्या २३ व्या तारखेला हॅवलॉक अलमबागेला येअून पोचला!! सर्व दिवसभर अलमबागेला वंडवाल्यांशी जंगी लढाअी लागलेली होती. त्याच्या पांच तोफा अिंग्रजांनी जिंकून घेतल्या. वंडवाल्यांनी त्यांपैकी पुन्हा अेक तोफ जिंकून परत नेली. अुभयपक्षांनी रणांगणावरच रात्र काढण्याचा निश्चय केला. परंतु अिंग्रजी सेना चिखलात, दलदलीत व मैदानात रात्रीचा विसावा घेअू लागताच वंडवाल्यांनी सर्व विसावा सोडून देअून पुन्हा

मारामारी चालू केली. त्या रात्री पर्जन्यही आकाशातून खाली कोसळत होता व वीर-शिरांची मादी जमिनीवरून वर अुसळत होती! अशा स्थितीतही त्या अिंग्रजी सेनेत अुत्साहाच्या लहरी ह्या पर्जन्याच्या लहरीहून जास्तच जोराने गर्जू लागल्या. कारण त्याच रात्री दिल्ली शहर पडल्याची विद्युद्वार्ता लखनौला येअून धडकली!

सरतेशेवटी तो ता. २५ चा निर्णयाचा दिवस अुगवला. लखनौ शहरातील मध्यवस्तीचे रस्ते सोडून देअून अेका आडवळणी मार्गाने हॅवलॉकची आंग्लसेना रेसिडेन्सीकडे निघालेली आहे हे कळताच बंडवाल्यांकडून तोफांचा जबर मारा चालू झाला. आलमबागेपासून ह्या शत्रूच्या माऱ्याला सहन करीत अिंग्रज लोक नेटाने चाल करून चारबागच्या पुलापर्यंत येअून भिडले. ह्या पुलाला ओलांडताच लखनौ-मध्ये प्रवेश होणार असल्यामुळे त्या महत्त्वाच्या नाक्यावर अुभय पक्षाची हटातटाची झुंज जुंपू लागली. मॉडने आपल्या तोफखान्याचा मारा त्या पुलावरील बंडवाल्यां-वर सुरू करून सुमारे अर्धा तास होत आला तरी तो मूळ रिकामा होत नाही किंवा शत्रूकडील तोफाही बंद पडत नाहीत. अितकेच नव्हे तर अिंग्रजांचे अेकवीस लोक यमलो हाअुसवर व आणखी कित्येक या पुलासमोर आधीच ठार झाले आहेत! सर्व आंग्लसेना या अेका हट्टी पुलाच्या धडकीने निश्चल अुभी रहावी काय? तेव्हा जवळच अुभा असलेल्या हॅवलॉकच्या तरुण पुत्राला मॉड म्हणाला: "तरुण वीरा, माला काहीतरी तोड काढ!" हे अैकताच तो तरुण हॅवलॉक नीलकडे आला व म्हणाला की तोफांच्या माऱ्याला बंडवाले दाद देत नाहीत तर आता त्या पुलावर हल्ला चढविण्याचाच हुकूम सुटावा. परंतु आअुटरामच्या विचाराशिवाय असा हुकूम आपल्याला देता येत नाही असे जनरल नील म्हणू लागला. तेव्हा आता काय तोड काढावी? तरुण हॅवलॉकला त्या प्रश्नाचे अुत्तर तत्काल सुचले. त्याने आपल्या घोड्याला टाच मारली. मुख्य कमान्डर जनरल हॅवलॉक अुभा होता त्या दिशेकडे त्याने थोडीशी दौड केली व जणू काय आपण मुख्य कमान्डरची भेट घेतलीच आहे असा बहाणा करून तो नीलकडे परत आला. नीलला लवून मुजरा करून तो तरुण हॅवलॉक म्हणतो: "महाराज, पुलावर हल्लाच चढविण्याचे ठरले!" हे अैकताच जनरल नीलने हल्ल्याचा हुकूम सोडला! पंचवीस अिंग्लिशांची पहिली तुकडी घेअून स्वतः तरुण हॅवलॉक पुलाकडे अुसळून निघाला. भयंकर निकराचा समय! त्या पंचवीस जणांतून अेका दोन मिनिटांचे अवकाशात कोण जिवंत अुरला? आणि खुद्द हे तरुण हॅवलॉक सभाळ—सभाळ—अेक शूर निधड्या छातीचा स्वातंत्र्यवीर त्या पुलावर अुडी घेत आहे व त्याच्या हातातील ती बंदूक नीट तुझ्यावरच रोखली जात आहे! हा शूर शिपाअी तरुण हॅवलॉकपासून दहा यार्डांवर येअून अुभा राहिला व अिंग्रजी योद्धयाच्या छातीसमोर अटळपणाने त्याने हॅवलॉकवर नेम धरला—गोळी सुटली—केवळ अर्ध्या अिंचाचा फरक! हॅवलॉकचे डोक्यात घुसण्याचे ऐवजी ती त्याच्या टोपीत गुणून घुसली! तरी तो धाडसी शिपाअी—अनेक आंग्ल बंदुक

त्याच्यावर रोखलेल्या असलाही मागे हटण्याचे अैवजी तेथेच अटळ राहून पुन्हा बंदूक भरू लागला ! वारे बहाद्दर ! अखेर हॅवलॉकच्या गोळीने वीरोचित अशा स्वातंत्र्य-समरात मारिता मारिता मेला ! क्षणा दोन क्षणांत अिंग्रजी सेनेचा समुद्र धडकीवर धडकी देत त्या पुलाला डळमळू लागला. वंडवाले मागे पडत व अिंग्रज पुढे चढत निघाले. पूल पडला, लखनौचा पहिला रस्ता पडला; दुसरा पडला; तिसरा पडला; अिंग्रजी सेना चालली पुढे घुसत. दोनचार पावलें सपलीं की पुन्हा अेकदा तरवारी-वर तरवारी व बंदुकावर बंदुकी अुडाव्या, रक्ताचे मुबलक तळें तिथे साचलें की, पुन्हा ती जिवंत लढाओी पुढे चालू लागे. संध्याकाळ झाली तेव्हा तर तिच्या त्या भयकर चालीत असह्यच ठेचा बसत चालल्या. म्हणून आअुटराम म्हणतो आजची रात्र येथेच काढावी. पण छे, छे ! थांबण्याचें नावही काढणें त्या शूर हॅवलॉकला रुचणार कसे ? तिकडे रेसिडेन्सीमध्ये आज महिनोगणती मृत्यूच्या दाढेत चेपून टाकलेल्या त्याच्या स्वदेशबंधूना आणखी अेक रात्र म्हणजे अेक युगासारखी जाणारी आहे. म्हणून हॅवलॉक पुढे चालला. नील पुढे चालला. पूर्वीचा बदललेला मार्ग चुकून अिंग्रजी सेना वटवाल्याच्या जास्त जास्तच मान्यात येत चालली होती, तरी नील पुढे चालला. खास बाजारच्या जंगी कमानीत घुसताच त्याच्या ध्यानात आले की अिंग्रजी तोफा जरा मागे पडल्या आहेत अेतदर्थ घोड्याला खेचून तो आग्लवीर नील आपली मान वळवून मागे पाहू लागला. हीच संधि ! हीच संधि ! स्वदेशाच्या सूडाची हीच संधि ! कमानीवर चढलेल्या कृतांता, तुझा प्राण गेला तरी बेहत्तर पण ही संधि साधलीच पाहिजे ! पळ विपळाचा अवकाश तोच त्या कमानीवर टपून बसलेल्या अेका शिपायाने अचूक नेम धरला व त्या जनरल नीलच्या मानेमध्ये त्याची गोळी अेखाद्या चताबळलेल्या विषारी नागिणीसारखी फणफणत येअून डसली ! पडला अिंग्रजी सेनेचा कलिजा पटला ! असा शूर, असा धृतियुक्त व असा मर्द, असा निधड्या छातीचा व असा अुलट्या काळजाचा, मनुष्य पार्शाच्या दुर्दैवाने वा सुदैवाने दुसरा पुरुष सापडणे फार दुर्मिळ आहे !

परंतु अिंग्रजी सेनेचा व शौर्याचा हाच विशेष आहे की त्यांचे प्रयत्नसातत्य हें कोणत्याही अेका व्यक्तीवर– मग ती व्यक्ति अेखाद्या अद्वितीय नीलची का असेना— अवलंबून नसते. नील पटला तरी अेक काडीचाही घोटाळा न होता अिंग्रजी सेना रेसिडेन्सीकडे तशीच दौडत चालली. ज्या खास बाजारच्या कमानीत नीलची मान तुटून पडली त्या खास बाजारात गोऱ्या रक्ताचा सडा पडू लागला. तरी अिंग्रजी सेना तशीच लढत चालली. त्या बाजारातून वाट मिळताच त्याना रेसिडेन्सी-तील अत्यानंदित जयगर्जना अैकू आल्या ! त्यांनीही परत जयगर्जना केल्या ! मरणाच्या दाढेत हात घालून हॅवलॉकने त्याच्या स्वदेशबांधवास बाहेर काढले ! त्या वेळचा प्रसंग तिथे असलेल्या कॅप्टन विल्सनच्या लेखणीनेच वर्णन करतो." रस्त्यातून पावलो-पावलीं त्यांचीं माणसें मरत असताही गोरी फौज शहरातून आपणाकडे चालून आलेली

दिसताच मग रेसिडेन्सीतल्या लोकांचें सर्व भय व सर्व कुशंका लपल्या गेल्या व त्यांचें जागी जयगर्जनांचा व आनंदाच्या टाळ्यांचा समोरून लढत येणाऱ्या वीरांवर पाऊस पडू लागला. हॉस्पिटलमधून रोगी लोकही सरपटत बाहेर पडले व आपल्या मुक्ततेसाठी समोरून लढत येणाऱ्या स्वकीय शूर सेनेला विजयस्वागताने आमंत्रू लागले. लवकरच ती स्वकीय सेना आम्हांस येऊन भेटली ! तो प्रसंग अवर्णनीय आहे ! ज्यांनी आपले पति मेले आहेत असें अंकलेले होतें त्या अविधवा आकस्मिक पतिलाभाने सनाथ होऊं लागल्या व ज्यांनी आपल्या प्रियजनाच्या भेटीसाठी आज चार महिने प्राण धारण केलेले होते त्यांना पहिल्यानेच कळले की, ते प्रियजन पुन्हा भेटण्याची आशा नको ! "

लखनौच्या रेसिडेन्सीत आज ८७ दिवस अहोरात्र लढणाऱ्या ह्या ब्रिटिश फौजेतील ता. २५ सप्टेंबरपर्यंत सुमारे ७०० लोक मृत्युमुखी पडले. जखमी व धडधाकट असे सुमारे पाचशे युरोपियन व चारशे नेटिव्ह लोक जिवंत होते. ह्या लोकांच्या मुक्ततेसाठी निघालेल्या हॅवलॉकचे सैन्यातील रेसिडेन्सीत पोचेतोंपर्यंत ७२२ लोक कामास आले. इतक्या शूर लोकांचें रक्त दिले तेव्हा लखनौचा विजय संपादिता आला !

परंतु हे दुष्ट निराशे, तू मात्र अजिक्यची अजिक्य आहेस ! हॅवलॉकने शत्रूची पाठ कितीही जरी पुरवली असली तरी तू मात्र त्याची पाठ काही सोडीत नाहीस ! कारण इतके विजय, इतका रक्तपात, इतकी हाणामार करून लखनौच्या रेसिडेन्सीत शिरताना त्याला वाटलें होतें की, अखेर मी वडवाल्याच्या वेढ्यातून आंग्लसत्तेची मुक्तता तर केली. परंतु आता त्याचा भ्रम निघून चालला आहे व गंगेच्या काठी असताना त्याला जसे विचारणें भाग पडे तसेंच तो आपल्या मनाला लखनौच्या रेसिडेन्सीत पोचल्यावरही विचारीत आहे की, मी रेसिडेन्सीत जी आणली ती " ही मदत की मुक्तता ? "

हॅवलॉक आल्याने रेसिडेन्सीचा वेढा उठविण्याचे ऐवजी रेसिडेन्सीसह त्या हॅवलॉकलाच वडवाल्यांनी वेढा घातला ! व म्हणूनच जो तो विचारू लागला की " हॅवलॉकने आणलेली ही मदत की मुक्तता ? "[१२]

---

१२. " Before closing this chapter a few remarks on the result of the siege generally are required. First it must be observed that, with the weak and unfinished defences which we had to protect us, it would have been quite impossible for us to maintain the defence for a single week, if we had been surrounded by a courageous enemy. When they attacked, they lacked that determinous courage which faces dangers with resolution. Brave men among them there were, no doubt and these were sacrificed in their attacks. But the brave were not many; the mass were —poltrous ". —Gubbin's 'Mutineers in Oudh.' page 348.

ती फक्त मदत होती ! हॅवलॉक व आऊटराम या दोन विख्यात आंग्ल योद्धयांनी लढायांवर लढाया मारून लखनौच्या अिंग्लिश लोकास पांडयांच्या कचाटीतून सोडविण्यासाठी जें सैन्य आणलें होतें तें त्या लोकांची वेढ्यातून मुक्तता करण्याचे अैवजी आपणही वेढ्यात अडकून पडलें आहे. हॅवलॉकचें अिंग्रजी सैन्य रेसिडेन्सीत घुसताच पांड्यांचें सैन्य लखनौहून निघून जाअील अशी जी अिंग्रजांना आशा होती तिची पूर्ण निष्फलता झालेली आहे असें थोड्याच वेळाने सर्व हिंदुस्थानच्या प्रत्ययास आलें. लखनौला सोडून देण्याचे अैवजी किंवा अिंग्रजांशी तहाचें बोलणें लावण्याचे अैवजी रणांगणात हट्टाम पेटलेलें तें पांड्यांचें दल हॅवलॉक रेसिडेन्सीत घुसतो न घुसतो तों पुन्हा पहिल्यासारखें त्या रेसिडेन्सी भोवती घेर घरू लागलें. रेसिडेन्सीत जाताना आलमबागेमध्ये अिंग्रजाचे सैन्याचा जो काही भाग मागे ठेवलेला होता त्याला आपल्या सैन्याच्या मुख्य भागाला मिळण्याची संधि देखील न देता, काल संध्याकाळी झालेल्या भयंकर रक्तपाताने रस्त्यातून वहात असलेल्या लोटाचा पहिला पूर अुतरला नाही तोंच आपल्याला आलेल्या अपजयाने व शत्रूस आलेल्या विजयाने अुत्पन्न झालेल्या अुत्साहभग्नतेला निरामय मग्नतेत भिडकारून देअून त्या स्वातंत्र्योत्सुक लखनौ शहराने अिंग्रजी सत्तेला पुन्हा अेकदा कोंडून टाकलें.

स्वातंत्र्यरणातील पांड्यांच्या ह्या दृढनिश्चयी अढळ ठाणामुळे केवळ लखनौला असलेल्या ब्रिटिश सैन्यासच पेच पडला होता असें नसून कलकत्त्यापासून तों तहत अलिगडपर्यंत सर्व प्रदेशात अिंग्रजी सैन्याला जंगी ताण पडू लागला. हॅवलॉकचे हाताखाली अिंग्रजाचें होतें नव्हतें नितकें सैन्य लखनौवर तुटून जाण्यासाठी रवाना झालेले होतें व जेव्हा त्या सैन्याच्या मदतीने लखनौला कोंडलेलें ब्रिटिश सैन्य मोकळें होण्याचे अैवजी तेंच तेथे अडकून पडले तेव्हा खालच्या सर्व प्रदेशावर अिंग्रजी सत्ता लुळी पडू लागली. याच सुमाराम दिल्ली शहर पडले असल्याने तेथील काही अिंग्रजी सेना जरी रिकामी झालेली होती, तरी ती दिल्लीच्या आजूबाजूच्या प्रदेशात शांतता करण्याचे कामात गुतलेली होती. अशा स्थितीत लखनौच्या रेसिडेन्सीत व आलमबागेत पुन्हा अेकदा कोंडून टाकलेल्या ब्रिटिश सेनेला त्यांच्या दृढद्वेषी शत्रूसह सटापट येत सोडून देअून ब्रिटिश सत्तेला बसलेला हा ताण कमी करण्याचें काम जास्त निकडीचे असल्याने अिंग्रजी कमान्डर-अिन-चीफ तदर्थ काय परिश्रम करीत आहे अिकडेच प्रथम लक्ष दिले पाहिजे.

ऑगस्ट तारीख १३ रोजी अिंग्रजाचा नवा कमान्डर-अिन-चीफ सर कोलिन कॅम्बेल हा कलकत्त्यास येअून दाखल झालेला होता. त्या तारखेपासून तारीख २७ ऑक्टोबरपर्यंत त्या आंग्ल सेनापतीने हिंदुस्थान देशाला बंडखोरांच्या हातून परत जिंकून घेण्यासाठी लवकरच सुरु होणाऱ्या मोहिमेप्रीत्यर्थ जंगी तयारी चालविलेली होती. मद्रास, सिलोन व चायनावर जाणारें अिंग्रजी सैन्य जसजसें कलकत्त्यास अुतरू लागलें तसतसे त्याची योग्य विभागणी करण्यात, कासिम

बाजारच्या शस्त्रशाळेत नवीन तोफा ओतण्यात व शस्त्रास्त्रांचा, रसदेचा, रणवस्त्रांचा, सैन्यवाहनांचा सर्व बाजूंनी शक्य तितका उत्तम बंदोबस्त करण्यात हे दोन महिने खर्च करून पुढील मोहिमेची बरीचशी जय्यत तयारी तो करतो न करतो तोंच सर कोलीनला हॅवलॉक व आऊटराम यांच्या कोंडमारीची वार्ता येऊन पोचली. तेव्हा त्या "पतितम् पतितम् पुनरुत्पतितम्" अशा हट्टी लखनौ शहराचा समाचार स्वतः आपणच घेतला पाहिजे अशा निश्चयाने त्याने ऑक्टोबरच्या २७ तारखेला कलकत्याहून जातीनें कूच केलें.

याच सुमारास कर्नल पॉवेल व कॅप्टन विल्यम पील यांच्या हाताखाली 'Naval Brigade' नांवाची अेक समुद्रसेना तयार करून तिला अलाहाबादेकडे जलमार्गाने धाडून दिलेली होती. कलकत्यापासून तो तहत अलाहाबाद, कानपूर-पर्यंत जे राजरस्ते पसरलेले होते त्या रस्त्याचे आजूबाजूवर बंडवाल्यांच्या लहान लहान टोळ्या अिंग्रजी सैन्यास अतिशय त्रास देत होत्या. त्या टोळ्या अेकत्र झाल्या असत्या तर त्यांच्याशी लढाअी देणे तरी अिंग्रजांस शक्य झालें असते. परंतु कुंवारसिंगाच्या तालमीतील पांडव सेनेने अिंग्रजी सैन्याच्या भोवती घिरट्या घालून लढाअीचा प्रसंग नेहमी टाळीत राहून, आपल्या अस्तित्वाची अचानक हल्याशिवाय दुसरी कोणतीच सूचना अिंग्रजांना न मिळू देअून त्या प्रांतभर गनिमी काव्याचा धुमाकूळ घालण्यास सुरवात केलेली होती. अशाच अेका बंडखोर तुकडीला कांजवा नदीपासून हुसकून देण्याचा प्रयत्न करीत असता या समुद्रसेनेचा नायक पॉवेल हा ठार होअून पडला! पविच्चमारख्या भाग्यवीरांचें अुष्ण रक्त ज्या दिवशी पाट्यांची तरवार पीत होती त्याच दिवशी कमान्डर-अिन-चीफ कानपूर शहराला येअून पोचला होता. बंडवाल्यांच्या टोळ्यांनी रस्ते कसे रोखून टाकलेले होते त्याचे भयंकर प्रत्यंतर कानपूरकडे पोचण्याचे आधी खुद्द कमान्डर-अिन-चीफलाही मिळालें होते.

अलाहाबादेहून कानपूरकडे जाण्यासाठी सर कोलिन अेका गाडीत बसून चाललेला होता. अिंग्रजांना वाहनांची जरी विलक्षण अडचण पडलेली होती व त्याचा खुद्द कमान्डर-अिन-चीफ अेका किरकोळ गाडीत बसून कानपूरकडे चाललेला होता तरी त्याच रस्त्याने चाललेली बंडवाल्यांची अेक पायदळ तुकडी दहाबारा हत्तींवर स्वार होअून निघालेली होती. त्याच्याबरोबर पंचवीस घोडेस्वारांचीही तैनात होती. सर कोलिनबरोबर सैन्य वगैरे बिलकूल नव्हते. त्याचा गाडीवान जों घाटीच्या जवळ येतो तों बाजूच्या रस्त्याने बंडवाल्यांची टोळी त्याच टोकाला येअून मिळत असलेली त्याला आढळली! त्या गाडीत कोणता माल भरलेला आहे हें पाड्यांस माहीत नसल्यामुळे त्यांचे जरी तिकडे लक्ष गेलें नाही तरी त्या गाडीतील मालाची नाव पाण्यावर धारण समजी! हिंदुस्थान परत जिंकण्यासाठी कानपूरकडे जाणारा तो कमान्डर-अिन-चीफ आपल्यासमोर हे बंडनकाळ बंडवाले भयाण घोरवाजाराने अचानक येअून अुभे राहिलेले पाहताच पुढचा रस्ता टाकून देअून मागची वाट सुधारता

झाला! अेका क्षणाचा अवकाश होता! कोण शिकार साधणार होती! त्या गाडीवाल्याने नुसतें अेका बोटाने बंडवाल्यांस खुणविलें असतें की, हजारो वीरांच्या रणसग्रामे जी बळी पाडता येणारा नव्हता तो अिंग्लिशांचा मुख्य कमान्डर-अिन-चीफ तत्क्षणी काबीज करण्याचें भाग्य त्या गाडीवानास लाभणारें होतें! तें अेका क्षणाचें अंतर होतें—नाहीतर सर कोलिन अिंग्लिशांचा कमान्डर-अिन-चीफ—बंडवाल्यांनी कैद करून आपल्या स्वदेशी कमान्डर नानांपुढे किंवा कुंवारसिंगापुढे किंवा अेकदम यमापुढे नेअून अुभा केला असता!

ह्या गडान्तरातून सुटताच सर कोलिन कानपूरला नोव्हेंबरच्या तिसऱ्या तारखेस येअून पोचला. त्या पूर्वीच अिंग्रजांचें सैन्य ब्रिगेडियर ग्रँटचे हाताखाली जमविलेलें होतें. मागे सांगितलेली समुद्रसेना कलकत्त्याहून धाडलेल्या नवीन युरोपियन भूसेनेसह तिथे आलेली होती. दिल्लीच्या आजूबाजूचे प्रदेशात बंडवाल्यांचे निर्मूलन करीत करीत दिल्लीच्या वेढ्यातून रिकामे झालेल्या सैन्यासह ग्रेटहेड हाही त्याली अुतरून तिथेच आलेला होता. दिल्ली पडल्यानंतर तिच्या भोवतालच्या प्रदेशात 'शांतता' करताना या ग्रेटहेडने अलाहाबादेच्या नीलचा गर्वपरिहार करण्यात जें शौर्य गाजविलें तें अप्रतिम व अनुपमेय आहे. बंड झाल्यापासून तों नोव्हेंबर महिन्यापर्यंत तो प्रदेश बंडवाल्यांच्याच ताब्यात होता. परंतु ह्या प्रदेशातील रहिवाशांना त्यांनी अितका कमी त्रास दिलेला होता की खुद्द अिंग्लिशांचा कमान्डर-अिन-चीफ आपल्या पुस्तकात लिहितो : "The people not only cultivated, but in many districts as extensively as ever. In fact beyond supplying their necessity the rebels did not venture to assume the characters of tyrants of the country.[१६]

आपल्या सेनेला जरूर असणाऱ्या रसदीपलीकडे शेतकऱ्यांवर जास्त जुलूम बंडवाल्यांनी सहसा केलेला नव्हता. क्रांतियुद्धाच्या भयंकर प्रलयातही दरसालाप्रमाणेच शेतांची विस्तृत लागवड झालेली असून जमिनी हंगामानी खुललेल्या होत्या. स्वदेशाच्या स्वयंसैनिकाला शोभेल अशाच रीतीने पाडघानी या प्रदेशाला संरक्षिलेलें होतें. पण गुलामगिरीच्या अध्वर्यूंना शोभेल अशाच रीतीनें त्या स्वातंत्र्योन्मुख देशाला चिरडून टाकण्यासाठी निघालेल्या ब्रिटिश लोकांनी तो बेचिराख करून टाकला! आणि तें सर्व शांततेकरिता! गावावर गावांना आगी लावीत, जो धडधाकट मनुष्य सापडेल त्याला फासावर चढवीत चढवीत, आकाशवासी पक्ष्याहूनही जास्त निष्काळजीपणाने ग्रामवासी मनुष्यांना ठार मारीत मारीत ग्रेटहेडची सेना दिल्लीवरून कानपूरपर्यंत येअून धडकली! तेव्हा तिला, त्या समुद्रसेनेला व अितर मोठ्या फौजांना अेकत्र करून ब्रिगेडियर ग्रँट हा गंगानदीला अुतरू लागला. लखनौची

१६. Collin's Narrative, page 159.

मुक्तता करण्याकरिता, हे गंगानदी, तुझ्या तीरावर ही कितवी अिंग्रजी सेना आलेली आहे? आणि हे मानिनी अयोध्ये, तू ह्या अिंग्रजी सेनेला तरी भिअून लखनौच्या अंधारकोठडीत कोंडलेल्या ब्रिटिश सत्तेला मोकळी सोडणार आहेस की नाहीस ?

ब्रिगेडिअर ग्रँटच्या हाताखाली सुमारे पाच हजार गोरी फौज असून शिवाय शेकडो अुंट व लखनौच्या सेनेसाठी मुबलक रसदही घेतलेली होती. ग्रँटची ही सेना आलम बागेपर्यंत हाणमार करीत गेली असल्याचें कळताच सर कोलिन कानपूरकडून गंगानदी अुतरला. त्याने मागे आपली पाठ सुरक्षित राहण्यासाठी निवडक युरोपियन व शीख लोकांचे सैन्य तोफासुद्धा कानपूर शहरी ठेवले व त्याचे आधिपत्य युरोपखंडातील कित्येक युद्धामध्ये नावाजलेल्या जनरल विंडहॅम याचे हाती सोपवून दिलें. कोलिन गंगा अुतरून आलमबागेला आपल्या सैन्यास नोव्हेंबर ता. ९ ला येअून मिळाला. आलमबागेतील सैन्याचें नीट निरीक्षण करून, त्यातील निरनिराळ्या भागांना अेका अभेद्य व्यूहरचनेत ओवून ता. १४ रोजी लखनौ शहरावर अिंग्रजी सेनेचा भयंकर हल्ला चढवावयाचा असा हुकूम सुटला. लखनौच्या कोंडलेल्या रेसिडेन्सीची हकीकत कळावी व संग्रामाचें खलबत करण्यासाठी कनोजीलाल नांवाच्या अेका धाडसी अिंग्रजाने तोंडाला काळा रंग फासून, अंगावर नेटिव्ह पोषाक घालून अेका नेटिव्हाला बरोबर घेअून बंडवाल्याच्या पहाऱ्यातून रात्रीचे समयी चालत जाअून कोलिनचे व आअुटरामचे निरोप अेकमेकांना आधीच दिलेले होते. लखनौच्या रेसिडेन्सीत व बाहेर आलमबागेच्या गोऱ्या छावणीत, ज्याला त्याला १४ नोव्हेंबरची सारोख कधी अुजाडते असें झालें. रेसिडेन्सीकडून आपल्या सैन्यासह हॅवलॉक व आअुटराम शत्रूला त्या बाजूने पेठेत बाहेर पडणार व बाहेरून सर कोलिन शत्रूला दुसऱ्या बाजूने पेठेत रेसिडेन्सीकडे रेटणार ! या समयी अिंग्रजी सेनेत त्याचे बहुतेक नामांकित योद्धे व सेनापति जमलेले होते. हॅवलॉक, आअुटराम, समुद्रसेनेचा पील, ग्रेटहेड, दिल्लीचा हडसन, ब्रिगेडियर होप ग्रँट, आयर, गुद्द कमान्डर अिन-चीफ सर कोलिन कॅम्पबेल ! ताज्या दमाचे युरोपियन हायलॅन्डर्स, वेढ्यातील काळमुखातून बाहेर अुडी घेण्यासाठी अत्यंत निधड्या धाडसालाही मिठी मारू पाहणारे आअुटरामचे युरोपियन्स, राजनिष्ठ पंजाबी जवान व दिल्लीकडे देशमातेच्या रक्ताने थबथबलेल्या तरवारी धारण करणारे त्या पंजाब्याहून अधिक राजनिष्ठ असणारे शीख !

अशी ही अिंग्रजी सेना ता. १४ नोव्हेंबर रोजी लखनौ शहराकडे निघाली. तो सर्व दिवस बंडवाल्यांच्या व अिंग्रजांच्या झटापटी होण्यात खर्च होअून संध्याकाळचे सुमारास अिंग्रजी सेना दिलखुष बागेपर्यंत शहर काबीज करीत गेलेली होती. तिथे ती रात्र काढावी असा विचार करून सर कोलिनने तळ दिला. त्या रात्रीही बंडवाल्याचे हल्ले मधून मधून जरी चालूच होते तरी अिंग्रजी सेनेने त्यास दाद न देता तिथेच रात्र काढली. दुसऱ्या दिवशी कोलिनने आपल्या सैन्याची पुन्हा अेकदा मांडी

नीट रीतीने बसविलीं व तारीख १६ रोजी लखनौवर जंगी हल्ला करण्याचा हुकूम सोडण्यात आला. त्यासरशी अिंग्रजी सेना असली घेअून सिकंदर बागेवर तुटून पडली. शहराच्या ह्या भागापर्यंत अिंग्रजी सेनेला बंडवाल्यांचा म्हणण्यासारखा अडथळा झालेला नव्हता. परंतु ह्या सिकंदर बागेवर कोणता धाडसी वीर नेमलेला असेल तो असो! तो जो कोणी असेल त्याने त्या बागेमध्ये भयंकर युद्धाचें अढळ ठाण मांडलें. अीवर्टचे हाताखालील हायलेंन्डर्स व पॉलचे हाताखालील शीख लोक हे कर्कश किंकाळी फोडून जेव्हा त्या सिकंदर बागेवर तुटून पडले तेव्हा अिंग्रजी सेनेची ती अमोघ धडक आपल्यापुढे कोणानही टिकू देणार नाही असें दिसू लागलें. शिखाचा सुभेदार गोकलसिंग हा आपली तरवार अुंच अुभारून आपल्या शीख अनुयायांच्या पुढे हायलॅन्डर्सनी जाअू नये म्हणून लढाअीची शर्थ करू लागला. दुर्दैवी, लखनौ ! त्याच्या शरीरावर कोण जास्त रक्त पिते अशा निष्ठुर अहमहमिकेने शिखाची व हायलॅन्डर्सची करडी तरवार मपासप वार करू लागली ! परंतु सिकंदर बागेचे भक्कम शिलासंचय काही केल्या डळमळेनात. व ते शिलासंचय डळमळले तरी त्या बागेतील वीरसच डळमळेनात! कारण तटाच्या काही शिला ढासळताच अिंग्रजी सेना तिकडे तीरासारखी चालली — कोण पुढे जातो? हायलॅन्डर की शीख? दोघानीही खूप दौड मारली आहे : पण अखेर जो त्या भगदाडाला पहिल्याने भिडला तो शीखच आहे. त्याच्या या देशद्रोही धाडसाला बक्षीस देण्यासाठी शिरली अेक देशाभिमानी गोळी त्याच्या छातीत! तो पडला आणि लगेच हा कूपर त्या भगदाडात घुसला — त्याच्या मागोमाग अेवर्ट गेला, कॅप्टन जॉन चालला — शीख व हायलॅन्डर्स. सोजीर भराभर आत घुसत चालले. आत असलेल्या शिपायांना हे अिंग्लिश सैन्य अेकाअेकी पाहून अेकदम चकित झाल्यासारखें झालें. परंतु त्या दिवशी त्या सिकंदर बागेजवळ लढत असलेला योद्धा कोणी सामान्य मनुष्य नसला पाहिजे. तो परत फिरण्याचे नाव देखील घेत नाही. विजय वा मरण! मरण वा जय! शाबास, वीरा, शाबास! स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्यांना हीच गर्जना शोभते! अिंग्रजी सेनेतून ह्या बागेच्या तटात हा कूपर घुसला आहे म्हणून कसेंही करून त्याला मारण्यासाठी त्या मार्गी शिपायांनी धडपड चालविली पाहिजे. लुधियाना येथून बंड करून आलेल्या शिपायाच्या त्या शूर नेटिव्ह ऑफिसराशिवाय हें काम होणें नाही. आला — कूपरला शोधीत शोधीत तो कृतान्त त्याच्या अंगावर धावून आला. खणखणाट — मपासप — छाटछाट — कूपरला त्याने व त्याला कूपरनें अेकसमयावच्छेदे छाटून दोघेही ठार झाले! लॅम्डेन आपल्या हातातील तरवार फिरवीत बकूं लागला 'Come on men for the honour of Scotland' कोण अुद्दाम वाक्य हें? स्कॉटलंडच्या अिभ्रतीकरता या! आणि हिंदुस्थानच्या अिभ्रतच नाही की काय? स्कॉटलंडच्या अिभ्रतीकरिता कोणी गोरा येण्याचे आधीच हिंदुस्थानच्या अिभ्रतीकरता अेक काळा वीर धवताळून धावला — लॅम्डेनच्या प्रेतातून रक्त भळभळा वाहू लागले ! असो.

ठिकठिकाणी भयंकर हातघाअी झालली असता दुसऱ्या बाजूचा दरवाजा फोडून तिकडूनही अिंग्रजी सेनासागर त्या बागेत घुसून राहिला! आता या बागेला विजयाची आशा राहिलेली नाही. मग हे शिकंदर बागे, विजय गेला तरी तू लढणारच आहेस कीं काय? लढ लढ—तशीच लढ! विजय जावो पण सन्मान जाअू देअू नकोस, यश जाअू देअू नकोस, कर्तव्य म्हणून रणधुमाळीत अुडी घे! दरवाज्यादरवाज्यात, पायरीपायरीत, खणखणत तरवारीला तरवार झुजून राहिली! रक्ताचा सडा चहूकडे सडसडू लागला. मॅलेसन म्हणतो, "भयंकर रक्तपाताची व तुमुल निकराची झुंज जुंपली. निराशेच्या अतुल शौर्याने बंडवाले लढू लागले. अिंग्लिश सैन्याने त्या स्थलाचा अातील भागही काबीज केला तरी लढाअीचा शेवट होअीना. प्रत्येक खोली प्रत्येक जिना, प्रत्येक बुरुजाचा प्रत्येक कोपरा हटातटाने झुजत राहिला! 'शरण' हा शब्द कोणी अुच्चारला नाही—कोणी अैकला नाही! जेव्हा ती सर्व जागा अिंग्लिशांनी जिंकून घेतली तेव्हा असें लक्षात आलें की, त्या बागेमध्ये दोनहजार बंडवाल्यांचीं प्रेतें पडलेलीं आहेत! त्या बागेमध्ये त्यांची जी फौज होती तीपैकी फक्त चार जण काय ते लढाअी सोडून पळाले असें म्हणतात—परंतु चार तरी पळाले कीं नाही ही शंकाच आहे!"[१४]

शिकंदर बागेत देशस्वातंत्र्यासाठी लढत लढत मरणाऱ्या शहीदहो, अहो द्विसहस्र वीरहो, तुमच्या त्या पवित्र स्मृतीला हा कृतज्ञ अितिहास अर्पण असो! दोन हजार गाझींचे रक्त! दोन हजार देशवीरांचें रक्त! त्या रक्ताला हा कृतज्ञ अितिहास अर्पण असो! देशासाठी लढू निघालेले तुम्ही कोण होतात, तुमचीं नावें काय होतीं, तुम्हांमध्ये तत्त्वनिष्ठेची दिव्य ज्योति प्रकाशत असता तिला चैतन्य देणारा कोणचा वीरवर धुरीण तिथे तुम्हास धारातीर्थाचे संकल्प सांगत होता हें कथन करण्याचे महद्भाग्य, जगाच्या कल्याणास्तव अुपकारक कर्मामध्ये देह झिजविणाऱ्या तुम्हा संताच्या विभूतींचा नामोच्चार अुच्चारण्याचें किंवा लिहिण्याचें महद्भाग्य जरी आमच्या नशिबी नाही तरी तुमच्या वीर्यस्मृतीला हा कृतज्ञ अितिहास अर्पण असो! विजय गेला परंतु तुम्हीं स्वकीय यशाला भगू दिलें नाहीत! विजय गेला पण स्वयशाला अुणोष्ण रक्ताच्या दोन हजार कारंजाखाली तुम्ही सुस्नात करून निर्मल ठेवलेले आहात! तुमचे रक्त ही भूतकालची तिलांजलि— आगामी वीराची सजीवनी होवो!

तुम्ही यश मिळविलें नाहीत परंतु हे स्वातंत्र्याच्या गाझींनो, हा शिकंदर बागेतील आत्मयज्ञ जर योग्य मुहूर्ताला आरंभिलेला असता तर तुमचा विजयही निसटून जाता ना! आता तुमच्या शत्रूची शक्ति कितीतरी वाढलेली आहे! त्याचे हजारो नवे गोरे रणाकडे लोटत आहेत, दिल्ली पडल्याने त्याचा ताण कमी झाला आहे, विज-

१४. Malleson, Vol. IV, page 132.

याने त्यांचें नैतिक बळ वाढलेलें व अपजयाने तुमचें मानसिक सामर्थ्य खचलेलें आहे. अशा रुक्ष व निर्बीज जमिनीत दोन हजारांचें रक्त देखील पुरासा ओलावा देणार नाही! परंतु दोन महिन्यांपूर्वी जर का हे दोन हजार रक्तमेघ देशवीरत्वाच्या त्वरेने ह्या भूमीवर वळले असते तर—जर लखनौला पहिली सलामी झडताच अिंग्रजी सत्तेच्या दुर्बल रेसिडेन्सीवर अशा मारू वा मरू या निश्चयाने चालत जाअून दोन हजार लोक गेले असते तर—तर अर्ध्या तासाचे आत हिंदुस्थानचे भालावर तुम्हांला पाहिजे होता तो स्वराज्याचा मुकुट चकाकू लागला असता! मरणी मेलात पण मरणाचा तो मुहूर्त हुकला! वेळ गेली, घटका फेव्हाच बुटाली—अेका रक्त-बिंदूने त्या वेळेस विजय मिळता—आता रक्ताने हौद ओतलेत तरी मुष्टा मिळेल—पण विजय मिळणें कठीण! राज्यक्रांतीसारख्या भयंकर वेगाच्या वावटळांत अेक क्षण कुचराअी झाली कीं घटी बिघडली. अेक पाय मागें घेतला कीं तो तुटून पडलाच, अेक क्षण जिवाची आशा धरली कीं कायमचा मृत्यु आलाच! क्रांतीच्या दरबारांत पहिली सावधगिरी ही कीं "बूंदसे गयी तो हौदसे नहीं आती !"

रक्ताचे हौद सिकंदर बागेंत जसे साचले तसेच रणांगणाच्या अितर बाजूला ही साचू लागलेले होते. दिलखुश, आलमबाग, शहानजीफ हीं सर्व स्थलें त्या दिवशी व त्या रात्रीं शत्रूबरोबर भयंकर झुंज करीत होतीं. पहाटे लखनौ शहराच्या सर्व घटा घणघणू लागल्या, नौबती धडाडल्या व पुन्हा त्या रक्तबंबाळ शहराने शत्रु-बरोबर टकरा देण्यास सुरवात केली. कालचा शहानजीफचा झगडा व आजचा मोतीमहालाचा झगडा ! तोडीस तोड जुडू लागली! परंतु अखेर अिंग्रजी निशाणाची बाजूच बिनतोड ठरून तें आंग्ल दल रेसिडेन्सीत कोंडलेल्या आपल्या देशबांधवांची मुक्तता करण्यास समर्थ झालें. ता. १७, ता. १८, ता. १९ तों तहत ता. २३ नोव्हेंबरपर्यंत लखनौशीं लढाअीवर लढाअी घेत घेत शेवटीं तीं वेढलेली व तीं वेढा अुठविण्यास आलेली अिंग्रजी सेना परस्परास भेटती झाली. ज्या रेसिडेन्सीत आज-पर्यंत मृत्यूची कळा पसरली होती त्या रेसिडेन्सीवर आता विजयाचें स्मित झळकू लागलें. परंतु ह्या आंग्ल विजयाला चढवाले अजूनही जुमानीत नव्हतेच. ह्या दोन्ही अिंग्रजी सेना अेकत्र झाल्या असता व रक्ताच्या प्रत्यक्ष समुद्रांत ते सर्व शहरचे शहर तरंगू लागले असता तेथील बटवाले शरण येण्याचें किंवा पळून जाण्याचें नाव काढीनात! अशा त्यांच्या हट्टी धैर्यामुळे लढाअी पुन्हा केव्हा जुंपेल हें अगदीच अनिश्चित होते तेव्हा मागील अहोरात्र हाणामारीत विस्कळीत झालेली ब्रिटिश सेना पुन्हा नीट व्यवस्थेने रचण्यासाठी सर कोलिनने सुरवात केली. त्याने रेसिडेन्सी सोडून देअून दिलखुष बागेंत सर्व सैन्य जमविलें. त्याची पुढील झटापटीला अवश्य अशी संघटना तयार केली व मिळालेल्या आलमबागेमध्ये आअूटरामच्या हाताखाली ह्या विस्तीर्ण छाटाछाटींतून अुरलेली सुमारे चार हजार सेना व पचवीस तोफा ठेवून दिल्या-व अशा रीतीने विजयाबद्दल त्याने आपल्या सैन्यातील शौर्याची, शिस्तीची व आज्ञा-

धारकत्वाची यथार्थ स्तुति केली. त्या स्तुतिशौर्यांचा बहुतेक वाटा जनरल हॅवलॉकचा होता!

परंतु तो विजयानंद आग्ल सेना अनुभविते न अनुभविते तोंच त्या विजयानंदाचा मुख्य वाटेकरी हॅवलॉक अकाअेकी मरण पावला! लखनौच्या रणांगणातील भयंकर जाचाने, काळजीने व निराशेने खचत खचत अंत विजयाचे रंगांत हा शूर हॅवलॉक मृत्यूचे स्वाधीन झाला. ता. २४ रोजी आंग्लविजयात मृत्यूने हे विष कालविले. तथापि हॅवलॉकचे मागे त्याच्या मुलाला व पत्नीला सरदारीचा सन्मान देअून त्याचा अिंग्लंड देश हा कृतज्ञ झालेला आहे. परंतु ती वेळ मेलेल्यांच्या दुःखात निमग्न होण्याची नव्हती तर त्याच्या अपूर्ण आशा पूर्णत्वास नेण्याची होती. लखनौ घेताना हॅवलॉक पडला तेव्हा त्याच्या मृत्यूनंतर त्याची खरी सेवा करणे म्हणजे लखनौ शहर जिंकणे होय!

परंतु लखनौ जिंकण्यासाठी निघावयाचे आधीच अिकडे कानपूरकडे हे तोफांचे आकस्मिक धडधडाट कां चाललेले आहेत बरें? असतील चालले कशासाठी तरी! युरोपमधल्या रणांगणात प्रख्यात झालेला वीर विन्डहम जोपर्यंत कानपूरला आहे तोंपर्यंत तिकडच्या तोफांनी सर कॉलिनच्या छातीत धडधडण्याचे मुळीच प्रयोजन नाही. विन्डहॅमसारखा आंग्ल योद्धा असल्यावर त्याला कोण वडलोर तोंड देण्याचें धैर्य करील? परंतु सर कॉलिन, विन्डहॅम जसा कानपूरला आहे तसाच तात्या टोपेही तिकडेच आलेला आहे! असें हे वार्ताहर म्हणतात!

तात्या टोपे कानपूरकडेच आहे? सर कॉलिनला त्या अंकू आलेल्या तोफांचा भयंकर अर्थ ध्यानात आला व तो अत्यंत त्वरेने, लखनौस आअुटरामला सोडून देअून, तो स्वतः कानपूरकडे तात्या टोपे काय गडबडीत आहे ह्याची चौकशी करण्यास धावत निघाला!!

* * *

## प्रकरण सहावें

# तात्या टोपे

कानपूरला आपल्या सैन्याचा पराभव झाल्यानंतर श्रीमंत नानासाहेब पेशवे व तात्या टोपे हे रात्री बाराचे सुमारास ब्रह्मावर्तास येअून पोचले. तेथें ती रात्र घालवून दुसरे दिवशी सकाळी त्याचे कनिष्ठ बंधु बाळासाहेब, पुतणे रावसाहेब व तात्या टोपे ही मंडळी राजघराण्यातील स्त्रीसमूहासह नावांत बसून गंगापार अुतरली व लखनौ प्रांतातील फत्तेपूर शहरी येअून पोचले. येथें असलेला श्रीमंत नानाचा परम-

स्नेही चौधरी भोपालसिंह ह्याने त्या सर्वांचें आदरातिथ्यपूर्वक स्वागत केलें व आपले येथे त्या सर्वांना ठेवून घेतलें. मध्यंतरी कानपूरच्या लढायांतीत विस्कळीत झालेलें सैन्य पुन्हा व्यवस्थित करण्यामध्ये नाना गुंतलेले होते. थोडेच दिवसांत बंड करून अुठलेली ४२-वी रेजिमेंट नानांचे निशाणाखाली लढण्याचा संकल्प करून शिवराजपुरापर्यंत आली व तिथून तिने सर्व संमतीने श्रीमंत नानांना आपल्यास घेअून जाण्याबद्दल कोणीतरी अधिकारी मनुष्य धाडावा म्हणून विनंती धाडली. या विनंतीप्रमाणे श्रीमंत नानांनी तात्या टोपे यांस शिवराजपुराकडे त्या रेजिमेंटला आणण्याचा अधिकार देअून रवाना केलें व त्याप्रमाणे तात्यांनी त्या रेजिमेंटला नानांच्या ध्वजाखाली आणलें. तात्यांना हें शिवराजपूरचें सैन्य मिळताच त्यांनी हॅवलॉकचे पाठीवर मागे सांगितल्याप्रमाणे, डावपेचांना आरंभ केला व अखेर त्या आंग्लवीराला अयोध्येतून खेचून परत कानपूरला आणलें. हॅवलॉक कानपूरला येअून पाहतो तों हा विचित्र मराठा ब्रह्मावर्ताचे वाड्यात अगदी पूर्वीप्रमाणे मारे राज्य करून राहिलेला ! तेव्हा पुन्हा अेकदा ब्रह्मावर्तास निकराची लढाअी करणें आंग्ल सेनेस भाग पडलें. या लढाअीत पराजय पावताच गंगानदी अुतरून तात्या ससैन्य नानांना फत्तेपूरला येअून मिळाले. थोडेच दिवसांत ग्वाल्हेरचे सैन्यास फितूर करण्याचा बेत नानांचे दरबारात घाटू लागला. या कामावर तात्याशिवाय कोणाची योजना अिष्टतर होणारी आहे? ज्या विलक्षण डोक्याने आजपर्यंत सबंध रेजिमेंटच्या रेजिमेंटस् गुप्तरीतीने पोखरून बंडाच्या धाडसी कर्मास भारतात प्रवृत्त केल्या त्या या कावेबाज मराठ्यानेच ग्वाल्हेरचें सैन्य फितवावयास गेलें पाहिजे ! तावडतोब तात्या टोपे ग्वाल्हेरला गुप्तरूपाने गेले. व तेथून त्वरेने परत फिरताना त्यांनी त्या ग्वाल्हेर सैन्यापैकी मोरारच्या छावणीतील कॉंटिंजन्ट पायदळ, घोडेस्वार, तोफखान्यासह फौज आपल्याबरोबर काल्पीपर्यंत फितवून आणलीही ! हे अैकताच नानांनी काल्पीच्या ह्या सर्व सैन्याची व्यवस्था करण्याचा अधिकार देअून बाळासाहेबास तिकडे धाडून दिलें. काल्पी शहर हे ठिकाण लष्करी दृष्टीने बघवाल्यास अत्यंत महत्त्वाचें होतें. यमुनेचा प्रवाह त्या शहरामध्ये व कानपूरमध्ये असल्याने अिंग्लिश सैन्यापासून संरक्षण करणारा तो अेक नैसर्गिक खंदकच झालेला होता. म्हणून काल्पी शहरात तात्यांनी ठेवलेले प्रस्थान कायम करून तेथील किल्ल्याची लष्करी तयारी जय्यत करण्याचा नानांनी हुकूम दिला. काल्पी शहराचे संरक्षणास काही लोक ठेवून बाकीच्या सैन्यासह तात्या टोपे कानपूरच्या अिंग्रजी फौजेस सह देण्याचा विचार करू लागला.

सर कॉलिन जेव्हा अिंग्रजी सैन्यासह लखनौच्या मुक्ततेकरिता कानपूर सोडून निघाला तेव्हा तेथील संरक्षण करण्याकरिता त्याने युरोपच्या लढायांत प्रसिद्धीस आलेला जनरल विन्डहॅम यास ससैन्य ठेवलेला होता. त्या युरोपियन सैन्याला नवीन कुमक येण्याचे आधी व लखनौकडे चाललेला झगडा संपण्याचे पूर्वी कानपूर शहरावर साधल्यास पुन्हा अेकदा चढाअी करून पहावी असा नानांचा निश्चय ठरून

त्या कामावर हें ग्वाल्हेरहून तात्यांनी आणलेलें सैन्यच धाडण्यात आलें. ह्या सैन्यावर आता तात्या टोपे यांचीच मुख्य सेनापतित्वावर नेमणूक झालेली होती. अशा रीतीनें नानाच्या दरबारात काल कारकुनाची लेखणी खरडीत बसणारा ब्राह्मण तात्या टोपे आज अेका सैन्याचा मुख्य सेनापति झालेला आहे! आणि युरोपच्या रणमैदानावर लष्करी तालमी घेण्यात ज्याचा जन्म गेलेला आहे त्या जनरल विन्डहॅमवर तो चालून जात आहे! आणि त्याचीं साधनें तीं कोणतीं? नुकतेच बंड केलेले, असंघटित लष्करी शिपायी आजूबाजूच्या बाजारबुणग्यांसह त्याच्या बरोबर निघालेले व समोर संघटनेने, लष्करी शिक्षणाने युक्त संस्थापित सत्तेचें असें विजयी आंग्ल सैन्य अुभे ठाकलेले! अशी ही असमान झुंज पाहू कशी लढते ती – स्वातंत्र्याचें चैतन्य, अितर सर्व फायदे विरुद्ध पक्षाकडे असतांनाही पाहू कसें लढते तें! म्हणजे साधनादि फायदे नसताना जर तें अितकें लढते तर शिस्त संघटनादि फायदे असताना ते किती लढू शकलें असतें याचें हें जिवंत शिक्षणच मिळालेले होअील!

बंड केलेल्या ग्वाल्हेरच्या कॉन्टिंजट फौजेसह तात्या टोपे हेता. ९ नोव्हेंबरला काल्पीला येअून पोचले. कानपूरपासून काल्पी ४६ मैलांवर बसलेली आहे. तेथून कानपूरच्या अिंग्लिश सैन्याची बरोबर बातमी काढून तात्यांनी काल्पी सोडून व यमुना नदी अुतरून दुआबमध्ये प्रवेश केला. जालन येथे खजिना वगैरे सर्व अडगळ ठेवून, त्यांनी काल्पीला ३००० सैन्य व २० तोफा संरक्षणार्थ ठेवून, यमुना अुतरताच घाअीघाअीनें ते कानपूरवर चढाअी करून गेले नाहीत. सर कॉलिनला लखनौकडे तेथील बंडवाल्यांनी अेकदा तोंड दिलें म्हणजे तो तिकडे पूर्ण अडकून पडण्याची वार्ता येअीतोपर्यंत तात्या कानपूरच्या भुसत्या आजूबाजूलाच घेर धरीत होते. लखनौचे बंडवाले आता काही दिवस तरी सर कॉलिनला गुंतवून टाकतील असा रंग दिसताच तात्या शिवराजपूरपर्यंत चढून आले. वाटेत लष्करी महत्वाच्या ठिकाणी त्यांनी सैन्याची ठाणी टाकलीं. सुमारे नोव्हेंबरच्या १९ तारखेला अितकी व्यवस्था करून तात्यांनी अिंग्रजांचा रसदीचा मुख्य मार्ग बंद करून टाकला. या तात्यांच्या डावपेचाचा अर्थ विन्डहॅमच्या नजरेस आल्याशिवाय राहिला नाही. त्याने कलकत्याकडून येहात असलेल्या गोऱ्या सैन्याचा प्रवाह कानपूरलाच थांबवून धरला. कार्थ्यूच्या हाताखाली सैन्य देअून काल्पीच्या रसदनजीक तळ देवविला व तात्या अयोध्येत सर कॉलिनच्या पाठीवर मार देण्यासाठी निघून जातो किंवा कानपूरला येतो याची तो वाट पाहू लागला.

परंतु विन्डहॅम हा जात्या वाट पहाणारा योद्धा नव्हता. त्याचा धाडसी स्वभावणामध्ये त्याला नेहमी पुढे ढकलीत असे. शिवाय अिंग्रजाची हिंदुस्थानातीलच नव्हे तर आशियातील सैन्याविषयी जी अेक लष्करी श्रद्धा ठरलेली आहे तिचाही त्याच्या मनावर पगडा बसलेला होता. ही श्रद्धा म्हणजे अशी होय की, "अेशियाटिक लोकांचा पराजय करण्याची अुत्तम युक्ति म्हणजे त्यांच्यावर सरळ रीतीने चढाअी

करून जाणें ही होय. आपण कितीही सशक्त असलो तरी जर किंचित् मागें पाय घेतला किंवा अुशीर केला तर अेशियाटिक लोक तेव्हांच गर्वभराने फुगून जातात. परंतु आपण कितीही अशक्त असलो तरी मागें न घेता त्यांच्यावर निकराने सरळ रीतीने तुटून पडलो की, अेशियाटिक लोकांचे डोळे दिपून जाअून ते तुमचे भेदरूनच पैरावैरा पळू लागतात." या लष्करी शब्दांचा अुपयोग आजपर्यंत अिंग्रजांनी जितके जितके वेळा केला त्यांतून बहुतेक वेळा तो यशस्वीच झालेला होता. त्यामुळे अेशियाटिक लोकांशी लढताना बळाच्या खऱ्या प्रमाणापेक्षा वरच्या दिमाखानेच यश यावा जास्त संभव असतो, म्हणून रणामध्ये गोऱ्या मूठभर सैन्यानेही नीट तीरासारखें अेशियाटिक लोकांवर तुटून पडत जावें, व त्यांनी चाल करण्याचे आधीं आपणच त्यांच्यावर चालून जाअून आपले शक्तिमत्व जबर आहे असें त्यांस भिववीत जावें, हा आंग्लयुद्ध-शास्त्रांतला अेक प्रयोगसिद्ध नियमच ठरलेला होता. जो जो अिंग्रजी सोजीर जिकडे येअी तो तो हा नियम पाठ करीत असे व जो जो अिंग्रज अितिहासकार ग्रंथ लिही तो तो या नियमाचा सिद्धान्त पुनः पठण करीत असे. अशा तालमीत जनरल विन्डहॅम हा तात्या टोप्याच्या हालचालींना मननोक्त रीतीने चालू देअून वाट पाहत थोडाच बसणार ! त्याने कानपूर शहरातून निघून काल्पीच्या बाजूला असलेल्या वाळव्याचे पुलापर्यंत चाल केली.

ही ब्रिटिश फौजेची झालेली चाल पाहताच वडवाल्याच्या सैन्यानेही हालचालीस आरंभ केला. त्याची सेना अकबरपुराहून मुरवंडीस आली व मुरवंडीहून ता. २५ नोव्हेंबरला पांडु नदीला येअून भिडली. आपल्या जितक्या नजीक हा धाडसी शत्रु चालून आल्याची वर्दी लागल्याने विन्डहॅमच्या सैन्यात लढाअीची तयारी झाली व अेशियाटिक लोकांच्या पराभवासाठी रामबाण असलेली युक्ति ता. २६ रोजी योजण्याचें ठरलें. वडवाल्यांवर आपण होअूनच सरळपणे चालून जाअून पहिल्याने त्यांच्या आघाडीला झोडावी व मग असेंच अेकअेकटे गाठून त्याचे अितर भागही हाणून टाकावे, असा संकल्प करून विन्डहॅम ता. २६ ला सकाळीच शत्रूवर चालून गेला. वडवाले अेका दाट झाडीत अुभे होते. त्यांनी अिंग्रजी सैन्यावर आपल्या तोफा सुरू केल्या. बराच वेळ मारामारी होअून अिंग्रजांनी तेथील ३ तोफाना जिंकून घेतलें. विन्डहॅम म्हणू लागला अखेर माझ्या सरळ हल्ल्याने अेशियाटिक लोक आपणांस अेकदा पराभव पावले व गोरी फौज आपणांस अेकदा विजयी झाली ! गोरी फौजही आपण विजयी झालो – विजयी झालो, म्हणून जयशब्द करू लागली – परंतु हे विजयी सैन्या, तुझा खराच जर विजय झालेला आहे तर मग हें काय तू रणातून मागें मागें का हटत चालला आहेस ? किंवा अलीकडे रणातील पिछेहाटीलाच विजय म्हणू लागले आहेत ? कसला विजय आणि कसले रण ! विन्डहॅमची गोरी फौज तात्या टोप्याच्या घोडेस्वारापुढे हटत हटत थेट कानपूरपर्यंत मागें सरली. तिच्या पाठीवर असलेले बहाद्दर घोडेस्वार घड लढाअी देअीनात, घड पाठलाग सोडीनात !

मराठ्यांच्या फौजेतारसोच ते मनूभोवती घिरट्या घालीत घालीत त्याला मागे रेटीत व आपण पुढे घुसत थेट कानपूर शहराच्या वेशीपर्यंत येऊन धडकले. बंडवाल्यांना धाकात ठेवण्यासाठी विन्डहॅमने मारलेल्या या गरळ धडकीला नेहमीच्या सम्प्रदाया-प्रमाणे न भिता हे अेशियाटिक लोक अुलट त्यालाच धडक देत पुढे आले ! मॅलेसन म्हणतो, "परंतु बंडवाल्यांचा पुढारी तात्या टोपे हा काही कोणी वेडगळ मनुष्य नव्हता. जनरल विन्डहॅमने जो आघात केला त्याने भयभीत होण्याचें दूरच राहून अुलट अिंग्रजी सेनानींचें मर्मस्थान त्या धूर्त मराठ्याच्या नजरेस आलें. विन्डहॅमची अतर्गत स्थिति अेखाद्या अुघड्या पुस्तकाप्रमाणे सरकन तात्या टोपेने वाचून टाकली आणि अस्सल सेनानीच्या अुपजत चातुर्याने त्याने त्या स्थितीचा पूर्ण फायदा घेण्याचा निश्चय केला." १

दिवसभर लढाअी दिलेल्या विन्डहॅमला २४ तासाचीही फुरसत न देता, आपल्या सेनेला तात्यानी त्या रात्री, दुसऱ्या दिवशी सकाळीच पुढे चाल करण्यास सज्ज असावे, असा हुकूम दिला. परंतु शिओली आणि शिवराजपूर येथील फौज येअून तिने अिंग्रजांच्या अुजव्या बाजूवर तोफांचा गोळीबार करीपर्यंत पुढे न जाता तो गोळीबार होताच मग अिंग्रजावर त्वरेने हल्ला करावा असें त्याने योजिले होतें. अिकडे विन्डहॅमनेही आपल्या सेनेला सकाळीच सशस्त्र अुभें केलें. परंतु सुमारे नऊ वाजेपर्यंत अुभें राहिले असताही बंडवाले येण्याची वार्ता मिळेना किंवा त्यांच्या हालचालीही कळेनात. तेव्हा अिंग्रजी सेना न्याहारीसाठी आपापल्या तंबूत परत गेली. सुमारे ११ वाजता अिंग्रजी सेनेला पुन्हा सशस्त्र सज्जतेचा हुकूम झाला. जनरल विन्डहॅमला सेनापति तात्या टोपे याचा नक्की हेतु काहीच कळेना. सर्व अिंग्रजी सेनेत अनिश्चितता माजलेली होती.

अितक्यात निश्चिततेचा भयंकर अंमल सुरू करण्यासाठी तात्या टोपे याच्या सैन्यातून अिंग्रजांचे अुजव्या बाजूवर तोफेचा लाल भडक गोळा येअून आदळला. तो गोळा आदळतो तोच समोरूनही मारा सुरू झाला. लगेच विन्डहॅमने ६ तोफांसही कार्यूला ब्रह्मावर्ताने रस्त्यावर धाडून शहराचे त्या भागाला रक्षण करण्यासाठी पाठविलें. बंडवाल्यांच्या तोफांचा व अिंग्रजांच्या मध्यभागाच्या तोफांचा जंगी सामना सुरू होअून त्यात अिंग्रजी गोलंदाज लवकरच हार घेअू लागले. तात्यानी आपल्या सैन्याचा अर्धवर्तुळाकृति व्यूह करून त्यामध्ये अिंग्रजी सैन्याला समोरून व दोन्ही बाजूनी कोंडीत आणण्याचा घाट घातलेला होता. विन्डहॅमने तात्याच्या

१ "Tatya Topi read then the necessities of Windham's position as he would have read an open book and with the instinct of a real general he resolved to take advantage of them."

—Malleson, Vol. IV, page 167.

अर्धवर्तुळास फोडण्याचा हवा तेवढा प्रयत्न केला. परंतु तात्यांच्या तोफांनी अिंग्रजांना पुढे पाअूल टाकण्यास असंवय करून टाकलेले होतें. पुढे पाअूल तर राहोच पण आता मूळ ठिकाणीही अढळ राहणे अशक्य होअून अिंग्रज रणांतुन पाअूल मागे घेअू लागला. अिंग्रजांची डावी बाजू आपल्या तोफा सोडूनही मागे फिरली हें पाहताच त्यांच्या भुजव्या बाजूकडील काही सैन्याने नेट धरून तोफा रक्षण केल्या. परंतु ह्यापुढे अिंग्रजी सोजीर रणात पाय धरीनात ते जसे मागे हटताना दिसले तसें बंडवाल्यांचे अर्धवर्तुळ पुढे ढकलीत चाललें. संध्याकाळी सहाचे सुमारास ह्या भयंकर ढकलाढकलीत अिंग्रजांची सेना पूर्णपणे कोलमडून गेली व त्यांचा सेनापति जनरल विन्डहॅम हा सर्व सैन्यासह अस्ताव्यस्त रीतीने पळू लागला. त्याचे हजारो तंबू, राहुट्या, बैल, रसद व पोषाख बंडवाल्यांच्या हातात पडले व कानपूर शहराचा निम्मा भाग पुन्हा सेनापति तात्यांच्या ताब्यात आला. अशा रीतीने या जवान मर्द मराठ्याच्या तरवारीवर ह्या विजयाचा दुसरा मुकुट झळकू लागला. कालच्या लढाअीत जर त्याचा काहीसा अप्रत्यक्ष विजय होता तर आज त्याचा प्रत्यक्ष व परिपूर्ण विजय झाला ! त्याने अिंग्लिशांच्या अेका अत्युत्तम सेनापतीला दिवसभर चाललेल्या निकाराच्या रणात नुसता पराभूत केला अितकेंच नसून त्याचा त्याने पाठलाग केला. तंबू राहुट्यासह त्याची छावणी पाडाव केली व कानपूर शहरातून त्यास हुसकीत नेअून त्या शहराचा ताबा घेतला. जर ह्या सेनापतीअितकेंच त्याचें सैन्यही कर्तृत्ववान् व सघटित असतें तर अिंग्लिश अितिहासकारही म्हणतात की ह्या मराठ्याने त्या दिवशी जनरल विन्डहॅमचे सैन्याला पार कापूनही टाकले असतें ! अितकी विनतोड बाजू तात्या टोप्याने जनरल विन्डहॅमवर लागू केली !

आणि तात्या हा बिनतोडीचा डाव खेळत असताना त्याचा आवाज सर कॉलिनला लखनौकडे अेकू गेलेला होता. ज्या वेळेस तात्या कानपूरवर चालून आले तेव्हा त्याना अशी आशा होती की निदान महिनाभर तरी सर कॉलिनला लखनौ शहर गुसवून ठेवील व तोपर्यंत जनरल विन्डहॅमच्या अेकलकोंडेपणाचा आपण सहजच फायदा घेअू. परंतु त्यांचा हा डाव त्यांच्या बाजूने अितका विजयी होत आला तोच त्याना बातमी कळली की लखनौचे काम अगदी त्वरेने संपुन तिकडे बंडवाल्यांचा फारसा अडथळा नसल्याने सर कॉलिनही आपणावरच चालून येत आहे. आता गंगेच्या दोहोबाजूने ब्रिटिश सैन्य तात्यावर चढाअी करून आले होते. लखनौच्या बंडवाल्यानी दाखविलेल्या ह्या ढिलेपणाने अिंग्लिशांच्या खुद्द कमान्डर-अिन-चीफशी कुस्ती घेण्याचा ह्या बंडवाल्या सेनानीवर बोजा पडला होता. तरी तो मराठा सेनानी ता. २७ ची सर्व रात्र रणावरच सावधगिरीने काढीत अटळ अुभा होता.

त्या रात्री अेकदा जनरल विन्डहॅमच्या मनात आलें की बंडवाल्यांवर रात्रीच्या रात्री छापा घालून दिवसा गेलेलें यश परत मिळवावें. परंतु ह्या कल्पनेला सार्थकता देण्याअितका धीर ब्रिटिश सैन्यात अुरलेला नसल्यामुळे आता रात्री तर राहोच पण सकाळी तरी शत्रूला हात दाखविता यावा म्हणून विन्डहॅम कडेकोट तयारी करू लागला. त्याने कालच्या पराजयातील सर्व चुका दुरुस्त करून ता. २८ रोजी बंडवाल्यांवर पुन्हा शक्य तर चढाओ करण्याचा निदान त्यांची चढाओ तरी न होअू देण्याचा निश्चय करून रणास सकाळीच आरंभ केला. अिंग्रजांच्या डाव्या व अुजव्या बाजूवर बंडवाल्यांच्या तोफा व सैन्य मार देअू लागलें. कालच्या प्रमाणेच आजही अिंग्रजांना त्यानी व त्यांना अिंग्रजांनी ठिकच्या ठिकाणी दुपारी १२ पर्यंत दाबून ठेवलें. परंतु काल अिंग्रजांनी पाय जसा मागे घेतला तसें आज न करता ते रणात पाय पुढे टाकून शत्रूवर तुटून पडले. अेशियाटिक लोकावर सरळ धडक घेतली, तेव्हा मग विजयाची शंका कशाला ?

विजयाची शंका मुळीच नाही पण हा अुजवीकडे हाहाकार कोण करीत आहे ? ब्रिगेडियर विल्सन ठार ! कॅप्टन माक्री ठार ! कॅप्टन मार्की, मेजर स्टर्लिन, लफ्टेनंट केन, लेफ्टेनंट गिबन चरचरा कापून जाअून ठार ! अेशियाटिकांमध्येही अेखादा तात्या टोपे असतोच तर मग ! त्या तात्याने व त्याच्या सैन्याने संध्याकाळपर्यंत मारामार करून पुढे चाल करीत आलेल्या अिंग्रजी सैन्यास त्याच्या कमान्डरसुद्धा मागे पिटाळून ह्या तिसऱ्या दिवशीही हा तिसरा विजय मिळविला ! कालच्या पेक्षाही आज अिंग्रजी सेनेची जास्तच नामोहरामी अुडवून दिली. त्याच्या दोन्ही भागानाही रणांगणातून हुसकून दिलें. काल अर्धे शहर घेतलें होतें तर आज तात्याने सर्व कानपूर काबीज केलें व अशा रीतीने ह्या जवानमर्द मराठ्याच्या तरवारीवर हा तिसरा विजयाचा मुकुट लकाकू लागला ! २ पराभव पावून अिंग्रजी सैन्य मागे पळत होते तेव्हाच अिंग्रजांचा कमान्डर अिन-चीफ सर

२. The following graphic picture is given of the defeat by an English Officer —"You will read the account of this day's fighting with astonishment for it tells how the English troops, with their trophies and their mottoes and their far-famed bravery were repulsed, and they lost their camp, their baggage and position to the scouted and despised natives of India ! The beaten English —as the enemy has now a right to call them, —have retreated to their entrenchments amidst overturned tents, pillaged baggage, men's kits, fleeting camels, elephants and horses, and servants. All this is most melancholy and disgraceful !" —Charles Ball, Indian Mutiny, Vol. II, page 190.

कोलिनही त्याच्या छावणीत येऊन दाखल झालेला होता. त्याने आपल्या डोळ्यांनी अिंग्रजी फौजेची मुडालेली मेधा पाहिली, त्याने आपल्या डोळ्यांनी वंडवाल्यांची विजयी सेना कानपूर शहरात प्रवेश करतांना पाहिली, त्याने आपल्या कानांनी वंडवाल्यांची रणशिंगे व रणतांशे, जयनादाचे कडकडाट करताना अैकिले ! कानपूरकडे तात्या टोपे काय गडवडीत आहे हें त्याच्या आता पूर्णपणे ध्यानात आलें !

सर कोलिन अिंग्रजाचे छावणीत येऊन पोचल्याचे कळताच ज्याची अत्यंत भीति वाटत होती ती गोष्ट घडली आहे हें तात्याना कळून आलें. लखनौने निकराचे अैवजी ढिलेपणा केल्याने सर कोलिन ससैन्य कानपूरवर अयोध्येकडून. चालून आला ! हें अप्रिय सत्य प्रत्ययास येताच धीर न सोडता तात्यांनी अयोध्येकडील पूल फोडून टाकून अिंग्लिश सैन्यास गंगा नदी अुतरणें अशक्य करण्यासाठी त्या पुलावर तोफांचा मारा सुरु करण्यास आरंभ केला. परंतु या वंडवाल्यांच्या तोफांवा रोख आधीच ओळखून सर कोलिनने अिंग्रजी तोफांचा अुलट मारा चालविला व त्यांच्या आश्रयाखाली ता. ३० नोव्हेंबरपर्यंत सर्व अिंग्रजी सेना अयोध्येतून कानपूर शहराजवळ येऊन अुतरली. तरी कानपूर शहर सोडून जाण्याम वंडवाले तयार होअीनात. त्यांनी त्या शहरापाशी अिंग्रजांच्या मुख्य कमान्डर-अिन-चीफशींही दोन हात करण्याचा घाट घातला. कारण "They had, as their leader, a man of very great national abilities."[३] ह्या कर्तबगारीच्या सेनापतीने आपली डावी वाजू कानपूरच्या व गंगेच्या दरम्यान अडचणीच्या जागेत, आपला मध्य खुद्द कानपूर शहरात व आपली अुजवी बाजू गंगेच्या कालव्यावर पसरून ठेवलेली होती त्याचे सैन्यात लष्करी शिक्षण मिळालेले दहा हजारपर्यंत शिपाअी लोक होते. त्यांनी डिसेंबरच्या पहिलीला व दुसरीला अिंग्रजी सैन्याच्या कमान्डर-अिन-चीफला स्वस्थ वसू दिलें नाही. दुसरे दिवशीं तर खुद्द त्याच्याच तंबूवर वंडवाल्यांनी अेकाअेकी गोळीवार सुरू केला होता. ४ तारखेला त्यांनी काही ज्वालाग्राही वोटी अयोध्येच्या पुलाला जाळण्यासाठी गंगेच्या प्रवाहात धाडून दिल्या ता. ५ ला तर त्यांच्या तोफखान्यांनी अिंग्रजाचे सर्व सैन्यावर असा मारा करण्यास आरंभ केला की, सर कोलिनला तळ मोडून सैन्याची पुष्कळशी हालचाल व अिंग्रजी तोफांतुन बराच वेळ गोळा फेकणें वंद करणें भाग पडले. वंडवाल्यांनी हीं धिटाअीची केलेली रणारूयानें आजपर्यंत मुकाट्याने अैकण्याची सर कोलिनला जी पाळी आलेली होती ती ह्या ५-च्या तारखेनंतर मात्र येणारी नव्हती. कारण आता त्याने त्याच्या सैन्याची अुत्तम अेकवद्धता करून मार्गातील सर्व अडचणी दूर केलेल्या होत्या. व म्हणून दिवसे दिवस प्रत्यक्ष अिंग्लिश कमान्डर-अिन-चीफचे तंबूवर गोळीबाराची चेंडूफळी खेळत चमणाऱ्या हट्टी, धीट व अुद्दाम वंडवाल्याशी ता. ६ रोजी आपण होअूनच निकर

३. Malleson, Vol. II, page 184.

करण्याचा त्याने निश्चय केला. या वेळेस बंडवाल्याकडे सुमारे नऊ-दहा हजार लष्करी शिक्षण मिळालेले शिपायी असून त्यांच्या डाव्या बाजूकडे खुद्द नानासाहेब, अुजवीकडे ग्वाल्हेरचें सैन्य व त्या सर्वांवर तात्या टोपे हे सेनापति झालेले होते. अिंग्लिशांकडे अेकंदर गोरी व काळी मिळून पांच हजार पायदळ, सहाशें घोडेस्वार व ३५ तोफा मिळून सुमारे ६००० लोक अितकी फौज सज्ज झालेली होती. चार्लस वॉल म्हणतो ७५०० फौज होती व त्या सर्वांवर खुद्द कमान्डर-अिन-चीफ सर कॉलिन हे सेनापतित्व करीत होते.

सर कॉलिनने बंडवाल्यांची अुजवी बाजू असंरक्षित ठिकाणी पडलेली आहे हें पाहून ता. ६ डिसेंबरला सकाळी ९ वाजता प्रथमतः लढाअीचें तोंड लुंपविलें. अुजव्या बाजूवरच आपण मुख्य हल्ला करणार आहोत हें दर्शविण्याकरता डाव्या बाजूवरच अिंग्रजी तोफा प्रथम गोळा फेकू लागल्या व त्यामुळे बंडवाल्याचें लक्षही तिकडे वेधलें. ग्रेटहेडने बंडवाल्याच्या मध्यावरही अेक खोटाच हल्ला चढविला. अशा रीतीने तिकडे लवकरच गोळीबारांच्या भयंकर धडाडीत ते पृथ्वी कंपित करूं लागले असता अिकडे अुजवीकडे लपत छपत येअून अिंग्रजांनी बंडवाल्यावर खराखुरा हल्ला अत्यंत निकराने चढविला. शीख लोक व गोरे लोक तीरासारखे चालून येत असता त्यांजवर ग्वाल्हेरचे सैन्याने तोफांचा भयंकर मारा सुरू केला. त्याचप्रमाणे पांडव सेनेच्या बंदुकाही आंग्लसेनेवर आगीचे लोळ ओकू लागल्या. शीख लोक 'डबल मार्च' करून धावत येताच बंडवाल्यांची व त्यांची अेक अर्धा तासपर्यंत सडाजंगीची कुस्ती चालली. अितक्यात पीछेचे लोक तोफ घेअून जेव्हा तिथे आले तेव्हा बंडवाल्यांची अुजवी बाजू हटू लागली. अेकदा ती हटू लागल्यावर मग अिंग्रजी सेनेच्या जोरास विचारतोच कोण? त्यांनी लवकरच त्यांच्या बाहेरच्या सैन्याची वाताहत अुडविली. त्याच्या तोफा पकडून घेतल्या व त्यांची सर्व छावणीही काबीज केली. बंडवाल्याच्या अुजव्या बाजूकडे सर कॉलिनला असा परिपूर्ण विजय प्राप्त झाला. परंतु त्याची मनीषा अितक्यानेच शांत होणारी नव्हती. ह्या अुजव्या बाजूकडे काल्पीचा रस्ताही अडवून टाकून त्याच्या मनात सर्वांना ससैन्य मरण आणावयाचें होतें. म्हणून त्याने काल्पीच्या रस्त्यावर मॅन्सफील्डला तातडीने धाडून दिलें. या दिवशी अेशियाटिक लोकांबद्दल असलेला पाश्चात्य लष्करी सिद्धान्त त्याच्या विधिनिषेधात्मक अुभय स्वरूपातही प्रत्ययास आलेला होता. बंडवाल्याच्या मध्यावर ग्रेटहेडने जो हल्ला केलेला होता तो अितका पोकळ होता की, जर बंडवाल्यांनी त्याच्यावर; तरीगरच अेकदम आघात केला असता तर त्याची मोड मोडून त्यामुळे तो सर्व दिवस पालटला असता. परंतु अिंग्रज मात्र रीतीने धडक देत देणार बंडवाले धाकाने दबू लागले. आघातक पद्धतीचा अवलंब करताच व हिंमतीचा देखावा दाखविताच अेशियाटिक लोक घाबरतात हा विधिपक्ष जर मध्यावर सिद्ध केला तर अिकडे बंडवाल्याच्या बाजूकडे त्याच सिद्धान्ताचा निषेध पक्षही प्रत्ययास आलेला होता. कारण मॅन्सफील्ड-

पाशी पुरेसें सैन्य असूनही तो बंडवाल्यांच्या डावीवर आघात करीत तुटून न पडता डावपेचाने लपत टपत यमतोंवर दिसताच बंडवाले निरजोर होऊन त्याच्यावरच तुटून पडले ! व ह्या मॅन्सफील्डच्या स्थिर पद्धतीने सर कोलिनची अर्धी मनीषा अपूर्ण राहिली. कारण तात्या ससैन्य धरण येण्याचा संभव आता दुर्मिळ झाला. तो मराठा सेनापति तात्या टोपे मॅन्सफील्डला दटावीत दटावीत ब्रह्मावर्ताकडे अिंग्रजी जाळें तोडून तोफांसुद्धा व सैन्यासुद्धा पार निघून गेला होता ! तात्यास धरूं पाहतो ! सर कोलिन, ह्या मराठी वाघास धरावयास तुला अजून रक्ताळलेल्या आतड्यांची अशी कितीतरी जाळीं पसरावीं लागतील !

या दिवशी बंडवाल्यांच्या तोफासुद्धा तात्या टोपे जरी निसटून गेलेले होते तरी त्यांचे मागोमाग होप ग्रँटने स्वारी केली. ता. ९ डिसेंबरला शिवराजपुराजवळ तात्यांचे सैन्याशीं त्याची पुन्हा अेक पळती चकमक अुडाली व त्यातूनही तात्या व त्याचें सैन्य जरी निसटलेंच तरी बंडवाल्यांच्या बहुतेक तोफा अिंग्लिशांच्या हातीं पडल्या. ह्याप्रमाणे सर कोलिनने ता. ६ ते ता. ९ या चार दिवसामध्ये विन्डहॅमचे पराजयांचा सूड अुगविला, बंडवाल्यांच्या ३२ तोफा काबीज केल्या व त्यांच्या सैन्याची साखळी तोडून टाकून काही काल्पीकडे व काही अयोध्येकडे घालवून दिले. ह्या कठीण विजयानंतर यांचे सोपे विजयही त्यानी कां मिळवू नयेत ? अेतदर्थ, तो ब्रह्मावर्तास दौडत गेला, तेथील राजवाडा त्याने धुळीस मिळवून टाकला. तेथील मालमत्तेची लूट केली व नंतर ह्या सर्व विजयावर कळस चढविण्याकरिता ब्रह्मावर्ताचीं टोलेजंग देवालयें फोडून अुद्ध्वस्त करून टाकलीं.

या ब्रह्मावर्ताच्या वाड्यातच सत्तावनच्या स्वातंत्र्यसमराचा गर्भसंभव झालेला होता. आणि ह्या ब्रह्मावर्ताच्या देवालयांनीच ह्या स्वातंत्र्यगर्भावर आशीर्वचनें वर्षिलेलीं होतीं ! याच ब्रह्मावर्तास भारतभूमीचीं देदीप्यमान वीररत्नें नाना, तात्या, बाळाराव, झाशीची 'छबेली' वाढून लहानाचीं मोठीं झालेलीं होतीं. रायगडावरून कडेलोट झालेलें मराठ्यांचे राज्य अिंग्रजांच्या रक्तकर्दमातून ज्या दिवशी येथे पुनःप्रादुर्भवन पावले त्या दिवशीं या वाड्याने व या देवालयानी दीपोत्सव केलेला होता !

परंतु त्या दीपोत्सवाच्या आगींनेच आज ते भस्मीभूत झालेले आहेत. पण अितिहासा, त्यांच्या या पवित्र भस्मावर अेक अश्रूही गाळू नकोस ! स्वातंत्र्याचे तेजोमय गर्भाला अुद्भव देत असताना त्या अुदात्त प्रसववेदनेनें जे वाडे व जीं देवालयें मरण पावतात त्यांचे मरण, गुलामगिरीची लेंढारें प्रसविणाऱ्याना वाड्याच्या व देवालयाच्या अस्तित्वापेक्षा सहस्रपटीने अधिक चैतन्यदायी होते ! प्रेताच्या ताटीला लागण्यापेक्षा यज्ञीय हुताशनांत हविर्भूत होणारें काष्ठच सहस्रतेने अधिक चैतन्यदायी असतें !

* * *

प्रकरण सातवें

# लखनौचा निःपात

तात्या टोपेनी कानपूरकडे चालविलेल्या भयंकर गडबडींना असा बंधारा घातल्यानंतर मग सर कोलिनने बंडखोर प्रदेशाचा पुनर्विजय करण्यास कंबर कसली. दिल्ली जिकल्यानंतर तेथून खाली अलिगडपर्यंतचा प्रदेश शांत करीत सीटन हा अलिगडाला आलेला होता. म्हणून आता कानपूरपासून वर अलिगडापर्यंत प्रदेश शांत करण्याकरिता वालपोलला काल्पी रस्त्याने धाडण्यात आलें. वालपोल कानपूरपासून वर चढत व सीटन अलिगडपासून खाली उतरत त्या दोघांनी मैनपुरीला भेटावें व अशा रीतीने दुआबाचा यमुनाकाठ पूर्णपणे पुनर्जित व्हावा, आणि यमुनातीराने हीं सैन्यें जात येत असता दुआबाच्या गंगातीराने खुद्द सर कोलिनने फत्तेगडापर्यंत चढत जावें असा आंग्ल सैन्याचा नकाशा रेखाटला गेला. या नकाशाप्रमाणे दुआबमधील बंडवाले हटत हटत फत्तेगडाकडे जमूं लागतील हें अघडच होतें आणि अेतदर्थ सरतेशेवटी वालपोल, सीटन व कोलिन ह्या आंग्ल सैन्याचे त्रयीने आपआपल्या मोहिमा संपवून फत्तेगडावर अेकत्र व्हावें हें ओघानेच प्राप्त होणारे होतें. सन १८५८च्या ह्या येत्या वर्षात साधारणपणे हें कार्य पुरें व्हावें हा अिंग्रजी बेत होता.

ह्या नकाशाप्रमाणे वालपोल हा तोफखान्यासुद्धा सर्वांगपूर्ण गोरें सैन्य घेअून कानपूरहून १८ डिसेंबरला काल्पीरस्त्याने वर चालला. वाटेमध्ये ठिकठिकाणी बंडवाल्यांच्या तुरळक सैन्याशी लहान लहान चकमकी देत, बंडखोराना आश्रय दिलेल्या गावांवर अिंग्रजांचा ठराविक सरसकट सूड अुगवीत, व अशा रीतीने तो प्रदेश पुन्हा पूर्णपणे ब्रिटिश अंमलाखाली आणीत तो अिटावा शहरापर्यंत चालत आला. आणि तेथूनही तसाच पुढे गेला असता परंतु ह्या अिटावा शहरातील सर्व बंडवाले निघून गेल्यानंतरही त्याला तेथे ससैन्य थांबणे भाग पडले. कारण काय असावें बरें ! अिंग्रजाचें हें बलवान सैन्य अेकदम थबकून रहावें असें काय झालें ? बंडवाल्याचे हजारो पायदळ तर चालून आलें नसेल ? किंवा पाडध सेनेची चपल घोडेस्वाराची मांदी तर अिंग्रजावर हल्ला करीत नसेल ? किंवा त्याचा गडगडणारा तोफखाना तर अिंग्रजांवर जळजळीत विस्तवाचा पाअुस पाडीत नसेल ?

यापैकी अिटाव्यापाशी काहीही घडत नव्हतें ! पायदळाची हजारो घोडेस्वाराची मांदी, किंवा तोफखान्याचा विस्तव यापैकी काहीही अिंग्रजांना थबकून ठेवण्यास अिटाव्यापाशी सजलेलें नव्हतें ! फक्त अेक तीस-चाळीस हिंदी योद्धे त्या शहरातल्या लहानशा अिमारतीत अुभे राहिलेले आहेत ! त्या अिमारतीवर छप्पर असून तिच्या भिंतीला गोळीबाराची भोकें दाखविलेली आहेत ह्या लहानशा अिमारतीत अुभे रहाणाऱ्या—हातात अेकेक मस्केट व हृदयात अेकेक जळती ज्योत घेतलेल्या—या तीस

केव्हा हजारापर्यंत लोक चराचर कापीत चलावें ! हें ह्या पळपुट्याचें मरणें व तें त्या अिटाव्याचें मरणें ! जमीन अस्मानाचा फरक !

फत्तेगडला नानांचा कट्टा मदतगार नादीरखान ह्याला नेटिव्ह लोकांच्या समक्ष फाशी देण्यासाठी नेला. फाशीवर चढताच तो लोकांस शेवटचा अुपदेश म्हणून म्हणाला : " Calling upon the people of India to draw their swords and assert their independence by the extermination of the English. " ह्या पराभावाचें प्रत्यंतर फरुकाबादच्या नबाबास लवकरच भोगावें लागलें. त्याची राजधानी, किल्ले, युद्धसामग्री ब्रिटिशांचे हातात पडली व अुरले सुरले सर्व बंडवाले त्याचेबरोबर रोहिलखंडात गंगापार हुसकले गेले. जानेवारीच्या ४-थ्या तारखेला ज्या वेळेस सर कोलिन फत्तेगडात विजयासह प्रवेश करिता झाला त्या वेळेस सर्व दुआब व बनारसपासून वर मीरतपर्यंत सर्व भूप्रांत ब्रिटिश सैन्याचे पूर्ण अंकित झालेला होता.

तेव्हा आता असा प्रश्न अुपस्थित झाला की दुआबच्या विजयानंतर ब्रिटिश सैन्याचा कार्यक्रम काय ठरवावा ? दुआबमधल्या बंडाच्या ज्वालाविप्रलयाने अितर प्रांतांतील बंडें आपोआपच अुपशम पावतील ही अिंग्रज सरकारास काही काळापूर्वी असलेली आशा हल्ली पूर्णतेने विफल झालेली होती. दिल्ली पडली की आठ दिवसांचे आत बंडाची राख होअून जाअील म्हणून मोठमोठ्या राजकारणकुशलांनी भविष्यें केलेलीं होतीं. परंतु वस्तुस्थितीत दिल्लीपतनाने बंडाची राख होण्याचे अैवजी त्या भविष्यांची राखरांगोळी झाली कारण दिल्लीला तुडून पडलेला सेनासमूह तें शहर पडताच अेका अुन्मत्त जलौघासारखा घोंघावत अितस्ततः धावत चालला. बख्तरखानाचे हाताखाली रोहिल्यांची फौज, वीरसिंगाचे हाताखाली नीमचची फौज, व आपआपल्या सुभेदाराच्या हाताखाली अितर पराभूत फौजा अिंग्रजांना शरण रिघण्याअैवजी दिल्ली पडताच अपमानाच्या संतापाने जास्तच वाढू लागून दिल्लीला हुकलेला सूड दुसरीकडे कोठेतरी अुगविण्यासाठी निघाल्या.[२] पराजयाची बंडवाल्यांना आता क्षिति अुरलेली नव्हती. विजयाच्या आशेचा पहिला भर यहावून गेला होता. आता त्यांच्या हृदयाला निश्चयाचें दाढर्य आलेलें होतें वाटेल तें झालें तरी अिंग्लिशांशी लढत रहावयाचें, याशिवाय दुसरा विचारच त्यांनी स्पर्शू दिला नाही अेकतर फिरंगी तरी मेला पाहिजे किंवा आपण तरी मेलो पाहिजे. ह्या दोहोंपैकी कोणतेंही अेक जोपर्यंत होणार नाही तोपर्यंत शस्त्र खाली ठेवणें नाही, असा त्यांचा बाणेदार निर्धार झालेला होता. ते आपआपसांत भांडत होते, त्यांच्यापैकी काही व्यक्ति

२. "अेकदा दिल्लीला अशी अफवा अुठली की श्रीमंत नाना स्वतः दिल्लीवर चालून येअून बादशहास सोडवून नेणार आहेत ! ही वार्ता अैकताच दिल्लीचे अिंग्रजी अमलदारांनी बादशहाचे कैदेवरील मुख्य अधिकाऱ्यास सक्त ताकीद दिली की अशी नानाची गडबड खरोखरच सुरू झाली तर त्याने अेकदम बादशहाला गोळी घालून ठार मारावें." —Charles Ball, Vol, II, page 94.

लोभाने बेबंदशाही करीत होते, काही मरणाचे भयाने केव्हा केव्हा पळत होते, परंतु अिंग्रजाशी लढाअी मोडून देण्यास मात्र त्यांच्यापैकी कोणीही कबूल नव्हते ! आणि अेकतर फिरंगी किंवा अेकतर आपण—कोणा अेकाचा पूर्ण निःपात झाल्याशिवाय तरवार ठेवणें नाही हा निर्धार जर कधी प्रत्येक बंडवाल्याच्या आवळलेल्या दातावर, आसडलेल्या भिवयांवर व आठी घातलेल्या कपाळावर स्पष्टतेने लिहिलेला असेल तर तो आता दुआबातील पराजयानंतरच होय ! याच वेळी लढाअीत पकडून फाशीवर चढविल्या जाणाऱ्या शिपायांस अिंग्रजी अधिकाऱ्यांनी या युद्धाबद्दल केलेल्या प्रश्नास त्यांनी अुत्तर केलें " फिरंग्यास मारणें हीच धर्माज्ञा आहे ! आणि याचा शेवट ? सर्व अिंग्लिशांचा नि.पात आणि सर्व शिपायांचा नि.पात ! पुढे जी प्रभूची अिच्छा ! "[३]

दिल्ली पडल्याने बंडवाल्यांची स्वातंत्र्य चेतना खंगावयाचे अैवजी ती अशी जास्त जास्तच पेटत चालली. आणि दिल्लीचा सूड घेण्यासाठी ते लखनौ व बरेली या दोन शहरी लढत चालले. कारण दुआब जिंकल्यानंतर रोहिलखंड व अयोध्या हे दोन प्रांत अजून बंडवाल्यांच्या पूर्ण ताब्यात असून तेथे त्यांची राजसिंहासनें चापून राज्य करीत होतीं. तेव्हा ब्रिटिश सेनेचा आता मुख्य प्रश्न म्हणजे या दोन प्रांतांस पुन्हा जिंकून घ्यावयाचे हा होता. या प्रश्नाचें अुत्तर सर कोलिनने असें दिले की प्रथम रोहिलखंड जिंकावें व मग लखनौचा समाचार घ्यावा. लॉर्ड कॅनिंगचा असा आग्रह पडला की, प्रथम लखनौचे जंगी केंद्र अुद्‌ध्वस्त केले असता बंडवाल्यांचीं दुसरीं लहान लहान शहरें आपोआपच शरण येतील. लॉर्ड कॅनिंगच्या हुकुमाप्रमाणे वागणें भागच असल्याने कमान्डर-अिन-चीफ सर कोलिन ह्याने प्रथमतः लखनौचा नि.पात करण्याचा निश्चय कायम केला. फत्तेगडला सीटन व वालपोल व कोलीन याच्या मागच्या बेताप्रमाणे अेकत्र झालेल्या फौजाची संख्या अेकंदर दहा अकरा हजारापर्यंत होती. दुआबमध्ये मुख्य मुख्य ठिकाणीं संरक्षणासाठी थोडी थोडी ब्रिटिश फौज ठेवून व आग्र्याहून आलेली नवी कुमक बरोबर घेअून सर कोलीन कानपूरहून आलेला सेनासागर घेअून लखनौवर चालला.

या वेळच्या अिंग्रजी सेनेचे वर्णन अिंग्रजी ग्रंथकार असे देतात : " अुनाव व बुन्नी या स्थलामधील वाळवंटावर त्या वेळेस अुतरलें होते तसें ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानातील मैदानात पूर्वी क्वचितच जमलेलें असेल ! अिंजिनिअर, तोफखाना, घोडे, पायदळ, रसदेच्या गाड्या, बाजारबुणगे असें अपूर्व ब्रिटिश सैन्य सर्वांगपूर्णतेने थाटून राहिलेलें होते. त्यात १७ बटेलियन पायदळाच्या असून त्यापैकी पधरा गोऱ्या होत्या, २८ स्क्वाड्रन घोडेस्वाराच्या असून त्यात चार गोऱ्या रेजिमेंट्स होत्या,

[३]. The slaughter of the English is required by our religion. The end will be the destruction of all the English and all the sepoys—and then the God knows ! "—Charles Ball, Vol. II, p. 242

थाळीस लोकांनीच अिटाव्याच्या दाराशी या अिंग्रजी चतुरंग सेनेला मज्जाव केलेला आहे! त्यांनी या अिंग्रजी तोफखान्यासह अिटाव्याच्या तटाशी भिडलेल्या अिंग्रजी सेनेला रणांगणावर 'युद्धं देहि' म्हणून निकराची मागणी चालविली आहे! अिटाव्याचे दारात पाय ठेवणारास 'युद्धं देहि' ची दस्तुरी द्यावी लागते! युद्धं देहि! जिवाची पर्वा वाळवून हे असामी पलायनाचे मार्ग खुले असताही त्या अिमारतीत हट्टाने अुभे राहून अिंग्रजांस म्हणू लागले 'युद्धं देहि'! आता या टीचभर अिमारतीत बसलेल्या या मूठभर लोकांशी अिंग्रजांच्या घोडेस्वारांनी, पायदळांनी, तोफखान्यांनी युद्ध तें तरी काय द्यावयाचें! आणखी थोडी वाट पहावी म्हणजे या वेडगळ मार्गाला सोडून हे मायेफिरू युद्धीवर येतील व अजून खुली असलेली पलायनाची वाट धार्तील! परंतु कितीही वाट पाहिली तरी त्यांचें फिरलेलें माथें ठिकाणी येअीना! ठीक आहे तर, द्या युद्ध द्या! नुसत्या आपल्या तोफखान्याला अेकदा त्यांना दाखविणें म्हणजेच त्यांच्याशी युद्ध देअून त्यांचा पराभव करणें आहे. म्हणून अिंग्रजी सैन्याने आपला जबडा अुघडून त्या मायेफिरूंना भय दाखवून पाहिले.

भय? भय कोणाला? ज्याने अेकदा दिव्य स्वातंत्र्यासाठी स्वातंत्र्यलक्ष्मीच्या चैतन्याने मोहित होअून मरणाशीच स्नेह केला—मृत्यूचें भय सांडलें—मृत्यूसाठी जो हपापून राहिला—त्याला भिवविण्यासाठी या जगात कोण समर्थ आहे? जो जयासाठी लढतो तो भिअील, जो कीर्तीसाठी लढतो तो भिअील, परंतु जो मरणासाठीच लढतो त्याला कोण भिवविणार आहे? शहीदला कोण अडथळा करू शकणार आहे? पृथ्वीवरील सर्व निखारे आणि आकाशातील सर्व विजा ह्या अेकसमयावच्छेदाने जरी त्यावर कोसळल्या तरी त्याला प्रिय असलेली वस्तु अधिक त्वरेनें प्राप्त करून घेण्यासाठी ज्याचे पाय वळतात त्याचें अधिक काय वाकडें होणार आहे? ज्याने अेकदा मरणाची आशा धरली त्याला मग जगात निराशा अुरली नाही! प्रियेकडे प्रियतम जसा धावत जातो तसे ते मरणाकडे धावत जातात, अशा ह्या अिटाव्याच्या देशवीराना भय कसले नि कोण दाखवू शकणार?

आणि म्हणून त्यांनी पलायनाचे अुघडे असलेले मार्ग सोडून दिले. त्यांनी विजयाची लवलेशही कल्पना बाळगली नाही आणि अिंग्रजांच्या चतुरंगसेनेला धिक्कारीत हे मूठभर लोक त्या अिमारतीतून 'युद्धं देहि' म्हणून गर्जना करू लागले! दिल्लीच्या तटाला भिअून जें थांबले नाही, कानपूरच्या रणास भिअून जें थांबलें नाही तें अिंग्रजी सैन्य या टीचभर अिमारतीपुढे ठेचाळून अेकदम थांबलें! !

मॅलेसन लिहितो, "सशेने मूठभर, फक्त मस्केट काय ती जवळ, परंतु त्याच्या मध्ये निराशेच्या अवसानाहूनही अेक जास्तच निकराचें अवसान भरलेलें होते. त्यांच्या ध्येयास्तव आत्मार्पण करण्यासाठी ते मृत्यूची लालसा करीत होते! वालपोलने त्या जागेची पहाणी केली अेका सैन्याने धावून रहावें असे त्या जागेत काहीच नव्हते तिला मारा करून घेणें अगदी सुलभ होतें. परंतु तिच्या आत असलेल्या

लोकांवर मारा करणें म्हणजे कितीतरी मनुष्यांचे बळी द्यावे लागते. म्हणून युक्त्या प्रयुक्त्या चालू झाल्या. त्या सर्वांचें वैफल्य लक्षात आल्यानंतर मग गवत पेटवून देऊन त्याना आतल्याआत भाजून काढण्याचा प्रयत्नही झाला. परंतु सर्व व्यर्थ! त्या भिंतीच्या भोकांतून त्या निर्धारी योद्धयांनी हल्ला करणारावर असा संतत व अचूक मारा चालविला की तीन तासपर्यंत अिंग्रज त्या अिमारतीला स्पर्श करू शकेना! शेवटी ती जागाची जागा सुरुंग लावून अुडवून देण्याचें ठरलें. अिंजिनिअर लोकांनी सुरुंग खणला व त्याला वत्ती दिली. The explosion of this conferred on the defenders the martyr's honour they coveted. It buried them in the ruins!"[१] सुरुगानें ती सर्व अिमारत आकाशांत अुसळली आणि मग तो खाली कोसळली–जिच्या अुसळण्यात आणि कोसळण्यात त्या देशवीरांना ज्याची अत्यंत अुत्कटता लागली होती तो शहादतीचा मान मिळाला! ते सर्वजण जागच्या जागी ठार झाले!

आणि त्या दिवसापासून मरावें कसे ह्या विषयावर ही अिटाव्याची पवित्र समाधि अहोरात्र आपल्या मूकपणानेच भयंकर व्याख्यानें देत असते! अिटावा! शूर अिटावा! थर्मापिलीच्या पहाडात, जिटलीतील ब्रेशाच्या तटबंदीत किंवा नेदर्लंडस्च्या डी रुटरच्या कलेवरात तुझ्याहून अधिक तेजोमय तें काय असणार आहे? अिटावा! शूर अिटावा!!

अिटाव्याहून वालपोल येतो आहे तो सीटनही अलिगड, कादगंज मिनपुरी वगैरे ठिकाणी वडवाल्यांच्या किरकोळ सैन्याला मार देत खाली अुतरत होता. या दोन्ही सैन्याची गाठ ता. ३ जानेवारी सन १८५८-ला मिनपुरी येथे पडली. पूर्वीच्या कार्यक्रमाप्रमाणे दुआवाचें यमुनातीर ब्रिटिश सैन्याने दिल्ली मीरतपासून अलाहाबादेपर्यंत परत जिंकून घेतलें. अिकडे गंगातीराने चढत जाअून फत्तेगडच्या नबावास शासन करून व दुआवातील वडवाल्याचा तो शेवटचा आश्रय अुधळून देअून दुआवचा सर्व प्रदेश निर्वैर करण्यासाठी कानपूरहून सर कोलिनही फत्तेगडाकडे चाललेला होता. या दोन्ही बाजूनी वर चाललेल्या ब्रिटिश सैन्याने अलिगड, अिटावा, मिनपुरी वगैरे ठिकाणचे अेकूण अेक वडवाले वर हुसकीत फत्तेगडात कोंडून टाकले. फत्तेगडाला फरकाबादेच्या नबाबानी आपले स्वातंत्र्य जाहीर केलें असल्याचे मागे सांगितलेलेच आहे. त्या नबाबाच्या सैन्याशी अिंग्रजी कमान्डर-अिन-चीफच्या बऱ्याच झटापटी झाल्या. फत्तेगडाकडे दिल्लीहून व कानपूरहून पराभव पावलेल्या शिपायांचाच फार भरणा असल्यामुळे त्यानी लढाअीचें तोंड लागताच मरणाचे भयाने धूम ठोकावी. परंतु ते मरण तरी ह्या अपमानाने टळत होते का? तर तेही नाही! त्यांनी पळ काढताच अिंग्रजानी त्यांचा पाठलाग करून सहाशे, सातशे, केव्हा

१. Malleson, Vol. IV, page 201.

५४ हलक्या तोफा व ८० जड तोफा होत्या !" अुन्मत्त अयोध्येला पदनत करण्यासाठी फेब्रुवारीचे २३-वे तारखेस कानपूर सोडून आपल्या ह्या मवल सेनेसह सर कोलिन कॅंपबेल पुन्हा अेकदा गंगा नदी अुतरू लागला !

– अयोध्येला पदनत करण्यासाठी, हे गंगानदी, ही कितवी आंग्ल सेना तुझ्या तीरावर अुतरलेली आहे ? आणि हे मानिनी अयोध्ये, ह्या सेनेला तरी भिअून तू आता पदनत होणार आहेस कीं नाहीस ?

सर कोलिन वाटेतील हिंदु देवालयांना सुरुंग लावून अुद्ध्वस्त करीत पुढे येत आहे याची पूर्ण कल्पना अयोध्या शहराला आलेली होती. परंतु आपल्याला पदनत करण्यासाठी ही अिंग्रजी सेना गंगा नदी अुतरत आहे ह्याचें त्या मानिनी अयोध्येला विशेषसें वाअीट वाटत नव्हते. तिला जें वाअीट वाटत होतें, ज्या दिशेकडे पाहून ती ढळढळा अश्रु गाळू लागली होती व पराजयाच्या मृत्यूची सावली तिच्या अभिमानी, चेहऱ्यावर जिकडून पडलेली होती तिकडून कोणी अिंग्रजी फौज चालून येत नसून तिकडून जंगबहादुरची नेपाळी फौज चालून येत होती. अिंग्रजी फौज आपल्यावर चालून येत आहे ह्याचें वाअीट वाटण्याअितकी अयोध्या नामर्द असती तर तिने रणांगणात हें भैरवरूप धारण केलेंच नसतें. अिंग्रजी सत्तेला झिज्या घरून वडवीत वडवीत ज्या दिवशी अयोध्येने आपल्या धरातून हुसकून दिलीं त्याच दिवशी त्या अिंग्रजी सत्तेचा कैवार घेअून कोणीतरी अिंग्रजी सेना आपल्यावर चालून येअील हें तिला स्पष्टतेने माहीत होतें आणि त्या आगामी रणासाठी ती आपल्या सहस्र भुजांनी सशस्त्र होअून रणात अुतरलेली होती. परंतु अयोध्येला जें पूर्वी माहीत नव्हतें तें हें होय की जंगबहादुरची नेपाळी फौजही मजवर चालून येअील ! तिला हें ठाअुक होतें की माझे शत्रु अिंग्रज हे माझ्यावर तरवार चालवितील, परंतु तिला हें ठाअुक नव्हतें की माझे मित्र—माझे सहोदर मजवर कुऱ्हाडीचे घाव घालू लागतील ! अिंग्रजांशी कुस्ती खेळण्यास ती तयार होती–परंतु हिंदुस्थानच्या अेका स्वकीयाशीही हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी झुंज द्यावी लागेल हे तिला माहीत नव्हतें. आणि ह्या अुदाहरणाचे आविष्करण करण्यासाठी जेव्हा जंगबहादूर ह्या आपल्या नेपाळी फौजेसह तिच्यावर स्वारी करीत निघाला, तेव्हा अैनमसमयी विश्वासघात पावलेली ती स्वजनपरित्यक्त अयोध्या त्या जंगबहादुरच्या दिशेकडे पहात पहात ढळढळा अश्रु ढाळू लागली !

कारण दुआबमधील विस्तीर्ण अिंग्रजी सेना अेकत्र करून तिच्यामुद्दा ज्या वेळेस सर कोलिन हा गंगानदी अुतरून लखनौकडे चालू लागला त्याच वेळेस पूर्व दिशेकडून आपल्या नेपाळी फौजेसुद्धा जंगबहादुरही अिंग्रजी सैन्याच्या मदतीसाठी तिकडेच चाललेला होता. अिंग्रज त्याचा स्नेही आणि हिंदुस्थानी त्याचा शत्रु ! काडतुसांना गाअींची चरबी लावणारे त्याचे स्नेही आणि ती चरबी तोंडाने चघळण्यास नाकारणारे हिंदुस्थानी त्याचे शत्रु ! असा हा अद्वितीय कुलांगार जंगबहादुर

हिंदुस्थानात हें स्वराज्ययुद्ध जुंपल्याचें अेकताच अिंग्रजांच्या बाजूस मिळालेला होता. सत्तावनचे किंचित् आधी ह्याने विलायतेची सफर केलेली होती व अिंग्रजी ग्रंथकार म्हणतात की, त्याने अिंग्लंडचें वैभव पाहिले म्हणूनच तो बंडात सामील होण्यास धजला नाही! अिंग्लंडचें वैभव खरोखरच का अितकें अवाढव्य होतें? पण अिंग्लंडचें वैभव प्रत्यक्ष पाहण्यासाठी जसा हा जंगबहादूर गेलेला होता तसाच नानांचा अझीमुल्ला व सातारचा रंगो बापूजीही गेला होता— आणि त्या वैभवाचा त्यांच्यावर काय परिणाम झाला आणि त्या वैभवाच्या प्रत्येक चिन्हामागे ते क्रांति-युद्धाच्या नवीन नवीन शपथा कशा घेत गेले हें अितिहास सांगतच आहे! तेव्हा अिंग्लंडच्या वैभवात काही विशेष नव्हतें. विशेषसें होतें तें पाहणाऱ्या नयनांच्या तेजात होतें. हें आंग्लवैभव पाहून त्याच्या देशाभिमानाला तळमळ लागली की, माझी मातृभूमि ही अशी स्वातंत्र्यतिलकांकित राणी झाली तर काय बहार होअील! देशद्रोहाला मळमळ सुटली की माझ्या आअीवर जर ह्या वैभवाचें वटीकपण मी लादीन तर मला दोन तुकडे जास्त मिळतील!!

आणि दोन तुकडे स्वतःला जास्त मिळविण्यासाठीच आपल्या मातृभूमीला वटीक करण्यास तयार झालेला हा जंगी बहादुर आपल्या नेपाळी फौजेला अिंग्रजां-कडे धाडता झाला. खाटमांडूहून प्रथमतः तीन हजार गुरखे लोक अयोध्येच्या पूर्व-भागी अझिमगड व जवानपूर ह्या प्रांतात १८५७-चे ऑगस्टमध्येच येअून अुतरले होते. त्यांच्याशी झगडा करण्यासाठी बंडवाल्याचा गोरखपूरचा पुढारी महंमद हुसेन हा सज्जखड्ग झाला होता. त्या वेळेस दुआबमधील लढाअीमुळे अिंग्रजांजवळ सैन्याची अतिशय ओढाताण झालेली असल्याने वेणीमाधव, महंमद हुसेन, राजा अिरादतखान वगैरे योद्धयांनी हा बनारसच्या भोवतालचा अयोध्येच्या पूर्वेकडील प्रांत पूर्णपणे काबीज केलेला होता. त्या प्रांतात अिंग्रजांचे सैन्य अितर ठिकाणाहून मोकळें होण्याचे आधीच नेपाळी फौजेने अत्यंत शूरपणा गाजवून बंडवाल्यांस अयोध्येकडे रेटीत नेलें. काही दिवसांनी जंगबहादुरशी ब्रिटिश सरकारचा शेवटचा निश्चित करार ठरून मग त्या प्रांतात तीन फौजा तयार करण्यात आल्या ता. २३ डिसेंबर रोजी खुद्द जंगबहादूर नेपाळाहून येअून अिंग्लिशांस मिळाला. अेकंदर नअू हजार गुरखे लोकांची निवडक फौज त्याचे बरोबर होती. त्या फौजेने ब्रिटिशाचा फ्रँक व रौक्राफ्ट ह्यांच्या हाताखालील फौजेसह बनारसच्या अुत्तरेस व अयोध्येच्या पूर्वेस असलेला सर्व प्रांत परत जिंकण्याची सिद्धता केली. अिंग्रजांच्या व गुरख्यांच्या ह्या सबल व संघटित सैन्याने लढाअीवर लढाअी देत त्या प्रांतातील बंडवाल्यांस मागे मागे हटवीत नेलें. व आता फेब्रुवारीच्या २५-व्या तारखेला तर ते अयोध्येतही प्रवेश करू शकले.

घोग्रानदी ओलांडून अयरपूरला ही नेपाळी व अिंग्रजी फौज येअून पोचली. त्या रस्त्यावर अेक बळकट किल्ला अशा महत्त्वाच्या जागी व अशा गर्द झाडीत अुभारलेला होता की तो बंडवाल्यापासून जिंकून घेतल्याशिवाय ब्रिटिश सैन्याला पुढे जाणें शक्य नव्हतें. म्हणून नेपाळी फौज त्या किल्ल्यावर चालून गेली. तो कि-

लढू लागला. त्या सर्वांगसिद्ध फौजेशी तो किल्ला लढू लागला, आणि त्या किल्ल्यास असा शर्थीने लढविणाऱ्या बंडवाल्यांच्या फौजेची संख्या किती होती? चौतीस! चौतीस लोक स्वातंत्र्याच्या स्फूर्तीने धुंद होऊन आपल्या देशाच्या शत्रूशी तो किल्ला लढवीत होते! नेपाळी फौजेने निकराचा हल्ला चालू केला असता, त्या चौतीस देशवीरांनीही त्याच्याशी निकराने तोंड दिलें! देशद्रोहाशी देशस्वातंत्र्याची निकराची झुंज जुंपली! अंबरपुराचें नांव सार्थक झालें! कारण चौतीस जणांनी शत्रूच्या हजारो सैनिकांशी युद्ध मांडावें असलें दिव्य समर ह्या जड पृथ्वीवरील कोणत्याही पुरापुढे होणें नाही! त्या चौतिसांनी देशाच्या अिभ्रतीसाठी व धर्माच्या आज्ञेसाठी तो किल्ला असा शौर्याने लढविला की शत्रूचे सात योद्धे ठार झाले व बेचाळीस जायबंदी झाले! असा तो किल्ला लढविला की त्या चौतिसातून तेहेतीस मेले तरी तो किल्ला लढतच होता! आणि जेव्हा तो चौतिसावा आपल्या स्थलावरून न हलता तो देशवीर धारातीर्थी पडला तेव्हाच काय ते शत्रू त्या किल्ल्यात जाऊ शकले! दिल्ली लढली नाही, लखनौ लढलें नाही, असा तो अंबरपूरचा किल्ला लढला! [४]

अंबरपूरचा किल्ला काबीज केल्यानंतर हें गुरख्यांचें व अिंग्रजांचें संयुक्त सैन्य तेथील प्रदेश जिंकीत जिंकीत पुढे झालें. त्यांचेच मागोमाग जनरल फ्रँक हाही सुलतानपूरचा नाझीम मेहंदी हुसेन व त्याचा कमान्डर बंदा हुसेन, ह्यांच्याशी सुलतानपूर व बुदायन वगैरे ठिकाणी लढाया देत वर अयोध्येकडे चढत होता. अयोध्येच्या पूर्व भागातील या प्रदेशात बंडवाल्यांनी आजपर्यंत जी सत्ता चालविलेली होती तिचा वरील फ्रँकने केलेला मोड पुन्हा सावरून घेण्यास लखनौच्या पूर्व रियासती. तील तोफखान्यावरचा प्रसिद्ध अंमलदार मिर्झा गफूर बेग ह्याला लखनौ दरबारातून धाडण्यात आला त्याच्या हाताखाली अेकत्र झालेल्या सैन्याचाही सुलतानपूरच्या जंगी लढाअीत ता. २३ फेब्रुवारीला पराजय झाल्याने जनरल फ्रँक पूर्णपणे यशस्वी झाला.

परंतु सर कोलिनला मिळण्याचे पूर्वी देवारच्या किल्ल्याला त्याने वेढा दिला. त्या किल्ल्याउ असलेल्या नूर लोकानी तोफा गेल्या तरी शत्रूशी झुंज सुरूच ठेवल्याने अखेर अिंग्रजी सेनेनहू फ्रँकला मागे फिरणें भाग पडले. वास्तविक पाहता फ्रँकने अितक्या लढाया मारलेल्या होत्या की, ह्या अेका आकस्मिक व छोट्याशा पराभयाने त्याचा काहीही तोटा होणारा नव्हता. तरी त्या वेळेस ब्रिटिश शिस्त व जबाबदारी अितकी करडया तऱ्हेने राखली होती की, फ्रँकच्या अनंत विजयानंतरही त्याच्या या अेका कमतीची वार्ता कळताच सर कोलिनने त्याचे महत्त्वाच्या बढती-साठी लिहिलेले नांव तावडतोब खोडून टाकले!

---

४. It was defended with so much vigour and resolution that the assailants lost, seven men killed and forty three wounded before they gained possession of it. The defenders died all at their posts." — Malleson's Indian Mutiny, Vol. IV, page 227.

अशा रीतीने त्या लखनौ शहरावर चालून जाणाऱ्या ह्या निरनिराळ्या सेना अेकमेकींच्या अगदी जवळ येअू लागल्या. कानपूरपासून निघालेली सर कॉलिनची प्रचंड सेना तिकडून पश्चिमेकडून येत असता फ्रँकची व जंग बहादुराची फौज अिकडून पूर्वेकडून वर चढत गेली. ता. ११ मार्चच्या आधी ह्या सर्व फौजा अेकत्रमिळाल्या व या पापी शहराची मान चरचर चिरण्यासाठी त्यांच्या तरवारी अगदी सरवारून राहिल्या!

पापी? नव्हे! नव्हे! फक्त अभागी लखनौ—त्याच्या मानेवर ह्या अितक्या स्वकीयांच्या व परकीयांच्या तरवारी सपासप अुड्या घेण्यास तरवारलेल्या असताना प्रतिकारासाठी तिकडे काही व्यवस्था चाललेली आहे का? कानपूरकडे तात्याटोपे काय गडबडीत आहे हें पाहण्यासाठी सर कॉलिन जेव्हा मागे नोव्हेंबरमध्ये धावत गेला तेव्हापासून आज मार्चपर्यंत या लखनौला त्याच्या संरक्षणासाठी व त्याच्या शत्रूच्या विनाशासाठी त्यांचे प्रयत्नावर प्रयत्न चाललेले होते. आजपर्यंत कित्येक वेळा तरी नानासाहेबांच्या कानपूरमधील पुनरुत्पतनांनी व अखंडित समरांनी त्याचें अप्रत्यक्ष संरक्षण केलेलें होतें. लखनौकडे सूड घेण्यासाठी ब्रिटिश सेना गंगा अुतरू लागली की नानांनी कानपूरकडून ताण देअून तिला दुआबात फरफरत ओढलीच. असा अुत्तम पेच नानांनी दिलेला असूनही त्याचा फायदा लखनौने घ्यावा तसा आजपर्यंत घेतलेला नव्हता.

लखनौमध्ये डौलाने डुलणाऱ्या स्वातंत्र्यध्वजाच्या रक्षणासाठी राजापासून रंकापर्यंत प्रत्येकजण हाती शिर घेअून लढत होता. त्यात कित्येक जमिनदार व राजेही सामील झालेले होते. लखनौचे जमिनदार केवळ अिंग्लिशांनी लादलेल्या शेतसारा पद्धतीमुळे असंतुष्ट होअून अुठलेले नव्हते; तर स्वदेशाला झालेला पापी फिरंग्यांचा स्पर्शच त्यांना चीड आणण्यास कारणीभूत झालेला होता. हें केवळ आमचेंच मत आहे असे नाही तर त्या वेळच्या गव्हर्नर जनरल कॅनिंगचेंही मत होतें, हें पुढील अुताऱ्यावरून सहजच कळून येअील :

"अयोध्येने राजे व जमिनदार केवळ आमच्या शेतसाऱ्याच्या नूतन पद्धतीमुळे दुखावले गेले होते असें आपणास कदाचित् वाटेल. परंतु माझ्या दृष्टीने त्यात दुसरीही अेक गोष्ट विचार करण्यासारखी आहे. चंदा, वेजा आणि गोंडा येथील राजांनी जो कडवट वैरभाव आमच्याविषयी धरला, तसा वैरभाव आमच्या दुसऱ्या कोणाही अकितानी वा मांडलिकानी धरला नसेल. चंदाच्या राजाचें अेकही खे" आम्ही घेतलेलें नाही. अितकेंच काय पण त्याची खंडणीही आम्ही कमी केलेली होती. वेजाच्या राजालाही सपच औदार्याने वागविण्यात आले होतें. गोंडाच्या राजाच्या चारशे खेड्यांपैकी अवघी तीन तर आम्ही घेतलीं होतीं. आणि त्याच्या बदलात त्याची दहा हजार रुपये खंडणीही कमी केली होती.

"राज्यपरत्वांमध्ये बदल झाल्यामुळे कोणाचाही झाला नसेल अितका लाभ

मौधान्याच्या तरुण राजाचा झाला. अिंग्लिश राजवट चालू होताच आम्ही त्याला अेक हजार गावें दिलीं; नि सर्व वारसदारांना दूर करून त्याच्या आधीलाच आम्हीं त्याचें पालक नेमलें. परंतु अगदी प्रारंभापासून तिचें सैन्य लखनौला आमच्याशी सामना देत आहे. दुराच्या राजाचाही या सत्ता संक्रमणामुळे लाभ झाला होता परंतु त्याच्या सैनिकांनी कॅप्टन हुमे याजवर चालून जाअून, त्याच्या स्त्रीला पकडून तिची लखनौच्या कारागारात पाठवणी केली.

"तालुकदार आश्रफ बक्षखान,—ज्याला पूर्वीच्या राजाने अतिशय छळलें होतें—त्याला आम्ही त्याच्या अुत्पन्नाचें पूर्ण स्वामित्व देअून टाकले. परंतु प्रथमपासूनच तो आमचें हाडवैर करू लागला. ह्या आणि दुसऱ्या अनेक अुदाहरणांवरून हें स्पष्टच कळून येतें की जे राजे आणि जमिनदार आमच्याविरुद्ध अुठले त्याला कारण आमच्या राजवटीमुळे झालेली त्यांची वैयक्तिक हानि हें मुळीच नव्हतें!"[५]

आणि म्हणूनच अिंग्लिश अितिहासकार होम्स याने प्रांजलपणाने मान्य केलेलें आहे की, ज्या राजांनी व जमिनदारांनी या स्वातंत्र्ययुद्धाला आरंभ करून ते लढविलें, ते लोक वैयक्तिक स्वार्थापेक्षा फार अुदात्त अशा तत्त्वांनी भारून गेलेले होते. असे कित्येक राजे व जहागिरदार होते की, ज्याना वास्तविकत: वाअीट वाटून घेण्यासारखें असें कोणतेंच विशेष दु:ख कारण नव्हतें, पण ते सुद्धा आमच्या राजसत्तेच्या—कायद्याविरुद्ध चरफडत होते. आमची राजवटच मुळी त्याना 'आपण जित राष्ट्र आहोत' या बोचक सत्याची आठवण करून देअी.[६]

पण या सर्वात प्रमुख तो फैजाबादचा देशभक्त वीर पुरुष अहमदशाह मौलवी कुठे आहे? क्रांतियुद्धाची ज्वलंत ज्योत हातात घेअून सर्व हिंदुस्थानभर आग लावीत चालला असता ज्याला लखनौच्या अिंग्रजी अधिकाऱ्यांनी पकडून फाशीची शिक्षा दिलेली होती, जो ती शिक्षा अंमलात येण्यापूर्वी फैजाबादच्या तुरुंगात नेण्यात आला व ज्याला या परकी तुरुंगाच्या कोठडीतून अुचलून सत्तावनच्या वादळाने अेकदम स्वराज्य सिंहासनाच्या पायरीवर नेअून ठेवले तो हा देशवीर अहमदशाह मौलवी आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी व आपल्या धर्माच्या प्रतिष्ठापनेसाठी रणरंगात रंगून राहिलेला होता! तो समरांगणात जसा शस्त्रयोद्धा होता तसाच तो सभांगणातील वाक्‌योद्धाही होता! सभांगणात आपल्या वाक्‌शौर्याने तो हजारो देशबंधूंना मंत्रबद्ध करीत असे. रणांगणात तो हजारो देशबांधवांसह शस्त्रयुद्धात शत्रूंना पाशबद्ध करीत असे. अलमबागेमध्ये चारहजार सैन्य व तोफांसह आअुटराम राहिला असता व तात्या टोप्याच्या पेचाने सर कॉलिन कानपूरकडे गुंतविलेला असताना लखनौने ही संधि साधून आपल्या शत्रूंना रणातून पिटाळून देण्यासाठी

५. Lord Canning's Reply to the letter of Sir James Outram.

६. Sepoy War, by Holmes.

निकराचा प्रयत्न करावा अेतदर्थ मौलवीने आपल्या लोकांना अुत्तेजित, संघटित व अेकीकृत करण्यासाठी अहोरात्र श्रम चालविले. अयोध्येची बेगम ही दरबारात मुख्य राजसत्ताधिष्ठित असताही तिच्या कर्तृत्वाने त्या लखनौ शहरी जमलेल्या हजारो भिन्नभिन्न राजामहाराजांचें अैकीभवन व संघटन होणें जेव्हा दुरापास्त आहे असें स्पष्ट दिसू लागलें, जेव्हा अिंग्रजांच्या मूठभर सैन्यास निकराने हल्ले करून गारद करण्याचे अनंत शुभप्रसंग लखनौच्या अंतर्गत बेदिलीने व हलगर्जीपणाने व्यर्थ गेले; व जेव्हा दिल्ली पडल्याने, कानपूर पडल्याने, फत्तेगड पडल्याने त्या त्या प्रदेशातील हजारो पराभूत बंडवाले लखनौकडे येअून जास्त अुत्तेजनाच्या अैवजी पूर्वीच्या बेशिस्तीत जास्त अुद्दामपणाचीच भर टाकू लागले व जेव्हा विजयाने फुगलेल्या व आता अगणित सैनिकांनी महत्पटीने सबलतर बनलेल्या अिंग्रजांचा शेवटचा अनिवार्य घाला नजीक आला आहे असा क्षणोक्षणी अुत्कट संभव दिसू लागला तेव्हा मग ह्या देशाभिमानी मौलवीने लखनौच्या दरबारात आपल्या वाक्तेजाने, आपल्या निर्भीड कडक टीकेने, आपल्या अप्रतिम कर्तृत्वबळाने कित्येक स्वकीयांची अंतःकरणें दिपवून टाकलीं व अजूनही अेकदिलाने व अप्रतिहत बलाने प्रयत्न केल्यास अिंग्रजांना रणांगणात चोप देणें शक्य आहे, हे लखनौच्या राजसभेत निकराने प्रतिपादन केलें; परंतु त्याच्या या तेजाने अुत्तेजित होण्याचे अैवजी त्या राजसभेतील कर्तृत्वशून्य दिवाणीने जास्त मत्सरपूरित मात्र झाली व थोड्याच काळात ह्या मौलवीला त्यांनी तुरुंगातही ढकलून दिलें ! परंतु बेगमेपेक्षाही शिपायात ह्या मौलवीचेंच अत्यंत वजन पडलेले होतें व त्याहूनही दिल्लीकडून आलेल्या फौजेचा तर ह्या मौलवीवर फारच भरंवसा होता. तेव्हा त्याला कैदेतून तावडतोब मुक्त करण्यासाठी त्यांनी नेट धरला व त्या योगाने अखेर मौलवीची तुरुंगातून मुक्तता झाली. मुक्त होताच त्याचें राजदरबारात पूर्ण वजन बसलें व हें आपसातील दुहीने भांडत बसण्याचे अत्यंत नाशकारक व्यसन मोडून टाकून सर्वशत्रूनी दाराशी थाप देत बसलेल्या परशत्रूचा नि:पात करण्यास सज्जखड्ग व्हावें असे त्यानी सैन्यामध्ये पुन्हा स्फुरण अुत्पन्न केले.

परंतु स्फुरण अुत्पन्न करूनच हा वीरात्मा स्वस्थ बसलेला नव्हता तर त्याने वेळोवेळी शिपायाना रणांगणाकडे जाण्यास प्रवृत्त केलेले होते आणि जेव्हा जेव्हा आलमबागेतील अिंग्रजावर हिंदुस्थानी चालून गेले तेव्हा तेव्हा सर्वांच्यापुढे मौलवीची दिव्य मूर्ति तळपत असे ! ता. २२ डिसेंबर रोजी त्याने आलमबागेच्या अिंग्रजांना फसवून त्यांच्या सैन्याला पूर्णपणे कोंडण्याचा अुत्कृष्ट व्यूह रचलेला होता. त्याने स्वतः आपल्या बरोबरच्या सैन्यासह अिंग्रजाना चुकवून कानपूर रस्त्यावर चाल केली व आपण अिंग्रजांच्या पिछाडीस जाताच अितरांनी समोरून मारा द्यावा असा बिनतोड घाट घातला. अितरांनी ! येथेच तर सर्व नडलें ! त्या अेका आत्म्याचे तेजाला प्रत्युत्साह देणारी तर राहोच पण त्याचे निदान अनिवार्यतेने अनुगमन करणारी शिस्त अितरात दिसून येअीना ! जो तो आपआपल्या परीने शहाणपण

मिरविणार! आणि रणांगणात पहिले बार झडले न झडले की हे सर्व सहाणे तिवडे तोंड देण्याचे अैवजी पाठ देणार! अितरांच्या अशाच कातरतेने व अव्यवस्थेने ह्या मौलवीने स्वतःचें काम अुत्तम रीतीने बजाविलें असताही रणांगणात वंडवाले त्या दिवशी पराभव पावले.

तरी त्यांच्या निरुत्साहाला अुत्साहाचें तेज देण्यासाठी मौलवी व त्याच्यासारखेच अिनर करारी पुढारी यांचे आटोकाट प्रयत्न चाललेले होते. ता. १५ जानेवारीला वंडवाल्यांस बातमी लागली की आलमबागेतील ब्रिटिश सैन्याला मदत व रसद पोचविण्यासाठी कानपूरहून काही अिंग्रज लोक येत आहेत. अशी बातमी लागताच ही रसद मारून आणण्यासाठी वंडवाल्यांत वाटाघाट चालली. वाटाघाट! वाटाघाट चालली पण काही वाट निघेना किंवा काही घाट जमेना! अखेर ह्या वंडवाल्यांच्या कातरतेने चिडून जाअून त्या अभिजात मौलवीने सर्वांसमक्ष शपथ घेतली की, "मी स्वतः ही रसद मारून खुद्द ब्रिटिश कँपमधून लखनौमध्ये प्रवेश करीन!" अशी घोरप्रतिज्ञा करून हा धाडसी आपल्या लोकांसह कानपूरच्या रस्त्यावर दबत दबत चालून गेला. परंतु ह्या छाप्याची बातमी आअुटरामला आधीच नेटिव्ह दूतांकडून कळलेली असल्यामुळे त्याने मौलवीच्या फौजेवर अुलट छापा घालावयास अिंग्रजी फौज धाडलेली होती. ह्या परस्पर छाप्याचा लवकरच सामना झाला. मौलवीने त्या दिवशी आपल्या अनुयायांना वीरश्री चढविण्यासाठी स्वतः रणकंदनात अुडी घेअून धैमार चालविली होती. राजकारणात हा जसा तळपत असे तसाच तो आज रणकारणातही तळपू लागला! बेहोष रीतीने लढता लढता ह्या वीर पुरुषाला अखेर अेक गोळी लागली व हातचा हात जायबंदी होअून तो खाली पडला! ह्या मौलवीला पकडण्यासाठी अिंग्रजांची अहमहमिका लागलेली होती तरी वंडवाल्यांनी त्याला डोलीत घालून लखनौला मोठ्या शिताफीने नेलें.

मौलवी जखमी झाल्याचे समजताच अेका विदेही हनुमान नांवाच्या शौर्यशाली ब्राह्मण पुढाऱ्याने अेका दिवसाचाही विसावा न घेता ता. १७-ला अिंग्रजावर हल्ला केला. सकाळी १०-पासून संध्याकाळपर्यंत हा शूर पुरुष रणांगणात लढत होता. परंतु अखेर तो भयंकर जखमी होअून पडताच वडवाले रण सोडून पळू लागले. अिकडे दरबारात ह्या अपजयानी आपसाआपसातील वैमनस्याचा कळस झाला. वदफैली शिपायांनी लढण्याचे पूर्वीच पैसे मागण्याचा पेच घ्यावा, अगाअू पगार दिले तरी पुन्हा पगाराशिवाय रणाकडे ते वळेनात! परंतु अशी वजबजपुरी माजली असताही त्या करारी व कर्तृत्ववान् बेगमेने राज्यकारभारची शिस्त चोख ठेवली होती आणि हाच तिच्या असामान्य मनोधैर्याचा पुरावा होय.[७]

७. Sir W. Russell says about this Begum : "The great bulk of Sepoy army is supposed to be inside Lucknow, but they will not

टीप पुढील पानावर चालू

अपजयांची ही अशी अेकामागून अेक मालिका चालू असता बेगमचा अर्थमंत्री राजा बाळकृष्णसिह हा मरण पावला, परंतु असल्या असंख्य आपत्तींनीही ती खचून गेली नाही. कारण ज्यांना अिंग्रज दाराशी अुभा राहणें हें मृत्यूपेक्षाही लाजिरवाणें होत होते त्यांनी पुन्हा पुन्हा रणांगणात अुडी घ्यावी व ह्या अुडींत सर्वांच्यापुढे ज्याची अुडी असे तो वीरपुत्र दुसरा कोणी नसून मौलवी अहंमदशाह हाच होय! त्याला रणांगणात झालेली असह्य जखम किंचित बरी होते न होते तोंच ता. ५ फेब्रुवारीला त्याने पुन्हा सर्व सैन्याला घेअून रणाकडे धाव घेतली. परंतु आता दिवसेंदिवस शिपायाच्या भ्याडपणाला पारावार नाहीसा झालेला होता. मौलवीचे सर्व श्रम व्यर्थ होअून त्या दिवशीही बंडवाल्यांचा पुन्हा पराभव झाला. तरी सुद्धा मौलवीने लढा चालूच ठेवला. या वीराच्या शौर्याने स्तिमित होअून अितिहासकार होम्स आपल्या पुस्तकात लिहितो, "जरी बहुसंख्य बंडवाले भ्याड व कचखाअू होते तरी त्यांचा पुढारी मात्र आपल्या निष्ठेने व कर्तृत्वाने अुदात्त ध्येयाचा पाठपुरावा करण्याला आणि सैन्याचें नेतृत्व स्वीकारण्याला अेकमेव असाच होता. हा पुढारी म्हणजे अहंमदुल्ला —फैजाबादचा मौलवी.[८]

---

टीप मागील पानावरून चालू

fight as willingly as the watch-men of Oudh who have followed their chiefs to maintain the cause of their young King Birjis Kadir, and who may be fairly regarded as engaged in a patriotic war for their country and their sovereign. The Sepoys during the seige of the Residency never came on as boldly as the Zamindari levies and Nujeibs. The Begum exhibits great energy and ability. She has excited all Oudh to take up the interests of her son and the chiefs have sworn to be faithful to him. We affect to disbelieve his legitimacy but the Zamindars who ought to be better judges of the fact accept Birjis Kadir without hesitation. Will Government treat these men as rebels or as honourable enemies. The Begum declares undying war against us. It appears from the energetic characters of these Ranees and Begums—that they acquire in their Zananas and Harems a considerable amount of actual mental power and at all events, become able intrigants. Their contests for the ascendency over the minds of men give vigour and acuteness to their intellect."—Russell's Diary, p. 275.

८. Sepoys' War by Holmes.

९०-व्या रेजिमेंटच्या अेका सुभेदाराने आठ दिवसात अिंग्लिशांना हुसकून देण्याची प्रतिज्ञा केली व त्यानेही पुन्हा हल्ले चढविले. अेके दिवशी खुद्द बेगम साहेबाही सैन्याबरोबर बाहेर पडल्या होत्या. परंतु त्या दुर्दैवी लखनौला विजय काही मिळेना आणि विजय मिळावा तरी कसा? कर्तबगारीचा विजय हा दामानुदाम आहे. ती कर्तबगारी बंडवाल्यांनी लखनौच्या रणात दाखविली असती तर विजय काही दूर नव्हता!

शेवटी अलमबागेच्या अिंग्रजी फौजेला मागे लिहिल्याप्रमाणे सर कोलिन येअून मिळाला. लखनौ शहराचा नि:पात करण्यासाठी आज अेक वर्षपर्यंत अिंग्रजी सत्ता धडपडत होती. तथापि तिच्या अनेक हल्ल्यांना न जुमानता हे शहर आजपर्यंत स्वराज्याच्या ध्वजाखाली हटातटाने अुभे होते. परंतु आता आज त्याचा नि:पात केल्याशिवाय अिंग्रजी सैन्य परत फिरणे नाही! त्या समरांगणात आता अेक अिंग्लिश सत्तेचा तरी नि:पात होअील वा हिंदी सत्तेचा तरी नि:पात होअील अशी अंतिम वेळा आलेली आहे. अिंग्रजी सत्तेने जसे या वेळेस आपले सर्व सामर्थ्य अेकत्र केलेले होते तसेच बंडवाल्यांचेही सर्व सामर्थ्य अेकत्र झालेले होते, ठिकठिकाणाहून स्वातंत्र्य-भक्त लखनौच्या ध्वजाकडे धावत होते. " The country was swarming with armed vagabonds hastening to Lucknow, to meet their commander and die in the last struggle with the Firangees. ".— (Charles Ball, Vol. II, page 241.) त्यांनी लखनौ शहरामध्ये घराघरांना माऱ्याची भोके पाडून ठेवली, गोमतीचे मोठमोठाले कालवे खणून शहराच्या पूर्व बाजूला बळकटी आणली, दिलखुश बागेपासून तो थेट कैसर बागेतील राजवाड्यापर्यंत संरक्षणाचे मोठमोठाले तट बांधले; त्या शहरात अयोध्येतील व अितर प्रांतातील बंडवाले मिळून कमीत कमी अेंशी हजार योद्धे सशस्त्र तयार होते. सारांश त्या शहराच्या अुत्तरेशिवाय सर्व दिशांनी जंगी कडेकोट लष्करी तयारी केलेली होती.

आणि म्हणूनच सर कोलिनने ह्या अुत्तर दिशेकडूनच बंडवाल्यांवर प्रथमतः मारा केला. मागे हॅवलॉक, आअुट्राम व स्वतः कोलिन ह्यांपैकी कोणीही या दिशेने आलेले नसल्याने व त्या दिशेसच गोमती नदी वहात असल्याने बंडवाल्यांचा असा समज होता की शहराच्या ह्या अुत्तर दिशेस काही विशेष बंदोबस्त नको आहे. परंतु सर कोलिनने आअुट्रामला त्याच दिशेकडे धाडून जेव्हा बंडवाल्यांच्या मर्मस्थानीच अेकाअेकी हल्ला चढविला तेव्हा त्यांचे पूर्वीचे सर्व बेत ढासळू लागले. सर कोलिनचे हाताखाली आता अेकंदर तीसहजार सैन्य तयार होते.[१] तेव्हा त्याने दिलखुश बागेपाशी आपले ठाणे देअून तेथून बंडवाल्यांची पूर्वबाजू जिंकीत आणली. ता. ६ मार्चपासून ब्रिटिश सैन्याने लखनौवर अुत्तरेकडून व पूर्वेकडून कोंडमारा चाल-

१. Narative of the Mutiny, page 403.

विला. सर कोलिनचा व्यूह अशा पद्धतीने रचलेला होता की, बंडवाल्याची चहूकडून पूर्णपणें नाकेबंदी करीत नेऊन त्यांना लखनौहून पळणें अशक्य करून टाकावें. मार्च ६-पासून तों तहत मार्चच्या १५-पर्यंत लखनौ आपल्या शत्रूशी अहोरात्र झुंजत होतें. ब्रिटिश सेना दिलखुष बागेपासून तों कदम रसूल, शहानजीफ, बेगमकोठी वगैरे स्थलें काबीज करीत पुढे पुढे घुसत चालली. ता. १०-ला अिंग्लिशांकडचा योद्धा हॉडसन हा बंडवाल्यांनी ठार केला. या हॉडसननेच दिल्लीच्या शरणागत राजपुत्रांना गोळी घालून खून केले होते. त्या या पापी अधमाला लखनौने ठार मारून आज दिल्लीचा सूड अुगविला! ता. १४ ला लखनौच्या खुद्द राजवाड्यात ब्रिटिश फौज घुसली! त्या या अेकंदर यशाचें वर्णन देताना मॅलेसन म्हणतो, " Its greatness and magnificence was due mainly to the Sikhs and the 10th platoon. " ह्या यशाची थोरवी व वैभव हें सर्व शीख लोकांकडेच व दहाव्या पायदळाकडे आहे![१०]

परंतु सर कोलिनच्या मनावर ह्या केसरबागेतील यशानें आनंदलहरी अुसळत असताच आअुटरामचे बाजूकडून आलेल्या वार्तेने त्याचा वराच हिरमोड झाला. कारण लखनौ शहराचा जरी नि:पात झाला तरी तेथील हजारो बंडवाले आपल्या तरुण राजपुत्रासह व त्या अकुंठित बेगमेसह अिंग्रजांच्या सुडाला विफल करून लढत लढत बाहेर गेले!

आणि लखनौ शहरातून रक्ताचा शिळधार पाअूस कोसळत असता राजवाड्यासुद्धा सर्व स्थली विजयी अिंग्रज सैन्य अकुतोभयतेने नाचत असता, खुद्द राजा, राजमाता हीं आपल्या सर्व सैन्यासह लखनौचे बाहेर निघून गेली असता तो अहमदशहा मौलवी कोठे आहे?

त्याच्या वीरमहिम्याला शतप्रणाम असोत! तो अभिमानी मौलवी अद्वितीय धाडसानें म्हणूनच आपल्या मूठभर अनुयायासुद्धा फिरून शहरात प्रवेश करीत आहे! फिरंग्यांनी लखनौचा निःपात करावा हें त्याच्या शौर्यशाली अंतःकरणाला कालकूट विषासारखें सलू लागलें. जिवावर अुदार झालेला, अपमानाने चिडून गेलेला, देशभक्तीने वेडा झालेला तो मौलवी शहराच्या मध्यभागी घुसून शहादतगंजच्या अेका लहानशा भागात रणकंदन करू निघाला! रोम शहरात शत्रूचें सैन्य घुसून तें शहर त्यांनी पादाक्रांत केलें असताही जसा मॅझिनी त्या शहराला अेकटाच चिटकून राहिला तसाच हा मौलवी लखनौहून सर्व बंडवाले निघून गेल्यावरही त्या शहरात अेखाद्या वेड्यासारखा अेकटाच झुंजत राहिला! आंग्ल सेनासर्पिणीने गिळून टाकलेल्या लखनौला ओढून काढण्यासाठी तिच्या तोंडात आपला हात खुपसू लागला! मॅलेसन लिहितो, "बंडवाल्याचा हटेल पुढारी मौलवी पुन्हा लखनौला परतला.

---

१०. Malleson Vol. IV, page 270.

time—thus had he time to relent—the gallant officer succeeded and the boy's life blood flowed at his feet !"[१३]

दिल्ली पडली, लखनौही पडलें पण क्रांतियुद्धाचा जोर काही कमी झाला नाही. ही अनपेक्षित परिस्थिति पाहता ही क्रांति शिपायांनी घडविली होती नि तिच्या मागे असंतोषाचीं अेक दोनच कारणें होतीं, असें समजण्यात आपण फार मोठी चूक करीत आहों याची अिंग्लिशांना खात्री पटली. हें काही 'बंड' नव्हते, तर स्वातंत्र्याकरिता ठाणलेलें तें अेक युद्ध होतें! अेखाद दुसऱ्या असंतोषामुळे ही अुठावणी झाली नव्हती, तर अनंत दुःखांना जन्म देणारें राजकीय पारतंत्र्यच हिच्या बुडाशी होतें! त्या क्रांतीच्या बुडाशी क्षुद्र वैयक्तिक स्वार्थ नव्हता, तर स्वातंत्र्याची पवित्र ज्योत व स्वधर्माची आणि स्वराज्याची अुदात्त ध्येयभावनाच येथे धगधगत होती, फक्त शिपाअीच काय ते आपला व्यक्तिगत स्वार्थ साधण्यासाठी या स्वातंत्र्याच्या पवित्र ध्येयाशी समरस झाले होते असे नाही, तर सर्व पाढरपेशी जनता व शहरातल्याप्रमाणेच खेड्यांतील जनताही या अुठावणीत प्रामुख्याने सहभागी झाली होती. आणि तसें नसतें तर ही शक्ति, हा कृतिनिश्चय, हा निःस्वार्थीपणा व हें धाडस चुकून सुद्धा दृष्टीस पडले नसतें! कारण याच वेळी लॉर्ड कॅनिंगने "जे कोणी बंडात सामील होतील त्यांची सर्व मालमत्ता व अुत्पन्नें जप्त करण्यात येतील व जे शरण येतील त्यांना क्षमा करण्यात येअील" असा जाहिरनामा काढला होता. तरीही क्रांतिकारकांनी शस्त्रें खाली ठेवलीं नाहीत. लखनौ पडलें तरी अयोध्येने लढा चालूच ठेवला होता. डॉ. डफ या प्रचंड अुठावाविषयी लिहितो : "जर हे केवळ शिपायांचेच बंड असतें व बहुसंख्य जनतेची सहानुभूति व साहाय्य त्यांना नसतें तर त्याच्यावर आम्ही जे पहिले दोन चार प्रचंड विजय मिळविले, त्यातच त्यांचा धुव्वा अुडवू शकलो असतो. पण तसा त्यांचा धुव्वा अुडणें राहोच, पण अुलट ते जास्त चेतलेले दिसू लागून पूर्वीपेक्षाही त्या बंडाची व्याप्ति अधिकच फैलावली! आणि ते जास्तच अुग्र स्वरूप धारण करीत आहे! ते साधें शिपायाचें बंड नसून ती अेक क्रांतिकारक अुठावणीच असल्याचे दिसतें! आणि यामुळे ती पूर्णपणें दामविण्यातच आपल्याला फार थोडे यश लाभले आहे व म्हणूनच ती पुढेही लवकर शमेल असें वाटत नाही. अशा प्रकारचें हें 'बंड' दीर्घकालिक व हेतुपूर्ण अुठावणी, जीमध्ये हिंदु-मुसलमान ही विसंवादी जोडी खांद्याला खांदा लावून मित्र म्हणून लढण्यास अुभी राहिली होती, जिच्या वाढीला व ती चालू ठेवण्याला अयोध्येची सबंध जनता कारणीभूत झाली होती, आणि जिला प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे शेजारच्या जवळजवळ सर्व प्रांताची सक्रिय सहानुभूति मिळालेली होती, ती अुठावणी बंडवाल्या शिपायांवर मिळविलेल्या चार दोन निर्मळ व अभूतपूर्व विजयामुळे दडपून टाकणें कधीच शक्य नव्हते

१३. Russell's Diary, Page 348.

"आदी सुरवातीपासून या 'बंडाला' सैन्याबाहेर पसरलेल्या अफाट अशा जनशक्तीने ब्रिटिशांच्या वर्चस्वाविरुद्ध व त्यांच्या राजसत्तेविरुद्ध केलेल्या क्रांतिकारक अुठावणीचेंच स्वरूप प्राप्त झालेलें होतें. आमचा खरा लढा केवळ सर्वस्वी बंडखोर शिपायांबरोबर होता हें निखालस खोटें आहे. आमचे शत्रु केवळ शिपाईच असते तर देशामध्ये शांतता प्रस्थापित होण्यास चुटकीचाही वेळ लागला नसता.

"शत्रूची पुरी दाणादाण अुडवून, त्याला पळवून लावून, व त्यांच्या तोफा काबीज केल्याशिवाय आम्ही अेकाही शत्रूला अेकाही लढाअीत तसें सोडलें नाही. परंतु लागोपाठ अनेकदा पिटूनही हे लोक पुन्हा पुन्हा ताजेतवाने होअून नव्या रणास सिद्ध झालेले दिसत। अेक प्रांत ताब्यात घेअून ब्रिटिश सैन्यें जों तेथे शांतता प्रस्थापित करताहेत तोंच दुसऱ्या प्रांतात प्रक्षोभाची वावटळ अुठे. महत्वाच्या स्थळांना जोडणारा दळणवळणाचा अेखादा राजरस्ता जों खुला करण्यात येत आहे तों लागलीच त्याची नाकेबंदी करून तेथील दळणवळण तोडण्यात येअी. अेका विभागातून बंडवाल्यांना जों हुसकावून लावण्यात येअी तों, पुन्हा दुप्पट तिप्पट संख्येनें ते दुसऱ्याच विभागात अुपटलेले दिसत. आमच्या फौजा त्यांच्या सैन्यावर मुसंडी मारून आक्रमण करीत जों पुढे घुसत आहेत तों बंडवाल्यांच्या तुकड्या मागचा सर्व प्रदेश पुन्हा आपल्या ताब्यात घेत."[१४]

डॉ. डफने वस्तुस्थितिनिदर्शक लिहून ठेवलेल्या या सत्याची पुरेपूर प्रचिती अिंग्लिशाना फार शेवटी शेवटी आली. परंतु पांडवांपैकी प्रत्येकाला अगदीं पहिल्यापासून याची सुस्पष्ट जाणीव होती. आपल्या राजाकरिता व आपल्या देशाकरिता ज्यांनी धारातीर्थी देह ठेवले ते तर या गोष्टी स्पष्टच बोलून दाखवीत, पण त्यांच्या स्त्रियांनीही खरोखर तितकाच कठोर निश्चय प्रकट केलेला होता. काही 'शूर अिंग्रजांनी जेव्हा लखनौच्या झनान्यावर चाल केली तेव्हा त्यांच्या हाती, काही अंतःपुरातील स्त्रिया सापडल्या. दरवाजे फोडून आत घुसल्यावर अिंग्लिश सोजिरानी येथेही बंदुकीच्या फैरी झाडल्याच त्यामुळे काही स्त्रिया मरून पडल्या. ज्या वाचल्या त्यांना कैदेत ठेवलें गेलें. लखनौची राखरांगोळी करण्यात आली. तो सर्व देखावा पाहून बंडवाले आता झट सारे शरण येतील या कल्पनेने अिंग्लिशाना अत्यानंद झाला. आपल्या देशबंधूच्या या आनंदोन्मादात सहभागी झालेले अिंग्रज जेलरही त्या राण्याना खिजविण्यासाठी विचारी "बंडाचा आता पुरा मोड झाला असें तुम्हांला नाही वाटत? त्या वेळी त्या कृतनिश्चयी बेगमानी स्पष्टपणे अुत्तर केले, "We are sure you will be beaten in the long run." सरते शेवटी तुमचाच पराजय होणार हे निश्चित आहे!!"[१५]

१४. Dr. Duff's Indian Rebellion, Pages 241–243

१५. Narrative of the Indian Mutiny, Page 388, Russell's Diary, Page 400.

* * *

शहादतगंज येथील अेका वंदिस्त अिमारतीत अवघ्या दोन तोफांनिशी, तो अिंग्रजांशी कडवट प्रतिकार करीत तेथेच राहिला. त्याला तेथून हुसकावून लावण्यासाठी ता. २१ मार्चला पहिल्याच दिवशी त्याने वेगम कोठी सर केली होती त्या न्यू गार्डला बरोबर काही सैन्य देअून त्याजवर पाठविण्यात आलें. न्यूगार्ड बरोबर ९३-व्या हाय लँडर पलटणीचे व चौथ्या पंजाब रायफलचे सैनिक होते. परंतु वंडवाल्यांनी आज अपूर्व शौर्य दाखविलें. त्यांनी मोठ्या धैर्याने आपलें संरक्षण केलें; व आमच्याकडील कित्येकांना ठार करुन व कित्येकांना घायाळ करुन नंतरच ते बाहेर पडले."[११]

लखनौ शहराचा हा शेवटचा झुंजार होम! थोडाच वेळाने त्या झुंजाराची वीर धुंदी अुतरुन त्याच्या नजरेस आले की, ज्या ध्वजासाठी मी हे युद्ध करीत आहे तो राज्यध्वज अितःपर लखनौला अुरलेला नसून तो माझ्या तरवारीची मार्गप्रतीक्षा करीत तिकडे वनवासाकडे अुभा तिष्ठत आहे!

वंडवाल्यांनी केलेले अिंग्रजी कैद्यांचे हाल व अिंग्रजांनी केलेले वंडवाल्यांचे हाल, यांची मासल्यासाठी दोन तीन चित्रें पुढे दिलीं आहेत. लखनौच्या कैदेत काही अिंग्रजी स्त्रिया व अिंग्रजी अंमलदार होते. त्यांना लखनौने सुमारे सहा महिन्यांपर्यंत ठार न मारता कैदेतच ठेवलेलें होतें. परंतु ज्या वेळेस अिंग्रजी फौज सर कोलिनच्या पहिल्या स्वारीचे वेळेस रस्त्यांतील नागरिकांची अेकसहा कत्तल करीत घुसली तेव्हा त्या रवेषाने संतप्त झालेले शिपाअी लोक केसरबागेतील राजवाड्याकडे जाअून निकराची मागणी करु लागले की अिंग्रजी कैदी आताच्या आता आमच्या स्वाधीन करावे. त्याप्रमाणे नाझिमजाने कॅ. ऑर, सर माअुंट स्टुअर्ट, वगैरे पाचसहा गोऱ्या पुढाऱ्यांना शिपायांचे स्वाधीन करताच त्यांनी गोळ्या घालून त्यांना ठार मारले. परंतु त्याच शिपायी गोऱ्या बायकानाही मारलें जावें म्हणून हट्ट धरू लागले तेव्हा "To the honour of womanhood the demand was imperatively refused by the Begum so far as the females were concerned and they were immediately taken under her care in the Zanana of the palace."[१२] वेगमेने गोऱ्या बायकांना देणें साफ नाकारुन त्यांचें स्वत: राजस्त्रियांच्या जनान्यात पोषण केलें!

आता अिंग्लिश लोक लखनौ शहरातील नागरिकांवर कोण अनन्वित जुलूम अुसळवीत होते हेही त्यांच्या प्रसिद्ध लेखकाकडून वदविलें पाहिजे. वंडवाल्यांच्या— आणि अयोध्येतील सर्वच लोक वंडवाले होते —५ वर्षांपासून ८० वर्षांपर्यंतच्या सर्व सशस्त्र लोकांना ठार मारण्यात येणें, हाती सापडलेल्या वंडवाल्यांपैकी शेकडो जखमी लोकांना बराबर गोळ्या घालून ठार मारणे, खेडेगावांना आगी लावून भस्म करणें, हे प्रकार तर दररोज चाललेलेच होते. परंतु यापेक्षाही अस्मत राक्षसी प्रकार—जे

११ Kaye and Malleson Vol. IV, page 286.
१२. Charles Ball, Vol II, page 94.

अितरत्र अप्रसिद्धीने छपून राहिलेले आहेत ते—लखनौला प्रख्यात लेखक डॉक्टर रसेल याच्या नजरेस पडले. त्यांपैकी अेका हकीकतीत तो म्हणतो :

" Some of the sepoys were still alive and they were mercifully killed. But one of their number was dragged out to the sandy plain outside the house, he was pulled by the legs to a convenient place, where he was held down, pricked in the face and the body by bayonets of some of the soldiers, while others collected fuel for a small pyre, and when everything was ready—the man was roasted alive ! These were English men and more than one officers saw it ! No one offered to interfere ! The horrors of this internal cruelty was aggravated by the attempt of the miserable wretch to escape when half burned to death. By a sudden effort he leaped away, and with the flesh hanging from his bones ran for a few yards before he was caught and brought back, put on the fire again and held there by bayonets till his remains were consumed. "

भावार्थ, अजूनही काही शिपाअी जिवंत होते. आणि ह्या सर्वांचा सदयतेने वधही करण्यात आला! परंतु त्याच्यापैकी अेकाला घराबाहेरील वाळूच्या फोफाट्यावर फरफटत ओढीत आणण्यात आले. तेथे त्याला अिंग्लिश सोल्जरांनी त्याच्या शरीरास आपल्या संगिनी खुपसून, दाबून धरले होतें. बाकीचे सोल्जर्स त्याला पेटवून देण्यासाठी सरपण वेचण्यास गेले होते आणि जेव्हा सर्व तयारी झाली तेव्हा त्या शिपायाला पेटलेल्या चितेवर जिवंत भाजून काढण्यात आले ! हें कृत्य करणारे सर्व अिंग्लिश लोकच होते व त्यांचे अनेक अधिकारी हें सर्व पहात तेथेच अुभे होते. तरी कोणीही मध्ये पडले नाही. परंतु जेव्हा तो दुर्दैवी बापडा अर्धा कच्चा जळून भाजून निघालेल्या स्थितीतच चितेतून धडपडत बाहेर पडला, तेव्हा मात्र या आसुरी क्रौर्याचा कळस झाला! विलक्षण धडपड करून जेव्हा त्याने चितेतून बाहेर अुडी घेतली तेव्हा जळत्या मासाचे लचके त्याच्या अुघड्या पडलेल्या हाडांवर लोंबत होते आणि त्याला पकडण्यापूर्वीच अशा स्थितीतही तो काही अंतर पळून गेला. परंतु त्याला पुन्हा धरण्यात आले आणि संगिनी रोखून त्याला पुन्हा चितेवर ढकलण्यात येथून त्याचे दग्ध अवशेष पुरे जाळण्यात आले!

अशी शहरात कत्तल सुरू असता अेके ठिकाणी अेक काश्मिरी मुलगा अेका अंधळ्या म्हाताऱ्यास बरोबर घेअून तेथील आंग्ल अधिकाऱ्यापुढे आला व त्याला साष्टांग नमस्कार घालून जीवदान द्यावें म्हणून विनवू लागला. त्या अधिकाऱ्याने पिस्तुल काढले व त्या दुर्दैवी शरणागताचे कपाळावर झाडलें! पुन्हा त्याने घोडा दाबला—पुन्हा पिस्तुल झाडले—पुन्हा गोळी हुकली. पुन्हा घोडा दाबला—त्या गोळीने त्या मुलाला ठार मारण्याचे आणखी अेकदा नाकारलें. " The Fourth

प्रकरण आठवें

# कुंवरसिंह व अमरसिंह

झाला क्षीण जरी क्षुधेस्तव बहु की व्यापिला वार्धकें ।
आली कष्टदशा पडो मरणही की तेज गेलें निकें ।।
ऐसाही मृगराज जीर्ण, तृण ती मक्षील कीं काय हा ।
शौर्ये भेदुनि हस्तिमस्तक शुभ ग्रासींच ज्याला स्पृहा ।।

— वामनपंडित

जगदीशपूरच्या दरीतून हौत्रच्या शिकारी टोळीने हुसकून दिल्यानंतर राजवाड्यातील सिंह वृद्धयुवा कुमार हा आता आपल्या स्वातंत्र्यघातवशाच्या कंठावर जबर झडप कधीं घालता येईल याची संधि पहात पश्चिम बहारच्या रानातून दबत दपत घिरट्या घालीत होता. त्याचे आयाळ संतापाने अुभारलेलें, त्याचे पंजे सुडाने विस्फारलेले व त्याचे डोळे शत्रूच्या कंठनालावर झडप घालण्याची योग्य संधि पहाण्यासाठी आपल्या कोटरीत गरगर फिरत असलेले असा तो सिंह त्या झाडींत या टोकापासून त्या टोकापर्यंत खेपा घालीत होता.

त्या सिंहाचे बरोबर त्याचे अितर छावेही जमलेले होते. त्याचे बंधु अमरसिंह, नि:स्वन सिंह, जवानसिंह हेही आपआपल्या अनुयायांसुद्धा तिथे आले. फार काय, परंतु त्यांच्या प्रियकरिणी सिंहिणीही आता युद्धवेषाने त्या रान्यात आपल्या वनराजासह रिपुरक्ताचें पान करण्यास सज्जून राहिल्या.

शहाबाद जिल्ह्यात त्याची वंशपरंपरागत भूमि परक्यांच्या ताब्यात गेलेली होती, त्याची सेना फार थोडी होती. १२०० शिपाअी व अधिकारी व आणखी चारसे अेक अशिक्षित नोकर त्याचेपाशी होते. त्याच्या जगदीशपूरच्या राजवाड्यात परशत्रूचा अमंगळ तळ पडलेला होता. त्याच्या देवालयांना व देवांना अुन्मत्त म्लेच्छांनी भरडून टाकलेले होते ! —परंतु ह्या सर्व अपमानांनी जरी तो चिडून गेला होता तरी कुंवरसिंह केवळ संतापाच्या अधीन झाला नाही. त्याने मनुष्यघात न होअू देता जगदीशपूर ज्या दिवशी सोडून दिलें त्याच दिवशी त्याने केवळ मनोविकाराचे दास न होता व संतापाचे भरात विजयाची संधि न दवडता अेका निराळ्याच युद्धपद्धतीचा अवलंब करण्याचें योजिले होतें. तो जगदीशपुरावर अेकाअेकी चालून गेला नाही किंवा शहाबाद प्रांतातही त्या दृष्टींने राहिला नाही. त्या प्रांतावर व त्या राजधानीवर अिंग्रजाचा कडेकोट बंदोबस्त होता हें त्याला माहीत होते. म्हणून त्याने राजधानी पडल्याची मुळीच क्षिति बाळगली नाही. त्याने जी क्षिति बाळगली ती फक्त अेवढ्यासाठी होती कीं राजधानी पडो वा न पडो, मात्र

स्वातंत्र्यसमराचा जरतारी ध्वज अढळ झळकत राहिला पाहिजे. त्याची नवी युद्ध-पद्धति म्हणजे स्वातंत्र्यसमराची अनन्यसंजीवनी आहे. त्या युद्धपद्धतीचें नाव गनिमी कावा हें होय !

आणि अेतदर्थ आपल्या अपमानांच्या अुद्क्षोभाने अिंग्रजांचे सबल सैन्यावर दीप-पतग-त्वरेने चालून न जाता कुंवरसिंह त्या पश्चिम वहारच्या रानात शोण नदाचे काठाकाठाने अिंग्रजांचीं व्यंगस्थलें पहात दवलेला होता. तों लखनौच्या नि:पातासाठी अझिमगडाकडील बहुतेक नेपाळी व अिंग्रजी फौज अयोध्येवर निघाली आहे अशी त्यास वार्ता कळली. त्याच्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाला ह्या शिकारीचा वास लागताच जगदीशपूरचा सिंह झडप घेत त्या रानातून बाहेर पडला. संतापाच्या व मनोविकारांच्या क्षणिक समाधानाचे अधीन होणाऱ्या दुर्बल लोकांप्रमाणे विजयाचा संभव कमी असताही अेका राजधानीभोंवतीच भ्रमण घालीत बसणारा तो मनुष्य नव्हता. तर तत्वाच्या अंतिम विजयाचें जिकडे चिन्ह दिसेल तिकडेच समर नेणारा तो गनिमी वीर होता. लखनौकडे सर्व ब्रिटिश सैन्य चाललें असतानाही जगदीश-पुराकडे अिंग्रजाचा डोळा कायमच असल्यामुळे कुंवरसिंहाने तिकडे सध्याच जाण्याचें योजले नाही, तर पूर्व अयोध्येत जेथे ब्रिटिश पकड अगदी मंदावलेली होती तिकडेच प्रथम झडप घालावी असा त्याचा बेत ठरला. पूर्व अयोध्येत शिरताच तेथील अनेक बडवाल्याना अेकत्र करून अझिमगडावर हल्ला चावा व तेथे विजय मिळाल्यास काशीक्षेत्रावर किंवा खुद्द अलाहाबादेवर धडक मारावी ! आणि अशी तोडीस तोड देअून जगदीशपूरचा सूड घ्यावा ! असा डाव योजून कुंवरसिंह पूर्व-अयोध्येकडे निघाला. अि. स. १८५८ चे १८ मार्चला वेलवाचे बंडवाले त्याला येअून मिळाले व त्या संयुक्त सैन्याने अत्रौलिया येथील किल्ल्यानजीक आपला तळ दिला.

अझिमगड अत्रौलियापासून २५ मैलांवर होतें. कुंवरसिंहाची फौज अितकी नजीक आली आहे हे कळताच सुमारे ३०० पायदळ व घोडेस्वार व २ तोफा अितकी ब्रिटिश फौज घेअून मिलमन अत्रौलियाकडे चालून आला. तारीख २२ मार्चला सकाळचे सूर्यकिरण रणमैदानाला स्पर्श करतात न करतात तोंच मिलमनची व बडवाल्याच्या आघाडीची दृष्टादृष्ट झाली. अेकाअेकी चालून आलेल्या ब्रिटिश सैन्याला पाहताच दवकलेल्या बडवाल्यांना क्षणाचाही अवसर न देता मिलमनने लढाअीस आरंभ केला. बंडवाले लढू लागले, परतु ते बडखोर ब्रिटिशांशी किती लढणार ? त्याचा तत्काल पूर्ण पराजय झाला. कुंवरसिंहाने अेवढ्या डौलात जी स्वारी केलेली होती तिचा ह्या मूठभर ब्रिटिश सैन्याने कसा फजिता अुडवून दिला! सारी रात्र चाललेले असतानाही बडवाल्याशी अितके निकराचे तोंड देणाऱ्या ब्रिटिश सैन्याची व त्याच्या सेनानीची खरोखरच शाबास आहे ! तुम्ही आपली सकाळची न्याहारी निवळाच्या पाण्यानेच नव्हे तर प्रत्यक्ष रक्ताने करविली आहे !

तर सर्व ब्रिटिश सैनिकांनो आपल्या सेनानीसह ह्या आंबराईत आता जरा स्वस्थ बसून ह्या बालसूर्याच्या किरणांसह व विजयाच्या स्मितासह तुम्ही त्या न्याहारीचा अुपभोग घ्या ! शस्त्रें रचलीं गेलीं, न्याहारी तयार झाली, भुकेचा घास तोंडाशी गेला, तान्ड्याचा पेला ओठाशी आला—

तोंच—हा ! हा ! हें काय ? ओठापासून पेला निसटला, तोंडीचा घास तोंडीच राहिला, न्याहारीचीं पात्रें कडाकड फुटलीं. शस्त्रें सपासप अुमपलीं गेलीं ! कुंवरसिंह तर आला नाही ना ? होय, होय, मदमस्त आंग्ल गजाच्या गंडस्थलावर कौसिलापासून ब्रिटिश फौजेला पिटाळण्यास जो पुन्हा आरंभ केला तो थेट अझिमगडापर्यंत कुंवरसिंहाने त्या हतमार्गां मिलमनला चेपीत नेले ! अझिमगडास पोचताच मिलमनच्या जिवात जीव आला. त्याच्या निकडीच्या निरोपाप्रमाणे बनारसकडून व गाझीपुराकडून समारे ३२५ लोकांची नवीन कुमक धाडण्यात आली, व ह्या सर्व फौजेच्या सेनापतित्वावर कर्नल डेम्स ह्याची योजना झाली. आता अझिमगडासारखी बळकट जागा, दुपटीने वाढलेली ब्रिटिश फौज, व कर्नल डेम्ससारखा ताज्या दमाचा सेनापति—आता मागच्या क्षणिक पराजयाचें अुट्टें काढण्याचा प्रयत्न आपण का बरे करू नये ?

म्हणून कर्नल डेम्स तारीख २७ मार्च रोजी अझिमगड सोडून कुंवारसिंगाची खोड मोडण्यास बाहेर पडला. बाहेर पडताच त्याला विजयही आला आणि कुंवरसिंहावर असा विजय येताच—पुन्हा त्या भूतपूर्व नाटकाचाच आणखी अेक भयंकर प्रयोग सुरू झाला ! कुंवरसिंहाने ह्या नव्या सोजिरांना व ह्या नव्या सेनानीला अशी अेक थप्पड दिली की कर्नल डेम्सही रण सोडून थेट अझिमगडाकडे पळत आला—शहरातील तटबंदीत जाअून दडला. त्याच्या फौजेत कुंवरसिंहावर जाण्यासाठी बाहेर तोंड काढण्याचे अित पर कोणीही नांव घेअीना !!

हे ब्रिटिशाचे पराजय अैकून अलाहाबादेला असलेल्या अिंग्रजाच्या गव्हर्नर जनरलाचे तोंडावर चिंतेने कालिमा दिसू लागला. " Knowing what sort of man Kunwarsing was, that he possessed audacity and courage and that he knew the value of time in military operations, Lord Canning realized at once the danger of the situation. "[1] दिवसें दिवस त्याच्या हाताखाली जास्त जास्त सैन्य जमत चाललेलें होतें. लखनौकडे पराभूत होअून पळालेले शिपाअीही आता त्याच्या झेंड्याकडे धावत येत होते व ज्याच्या अंगात या पराभूत व असंघटित सेनेलाही यशस्कर करणाऱ्या गनिमी काव्याची कुशलता वास करीत होती तो जगदीशपूरचा राणा अझिमगडला कोंडून टाकून मधल्या ८१ मैलाचा जलदीने प्रवास करून व बनारस शहरावर अचानक

1. Malleson, Vol. IV, Page 321.

हल्ला चढवून अलाहाबादेस असलेला गव्हर्नर जनरल व लखनौला असलेला कमांडर-अिन-चीफ ह्या दोघांचीही कलकत्त्याकडील साखळी पार तोडून टाकण्यास चुकणार नाही हे लॉर्ड कॅनिंगच्या तावडतोब ध्यानात आले. बंडाच्या आरंभी शीख लोकांच्या राजनिष्ठेने बनारस व अलाहाबाद हीं शहरें अिंग्जाचे हाती पडल्याने तर त्यांना स्वातंत्र्याचें मुख अितकें करकचून हिंदुस्थानचा गळा दाबता आला होता; ती निसटलेली संधि आता कुंवरसिंह पुन्हा साधतो की काय अशा चिंतेने लॉर्ड कॅनिंग त्वरित हुकूम देता झाला की त्या बंडखोरावर खुद्द लॉर्ड मार्ककेर ह्यानीच चालून जावे.

क्रिमियन युद्धात प्रख्यातीस आलेला व हिंदुस्थानात पूर्णपणे अनुभवलेला हा लॉर्ड मार्ककेर हा सुमारे ५०० योद्धयांसह व तोफांसह कूच करीत अझिमगडापासून ८ मैलावर येअून धडकला. थोडयाना विसाव्यानंतर तारीख ६ अेप्रिलचे पहाटे त्याने जपतजपत पुढे पाअूल टाकलें. सकाळी ६ वाजण्याचे सुमारास त्याला बातमी लागली की नजीकच कुंवरसिंहाची सेना त्याच्या पाळतीवर टपून बसलेली आहे. लॉर्ड मार्ककेर ह्याने ह्या पाळतीचें आपणास ज्ञानच नाही असे ढोंग करुन सैन्याला सज्जतेने आणखी थोडें पुढे नेलें व लगेच कुंवरसिंहाच्या अुजव्या बाजूवर मारा केला. त्यासरशी कुवरसिंगाची डावी बाजू गोळयांचा पाअुस पाडीत अुठली ! तो वृद्धयुवा अेका पांढऱ्या शुभ्र घोडयावर स्वार होअून आपल्या सैन्यात भीष्माचार्यां-सारखा तळपत होता ! फरक अितकाच की दुर्योधनाच्या पक्षाकडून भीष्माचार्य लढत होते—हा वृद्ध युवा धर्मराजाचे बतीने लढत होता ! तो स्वातंत्र्यधर्मासाठी, देशधर्मासाठी धर्म्य धर्मासाठी लढत होता ! त्याची सेना चार हजारांपर्यंत होती. परंतु तिच्यात संख्येअितका जोर नव्हता हें तो जाणून होता व म्हणून आज सर्व भार कायतो त्याच्या अेकटयाच्या पौरुषावर अवलंबून आहे असें पाहून शुभ्रास्वारूढ तो अेंशी वर्षांचा सेनापति आपल्या सेनेसह लढण्याची शर्थ करू लागला.

त्याने मार्ककेरच्या आजूबाजूनी आपली सेना पसरीत नेली. मार्ककेरच्या तोफा त्यावर जबर मारा करीत असताही व त्यांना अुत्तर देण्यास त्याचेजवळ तोफा नसताही त्याने थोडयाच वेळात मार्ककेरच्या पिछाडीवर आपले सैन्य जमवीत आणले. ब्रिटिश सैन्याच्या सेनापतीची धादल अुडून त्याने आपल्या तोफा किंचित् मागं घेतल्या. हे पाहताच बंडवाले मोठमोठयाने जयनाद करीत पुढे सरू लागले. कुंवरसिंहाने मध्यंतरी संधि साधून अिंग्रजांचे पिछाडीवरचा पेच पूर्ण रीतीने दृढ केला. अिंग्रजांचे हत्ती वेडे होअून सैरावैरा धावू लागले. त्यांचे महात हत्तीला मिठया मारमारून जीव संरक्षण करू निघाले व त्यांचे नोकर भराभर रण सोडून पळून गेले ! तरी मार्ककेरने धीर सोडला नाही. त्याने आघाडीच्या बंडवाल्यांच्या टोळया विभागून व तेथील घरें काबीज करून समोरची बाजू जिंकून घेतली. तों कुंवरसिंहाने ब्रिटिशांची पिछाडी मारून पाडाव केली !

आता ही विचित्र लढाओ बरोबर अुलटीची पालटी झालेली होती. कारण आरंभी कुंवरसिंहाचे तोंडाशी ब्रिटिशांचें तोंड होतें. लढता लढता आता कुंवरसिंह त्यांच्या पिछाडीला भिडून कुवरसिंगाचे तोंडाकडे ब्रिटिशांची पाठ आली ! व त्यांच्या पाठीला कुंवराने आग लावून दिली ! आपल्या पिछाडीस बंडवाल्यांनी पेटवून दिलेलें हें आपलें भिघासामान जळताना पाहून – लॉर्ड मार्क केरने धीर जरी सोडला नसला तरी रणांगण सोडण्याचा निश्चय केला ! पूर्ण विजय साधत नसला तर निदान अझिमगडला मदत नेण्याचा हेतु तरी साधावा म्हणून आपली विजयी आघाडी तशीच पुढे रेटीत मार्ककेर रण सोडून लढत लढत निघाला व आपल्या तोफांच्या साहाय्याने त्या शहराला रात्रीचे भरात येवून पोचला.

कुंवरसिंहाच्या ह्या अेकंदर रण तांडवाविषयी प्रख्यात अितिहासलेखक मॅलेसन म्हणतो : "त्याच्या मोहिमेचा नकाशा प्रशंसनीय होता. परंतु त्या नकाशाप्रमाणे वर्तन करण्यात त्याने बऱ्याच चुका केलेल्या आहेत. गिलमन जेव्हा त्याच्या हातात सापडला तेव्हा त्याच्या मागचा अझिमगडचा रस्ता अडकवून टाकण्याचें अैवजी कुंवरसिंहाने त्याच्या तोंडावरच मार दिला. त्याचा पाठलाग करून त्याला अझिमगडामध्ये कोंडल्यानंतर थोडेसें सैन्य अझिमगडाश ठेवून बाकीच्या लोकांसह कुमार जर बनारसवर तावडतोब येता तर लॉर्ड मार्ककेरशी त्याला याहूनही जबरदस्त सामना देता येता. परंतु वास्तविक पाहता ह्या सर्व संधि त्या कुवरामारख्या योग्य पुरुषाच्या ध्यानात आल्याशिवाय राहिल्या नसतील. परंतु त्याला परिस्थितीने नाडलें होतें. ज्या ज्या लहान पुढाऱ्यांनी जे लोक त्याच्या झेंड्याखाली लढण्यास आणलेले होते त्याच्यापैकी प्रत्येकाला अेकेक निराळीच लहर लागणार. अशा अनेक शहाण्यांच्या वेलगामी वादांचा निकाल बहुतेक वेळा भेसळ केलेल्या तडजोडीतच करावा लागे."

लॉर्ड मार्ककेर अझिमगडात घुसून तेथील अिंग्रजी सैन्यास जाअून मिळाला तरी कुंवरसिंहाचा अझिमगडवरचा पेच कमी झाला नाही. तें सर्व शहर बंडवाल्यांच्याच ताब्यात असून त्याचे आजूबाजूच्या मुलुखात त्यांनी पाळतीही ठेवलेल्या होत्या. आपल्या सैन्याचें खरें खरे बल किती आहे हे तावडतोब जाणण्याची कलाही सेनानीला अवश्य असावी लागते. आणि या कलेत जर कोणचा सेनानी अत्यंत चतुरता दाखवीत असेल तर तो कुंवरसिंह होय ! त्याने शत्रूचें बल जसें मापलेलें होते तसेच अचूकपणे त्याने स्वसैन्याचे गुणदुर्गुणही मापलेले होते. तेव्हा अिंग्रजांच्या तटबंदीवर हल्ला करण्याच्या भानगडीत तो मुळीच फारसा पडला नाही. अिंग्रजी तटबंदीवर किंवा अिंग्रजी बेयोनेटावर हल्ला करण्यापेक्षा वाटेल तें अितर दुर्घट कृत्य करण्यास शिपाओी धजत असत हें कुंवरसिंह लखनौच्या अुदाहरणावरून समजलेला होता. अेनदर्थ त्याने अझिमगड शहराचा ताबा कायम ठेवून व तेथील अिंग्रजांना बाहेर तोंड काढणे तेवढें अशक्य करून तो आपल्या धाडसी हृदयात दुसराच अेक

विलक्षण डाव योजू लागला. सत्तावनसाली रणांगणात अुतरलेल्या हजारो योद्धयांत नेहमीच दोन वर्ग दिसून येत. अेक स्वातंत्र्यतेजाचे दिव्य स्फूर्तीला शोभेल असेंच रणसन्मुख छातीशी छाती भिडली असताही अढळ समर करणारे व दुसरे बेवदी अवसानघात करणारे. कुमाराने आपल्या सैन्यातील पहिल्या प्रतीचे व जिवाला जीव देणारे असे करारी लोक निवडून काढून त्यांचें अेक खास पथक तयार केलें. सत्तावनसाली कोणत्याही अितर सेनानीने अंमलात न आणलेली ही युक्ति सिद्धीस नेल्याबरोबर कुंवरसिंहाने जो वर सांगितलेला आपला धाडसी बेत अंमलात आणण्यास कंबर बांधली व अझिमगडाजवळील नदीचे पुलावर आपलें हें निवडक सैन्य अुभें केलें.

कारण ह्या पुलासमोरूनच सर ल्युगार्ड नांवाचा जनरल अेका सबळ ब्रिटिश सेनेसह अझिमगडावर चालून येत होता. अर्थातच या जनरलला वाटलें कीं अझिमगडावरील ताबा सोडावा लागू नये यास्तव हेतूने कायतें कुंवरसिंहाची सेना त्या पुलावर गला आडवी आलेली आहे ! " But the wily chieftain had matured plans far deeper than even those about him could fathom."[२] ब्रिटिश जनरलचाच काय, परंतु त्याच्या अगदी नजीकच्या लोकांना देखील त्या कावेबाज राजपुताच्या मनात काय डाव जुळत आलेला होता हे समजलें नव्हतें; तो डाव हा होता की अिंग्रजांस तिथेच गुतवून टाकून मध्यंतरी आपल्या सेनेसुद्धा त्वरेने जगदीशपुरावर चालून जावें. ही युक्ति म्हणजे युद्धकौशल्याचा व युद्धधैर्याचा अुत्कर्ष होय. अझिमगडापासून गाझीपुरापर्यंत जाअून तेथून गंगानदीचे पात्र ससैन्य अुतरून जगदीशपूरला जिंकावयाचें व तें सर्व मागे असलेली ल्युगार्डची ब्रिटिश सेना व पुढे असलेली आराची ब्रिटिश सेना ह्या अुभयतांसही चकवून ! ह्या धाडसी बेताचे सिद्धिसाठीच त्या पुलावर त्या राजपुताने आपले अत्युत्तम तितकेच लोक ठेवलेले होते. ह्या सैन्याने त्या पुलावर ल्युगार्डला अितके वेळ थांबवावे की, अझिमगडात असलेल्या बंडवाल्याच्या सात आठ हजार सैनिकांना त्या शहराला वळसा घालून, तें शहर मागे टाकून, नीट गाझीपुराचे मार्गात सुखरूपपणें लागता यावें. गंगा अुतरून अेकदा जगदीशपुरच्या रानात जगदीशपूरचा सिंह शिरला की, पुन्हा रणक्रीडनाच्या नव विटी भवराज्यास आरंभ !

हा सर्व धाडसी प्रयत्न सिद्धीस जाणें हें, त्या तानू नदीच्या पुलावरील सैनिकांनो, सर्वस्वी तुमच्या शौर्यावर अवलंबून आहे ! कुंवरसिंहाची सर्व फौज अझीमगड सोडून शत्रूच्या टप्प्यातून पूर्णपणें बाहेर पडेतोपर्यंत तुम्ही या पुलावर सर ल्युगार्डला पाय टेकू देअू नका ? ह्या अढळ समरास तुम्हीच योग्य आहा म्हणून हजारो योद्धयातून तुमच्या त्या नायकाने तुमची निवड केलेली आहे. त्या त्याच्या विश्वासाला आपले शौर्य सत्पात्रतेला नेवो. अेक विचार, अेक निर्धार, अेक प्रतिज्ञा

२. Malleson, IV 330.

की आपले अिमगडचे हजारो बांधव पार निसटले आहेत ह्याची निशाणी मिळाल्या-शिवाय वाटेल तें झालें तरी हा पूल सोडणें नाही ! ब्रिटिशांसारखी सबल फौज तोफांसह पुढे भिडली आहे तरी हा पूल सोडणें नाही ! अकूणअेक मनुष्य ठार होअीतोपर्यंत पूल सोडणें नाही ! कुंवरची आज्ञा होण्यापूर्वी लढत लढत मेलो तरीही पूल सोडणें तर " पुनर्जन्म तत्क्षणी घेअुन पुन: पुन्हा लढणें ! " श्रीशिवराज रांगण्यास सुखरूप पोचेतो बाजी देशपांडे पावनखिंडीत जसा भाडला तशी स्वदेशाची अतुल पाडेगिरी स्वराज्याचे बाजीसाठी करून आज ह्या पुलाच्या खिडीलाही पावन करा ! फाजलखानाच्या सैन्याने जसे त्या अितिहासप्रसिद्ध खिंडीतील मूठभर मराठ्यां-वर हल्ल्यामागून हल्ले चढविले तसेच ह्या पुलावरील कुंवरसिंहाच्या चिमुकल्या सैन्यावर ब्रिटिश सेनानी ल्युगार्ड हाही हल्ल्यामागून हल्ले चढवून राहिला. परंतु त्या पुलावर त्याचा पाय अढळ राहीना. अिंग्लिशांच्या प्रत्येक हल्ल्याचे रोधाने ते वार तो पाड्य-पक्षीय सेनाकंदुक तितक्याच जास्त जोराने अुलट टप्पा घेअी. तिकडे अिमगडातील अेकूणअेक बंडवाले पूर्वसंकेताप्रमाणे गाझीपुराचे मार्गास लागले आहेत अशी वार्ता येअीतोपर्यंत तो स्वदेशाभिमानी पूल असा अप्रतिहत बळाने झुंजत राहिला.

" They held the bridge of boats with a resolution and perseverance worthy of veterans and it was not until they had by their long resistance assured the safety of their comrades that they fell back. "[३] जगदीशपूरचा मालक आपल्या सेनेसुद्धा अिमगडाहून सुख-रूपपणे पार झाला आहे अेतन्निदर्शक सांकेतिक निशाण पाहताच हे स्वातंत्र्यवीर कृतकृत्यतेच्या समाधानासह त्या पुलाला सोडून व्यवस्थेने मागे फिरले.

पाड्य सेनेने आपण होअूनच अेकाअेकी पूल सोडलेला आहे हे पाहताच ल्युगार्ड त्यावर घुसू लागला. तेव्हा त्याच्या लक्षात आलें की, कुंवरसिंह किंवा त्याची सेनाही अेखाद्या जादूगाराच्या निर्मितीप्रमाणे अिमगडाहून क्षणार्धात नाहीशी झालेली आहे ! निराश झालेल्या त्या ब्रिटिश सेनानीने घोडघावरच्या तोफखान्या-सह घोडेस्वारांना कुंवरसिंहाचा भयकर पाठलाग करण्यास धाडून दिलें. बारा मैल पर्यंत अिंग्रजी घोडे दवडले तरी कुंवरसिंह दृष्टीस पडेना—आणि जेव्हा तो दृष्टीस पडला तेव्हा अशा थाटाने पडला की पळणारे कोण व पाठलाग करणारे कोण हे ओळखणे समरांगणात अशक्य व्हावें ! अिंग्रजी सेनेला पाहताच बंडवाले भेदरून जाण्याचे अेवजी बडवाल्यांना पाहताच अिंग्रजी लष्करच भेदरून गेलें. कुंवरसिंहाचें सैन्य अेटीत अुभे राहून, आपल्या तरवारी अुपसून व बंदुका रोखून, कोपाने फण-फणत व तिरस्काराने गुणगुणत " began to abuse and tell us to come on. " बंडवाले आव्हान देअू लागले, " चल फिरंगी ! ये पुढे ! होअून जाअू देत

३. Malleson, Vol. IV, page 330.

न हात !" आणि फिरंगी पुढे येताच बंडवाल्यांनी असे दोन हात केले की
ग्रजांचे कित्येक योद्धे व अधिकारी रणभूमीवर ठार झाले, बंडवाल्यांचे चौकोन
वलासारखे अभंग राहिले, अिंग्रजांना स्वसंरक्षण करताकरताच नाकी नव आले
कुंवरसिंह आपल्या सैन्यासह गंगेच्या जास्त जास्तच नजीक चालला.

अिंग्रजी पाठलागाची ही दरिद्री वार्ता त्यांच्या प्रेतांसुद्धा अझिमगडास पोच-
च तेथून दहापाच तोफांसुद्धा नवीन ब्रिटिश सैन्य घेअून डग्लस त्या पाठलाग
णाऱ्या तुकडीला जाअून मिळाला. ह्या डग्लसला मुकतेच अझिमगडाकडे कुंवरच्या
वारीने पाणी चाखावयास मिळालेलेच होतें ! कुंवरच्या त्या थपडीस न विसर-
ग हा ब्रिटिश सेनानी मोठ्या सावधगिरीने त्याचा पाठलाग करीत नाघाअी ह्या
ाजवळ आला. येथे कुंवरसिंह त्याची वाट पहात अुभाच होता, ब्रिटिश सैन्य
ीस पडताच त्या सिंहकुमाराने आपलें शूरतम लोकांचें खास पथक शत्रूच्या
डावर नेले, व पुन्हा अेकदा त्यांना सांगितलें की माझी अुलट निशाणी होअीतो-
त शत्रूला निकराने झुजवीत ठेवावे. लगेच बाकीच्या सैन्याचे दोन भाग करून
ना कुमाराने निरनिराळ्या मार्गांनी पुढे कूच करण्यास धाडून दिलें. ते तिकडे
त आहेत तोपर्यंत ब्रिटिशांशी त्या मूठभर वीरांनी हटातटाची झुंज चालविली.
ऱ्या भयंकर तोफांना मारक असें अुत्कृष्ट साधन जवळ नसल्याने त्यांचे सवंगडी
पट मरत असताही ते तिळमात्र डगमगले नाहीत वा त्यांची रांग ढिली झाली
ी वा शिस्त बिघडली नाही वा अेकही पाय वेकवायतीने रणात रेंगाळला नाही!
: मैलपर्यंत ही भयंकर लढाअी चालली ! अखेर ब्रिटिश फौज दमली आहे हें
या लटपटणाऱ्या तगड्यावरून पाहताच बंडवाल्यांचे निरनिराळ्या मार्गांनी
ठलेले दोन सैन्यभाग चटकन अेकत्र झाले व आपल्या त्या सर्व सैन्यासह कुंवर-
गंगापात्राच्या जास्त जास्तच नजीक आला.

त्या अेप्रिलचे १७-वीचे रात्री हें दमलेले ब्रिटिश सैन्य अथुसिखा गावी झोपी
पहाटेच डग्लस पुढे चालला तों बंडवाले त्याच्याही पुढे १८ मैल गेलेले होते !
सर्व दिवस ब्रिटिश घोडे व तोफखाना बंडवाल्यांच्या शोधात चाललेले होते.
; ब्रिटिश पायदळ फार मागे पडू लागले. तेव्हा आज रात्री कुंवरसिंहापासून
मैलावर ब्रिटिश सेना पुन्हा अेक झोप ताणावयास अुतरली. कुंवराचे हेर
वार्ताहरणात अतुल कुशल होते. त्यांनी अिंग्रज झोपी गेल्याची वार्ता क्षणार्धात
ताच कुंवर खाडकन अुभा राहिला व शत्रूच्या झोपाळूपणाचा फायदा घेण्याचा
निश्चय केला. तो अैंशी वर्षांचा म्हातारा वृद्ध रजपूत आपल्या सर्व सेनेसह
मध्यरात्रीच्या अंमलात तेथून जो तडक निघाला तो शिकंदरपूरला भिडला,
नदी अुतरला, गाझीपूर प्रांतात शिरला, थेट मनोहर शहरापर्यंत चाल करून
ा व आपल्या श्रमलेल्या, दमलेल्या, भुकेलेल्या सैन्याला क्षणभर विसावा देण्या-
तेथे जरासा थाबू लागला. कुंवरचें सैन्य आता अत्यंत श्रमी झालेलें होतें.

मनोहर गांवाची जागा फारशी बळकट नसताही तिथे विसावा घेण्यासाठीं थांबणें म्हणूनच त्यांना भाग पडलें होतें. ह्या गावी बंडवाले पुढे जाणें असंभव होऊन थांबले आहेत असे अैकताच डगलसही धावू लागला व तारीख २० अेप्रिललाच त्या मनोहर गावी येऊन थडकला. या दिवशी त्या थकलेल्या बंडवाल्यांचा नेट सुटला व अिंग्रजी सैन्याने त्यांचा पराजय करून त्यांचें गाड्या, रसद वगैरे सामान पाडाव केलें. परंतु म्हणून तो वृद्ध युवा किंवा त्याचा धीर हा थोडाच पाडाव होणार होता! पराजयाचें चिन्ह दिसलें मात्र तो पूर्वीच योजून ठेवलेला युक्तिबाज हुकूम सुटला. कुंवरची सेना अेका दृष्टिपातावरोबर लहान लहान कित्येक तुकड्या करून रणांगणातून भरंकन अदृश्य झाली व अेका ठरलेल्या तासाला ठरलेल्या ठिकाणी त्या सर्व भिन्नभिन्न तुकड्यांनी अेकत्र व्हावें असा गनिमी कावा योजिला गेला ! पण हें सांकेतिक ठिकाण कोणचें असावें याचा ब्रिटिश सैन्याला बिलकुल सुगावा लागेना. तेव्हा आपला हा विजय निष्फळ झालेला पाहून ब्रिटिश सैन्य चुरमुरे खात तिथेच थांबलें. परंतु कुंवरसिंह मात्र आपल्या सैन्यासह गंगापात्राच्या जास्त जास्तच नजीक चालला !

गंगापात्राच्या जास्त जास्तच नजीक चालला ! आतां भयंकर दायतीला जिंकून तो गंगापात्राला भिडलाही ! मागे अिंग्रजी फौज धौडत आलेली होती. परंतु तिला तोंड देण्यास आता त्याच्या सैन्याला त्राण किंवा वेळ अुरलेला नव्हता. म्हणून त्या कावेबाज वृद्धानें दुसरीच अेक शक्कल योजिली. त्यानें प्रांतात जिकडे तिकडे अशी वार्ता अुठविली की बोटी मिळणें शक्य नसल्यामुळे कुंवरसिहाचें सैन्य हत्तीवरूनच बालिटिलानजीक गंगापार होणार आहे. ही बातमी अिंग्रजाच्या हेरानी हेरून डगलसला कळविताच त्याला धन्यता वाटली की शाबास आहे या हेराची ! आता कुंवरसिंह कुठे जातो ! त्याची ही अतर्वार्ता मला मिळाल्याने त्याला त्याच्या हत्तीसुद्धा मी गारद करून टाकणार ! म्हणून ब्रिटिश सैन्य बालिटिला-नजीक जाऊन त्या अवजड हत्तींची वाट पहात दडून बसलें. शूर वीरहो, खुशाल दडून बसा ! या तुमच्या स्वयप्रणीत कैदेत तुम्ही अडकून पडला आहा व कुंवर-सिंहाचे हत्ती आता येतील, मग येतील म्हणून अिकडे झोपा काढीत आहा त्याच वेळेला ७ मैलावर कुंवरसिंह गंगा अुतरूनही चालला. आपण हत्तीवरून गंगा अुतरणार या वार्तेनें अिंग्रजास बालिटिलाकडे भुलवून नेताच कुंवरने जरूर तितक्या बोटी तावडतोब जमविल्या व रातोरात त्याचें सैन्य सेयोपूर घाटापाशून श्रीगंगेच्या जलाशयात प्रवेश करितें झालें. आपली झालेली फसगत अिंग्रजाचे ध्यानात येताच ते चवताळून पहाटेच्या सुमारास सेवोपूर घाटावर तुटून पडलें व त्यांनी पाडाव पक्षाची अेक बोटही बुडवून टाकली—परंतु ती शेवटची चोट होती ! सर्व सैन्य कुमाराने आधीच गंगेपलीकडे नेलेलें होतें व अेका क्षणा दो क्षणात आपल्या सैन्याचें नदीतरण सुरक्षित झालेलें पाहताच तोही अुतरून पार पडला—परंतु, हाय हाय !

अेका दाणाने केवढा घात केला ! भारतभूमीचा तो सौभाग्यतिलक, वीरांगणाचा तो अभिमान, ती स्वतंत्रतेची तरवार—राणा कुंवरसिंह ! गंगेच्या पात्रामध्ये मधोमध गेला असता शत्रूची अेक गोळी आली व ती त्याच्या हातामध्ये फोफावत घुसली. हे पाहताच त्या भीष्माने काय केलें ? तो अश्रु ढाळू लागला काय ? रक्ताचा पूर बंद व्हावा म्हणून कोणाची मदत मागू लागला काय ? काय त्याचें आसन त्या तीव्र वेदनेने किंचित् तरी ढळू लागलें ? नाही, नाही, तसें काही अेक झाले नाही. हातावरील माशीअितका देखील तो थरारला नाही. त्याने त्या गोळीकडे अेकदा तिरस्काराने पाहिलें, व कुंवरसिंहाला क्षणैक तरी मी अस्वस्थ केलें असा त्या फिरंगी गोळीलाही डौल मारता येअू नये, असें त्याला वाटलें. त्याने आपल्या दुसऱ्या हाताने आपली तरवार अुपसली, त्या फिरंगी गोळीने दुष्ट झालेला तो हात कोंपरापासून छाटून टाकला आणि तो छाटलेला तुकडा गंगेला अर्पण करताना गंभीर गर्जनेने कुंवरसिंह अुद्गारला " हे मातर्, हे गंगे, बालकाचा हा दीपोपहार मानून घे. ![४] भागीरथीला ' हे मातर् ' ' हे मातर ' म्हणणारे शेकडो पृथुजन आजपर्यंत जन्माला आले व येतील; परंतु कुमारपाल, तुझ्यामुळे ती देवी जाह्नवी पुत्रवती झालेली आहे ! ' नक्षत्रतारागृहसंकुलापि, ज्योतिष्मती चंद्रमसैव रात्रिः ।'

त्या लोकोत्तर कुमाराने हा अलौकिक दीपोपहार आपल्या त्रिलोकविख्यात मातृगंगेला अर्पण करताच तिच्या शीत तुषारांनी त्याचें देहसिंचन केलें व ह्या मातृप्रेमाने अुत्साहित झालेला तो वीरवर आपल्या सैन्यासह गंगापार होता झाला. त्याच्या मागची अिंग्रजी फौज हताश होअून गंगेच्या अलीकडेच कुंवरसिंहाचें नाव घेणें सोडून देअून स्वस्थ बसली होती. तेव्हा निर्वैर झालेला तो सिंहकुमार शहाबाद प्रांताच्या आपल्या जन्मसिद्ध जंगलांत पुन्हा अेकदा घुसू लागला. तारीख २२ अेप्रिलला त्याने जगदीशपुरातही प्रवेश केला व अशा रीतीने ज्या राजवाड्यातून त्याला सुमारे ८ महिन्यांपूर्वी अिंग्रजांनी हुसकून दिलेले होतें त्याच जगदीशपूरच्या राजवाड्यात त्याचा स्वकीय राजा पुन्हा अेकदा विराजू लागला ! कुंवरसिंह गंगा अुतरून येताच त्याचा तुल्यवीर्य बंधु अमरसिंग हजारो सशस्त्र गांवकऱ्यांसुद्धा त्याला येअून मिळाला होता. ह्या लोकांना व गंगा अुतरून आलेल्या शूर शिपायांना कुंवरसिंहाने जगदीशपूरच्या आजूबाजूने जंगलात मोक्यामोक्यांवर ठेवून दिले व गनिमी काव्याने विजयश्री पावलेला तो वीरतेचा रणवरा रणासाठी सज्जचाप होअून रणांगणात पुन्हा अुतरला.

आणि पुन्हा रणांगण जुंपले ! कुंवरसिंह अितक्या तडफेने जगदीशपुरावर येअून कोसळला होता की नजीक असलेले आराचे ब्रिटिश सैन्यास त्याचे आगमनाची वार्ताही

४. आर्यकीर्ति " by रजनीनाथ गुप्त of Bengal.

नव्हती. तेव्हा जगदीशपूरचे राजवाड्यात कुंवरसिंह पुन्हा शिरलेला आहे हें अैकून आराचा अिंग्रजी सेनानी ली ग्रँड हा क्रोधाने लालभडक झाला. पूर्व अयोध्येपासून अिंग्रजी सेनेला थपडा मारीत मारीत ह्या कुंवराने गंगा अुतरावी व खुद्द माझ्या छातीवर चालत येअून जगदीशपुरात राज्य करूं लागावें ! पुरते आठ महिने झाले नाहींत तर होअर ह्याच जंगलात कुंवराची खोड मोडण्यास शिरलेला होता. तमाच आज मीही शिरेन व ह्या सर्व अपमानांचा सूड अुगवून तमाच विजयीही होअीन असा निश्चय केलेला तो ताज्या दमाचा ब्रिटिश सेनानी ४०० योद्धे व २ भयंकर तोफा घेअून ता. २३ अेप्रिलला जगदीशपुरावर तुटून पडला. आता या रणात कुंवराने कसा टिकाव धरावा ? तो आजपर्यंत अेकसारखा लढत लढत अुभाचा अुभा आहे. त्याच्या सेनेला कित्येक दिवस पोटभर खावयास वा घटीभर निजावयास वेळ मिळालेला नाही. नुकता कालच तो या महाप्रवासानंतर जगदीशपूरच्या वाड्यात आलेला—त्याला व त्याच्या सैन्याला अेका दिवसाचीही फुरसत मिळालेली नाही ! त्याचें सैन्यही ह्या वेळेस मिल्लिसांच्याच रिपोर्टाप्रमाणे—" disjointed, badly armed and without guns " होतें ! त्याच्याजवळ अेकही बंदूक नाही, त्याचे हताश लोकांची संख्या जेमतेम दीड हजारापर्यंत, त्यांच्या पाशीं मोडकीं तोडकीं शस्त्रें व त्याच्यात शिक्षित शिपाअी केवळ तुरळक आणि खुद्द त्या वृद्ध सेनानीचा हात कालच जबर जखम लागून तुटलेला ! अशा पांढच सेनेवर तोफांसह, ताज्या दमाच्या, अुत्तम शिस्तेच्या लोकांच्या आगलेमेनेसह ली ग्रँड चालून आलेला ! ह्या असमान झुंजीत विजय अिंग्रजांना मिळणारच मिळणार ! तो अिंग्रजी वीर जगदीशपूरच्या दाट झाडीत घुसला. या झाडीची लांबी दीड मैलच होती. झाडीत जाताच कुंवरचे लोकांवर अिंग्रजी तोफा गडगडत मारा देअू लागल्या. कुंवरपाशीं तर तोफा नाहीत ! परंतु असें असताही त्याचें सैन्य आपल्या तोफांची चेष्टा करीत आपल्याला कोंडू पहात आहे. मग नर मोडा आता निर्वाणीचा बाण ! अिंग्रजी सैनिकांनी नेटाचा हल्ला चढविण्याचा निश्चय केला. ते काळदूतामारखे कुंवरावर तुटून पडले, कुंवराची सेना झाडीतून त्याला तोंड देअू लागली—त्यासरशी ब्रिटिश सेनेतील सर्व अवसान अेकाअेकी सुटून पिछेहाटीचे शिंगही फुंकले गेलें ! कुमाराने अिंग्रजी सैन्यास अशा जागी व अशा रीतीने कोंडलेले होतें की, तेथे अुभें रहाणें व तेथून पळणें हीं दोन्हीही कृत्यें मारखींच मारक होतीं !

अिकडे कुंवरसिंहाच्या आज्ञेने त्याच्या राजवाड्यातील सारें महत्त्वाचें सामान अन्यत्र धाडून दिले होते. तसेच सरकारी कागदपत्र जाळावयाचे मना करून त्याने शिपायांस सांगितलें की, आपण अिंग्रजाना या देशातून हुसकून दिले म्हणजे

यथार्थ रीतीने वसूल व न्याय करण्यास हे कागद अवश्य ठेवले पाहिजेत. लोकांना त्याचा अेवढा आदर वाटे की, त्याच्यासमोर कोणी धूम्रपान करण्यासही धजत नसे.[५]

तारीख २६ अेप्रिलला अिंग्लिश सैन्याला असें अगदी चारी मुंडीवर चीत केल्यानंतर तो वृद्धयुवा राणा कुंवरसिंह आपल्या जगदीशपूरच्या राजवाड्यात विजयश्रीसह प्रवेशता झाला !

हा त्याचा शेवटचा प्रवेश होता. कारण जगाच्या रंगभूमीवर आता कुंवरसिंह पुन्हा कधीही प्रवेश करणार नाही ! त्याच्या हाताला गंगापात्रात जी जबर जखम झालेली होती ती विकोपास जाऊन तो रजपूत कुलावतंस राणा कुंवरसिंह ह्या विजयापासून तिसऱ्या दिवशी तारीख २६ अेप्रिल रोजी आपल्या पूर्वजार्जित राजवाड्यात स्वतंत्रतेच्या निशाणाखाली चिन्मयरुपी लीन होता झाला ! तो जन्मला तेव्हा त्याची भूमि स्वतंत्र होती आणि त्याचें प्राणोत्सरणही स्वतंत्रतेच्या निशाणाखालीच झालें ! ज्या दिवशी तो मेला त्या दिवशी जगदीशपूरच्या वाड्यावर अिंग्रजाचें निशाण फडफडत नसून त्याच्या स्वदेशाचा व स्वधर्माचा स्वातंत्र्य-ध्वजच झळकत होता ! रजपुताला यापेक्षा पुण्यतर मरण तें कोणतें यावयाचें आहे ?

त्याने आपल्या अपमानाचा सूड अुगविला, त्याने आंग्ल सैन्यासारख्या प्रबळ शत्रूलाही आपल्या तुटपुंज्या साधनांनी रणांगणात अनेकदा दाती तृण धरावयास लावले, त्याने स्वधर्माशी धर्मद्रोह वा स्वदेशाशी देशद्रोह केला नाही, त्याने आपल्या भूमीच्या दास्यशृंखला तोडून तिला स्वतंत्र केली, आणि रणात आज अेंशी वर्षांच्या ह्या वृद्ध कुमारसिंहाला विजयश्रीने अलौकिक आलिंगन दिलेले आहे, तर हे सिंह-कुमारा हाच मुहूर्त, हीच पर्वणी, हे धर्मपक्षीय भीष्माचार्या, हेंच अुत्तरायण, तर तू तुझ्या वीरतनूचा त्याग कर ! आणि तोही रोगाने नव्हे तर रणांगणातील जखमांनी ! जसें तुझें आयुष्य तसें तुझें मरणही लोकोत्तर ! म्हणूनच तो कुमारसिंह त्या दिवशी मेला. रजपुताला यापेक्षा पुण्यतर मरण तें कोणतें यावयाचें आहे ?

श्रीकुमारसिंहाची भूमिका ही अेखाद्या वीर काव्याच्या नायकस्थानी शोभू शकेल. सत्तावनच्या क्रांतियुद्धाला जर कोणी सर्व दिशेने योग्य असा पुढारी शोभत असेल तर तो कुमारसिंह होय. युद्धकलेत तर त्याचा कोणीही हात धरणारा नव्हता. स्वातंत्र्ययुद्धात गनिमी काव्याचें किती महत्त्व आहे हें प्रथमतः कुमाराने ओळखले व शिवरायाच्या गनिमी काव्याची बरोबर नक्कल कशी करावी हे त्यानेच काय ते सिद्ध करुन दाखविलें. तात्या टोप्याच्या व कुंवरसिंहाच्या युद्धचातुर्याची तुलना केल्यास कुंवरची गनिमी पद्धतच जास्त बिनतोड होती असें दिसून येअील. तात्यानी गनिमी काव्याच्या निषेध रूपात अत्यंत चातुर्य प्रकट केलें. परंतु कुंवरने निषेध रूपाप्रमाणेच

५. आर्यकीर्ति by रजनीनाथ गुप्त of Bengal.

विधिरूपातही वृकयुद्धाची पूर्णता करून दाखविली. तात्यांनी सैन्याचा नाश तेवढा होऊं दिला नाही. परंतु कुमाराने तें करून शिवाय परसैन्याचाही वेळोवेळी नाश केलेला आहे. गनिमी काव्यात पूर्ण विजय येण्यासाठी ही सावधगिरी घेणे भाग असते की मोठ्या शत्रूच्या पुढून नेहमी पळत असता त्या अपजयांनी स्वकीय सैन्य हताश वा भयभीत न झालें पाहिजे. जाणून बुजून स्वीकारलेल्या पराजयांनी त्यांची आत्मनिष्ठा सुटणार नाही व लढाईच्या वारंवार चाललेल्या टाळाटाळीने लढाईचा त्यांना कायमचाच धाक बसणार नाही ह्याबद्दल वृकयुद्धाच्या सेनानींनी नेहमी काळजी घेतलेली असावी. लढाई टाळणें ही गोष्ट निराळी व लढाई देण्यात भित्रेपणाने अपयश घेऊन मागे फिरणे ही गोष्ट निराळी. तेव्हा गनिमी काव्यात भित्रेपणाने अपयश घेऊन केव्हाही मागे फिरू नये तर लढाई देणेंच झालें असता अशा रीतीने द्यावी की शत्रूला आपल्या शौर्याचा जबर धाक व आपल्या सैन्याला आत्मनिष्ठेची स्फूर्ति प्राप्त व्हावी. मुख्य खुबी जी सेनानीच्या अंगी पाहिजे ती ही की, आपलें फार नुकसान होईल अशा ठिकाणी तोंड देणेंच टाळीत जावें. परतु जेव्हा तोंड लागेल तेव्हा असें शौर्य गाजवावें कीं जसें बाजीने पावनखिंडीत वा कुमाराने तानुनदीवर गाजविलें. सारांश फायदेशीर नसल्यास लढाई टाळावी, फायदेशीर असल्यास लढाई द्यावी, परंतु केव्हाही रणामध्ये भित्रेपणाने वा बेशिस्तीने बदलौकिक करून घेऊ नये. शौर्याने अशी झुज घेत रहावी की रणात अपयश आलें तरी जगांत सत्कीर्तिच वाढली पाहिजे. म्हणजे शत्रूला धाक बसतो, स्वसैन्यात अनीति वाढत नाही, शिस्त सुटत नाही, उत्साह वाढू लागतो, शौर्याचा उत्कर्ष होतो, विजय हटकून मिळतो. शत्रूने आपल्याला शौर्याने जिंकले असे कधीही होऊं देऊं नये ही गनिमी काव्याची किल्ली आहे.

परंतु तात्यांनी गनिमी काव्याच्या या विधिरूपाचा अवलंब पुष्कळ वेळा केलेला नव्हता. ते नर्मदा उतरत असताना व कुंवरसिंह गंगा उतरत असताना त्या उभयतांच्या युद्धकौशल्यात हा फरक कसा वगत होता हे स्पष्ट दिसतें. तात्यांना सैन्याच्या भित्रेपणाने वारंवार पराजय घेणें भाग पडे, परंतु कुंवरने मागे हटताना शत्रूला शौर्याची फुशारकी सुरू न देता जेव्हा जेव्हा संधि सापडली तेव्हा तेव्हा उलट थपडाही अशा लगावल्या की, रणामध्ये त्याच्याच सैन्यात जास्त आत्मनिष्ठा व वीरस्फूर्ति कायम असे. तात्यांना त्यांच्याच मताप्रमाणे बहुधा चालता येत नसावे व म्हणून त्यांना जें मनात तितकें त्या परिस्थितींत करता येत नसावे; परंतु कुंवरसिंगाने गनिमी काव्याने लढत असताही शिवभूपाप्रमाणे सैन्यात कातरता व अनीति शिरू दिली नाही व लढाई टाळणें व लढाई मारणें ह्या विधि-निषेधानी वृकयुद्धाच्या उभय स्वरूपाचाही अवलंब करण्यात अप्रतिम युद्धकौशल्य दाखविले व म्हणूनच त्यास इंग्लिश सैन्याचे छातीवर नाचत नाचत पवित्र विजयानंदांत व स्वकीय राजमंदिरांत, स्वतंत्रतेच्या निशाणाखाली व देवदूतांच्या पंखाखाली पुण्यपावन मरण मरता आले !

इ. स. १८५८ साली तारीख २६ ऐप्रिलला हा दिव्यपुरुष देवलोकाला जाताच त्याच्या तत्त्वाचा, त्याच्या ध्येयाचा, त्याच्या सैन्याचा, व त्याच्या ध्वजाचा सर्व भार आपले शिरावर घेऊन कुंवरसिंहाचा कनिष्ठ बंधु अमरसिंह हा गादीवर चढला. कुमारसिंहाचा हा भाऊ अमरसिंह अेकाच सिंहाच्या गर्भगुहेत संभव पावलेले ते दोन केसरी किशोर आपल्या प्रखर नखराच्या तैक्ष्ण्यात परस्परतुल्य होते. भावाच्या मरणाने त्या लढाअीला यत्किंचितही शैथिल्य न येऊ देता पुरते चार दिवसही विश्रांति न घेता हाही रणपंडित राणा अमरसिंह आरा शहरच्या दारावर तडाखे देऊ लागला, लीग्रँडचा पराजय झालेला अेकून मागे गंगाकाठीच थांबलेला ल्युगार्ड, ब्रिगेडियर डग्लस हे आपआपल्या ब्रिटिश फौजांसह अमरसिंहावर मेच्या तिसऱ्या तारखेस चालून आले. भिहिया, हतमपुरा, दलितपुरा, येथे दर दोन तीन दिवसाआड वडवाल्यावर अिंग्रजांनी मारा करावा, जगदीशपूरही अिंग्रजी फौजांनी ताब्यात घेतले. तेव्हा सबळ सैन्याचे कचाट्यातून सुटण्यास आता अमरसिंहाने हे पराभव टाळण्याची विनतोड युक्ति काढलेली होती. त्यानी रणांगणावर आपआपल्या सैन्याची लहान लहान पथकें करावी व पराजयाचा रंग दिसताच त्या पथकानी भराभर जिकडेतिकडे पांगून जावें. त्या प्रदेशातील अिंचाअिंचाची त्याना माहिती असल्याने ठरलेल्या तासाला हीं सर्व विस्कळीत पथकें ठरलेल्या ठिकाणी गोळा व्हीत व पुन्हा अिंग्रजाच्या छातीवर किंवा पाठीवर नाचू लागत. अशा अदृश्य सैन्याशी अिंग्रज कसे लढणार! प्रत्येक विजयाचे वेळी त्यांना वाटावें आता मात्र बंडखोरांची पूर्ण वाताहत झाली आहे–परंतु दुसरे दिवशी पहातात तों तें सैन्य कालच्या प्रमाणेच जितकेंचें तितकें जमलेले आहे! तारीख २७ मेपासून तर त्याचें सैन्य अिंग्रजाना मुळी दिसेनासेच झालें. अेखाद्या भूतबाधेप्रमाणे त्या सर्व प्रांतात ब्रिटिश सत्तेचे रंध्ररंध्राला पछाडीत असताही अमरसिंह तिला प्रत्यक्ष काही दिगत नव्हता. अेका टोळीने राजपूर घ्यावें, तर दुसरीने दमरान घ्यावे, तर तिसरीने कर्मनाशेवरील रेल्वेचे कारखाने धुळीस मिळवावे! जंगलाच्या ह्या टोकावरून अमरसिंहाला हुसकला की जंगलाचे ते टोक त्याने जिंकून घेतलेच, जंगलाच्या त्या टोकाकडे अिंग्रजी सैन्य धावत गेले की ह्या टोकावर अमरसिंह पुन्हा राज्य करू लागला! शहाबाद प्रांतातील यच्चयावत् लोकसमूहाची सहानुभूति व सहकरण मिळत असल्याने अमरसिंहावरोबर रणाचा डाव खेळताना ल्यूगार्डची व त्याच्या विस्तीर्ण फौजेची हाडें अगदी खिळखिळी झाली. तारीख १५ जून रोजी हतारोग्य, हतवीर्य, हताश झालेला तो ब्रिटिश सेनापति आपल्या जागेचा राजिनामा देऊन अिंग्लंडला गेला व त्याची दमलेली फौज विसावा घेण्यासाठी छावणीत शिरली!

हें पहाताच त्या लहान लहान टोळ्या अेकत्र होऊन जगदीशपूरचा राणा अमरसिंह व त्याचे सैन्य हे रणागणात पुनर्दर्शिभवन पावले नि विजयस्फूर्तीनें स्फुरण चढलेलें सैन्य तिकडे गयेला तुरुंगात टाकलेले सर्व बडवाले तेथील अिंग्रजी नोकरीतील

पोलिसांनीच मुक्त केलें आणि त्यासरसीच गया शहर स्वतंत्र झालें व शिकडे आराच्या शिंग्रजी सैन्याला युक्तीने बाहेर भुलवून नेशून त्या शहरावर अमरसिंहाचा झेंडा अेकाअेकी चालून गेला ! असा जिकडे तिकडे अमरसिंहाने कहर अुसळून दिला आणि आता जुलैच्या सुमारास त्याने पुन्हा अेकदा जगदीशपुरात प्रवेश केला ! जुलै अुलटली. ऑगस्ट अुलटला. सप्टेंबर अुलटला तरी जगदीशपुरावर स्वातंत्र्याचा जरिपटका प्रत्येक सूर्यकिरणात झळकत होता ! ब्रिगेडियर डग्लस सारखा आंग्ल सेनानी व ७००० अिंग्रजी सेना त्या चिमुकल्या राण्यावर दात ओठ खाअून तुटत होती. त्यांचे शिर आणावयास किंवा त्याचे बेत फोडावयास कित्येक देशद्रोही लोकही त्याचे सैन्यात पैशाचे लालचीने घाडलेले होते; जंगलांतून निरनिराळे नवे मार्ग पाडले होते; नावयानाक्यावर ब्रिटिश सैन्याची कायमची रांग बांधली होती. परंतु काही केल्या जगदीशपूरचा राणा हैराण होअीना. त्याच्या अनंत झटापटींच्या सर्व कथा देण्यास स्थलावकाश नाही. अितकें सांगितलें म्हणजे पुरेसें आहे की स्वतंत्रतेच्या पुण्यरणात आमरण अशाच पूर्णवीर्याने तो रणसिंह राणा अमरसिंह समरांगणात दंग झालेला होता !

शेवटी त्याला जगदीशपुरास कोंडून ठेवून, गाडून टाकण्यासाठी सात निरनिराळ्या अिंग्रजी सेना जगदीशपूरचे सर्व मार्ग बंद करीत चालून आल्या. प्रांतातून या दोन्यांच्या जाळ्यानी सर्व बंडवाले हुमकीत हुसकीत ऑक्टोबर १७-ला तो कालपाश जगदीशपूरच्या सीमेला भिडला. हाय, हाय ! आता या काळपाशात तो स्वातंत्र्यप्रिय सिंह अखेर सापडणार आहे ! ठरलेल्या तासाला या अमोघ बलाच्या सातही आंग्ल सेनानी जगदीशपुराला अकस्मात् येअून वेढावें असा निकराचा हुकूम सुटला व त्या बरहुकूम पूर्णपणे कोंडून टाकलेल्या जगदीशपूरच्या पिंजऱ्यावर ह्या निरनिराळ्या आंग्लसेना निश्चित घटीला अेकदम येअून कोसळल्या आणि त्या पिंजऱ्यातील अमरसिंहावर कठोर वार पडला ! पण शाबास अमरसिंह, शाबास ! त्या वाराला पिंजरा सापडला पण सिंह नाही तो नाहीच सापडला !

कारण सहा सेना सहा मार्गांनी अचूक आल्या तरी सातवी सेना यावयास पाच तासाचा अुशीर लागला ! व या अुशिराचा कुशाग्र अमराने सुशीघ्र फायदा घेअून तो त्याच वाटेने व त्याच पांच तासात ससैन्य पसार झाला ! त्या सात दोरी जाळ्याची ही सातवी दोरी तुटताच सिंह हसत हसत बाहेर निसटला व भक्ष्यार्थ लावलेले ते जाळें त्याच्याच नखाग्रांत गुतून ते पूर्णपणे फाटून गेले !

अेतदर्थ आता अशी जाळीं विणीत बसण्याचा नाद सोडून देअून अिंग्रजानी घोड्यावरील पायदळाचे अेक निवडक पथक तयार केलें व त्या पथकाने बंडवाल्याचा सदोदित पाठलाग करावा म्हणून धाडून दिले. हा अखंड ससेमिरा अमरसिंहाचे पाठीला लागताच त्याला क्षणभर विसावा घेणे अशक्य केलें शिवाय अिंग्रजांपाशी आता अेन्फील्ड रायफल्स ह्या नवीन बंदुका देण्यात आल्यामुळे त्यांच्या लांब

पल्याच्या माऱ्यापुढे बंडवाल्यांची मस्केट बंदूक चांगलेसें काम करीना. तारीख १९ ऑक्टोबरला बंडवाल्यांच्या पिछाडीला अिंग्रजांनी प्रथम अेका गावात कोंडलें व त्या लोकांपैकी तीनशे लोक कापून टाकले. अुरलेले शंभर अेक खेडेगावांतून लढत बाहेरच्या शेतात पिसाळलेल्या वाघासारखे घुसले. परंतु त्यांच्या भोवती ब्रिटिशांच्या नवीन कुमकेने वेढा दिलेलाच होता. तेव्हां ब्रिटिशांनी तरवार घेअून त्यांच्यापैकी सर्वजण ठार केले. फक्त तीन असामी काय ते जवळच्या अुसाचे रानात छपून बचावले आणि या तीन जणांतच वेषधारी रणझुंजार अमरसिंह होता! येथून बचावल्यानंतर अमरसिंहाची सेना कैमूर पर्वतात धुमू लागली. मागोमाग ती पाठलाग करणारी ब्रिटिश सेना घुसली–तिच्याशी त्या पर्वतातील प्रत्येक खडकावर व प्रत्येक शिखरावर लढाअी देत देत पाडच पक्षाची ती स्वातंत्र्य पृतना (पलटण) डिसेंबरचे शेवटी शेवटी रणात रक्तसमाधि घेती झाली! अशा रीतीने बहार प्रांतातील स्वातंत्र्यसमराची बहार अुडाली! तरी राणा अमरसिंह शत्रूचे हाती सापडला नाही. राणा अमरसिंह तर काय, त्याची अंतिम वृत्तान्तवार्ता देखील शत्रूचे हाती अजूनपर्यंत पडलेली नाही! अंतिम वृत्तान्त कोणासही कळवू न देता जर सदेह स्वर्गगमन करण्याची भूलोकीच्या मनुष्याना स्वर्लोकीचे देव गंधर्व केव्हा तरी परवानगी देत असतील तर त्या मानाला या मर्त्य जगात केवळ अमरसिंहच योग्य होता, हे निर्विवाद आहे.

* * *

प्रकरण नववें

# मौलवी अहमदशाह

लखनौचा नि पात झाल्यानंतर अयोध्या व रोहिलखंड येथील बंडवाल्यांना आता सबल मुख्य केंद्र असे अुरले नव्हते. दुआब प्रांतात व बहार प्रांतात अिंग्रजांच्या पुनर्विजयाची लाट समोर येणाऱ्या बाधवधाऱ्याना घडकीमागून घडकी देअून जोराने फोफावत चालली असता तिकडेही ह्या प्रांतातील पाडच पक्षीय पुढाऱ्यांना आश्रय मिळणारा नव्हता अशा स्थितीमुळे त्याना वडाचे आरंभीच जी युद्धपद्धति सुचली नाही ती माहजिकपणेच सुचली व ती अवलबून अिंग्रजांशी माडलेले हें तुमुलयुद्ध पुढे लढवीत ठेवण्याचा त्यांनी निश्चय केला. फरक जितकाच की, वडाच्या पहिल्या आवेशात जर हा मार्ग स्वीकारला असता तर तो यशस्वी होण्याचा फारच जास्त संभव होता. परंतु आज अपजयानी खचल्यानंतर त्या मार्गात पाय ठेवलेला

असल्यामुळे अंतिम यशापर्यंत चालत जाणें फार दुष्कर झालें होतें. तथापि दुष्कर असो, सुकर असो, अुपसलेली तरवार शरण म्हणून खाली ठेवणें नाही अशा निर्धारानें अयोध्येतील बंडखोर पुढाऱ्यांनी लखनौ पडताच गनिमी पद्धति स्वीकारून रोहिलखंडातील बंडवाल्यांच्या निरनिराळ्या चमूसमूहांत खालील प्रख्यात जाहीर हुकूम सोडला :

" फिरंग्याच्या संघटित फौजांशी तोंड देण्याचा प्रयत्न करू नये. कारण बंदोबस्तात, शिस्तीत व कवायतीत त्या फौजा तुमच्याहून श्रेष्ठ आहेत व त्यांच्या जवळ मोठमोठाल्या तोफा आहेत. तर त्यांना अुघड रणाची लढाअी न देता छाप्याछाप्यांनी त्यांच्या हालचाली रोखीत चलाव्या, नदचोंवरील सर्व घाट दाबून धरावे, त्यांचें दळण वळण तोडून टाकावें. त्यांची रसद पाडाव करावी, डाका लुटून त्यांच्या ठाण्यांना ठार मारावीं व त्यांच्या तळाभोंवती अखंड घिरटी घालीत रहावें, फिरंग्याला विश्रांति म्हणून मिळाली न पाहिजे. " [१]

ह्या स्फूर्तिकारक, काबेबाज व करारी युद्धलेखाचें प्रत्यंतर कृत्यात दाखविण्यासाठी मौलवी अहमदशाह हे अिंग्रजांच्या लखनौ येथील सैन्यावर रोख ठेवीत सुमारें २९ मैलांवर बारी नजीक ससैन्य टपलेले होते व दुसऱ्या बाजूला बेगम हजरतमहाल हीही ६ हजार लोकांसह बिरोलीनजीक अुतरलेली होती. ह्या दोन्ही सैन्यांचा समाचार घेण्यासाठी होप ग्रँट हा तीन हजार लोकांसह व प्रबळ तोफखान्यासह लखनौहून प्रथम बिरोलीचे रोखानें चालला. दुसरे दिवशी त्याचा तळ पडलेल्या जागी अेक परम धाडसाची गोष्ट अुघडकीस आली. आपल्यावर अिंग्रजी सैन्य चालून येत आहे हें अैकताच त्या सैन्याची अितथभूत बातमी काढण्यासाठी मौलवीनें आपले हेर धाडले त्या रात्री ही हेराची टोळी अिंग्रजाच्या छावणीत अगदी निःशंकपणे घुसू लागताच अिंग्रजाच्या पहारेवाल्यानें विचारलें ' कोण चाललें आहे ? ' ' आम्ही १२-व्या रेजिमेंटचे लोक आहोत ' असें अुत्तर आलें. हें अुत्तर अगदी शब्दशः सत्य होतें. कारण हे सर्व हेर १२-व्या रेजिमेंटचेच लोक होते. परंतु

---

१. " This general order bears marks of sagacity and points out the most formidable war we could encounter – a genuine guerilla. "... " Do not attempt to meet the regular columns of the infidels, because they are superior to you in discipline bundobast and have big guns. But watch their movements, guard all the ghats on the rivers, intercept their communication, stop their supplies, cut up their daks and posts, and keep constantly hanging about their camps, give them no rest. "

—Dr. Russell, page 276.

ही १२-वी रेजिमेंट म्हणजे गेल्या वर्षाच्या जुलैत बंड करून अुठलेली व आपल्या गोऱ्या ऑफिसरला ठार मारणारी रेजिमेंटच होय हें त्या अिंग्रजी पाहरेकऱ्यास काय माहीत ! ह्या पाहुण्यांचे निःशंक घुसणें, निश्चल अुत्तर व निर्धास्त सावधपणा पाहून तो पहारेकरी आलवेल करून स्वस्थ बसला आणि ही टोळी अिंग्रजी कॅम्पात शांतपणे घुसली. तेथे त्यांना हेरायचें होतें तें तें सर्व हेरून हे मौलवीचे हेर बाहेर पडले व अशा रीतीने मृत्यूच्या जबड्यातील दात मोजून ते दूत आपल्या मौलवीकडे परत गेले.

हेरांनी आणलेली ही सूक्ष्म वार्ता अैकताच त्या युद्धविशारद पुढाऱ्याने आपला बेत चटकन ठरविला. त्याने ४ मैल अलीकडे आपल्या सैन्यासह येअून अेक लहानसें गाव ताब्यात घेतलें. त्या गावाच्या समोर अेक नदी असून तिचा काठ अुंच व honeycombed होता. ती जागा फारच बळकट होती. मौलवीचा डाव असा होता की, त्या खेड्यात त्याने त्याच्या पायदळासह दडून राहावें व त्याच वेळी त्याच्या घोडेस्वारांनी अेका लांब आडवळणाने जाअून अिंग्रजाच्या बाजूवर रोख ठेवावा. मौलवीला हें नक्की समजलेलें होतें की, अुद्या पहाटे ब्रिटिश सैन्य बिनसावधपणे त्याच ठिकाणी येणारें होतें. बंडवाले त्या खेडेगावी नसून बरीला आहेत अशा खात्रीने निःशंकपणें येणारें हें सावज बंदुकीचे टप्प्यात आलें की, मौलवीने समोरून मारा द्यावा व तो सुरू होताच घोडेस्वारांनी अिंग्रजाच्या बाजूवर तुटून पडावें ! मॅलेसन म्हणाले " It was really a brilliant idea and did credit to his tactical skill. "

अशा या शत्रूंनाही चकित करून टाकणाऱ्या अुत्कृष्ट डावाच्या विजयासाठी दोन गोष्टी अवश्य होत्या. अेक की अिंग्रज लोक त्या खेड्याशी येअीतोपर्यंत त्यांना आपलें सैन्य न दिसेल असें छपवून ठेवणें व दुसरें की, खेडेगावातून मारा सुरू होअीतोपर्यंत त्या बाजूला दडवलेल्या घोडेस्वारांनी शांत रीतीनें थांबणें. मौलवीने आपल्या बाजूला जें जें कार्य होतें तें ते पूर्ण तडफेने पार पाडलें. रातोरात पायदळासह तो गाव त्याने गुपचीपपणे घेतला. आपले घोडेस्वार त्याने तावडतोब इष्ट मार्गाने बाजूवर रवाना केले व त्या खेड्यातील आपल्या सैन्याचें अस्तित्व अितक्या अुत्कृष्ट रीतीनें त्याने छपविलें की सकाळी बरोबरीच ब्रिटिश सैन्य अगदी बिनसावधपणे हलके हलके तेथे आलें तास अर्ध्या तासाचा अवकाश की पाडाव पक्षाचा विजय ठरलेला

परंतु त्या अर्ध्या तासातच मौलवीने घडविलेला हा अुत्कृष्ट डाव घोडेस्वारांनी बिघडवून टाकला ब्रिटिश सेना त्या जाळ्याजवळ येत असता ठरल्याप्रमाणे घोडेस्वारांनी त्याच्या पाठीवर अुत्तम जागाही गुपचूप पटकावली व तेथून अिंग्रजाच्या ६००० गैरसावध सैन्यावर छापा घालण्याचें काम अगदी सुलभ झालें. परंतु अितक्यात त्याचे पुढारी अिंग्रजाच्या दोन असंरक्षित तोफा पाहून भुलले व मौलवीचो

कालची सर्व आज्ञा विसरून जाऊन त्या लोकांवर चालून गेले. क्षणभर तोफाही त्यांच्या हाती आल्या. परंतु क्षणानंतर त्या तोफाच नाही, तर मौलवीचा सर्व डाव अिंग्रजांनी हिसकून नेला ! कारण ही पिछाडीची गर्दी पाहताच ते पूर्णपणे सावध झाले व आघाडीचा खळगाही त्यांना दिसला. थोडीशी झटापट झाल्यानंतर आपल्या घोडेस्वारांच्या ह्या हलगर्जीपणाने फिसकटलेले जाळें टाकून देऊन मौलवी आणखी अेखादी संधि पाहण्यास पुढे निघून गेला.

अेप्रिल १५-चे सुमारास हॉप ग्रॅंट बारी व बिटोलीहून लखनौच्या बंडवाल्यांस चर रेटीत असता तिकडे रुइया किल्ल्यापाशी अयोध्येची व अिंग्रजांची आणखी अेक झुंज जुंपलेली होती. मागे दुआबमध्ये बंडाचा बीमोड करण्यासाठी कानपूरहून जशा आंग्ल सेना सर्व बाजूंनी बंडवाल्यांना अेकसमयावच्छेदे चेंपीत फत्तेगडाकडे गेल्या तमाच कार्यक्रम आता अयोध्येतून बंडवाल्यांचा बीमोड करण्यासाठी कमांडर-जिन-चीफने लखनौला योजिला.[२] अयोध्येच्या पूर्वभागात व बहार प्रांतात मागे सांगितलेला ल्युगार्ड व डग्लस गेला, बारीबिटौलीकडून सर हॉप ग्रॅंट गेला व वालपोल गंगेच्या काठाने वर निघाला. ह्या व कमांडर-जिन-चीफ मुद्दा बाकी सर्व फौजांचा बेत असा होता की, अयोध्येतून वरवर बंडवाल्याना रोहिलखंडात चेपावे व तेथेच त्याशी शेवटची मारामारी करावी. अशा कार्यक्रमाप्रमाणे ता. ९ अेप्रिलला वालपोल हा सर्वांगपूर्ण सबल फौज घेअून लखनौहून निघून गंगाकाठाने वर चालला. ता. १५ अेप्रिल रोजी तो लखनौच्या अुत्तरेस ५१ मैलावर असलेल्या रुजिआच्या किल्ल्यापर्यंत पोचला.

हा किल्ला फार मोठा नव्हता व त्याचा मालक नरपतसिंग हाही अेक चिमुकला जमिनदार होता. तरी स्वतंत्रतेचा हा महायज्ञ सुरू झाल्यापासून नरपतसिंगाने तिच्याच स्थंडिलावर आपले सर्वस्व अर्पिलेले होते. आज त्याच्यावर जाज्वल्य तोफखान्यासह अेक प्रचंड आंग्ल फौज चालून आलेली आहे. त्याचेजवळ किल्ल्यामध्ये तर पुरते शेदीडशे लोकही नाहीत. मग किल्ला मोकळा करून बंडवाले बिनशर्त शरण येतीलच येतील अशी अिंग्लिशाना खात्री वाटू लागली. परंतु त्या दिवशी सकाळी नरपतसिंगाने कैदेतील अेक युरोपियन सुटून येअून अिंग्रजास कळविता झाला की नरपतसिंग म्हणतो, "किल्ला खाली करणार पण रणांगणात हात दाखवून मग !"

---

२. On the first of April 1858 there were 96000 British soldiers in India besides a large body of reliable native troops, raised in haste some of whom had already shown that they were capable of doing good service—a very different state of affairs from the one which prevailed six months before.
—Roberts, Vol. I.

रणांगणात! हा बडखोर नरपत आम्हांला रणांगणात हात दाखविणार! आणि मग किल्ला खाली करणार! वालपोल म्हणाला, त्याला त्याच्या किल्ल्यासुद्धा ठिकच्या ठिकाणी गाडून टाकत चला. नेहमीच्या सवयीप्रमाणे अिंग्रजी सैन्याने बातमी अुठविली की किल्ल्यामध्ये दोन तीनशेच लोक नसून ते बरोबर पंधराशे आहेत! नरपतला आपण नक्की चिरडणार आहो तेव्हा त्याची फौज टोलेजंग होती अशी बातमी अुठविल्याशिवाय मग त्याला जिंकण्याचें भूषण तें काय? म्हणून वालपोलने देखील म्हटले, बरोबर आहे नरपत हीं अुद्दाम बोलणी पंधराशे फौजेमुळेच बोलत असला पाहिजे. किल्ल्यातील कैदेत हा प्रत्यक्ष पहात असलेला युरोपियन दीडशेच लोक आहेत म्हणून नुसती थाप देतो आहे झालें. किल्ल्यावर आंग्लसेना चालू लागली आणि तेंही काही किल्ल्याच्या अत्यंत दुर्बल पडक्या भागावर नव्हे तर समोरील धडधाकट तटावर. किल्ल्यासमोरील झाडीतून ही ब्रिटिश सेना शिरलेली पाहताच नरपतचे करारी योद्धे गोळ्या झाडू लागले. ब्रिटिश लोक खंदकाशी भिडताच मारामारीची कमाल झाली. काफेच्या अेकदोघींस लोकांपैकी तेथल्या तेथे ४६ जण ठार झाले. काफे मागे हटला. तिकडे ग्रूव्हलाही बंडवाल्यांनी ठिकच्या ठिकाणी मरणासाठी खिळून ठेवलें. तेव्हा ह्या घडक्या बाजूवर गुदरलेले हे अकल्पित संकट पाहणारा योद्धा वालपोल आता तोफा घेअून पडक्या बाजूकडे गेला व त्याने तोफा अशा कौशल्याने डागविल्या की आंग्ल सैन्याच्या ह्या बाजूचा गोळा, किल्ल्याला ओलांडून आंग्ल सैन्याच्या त्या बाजूस जाअून आदळावा!! फक्त शत्रूशी लढणारे सेनानी जगात पुष्कळ झाले व होतात. परंतु शत्रूशी न स्वत:शी मारल्याच शौर्याने झुजणारा असा सव्यसाची वीर वाल्पोलशिवाय आढळणे नाही!! वालपोलचे समरचातुर्य पाहून घाबरलेला आंग्ल योद्धा होप हा जो रणावर अिंग्रजी बाजू सावरण्यास येतो तों तोही ठार झाला! बंडवाल्यांच्या माराने ग्रूव्हही हटू लागला! जिकडे तिकडे अेकच गोंधळ! गोंधळलेली ब्रिटिश सेना ह्या अडीचशे बंडवाल्यांच्या धिक्कारासह रण सोडून निघून गेली!

होपसारखा योद्धा बळी पडला हे अैकून जिकडे तिकडे हाहाकार सुरू झाला! लॉर्ड कॅनिंग, सर कोलिन, सगळे अिंग्लंड शोकानें विव्हल झाले! हजारो अिंग्रजलोक मेले असता जितका कळवळला नसता तितका या लोकप्रिय होपच्या मृत्यूने अिंग्लंड देश कळवळत आहे!

ब्रिटिश सेनेचा पूर्ण पराजय व होपचा देहान्त! त्या करारी नरपतसिंगाने आपला शब्द खरा केला. "रणात शत्रूला हात दाखवीन." आपल्या अडीचशे अनुयायांसह त्याने लगेच तो किल्ला सोडून दिला!

या निरनिराळ्या अिंग्रजी सैन्यानी अयोध्येतून सर्व बंडवाले रोहिलखंडात चेपीत नेल्यानंतर आपल्या या पृथक् पृथक् सेना अेकत्र करून कमांडर-अिन-चीफ सर कोलिन हा रोहिलखंडाकडे निघाला. अयोध्येतून हुसकलेले बंडखोर पुढारी शहाजहान-

पूरला जमलेले होते. तेथेच नानासाहेब होते, तेथेच मौलवी अहमदशाह होते या जोडीला धरण्यासाठी सर कॉलिनने आजपर्यंत कित्येकदा दीर्घप्रयत्न केलेले असताही ते अुभयतः अजून अजिक्यचे अजिक्य होते. तेव्हा ते रोहिलखंडात शहाजहानपूरला अेकत्र आहेत हें कळताच सर कॉलिनने अत्यंत कसोशीनें त्या शहराला कोंडण्याचा घाट घातला व ते दोन प्रथित पुरुष हाती लागलेच आहेत असें समजून तो ता. ३० अेप्रिलला शहाजहानपुरास येअून भिडला—पण ते दोन पक्षी अुडून गेल्यानंतर ! सर कॉलिनच्या चित्तास अतिशय विषाद वाटणे साहजिक होतें. त्याने चार दिशेने चार सेना त्या शहाजहानपुरावर व बरेलीवर चालवीत आणल्या. त्याला खात्री होती की त्यांच्या जाळ्यातून अेकही बंडवाला सुटणें नाही. परंतु वस्तुस्थितींत अत्यंत प्रबल बंडवालाच त्या जाळ्यातून निसटून पार झाला व तोही खुद्द कमांडर-अिन-चीफच्याच दोरीला हिसडा देअून !

मौलवी व नाना निसटलेच, पण आता बरेलीचा डाव तरी फसू नये म्हणून शहाजहानपूरला ४ तोफांसह अेक ब्रिटिश सैन्य ठेवून खिन्न झालेला कमांडर-अिन-चीफ बरेलीवर निघाला व ता.४ मेला अेका दिवसाच्या अंतरावर येअून अुतरला. बरेली येथे खानबहादुरखान हे अजूनपर्यंत राज्य करीतच होते. दिल्ली व लखनौ पडल्यानंतर निराधार झालेले बडखोरांचे पुढारी ह्याच स्वतंत्र राजधानीत येअून राहिलेले होते. दिल्लीच्या राजवंशातील रणकुशल राजपुत्र मिर्झा फेरोजशाह, श्रीमंत नानासाहेब, मौलवी अहमदशाह, राजा तेजसिंग व अितर कित्येक पुढारी खानबहादुर खानाच्या अद्यापि स्वतंत्रतेंत असलेल्या राज्यातच मिरलेले असल्यामुळे ह्या बरेली शहरावर अिंग्रजांचा अतिशय डोळा होता. परंतु तें शहर अुगीच हट्टाने लढवीत बसण्यापेक्षा अेक दोन हात होनाच सोडून देअून मागे दिलेल्या प्रख्यात जाहिरनाम्याप्रमाणे प्रदेशात धांगडधिंगा घालावा असा खानबहादुरखानाचा व तत्पक्षीय धुरीणाचा विचार ठरलेला होता. अिंग्रजी सेना अेक दिवसाचे अंतरावर येताच बरेलीला आपणास कोंडून टाकण्याचे अिंग्रजी प्रयत्न विफल करण्यासाठी शहर सोडण्याची सिद्धता करून त्यांनी बाहेर पडण्याचा मार्ग रोखून धरला. परंतु फिरंगी शत्रूला अेकतरी चागला तडाखा दिल्याशिवाय व रणांतील आपले कर्तव्य थोडें तरी बजावल्याशिवाय बाहेर पडावयास ते तेजस्वी रोहिल्याचे रक्त तयार होअीना. म्हणून ते ता. ४ मे रोजीं अिंग्रजाशी तोंड देण्यास रणांगणात अुतरले.

या रणांगणात असलेलें ब्रिटिश सैन्य अभूतपूर्व होतें प्रबल होतें. त्यांचा भयंकर विस्तृत तोफखाना, त्यांचे अत्युत्कृष्ट घोडदळ, त्यांचे शिस्तबाज पायदळ व या बहुसंख्य तीक्ष्ण सेनेवर खुद्द सर कॉलिनचें सेनानीत्व ! अशा या सैन्यावर खानबहादुराच्या तोफांचा फारसा परिणाम न होता तें बरेलीवर अप्रतिहततेने चढत चाललें. ता. ५ मेला तोफा टाकून देअून बंडवाल्यांनी तरवार अुपसली. विजयाची काहीही आशा नसताना किंबहुना तशी आशा नसेल तेव्हाच रणांगणातून परत न फिरता जे

हुमत हुमत मरणाला मिठी मारतात असा भयंकर गाझींची ही तरवार होती. कोणच्याही धर्म्य युद्धात शत्रूचा प्राण घेणें किंवा घेताना मरणें म्हणजे स्वर्गाचीं कवाडें सडाडदा अुघडणें होय ही ज्याची दृढमूल अनिवार्य श्रद्धा आहे त्या धर्मवीरांची ही तरवार होती! ती तरवार अुपसून हे गाझी लोक अेकाअेकी अिंग्लिश सैन्यावर कोसळले. दाढीचे केस वाढलेले, हिरवे फेटे मस्तकाला वेढलेले, कंबरबंद कमरेला कसलेले, हातात रुप्याची चपटी अंगठी आणि तिच्यावर कुराणातील धर्मवाक्यें अुतरलेली असे ते भव्याकृति वीर अुजवीकडून तीरासारखे घुसले व अिंग्रजी सैन्यावर तुटून पडले. आपल्या ढाली मागे पाठवीत व तरवारी सूर्यप्रकाशात लखलखवीत 'दीन दीन' गर्जनेने नाचत ते शत्रूवर धावले. धमरदाच अिंग्रजी सेना ताडदिशी मागे हटली—४२-वे हायलंडर्स पुढे झाले—त्यांच्यावर हा वज्राघात जाअून आदळला—त्यांनी सरासर फिरंग्यांना यमसदनात फेकून देण्याचा सपाटा चालविला! त्यांचे काही लोक तर झपकन पुढेही घुसले व अिंग्रजाच्या पिछाडीला भिडले. गाझींच्या अेका टोळीपैकी अेकही मागे परतला नाही. मारीत, छाटीत, काटीत त्यांच्यातील प्रत्येकजण जिथे लढला तिथेच छाटला गेला! अेकजण मात्र छाटला जाण्याचे आधी रणात पडला—का बरें? क्षणभर विचारू नका—हा पहा तिकडून अिंग्रजाचा कमान्डर-अिन-चीफ अगदी जवळ आला—त्याला पाहताच हा मरणाचे सोंग घेअून पडलेला गाझी वाघासारखा अुडी मारून अुसळला. परंतु जवळच्या अेका हुशार शिपाने त्याची गर्दन तत्क्षणी छाटून टाकली.

जगातील अितिहासात अप्रतिम धाडसाचीं, तत्वनिष्ठेचीं, शहादतीचीं व मृत्युंजयतेचीं जीं अुदाहरणे असतील त्यांपैकी कोणतेही अुदाहरण ह्या बरेलीच्या स्वातंत्र्यसमरातील गाझीहून गाजी असणें नाही!

दुसरे दिवशी सर कॉलिनचे जाळें तोडून टाकून खानबहादुरखान हे ससैन्य बरेलीहून बाहेर पडले व ७ मे रोजी अिंग्रजांनी बरेलीचा ताबा घेतला.

खानबहादुरखानाने रणांगणात आपले डावपेच विफल करावे या खिन्नतेने कमान्डर-अिन-चीफ बरेलीमध्ये प्रवेश करीत आहे नोंच त्याच्यामुद्धा सर्व अिंग्रजी सेनेत अेकदम 'मौलवी! मौलवी!' असा आश्चर्यचकित अेकच आवाज कुजबुजू लागला!

होय, आश्चर्यचकित होण्यासारखाच अेक विलक्षण पेच तिकडे शहाजहानपुराकडे मौलवीने घातलेला होता. सर कॉलिनला पूर्णपणे ठकवून मौलवी व नानासाहेब शहाजहानपुराहून जे निसटले होते ते काही केवळ लढाअी टाळण्यासाठीच नव्हे. शहाजहानपुराहून निघण्यापूर्वी नानाच्या हुकूमावरून तेथील सर्व सरकारी अिमारती पाडून टाकण्यात आल्या होत्या. आपण गेल्यानंतर तिथे अिंग्रजी फौज येअील व त्या पैकी लहानशी तुकडी तिथे ठेवून सर कॉलिन बरेलीला जाअील हे त्या कुशाग्र मौलवीनें चटकन ओळखून तें शहाजहानपूर शहर सोडलेले होते. अिंग्रजी फौज बरेलीला किती वेळ गुंतणार हे नक्की अजमावून मौलवीने असा डाव योजला की

सर कोलिन तिकडे जाताच आपण झपाट्याने शहाजहानपुरावर अुतरावें, तेथील मूठभर अिंग्रजांना नामशेष करावें व अशा रीतीने बरेलीचा सूड घ्यावा. मौलवीच्या दूरदृष्टीप्रमाणे शहाजहानपुराला लहानशी ब्रिटिश फौज राहिली व नानांनी सर्व अिमारती अुद्ध्वस्त केल्या असल्यामुळे त्यांना मैदानातच अुतरणें भाग पडलें.

अशा रीतीने सर्व वेत जिजत आला. ता. २ मेला ती थोडीशी ब्रिटिश सेनाही शहाजहानपुर सोडून जाणार आहे असें कळताच अहोरात्र मजला मारीत मौलवी अहमदशाह चालू लागला व त्याचें गैरसावध भक्ष्य अगदी त्याच्या पंजाजवळ आलें. परंतु त्या मध्यरात्रीच हल्ला न देता मौळवीची फौज कोणाच्या मूर्खपणामुळे असेल तें असो, किंचित वेळ ४ मैलांवर थांबली. अितक्यात सर्व वेत ढासळून गेला! कारण " Native spies employed by the British were on the alert and one of these flew with the intelligence of his dangerous vicinity to colonel Hale at Shahajahanpur." ह्या नेटिव्ह पिशाच्चाने ही वार्ता अिंग्रजांस कळविताच त्याची ती छोटीशी सेना तुरुंगाचे बळकट कडेकोट अिमारतीत घुसली. अिकडे मौलवी तसेच चालून आले. त्यांनी तें सर्व शहर ताब्यात घेतलें, किल्ला काबीज केला व लढाअीच्या यथान्याय शिरस्त्याप्रमाणे शहरातील श्रीमंत लोकांवर अेक रमदेचा कर बसविला. मॅलेसन कबूल करतो की, " In acting thus he simply conformed to the customs of war in Europe." लगेच त्यानी आठ तोफा आणवून त्या तुरुंगातील ब्रिटिश सेनेवर मारा सुरू केला.

ही बातमी ता. ७ मेला बरेलीला पोचताच सर कोलिनचा आनंद गगनात मावेनासा झाला. मागे मौलवी त्याचे हातून निसटल्यापासून तो मनातल्या मनात फार खात होता ती चूक दुरुस्त करण्याची संधि आता मौलवींनेच आणून दिली! आपण होअून शत्रूच्या जाळ्यात गिरलेल्या या मृगयेवर सर कोलिन झडप घालीत निघाला. या वेळेस त्याने आपली पूर्ण खात्री करुन घेतली की कुठेही सापळ्यास फट राहिलेली नाही. ता. ११ मेपासून त्या अेकाकी मौलवीची व ह्या प्रचंड अिंग्रजी फौजेची निकराची लढाअी चालू झाली ही वार्ता अैकताच त्या लोकप्रिय मौलवीच्या रक्षणार्थ वंडवाल्यांचे थवेचे थवे दशदिशांनी लोटू लागले. अयोध्येची बेगम, मम्मनसाहेब महमदीचा राजा, दिल्लीचा मिर्झा फेरोजशाह, कानपूरचे नानासाहेब, ह्या सर्व स्वातंत्र्य धुरीणांचीं सैन्यें १४ मेचे आत मौलवीच्या ध्वजाला येअून मिळालीं! तेव्हा ज्याला धरण्यासाठी ब्रिटिशांनी अेक फट न ठेवता तो टोलेजंग सापळा अुभारला होता त्या मृगयेनेच त्याच्यावर आपले भयंकर पजे विस्फारित लोटें मारले. वेळ ठेवलें नाही म्हणून त्या सापळ्याचे तुकडे अुडविले व मौलवी आपल्या सैन्यासह शहाजहानपुराहून पुन्हा लढत लढत बाहेर पडले! या वेळेस मौलवी धरला जाणारच याची सर कोलिनला अितकी खात्री होती की त्याचा नाश गृहीत धरून त्याने फौजेच्या भार्वी नेमणुकाही करुन टाकल्या होत्या. आणि त्यानूनही मौलवी सुटताच गेले कोणीकडे? तर अिंग्रजांनी महत्प्रयासाने जिंकून निर्वैर केलेल्या अयोध्या

प्रांतात होय! आपण अयोध्या जिकली तर मौलवीने रोहिलखंड जिकलें--आपण रोहिलखंड जिकलें तर मौलवी पुन्हा अयोध्येत ससैन्य कायमचे कायम!

अशा रीतीने आपल्या देशाच्या शत्रूशी, आपल्या देशाच्या सन्मानरक्षणासाठी आपल्या देशबांधवाच्या वतीने हा देशभक्त मौलवी झगडत असता त्याचा निःपात करण्याचे अिंग्रजांना दुर्धर झालेले काम कोण तडीस नेणार आहे? सर कोलिनच्या तरवारीला ज्याने धिक्कारून हताश केली त्याला आता कोणाची तरवार मारक ठरणार आहे? आता काय करावें?

काय करावें? अितकी पचाअीत कशाला? मागे नाही का कितीकदा तरी हिंदुस्थानचे सौभाग्याला आग लावणे अिंग्रजांना शक्य झालें? मग तेव्हा ज्यानी ते सौभाग्य जाळले ते आजही जाळतील! अिंग्रजांनी धीर धरावा, कारण सर कोलिनच्या तरवारीला बोथट करणारी ही मौलवीच्या देहाची हिंदुस्थानची ढाल असेर अेका हिंदुस्थानच्याच पोटच्या अेका कुलांगाराने फाडून, तोडून, जाळून टाकली!

अयोध्येत घुसल्यानंतर अिंग्रजांच्या विजयाला जितका प्रतिरोध करणें शक्य होअील तितका करीत असता मौलवीच्या ध्यानात आलें की, अयोध्या व रोहिलखंड याच्या दरम्यान पोवेनच्या राजाचें संस्थान असल्याने त्या संस्थानचा राजा जर आपल्यास अनुकूल झाला तर अिंग्रजाविरुद्ध आपण जमवीत आणलेल्या नवीन कटाला अधिकच मदत होअील. म्हणून त्याने त्या अर्थाचा निरोप पोवेनच्या राजास धाडला. हा टीचभर संस्थानिक शरीराने गलेलठ्ठ, मतीने जड, मुखाने अजागळ व निरुद्योगाने मतिमंद झालेला होता. रणाचे नांव अैकताच त्याच्या अंगावर काटा आला. तरी मौलवीची प्रत्यक्ष गाठ घेण्यास आपण तयार आहोत असे त्याने कळविलें. तेव्हा बेगमेची राजमुद्रा घेअून हा तिचा प्रतिनिधि पोवेनच्या शहराकडे निघाला. मौलवी आपल्या थोड्याशा अनुयायासह पोवेन शहराच्या तटापाशी येताच त्याला दिसून आले की तटाचे दरवाजे बंद केलेले, तटावर सशस्त्र लोक खडे असलेले व तो लठ्ठ राजा जगन्नाथसिंग आपल्या भावासह त्याचेमध्ये अुभा राहिलेला आहे-या सशयात्मक देखाव्याचा अर्थ जरी त्यानी ओळखला तरी रणांगणात खेळलेला तो वीरगडी तशाने काही भेदरणारा नव्हता. त्याने तटाचे बाहेरूनच त्या राजाशी बोलणे चालविले. आपल्या ध्येयाच्या प्राप्तीसाठी सर्वस्वाची राख होअीतोपर्यंत तरी तरवार खाली ठेवणे नाही ही ज्या पुरुषमूर्तीची प्रतिज्ञा होती त्याचें तेजःपुंज वक्तृत्व त्या तटावरील घुबडाला फार भयंकर वाटणेच साहजिक होते. तेव्हा मौलवीने पाहिलें की आता ह्या भ्याडाला भिवविल्याशिवाय हे माझें वक्तृत्व सफल होणार नाही. तेव्हा त्याने आपल्या महाताला हुकुम दिला की तटद्वार तोडण्यासाठी हत्तीने धडक मारावी. ज्यावर ते आरूढ झालेले होते त्या विशाल हत्तीचे मस्तक त्या तटद्वारावर धडाडून आदळलें! आणखी अेक धडक. त्या द्वाराचा निश्चिततेने चुराडा होणार तों राजाच्या भावाने तटावरून बंदूक झाडली व त्याच्या गोळीने—

मौलवी अहमदशाह—! मौलवी अहमदशाह त्या तटावरील हिंदुस्थानच्या पोटीं जन्मलेल्या कुलांगाराने गोळी घालून ठार मारला. लगेच ते उभय बंधु तटाबाहेर आले आणि त्यांनी मौलवीचें डोकें मानेपासून छाटून घेतलें, त्या डोक्याला अेका रुमालात गुंडाळलें व १३ मैलावर असलेल्या शहाजहानपुराला तें धावत गेले. ब्रिटिश अधिकारी टेबलावर जेवत असता तो राजा आत शिरला. त्याने आपल्या हातातील रुमाल सोडला व रक्ताने थबथबलेलें तें मौलवीचें मस्तक ब्रिटिशांच्या पायापुढे गडगडत सोडून दिलें!!! दुसरे दिवशी शहरातील कोतवालीवर ते डोकें अिंग्रजांनी टांगून दिलें आणि ह्या शतकृत्याबद्दल पावेनच्या राजाला पन्नास हजार रुपये बक्षीस मिळालें!

पोवेनचा राजा! पोवेनचा चांडाळ! तुझ्या देशद्रोहानें जर खरोखरच अंगाचा तिळपापड होत असेल तर, हिंदुस्थानात ह्या प्राण्याची प्रतिमा प्रत्येक घराघरातून नरककूपाचे दाराशी टांगलेली असावी!

मौलवी अहमदशहाची अंगकाठी अुंच, सडपातळ, कसलेली, भरतभूमीच्या हातातील अेखाद्या तेजस्वी तरवारीसारखी होती. त्याचे नाक अगदी सरळ, भुवया कमानदार. तो मरताच अिंग्रज म्हणाले, " The most formidable enemy of the British in Northern India was no more. " ह्या अिंग्रजांच्या अत्यंत भयंकर शत्रूविषयी अिंग्रजी अितिहासकार मलेसन म्हणतो, "त्याच्या लष्करी नेतृत्वाची व युद्धचातुर्याची चंडात पुष्कळ अुदाहरणे घडलेली आहेत. अंतिम भागातील त्याचे डावपेंच तर अप्रतिम होते. सर कोलिनला दोनदा भग्नधैर्य करून अुधळून दिल्याचा मान त्याच्याशिवाय कोणालाही मिळविणें अशक्य होतें. अशा रीतीनें हा फैजाबादचा मौलवी अहमदशाह रणात चमकला. आपल्या जन्मसिद्ध देशाचें अन्यायाने छिनावून घेतलेले स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठी जो पुरुष कटाची संघटना करतो व रणात लढाओ देतो तो जर देशभक्त होत असेल तर मौलवी अहमदशाह खरोखरा देशभक्त आहेच आहे. खुनाने त्याची तरवार विटाळलेली नाही. खुनाला त्याची संमति नव्हती. ज्याने त्याचा स्वदेश बळकावला होता त्या अुपऱ्या परक्याशी तो रणांगणात लढला, वीरासारखा लढला, रणनीतीने लढला, हटातटाने लढला, आणि अेतदर्थ सर्व राष्ट्रातील रणवीरांच्या व सत्यप्रियांच्या आदराला त्या लोकोत्तर मौलवीची स्मृति सत्पात्र झालेली आहे।[3]

---

३. The Maulvi was a very remarkable man. Of his capacity as a military leader many proofs were given during the revolt, but none more decisive than those recorded in this chapter No other man could boast that he had twice foiled Sir Colin Campbell in the field ". —Malleson's Indian Mutiny Vol. IV, P. 380.

✦ ✦ ✦

प्रकरण दहावें

# रणलक्ष्मी लक्ष्मीराणी

' मेरा झांसी नहीं दूंगा ! छाती असेल त्यांनी घेऊन पहावी ! "

झाशीची कडक विजळी असे गडगडली मात्र, तोंच बुंदेलखंडभर घनघोर वादळाचा हुंकार झाला! जिकडे तिकडे रक्ताचा शिळंधार पाऊस झोड देत अुठला. सागर, भोपाल, चांदा, बाणापूर, शहागड, कर्की - तेथील आकाशाच्या बिंदुबिंदूतून अुल्कापातांचें - अग्निगोलकांचे वारें अंधळेपणाने सोसाटत चाललें !

झाशीच्या पुण्यपावन सिंहासनाला स्वातंत्र्याचें वरदान - पुन्हा राज्यामध्ये शांतता, सुव्यवस्था नि समृद्धि नांदू लागली. राणीची नित्याची दिनचर्या पुढील-प्रमाणे होती :- " बाअी पहाटे पाच वाजता अुठून अत्तरोदकाने अभ्यंग स्नान करीत. बहुधा त्या शुभ्र चंदेरी साडीच परिधान करीत असत. स्नानोत्तर त्या नित्याच्या पूजा प्रार्थनेला वसत पतिनिधनानंतर मस्तकी केशभार तसाच ठेवल्याचें प्रायश्चित्तही त्या प्रतिदिनी अर्घ्य सोडून घेत असत. त्यानंतर तुळसी अुद्यानात जाअून, त्या तुलसीची पूजा करीत. पार्थिव पूजेच्या वेळी पदरीच्या गायकवादकांचें गायनवादन होत असे. त्यानंतर त्या पुराणश्रवणाला बसत. ते आटोपल्यावर सरदार नि आश्रित लोक बाअीमहाराजांना नित्याचें अभिवादन करण्यास येत. बाअीची स्मरण-शक्ति अितकी तीव्र होती की, प्रात काळी अभिवादन करण्यासाठी येणाऱ्या सातशे पन्नास लोकांत जर कोणी अेखादा आलेला नसला तर बाअी दुसरे दिवशी त्याला त्याच्या आदल्या दिवशीचें न येण्याचें कारण विचारण्यास कधीही चुकत नसत. पूजार्चनानंतर भोजन होअी. काही विशेष कामकाज नसलें तर बाअी अेक तासभर वामकुक्षि करीत. अुठल्यानंतर सकाळी भेटीचे वेळी स्वीकारलेल्या वस्तू पाहण्यासाठी जेव्हा त्या मागवून घेत त्या वेळी सर्व वस्तु चांदीच्या तबकातून वर रेशमी आवरणें घालून बाअी महाराजापुढे आणून ठेवण्यात येत. विशेष मनात भरणाऱ्या तेवढयाच वस्तु त्या ठेवून घेत नि राहिलेल्या सेवक वर्गात वाटण्यासाठी कोठीवाल्याच्या स्वाधीन करीत. दुपारी तीन वाजता जेव्हा त्या राजसभेला (दरबारला) जात तेव्हा प्रायः पुरुष वेशातच जात पायात पायजमा, गर्द निळया रंगाचा सदरा, टोपीवर सुंदर वस्त्रो, कमरटीभोवती जरतारी दुपेटा आणि बाजूला रुळणारी रत्नजडित असिलता - असा अेकंदर त्याचा वेष असे. या वेषात ती रमणी गौरीप्रमाणे भासे ! केव्हा केव्हा, त्या स्त्रीवेषातही जात. पतिनिधनानंतर नथीसारखे सौभाग्यसूचक अलंकार त्यांनी कधीच वापरले नाहीत. हातामध्ये हिऱ्याच्या बांगड्या, कंठामध्ये अेक लहानसा मोत्याचा सर नि बोटामध्ये अेक अंगठी अेवढेच अलंकार काय ते त्या

वापरीत, पाठीमागे केसांचा बुचडा बांधलेला असे. पांढऱ्या स्वच्छ मुघीन साडीवर तसलीच अेक पांढरी चोळी त्यांना खुलून दिसे. अशा रीतीने कधी पुरुष वेषात तर कधी स्त्री वेषात जाअून त्या राजसभास्थान मंडित करीत. राजसभेतील सभासदांना मात्र त्यांचे प्रत्यक्ष दर्शन कधीच होत नसे; कारण त्या ज्या खोलीत बसत ती खोली राजसभास्थानाच्या अगदी अेका बाजूला असून, केवळ राजसभाभिमुख असें अेकच द्वार तिला होतें. दाराच्या चौकटीवर सोनेरी वेलपत्तीचे कोरीव काम होतें. आणि दारावर सुंदर जरकाम केलेला रंगीबेरंगी पडदा सोडलेला असे. याच गर्भगृहात पराच्या मञू गादीवर अेका गिर्दीवर थोडेसे कलून त्या बसत. दाराबाहेर दोन वेत्री (हुजरे) हातीं सोन्याचें पाणी दिलेल्या काठ्या घेअून अुभे असत. खोलीसमोर लक्ष्मणराव प्रधानही महत्त्वाचे कागदपत्र घेअून अुभे असत, नि त्यांच्याच पलीकडे दरबारचे दफ्तरी बसत. बाअींची बुद्धिमत्ता कुशाग्र असल्यामुळे पुढे आलेल्या कोणत्याही कामाचें त्यांना तत्काळ ग्रहण होअी; आणि त्यांच्या आज्ञाही सुस्पष्ट, असंदिग्ध नि यथायोग्य असत. कधी कधी आपल्या आज्ञा त्या स्वत:च लिहीत. न्यायदानाचे संबंधातही त्यांचा विशेष कटाक्ष असे; आणि दिवाणी फौजदारीचे खटलेही त्या तितक्याच बुद्धिकौशल्याने सोडवीत. महालक्ष्मीवर बाअी महाराजांची विशेष भक्ति होती. कमळांनी भरलेल्या अेका तळ्याकाठी श्रीमहालक्ष्मीचे मंदिर होतें नि त्या ठिकाणी प्रति मंगळवार, शुक्रवार बाअी दर्शनाला जात. अेके दिवशी दर्शन घेअून दक्षिण द्वाराने बाअी परत जात असताना असें झालें की, सहस्रावधि भिकारी अेकत्र जमून भयंकर गोंधळ माजवीत असलेले त्यांना दिसले. तेव्हा, 'हा काय प्रकार आहे' म्हणून त्यांनी आपले प्रधान लक्ष्मणराव पांडे यांना विचारलें. त्यांनी जाअून विचारपूस करता त्यांना असें कळलें की, ते भिकारी अत्यंत हालअपेष्टांनी गांजलेले असून, थंडीपासूनही त्यांना अतिशय त्रास होत असल्यामुळे त्यांचें म्हणणें असें होतें कीं, बाअीसाहेबांनी त्यांची ती परिस्थिति लक्षात घेअून सोय करावी. हें अैकून बाअींना त्या भिकाऱ्यांचा कळवळा येअून त्यांनी तियल्या तिथे अशी आज्ञा दिली की, आणखी बरोबर चार दिवसांनी त्या भिकाऱ्यांना अेकत्र गोळा करून त्या दिवशी त्यांतल्या प्रत्येकाला अेक टोपी, अेक घोंगडी नि अेक कुडतें वाटण्यात यावें. लगेच दुसरे दिवशी गावातील शिंप्यांना बोलावून आणून कुडतीं नि टोप्या शिवण्याचे काम त्यांचेकडे सोपवून देण्यात आलें. ठरलेल्या दिवशी गावात दवंडी पिटवून भिकाऱ्यांना राजवाड्यापुढे अेकत्र जमविण्यात येअून स्वत: बाअींच्या हस्तें त्यांना कपडे वाटण्यात आल्यावर बाअींना दुवा देत देत भिकारी निघून गेले. . . नथ्थेखानाबरोबर झालेल्या लढाअीत घायाळ झालेल्या सैनिकांना जेव्हा गावात आणलें गेलें तेव्हा बाअी त्यांचे घाव बांधण्यासाठी तेथे स्वत: अुपस्थित राहण्याविषयी आग्रह धरीत. शिपायांच्या प्रकृतीची जिव्हाळ आत्मीयतेने चिंता वाहणाऱ्या बाअींच्या नुसत्या अुपस्थितीनेच शिपायांचें शारीरिक दु:ख हलकें होअी, नि आपल्या पराक्रमाचें नि सेवेचें चीज

ले म्हणून त्यांना धन्यता वाटे. सैनिकांच्या दुःखाविषयी सहानुभूति व्यक्तवून बाओी कुणाला दागिने, कुणाला पदकें अित्यादि देअून गौरवीत असत. घायाळ सैनिकांच्या दुःखाने घाबरून न जाता अुलट त्यानाच धीर देणाऱ्या बाअींना पाहून बाअींकरिता रणांगणावर प्राणार्पण करण्यास सैनिकांना काहीच वाटेनासे होअी. बाअींची स्वारी बाहेर जावयाला निघे तेव्हा तर अपूर्व देखावा असे. महालक्ष्मीच्या मंदिराकडे दर्शनाला जाताना कधी मेण्यातून तर कधी घोड्यावरूनही त्या जात. मेण्यातून जाताना मेण्यावर भरजरी फितींनी बांधलेले भरजरी कापडाचे पडदे सोडलेले असत. पुरुषवेशात घोड्यावरून जाताना त्यांच्या तलम नि सुंदर वस्त्रांचा खोवलेला शेमला त्यांच्या पाठीवर डौलाने रुळत असे. स्वारीमध्ये अग्रभागी ध्वज असून रणगीताचे सूर काढीत विविध वाद्यें वाजत असत. दोनशे युरोपियन सैनिक ध्वजाबरोबर असत आणि शंभर घोडेस्वार बाअींच्या मागेंपुढे मिळून असत. मेण्याबरोबर कारभारी, मंत्री, अिनामदार, जहागिरदार आणि भय्यासाहेब अुपासने यांच्यासारखे अितर अधिकारीही असत. स्वारीबरोबर कधी कधी सैन्यही अुपस्थित असे. स्वारी निघताच राजवाड्यातील चौघडा वाजू लागे नि त्याच वेळी महालक्ष्मीच्या मंदिरातील चौघडाही चालू होअी.[1]

अकरा महिनेपर्यंत वरील प्रकारच्या यशोदुंदुभीचे गंभीर ध्वनि भारत-स्वातंत्र्याच्या सुंदर आकाशात दुमदुमत राहिलेले होते. परंतु आता त्या कर्कश आवाजाला अिंग्रजांचे कान अित:पर सहन करू शकणार नाहीत. आजपर्यंत तरी त्यांनी बुंदेलखंडाचा हा कलकलाट केवळ नाअिलाज म्हणूनच सहन केलेला होता. सतावनच्या जुलैपासून तों आतापर्यंत दिल्ली, कानपूर, लखनौ, जगदीशपूर वगैरे यमुनेच्या पलीकडील सर्व भूभागाच्या क्रुद्ध नर्तनाखाली ब्रिटिश सत्ता जवळजवळ गुदमरून, चिरडून गेलेली होती. आज तिच्या पायाखाली तो सर्व भूप्रदेश चिरडत आलेला आहे. यमुनेच्या व गंगेच्या पलीकडील प्रदेशाकरिता अेक विस्तीर्ण फौज खुद्द कमान्डर-अिन-चीफचे हाताखाली धाडलेली असून तिने दुआब, बहार, अयोध्या, रोहिलखंड वगैरे अुत्तर प्रदेश कसे पुनर्जित करीत आणले हे वर दिलेलेच आहे. प्रदेश जसजसे हातातून निसटत चालले तसतसे त्या नद्यांच्या दक्षिणेकडील प्रदेशावर बंडवाल्यांची जास्तजास्तच मगरमिठी बसत गेली. तात्या टोपे यांनी मागे सांगितल्याप्रमाणे काल्पीला आपली मुख्य राजधानी केल्यापासून पूर्वी दिल्ली घरून त्या प्रदेशात जशी राज्यक्रांतीची चेतना अुत्तरेकडे सचरविलेली होती तशीच आता ह्या काल्पीचे आश्रयाने दक्षिणेकडे सचरविलेली होती. काल्पीला पेशव्यांचे मुख्य प्रस्थान ठेवून तेथून त्यांनी आजूबाजूच्या प्रदेशाला राज्यक्रांतीच्या वणव्यात जळत ठेवले होते. ग्वाल्हेरमध्ये त्यांची कारस्थाने सुरू होतीं – अिंदोरमध्ये सुरू होती. नव्हे ह्या दोन्हीही

---

[1] श्री. पारसनीस कृत 'झांशीच्या राणीचें चरित्र' पृ. १४७-१५१

संस्थानात वास्तविक रीतीने ब्रिटिश अंमल उरलेलाच नव्हता—आणि त्यांच्या त्या नामर्द राजपुरुषांमध्ये जर झांशीच्या राजश्रीचा शतांश जरी मर्दपणा असता तरी तो अंमल पुन्हा काही परतही येता ना! अिंदोर व ग्वालेरच्या नामर्दांनाही जर त्या राज्यक्रांतीच्या पर्वणीत स्वातंत्र्य मिळालेलें होतें तर मग बुंदेलखंडच्या मर्दांना तें मिळालें यात काय नवल आहे! अशा रीतीने काल्पीपासून तों थेट विंध्याचलापर्यंत आता स्वतंत्रतेचा जरिपटका फडकत होता. ब्राह्मणांच्या व मौलवींच्या आशीर्वादांचा तिच्यावर वर्षाव होत होता. सरदार, दरकदार, शिपाओी, पेंढीवाले, गावकरी, शेतकरी, त्या भूमातेच्या सहस्रशत तप्त अंतःकरणात 'स्वातंत्र्य, स्वातंत्र्य' अशी अेकच अूर्मि अुसळलेली होती. आणि त्या अूर्मींच्या सहस्रशत भिन्न कंठांची अेकतानता अेक स्वरता करण्यासाठीच की काय झांशीची रणलक्ष्मी गर्जना करीत होती, "मेरा झांसी नहीं दूंगा! मेरा झांसी नहीं दूंगा!!"

अशी गर्जना अिंग्रजांच्या कानावर फारच थोड्या वेळा आदळलेली असेल! आजपर्यंत देणार देणार असेंच अुदार दातृत्व हिंदुस्थानात भरलेलें होतें. परंतु आज हा अभूतपूर्व कंजूषपणा अुत्पन्न झाला—देणार नाही! मेरा झांसी—दूंगा नहीं! मातृभूच्या प्रत्येक रजःकणाने जर असेंच म्हटलें असतें! झांशीच्या लक्ष्मीची अपूर्व गर्जना अेकताच अिंग्रज जरा चपापले व ही काय गडबड आहे हें पाहण्यासाठी सर ह्यू रोज व ब्रिगेडियर जनरल व्हिट्‌लॉक हे चार पांच हजार शस्त्रधरांसह व भयानक तोफांसह बुंदेलखंडाकडे चालले.

महूहून निघून सर ह्यू रोजने काल्पीपर्यंत बंडवाल्यांच्या ताब्यातून प्रदेश जिंकीत जावें, जबलपुराहून निघून सर व्हिट्‌लॉकने विना, बर्की वगैरे तो मुलूख घेत घेत तिकडून सर ह्यू रोजला मिळावें व अशा रीतीने कोलिन कँपबेलच्या निर-निराळ्या पथकांनी अुत्तरेकडे जशी निर्वैरता संपादन केली तशीच त्या दोन फौजांनी गंगा-यमुनाच्या दक्षिणेकडील प्रदेशात सर्वत्र निर्वैरता संपादावी असा कार्यक्रम ठरून हीं दोन सैन्यें आपआपल्या प्रस्थानबिंदूपासून पुढे चाललीं. अिंग्रजी सैन्याबरोबर हैद्राबाद, बॉम्बे येथील ब्रिटिश नोकरीतील व भोपाळच्या बेगमेचे ८०० लोक व भोपाळ संस्थानचा तोफखाना हीं नेटिव्ह सैन्येंही होतीं. सर ह्यू रोजने ता. ६ जानेवारी १८५८ रोजी महू सोडलें. रहातगडच्या किल्ल्यापाशी झगडा करून तो जिंकून घेतला. सागरच्या किल्ल्यामध्यें बंडवाल्यानी कोंडून टाकलेल्या अिंग्लिशांची मुक्तता केली, वाटेमधल्या प्रत्येक झाडावर बसलेली बंडवाल्याची नासी पाडाव केली, गढागड संस्थान खालसा करून सराओीचा किल्ला घेतला, ता. १० मार्च रोजी बाणापूर काबीज झालें, चंदेरीचा प्रसिद्ध किल्ला परत आला व ता. २० मार्चला अिंग्रजी सैन्य झांशीपासून १४ मैलावर येअून अुतरलें. वर दिलेले अनेक झगडे करून अिंग्रजी सैनेने नर्मदेच्या तीरापासून वर ढकलीत नेलेलीं बंडवाल्यांचीं सर्व सेनापथकें आता झांशीत जमलेलीं होतीं. बाणापूरचा राजा मर्दनसिंग, स्वराज्या-

साठी प्राण देणारे शूर ठाकूर, स्वदेशप्रीतीने हातावर शीर घेणारे बुंदेले सरदार हे सर्व आपआपल्या कृतनिश्चयी अनुयायांसह तिथे जमलेले होते; तिथे तटातटावरून जरिपटके डोलत होते, तिथे देवळादेवळातून सर्व सरदारांची, राजांची, ठाकुरांची, तटाची देवळांची नयने ज्या वीरमूर्तीला आपली अधिदेवता म्हणून सैनिक वंदना देत होती ती तरुणी 'रणलक्ष्मी' राणीलक्ष्मी ही तिथेच रणावलेली होती!

आणि अेतदर्थच बंडखाल्याचा तो शेवटचा आधार निराधार करण्यासाठी सर ह्यू रोज झाशीवर जावयास अगदी अुत्सुक झालेला होता. अितक्यात, गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंग व कमान्डर-अिन-चीफ सर कोलिन कॅंपबेल या अुभयता अधिकाऱ्यांनी सर ह्यूरोजला हुकूम सोडला की, झांशीवर चाल्याचे आधी तात्या टोप्यांनी वेढलेल्या चरखारीचे राजाची मुक्तता करण्यास तुम्ही तिकडे जावे. ह्या हुकमाने झांशीला चोहीकडून शह देत वेगात आणलेला डाव फिसकटणारा होता. तेव्हा काय करावे? सर ह्यू रोजला हुकूम धड पाळवेना किंवा धड मोडवेना. अशा आणीबाणीच्या प्रसंगी अिंग्लिश राष्ट्राचे हित झाशीवर चाल करण्यातच असल्याने त्याविरुद्ध असलेला वरील हुकूम मोडण्याची सर्व जबाबदारी हिंदुस्थानातील अत्यंत श्रेष्ठ अिंग्रज अधिकारी सर रॉबर्ट ह्यामिल्टन ह्या अधिकाऱ्याने आपल्या शिरावर घेतली, व ह्या अुच्च राष्ट्रधैर्याचे स्वार्थत्यागी अुदाहरणाने प्रस्फुरित झालेले ब्रिटिश सैन्य झांशीकडेच त्वरेने चालू लागले!

अिकडे झाशीला लक्ष्मणराव बांडे, तिचे वडील मोरोपंत तांबे, तिचे शूर ठाकूर सरदार, तिची सेना या सर्वांनी लढाअी करावयाची असे ठरविले. कोणी कुजबुजला की, शरण आल्यास तारण करू म्हणून अिंग्रज वचन देतो आहे शरण? झाशीची राणी शरण? तिच्या त्या तेजस्वी नेत्रातून संतापाच्या ज्वाला दिसू लागल्या! तिचे दिवाण लक्ष्मणराव बांडे, तिचे वडील मोरोपंत तांबे, तिचे शूर ठाकूर सरदार, अहो सर्व स्वातंत्र्यवीरहो, शरण जाल तर तारण होअील, समर कराल तर मरण येअील! काय पसत करता? झाशीने आपल्या सहस्र कंठातून कठोर अुत्तर केले 'यदि मरणमवश्यमेव जंतो: किमिति मुधा मलिन यश: कुरुध्वे!' झाशीने आपल्या हातात कागदाच्या शरणचिठ्ठीअैवजी तरवारीची विद्युल्लता धरली आणि पहा आता राणी लक्ष्मी किल्ल्याच्या तटावर कशी चमका मारीत फिरते आहे, किल्ल्याच्या बुरुजावर मोर्चे बांधून तोफा रोखविताना ती तेथे अुभी आहे, हुशार गोलंदाजाची निवड करून ती तिथे अुभी आहे, झाशीच्या स्त्रिया दारुगोळा वाहत आहेत, तोफखाना अुभारीत आहेत, रसद पुरवीत आहेत,[२] झाशीचे पुरुष तोफा रोखीत आहेत, बंदुका भरीत आहेत, तरवारी अुपसीत आहेत, झाशीचे वेदविद् ब्राह्मण स्वदेशविजयार्थ

---

२ " The women were seen working in the batteries, carrying ammunition. " —Sir Hue Rose.

अनुष्ठानें करते झाले, झांशीची देवळें रणांमधील जखमी निराश्रितांना अन्नसंतर्पणात रत झालीं.

ता. २३ च्या रात्री शहरामधून रणवाद्यांचे भयंकर ध्वनि अैकू येत असून, किल्ल्यामधून भयंकर मशालींचा प्रकाश दृष्टीस पडत आहे. पहारेवाल्यांकडून बंदुकांचे आवाजही निघू लागले, पहाटेची वेळ झाली व अगादी भिडलेल्या आंग्ल-सेनेशी झांशीचे वतीने 'घनगर्ज' तोफ हलके हलके बोलू लागली ! 'हरहर महादेव, हरहर महादेव !' जिकडे तिकडे समरांगण झुंजू लागलें. राणी लक्ष्मी सर्व सैन्याचें आधिपत्य स्वीकारून रणांगणात झुंजू लागली. अिंग्रजाचा रणपंडित सर ह्यू रोज व झांशीची कोवळ्या वयाची अबला राणी लक्ष्मी ! कोण अपूर्व झुंज !

ह्या ठिकाणी वेढ्याच्या पूर्वार्धाचें वर्णन आम्ही त्या वेळी प्रत्यक्ष हजर असलेल्या अेका माणसानें लिहिलेल्या वृत्तान्तावरूनच अुद्धृत करणार आहो : "ता. २५ पासून लढाअीला खरें तोंड लागलें. रात्री तर किल्ल्यावर नि गावामध्येही गोळे येअून पडू लागले. हें दृश्य पाहण्याला फारच भयंकर होतें. पन्नास साठ पौंडाचा तोफेचा गोळा अेखाद्या टेनिसच्या चेंडूअेवढा व धगधगीत निखाऱ्याप्रमाणे दिसे. दिवसा हे गोळे अितक्या स्पष्टपणें दिसत नसत. पण रात्र झाली की, ते स्पष्ट दिसू लागत त्यामुळे रात्रीला अेक निराळेंच भेसूर स्वरूप प्राप्त होअी. ता. २६-ला दक्षिण दरवाज्यावरील तोफखाना अिंग्रजांनी बंद पाडला, व त्यामुळे तेथील प्रतिकारही आटोपला. तेव्हा रणभूमीवर लढत असलेल्याचा अेकाअेकी धीर खचला. तेव्हा पश्चिम द्वारावरच्या तोफखान्यावरील गोलंदाजानें तोफेचें तोंड फिरवून चौफेर मारा केला आणि निमिषाच घडावयास त्याने अिंग्रज तोफखान्यावरील गोलंदाजाला ठार केले. तत्काळ अिंग्रजी तोफखाना बंद पडून अिंग्लिश सैन्यही थंडावले. या पराक्रमाने संतोष पावून राणीने त्या गोलंदाजाला चांदीचा तोडा बक्षीस म्हणून दिला. या गोलंदाजाचें नाव गुलाम गौसखान असें होतें. अशा तऱ्हेचें कौशल्य याच घोसखानानें नत्थेखानाशी झालेल्या युद्धातही गाजविलें होतें.

"पाचवे सहावे दिवशी पुन्हा असाच तऱ्हेची लढाअी माजून राहिली. चार पाच तास, बाअीच्या तोफखान्याने न भूतो न भविष्यति असा प्रलय अुडवून दिला. त्यामुळे अिंग्लिशांची अपार हानि झाली, काही काळ त्यांचा तोफाही बंद पडल्या. परंतु अेकाअेकी अिंग्रजानी जोर केला. त्यामुळे सातवे दिवशी झांशीतील डाव्या बाजूची तोफ थंडावली. त्या ठिकाणचा प्रतिकार आटोपला. शत्रूच्या तोफखान्याच्या अग्निवर्षावामुळे जंग्याची भिंतही कोसळली. रातोरात अकरा गवंडी बोलावून आणून दिवस अुजाडण्याच्या आत पूर्ववत् भिंत बांधून घेण्यात आली. अशा रीतीने भिंत बांधल्यावर झांशीचा तोफखाना पुन्हा धडधडू लागलेला पाहून अिंग्लिशानें घाबरें दणाणलें. या वेळी अिंग्लिश सैन्यातही पुष्कळच अव्यवस्था झाल्यानें त्याची हानिही बरीच झाली.



१८५७-च्या रणसंग्रामात तळपणारी
रणलक्ष्मी लक्ष्मीराणी



१८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धाचे सेनापति
वीर तात्या टोपे

आठव्या दिवशी अिंग्लिश सैन्य शंकर किल्ल्याकडे गेलें. अिंग्रजांच्या जवळ अद्ययावत् पद्धतीच्या भारी किंमतीच्या दुर्बिणी असल्यामुळे त्यांच्या साहाय्याने त्यांनी किल्ल्यातील पाण्याच्या टाक्यांवर गोळे टाकण्यास आरंभ केला. पाण्याकरिता आलेल्या सहासात माणसांपैकी चार लोक ठार झाले व बाकीचे आपले हंडे, घागरी तेथेच टाकून पळाले. या आपत्तीमुळे नागरिकांचे पाण्याचे फार हाल अुडाले. पश्चिम-बाजूच्या व दक्षिणबाजूच्या गोलंदाजांनी शंकर किल्ल्यावर डागलेल्या अिंग्लिशांच्या तोफा बंद पाडल्या, तेव्हा कोठे नागरिकांना पिण्याजेवण्यासाठी पाणी मिळालें. चिंचेच्या झाडीत दारू कुटण्याचा ढंक होता. दोन मण दारू कुटून झाली की, ती तळघरात साठवून ठेवण्याकरिता तेथून हलविण्यात येअी. या दारू ढंकावर तोफेचा गोळा पडला व त्यात तीन लोक आणि आठ स्त्रिया जळून गेल्या. या वेळी मात्र खरोखरी रणधुमाळी अुमळून गेली. धुराने व धुळीने आकाश कोंडून गेलें. बुरुजा-वरचे कितीतरी गोलंदाज व कितीतरी शिपाअी ठार झाले. पण लगेच दुसरे लोक तेथे आणून अुभे करण्यात आलेले होते. स्वतः बाअी त्या धामधुमीत जातीने हजर राहून देखरेख करीत होत्या. बुरुजाबुरुजांवर स्वतः हिंडून, शिपायांना आज्ञा देत व प्रत्येक अडचणीचें निवारण करीत त्या स्वतः फिरत होत्या. त्यामुळे शिपायांनाही अुत्साह वाटून, तेही त्वेषाने लढण्यास सरसावत. अशा या हट्टेल प्रतिकारापुढे काही न चालून अिंग्लिशांजवळ अितक्या तोफा व दारूगोळा असूनही त्यांना ३१ मार्च-पर्यंत किल्ल्यात प्रवेश मिळाला नाही.[३]

पण ह्या प्रलयकालच्या गडबडीत रणावरची राणी कोणीकडे आहे? आज प्रभात होताच ती लक्ष्मीराणी तटावरून तिकडे कां बरें अितकें निरखून पहात आहे? चला तोफांच्या सलाम्या द्या, आनंदभराने जयवाद्यांचे जयनाद कडाडवा, आकाश थोरगर्जनांनी अेकदम डळमळून टाका. कारण तो पहा मनमोहन तात्या टोपे ससैन्य धावत येत आहे! अिंग्रजांच्या सैन्याला भयग्रस्तता व झाशीचे मुलाला अुत्साह-जनकता देण्यासाठी तात्या टोपे ससैन्य आला आहे. विन्डहॅमचा पराजय व सर कॉलिनचा जय केल्यानंतर तो प्रथम गंगापार होअून श्री. नानांना मिळाला व त्यांची आज्ञा होताच त्वरित यमुना अुतरून काल्पीला आला. चरखारीच्या राजाने पेशव्यांनी मांडलेल्या देशसंगरात मदत देण्याचे नाकारताच तात्या त्याच्या राजधानीवर तुटून पडला, त्या फुलम्याला ससैन्यास रणशासन केलें, त्याच्यापासून तीन लक्ष रुपये व चोवीस तोफांची खंडणी अुकळली आणि हा मराठा गडी पुन्हा काल्पीला परतू लागला. तों त्याला लक्ष्मीराणींची चिठ्ठी आली की आपण त्वरित येअून झाशीची मुक्तता करावी. ती चिठ्ठी त्याने काल्पीच्या मुख्य अधिकारस्थित रावसाहेबांकडे धाडली व त्यांची अनुज्ञा मिळताच तो तात्या आता अिंग्रजांच्या पाठीवर तरवार अुपसून धावला.

---

३. श्री. पारसनीसकृत 'झाशीच्या राणीचें चरित्र' पृ. १८७–१९३

ब्रह्मावर्तांचे वाड्यात लहानपणी अेकत्र मेळणारी कोणाच्या विशेष लक्षात न भरणारी हीं दोन बालकें आज रणांगणात अेकत्र खेळत आहेत — अेक झांशीच्या तटावर अग्नि-प्रलयात विराजत आहे — दुसरा बावीस हजार सैन्यासह बेटवानदीवर तरवार परजतो आहे ! कोणाच्याच लक्षात न भरणारा त्यांचा खेळ आज जगाचें लक्ष्य झाला आहे !

तात्याच्या हाताखाली या क्षणी जितकें सैन्य होतें तितकें केव्हाही नव्हतें व म्हणून त्याला पाहताच अिंग्रजांची मनातल्या मनात तारांबळ अुडाली, आणि ती रणातही अुघडपणे अुडणार. कारण पुढे झांशीची ती रणलक्ष्मी आणि मागे हा मराठी वाघ — बावीस हजार नखें ज्याच्या पंजाला ! तेव्हा सर ह्यू रोजला आता त्याने फाडून का खाअू नये ? तो त्याच्याग पुढे मरणावलाही — पण कोण चमत्कार ? तीं बावीस हजार नखें सर्व लुळीं — वर अुचलली जाअीनात — मांजराच्या नखांअितकी हीं ताठ करता येअीनात आणि नखें अशीं लुळीं पडताच वाघ झाला तरी काय करणार ? छे, छे, ह्या बेटवा नदीवर वंडवाल्याच्या सैन्याने अत्यंत लाजिरवाणा पळपुटेपणा केला. झांशीच्या सैन्याने अिंग्रजाच्या पाठीवर मारा द्यावा व तात्यांनी त्याच वेळेस तोंडावर मारा द्यावा हा अत्युत्कृष्ट बेत. अिंग्रजांनी ही निराशेची कैची पाहून तात्यांवर चाल केली व झांशीवर मारा चालविला म्हणजे काय तर त्यांचे दोन्हीही मारे पोकळ झाले. अशात अेक नेटाचा शिवाजीच्या मावळ्यांचा किंवा कुवराच्या खास पथकाचा हल्ला व्हावा तसा हल्ला केला असता तर रणांगणात युनियन जॅकचे तुकडे गिधाडांनी फाडले असते ! परंतु अिंग्रजी हल्ला नीट 'सरळ: धडक' देत असलेला पाहताच अेशियाटिक लढलेच नाहीत — आणि कोण गफलत वा फितूर झाला असेल तो असो — झांशीच्या तोफा त्याच वेळी मुक्या राहिल्या' तेव्हा आपली सेना अुधळलेली पाहून तात्या अुधळून गेला. अिंग्रजांनी त्यांची युद्धसामुग्री पाडाव केली, मोठमोठाल्या तोफा काबीज केल्या व पंधराशे लोक ठार केले — पंधराशे लोक ठार झालेच तर शेवटी ! मग वेड्यांनो, भ्याडामारखें पळून मरण्यापेक्षा जर पंधराशे बरेलीच्या गाझीसारखे मरणासाठी शत्रूवर तुटून पडले असतेत तर सर ह्यू रोज सुद्धा सगळ्या अिंग्रजी सेनेला ठार मारून तुम्ही चिरंजीव झाला नसता काय ? परंतु तुम्हाला परमेश्वर क्षमा करो ! कारण कसेही मेलात तरी देश-स्वातंत्र्यासाठी तुम्ही मेलात ! आदराला नसलात तरी सहानुभूतीला तुम्ही पात्र आहात ! जगण्यासाठी लढणारे जे असतात ते मरतात व मरणासाठी लढणारे जगात अितकेच नाही त्रिलोकात जगतात — चिरंजीव होतात !

आणि मरणासाठीच रणलक्ष्मी लक्ष्मीराणी लढत आहे. मग सरदार ठाकूर सैनिकहो निराश का ? तात्या टोपे यांची मदत येअील ह्या आशेने आज ११ दिवस व ११ रात्री विस्तवाच्या वर्षावात काढल्यात. तात्या टोपे आलेला पाहताच आनंदाची वीरगर्जना केलीत. तात्या टोप्याच्या पराजयाने तुमचा तो आनंदच नव्हे तर –

तुमची यशाशाही ठार झाली आणि शत्रूला ज्याची आपण तूट पाडली होती ती दारू-गोळा व तोफा व रसद हीं आयतीच मिळाली हें खरें आहे. पण म्हणून निराशा का? यशस्वी जगणें जरी शत्रूला अशक्य करता आलें आहे तरी यशस्वी मरणें त्याला कालत्रयी तरी अशक्य करता येईल काय ? मग निराशा कां ? ऐका, रणलक्ष्मीची गर्जना ऐका. " आजपर्यंत झांशी लढली ती पेशव्यांच्या बळावर लढली नाहीं व आता पुढेही तिला त्यांच्या मदतीची जरूर नाही. आजपर्यंत तुम्ही आपला स्वाभिमान, आपली हिंमत, आपलें धैर्य व आपलें शौर्य जसें उत्तम प्रकारे व्यक्त करून आपले नांव मला दिलें तसें आता यापुढेही द्वियावें युद्ध करा, " जय रणलक्ष्मी जय ! हरहर महादेव -- चला वाजवा रणनौबती, फुंका रणशिंगें, ठोका रणगर्जना, गडगडू द्या रणतोफा ! आज अिंग्रज झांशीवर चहूबाजूंनी शेवटचा हल्ला चढवीत भिडला आहे तर उसळू द्या बेसुमार रणधुमाळी ! पहा पहा, ती लक्ष्मीबाओी कमरेला तरवार लटकावून कोणाला सुवर्ण वलय, कोणाला पोषाख, कोणाला हस्तस्पर्श, कोणास वीरस्मित आणि सर्वांस वीरस्फूर्ति देत चमकत आहे ! तर गुलाम घोषखान व कुंवर खुदाबक्ष, तोफाच्या मारगिरीची शर्थ करा. शत्रू झांशीच्या मुख्य दरवाज्याला व तटाला लगटला -- आठ ठिकाणी आठ शिड्या लावून तो वर येत आहे -- हरहर महादेव ! लाल गोळ्या, पेटते गोळे, तोफाचे घनगर्ज, बंदुका झडल्याच्या फेरी, विस्तीर्ण शिला, आगीचे डोंब, किल्ल्यावरून, तटावरून, घरांवरून हरहर महादेव! रणलक्ष्मी का -- ती रणघोरा कालिका ! हरहर महादेव ! अरे हा कोण ? लेफ्टेनंट डिक व ले. मेकिलजॉन ! तटावर शिड्या चढून आले व बाकीचे अिंग्रजी वीर आपल्यामागे येण्यास चेतवीत आहेत ! धडाड धडाड -- तत्क्षणी त्यांची प्रेतें काळाच्या जबड्यात धडाडून कोसळली आणि तिथे त्यांच्या मागे येण्यास कोणी अिंग्रज तयार आहे का ? ले. बोनस व ले. फाक्स, तुमची अिच्छा दिसते तशी तर जा तुम्हीही त्यांच्यामागे काळाच्या जबड्यात ! हे चार शूर अधिकारी तटावर कापले जाताच अिंग्रजी शिड्या लटपटल्या -- भाराखाली काही शिड्या मोडून गेल्या -- अिंग्रजी सेना हटू लागली, हटली, दगडादगडामागे दडत चालली ! आंग्ल सेनेने पिछेहाटीचे बिगूल फुंकले.[४]

४. " No sooner did we turn into the road leading towards the gate, than the enemy's bugle sounded, and a fire of indescribable fierceness opened upon us from the whole line of the walls and from the tower of the fort overlooking this site. For a time it appeared like a sheet of fire, out of which burst a store of bullets, round shots and rockets destined for our annihilation....But the fire of the enemy waxed stronger, and amidst the chaos of sounds of volleys, of musketry and roaring of cannon hissing and burst-

(टीप पुढील पानावर चालू)

परंतु तिकडे तटाचे दक्षिण बाजूला ही भयसूचक किंकाळी कोण फोडीत आहे? अधम फितुराने तो ओरछा दरवाजा तर गमावला नाही ना ? होय, होय, ओरछा दरवाजा अिंग्रजांनी हस्तगत करून ते तटावर भराभर चढले आहेत! मग काय मारणमरणावाचून नांव घेणें नको ! रणाचा शिळंधार पाअूस पडू लागला. त्यांनी अिंग्रजांनी घेअून राजवाड्यापर्यंत कत्तलीचा, आगीचा, नाशाचा झेंडा नाचवीत आणला. किल्ल्याचे तटावर अुभे राहून राणी लक्ष्मी शून्य दृष्टीने झाशीकडे पाहू लागली तों आगीचे लोळ, मरणाऱ्या व मारल्या जाणाऱ्या बायकांचे आक्रोश, अर्भकांचीं छाटलेलीं डोकीं! हाहाकार! प्रेतांचे ढीग! शंकराचा तिसरा नेत्र प्रलयकाली पेटत नसेल असे तिचे नेत्र संतापाने ज्वालग्राहक झाले. तिने तरवार अुपसली व दीड हजार तरवारबंद लोकांसुद्धा ती किल्ल्याखाली धावत चालली. पिले पळविणाऱ्यावर पिसाळलेली वाघीण जशी धावत नसेल! दक्षिणचे तटावर जे गोरे लोक आले होते त्यांना पाहताच तिने तरवार अुपसली व ती पिछाडीस असता अेकदम मध्ये चालून गेली आणि पहा पहा, तरवारीचा चकचकाट होअून दोन्ही सैन्यें अेकमेकात मिसळलीं. पांचापाच अंक मोजण्याचा अवकाश तों तरवारीवर तरवार झडली. पुष्कळ युरोपियन लोक कापले गेले, बाकी राहिलेले शहराकडे पळून आडून बंदुका झाडू लागले. शत्रूच्या रक्ताने तिचा कोप किंचित् शांत झाला. तेव्हा तिला अुमगले की, किल्ला सोडून येथे लढणे अयोग्य आहे. तिच्या असल्या धाडसी चपेटघाचे प्रतिध्वनि प्रत्येक रस्त्यात होत आहेत. राजवाड्यात ५० मोतदारांनी सर्व शहर व खुद्द तो वाडा अिंग्रजी क्रूर तरवारींनी रक्ताने भिजविला असताही —आपली पागा सोडण्याचे नाकारले! शरण हा शब्दच त्यांच्या कोशातच नव्हता! त्यांच्यातील अेकूण अेक मनुष्य शत्रूला छाटीत छाटीत छाटला गेला तेव्हाच पागा पाडाव झाली! आता लक्ष्मीराणी पुन्हा किल्ल्याच्या गच्चीवर चढली आहे आणि—हा हा धैर्यदेवी,हें काय तुझ्या नेत्रातून संतापाचे जाळ आणि अनुकंपेचें पाणी —पाणी आणि जाळ अेकसमयावच्छेदाने वाहताहेत!

आता किल्ला शत्रूच्या हाती पडणे हा फक्त वेळेचा प्रश्न अुरला ! लक्ष्मी राणीने आता काय बेत योजावा! बेत—अेकच बेत की, वाड्यात दारुगोळा घालून तो पेटवून देअून मी आपला शेवट करण्याचा संकल्प केलेला आहे! त्या माझ्या जरिपटक्यासह गादीवर नाहीतर आता चितेवर पण मी सहगमन करणार! हे अैकताच

(टीप मागील पानावरून चालू)

ing rockets, stink-pots, infernal machines, huge stones, blocks of wood and trees, all hurled upon our heads, it seemed as though Pluto and the Furies had been loosened upon us, carrying death amongst us fast. At this instant a bugle sounded on our right for the Europeans to retreat." —Lowe's Central India, page 254.

अेक वृद्ध सरदार प्रशांत वाणीने म्हणतो, "महाराज, किल्ल्यात राहणें आता सुरक्षित व निर्भयपणाचें नसेल तर आपण आज रात्री शत्रूचा घेर फोडून शहराबाहेर निघून जावें व पेशव्यांचे सैन्यास मिळावें. मध्यंतरी मृत्यु आला तर—धारातीर्थी शयन करून स्वर्ग जिंकणें हें फार चांगलें आहे! लक्ष्मीराणी म्हणते, "युद्ध करून रणात मरणें मलाही अिष्टतर वाटते. पण स्त्रीदेह आहे. शत्रू विटंबना करतील." विटंबना! दरबार गर्जला 'आम्ही ती होअू देणार नाही!'

बस्स तर, रात्र पडली आहे, आता माझ्या प्रियजनानो, ही माझी शेवटची भेट मानून घ्या! प्रिय प्रजाजन डोळ्यांत आसवें आणून तिच्या पायावर नमस्कार घालू लागले. मोरोपंत तांबे, तुम्ही हत्तीवर जामदारखान्याचें द्रव्य भरून तो ह्या निवडक दोनशे रणबहादुरांचे मध्यभागी घ्या, झाली सर्व सिद्धता? चला तर, बोला हरहर महादेव! हरहर महादेव गर्जत आणि लक्ष्मीराणी किल्ल्यावरून खाली अुतरू लागली. तिनें पुरुषवेष धारण केलेला आहे, अंगात तारेचे चिलखत, कंबरेस जरिया म्यानात अेक अुमदी समशेर, अेक रुप्याचा पेला पदराशी, अेक अल्पवयी लहान बालक अेका राजरत्नासारखा तिचा दत्तक पुत्र दामोदर, रेशीमकाठी धोतरात पाठीशी, —पाठच्या खंद्या घोड्यावर चढून ती देवी लक्ष्मी किल्ल्यावरून खाली अुतरू लागली!

किल्ल्याचा अुत्तरेचा दरवाजा आला, समोर असलेला तेहरी संस्थानचा देशद्रोही पहारा विचारतो, 'कोण चालले आहे?' ही तेहरीचीच फौज सर ह्यू रोज साहेबांचे मदतीस चालली आहे! असे अुत्तर मिळालें. लक्ष्मीराणी, दे घोड्याला टाच! अेक दासी, अेक बारगीर आणि दहापधरा स्वार काय ते आपल्या घोड्याशी घोडा ठेवीत शत्रूचा गोट फोडून थेट काल्पीच्या रस्त्यापर्यंत आले खरे, परंतु बाकीचे ते शूर मकराणी स्वार का बरे आले नाहीत? अिंग्रजी सैन्याने संशय येताच राणीचा पाठलाग चालविला असल्यामुळे रणांगणाची वाट आपल्या रक्तामांसाने अडवून टाकण्यात ते गुतले आहेत! लेफ्टेनंट बोकर तर काही स्वारीनिशी त्यांना टाळून पुढेही निघाला म्हणतात. तर चल, सद्भाग्यशाली अश्वा, वायूचे पंख लावून अुडत चल! भारतीय मनुष्यें देशद्रोही होवोत, परंतु हे भारतीय अ-मानुषीयहो, तुम्ही तरी देशद्रोही होअू नका. हे अश्वा, कमलाहूनही कोमल असलेल्या लक्ष्मीराणीला अलगत रीतीने तोलून धर हे रात्री, काळोखाचा पडदा राणी लक्ष्मीच्या व शत्रूच्या मध्ये अेकसारखा लटकत ठेव हे मार्गा, तिच्या घोड्याला कोठेही ठेचाळवू नकोस व हे तारकानो, शत्रूला दिसेल अितके प्रकाशू नका पण ह्या वीर तरुणीवर तुमच्या अमृतशीतल किरणांनी राणीचे श्रमपरिहार होण्यापुरते प्रकाशल्यावाचून राहू नका! प्रभात झाली आहे, तेव्हा सर्व रात्र पवन वेगाने चालल्यामुळे बोरागने, तू आता ह्या भाडेर गावाजवळ विश्रांति घे. गावचा महालकरी परमप्रिय दामोदरास फराळास देईल—फराळ झाला, चल आता पुन्हा काल्पीच्या रस्त्याला लाग—पण हा धुळीचा लोट कसला? बोकर व त्याचे घोडेस्वार आपला मुगावा काढीत हे आले

पहा!' टाच, घोड्याला टाचा मारा—राणी लक्ष्मी दामोदरास पाठीशी बांध व घोड्यावर चढ, तरवार उपस, ह्या पहा लगटला बोकर तुझ्या घोड्याला? घे तर तुझ्या लगटण्याला बक्षीस—अधम, बायलीला धरू पाहतो! —तिच्या तरवारीचा वार बोकरवर दणकून आदळला, तिचा घोडा त्याच्या हातातून सुटला, तो बाणासारखा पुढे कोसळून सोसावत गेलाही! तिच्या बरोबरच्या पंचवीस स्वारांची व अिंग्रजी स्वारांची अशीच निकराची चकमक अुडून जे अुरले ते आपल्या लक्ष्मीच्या रक्षणासह सुरक्षित पुढे गेले—व जखमी झालेला बोकर व त्याचे मूठभर स्वार पाठलाग सोडून मटकन खाली बसले! भूमातेची तरवार चालली चमकत चमकत पुढे-सूर्य आकाशात व राणी लक्ष्मी पृथ्वीवर—सकाळ झाली, मध्यान्ह झाला, सूर्य थांबला पण ती थांबली नाही—दुपार झाली, तिसरा प्रहर झाला, सध्याकाळ झाली, सूर्य समुद्रस्नानाची बुडी मारता झाला, तरी राणी लक्ष्मी थांबेना, तारे अुगवले, रात्री तिला काल जशी पाहिली होती तशीच आज त्यांच्या ह्या लांब निद्रेनतरही पुन्हा पाहिली. रात्रीचे बारा घटकाचे सुमारास ती वीर लक्ष्मी काल्पीमध्ये थांबली! अेकशे दोन मैलांचा प्रवास क्षणभर न थांबता तिने केलेला होता व तेही बोकर-सारख्याशी दोन हात करून व पाठीशी मुलाचें ओझें वाहून! काल्पीत येताच तिचा तो देशाभिमानी घोडा अतिश्रमाने जमिनीवर धाडकन अंग टाकून पडला—सात आठ शिपाअी त्या घोड्याच्या शिरा मळण्यास लागले. वाअीचें सुखरूपपणे पोचण्याचें श्रेय त्याच्यावरच विशेष, देशमातेच्या प्रेमासही असला घोडा पात्र आहे. सकाळपर्यंत लक्ष्मीराणीने शय्या केली.

सकाळी रावसाहेब पेशव्यांची व लक्ष्मीराणीची भेट झाली. त्या स्वराज्यासाठी रक्ताचा शेवटचा बिंदु गळेपर्यंत व शेवटचा श्वास सुटेपर्यंत स्वदेशाला भ्रष्ट करणाऱ्या शत्रूशी अखंड युद्ध चालू ठेवावे असा कृतनिश्चय ठरला. रावसाहेब, आपल्या पूर्वजांचे वेळी शिंदे, होळकर, गायकवाड, बुंदेले, विंचूरकर, रास्ते, पटवर्धन, असले असले सरदार स्वराज्याकरिता आपले प्राण खर्ची घालण्यास तत्पर होते म्हणून मराठेशाहीचा झेंडा अटकेपर्यंत फडकला! अेतदर्थ त्या स्वराज्यासाठी काल्पीत बंडवाल्यांच्या सैन्यामध्ये निकराची युद्धरचना चालू झाली [५]

ती रचना तिकडे चालली आहे तोपर्यंत आपण मागे सोडून दिलेला ब्रिगेडियर जनरल व्हिटलॉक काय करीत आहे ते अेकदा भरकन पाहून यावे. नर्मदेपासून गंगायमुनापर्यंतचा प्रदेश पुनर्जित करण्यासाठी अिंग्रजाच्या निघालेल्या दोन फौजापैकी सर ह्यू रोजची फौज झाशीपर्यंत येअून आता झाशीस अमानुष कत्तल व नादिरशाही लूट करीत आहे. त्याने राणीचे वडील मोरोपंत तांबे यांना पकडून फाशी दिले. ते पवित्र कार्य तडीस नेल्यानतर तो काल्पीपर्यंत जाअून, यमुनेला मिळून, पुढ

---

५. ग्रंथविस्तारास्तव ही माहिती येथे देता येत नाही. चोकस वाचकानी ती 'पारसनिसांचे पुस्तकातून वाचावी.

ाक्रमाचा अर्धाअधिक भाग लवकर पूर्ण करील. सर ह्यू रोजकडे महूपासून
ांसीपर्यंत कार्यक्रमाचा हा भाग जो देण्यात आला तसाच बाकीचा ब्रिगेडियर व्हिट-
ाचे हाताखालील फौजेकडे देण्यात आला होता. त्याप्रमाणे व्हिटलॉक जगदीश-
हून ता. १७ फेब्रुवारी रोजी युरोपियन रेजिमेंट, मद्रासचे नेटिव्ह रेजिमेंटस्,
स्वार, तोफखाना वगैरे सर्वांगपूर्ण अशा आपल्या हजारो सैनिकांसह निघाला व
ारशहरात विजयासह शिरला. बुंदेल्यांचा राजनिष्ठ राजा तिथे त्याला मिळाल्या-
र तेथून त्या प्रांतातील बंडखोरांचा मुख्य धुरीण जो बांद्याचा नबाब त्याच्या-
तो चालून गेला. झाशी, नौगाव वगैरे ठिकाणी बंडाचे आरंभी जेव्हा क्रूर कत्तली
ून त्यातून जीव बचावीत गोरे लोक रानोमाळ पळत होते तेव्हा त्यांना या नबा-
, कारच्या उदार आश्रय व जीवदान दिलेले होते. हे जीवदान देण्यात अिंग्रजी
ामगिरीने जू बंडाचे दंडुक्याखाली कडकडून मोडताना पाहून त्याने आपलीही
न त्यातून काढून घेतली व त्या प्रांतात स्वातंत्र्याची ग्वाही फिरविली. अिंग्रजी
ज आपल्यावर चालून येत आहे हे कळताच त्यानेही त्याच्याशी युद्ध देण्याची
ारी केली. त्याच्या व अिंग्लिश सैन्याच्या बऱ्याच झटापटी झाल्या. अेक निकराची
ाअी होअून तो नबाव काल्पीकडे निघून गेला व व्हिटलॉकने बांदा शहरात प्रवेश
ला व ता. २७ मेपर्यंत तो बांदा शहरीच तळ देअून राहिला. आता त्याची पुढची
डप किर्वीच्या राजावर पडणारी होती.

किर्वी येथील रावमाधव हा या वेळेस केवळ दहा वर्षांचा बालक असून त्याचे
लकत्व खुद्द ब्रिटिशांच्या हातात होतें. त्यांनी त्याच्या खाशींचा रामचंद्रराव म्हणून
क गृहस्थ त्या कामी नेमलेला होता. किर्वीचे राव हे पेशव्यांचेच सबंधी होते.
८२७ साली अमृतरावाने अिंग्रज सरकारपाशी विश्वासाने दोन लक्षांची ठेव म्हणून
ेलेली रक्कम त्याच्या पश्चात् खाअून टाकण्यात आली. त्याच्यामागे त्याचा पुत्र
वनायकराव ह्याने पुन्हा दिलेली लाखो रुपयांची रक्कमही तो मरताच गिळंकृत
रण्यात आली. तरी माधवराव हा दत्तक पुत्र असल्याने व त्याचे पालकत्व खुद्द
ब्रिटिशांचेकडे असल्याने किर्वी संस्थानात बंडाची फारशी भीति नाही असा सभव
ोता. परंतु सत्तावन साली हिंदुस्थानातील राव किंवा महाराव काय करतात याची
ारच थोडी किंमत अुरलेली होती. अस्पष्टपणे वा स्पष्टपणे पण लोकशक्ति – हिंदु-
थानची देशशक्ति – हुंकार करूलागली व तिच्या त्या हुंकाराचा व गंभीर गर्जनेचा
ाघगर्ज अैकताच क्रांतीच्या ज्वाळा अुठू लागल्या! स्वातंत्र्याची अुत्कट चेतना व देश-
ाची अुच्च कल्पना या अुदात्त स्फूर्तिने देशाच्या अंगात संचार झालेला असताना
ाव वा महाराव त्याच्यापासून अलिप्त राहणार किती? अलिप्त राहून करणार
काय? किर्वीच्या संस्थानात जमिनदार, धर्माधिकारी, व्यापारी, वगैरे झाडून साऱ्यांच्या
अंगात हें स्वातंत्र्याचें वारें भरलेलें, अिंग्रजी सत्तेचा नामोच्चार होताच सहस्र विंचू
डसल्याप्रमाणे लोकपदाला असह्य वेदना होत असत व त्यातून आता आज झांशी

अुठली तर अुद्या कानपूर अुठेल तर परवा दिल्ली अुठली तर तेरवा स्वनी असा स्फूर्तिदायक वार्ता निघून क्षणोक्षणी येअून आदळत असता तें संस्थान, राव काय म्हणतो याची वाट न पाहता, द्वाही फिरवितें झाले यात काय नवल आहे! परंतु लोकपदाने स्वातंत्र्यद्वाही फिरविली असताही रावाने – नअू वर्षाचें बालक – अिंग्रजांचे विरुद्ध कोणतेंही कृत्य केलेलें नव्हतें. अितकेंच नव्हे तर अिंग्रजी सैन्य आलें आहे असे कळताच तो त्यास सामोरा आला व त्यांना शहरात बोलविता झाला. त्या बोलावण्याप्रमाणे अिंग्रजी सैन्य शहरात आलेंही. पण तें रावपणाचा, त्याच्या राजधानीचा व त्याच्या राजवाड्याचा खून करण्यासाठी होय! भयंकर लूट, भयंकर जाळपोळ भयंकर अनीतीचा सूड! नंतर ते संस्थान खालसा झालें.[६] व्हिटलॉक जिंकलेल्या प्रदेशात शांतता ठेवण्यासाठी महोबा येथे जाअून अुतरला. आता वास्तविक पाहता त्याचा कार्यक्रम पूर्ण होअून त्याचेकडचा प्रांत ब्रिटिशांनी पुनर्जित केलेला आहे व्हिटलॉकबद्दल अितकी चौकशी करून काल्पीला गोटलेल्या राणी लक्ष्मीच्या पदपद्म दर्शनासाठी हे नयनांनो, जलदीने तिकडे चला!

राणी लक्ष्मी आता पेशव्यांचे सैन्यावरोबर काल्पीपासून ४२ मैलांवर असलेल्या कुंच नांवाच्या गावाजवळ येअून अुभी राहिलेली आहे. परंतु तिच्या मनाप्रमाणे त्या सैन्याची व्यवस्था रावसाहेबांनी केलेली नाहीसे दिसते. रावसाहेब किंवा तात्या टोपे तरी व्यवस्था कशी करणार? तिथे बांदेवाले नबाब, शहागडचे राजे, बाणपूरचे राजे हे सर्व स्वराज्याच्या अेका निशाणाखाली जरी जमलेले आहेत तरी अेका मनाने किंवा अधिकृत रचनेने जमलेले नाहीत. त्यामुळे धट कोणाचीच अक्कल काम करू शकणार कशी? परतु समोरून चालून येणाऱ्या ह्या शत्रुसैन्यात मात्र अशा बेसुमार अकलींचा गोंधळ नसून सर्व रचना सुयवद्धतेने झालेली दिसते! मग ह्यूला सेनापतित्वावर नेमण्याने आधी यथेच्छ चर्चा व मतवैचित्र्य, परतु अेकदा तो सेनापति झाला म्हणजे सर्व मतभिन्नता त्याच्या मतात अेकजीनता पावलीच. तो हुकूम देअील तोच बरोबर – नव्हे तो चुकीचा असला तरी तोच मान्य आणि सेनेच्या वश आज्ञाधारक

---

६. With regard to this injustice done to Rao, Malleson has to confess : ' Not a shot had been fired against him ( Whitlock ) but he resolved nevertheless to treat the young Rao as though he had actually opposed the British forces. The reason for this perversion of honest dealing lay in the fact that in the palace of Kirvi was stored, the wherewithal to compensate soldiers for many a hard fight and many a broiling sun. In its vaults and strong rooms were special jewels and diamonds of priceless value. The wealth was coveted. " Kaye and Malleson's Indian Mutiny Vol. V, Pages 140–141.

शौर्याने सेनापतीने चुकीचे हुकूमही यशस्वी होतातच, झालेच पाहिजेत. परंतु सेनेच्या आज्ञाभंजक लहरीपणाने सेनापतींचे अुत्कृष्ट हुकूमही निकृष्ट अपयशाला पोचतात – नव्हे पोचलेही !

नाहीतर कुंचगावाला जी धुळधाण अुडाली ती कधीच अुडाली नसती. सर ह्यू रोज झाशीहून येताच वडवाल्यांनी त्याच्याशी कुंचगावजवळ सामना दिला. दुपारचा प्रखर सूर्य अिंग्रजांना फारच तापदायक नि असह्य असतो हे लक्षात घेअून वडवाल्यांच्या अेका तुकडीच्या नायकाने अशी आज्ञा दिली होती की, 'सकाळी १० वाजण्यापूर्वी कोणीही अिंग्रजाविरुद्ध रणात अुभे राहू नये. लढाअीला प्रारंभ नेहमी १० च्या पुढेच व्हावा आणि हीच आज्ञा त्या दिवशी सर्वांनी पाळली. त्यामुळे १० नंतरच्या प्रखर अुन्हात अिंग्रजांचें चांगलेच बारा वाजले ! परंतु अितके होअूनही कुंचगावला वडवाल्यांचा पराभव होअून त्यांना काल्पीकडे माघार घ्यावी लागली. अर्थात् ज्या कौशल्याने त्यांनी अत्यंत शिस्तीत नि संघटित रीतया माघार घेतली त्याविषयी त्यांचें शत्रूने सुद्धा कौतुकच केलें आहे.[७] परंतु दुर्दैव असें की ही सर्व संघटना नि शिस्त, ही पराभवापूर्वी दिसावयास पाहिजे होती ती पराभवानंतर दिसून आली. यानंतर वडवाले काल्पीला येअून पोचले. त्या ठिकाणी आल्यावर जो तो पराभवानें खापर दुसऱ्याच्या डोक्यावर फोडून त्याला दोषी ठरवू लागला. पायदळाने पराजयाकरिता घोडदळाला दोष दिला, घोडदळाने झाशीच्या सैन्यावर शब्द ठेवला, नि सर्वांनी मिळून तात्यांवर तोंडसुख घेतले!

परंतु हा दोषारोप अैकण्यास आता तात्या टोपे काल्पीत पुन्हा येणार नाही – तो सध्या आपल्या वडिलांस भेटण्यासाठी जालवणाजवळ असलेल्या चरखारी गावी गेलेला आहे आणि तेथून तो पुढे कुठे जाणार की तेथेच राहणार हे अजून कोणासही नक्की कळलेलें नाही. अितके खरें की ग्वालेर शहर त्याच्याच मार्गावर वसलेले

७. Then was witnessed action on the part of the rebels which impelled admiration from their enemies. The manner in which they conducted their retreat could not be surpassed. They remembered the lessons which the European Officers had well taught them There was no hurry, no disorder, no rushing to the rear. All was orderly as on a field day. Though their line of skirmishes was two miles in length, it never wavered in a single point. The men fired then ran behind the relieving men and loaded. The relieving men then fired and ran back in their turn. They even attempted, when they thought the pursuit was too rash to take up a position, so as to bring on it an enfilading fire. "—Malleson's Indian Mutiny Vol. V, page 124. शत्रूने केलेल्या या गुणगौरवामुळे ' पाडे ' सैन्याचें श्रेष्ठत्व अधिकच स्पष्ट होतें.

आहे! त्या अद्वितीय पुत्राची व त्याच्या त्या 'धन्यवीज' बापाची भेट प्रेमाने ओथंबलेली होती! व त्या प्रेमभेटीनंतर ह्या अलौकिक क्रांतिदूताला ज्यांची मुख्य भेट घेणें आहे त्यांच्या अनुरोधानें तो तिकडे त्वरित गमन करी! त्याचें तें विशिष्ट गमन तिकडे त्वरेनें चाललेलें असता जिकडे काल्पीला राणी लक्ष्मीही रावसाहेबांचे बाड्याकडे गमन करीत आहे. रावसाहेबांची कुंच येथील पराजयाने आलेली खिन्नता दूर करुन ही वीरलक्ष्मी म्हणते की सैन्याचा बंदोबस्त कच्चा नसेल तर अपयश का म्हणून मिळेल? तिच्या म्हणण्याने बांदेवाले नबाबही जुलाही होतात, बंडवाल्यांच्या सेनेत पुन्हा युद्धमायेचे जाहिरनामे प्रसिद्ध होतात. ती अफाट सेना, ते त्यांचे स्वराज्यभूषण जरिपटके, श्रीयमुनेच्या काठावर लोटू लागतात. देशमातेच्या व देशधर्मांच्या जयजयकाराने यमुनेचें तीर दुमदुमून जातें. तिचें तें पवित्र पाणी हातात घेऊन आम्ही शपथ घेतो की, "फिरंग्यांचा नायनाट करू, स्वदेशाला, स्वातंत्र्याला व स्वधर्माला प्रतिष्ठापण देऊ तरच, हे यमुने, ह्या जगामध्ये प्राण धारण करू! जर हें घडलें नाही तर रणांगणातील धारातीर्थात रक्तसमाधि घेऊ! हे कालिंदी, आम्हाला तुझीच त्रिकाल शपथ आहे!" वीरांनो, चला तर आता रणाकडे ती रणलक्ष्मी तुम्हांस तिकडे उत्तर बाजूकडे पाचारीत आहे. रावसाहेब, तुम्ही स्वतः सर्व सैन्याचें आधिपत्य घ्या. सर ह्यू रोजची २५-वी नेटिव्ह अिन्फंट्री आली— चोपा आणि द्या पिटाळून त्या देशद्रोह्यांना—मेजर आर पुढे आला त्यालाही त्याच्या तुकडीसह करा अपयशाचे वाटेकरी. आज ह्या काल्पीसमोरील मैदानात आपली रणभूमि उंच सखल अशा डोंगराळ प्रदेशांनी भरून अजिंक्य आहे. परंतु हाय हाय, आपले आघाडीवरचे लोक मागे पडले पहा—अवसानाचे भरात पुढे गेल्याने त्यांची अशी निराधार स्थिति झाली असावी! तर धाव—हे रणलक्ष्मी तू धाव! ह्या प्रबल सेनेचे, हे अबले, तूच आता रक्षण कर! 'आले मी आले' असें गडगडत ती रणलक्ष्मी लालवर्दीच्या घोडेस्वारांसह विजयी अिंग्रजाचे उजव्या बाजूवर तुटून चालली. ती विजयी उजवी बाजू या वीर चढाओपुढे दबकली, गांगरली, मटकन खाली बसली. त्या शिसोदियांचीच्या तरुण रणलक्ष्मीचा हा आवेश, तिचा बेफाम सुटलेला घोडा, ही तिची सपासप लवलवणारी रक्त रक्त तरवार, तिला पाहून कोण रणावणार नाही? वीर स्फूर्तींच्या विजेने काय प्रकाशणार नाही? सर्व बंडवाले तिच्या तेजाने प्रस्फुरित झाले—रणधुमाळीचा कळस झाला. लाअिट फील्ड तोफांवरचे अिंग्रजी गोलंदाज पटापट मरू लागले—राणी व तिचे घोडेस्वार अिंग्रजी तोफांच्या आगीने डोंबावर उड्या घेत गेले व त्या आगीच्या डोंबाला चटके देऊ लागले! अिंग्रजी गोलंदाजांनी तोफा सोडल्या, अिंग्रजी घोड्यावरचा तोफखाना घोड्यांसह उधळून चालला, बंडवाल्यांचे वीर गर्जना करीत फारा दिवसांचा दुष्मन फिरंगी सापडला रे सापडला म्हणून चोहो बाजूंनी तुटून चालले आहेत— आणि सर्वांच्या पुढे ती रणलक्ष्मी लक्ष्मीराणी चमकत आहे! असा हा भयंकर चमचमाट पाहून

दिपलेला सर हयू रोज आता आपलें राखलेले अुंटावरचें सैन्य घेअून पुढे घुसला व त्या सैन्याच्या नवीन जोमानेच अिंग्रजांचा त्या दिवशी प्राण वचावला. अिंग्रजी लेखक म्हणतो, "अेक पंधरा मिनिटें अुशीर की बंडवाल्यांनी आमची कत्तल अुडविली असती! ताज्या दमाच्या दीडशे अुंटांनी तो दिवस पालटविला. 'Ever since that day I have looked upon a camel with eyes of affection." त्या दिवसापासून अजूनपर्यंत माझें प्रेम अुंटावर जडलेलें आहे! ह्या परमप्रिय अुंट वीरांच्या असह्य बाणवृष्टीने पेशव्यांचीसेना हटू लागली—हटली—छाटली—काल्पी सोडून दशदिशांना फाकली! आणखी अेकदोन दिवसांनी काही छोटयाशा चकमकी होअून ता. २४ मे रोजी अिंग्रजी सैन्याने काल्पी शहरात प्रवेश केला. काल्पीच्या किल्ल्यात श्रीमंत रावसाहेब पेशवे व तो जवानमर्द मराठा तात्या टोपे ह्यांनी अेक वर्षपर्यंत अश्रांत श्रम करून अपार युद्धसाहित्य तयार केलेलें होतें. तें सर्व अिंग्रजांचें हातात पडलें—बंदुकीची दारू साठ हजार पौंड पुरलेली सापडली, अुत्तम रीतीने जडविलेल्या मस्केट बंदुका, मातीच्या साच्यात तोफेसाठी ओतलेले पितळी गोळे, युरोपमध्ये तयार केलेलीं शस्त्रें, तोफा, हावित्झार, गोळे, गोळ्या व तोफा नीट करण्याचे व बनविण्याचे कारखाने, लष्करी पोषाखाचे प्रचंड ढीग, निशाणे, दुंदुभी, ध्वज, फेंच शिंगें, अित्यादि अित्यादि अशी अगड व अत्यंत अुपयुक्त अशी लूट सापडली!

जें सापडले नाही ते फक्त बंडवाल्यांचे अमर्त्य धैर्यपुढारी हे होत. कारण तें शहर पडल्यानंतर आठवड्यातच युक्तीने रावसाहेब, बांदेवाले नबाब, राणीलक्ष्मी अित्यादि धुरीण काल्पीहून निसटून पुढे कुठे तरी गेलेले होते. परतु आता वनवासात दुष्काळाने वा शत्रुशस्त्राने मृत्यूचे दाढेत पडण्यापलीकडे त्या असैन्य. अशस्त्र, अनाथ, अयशी लोकाचें हातून काहीही घडणें नाही. सर कोलिनने यमुनेच्या अुत्तर तीरापासून आरंभ करून थेट हिमालयापर्यंतचा प्रदेश जिंकून घेतला व सर ह्यूरोज व व्हिटलॉक ह्यांनी नर्मदेपासून आरंभ करून यमुनेच्या दक्षिण तीरापर्यंत सर्व प्रदेश जिंकून घेतला. तेव्हा आपल्या सैन्याचें अेका वक्तृत्वपूर्ण भाषेत अभिनंदन करून व 'सोल्जर्स, तुम्ही अेक हजार मैलांवर चाल करीत आलेत, शभरावर तोफा काबीज केल्यात, नद्याचे आलोडन, पर्वतांचे आरोहण, अरण्यांचे पर्यटन, प्रचंड शत्रूचा पराजय, विस्तीर्ण प्रदेशाचा पुनर्जय व स्वपक्षाचा विजय, हीं सर्व महत्कार्यं करण्यात तुम्हां यश मिळविलेत आणि तीं करताना तुम्हास अपयश म्हणून शिवले नाही। तुम्ही धैर्यवान् तर आहातच परंतु तुम्ही शिस्तही अुत्कृष्ट पाळलीत शिस्तीशिवाय धैर्य हे निष्फळ असते. अडचणीत, मोहात व संकटात तुम्ही तुमच्या सेनापतीचे हुकूम शब्दशः पाळलेत व तुम्ही केव्हाही बेबंद वर्तन केलेले नाही. नर्मदेच्या पाण्यापासून यमुनेच्या पाण्यापर्यंत तुमचे यश तुमच्या शिस्तीने आणलेले आहे!" असें सानंद प्रदर्शन करून प्रकृति अत्यंत अस्वस्थ असल्यामुळे व बंडवाल्याचा पूर्ण निःपात केल्यामुळे सर ह्यू रोजने आपला चार्ज सोडून दिला व तें कृतकृत्य आंग्ल सैन्य आता विसावा घेण्यासाठी हुश्श करून खाली बसू लागलें.

पण खबरदार कोणी असें हुश करीत बसलें तर! तात्या टोपे आणि राणीलक्ष्मी जिवंत असताना त्याच्या माघून हुश्श करीत खाली बसू लागावें – कोण हा उद्दामपणा!· खडे रहो! आणि मुकाट्याने खडे रहात नसाल तर हा केला पहा तिकडे भयंकर वेढा ग्वाल्हेरला! ऐका हे तोफांचे जयनाद! तोफा धडाडत आहेत, मनयाचें यशोगीत तननत आहे, वीर जनाचे नाच थयथया नाचत आहेत, भालदारांची ललकारी, ब्राह्मणांचीं वेदगीतें, वृद्धाचे आशीर्वाद, तरुणाचे रणनाद, आणि त्या सर्वांवर चढत जाणारा त्या सर्व गर्जनांचा आत्मा—त्या सर्व गर्जनांची ऐकवाक्यता असा हा अद्भुत सिंहनाद "आम्ही रावसाहेब पेशवे आहोत, आम्ही स्वराज्यासाठीं व स्वधर्मासाठीं लढत आहोत,[८] अखिल चराचरहो, नीट ओळखा आम्ही रावसाहेब पेशवे आहोत! आणि अितिहासा, अेक आम्ही स्वराज्यासाठीं व स्वधर्मासाठी लढत आहोत!" ही अोळख पटली सर हयू रोजला! जिला वनवासाच्या दाढेत ढकलून दिलें म्हणून मी समजत होतो तीच ही गर्जना तर नसेल? आम्ही स्वराज्यासाठी लढत आहो, आम्ही स्वधर्मासाठी लढत आहों!

होय, तीच ही गर्जना आहे. काल्पीच्या किल्ल्याचा आश्रय सुटताच ती प्रथम गोपाळपुराच्या वातावरणात घुसली. त्या वेळेस आशेचें चिन्ह अुरलेलें नव्हते. नर्मदेपासून यमुनेपर्यंत व यमुनेपासून हिमालयापर्यंत अिंग्रजानी सर्व प्रदेश जिंकलेला आहे, जवळ सैन्य अुरले नाही, अेका किल्ल्याचाही आधार राहिलेला नाही, पराजयाने नवीन सैन्य मिळण्याची आशा अुरली नाहीं—अेक तात्या टोपे काय तो अुरलेला आहे! होय ना? तात्या टोपे! चांदण्या अुरल्या नाहीत, दिवे अुरले नाहीत, आगपेट्या अुरल्या नाहीत—पण सूर्य अुरलेला आहे ना? आणि त्याची दीप्ति ती लक्ष्मीराणी? मग आकाशाला प्रकाशाची विवंचना नको. गोपाळपुराला तात्या परतही आला आहे. लोक म्हणतात तो फक्त आपल्या वडिलांस भेटून परत आला आहे—लोक म्हणोत पण अितिहास तसें म्हणत नाहीं. काल्पीला सर हयू रोजचा पेच पडला व ती हातची सुटणार असें दिसू लागलें तेव्हा त्याना अेकदम पितृवात्सल्याची अितकी अनिवार अुबळी फुटली की रणवात्सल्य सोडून ते चरखारीला वडिलास भेटण्यास गेले! कारण? कारण कानपूर पडताच जशी त्यांनी काल्पी वगलेत मारली तशीच काल्पी पडताच दुसरा अेखादा नवीन किल्ला व सैन्य व तोफा वगलेत मारणे अवश्य झालेलें होतें! व अेतदर्थच वडिलाच्या भेटीसाठी तर खरेंच–पण ग्वाल्हेरची भेट घेण्यास हा कातिदूत पसार झालेला होता. आणि पहा तो त्या शहरात गुप्तरूपाने कसा वावरत राहिलेला आहे तो! सैन्याच्या मुख्य अधिकाऱ्यांची वचनें घेतो आहे, दरबारी व सरदारी पुढाऱ्यांचेपासून लागेल तें साह्य देअू म्हणून अभिवचन घेतो आहे, ग्वाल्हेरचीं खडानखडा टिपणें करून व तें

---

८. रावसाहेब पेशव्यांचें भाषण – पारसनीस पृ. २९५.

सिंहासन अगदी वरच्या पृष्ठापर्यंत पोखरून भुसभुशीत करून भुंगा पुन्हा गुणगुणत झाला परत उडता ! आणि वडिलांची भेट घेऊन गोपाळपुरला तात्या पुन्हा रावसाहेबांपुढे तयार !

आणि गोपाळपूरला तात्या येताच व त्यांनी ग्वालेर पोखरल्याची वार्ता कळविताच राणी लक्ष्मी म्हणाली, ' तर मग चला, वळवा मोर्चा ग्वालेरकडे ! ता. २८ मेच्या तें बंडवाल्यांचे सैन्य आमेन महालांत येऊन थडकलें. शिंद्याला त्यांनी पत्रही धाडलेलें होतें. " आम्ही तुमच्याकडे स्नेहभावानें येतो आहो. तुम्ही आमचा पूर्वीचा संबंध ध्यानात ठेवून आता साह्य व्हावें, म्हणजे आम्हांस दक्षिणेकडे जाता येईल." पण त्या कृतघ्नाला त्या पूर्वीच्या संबंधाचा अेकदम विसर पडला आहे. ठीक तर अेक, तुझा संबंध पूर्वीचाही व आताचाही. " शिंद्याच्या पूर्वजांनी आमची हुजरेगिरी केलेली आहे "–पूर्वीचा संबंध झाला–" व त्याचें सर्व सैन्य आम्हांस मिळालें असून तात्यांनी ग्वालेरीस जाऊन व सर्व मंडळींची भेट घेऊन अेकंदर हालहवाल माहीत करून घेतली आहे "–हा झाला आताचा संबंध.–" मग तुम्हांस आम्हांबरोबर युद्ध करण्याची अजूनही अिच्छा आहे काय ?" या अुद्दार लेखाला प्रत्युत्तर म्हणून ता. १ जूनला सकाळीच शिंदा आपली खास वालेघाटी पलटण घेऊन व आपलें सर्व सैन्य सज्ज करून श्रीमंतावर ग्वालेरीजवळ चालून आला. त्या स्वदेशद्रोही श्रीमंताना वाटलें की, आपल्या स्वदेशध्वजाला वंदन करीत शिंदा सामोरा आला आहे ! परंतु रणलक्ष्मी लक्ष्मीराणी म्हणाली 'वंदन नव्हे, शिंदा तो जरतारी ध्वज भजन करावयास आला आहे '–तिने आपले तीनशे स्वार अेकदम पुढे काटले व समशेर अुपसून शिंद्याच्या तोफांवर तुटून पडली सॉंच तिला जयाजी शिंदा व त्याची वालेघाटी फौज दिसली ! पुच्छावर ताडन करणाऱ्याला विखारी नागीण जितकी फणफणून झडपीत नमेल–तितकी फणफणून ती लक्ष्मीराणी त्या प्राण्यावर सपकन अुलटली. अलिजा बहादर शिंदे–अहो महादजींचे वंशज, ही बावीस वर्षांची क्षत्रियांतली अेक अनाथ मुलगी आपल्यापाशी रणदान मागते आहे. पाहू आता त्या देशनिष्ठ महादजींचे कितीसें तेज आंग्ल राजनिष्ठ जयाजींत अुतरलें आहे ! क्रोधाने भडकलेली ही धावती वीज मस्तकावर तडाडकन येऊन आदळताच शिंदा व त्याची वालेघाटी फौज रणांगणात भिरडून गेली आणि वालेघाटी सैन्याचा असा अिकडे जरी बोजवारा अुडत असला तरी तिकडे शिंद्याचे ते अफाट सैन्य व त्या भयंकर तोफखान्यांनी तरी लढाअीची शर्थ केलेली असावी! शर्थ खरीच. कारण तात्याला पाहताच त्या सर्व सैन्याने लढण्याचे नाकारले व त्या सर्व तोफांनी गडगडण्याचे नाकारलें पूर्वीच्या वेतप्रमाणे सर्व सैन्य तात्यास जाअून मिळालें ! तेव्हा जयाजी अुर्फ मागोजीराव शिंदे व त्याचे दिवाण दिनकरराव ह्यांनी ग्वाल्हेरचें रणच नव्हे तर ग्वालेरचें सिंहासनही सोडून आग्र्याकडे धूम पळ काढला.

ग्वाल्हेर शहराने आता मंगलवाद्यांचा कडकडाट सुरू केला, ग्वाल्हेरचे

सैन्याने श्रीमंतांस तोफांची सलामी दिली, ग्वाल्हेरच्या द्रव्यभांडाराचा अधिकारी अमरचंद भाटिया यांनी तें अपार भांडार श्रीमंतांस अर्पण केलें. ग्वालेरमध्ये बंडवाल्यांना सहानुभूति दाखविण्यारे जे जे स्वदेशभक्त पूर्वी तुरुंगात पडले होते ते आता तुरुंगातून लोकजयजयकारात मुक्त झाले. ग्वाल्हेरमध्ये अिंग्रजांस मिळावें म्हणून ज्यानी शिंद्यांस मसलत दिली ते जरी पळाले तरी त्यांचे हाती पडलेले वाडे नि घरें मुद्दा जमिनदोस्त झालीं! ‘ राजा आणि प्रजा यांचें नातें अेशियाटिकास कळत नाही ’ हा काळाकुट्ट कलंक ग्वाल्हेरने रक्ताची पुटावर पुटें देअून पार होता नव्हता असा केला. कारण स्वदेशाच्या व स्वधर्माच्या विरुद्ध जो जातो तो राजा कसला? पुण्याने कुलकलंक रावबाजीला वेळीच पदच्युत न करण्यात जो राष्ट्रद्रोह केलेला होता तो ग्वाल्हेरने केला नाही. अेतदर्थच ५७ सालची क्रांति ही अितिहासात लोकशक्तीचा प्रथम हुंकार म्हणून मोठली पाहिजे. शिंदा स्वदेशास मिळत नाही तर स्वदेशही त्यास मिळणार नाही. तोफा स्वदेशाकडे, पायदळ स्वदेशाकडे, घोडेस्वार स्वदेशाकडे, सर्व सरदार, सर्व मानकरी, सर्व देव, सर्व देवालयें, सर्व ग्वालेर स्वदेशाकडे—आता तू स्वदेशाकडे नसशील तर? ओढा त्याला फरफर सिंहासनाखाली, राजवाड्याबाहेर, शहराबाहेर, हद्दीबाहेर या हुसकून! अितःपर राजा ‘ प्रजारंजनलब्धवर्णः ’!

तर हा ता. ३ जून सन १८५८ चा शुभदिन बिलकूल टळता अुपयोगी नाही. स्वदेशाच्या जरतारी पटक्याला आज स्वराज्याचा दिव्याभिषेक केलाच पाहिजे. “ फुलबागेत जंगी दरबार भरला. सरदार, मुत्सद्दी, शिलेदार, सेनाधिकारी जे जे म्हणून श्रीमंतांना येअून मिळाले होते ते ते सर्व आपापल्या अितमामाप्रमाणे आसनांवर विराजमान झाले. कारण अरब, रोहिले, पठाण, रजपूत, रांगडे, परदेशी आणि अितर वीरश्रेष्ठ आपापल्या सैनिकी पोषाखात कमरेला तरवारी लटकावून स्थानापन्न झाले. श्रीमंतांनी स्वत: पेशवाअीचीं वस्त्रें परिधान करून मस्तकावर शिरपेंच व कलगीतुराही चढविला. कानामध्ये पाणीदार मोत्यांची भिकबाळी आणि गळयात मोत्यांचे मौल्यवान् सरही त्यांनी घातले. आणि अशा रीतीने पेशवाअीच्या सर्व लवाजम्यासह भालदार चोपदारांच्या ललकाऱ्यात व वरून मोर्चेलें ढाळलीं जात असता, श्रीमंतांचे दरबारात आगमन झाले. त्याबरोबर नेहमीप्रमाणे सर्वांनी अुत्थापन देअून श्रीमंतांना मुजरे केल्यावर श्रीमंत सिंहासनावर चढले. श्रीमंतांच्या डोळयात आनंदाश्रू आले व सद्गदित होअून त्यांनी वक्तृत्वपूर्ण शब्दांत सर्व सरदारांचे अभिनंदन केले. रामराव गोविंदाना मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें देण्यात आलीं तात्या टोपी सरसेनापति-पदावर नेमणूक करून अेक रत्नजडित तरवारही त्याला देण्यात आली त्यानंतर अष्ट प्रधानांचीही निवड झाली. सैन्यामध्ये वाटण्यासाठी वीस लाख रुपये देण्यात आले. आणि हा संपूर्णतया यशस्वी झालेला समारंभ संपला. प्रत्येकाचें मुखमंडल टवटवीत झालें होते व जिकडे तिकडे तोफांच्या सरबत्त्या होअू लागल्या.”[१]

१. (पारसनीसकृत झाशीच्या राणीचे चरित्र. पृष्ठ २०९)

त्या सरवल्यांचे आवाज अैकूनच सर ह्यू रोज तिकडे धपकला होता आणि हे आवाज अैकून सर्व पागापांग शाल्लेल्या मंडवाल्यांना पुन्हा आवेश व संमेलनकेंद्र मिळाले व आजपर्यंत लुटू कीं नको म्हणून दचकणाऱ्या महाराष्ट्रास त्याचा जरि-पटका असा डोलत असलेला पाहताच नवस्फूर्ति व क्रांतिचेतना अुत्पन्न व्हावी म्हणून नानासाहेब पेशव्यांचा प्रतिनिधि श्रीमंत रावसाहेब ह्याचा हा राज्यारोहण समारंभ घडवून आणलेला होता. भर युद्धाच्या रणधुमाळींत या राज्यारोहण समारंभात श्रीमंतांना मुजरे करीत बघण्याला तात्या टोपे काही महामूर्ख नव्हता. अुभ्या जगाने क्रांतीचा मृत्यु अुभ्या डोळ्याने पाहिलेला होता; पण ह्या घटनेने नैराश्याच्या गडग्यातून तात्याने क्रांतीला नवचैतन्य दिलें. जगातील काही लोक—काही आनंदाने तर काही नैराश्यमय दुःखाने ओरडले होते—" अरे हें तर प्रेतच अुरलें आहे; यात प्राण असा मुळी नाहीच !" पण काय चमत्कार सांगावा ! तात्याने गोपाळपुराला मृत झालेली माती हाती घेतली आणि तीवर फुंक मारताच काय चमत्कार—सारें जग आश्चर्याने तोंड पाहातच राहिलें ! त्या चिमूटभर मातीतून लक्षावधि रुपयांचा छनछनाट करीत अेक सिंहासन प्रकट झालें ! खरोखरच महदाश्चर्य ! पहा ते हजारो खड्गधारी योद्धे धावून पुढे घुसत आहेत. अैका त्या वीर नेत्यांच्या सन्मा-नार्थ अुडविलेल्या तोफांचे गडगडाट ! अेक नवीन सैन्य अुभें ठाकलें, नवीन तोफा धडाडू लागल्या, तात्याने अशा प्रकारे अेक नवीन राज्यच हस्तगत केले ! परंतु आपल्या या अद्वितीय पराक्रमाने जगाला दिपविणें अेवढाच तात्याचा अुद्देश नव्हता. तो निश्चितपणे हे जाणून होता की, मराठी साम्राज्याच्या पेशवे पदावर श्रीमंत रावसाहेबांना बसविण्यात आल्याचें शुभ वर्तमान, सर्वांना जाहीर करून सांगणाऱ्या तोफांचा गडगडाट अैकून रानोमाळ अितस्ततः पसरलेल्या बंडवाल्यांमध्ये अेक नवीन आशा, नवीन अुत्साह व नवीन स्फूर्ति संचरेल. तात्या हेंही जाणून होता की, ग्वाल्हेरला फडफडत असलेल्या विजयी जरिपटक्याला पाहून अनेकांच्या मनात दुर्दम्य रणोत्साह व वीरश्री यांना भरती येअील. तसेच तो हेंही जाणून होता की, ज्याच्या भोवती गोळा व्हावयाचें ते मूळ सत्ताकेंद्रच नष्ट झाल्यामुळे बंडवाल्यांमध्ये निर्माण झालेला मोकाट बेशिस्तशीरपणा या नवीन स्थापन केलेल्या सत्ता-केंद्राच्या स्फूर्तीने नष्ट होअून जाअून त्यांना शिस्त लागेल. आणि तात्याचे हे सर्व अंदाज तंतोतंत खरे ठरले. कारण पाडे सैनिकांच्या संघटनेत अेकदम नवें वारे खेळू लागले, आणि अिकडे अशा रीतीने तात्याचे देशबांधव जसे अुत्साहित झालेले होते, तसें तिकडे त्या अिंग्लिश सैन्याने सुटकेचा निःश्वास सोडला होता त्या आंग्ल सेनेला या नवीन प्रकट झालेल्या सिंहासनाच्या स्थापनेने पुन्हा आश्चर्याचा धक्का बसला. आणि हेंच अुद्दिष्ट साधण्यासाठी तात्याने व क्रांतिकारक नेत्यांनी पेशव्यांच्या राज्यारोहणाचा डिंडिम अितक्या प्रकटपणे वाजविलेला होता. त्यानी टाकलेला डाव

संपूर्ण यशस्वी झाला. कारण तात्याच्या तोफांच्या गडगडाटासरशी सर ह्यू रोजच्या विश्रांतीला तडा जाऊन तो दचकून अकस्मात् जागा झाला.[१०]

पण आता सर ह्यू रोजला अेकदा दचकविल्यावर मग रणसमारंभाशिवाय दुसरे सर्व समारंभ बंद करावेत हें लक्ष्मी राणीचें म्हणणें जो कोणी ध्यानात घेणार नाही त्याचा मात्र वाअीट परिणाम ! परंतु सैन्याची व्यवस्था तिच्या म्हणण्याप्रमाणे लावण्याअितकी बंडवाल्यांची बुद्धी, दुर्दैव अुजरवू देणार नाही ! ते अेपारामात अव्यवस्थेत, भोजन समारंभात, अप्रासंगिक दारूकामात, फुलबाज्या अुडविण्यात व हलगर्जीपणात दंग होणारच होणार—कारण नाहीतर मग स्वराज्य मिळविल्याचा अुपयोग तो काय ? तात्याने व राणीने हा लखलखाट 'चल् चल् चल् ' म्हणताच निर्माण केला ! पण ह्या दारूकामास तोफांच्या दारूकामावाचून नि गोळीबारावाचून स्थिरता येणार नाही ! सरसर करीत हा जाज्वल्य विस्तार झाला—क्षणभर जळणार—दुसऱ्याच क्षणी आपला आपणच राख होअून खाली येणार ! अितक्यात बेहत्तर आहे आलास तर. कारण अशा जळत्या द्रव्याचा अेक क्षणही मुळीच न जळणाऱ्या मातीपेक्षा वदनीय नमता तर हा अितिहासच नसता !

दचकलेला सर ह्यू रोज आपल्या अुत्कृष्ट सेनेचें आधिपत्य पुन्हा स्वीकारून तातडतीव ग्वालेरवर चालून आला. विजयरंगात दंग झालेल्या बंडवाल्याना अखेर जागें करण्यात यश येअून तात्या टोपे मुरारकडे येतो तो ता. १६ जून

१०. Malleson, writing about the cleverness and diplomacy which Tatia and Laxmibai showed in taking Gwalior, says :—" How the ' impossible ' happened has been told.......He (Sir Hugh Rose) realised, moreover, the great danger which would inevitably be caused by delay. No one could foresee the extent of evil possible if Gwalior were not promptly wrested from rebel hands. Grant them delay, and Tatia Tope, with the immence acquisition of political and military strength secured by the possession of Gwalior and with all its resources in men, money and material at his disposal, would be able to form a new army on the fragments of that beaten at Kalpi, and to provoke a Mahratta rising throughout India. It might be possible for him using the dexterity of which he was a master, to unfurl the Peshwa's banner in the Southern Mahratta districts. Those districts were denuded of troops, and a striking success in Central India would probably decide their inhabitants to pronounce in favour of the cause for which their fathers had fought and bled. "

—Malleson's Indian Mutiny Vol. V, pages 149-150.

१८५७-ला दोन तास हातघाओीची लढाअी होअून ती छावणी अिंग्रजांनी जिंकून घेतली. शिवाय सर ह्यू रोजचे बरोबर पळून गेलेला शिंदाही आलेला होता. व आपण केवळ त्याच्यासाठीच लढतो आहोत असे दाखवून ग्वालेरीतील भोळ्या लोकाना स्वामिनिष्ठेच्या आवरणाखाली फुटविण्याचाही प्रयत्न त्यानी केलेला होता. मुरारची छावणी जाताच मग ग्वालेरच्या बडवाल्याना पुन्हा अवसान भरलें ! अपयशाचीं चिन्हें दिसू लागताच फाटाफूट होत चालली. रावसाहेब बांदाच्या नवाबाकडे, नवाब रावसाहेबाकडे, अेकच धावपळ सुरू झाली.

परंतु असल्या विकट प्रसंगीही रणलक्ष्मी लक्ष्मीराणी अचंचल निश्चयाने तरवार परजीत आहे. तिला आता धास्ती कसली ? आशा आणि निराशा ह्यांना तिने पायाखाली तुडविलें आहे. अैहिक वैभवाची तिला किळस आलेली आहे. आता अेकच महत्त्वाकांक्षा अुरलेली आहे की, लढत लढत रणात मरेतोंपर्यंत हा स्वातंत्र्यध्वज माझ्या तरवारीने ताठ तोललेला असो ! ती किंवा तो (लक्ष्मी राणी किंवा ध्वज) धुळीत न पडता रणात पडावें ! अेतदर्थ तिने रावसाहेबास धीर दिला, त्या वेंवद सैन्याची शक्य तितकी व्यवस्था केली व आपण पूर्व बाजूचें संरक्षण करण्याचे काम अंगावर घेतलें. ती रणदेवी म्हणाली, " मी स्वत. आपलें कर्तव्य करण्यास अेका पायावर तयार आहे. तुमचें कर्तव्य तुम्ही करा म्हणजे झाले. "

तिने नेहमीचा लष्करी पोषाख अंगावर चढविला. अुमद्या घोड्यावर ती स्वार झाली, तिने म्यानातून आपली रत्नखचित समशेर बाहेर काढली व ती आपल्या सैन्याची कडक कवाअीत घेअू लागली ! तिने कोटाकी सराअीच्या बाजूने आपले मोर्चे अुत्कृष्ट तऱ्हेने सज्ज केले. अशा या युद्धदेवीच्या सेनापत्याखाली तिच्याच तेजाचें अनुरूप असे अतुल सैन्य असते तर! अतुल नसलेले तें सैन्यदेखील तिच्या या रणोत्साहाने वीरावून गेलें. कारण अिंग्रजी सैन्य दिसताच जिकडे तिकडे कर्णे, तबूर, भेरी, रणवहिरी वाजू लागून आकाशमंडळ दणाणलें व राणी तिच्या निवडक स्वारांसह रणात समशेर चमकावीत तळपू लागली. तिच्या बरोबर मंदर व काशी ह्या तिच्या जिवलग दासीही तळपत आहेत. स्वरूपाने खूबसूरत, पोषाख मर्दानी, रणात रंगलेल्या—ह्या दासींची त्यांच्या स्वामिनीबरोबरच अितिहासाच्या आकाशात आचंद्रार्क स्मृति चकाकत असो !

राणी लक्ष्मीबाअी आज शौर्यस्फूर्तीच्या शिखरास पोचली. आकाश धुराने व धुळीने व रक्ताने व निनादाने व गर्जनेने जरी खचून भरलेलें होतें तरी तितक्या-तूनही ती विजेसारखी चमका मारून निराळी पडत होती। तिच्या फळीवर स्मिथचा वारवार मारा झाला, पण तिने तिच्या सैन्याची फळी फुटू दिली नाही. सर्व दिवसभर ती लढत होती. तिचें सैन्य जोपास चढून तिच्या तरवारीबरोबर सपासप शत्रूना कापीत होतें. अखेर स्मिथ हटला त्याने तिची फळी फोडण्याचा

नाद मोडून दिला, व त्या काळमर्पिणीच्या विळाची दिशा सोडून देऊन दुसऱ्या बाजूला तो वळू लागला.

जूनची १८ तारीख उजाडली. अिंग्रजी मेनेचा आजचा कार्यक्रम अमोघ होता. निरनिराळ्या दिशांनी ग्वालेरवर चढाओी करीत आज ग्वालेर घेण्यासाठी त्यांनी शिकस्त चालविली. अितर दिशांकडे खुद्द मर ह्यू रोज गेलेला होता व झांशीच्या राणीच्या दिशेला तो कालचा परतवलेला परंतु आज हट्टास पेटलेला व नव्या कुमकीने सबळतर झालेला योद्धा स्मिथच चालून आला. राणी आपल्या दळभारासह सिद्धच होती. ' मी माझें कर्तव्य करण्यास अेका पायावर तयार आहे ! ' आज डोक्यास भरजरीची चंदेरी पट्टी, अंगात तमामी अंगरखा, पायात पायजमा, आणि गळ्यात मोत्यांचा कंठा रुळत आहे, तिची दासी व ती ह्या दोघीजणी मर्दानी पोषाखात आपल्या तंबूत सरबत पीत आहेत तोंच अिंग्रजी हल्ला झाल्याची वर्दी पोचली. भात्यातून बाण, मेघातून वीज, गुहेतून सिंहीण, तशी तंबूतून लक्ष्मी सपकन बाहेर धुसली, घोड्यावर चढली, समशेर उपसली व सैन्यासह आपल्या शत्रूवर जाअून घसरली. अिंग्रजी योद्धे मी मी म्हणणारे, पण रणलक्ष्मीने बेजार केलें. " तिने आपले सैन्यासह तत्काळ, अखंडित व भयंकर हल्ले चालू केले आणि जरी तिचें सैन्य पुन:पुन्हा धारातीर्थांत बुडून अेकसारखें कमी कमी होत चाललें. तरी राणी सर्वांच्या पुढे तळपत चाललेली दिसे ! तिच्या भंगलेल्या सैन्यास पुन्हा गोळा करीत व शौर्याचे अुत्कर्ष गाजवीत रणावलेली दिसे ! " असें अिंग्रज अितिहास लेखक म्हणतो. तिची बाजू अशी अतुल शौर्याने झुजत असता अितर बाजूली वडवाल्याना भंगवून अिंग्रजी सैन्य तिच्या पिछाडीवर गर्जत आलेले तिला दिसलें. तोफा बंद झालेल्या, सैन्य अुधळून गेलेले, जवळ १५-२० घोडेस्वार काय ते शिल्लक, चोहो बाजूनी अिंग्रजी विजयी लगट— राणी लक्ष्मीने आपल्या त्या सुंदर दासीसह तो शत्रूचा कोट फोडून वडवाल्याच्या मुख्य भागास मिळण्यासाठी घोड्यास टाच दिली. मागोमाग हुसार्स पलटणीचे आगल स्वार चिम्याप्रमाणे गोळ्या सोडीत तुटून पडले. तरी ती झांशीची राणी तरवारीने सपासप मार्ग काढीत पुढे चालली आहे. ' मेलें, बाओीसाहेब, मेलें ! ' हाय हाय, हा करुण रव कोणाचा ? लक्ष्मी मागे वळून पाहते तों तिची ती सुंदर दासी फिरंग्याने यमपुरीस धाडलेली दिसली !! चवताळून ती राणी त्या फिरंग्यावर धावली, तिचा वार त्याच्या अधम मस्तकावर दणाणला, सुंदर दासीचा सूड घेअून तिचा घोडा पुन्हा भरधाव पुढे चालला अेका लहानशा ओढ्यात ती भिडली अेक अुडी व राणी शत्रूच्या टप्प्यातून निसटलीच ! परंतु घोडा तो अुडी घेओीना ! तिचा तो रणप्रथित जुना घोडा आज जर असता ! मानिकाच्या विम्बवाचे वर्तुळ जणू त्याचे भोवती पसरलेलें आहे असा तो घोडा त्या ओढ्याच्या भोवती भोवती फिरे पण अुडी घेअून पलीकडे निघेना. तों दृष्टिपाताच्या अवकाशात अिंग्रजी घोडेस्वार तिच्या अंगावर कोसळले. तरी झांशीच्या राणीचे

तोंडून शरणाचा शब्द नाही! त्यांच्या अनेक तरवारींशी तिची अेक तरवार भिडली. समोरच्या आघाताशी तिने खडाखड खडका अुडविला, पण अेकाने तिच्या मस्तकावर पाठीमागच्या बाजूने वार केला! त्या वारासरशी तिच्या मस्तकाचा दक्षिण भाग विच्छिन्न होअून तो नेत्रही बाहेर आला — तितक्यात तिच्या छातीवर पण वार झाला! लक्ष्मी, लक्ष्मी! तुझ्या शरीरातला शेवटचा रक्तबिंदु गळू लागला — आणि म्हणून समरदेवते, हा घे तुला शेवटचा बळी!

तसल्या आसन्नमरण स्थितीतही त्या मानिनीने आपल्यावर वार करणाऱ्या त्या गोऱ्या सार्जंटाचा तुराडा केला आणि ती शेवटचे श्वासोच्छ्वास करू लागली अभिमानी सेवक रामचद्रराव देशमुख हे जवळच होते. त्यांनी संग्रामस्थानातून त्या विकलित राणीला शेजारच्या पर्णकुटिकेत नेले; गंगादासबाबांनी तिला तृषा-शात्यर्थ शीतजल सादर केले. रक्ताने लालभडक पडलेली ती रणलक्ष्मी रणशय्येवर पहुडली आणि तिच्या मृण्मय पिंजऱ्यातून अुडून तिचा तो दिव्य आत्मा चिन्मयरूपी सारूप्य पावता झाला. तिचें निधन होताच तिच्या आज्ञेप्रमाणे शत्रूचा डोळा चुकवून रामचद्ररावाने जवळच्या गंजीतील गवताची अेक चिता तयार केली व तिच्या त्या मृण्मय पिंजऱ्यालाही रिपुस्पर्शाने अपवित्रता येण्याचे आधीच ज्वालामालींच्या दीप्त ज्वालावर आरूढ केलें! गादीवर नाही, तर चितेवर! पण ती राणी स्वतंत्र राणी-सारखीच लढता लढता अमरत्वाच्या मंदिरात विराजमान झाली! अिंग्रजाच्या पाठलागा, आता तुझी अिच्छा असेल तर मरणाच्या दारातून प्रवेश कर आणि त्या चितेच्या अग्नीतच राख होअून जा!

सत्तावनच्या स्वातंत्र्य समरातील अग्निकल्लोळाची ही शेवटली ज्वाला स्वर्गा-कडे चढत आहे! अशी रणलक्ष्मी लक्ष्मीराणी कृतकीर्ति, कृतप्रतिज्ञ, कृतकृत्य झाली! असली अेक विभूति राष्ट्राच्या अस्मितेला सफलता देते. अत्युत्तम सद्गुणांची ही मंजूषा होती. जातीने स्त्री, वयाने पंचविशीचे आत, रूपाने खूबसूरत, वर्तनाने मन-मोहक, आचरणाने सच्छील, राज्याचें नियमनसामर्थ्य, प्रजेची प्रीति, स्वदेशभक्तीची जाज्वल्य ज्वाला, स्वातंत्र्याची स्वतंत्रता, मानाची माननीयता, रणाची रणलक्ष्मी! रणलक्ष्मी लक्ष्मीराणी, तुम्हासारख्याच्या समवाने ह्या जड पृथ्वीला कवि वसुंधरा म्हणतात. 'लक्ष्मीराणी आमची आहे' हे म्हणण्याचा मान मिळणे परम दुष्कर आहे. अिंग्लडच्या अितिहासाला तो मान अजून मिळालेला नाही! अिटलीतील राज्यक्रांति कितकी वीररसयुक्त असताही तसल्या अुदात्त प्रसंगातही अिटलीच्या गर्भात राणी लक्ष्मीसारखा गर्भसंभव झालेला नाही! 'लक्ष्मीच्या अंगात जें रक्त खेळत होते तें रक्त, ते बीज, ते तेज आमचें आहे' ही यथार्थ गर्वोक्ति करण्याचें भाग्य, हे भारतभू, तुझें आहे! वीरप्रसव भरतभू, तुला दृष्ट न पडो — तुझी सर्व अिडापीडा टळो!

पण भारतभूलाही हें रत्न सत्तावनच्या स्वातंत्र्यसमराशिवाय अन्य प्रसंगीं संभविता आलें नसतें. समुद्रांतील चतुर्दश रत्नें काही सपाटीवर तरंगत नसतात. मात्यांतून ब्रह्मास्त्र काही रोज निघत नाही. सूर्यकांतांतून तेजाचा ओघ काही निशान्तांतेत लोटत नाही, त्याला सूर्याचा खरोखरच चटका बसावा लागतो. अन्यायांनी हृदय खरोखरच तळमळावें लागतें—पोळावें—जळावें लागतें. खरोखरच—वरपांगी नव्हे; तर रक्ताचा बिंदु नि बिंदु खरोखरच कढावा लागतो. राष्ट्राच्या धृति अशा तळच्या सळसळासुद्धा पेटल्या, लाल, कढत तप्तरसाची लाट गुरगुरत ढवळू लागली, अन्यायांच्या सर्पणांचा ढेकळा त्यांत अखंडित वेगानें भरभरत चालला, अग्नीच्या घुमसण्यांनीं व फूत्कारांनीं व कडकडाटांनीं ज्वाला अेकावर अेक अुंच अुड्या मारीत चालल्या, म्हणजे मग अशा या भट्टींत राष्ट्रीय गुणांचे हिणकस कण पेटू लागतात, हिण पेटू लागलें आणि कमकमू लागलें व त्या भयंकर ज्वालाकल्लोळांची पूर्ण रसतप्ततेची परमावधि झाली की, त्या सर्व गुणांची निष्कर्षमूर्ति रसरसत वरती चढू लागते. सत्तावनच्या सालीं भरतभूमीच्या अंतःकरणाला खरोखरीच आग लागली. त्या ज्वालामुखीचा दिग्गजाची कंठाळी बसेल असा भयंकर स्फोट झाला, आणि पहा त्याचे अग्निकल्लोळ कोणीकडून कोणीकडे व कोठून कोठपर्यंत धडधडत फोफावताहेत ते ! अुंच अुंच ज्वालांवर ज्वाला ! मीरतला ठिणगी पडली आणि जी नुकतीच डलहौसीनें तुडविली होती ती भूमि वरून मातीचें मैदान वाटत होती ती दारूचे ज्वालाग्राही पेव ठरली ! भराभर तिच्या तप्तरसाचीं रसायनें वर लागलीं ! अेखाद्या दारूच्या नळ्यातून हवेमध्ये जसे बाण, झाडे, चित्रविचित्र अद्भुत देखावे सरसरत, जळत, जळजळत सुटत चालतात तसे ह्या नळ्यांतून कोरायमान रक्तवर्षाव, रणें, शस्त्रास्त्रें सरसरत वर अुसळलीं ! केवढा नळा ! मीरतपासून विद्ध्याद्रीपर्यंत जाडी व पेशावरपासून डमडमपर्यंतची रुंदी ! आणि तो पेटला ! ज्वालाचा स्फोट सणाणत त्या कल्लोळाच्या अुदरात कोण ही रक्ताची शिलेधार निर्मिति ! दिल्ली पेटली, प्लासीचा सूड, कानपूरच्या कत्तली, लखनौचा संग्राम, हजारो वीर रुढत लढत मरतात, जरिपटके भरासर वर चढतात, शहरें पेटतात, बालकें जळतात, कुंवरसिंह येतो, झगडतो, पडतो. मौलवी येतो, झगडतो, पडतो. मिनपुरीचें सिंहासन, दिल्लीचें सिंहासन, लखनौचें सिंहासन, कानपुराचें सिंहासन, बादशाचें सिंहासन, फरुकाबादचें सिंहासन, त्यांचे ध्वज, पताका, सेनाश्रेणी, मत्त गज, भराभर सरसरत बाहेर पडतात, ज्वालाच्या लालभडक कल्लोळांत तळपतात, कोणी या ज्वालेच्या, कोणी त्या ज्वालेच्या शिखरावर चढतात, लटतात, पडतात ! अमल्या क्षुण्णतेत भारती जळू लागली ! असें भयंकर दारूकाम जळत आहे !

आणि ही गंगातीर वीवाच्या पर्णकुटिकेच्या शेजारी भडकलेली चिता त्या सत्तावनच्या स्वातंत्र्यसमराच्या अग्निकल्लोळाची शेवटची ज्वाला आहे !!

* * *

# भाग ४ था

## तात्पुरती शांतता

प्रकरण पहिलें

## विहंगावलोकन

सत्तावनच्या युद्धप्रसंगाची मुख्य भूमिका उत्तर हिंदुस्थानातच असल्यामुळे त्या प्रदेशातील अद्‌भुत उलाढालीचें वर्णन करण्यातच इतका वेळ ग्रंथाचा विस्तार करावा लागला. तथापि त्या प्रसंगाचें सविस्तर स्वरूप तर राहोच, परंतु साधारण नकाशा समजण्यासही इतर प्रांतांत त्याचे काय परिणाम घडले हें पाहणें अवश्य आहे. एतदर्थ त्या रणस्फोटातील प्रचंड ज्वालाकल्लोळ आकाशात अंतर्धान पावत असता इतरत्र उडालेल्या ठिणग्यांच्या चकमकीही एकदा धावत्या दृष्टीने पाहून घेणें भाग आहे.

पंजाब प्रांतामध्ये दिल्लीचा वेढा भुजत असताना उडालेल्या गडबडीची हकीकत मागे जी दिली आहे तीनंतर एकदोन प्रसंगविरहित साधारण स्वस्थताच नांदत होती. शीख लोकाव्यतिरिक्त इतर लोक कोणत्याच बाजूने न लढता मनातल्या मनात जळफळत होते व वडाला यश यावें असें इच्छीत होते. व शीख लोक व शीख संस्थानें इंग्रजांच्या बाजूनेच लढत होतीं.

राजपुतान्यातील लोकसमुदायांची सहानुभूति पाठचपक्षाकडेच होती हें अनेक प्रसंगी उघड झालेलें होते. जयपूर, जोधपूर, उदयपूर वगैरे शहरी इंग्रजांच्या वतीने लढणारी नेटिव्ह फौज असली तरी तिच्यावर सुरू होणाऱ्या शिव्याशापांच्या वर्षावावरून, बाजारात बंडवाल्याच्या जयाची बातमी येताच सुरू होणाऱ्या जयजयकारावरून व बंडवाल्याचे मोड झालेले ऐकताच व्यक्त होणाऱ्या संतापचिन्हांवरून ही लोकसमुदायाची सहानुभूति दर क्षणी व शेवटपर्यंत सुव्यक्त होत होती. राजपुतान्यातील बहुतेक राजांनी तटस्थतेचें धोरण स्वीकारून कोणत्याच पक्षास जयापजयाचा स्थावर निकाल होईतों प्रत्यक्ष मदत दिली नाही. व जेव्हा त्यातील काहींनी केवळ भागच पडले म्हणून इंग्रजाकडे आपली सैन्यें धाडली तेव्हा त्या सैन्यांनी आपल्या स्वतःच्या राजाच्या आज्ञेलाही धाब्यावर बसवून स्वदेशबंधूवर फिरंग्याकरिता शस्त्र उचलण्याचे साफ नाकारलें !

विंध्याद्रीच्या अुत्तरेचें हें विहंगावलोकन करून आतां त्याच्या दक्षिणेकडे दृष्टिपात फेरला असता प्रथमतः शिवाजीच्या मराठ्यांचें राष्ट्र कटाक्षमर्यादेत येअू लागतें. अुत्तरेकडे गेलेले त्यांचे देशबंधु कानपूर, काल्पी व झांशी येथे रणसंग्रामाची पराकाष्ठा करीत असता, रायगडला कडेलोट झालेली त्यांची स्वराज्याची गादी ब्रह्मावर्तास रक्तकर्दमातून पुन्हा प्रादुर्भवन पावत असता व संताजी-धनाजींनी तोललेला त्यांचा भगवा झेंडा पुन्हा फडकाविण्याचा खटाटोप तात्या टोप्यांनी मांडला असता अुत्तरेकडे दिसून आलेल्या अभूतपूर्व समकालोत्थानाची, तडफेची व करारीची अुठावणी महाराष्ट्रानें महाराष्ट्र राज्यासाठी तत्कालीच व तत्सम वेगानेंच दक्षिणेकडे केली असती तर सर्व अिंग्लंड जरी लढावयास आलें असतें तरी महाराष्ट्राचें निशाण त्यांच्या-च्याने वाकवलें नसतें! महाराष्ट्राचा भगवा झेंडा रणांगणात डोलताना पाहून ज्याच्या अंतःकरणात अभिमानाच्या लहरी अुसळत नाहीत असा मराठी बीजाचा अनैसर्गिक मराठा—वरून तो दाखवो वा न दाखवो—असणें शक्य आहे काय? सत्तावन सालीही महाराष्ट्राच्या अंतःकरणात वीरोचित चेतना निसर्गानें अुठविली—परंतु तिला घर-सोडीच्या व अनिश्चिततेच्या रोगानें शरीरातल्या शरीरातच गुदमरवून ठार केली. अुत्तरेकडे क्रांतिसंघटना चालली असता दक्षिणेकडेही तिचे दूत शहरा-शहरांतून व संस्थाना-संस्थानांतून फिरत होते. सातारचे रंगो बापूजी यांचे कानपूरच्या नाना-साहेबांशी पत्रव्यवहार चालले होते. पुणें, सातारा, बेळगाव, धारवाड, मुंबअी, हैद्राबाद, वगैरे ठिकाणच्या शिपायांच्या रेजिमेंटमध्ये शिरून ब्राह्मण, मौलवी व अुत्तरेकडील शिपायी वार्तांचा भयंकर वणवा पेटवीत होते व अुत्तर अुठताच दक्षिणही अुठणारच अुठणार असा म्हैसूरपासून विंध्याद्रीपर्यंत आणाभाकाही घेण्यात आल्या होत्या. परंतु 'अुठावयाचें' हें जरी दक्षिण विसरली नाहीं तरी 'अुत्तर अुठताच' अेवढें मात्र ती विसरली! अुत्तरेकडे वंहावी अुठावणी जशी विद्युद्-वेगानें अकल्पनीय समुत्थानानें झाली तशीच तेव्हाच मारू वा मरू या निश्चयानें अुठण्याचे अैवजी दक्षिण वाट पाहून बसली की अुत्तरेकडे कसा रंग भरतो तें थोडा वेळ पाहून मग अुठू. क्रांतीसारख्या जीवनमरणाच्या अशा भव्य कार्यात दोहो बाजूस कोणना ना कोणता तरी तोटा असतोच. तडकाफडकी केली तरी अेक तोटा असतो, शांततेनें केलें तरी अेक तोटा असतो. अशा दुहेरी तोटयांमध्ये कर्ते लोक तो तोटा निवडतात की ज्यात साहसाचा व तज्जन्य अवमानाचा अुत्कर्ष होअील. क्रान्त्या ह्या गणितातल्या बेरीज-वजाबाकीनें चालत नसतात. त्या हृदयातील अवमानाच्या अतवर्य बलानें विजय पावतात मदतेच्या षढपणानें त्या थंड पडतात—गतीच्या अुष्णतेनें त्या अुष्ण राहतात. संघटना चालली असता शांतता असावी, गणित करावें, षंढपणानें कालनिश्चितता ठरवावी. परंतु अेकदा तीळ फुंकली गेली की मग जीव जावो अथवा राहो अशा मारामारीनें भयंकर गर्दी अुडवून द्यावी. तिथे जो घरमोड करील त्याचा जीव गेलाच. तिथे अुठू या नको म्हणून म्हणेल तो कायमचा खाली कोसळलाच

संघटनेत शांतता, परंतु क्रांतीत धाडस ! संघटनेत गालिचावरही जपून पाय हलके हलके टाकणे परंतु क्रांतीच्या विस्तवाच्या मैदानात अेकही पाय न डळमळविता नीट तीरासारखें पुढे घुसणें ! मग यश वा अपयश येवो, मग जीवन वा मृत्यु येवो, रणधुमाळी करावी, माझुर्गदी करावी, मारिता मारिता मरावें—कारण अेकदा नौबत झडली की क्रांतीत यश येण्याचा अुत्कृष्ट संभव म्हटला म्हणजे यशाच्या बेफिकिरीतच असतो.

दक्षिण हें तत्त्व विसरली व अुत्तर अुठताच तत्क्षणीच न अुठता हलके हलके व चाचपडत अुठू लागली. यशाच्या या फाजील काळजीने अपयश कसें आलें हें आता झटकन अवलोकन करू.

कोल्हापूर येथे असलेली २९-वी व धारवाडची २८-वी ह्या रेजिमेंटमध्ये क्रांतिकारक पत्रव्यवहाराने व दूत शिष्टाअीने वंड करून अुठण्याचा विचार जेव्हा पाटू लागला तेव्हा अुत्तरेबरोबर अुठण्याचे अेवजी ऑगस्ट तारीख १०-ला सर्वांनी अुठावें असें ठरविण्यात आलें. परंतु कोल्हापूरकडे दाब ठेवण्याकरिता अिंग्रजी सैन्य मध्यंतरीच गुप्तरूपाने धाडण्यात आले आहे ही बातमी तेथील शिपायांस तार ऑफिसातील अेका नेटिव्ह नौकराने झटकन् कळविल्यामुळे तेथील शिपायी ता. ३१ जुलै रोजीच बंड करून अुठले. अिंग्रजी ऑफिसरांपैकी काहींना ठार करून येथील खजिना ताब्यात घेअून व नुकत्याच धाडलेल्या अिंग्रजी लष्करासी दोन हात करून ते शिपाअी कोल्हापुराहून घाटाकडे निघून गेले व तेथे सावंतवाडीचा प्रमुख पुढारी रामजी-शिरसाठ याचे हाताखाली अेकत्र होअून वाडीच्या रानात त्यांनी अिंग्रजी सत्तेला अुपद्रव देण्यास आरंभ केला. कोल्हापूरला झालेल्या या अुठावणीच्या चौकशीत हें अुघडकीस आलें की पुण्यास असलेल्या बहाअी लोकांच्या मुख्य मौलवीने गुप्तदूत धाडून कोल्हापुरातील व महाराष्ट्रातील बंडखोर पुढाऱ्यांशी सगनमत केलेले होतें. ग्रँड जेकब याची कोल्हापुरास रवानगी होताच त्याने तेथील राहिलेल्या नेटिव्ह शिपायांस नि:शस्त्र केलें व त्यांच्यातील बंडखोर पुढाऱ्यास गोळ्या घालून ठार मारण्यात आलें.

परंतु हे शिपाअी ज्या दिवशी अुठले त्या दिवशीच कोल्हापूर काही अुठलें नव्हते. मध्यंतरी तेथील तरुण राजाकडे नानासाहेबाचे दूत प्रत्यक्ष येअून भेटून गेले व त्याला लखनौच्या नवोदित सिंहासनावरून अेक अुत्तम तलवारही बक्षीस देण्यात आली. जमखंडी, सांगली वगैरे संस्थानातूनही अुठावाचे प्रयत्न करण्यात आले. कोल्हापूरच्या राजापेक्षा त्याचा धाकटा भाअू चिमासाहेब याच्या अंगात शिवाजीच्या रक्ताचे किंचित् जास्त बीज अुतरलेले असल्याने त्याने बिघडलेली घडी पुन्हा बसविण्याचा प्रयत्न केला. कोल्हापूरच्या खाजगी सैन्यात अितर लढवय्यांत फारच कसोशीने गुप्त तयारी चालविली. व ता. १५ डिसेंबर १८५७-च्या पहाटे कोल्हापूर शहर पुन्हा अेकदा बंड करून अुठले. शहरातील तोफा मोर्चावर अुभारल्या गेल्या, दरवाजे बंद

झाले व जिकडेतिकडे स्वातंत्र्याची नौबद घडाडली. जेकबने आपल्या हाताखालील लोकांस सज्ज करून शहरातील अेका कच्च्या दरवाजाने जेव्हा प्रवेश करण्याचा प्रयत्न केला तेव्हापासून तों अिंग्रजी सैन्य राजवाड्यापाशी लगटेपर्यंत लढाअी चालू होती. पराजय होताच नेहमीच्या डावाप्रमाणे छत्रपतींने सांगितलें की फौजेने व लोकांनी मला न जुमानता बंड अुभारलें होतें. बंडाचे पुढारी कोण हें कळण्यासाठी जेकबने वाटेल तितके प्रयत्न केले. परंतु जो कोणी धरला जाअी त्याने त्याच्या पलीकडे कधीही मागमूस लागू दिला नाही. अेका पुढाऱ्याने तर त्याला पकडण्यात आल्यावर आपल्याजवळ असलेलें आक्षेपार्ह पत्र अधिकाऱ्यांसमक्ष फाडून गिळून टाकलें. दुसऱ्या अेकाला तोफेचे तोंडीं बांधीत असता त्याने चुकून अेक नांव घेतलें. तें अेकताच जवळ असलेल्या नेटिव्ह सरकारी नोकरांपैकी अेक नाहीसा झाला व त्याने त्या पुढाऱ्याला ही वर्दी दिली तेव्हा तो पुढारी फरारी झाला. विमासाहेबाला त्याच्या विरुद्ध कोणताही पुरावा दिसत नव्हता तरी त्याला मात्र अेकटे गाठून हद्दपार करण्यात आलें. अशा परस्पर विश्वासाने क्रांतिकारक कडवाले अेकमेकांशी बांधलेले असत. आणि याच पद्धतीने कोणताही व्यत्यय किंवा घोटाळा निर्माण न होता निरनिराळ्या गटांना व संघाना अेका मोठ्या संघटतेत कौशल्याने अेकत्रित करण्यात येत होतें. [1]

कोल्हापूरचें बंड होताच बेळगावालाही बंड होण्याचा रंग ता. १० ऑगस्टचे सुमारास दिसू लागला. परंतु शिपायाचा पुढारी ठाकोरसिंग व शहरातील मुसलमान व इतर नागरिक यांचा पुढारी अेक शाळसी मुनशी यास वेळींच पकडला गेल्यामुळे व नवीन अिंग्रजी सैन्य तावडतोब आल्यामुळे बेळगाव् व धारवाड येथे लवकरच शांतता झाली. वरील मुनशी हा सरकारी नोकरीत असून त्याच्या हातचीं कोल्हापूरचे शिपायाना व पुण्याचे वहाबी बंडखोरांना गेलेलीं पत्रें पकडण्यात आल्यावरून त्यास तोफेच्या तोंडीं देण्यात आलें.

सातारला अिंग्रजाचा मुख्य डोळा रंगो बापूजीवर पहिल्यापासूनच होता. अितक्यात कोल्हापूरला क्रांतिचेतना संचरवीत असता रंगो बापूजींच्या अेका मुलाला

---

१. But it is difficult to describe the wonderful secrecy with which the whole conspiracy was conducted and the forethought supplying the schemes, and the caution with which each group of conspirators worked apart, concealing the connecting links, and instructing them with just sufficient information for the purpose in view. And all this was equalled only by fidelity with which they adhered to each other." Western India, by Sir George Le. Grand Jacob K. C. S. I. C. B.

पकडण्यात आलें. त्याला सातान्यास आणताच, बंडाच्या संशयाचे अधिकारी झालेल्या अितर लोकांना व त्यास फाशी देण्यात आलें. सातारच्या दोन्ही राजपुत्रांना हद्दपार करण्यात आलें. ज्या गादीची सेवा करण्यात रंगो बापूजी अनवरत झटत होता तिची अशी दुर्दशा होताच तो देशभक्त सातारा सोडून तावडतोब निघाला. त्याला पकडण्यासाठी मोठमोठाली बक्षिसे लावलीं असताही त्यांना भुलण्याअितका नीच देशद्रोही कोणी निघाला नाही. शत्रूच्या हाती न पडणाऱ्या रंगो बापूजीचें पुढे काय झालें हे अितिहासास अजून विदित झालेलें नाही. रंगो बापूजीबरोबरच साताऱ्याची स्वतंत्रताही नष्ट झाली !

मुंबई अिलाख्याचे गव्हर्नराचे जागी या वेळेस लॉर्ड अेलफिन्स्टन या कर्त्या पुरुषाची योजना झालेली होती. त्याने मुंबई अिलाख्याचा ताण—जो थोडाबहुत पडला तो संभाळून वर राजपुतान्यातही आपलें सैन्य धाडलेलें होतें. परंतु मुख्य मुंबअी शहरात जर बंड न होअू देण्यास कोणाची चलाखी कारण असेल तर ती फारेस्ट हृया पोलिसाच्या मुख्य अधिकाऱ्याची होय. मुंबअीला खुशालचंदाची, देशद्रोह्याची व नेभळ्या सुखवस्तूंची भर सर्व हिंदुस्थानापेक्षा जास्त भरलेली असल्यामुळे बंडाची ज्योत पेटण्याअितकीं ज्वालाग्राही अंतःकरणे फक्त काय त्या तेथे ठेवलेल्या शिपायांच्या रागेतच होतीं व म्हणून फारेस्टने या लोकावर बारीक लक्ष ठेवलेलें होतें. मोहरमच्या सणात शिपायांत थोडी चलबिचल पाहताच त्याने जरी दाबून टाकलें नाही तरी दिवाळीचे सणात अुठण्याचा बेत शिपायांच्या गुप्त सभात पुन्हा ठरू लागला. अुत्तरेप्रमाणे दक्षिणेत त्या वेळीच समकालोत्थान न करता अेकेकट्या अुठावण्या करण्यात अुत्तरेकडे जसे अपयश आलें तसेच मुंबअीसही येअू लागलें. फारेस्टने शिपायांच्या कटात गुप्त पोलीस धाडण्याचा बाटेल तितका प्रयत्न केला तरी तो त्याच्या चाणाक्षतेने व अुत्कृष्ट सावधगिरीने मुळीच जेव्हा सफल होअीना तेव्हा स्वतः फारेस्टने ब्राह्मणाचे वगैरे पोशाख करून, त्याच्या पंक्तीला चपून शेवटी अितकी बातमी मिळविली की शिपायांच्या गुप्त सभा गंगाप्रसाद नावाच्या मनुष्याच्या घरी भरत असतात. तिथे त्याने त्या गंगाप्रसादाला धाक-दपटशा देअून प्रवेश केला व शिपायांच्या सभा चालताना भिंतीच्या भोकातून सर्व प्रकार प्रत्यक्षतेने पाहिला. अितकेच नव्हे तर पुढे त्याने लष्करी गोऱ्या अधिकाऱ्यांना बरोबर आणलें. जेव्हा अत्यंत राजनिष्ठ म्हणून वाटणारे प्रमुख नेटिव्ह अंमलदार तेथे अेकामागून अेक येअू लागले व गुप्त रीतीने फिरंग्यांना मारण्याचा सल्ला करू लागले. तेव्हा भिंतीच्या भोकातून पाहणारे चकित झालेले गोरे अधिकारी म्हणाले, "My God, my own men ! Is it possible ? अरे बापरे, हे तर आमचेच लोक ! हे कसें शक्य असेल ?" शिपायांचा अेकंदर बेत असा ठरलेला होता की, मुंबअीला बंड अुभारून पुण्याकडे चालून जावे. तेथे तें शहर ताब्यात घ्यावें व श्री. नानासाहेब पेशव्यांच्या नावाची द्वाही फिरवून मराठ्यांना झेंडा

पुन्हा अुभारावा [२] परंतु हा बेत सिद्धीस जाण्यापूर्वीच फारेस्टनें हें कारस्थान फोडलें, बंडाच्या दोन पुढाऱ्यांना फाशावर चढविलें व सहा प्रमुख नेटिव्ह लष्करी लोकांस हद्दपार केलें. अशा रीतीनें १८५७-च्या आक्टोबरातच बंडाचा मुळातच बीमोड झाला !

नागपूर व जबलपूर येथेही बंडाची धुमसणारी आग याच वेळेस तुडवून विझविण्यात आली. नागपूरला ता. १३ जून १८५७ रोजी अुठण्याचा बेत शिपाअी लोकांनी ठरविलेला होता. शहरांतील नागरिकांपैकी क्रांतिकारक कटात असलेल्या लोकांनी १३ तारखेच्या रात्री तीन दारूची जळती विमानें आकाशात अुडवावी व हें सूचक चिन्ह दिसताच शिपायांनी अुठावें असा बेत ठरला. परंतु मद्रासहून आणलेल्या नेटिव्ह फौजेने नागपूर व जबलपूर येथील बंडवाल्यांना ठिकच्या ठिकाणीच हतबल करून सोडलें. त्या समयी त्या प्रांतात ह्या मद्रासच्या नेटिव्हांशिवाय सरकारपाशी अेकही युरोपियन शिपाअी धाडता येणार नव्हता ! जबलपुरास गोंड जातीचा राजा शंकरसिंह व त्याचा पुत्र हे क्रांतीची आग सर्वत्र पेटवीत असताना अिंग्लिशांच्या हाती पडले, व त्यांच्या वाड्याची जेव्हा झडती झाली तेव्हा राजा शंकरशहाची रोजची प्रातःस्मरणाची अेक श्लोक पंक्ति त्याच्याच हस्ताक्षरात अुतरलेली सापडली. त्याच्या अिंग्रजी भाषांतरावरून पुढील श्लोक अुदाहरणार्थ दिलेले आहेत. श्री कालिकेच्या चंडस्वरूपाचें वर्णन करीत राजा शंकरशहा म्हणतो,

साधुछळ दुष्कृती ! दुष्ट नाशाप्रती ।
धाव गे संप्रती ! चंडिके कालिके ! ॥ १ ॥
शत्रु विध्वंसना । धर्म संस्थापना ।
बाल संगोपना । येअि गे मातृके ! ॥ २ ॥
आंग्ल रिपु मातले । भूतल त्रासले ।
रक्त पी अघोरे । शत्रु संहारके ! ॥ ३ ॥

राजा शंकरशहाने ५२-व्या रेजिमेंटला वश करण्याचा प्रयत्नही केलेला होता व म्हणूनच त्या रेजिमेंटला धोका दाखविण्याकरिताच त्या राजाला व त्याच्या पुढाऱ्याना तोफेच्या तोंडी १८ सप्टेंबर १८५७ रोजी देण्यात आलें. ही बातमी अैकताच दवग्याचे अेवजी चवताळून गेलेली ती ५२-वी नेटिव्ह रेजिमेंट बंड करून अुठली व रणाकडे चालती झाली व तिने मॅकग्रेगर याला ठार मारलें.

तिकडे धार संस्थानानें व दिल्लीचा राजपुत्र प्रथित वीर फेरोजशाह ह्याने महिदपूर व गोराअिया अिथे केलेल्या अुग्र संग्रामाची वर्णनें विस्तारभयास्तव देता येत नाहीत.

२. 'Forrest's 'Real Danger in India.'

परंतु वरील सर्व ठिकाणांपेक्षा अिंग्लिश सत्तेचें मर्मस्थान हैदराबादच्या निझामाचे हातात होतें. त्या गादीवर १८५७ चे मेमध्ये नवीन निझाम अफझुल अुद्दौला हा बसला होता व त्याच्या दिवाणगिरीचें काम सर सालरजंग नावाच्या पुरुषाचे हाती होते. या सर सालरजंगच्या अेका शब्दावर सर्व दक्षिण तोललेली होती. जर हैद्राबादचा निझाम बंडास मिळाला असता तर सर्व दक्षिण अेका व्यक्ती-सारखी अुसळून अुठती व अुत्तरेच्या ताणानेच फाटत आलेली अिंग्रजी सत्तेच्या आयुष्याची अेकेरी दोरी या दक्षिणेच्या लहानशा हिसक्यासरशीही तुटून पार होती ! सालरजंगास अिंग्लिशांविरुद्ध जाण्याची कल्पना कोणी सुचविली होती असेंही नव्हे. धर्माभिमानाने, स्वदेशाभिमानाने, स्वातन्त्र्याभिमानाने, ही कल्पना न सुचण्या-अितका जरी तो राजनिष्ठ होता असे गृहीत धरले तरी खुद्द त्याच्या संस्थानातील प्रजेने त्याला अेकसारखे तिचें नेट लावलेले होतें. परंतु सालरजंग काही केल्या चळवळ करीना. तेव्हा हैद्राबादने ता. १२ जूनचे सकाळी आपण होअूनच पहिली दंगल अुडविली. त्या दिवशी मोठमोठाल्या मौलवींनी सह्या केलेल्या जाहिरनाम्यांचे व हस्तपत्रकांचे ढीग हैद्राबादेत पडलेले होते. फिरंग्यांना स्वदेशातून हुसकून द्यायच्या कडक शपथा जनसमूहास घातल्या जात होत्या. मशिदींतून मुसलमानांच्या टोळेजंग सभा भरल्या व हया क्रांतियुद्धाचे अत्यंत जालीम अुपदेश अुघडपणे देण्यात आले. तरी सालरजंग हलेना. अितकेंच नव्हे तर त्याने शहरातील काही पुढाऱ्यास पकडून अिंग्रजांचे हवाली करून दिलें ! तेव्हा १७ जुलै रोजी संध्याकाळी ५ वाजण्याचे सुमारास हैद्राबादेस प्रत्यक्ष बंडासच लोकांनी आरंभ केला. शहरातील चारपांचशे लोकांनी व निजामचे लष्करातील रोहिल्या शिपायांनी हिरवीं निशाणे अुभारलीं व 'दीन दीन' म्हणत ब्रिटिश रेसिडेन्सीवर हल्ला चढविला. अशा स्थितीत आपल्यास प्रत्यक्ष मिळणें नसेल तर अितर संस्थानिकाप्रमाणे सालरजंग आतून तरी मिळेल, निदान आपल्या विरुद्ध तरी जाणार नाही अशी हैद्राबादेस फार खात्री होती. परंतु सालरजंगने त्यांची पूर्ण निराशा केली. तो त्यांना न मिळता मुग्ध बसला नाही, अितकेंच नव्हे तर अिंग्लिशांना प्रत्यक्षपणे जाअून मिळाला व आपल्याच सैन्या-वर हल्ला करून त्यांना हुसकून देअू लागला. त्या गर्दीत बडवाल्यांचा पुढारी तोरा-बाझखान हा ठार झाला व मौलवी अल्लाअुद्दीन हा शत्रूचे हाती सापडला. लवकरच *त्याला अंदमान बेटात धाडून देण्यात आले व येथेच हैद्राबादेचे शांतिप्रयत्न विफल-*तेत विनळून गेले. अिंग्लिश ग्रंथकार प्राजळपणे म्हणतात, " For three months the fate of India was in the hands of Nizam Afzul Uddaulah and Salarjung. Their wise policy proved that they preferred the certain position of a protected state to the doubtful chances of a resuscitation of the Delhi monarchy under the auspices of revolted Sepoys." व ह्या अस्पृहणीय कारस्थानीपणाबद्दलच सालरजंगची कीर्ति अितिहासात नोंदत आहे.

निझामानें जरी दक्षिणेतील शत्रूंचा असा नाश केला तरी त्याच्याच राज्यानजीक राहणाऱ्या झोरापूर संस्थानच्या तरुण हिंदु राजाने मात्र आपलें सर्वस्व स्वातंत्र्यसमरात वेचण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणे त्याने अरब, रोहिले, पठाण व डोंगरी लोक ह्यांचें अेक जंगी सैन्य जुमारलें. त्याच वेळी त्याच्याकडे नानांचे दूत आले व पेशव्यांच्या नांवाने त्यांना अुठाव करण्यास प्रवृत्त केलें. रायचूर व अर्काट येथून काही ब्राह्मण व मौलवी येथून त्याला प्रोत्साहन देते झाले. अितकेंच नाही तर अिंग्रजाविरुद्ध अुठाव करण्याची त्याजकडून जेव्हा हयगय होअू लागली व विलंब होअू लागला त्या वेळेस त्याचीच प्रजा त्याला भित्रा भागूबाअी म्हणून हिणवूंही लागली. तेव्हा त्याने पेशव्यांच्या नावाने अिंग्रजांविरुद्ध वंड पुकारले. परंतु निझाम व अिंग्रज ह्यांच्या द्विगुणित शक्तीपुढे त्या अेकट्याचा अर्थातच फार वेळ टिकाव लागला नाही. सन १८५८-चे फेब्रुवारीस पराभव होअून तो हैद्राबादला निघून गेला व तिथे बाजारात हिंडत असता सालरजंगाने त्याला पकडून अिंग्रजांच्या हवाली केलें. त्या राजाला लहानपणी मेडोज टेलर ह्याचा फार ळळा असे. अेतदर्थ त्याच्यापासून गुप्त कटाचीं बिंगें बाहेर काढण्याकरिता मेडोज टेलरला धाडण्यात आलें. मेडोज टेलरला पाहताच त्या तरुण राजाने 'अप्पा' म्हणून त्याला मिठी मारली. परंतु जेव्हा गुप्त कटाची हकीकत तो विचारूं लागला तेव्हा 'He drew himself up very proudly and replied haughtily :—"नाहीं, अप्पा, मी तें सांगणार नाही! रेसिडेंटाला भेटण्यास यावें म्हणून म्हणता पण तेंही मला करता येत नाही. त्याला आशा असेल की मी त्याजपाशी आयुष्याची भिक्षा मागेन. परंतु, अप्पा, मी भ्याडासारखा भिकेवर जगू जिच्छीत नाही किंवा माझ्या देशबंधूंचीं नावेंही मी फोडणार नाही!" मेडोज टेलर पुन्हा अेके दिवशी त्याचेकडे गेला व त्या मरणाची प्रतीक्षा करणाऱ्या तरुण राजाला जिवाची आशा दाखवून हकीकत सांगण्यास सुचवू लागला. तेव्हा राजा म्हणाला, 'मी सर्व हकीकत सांगेन. परंतु जर ते मला ज्यांनी युद्धाला प्रवृत्त केलें त्यांची नावे विचारतील तर मात्र मी अक्षरही बोलणार नाही! काय? मी, मरणाच्या तोंडात अुडी टाकण्यास राजलेल्या मी, माझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या माझ्या देशबंधूंचा विश्वासघात करूं? छे, छे! तोफेचें तोंड, फांशीचा खांब, अंदमानची हवा—यांत मजकडून विश्वासघात करविण्याचें सामर्थ्य नाही!" मेडोज टेलर म्हणाला, "तुला मरण निश्चितच आहे"—राजा म्हणाला "अप्पा, मला फाशीवर देअू नका. मी काही चोर नाही. मला तोफेच्या तोंडी द्या. पहा' अप्पा मी तोफेच्या तोंडाशी अचल अुभा राहीन! बिलकूल डगमगणार नाही!"

या सतेज राजतरुणाला मेडोज टेलरच्या शिफारशीने प्रथम मरणाची शिक्षा झालेली असूनही पुढे ती कमी करून ६ वर्षे हद्दपारीची शिक्षा देण्यात आली. ही बातमी अेकल्यानंतर लवकरच राजाने जवळच्या अेका अिंग्रजी पहारेकऱ्याचें पिस्तूल अुचललें व आपल्यावर गोळी झाडून त्याने आत्महत्या करून घेतली—तो मागेच

म्हणाला होता, "हद्दपारीपेक्षा मला मरण रुचतें. तुरुंग व हद्दपारी ! माझ्या प्रजेतील अत्यंत कनिष्ठ डोंगरीदेखील तुरुंगात जिवत राहणार नाहीं. तर मग मी राहणार ? मी तर राजा आहे ! [१]

आणि कोल्हापूरच्या राजाचा असा पराभव होईतोंपर्यंत 'अुठू' कां नको असी वाट पाहत स्वस्थ असलेल्या नरगुद संस्थानच्या अधिपतीनें आता बंड करण्यास कंबर बांधली ! भास्करराव बाबासाहेब हे विद्येचे फार चाहते असत. त्यांनी पुस्तकें ठिकठिकाणाहून आणवून अेक विस्तृत पुस्तकालय तयार केलेले होतें. त्यांचा स्वभाव फारच दयाळू असे. त्यांची रूपवती व तरुण भार्या ही तर तेजामध्ये रूपाभिरुचीच संपन्न होती. दत्तकाचा अधिकार नाकारल्यामुळें ह्या अुभय दांपत्यानें अिंग्लिशाविरुद्ध शस्त्र धरण्याची घोर प्रतिज्ञा केली व दक्षिणेंत क्रांतीचे कटात ते सामील झाले. परंतु केळीच अुठावणी न करता आता ता. २५ मे १८५८ रोजी त्यांनी प्रसिद्धपणें लढाओची द्वाही फिरविली व ब्रिटिशावर तरवार अुपसली. या स्फूर्तीला बहुतेक तेज त्या राणीचेंच होतें. त्यांच्यावर मॅन्सन नांवाचा अिंग्रजी अंमलदार येत असल्याचें कळताच बाबासाहेब काही निवडक लोकांनिशी त्याच्यावर चालून गेले व तो रात्री अेका रानात निजलेला असताना छापा घालून त्याला ठार मारून, त्याचें शरीर तेथील पेटलेल्या अग्नीत फेकून देअून व त्याचें शिर छाटून घेअून ते नरगुंदला परत आले. दुसरे दिवशी नरगुंद शहरावर ते अिंग्रजी मुंडकें लटकत ठेवलेले होते. मध्यंतरी बाबासाहेबांचा सावत्र भाअू अिंग्रजांना जाअून मिळाला व थोडेच दिवसांत अिंग्रजांच्या सैन्याशी झटापट होअून बाबासाहेबांचा पूर्ण पराजय झाला व ते वेष पालटून निघून गेले. परंतु त्यांना लवकरच धरून आणून अिंग्रजांनी ता. १२ जूनला फाशीवर चढविलें. त्यांची ती तरुण, सुंदर व साहसी राणी शत्रूपासून होणारी विटंबना टाळण्याकरिता आपल्या वृद्ध मामूसह मलप्रभेत अुडी टाकून आत्महत्या करती झाली !

याशिवाय कोपलदुर्गचा भिमराव, सावंतवाडीचे अधिपति वगैरे बऱ्याच लोकांनी पेशव्यांच्या नावानें लहान लहान अुठावण्या केल्या. परंतु काल-चतुरतेच्या अभावानें, संघटनेच्या अपूर्णतेनें व विस्कळीत अेकेरी व व्यक्तिशः अुठण्यानें दक्षिणेकडे अिंग्रजांना कोणताही महत्त्वाचा ताण न पडता त्यांना आपला सर्व जोर अुत्तरेकडे खचिता आला.

अशा रीतीनें दक्षिणेचें विहंगावलोकन केल्यानंतर मौलवी अहमदशाह यांच्या वीररसप्रचुर चरित्रकथेचे शेवटी समरांगणात तळपत सोडलेल्या त्या मानी

---

१. I prefer death to transportation. Prison and transportation? The meanest mountaineer of my subjects will not remain in gaol—what then of me, their king ?

—Meadows Taylor's 'Story of My Life'

अयोध्येचा शेवटचा निरोप घेण्याम आता त्वरेनें विकडेच गेलें पाहिजे. मौलवी अहंमदशहासारख्या परम तेजस्वी देशवीरांच्या आयुष्याप्रमाणेच त्यांचें मरणही अपूर्व चरित्रच असतें. मारल्याने अितर लोक मरोत, परंतु ज्याच्या आत्म्याला देश-धर्म-प्रीतीने आग लागलेली आहे व त्या आगीचे शांतीसाठी रणांगणात 'रक्त रक्त' म्हणून थयथय नाचत पराक्रमाचें तांडव गाजवितात, अशा देशभक्तांचो मुंडाचो अिच्छा पुरी असता तो मरणाने कधीही मरत नाही. रणांगणात शिर छाटलें गेलें तरी शूरांचीं कबंधेंही समरात लढत राहतात असे जें वर्णन असतें व तीं कबंधेही छाटलीं तरी अमानुष देह धरून त्यांचे आत्मे आपल्या शत्रूंस काळोखात पछाडीत असतात अशी जी समजूत आहे तिचा तात्त्विक अर्थ काही खोटा नाही. मौलवी अहंमदशाह लढत होते तेव्हा लॉर्ड कॅनिंगने अेक जाहिरनामा प्रसिद्ध करून सर्व अयोध्येस जाहीर केलेले होते की, "जो आता शस्त्रें खाली ठेवील त्याच्या केसालाही धक्का लावण्यात येणार नाही व त्याला मागील अपराधाची माफी केली जाओल; जो आम्हांस मदत करील त्याची अिनामें त्याला परत देण्यात येतील; व आता अिंग्रजी शस्त्रांचा नि:संशय रीतीने जय झालेला असल्यामुळे यापुढेही जर अयोध्येतील लोक असेच हट्टाने लढू पाहतील तर त्यांना कडक शासन करण्यात येओल." असा हा माफीचा जाहिरनामा लागल्याने अयोध्येतील बरेच जमिनदार लोक शांत होतील असा अिंग्रजांचा साधार समज होता. परंतु अितक्यात ता. ५ जून १८५८ रोजी त्या पोवेनच्या गलेलठ्ठ चांडाळाने तो फैजाबादचा मौलवी मारला अशी दु:खकारक वार्ता अयोध्येवर विद्युत्पातासारखी कोसळली! — आणि अशात श्रमाने ती जर दमलेली होती, अपजयाने जरी निरुत्साही झाली होती, माफीच्या लालचीने जरी शरणागतता तिला भुलवीत होती व शत्रूच्या व मित्राच्या भयंकर आघाताने जरी विकलांग झालेली होती तरी ती अयोध्या अेखाद्या भुताटकीसारखी ही मृत्युवार्ता अैकताच 'सूड-सूड-सूड' करीत तत्क्षणी रक्तपातात अुसळली! मौलवीचें शिर त्याच्या अनुदार शत्रूने चावडीवर टांगले — पण मौलवीचें कबंध रणात लढू लागले, मौलवींचें मरण अिंग्रजांशी झुंजू लागलें. अपूर्ण विच्छेच्या पूर्ततेसाठी मौलवींचें भूत आपल्या अमानुष विशाळतेने अिंग्रजीसत्तेच्या नरड्यास जाअून बिलगले! अयोध्येतील नष्टप्राय होत आलेला रणोत्साह मौलवींच्या आयुष्यापेक्षा किंवा आयुष्याप्रमाणेच त्याच्या मरणानेही प्रदीप्त केला व स्वपर बलाबलाचा, यशापयशाचा, जीवनमृत्यूच्या विचाराला लाथ मारून ती मूर्तिमत भूतबाधा अयोध्या रणाकडे अेकाअेकी अगदी आरभीच्या तडफेने धावत चालली! पोवेनच्या चांडाळाचा सूड घेण्यासाठी निजाम अल्लीखान हा पिलिभिटपर्यंत चालून गेला, चार हजार लोकांसह वृद्ध खानबहादुरखान हे त्याच रणाकडे धावत आले; ५००० लोकांसह फरुखाबादचा पुढारी, ३००० लोकांसह विलायत शहा, २००० लोकांसह नानासाहेब, अल्लीखान मेवाती व त्याचे अनुयायी यांनी रोहिलखंडात अेकदम रणधुमाळी माडली. पोवेनच्या राजाचें रक्त

केव्हा पिशू असे बसवलेले हे पांडप वीराचे पंजे आपल्यावर फिस्कारून येत आहेत हें पाहताच त्या नामर्द देशद्रोह्याच्या पापी अंगास थरकाप भरला, त्यानें संरक्षण करण्यासाठी अिंग्रजानी तिथे तावडतोब सैन्य धाडलें, त्याचे हजारो लोक पोवेन भोवती नेहमी सशस्त्र अुभे राहू लागले. त्या भागाभोवती बंडवाल्यांच्या निकराच्या झटापटी अेकसारख्या सुरू झाल्या. अिकडे घाग्रा नदीच्या काठी चौकाघाट येथे बेगम व तिच्या प्रीतीतील सरदार ममूखान यांनी मुख्य केंद्र स्थापलेले होतें. त्या शिवाय अनेक निरनिराळीं लहान मोठीं सैन्यें घेअून राजा रामबक्ष, वहुनाथसिंग, छंदाबक्ष गुलाबसिंग, भोपालसिंग, हनुमानसिंग वगैरे शूर जमिनदार अिंग्रजानी जिंकीत आणलेल्या सर्व अयोध्येभर पुन्हा धामधूम घालीत धावत चालले. शिवाय मागे धार सस्थानच्या रणाकडे लढणारा दिल्लीचा शूर राजपुत्र फिरोजशाह अयोध्येतच लढत होता. मागे ज्याने रोमाला, " पडौन निरचये मी कोण्या अेका महारथी आजी। गातील जिला मत्कवि अैशी होअील सर्वथा आजी ॥ ' अशी घोर प्रतिज्ञा करून ती पूर्ण केली होती, ज्याच्या जुसासिंग नामें शूर पित्याची व श्री. नानांची अत्यंत मैत्री होती, स्वदेशयुद्धार्थं ब्रह्मावर्ताकडे हॅवलॉकशी नानाबरोबर लढत असता ज्याचा पिता तो शूर जुसासिंग रणात पडलेला होता, ज्याने नानाना आपल्या रोयाच्या किल्ल्यात आश्रय दिला व फिरंगी त्या किल्ल्याशी आला असता ज्याने आपल्या पित्याच्या या क्षत्रिय ब्रीदाचें अनुकरण करून तो ज्या रणात पडला त्या देशरणाच्या विजयासाठी आपणही तरवार अुपसली, तो मानी पित्याचा मानी पुत्र राजा नरपता सिंग हाही अयोध्येत लढत निघाला ! आणि या सर्वाहूनही बलाने, निश्चयाने, देश-प्रीतीने व रजपूतत्वाने आगळा असणारा राजा बेणीमाधव हाही आपला किल्ला सोडून, देशरणाचें कंकण बांधून धाडसाची कमाल करून थेट लखनौच्या कानपूर रस्त्यावर चालून आला ! ज्याची यशाची आशा सुटते व नतर जे फक्त मानासाठी व कर्तव्यासाठी मरणाच्याच आवेशाने लढू निघतात त्यांच्या साहसाला पारावार कस असणार ? केवळ क्षात्रब्रीदाच्या रक्षणासाठी लढत असणाऱ्या ह्या बेणीमाधवने आत साहसाची कमाल केलेली होती. यशाचें किंचितही चिन्ह अुरलेले नसता आज तो अेकाअेकी लखनौवर चालून येत आहे–आला आहे व त्याने त्या शहरात जाहिरनामे लावले आहेत की, तेथील शहरवासीय स्वजनानी बाहेर जावें. कारण फिरंग्यावर आमचा भयंकर हल्ला लवकरच चालू होअील ! विजयाने, सबलत्वाने व सघटनेने सशक्त असलेल्या फिरंग्यानाही ह्या त्वरेने व साहसाने चकित करून सोडले यात काय नवल आहे ! मृतवत् झालेली अयोध्या अेका निमिषार्धात पुन्हा अशी अुसळी मारून युठली ! लखनौवर हल्ला–जसा काही बडाला वर्षापूर्वी आरंभ झालेला नसून आजच तो झालेला आहे !

रक्ताचे समुद्र अयोध्येच्या अगातून सुकले नाहीत तोंच ता. १३ जून १८५८ रोजी होप ग्रँट हा ससैन्य लखनौहून नजीकच असलेल्या नवाबगज गावावर चालून

गेला. तेथे लखनौवर चालून येऊ पाहणारे परंतु विजयाशेचा लवलेशही मनात नसणारे अभिमानी पांडववीर जमत होते. त्यांचेवर अेकाअेकी होप ग्रँट आपल्या गोऱ्या व काळ्या फौजेसह तुटून पडला ! अितर कोणतेंही सैन्य तत्काळ फुटून जाणें अपरिहार्य होतें. पण वीरहो थांबा, मौलवीला मरून ८ दिवस झाले नाहीत तर थांबा ! ते थांबले व त्यांनी आक्रमक पवित्रा घेण्यास आरंभ केला ! शौर्याचा असा अुत्कर्ष फार तुरळक आढळेल. खुद्द त्याच्याशी नेहमी अनुदारतेने वागणाऱ्या शत्रूच्याही हृदयात नैसर्गिक वीरप्रेम अुत्पन्न व्हावें असा अुत्कर्ष ! आंग्ल वीर होप ग्रँट म्हणतो, " Still, their attacks were vigorous, if unsuccessful, and we had much ado to repel them. A large body of fine, daring Zamindari men brought two guns in the open and attacked us in the rear. I have seen many battles in India and many brave fellows fighting with a determination to conquer or die; but, I never witnessed anything more magnificent than the conduct of these Zamindars. In the first instance they attacked Hodson's horse, who would not face them and by their unsteadiness placed in great jeopardy two guns which had been attached to the regiment. I ordered up the 7th Hussars and the other four guns belonging to the battery to within a distance of five hundred yards from the enemy and opened a fire of grape which mowed them down with a terrible effect, like thistles before the scythe. Their chief, a big fellow with a goitre on his neck, nothing daunted, caused two green standards to be placed close to their guns and used them as a rallying point. But our grape fire was so destructive that whenever they attempted to save their pieces, they were struck down. Two squadrons and more now came up to our side and forced the survivors to retire, waving the swords and spears at us and defiantly calling out to us to come on. Arround the two guns alone there were one hundred and twenty five corpses ! After three hours' fighting, the day was ours ".[४]

अशा निकराच्या झटापटी पूर्व अयोध्येत, मध्य अयोध्येत, अुत्तर अयोध्येत व सर्व अयोध्येतच सुरू झाल्या. जो तो आपली तोडयाची बंदूक व आपली गंजलेली समशेर अुपसून शेवटचा सामना करण्यास हट्टाची कमाल करू लागला. अिंग्लिशांचे पाठलाग, त्याची जाळी व त्या जाळ्यांचे व त्या पाठलागाचे तुकडे करीत वाऱ्याप्रमाणे भराभर अितस्ततः अुग्र हट्टाने लढत फिरणारे रणवीर, त्यांच्या हकीकती देण्यास आता स्थलावकाश नाही अितके त्या अयोध्येने रणाचे भयकर आकाडतांडव मांडले.

४. Hope Grant's Incidents of the Sepoy War, page 292.

ते फक्त शत्रूशीच नव्हे तर शत्रूच्या माफीला भुललेल्या राजा मानसिंग व पोवेनचा चांडाळ असलेल्या देशद्रोह्यांशी—अशा दुहेरी लढाईत ! त्यांनी पोवेनवर हल्ले चढविले, त्यांनी लखनौकडे लाडगेतोड केली, त्यांनी सुलतानपूरला टक्कर दिली, त्यांनी देशद्रोही मानसिंगला किल्ल्यात कोंडून पाडला, त्यांनी अिंग्रजी रस्ते अडकविले, त्यांनी अिंग्रजी ठाणी मारलीं, त्यांतील प्रत्येकाने तरवार फिरवीत, घोड्यावर दौडत रणात झुंजत, रक्ताचा पाअूस पाडीत, मरेतोपर्यंत लढाओी चालविली ! जूनपासून आक्टोबरपर्यंत—आक्टोबरपासून डिसेंबरपर्यंत अयोध्या लढली. आता मात्र पूर्व पश्चिम, दक्षिण अुत्तर अशा सर्व दिशांनी अेक समयावच्छेदेकरून निरनिराळीं अनेक ब्रिटिश सैन्यें त्याच्यावर सोडण्यात आली की त्या योगाने अेका प्रदेशातून हुसकताच दुसऱ्या प्रदेशाला जाता येअू नये. अशा अनंत भिन्न सैन्याशीही त्या कृतनिश्चयी, जिवावर अुदार झालेल्या वीरांनी लढत लढत चालावे असा आक्टोबरात बेत केला ! बेणीमाधवाच्या शंकरपुराला तिन्ही बाजूनी वेढा पडला. जवळ सैन्य नाही, शत्रु बलवत्तर—तरी बेणी माधव शस्त्र ठेवीना. तेव्हा अिंग्लिशांच्या खुद्द कमांडर-अिन-चीफने त्याला निरोप धाडला कीं, 'जीत तुझ्या पक्षाला विजयाची आशा नाही अशा या लढाअीत अुगीच हट्टाने लढणे सोडून देशील तर तुला माफी मिळेल व फायदाही मिळेल, !" बेणी माधवने अुत्तर धाडलें "किल्ल्याचें संरक्षण अितःपर अशक्य असल्याने तो मी सोडून देणार आहे परंतु मी मात्र तुम्हास शरण येणार नाही. कारण ह्या देहावर सत्ता माझी नसून माझ्या राजाची आहे ! " किल्ला शरण येअील, पण बेणी माधव येणार नाही, कारण त्याचा देह स्वराज्याचा काय तो दास आहे !'[५]

मध्यतरी सन १८५८ च्या नोव्हेंबर महिन्यात सुप्रसिद्ध असलेला राणीचा जाहिरनामा सर्व हिंदुस्थानभर जाहीरपणे प्रसिद्ध करण्यात आला आणि पूर्वी वर्त-

५. Charles Ball says :— " After the proclamation, still the struggle in Oudh was wonderfull, and all these bands of rebels were strengthened and encouraged to an inconceivable degree by the sympathy of their countrymen. They could march without commissariat, for the people would always feed them. They could leave their baggage without guard for the people would not attack it. They were always certain of their position and that of the British for the people brought them hourly information. And no design could be possibly kept from them while secret sympathisers stood round every mess-table and waited in amidst every tent in the British camp. No surprise could be effected but by a miracle, while rumour, communicated from mouth to mouth, outstripped even our cavalry. " Vol. II. p. 572.

विलेल्या भविष्यवाणीप्रमाणे अेक शतकानंतर कंपनी सरकारची राजसत्ता हिंदुस्थानातून संपुष्टात आली व त्याजागी राणीची राजसत्ता चालू झाली! ज्यानी ज्यानी अिंग्लिशांविरुद्ध बंडाची अुठावणी केली होती व जे आपली शस्त्रें खाली ठेवून ब्रिटिशांना शरण येतील त्यांना सार्वत्रिक माफी देण्याचे आणि त्यांची मालमत्ताही जप्त करण्यात येणार नाही, असे जाहीर करण्यात आलें.[६] अितकेंच नाही तर त्यांच्या अपराधाची चौकशीही करण्यात येणार नाही. वारसासाठी दत्तक घेण्याचा राजामहाराजाचा अधिकार मान्य करण्यात आला. लोकाच्या धार्मिक अधिकारात व समजुतीत निष्कारण ढवळाढवळ किंवा हस्तक्षेप सरकार करणार नाही असें खास वचन देण्यात आलें व तीं वचनें क्सोशीने पाळण्यात येतील असेंही जाहीर केलें गेलें.

राणी आपल्या जाहिरनाम्यात पुढे म्हणते, "सध्याच्या सन्माननीय ऑस्ट अिंडिया कंपनीच्या मुल्की व सैनिकी नोकरीत असलेल्या अधिकाऱ्याना व अितर सर्व नोकराना आम्ही कायम करीत आहोत. अर्थात् भावीकालात जे कायदेकानू आमच्या मर्जीनुसार केले जातील ते त्यांना पाळावे लागतील."

---

६. राणीचें हें वचन व अशा प्रकारचीं अन्य वचनें अिंग्लिशांनी कशी पाळली हें हिंदुस्थानातील लोकाना पूर्णपणे माहीत झालेलेच आहे. निरनिराळ्या सावकाराकडून सरकारने घेतलेलें लक्षावधि रुपयांचें कर्ज, ज्याना जामीनसुद्धा दिले होते,ते कर्ज, 'सावकार बंडखोर आहेत' असे ठरवून, देण्याचें सरकारने साफ नाकारले. ह्यासाठी पुढील अुदाहरण फार महत्त्वाचे आहे. कारण ते 'बंडाच्या' कोणत्याही अितिहासात सापडणार नाही. अितकेंच काय पण लंडन टाअिम्स करता मि. रसेल—१८५७ मधील लंडन टाअिम्सचा हिंदुस्थानातील वातमीदार—याने टाअिम्सला धाडलेल्या पत्रातही त्याचा अुल्लेख आलेला नाही. लंडन टाअिम्सचा संपादक जॉन डीलन याचें आत्मचरित्र नुकतेच प्रसिद्ध झालें आहे. त्यात लंडन टाअिम्सचा हिंदुस्थानात असलेला १८५७ मधला वार्ताहर मिस्टर रसेल याने जॉन डिलनला अेक खाजगी पत्र पाठविले होते—ते या आत्मवृत्तात प्रसिद्ध झालें म्हणून जगास कळून आले ते पत्र असें :

"At the end of January 1859 Sir W. H. Russell was still with Lord Clyde and in one of his last letters from Lucknow he tells a delightful story which he heard from the Commander-in-Chief. Alluding to his landlord at Allahabad (an Anglo-Indian general merchant) Lord Clyde said, "You doubtless heard what he did?" 'No' "Well, he was much in debt to native merchants when the mutiny broke out. He was appointed special commissioner, and the first thing he did was to hang all his creditors!"

" आम्ही अशी घोषणा करतो की, हिंदुस्थानातील सर्व राजेरजवाड्यांशी व संस्थानिकांशी ओस्ट अिंडिया कंपनीने केलेले करार आणि तहनामे आम्हांला पूर्णपणे मान्य असून ते आम्ही काटेकोरपणे पाळू. दुसऱ्या पक्षानेही ते तसेच पाळावेत अशी आमची अपेक्षा आहे. सध्या असलेल्या आमच्या ताब्यातील प्रदेशात अधिक भर घालण्याची आमची अिच्छा नाही. त्याचप्रमाणे अितरांनी आमच्या राज्यावर किंवा अधिकारावर दुष्ट हेतूने आक्रमण करण्याचा केलेला प्रयत्न आम्ही चालू देणार नाही. त्याचप्रमाणे दुसऱ्यावर केलेल्या आक्रमणालाही आम्ही मान्यता देणार नाही. आमच्याप्रमाणे आम्ही नेटिव्ह राजांचे व संस्थानिकांचे अधिकार, त्यांचा सन्मान, व मोठेपणा यांचा सन्मान ठेवू. आमची अुलट अशी अपेक्षा आहे की, त्यांनी, तसेच आमच्या प्रजेनेही सुख, आणि सामाजिक प्रगति यांचा आनंदाने अुपभोग घ्यावा आणि त्यासाठी अंतर्गत शांतता व सुव्यवस्था राखावी.

" आमच्या अितर प्रजाजनांसंबंधी जे कर्तव्य करण्याचें बंधन आमचेवर आहे तेंच कर्तव्यबंधन हिंदुस्थानातील नेटिव्ह प्रजेसंबंधीही आमच्यावर आहे असें आम्ही मानतो. आणि अीश्वराच्या आशीर्वादाने प्रामाणिकपणे व मनःपूर्वक ती सर्व कर्तव्यें आम्ही पार पाडू.

" पुढे आमची अशीही अिच्छा आहे की, शक्यतो कोणत्याही वंशाच्या अगर धर्माच्या आमच्या प्रजाजनांना, पक्षपात न करता, त्यांचें शिक्षण, पात्रता, व निष्ठा लक्षात घेअून आमच्या सरकारात योग्य त्या नोकऱ्या दिल्या जातील.

" ज्यांनी आमच्या ब्रिटिश प्रजाजनांना ठार मारण्यात प्रत्यक्ष भाग घेतला आहे व त्याबद्दल ज्यांना शिक्षा झाल्या आहेत किंवा होतील त्या व्यतिरिक्त अितर सर्वांना सार्वत्रिक माफी देण्यात येअील.

" सरकारविरुद्ध शस्त्र धारण करणाऱ्या अितर सर्वांना ते आपापल्या घरी जाअून शांततेने जीवन जगू लागल्यास त्यांनी आमच्या विरुद्ध, आमची सत्ता व प्रतिष्ठा यांविरुद्ध केलेले सर्व अपराध विना अट क्षम्य समजले जातील, असें आम्ही या जाहिरनाम्याद्वारे आश्वासन देतो "

हिंदुस्थानचा हा 'मॅग्नाचार्टा' (?) अशा रीतीने जाहीर करण्यात आला ! ह्याच्या मागील मुख्य कारण अयोध्येचे बंड शमविण्याची अिच्छा, हेच होते यात काही शंका नाही. पण अयोध्येने त्याच्याकडे ढुंकूनही पाहिलें नाही. तर अुलट त्याला प्रत्युत्तर म्हणून अयोध्येच्या बेगमेने खालील जाहिरनामा प्रसिद्ध केला.

" राणीच्या जाहिरनाम्यात असें म्हटले आहे की, कंपनीने केलेले सर्व करार व तह राणीकडून पाळले जातील. पण त्यातील डाव लोकांनी नीट लक्ष ठेवून ओळखावा. कंपनीने सर्व हिंदुस्थानवर तिची सत्ता प्रस्थापित केलेली आहे. आणि हीच व्यवस्था जर स्वीकारायची तर त्यात नवीन असें काय आहे ? भरतपूरच्या राजाला आपला मुलगा मानून कंपनीने त्याचा सर्व प्रदेश खालसा केला !

लाहोरच्या राजाला ( रणजितसिंहाचा मुलगा दुलीपसिंह ) लंडनला नेलें, पण तो पुन्हा अिकडे येअू शकला नाही ! नवाब शमसुद्दीनखान ह्यांस अेका हाताने सलाम करीत असतानाच दुसऱ्या हाताने ह्यानी फांशी दिलें. पुणें व सातारा येथून पेशव्यांना बाहेर काढून जन्मभर विठूरला कैदेत ठेवले! बनारसच्या राजाला आग्रा येथे कोंडण्यात आलें ! बिहार, ओरिसा व बंगाल येथील राजांचें तर नाव निशाणही त्यांनी शिल्लक ठेविलें नाही ! पगार वाटण्याच्या नावाखाली त्यांनी आमची पूर्वीची मालमत्ता आमच्याकडून तहाच्या ७ व्या कलमाप्रमाणे घेताना प्रतिज्ञेवर लिहून दिले की, ते आमच्याकडून अधिक काहीही घेणार नाहीत. कंपनीने त्या वेळी केलेली ही व्यवस्था जर जशीच्या तशी स्वीकारावयाची तर त्या वेळच्या व आजच्या परिस्थितीत फरक तो कोणता ? ही सर्व व्यवस्था जुनीच आहे. पण अगदी अलीकडे त्यांनी दिलेल्या शपथा आणि केलेले तह मोडून, त्याच्याकडे आमचें लक्षावधि येणे असताही कोणतेंही कारण नसताना आमच्या लोकांची वर्तणूक ठीक नाही या ढोंगाखाली त्यांनी आमचा प्रदेश व लक्षावधि रुपयांची मालमत्ता अपहरण केली आहे. आमचे माजी राजे वझीदजलीशहा यांच्या संबंधी जर आमच्या प्रजेत नाराजी असती तर आमच्यापाशी ते प्रेमाने व सलोख्याने वागतात ते कसे ? अितकी अेकनिष्ठा आणि जिवाभावाची भक्ति - जी आम्ही अनुभवतो आहोत ती दुसऱ्या कोणत्याही राज्यकर्त्याला लाभली नसेल. असे असताना आमचा प्रदेश आमच्या हाती परत देण्यास कोणती अडचण वा अुणीव आहे ? जाहिरनाम्यात पुढे म्हटले आहे की, अधिक प्रदेशाची हाव त्यांना नाही. पण आमचा प्रदेश त्याच्या राज्याला जोडण्यापासून ते परावृत्त होअू शकत नाहीत. राणीने जर सत्ता हाती घेतली असेल तर आमच्या प्रजेने निःसंशयपणे तशी अिच्छा व्यक्तविली असताही राणी आमचा प्रदेश आम्हाला परत का देत नाही ?

" कोणत्याही राजाने अथवा राणीने बंडाच्या अपराधासाठी सर्व सैन्याला व सर्व जनतेला कधीही शिक्षा केली नाही ही गोष्ट जगजाहीर आहे. सर्वांना क्षमा केली जाअील, कारण सर्व सैन्याला अथवा हिंदुस्थानातील सर्व जनतेला शिक्षा करणे सुज्ञ पसंत करीत नाहीत. तसेच त्याना हेही पक्के माहीत आहे की, जोपर्यंत शिक्षेची भीति आहे तोपर्यंत येथील बंडाळ्या थांबविता येणार नाहीत ' मरता क्या नहीं करता ' ही म्हण प्रख्यातच आहे.

राणीच्या जाहिरनाम्यात लिहिलें आहे की, ज्यांनी बंडखोरांना आश्रय दिला किंवा बंडाला ज्यांनी प्रोत्साहन दिले त्यांची चौकशी होअून त्यांना देहान्त प्रायश्चित्त न देता किरकोळ शिक्षा देण्यात येतील. पण खुनी व खुनाला सहाय्य करणारे अशा लोकांना मात्र कोणतीही दया दाखविली जाणार नाही. अितर सर्वांना मात्र क्षमा करण्यात येअील. ही घोषणा वाचून मूर्खसुद्धा हे अुमजतील की अपराधी असो वा नसो, कोणीही शिक्षेतून सुटणार नाही. सर्व काही लिहिले आहे आणि

काहीही लिहिलेलें नाही ! पण अेक गोष्ट मात्र स्पष्टपणे सांगितली आहे की ज्याचा संबंध आहे अशा अेकाही माणसाला सोडलें जाणार नाही. आणि म्हणून ज्या खेड्यात व ज्या भागात आमचे सैनिक थावले तेथील सर्व रहिवाश्यांना ह्या जाहिरनाम्याप्रमाणे क्षमा मिळणार नाही. शत्रुत्वाच्या भावनेने भरलेला हा राणीचा जाहिरनामा वाचून आमच्या प्रिय प्रजेचें काय होअील या कल्पनेने आमचें हृदय भरून आले आहे. आता आम्ही अशी स्पष्ट आणि विश्वासार्ह अशी आज्ञा देतो की, जे गांवप्रमुख वेदगळपणे अिंग्लिशांच्या स्वाधीन झाले असतील त्या सर्वांनी १ जानेवारी १८५९ पूर्वी आमच्या छावणीत आश्रयाला यावें. आम्ही त्याना निःसंशय क्षमा करू. हिंदुस्थानी राज्यकर्ते हे दयाळू व क्षमाशील असतात. हा अनुभव ध्यानात घेअूनच या आमच्या घोषणेवर विश्वास ठेवा. हजारो लोकांनी हा अनुभव घेतलेला आहे, लक्षावधि लोकानी ही कीर्ति अैकलेली आहे. परतु अिंग्रजांनी अेसाद्याही अपराध्याला क्षमा केल्याचें कोणालाही ठाअूक नाही.

"राणीच्या जाहिरनाम्यात असें म्हटले आहे की, शांतता प्रस्थापित झाल्यावर लोकांची परिस्थिति सुधारण्यासाठी राजरस्ते, कालवे आदि लोकहिताचीं कामें हाती घेण्यात येतील. या त्याच्या आश्वासनावरून अुघड होते की, हिंदुस्थानी लोकांना केवळ रस्ते बांधणें, कालवे खणणें, यापेक्षा कोणतेही महत्त्वाचें काम ते देणार नाहीत!

"याचा अर्थ जर लोकानी नीट ध्यानात घेतला नाही तर त्यांनी कशाचीच आशा धरू नये !"

"या जाहिरनाम्यानें अेकाही प्रजाजनानें फसू नये !" अेनदर्थ अयोध्या विना अट दिलेल्या या माफीचा लाभ घेणार नाही. अद्यापही हातातील तरवार परजीत, अश्वारूढ होअून, शेतांतेमातून लढत, रक्तात स्नान करीत, स्वातंत्र्य-यशाच्या ज्वलित अयोध्या अुडी घेत होती. तिला युद्ध किंवा स्वातंत्र्य पाहिजे होते. शत्रूच्या पायापाशी पडण्यापेक्षा शत्रूच्या गळयाचा घोट घेण्याचीच तिला सवय होती. अशा प्रकारें १८५९ चा अेप्रिल आला तरी अयोध्या लढत होती. शंकरपूर, धुंडियाखेरा, रायबरेली, मिर्झापूर वगैरे अनेक पावलोपावली लढाया देत देत रण-पतनांतून थुरलेसुरले बंडवाले नेपाळच्या हद्दीपर्यंत हटत गेले. अिंग्रजांचीं ती भिन्न सैन्यें त्यांच्या पाठीशी लागलेलीच होती. तेव्हा ते नेपाळात घुसले आणि तेथे त्यांना नवीन आशा अुत्पन्न झाली की – नेपाळचा हिंदु राजा आपले संरक्षण करील काय ?

या वेळेस नेपाळमध्ये घुसलेल्या बंडवाल्यांची संख्या ६०००० असून त्यांचे आधिपत्य बेगम, तिचा मुलगा तो तरुण नबाब, नानासाहेब व बाळासाहेब यांजकडे होते. त्याना जंगबहादुरांचें जें अेक पत्र आले त्याला अुत्तर म्हणून नानांनी व बेगमेने दोन पत्रे लिहिलीं होतीं. त्यापैकी नानाच्या पत्रातील सुबोदार, मार्मिक व अुपरोधिक मजकूर देण्यासारखा आहे. "तुमचें पत्र पोचलें. आपल्या औदार्याची प्रख्याति आम्ही दूरपासून अैकत आलो आहोत. खरोखर मी हिंदुस्थानातील पूर्वीच्या

राजांचे अितिहास अैकलेले आहेत व हल्ली राजांचे पाहत आहे, पण आपल्या वर्तनास तोड मिळणें अशक्य आहेसें मला वाटतें. कारण तुम्ही आपली मदत देण्याचें ब्रिटिशाना नाकारलें देखील माहीत—ज्या ब्रिटिशांचा आमच्याशी प्रत्येक प्रकारें विरोध आहे ! परंतु त्यांनी विनंती करताच आपण स्वतःच्या नांवासाठी त्यांना मदत दिलीत—या औदार्याला सीमा नाही ! आता आपण ज्या सर्व प्रकारे विरोधी शत्रूलाही मदत देता ते तुमच्याशी सर्वस्वी स्नेहभावाने वागणाऱ्या पेशव्यांच्या स्नेहाला मदत घाल अशी आशा करण्यास मी अयुक्त कां होअू नये बरे ? शत्रूलाही ज्यांनी घरात घेतले तो मित्राला निदान निराश तरी करणार नाहीच ! पायाखाली तुडविलेले तह, भंगून टाकलेलीं वचनें व हिसकून घेतलेली राज्यें ह्यांच्या जुलमाखाली हिंदुस्थान कमा ग्रस्त झालेला आहे हे अितके विश्रुत आहे की, त्यांचें येथे वर्णन करण्याची जरूरी नाहीं. स्वराज्याप्रमाणेच हिंदुस्थानी लोकांच्या धर्मालाही नष्ट करण्यास अिंग्लिश कसे प्रवृत्त झाले हेंही जगप्रख्यात आहे. यास्तव हें भयंकर आतियुद्ध जुपलेलें आहे व यास्तवच सरकारातून आमचे बंधु श्री.बाळासाहेब पेशवे ह्यांना तिकडे धाडण्यात येत आहे. ते विशेष खुलासा भेटीअंती करतीलच."[७]

या पत्रावर पेशव्यांच्या राजमुद्रेचा छाप दिलेला आहे. हे पत्र गेल्यानंतर पुष्कळ बोलणीं चाललेलीं होतीं. बंडवाल्यांच्या पुढाऱ्यांची प्रत्यक्ष भेट घेण्यास जंगबहादुराने जेव्हा कर्नल बलभद्र हा सरदार धाडला तेव्हा त्यालाही बंडवाल्यांच्या सैन्याच्या प्रमुखानी अेकमताने अुत्तर केलें, "आम्ही हिंदु धर्माच्या संरक्षणार्थ लढतो आहोत. महाराजा जंगबहादुर हाही हिंदु आहे व म्हणून त्यांनी आम्हांस मदत दिलीच पाहिजे." त्याच्या सरदाराने विचारलें, "तुमचा कार्य करण्याचा हेतु काय आहे ?" तेव्हा ते पाडावपक्षाचे प्रतिनिधि म्हणाले, "आम्ही अजून साठ हजारांपर्यंत लढाअू आहोत. जंगबहादुराने अिंग्लिशाना दिले तसे ५० हजार गुरखे शिपाअी आम्हास द्यावे. आम्ही त्याना अिंग्लिशाच्या दुप्पट पगार देअू. तसें नसेल तर आम्हास आपले निवडक सेनानी द्यावे. आम्ही पुन्हा हिंदुस्थानात अुतरतो, थेट कलकत्त्यावर स्वारी करतो व जो जो मुलूख जिंकू तो तो नेपाळच्या राज्याला सामील करतो. तसें नसेल तर निदान त्याने आम्हास या मुलुखात राहण्यास जागा तरी द्यावी." सरदार म्हणाला : "मग ब्रिटिश तसें करीत आहेत तर त्यांना शरण का जात नाहीं ?" शिपाअी म्हणाले "आम्ही राणीचा माफीचा जाहिरनामा वाचलेला आहे व तरवार टेवली तर आम्हापैकीं बहुतेकांस माफी मिळणार नाहींं हेंही आम्हास माहीत आहे. परंतु आमच्या अितर बंधूंना मरणाचे दारी सोडून आम्ही जीव वाचवावा काय ? म्हणून ब्रिटिशास शरण जाणे नाही."

---

७. Charles Ball's Indian Mutiny, Vol. II.

अशीं अनेक बोलणीं होऊनही शेवटी जंगबहादुरने बंडवाल्यांस साफ उत्तर दिलें की, " तुम्हांस मदत देणें असतें तर मी लखनौकडे तुमच्या कत्तली का केल्या असत्या ! ! ! " असें अधम निर्घृणतेचें उत्तर देऊन जंगबहादुराने अिंग्लिशांस परवानगी दिली की, तुम्हीं नेपाळात शिरा व याची खोड मोडा !

तेव्हां सर्वस्वी हताश झालेले शिपाओ शस्त्रें खाली ठेवून आपआपल्या घरी जाऊं लागले. त्याना तसें करण्यास उत्तेजन देण्यासाठी अिंग्रजांनीं पूर्णपणे माफी देण्याचा प्रघात पाडलेलाच होता. जे घराकडे आले नाहीत ते जंगलात उपवास करून मरून गेले ! कोण हा परस्थाचा दुर्दैव ! त्याच वेळेला श्री. नानांचे अेक पत्र ब्रिटिशांचा प्रमुख अमलदार होप ग्रँट ह्याला आलेलें आहे. त्या पत्रात ब्रिटिशाच्या अुपऱ्या सत्तेची व अन्यायाची निंदा करून नाना विचारतात, " What right had you to occupy India and declare me an out-law ?" हिंदुस्थानवर राज्य करण्याचा तुम्हास कोणीं अधिकार दिला ? तुम्ही राजे आणि आम्ही चोर काय ?" बस — हा नानांचा शेवटचा अुद्गार आहे ! नव्हे — हा बाळाजी विश्वनाथाच्या पेशवाओचा शेवटचा निःश्वास आहे ! तप्त, माननीय, बाणेदार, न्याय्य, शिवाजीच्या पेशव्याला शोभेल असाच हा त्याचा शेवटचा निःश्वास होता ! बाजीरावाच्या नामर्दपणाचा कलंक रक्ताच्या शतशत धारांनीं धुवून पेशव्याची गादी चितूरच्या रजपुतानीं प्रमाणेच लढत, झगडत, जळत, देदीप्यमान ज्वालाकल्लोळात आकाशात अंतर्धान पावली — तिची शेवटची किंकाळी — " परके हिंदुस्थानचे राजे आणि आम्ही हिंदुस्थानचीं मुलें हिंदुस्थानात चोर ! "

या पत्रानंतर नानांचें पुढे काय झालें हें अितिहासास माहीत नाहीं. बाळाराव दुसऱ्याने त्याच वेळी त्या रानात स्वर्गवासी झाले. बेगम व ती तरुण राजकुमार ह्यांना नेपाळात राहण्यास परवानगी मिळाली. महान शहीद गजराजसिंग शेवटच्याच चकमकीत ठार झाला.

आणि अशा रीतीने अयोध्येतील बंडाचा शेवट झाला ! आपल्या स्वातंत्र्यासाठी अयोध्या कशी लढली हे तिच्या शत्रूच्या शब्दातच वाचलें पाहिजे. आपल्या देशस्वातंत्र्यासाठी अितक्या टिकेल पराक्रमाने झुंजत राहिलेला देश जगाच्या पाठीवर दुसरा कोणताही नसेल. मॅलेसन म्हणतो · " शिपाओंबधूनीं जें स्वातंत्र्यासाठी बंड पुकारलें होतें त्या बंडात हे अयोध्येचे प्रजाजन सामील झाले. स्वदेश स्वातंत्र्यासाठी लढत राहिले. ते किती दृढनिश्चयाने लढले हेच ह्या पानावर सांगत आहे. अयोध्येने जितका निश्चयात्मक, दीर्घकालीन लढा दिला तितका हिंदुस्थानातील दुसऱ्या कोणत्याही भागाने दिलेला नाहीं. १८५६ मध्ये त्यांच्यावर जे अन्याय लादले गेले, त्यांचीं अंतःकरणे पोलादाचीं बनलीं व त्याच्या कठोर निश्चयाला बळकटी दिली गेली. काही थोड्या प्रसंगी त्यांना जिवावर अुदार होअून माघार घेअून पळून जावें लागले तरी त्यांची ती माघार दुसऱ्या अन्य दिवशी यशाच्या अंतिम आशेनेः

नवीन कुमक व शक्ति मिळविण्यासाठीच होती. आणि शेवटी लॉर्ड क्लाअीव्हने अयोध्येवर शेवटची चढाओ करून अुरल्या सुरल्या प्रतिकार करणाऱ्यांना नेपाळमध्ये आश्रय घेण्यास भाग पाडलें. तेव्हा त्यांतून वाचलेल्या वीरांनी शरणागतीपेक्षा अुपाशी राहून मरण पत्करलें. या दीर्घकालीन चाललेल्या झुंजीत जेव्हा विजयाची आशा दिसेना, तेव्हा अयोध्येतील शेतकरी, तालुकदार, जमीनदार, व्यापारी वगैरेंनी निरुपाय म्हणून पराजय मान्य केला."[८]

* * *

प्रकरण दुसरे

# पूर्णाहुति

ता. २० जूनला ग्वालेरच्या मैदानात झालेल्या घनघोर संग्रामात रणलक्ष्मी लक्ष्मीराणी समरांगणात पतन पावली. परंतु अिंग्रजांचा हा अेक दृढनिश्चयी शत्रु जरी तेथें नाहीसा झाला तरी अजून तितकाच दृढनिश्चयी व त्याहूनही युक्त्या-प्रयुक्त्यांत जास्त, धीटाअीत जास्त असा दुसरा अेक शत्रु मात्र रणांतून निसटलेला होता. तो ग्वालेरच्या रणांतून ता. २० मे रोजी निसटला तो लगेच ता. २२ रोजी जवराअल्लीपूरच्या रणांतूनही निसटला आणि अिंग्रजांच्या टप्प्यांतून पार होअून गेला—पण कोणीकडे ?

## जेथे तेथें तात्या टोपे

थोड्याच दिवसात मध्य हिंदुस्थानातील अरण्यें, गुहा, गाव, शहर, पर्वत सर्व रणाच्या ध्वनिप्रतिध्वनीनें निनादून गेली. जिकडे तिकडे तात्या टोपे ! तात्या टोपे ! ! अशी अेकच आरोळी अुठली.

कारण तो शिकारीच्या भाल्यांनी विद्ध झालेला मराठी वाघ आता मध्य हिंदुस्थानच्या जंगलात मुसंडी मारून घुसलेला होता. ग्वालेरच्या लढाअीत राणी लक्ष्मी पडल्याने त्याचा अुजवा हात जरी तुटला, जरी अनंत पराजयाने बंडाचा बीमोड होत आला, जरी श्रीमंत नानासाहेबांपासून त्याची कायमची ताटातूट झाली होती, जरी अिंग्रजांची सत्ता हिंदुस्थानी लोकांच्या बळावरच पण आता अमोघबला झालेली होती, जरी त्याच्यापाशी अुत्तम सैन्य नव्हतें, तोफा नव्हत्या, पैसा नव्हता, लढाअीची रसद नव्हती, किंवा ती साधने कोठे तरी मिळतील अशी आशाही जर

८. Mallesson's Indian Mutiny, Vol. V, page 207.

जवळ शिल्लक नव्हती तरी अकुंठित धैर्यशाली तात्या टोपे पराजयाला वेडावीत, अडचणींना मागे दवडीत, आजही जरिपटका शत्रूच्या पायापुढे शरणास्पदतेत वाकविण्यासत तयार होओीना. शत्रूपुढे वाकणें ? छे ! छे ! अशा अेका झाडापासून मराठ्याच्या जरिपटक्याची काठी बनविलेली आहे की, ती शत्रूला फारतर मोडता येअील, पण कधीही वाकविता येणार नाही !

## गनिमी काव्याचा रणपंडित

ग्वालेर व जोराअलीपूर येथील पराभवांनंतर अुरलेसुरलें ते सैन्य घेअून तात्या व रावसाहेब पेशवे हे सरमथुरा नावाच्या गावाकडे निघून गेले. आता त्यांनी तीन मुद्द्यावर पुढील सर्व कार्यक्रमाची अुभारणी केली होती. पहिली गोष्ट की, अित:पर अुघड लढाअी सोडून देअून गनिमी काव्याची कास मट्ट रीतीने धरणें व दुसरी गोष्ट की केव्हाही व काहीही झालें तरी अिंग्रजांच्या फौजेशी तोंड देअून कधीही टक्कर न घेणें. परंतु ह्या दोन्ही डावांचा रसद व लढाअू शस्त्रें याशिवाय मुळीच अुपयोग नसल्याने ती मिळविण्याचा मार्ग कसा शोधावा ही सर्वांत महत्त्वाची अडचण होती. तिला टाळण्यासाठी तात्यांनी तिसरा मुद्दा जो ठरविला तो असा की, वाटेत जेथे जेथे नेटिव्ह संस्थान म्हणून लागेल तेथे तेथे खुषीने वा सक्तीने शस्त्राची व पैशाची खंडणी अुकळीत चालणें. अुत्तर व मध्य हिंदुस्थानात पावलोपावली नेटिव्ह संस्थानें वसलेलीं आहेत. त्याच्यापाशी कित्येक दिवस साचत आलेले धनसंचय व शस्त्रसंचय मुबलक आहेत, व ज्या भूमीच्या प्रतिपालनासाठी ज्या राजांना हें भूपालत्व मिळालेलें आहे त्या भूमीच्या सरक्षणार्थ ह्या संचयाचा विनियोग करणे हें त्यांचें कर्तव्य आहे. परंतु ५७ साली त्यांची ती भूमि व त्यांची प्रजा याच्या अंतरिच्छेला व दुःखाला न जुमानता हे राजे आपल्या स्वत:च्या व्यक्तिविषयक फायद्याची तुंबडी कोणीकडून भरेल अशा पापी विचाराने वडवाल्यांस अुघडपणे मिळत नव्हते. तेव्हा त्यांच्यापाशी निकडीचे वेळी आपल्या अुपयोगी पडावी म्हणून भूमीने राखलेली धान्याचीं व शस्त्राचीं भांडारें असूननसून सारखीच झालीं. ते पैशात लोळत असता स्वातंत्र्यसमराच्या दारिद्र्याने देशमाता व देशभक्त मात्र अुपाशी राहू लागले. अशा स्थितीत ह्या विश्वासघातकी भांडारकरांना अुत्तम धडा शिकविण्यासाठी व देशाच्या निढळाच्या घामाने जे पैसे साचविलेले होते ते देशाच्याच सरक्षणार्थ खेचून घेण्यासाठी तात्या व राव यांनी ही यथान्याय्य व अजब चिनतोड सोड काढलेली होती. ह्या योगाने क्रांतीला पैशाचा व रसदीचा पुरवठा मुबलक मिळण्याचा संभव असतो. देशांतील गरीब प्रजेवरच सैन्य पोसण्याचा बोजा पडत नाही. ह्या दुबळ्या व मिजासखोर संस्थानिकाजवळ सैन्य जय्यत तसेंच असल्याने व तें सैन्यही बहुतेक वेळा क्रांतीलाच अनुकूल असल्याने त्यांना दटावून पैसे अुकळण्यास विशेष त्रास पडत नाही. संस्थानें पावलोपावलीं असल्याने सैन्याबरोबर.

रणदेवें या मामानाचें ओझें वाळगण्याची मुळींच जरूर रहात नाहीं व सैन्य मुठ-मुठीनें राहून टप्पाटप्प्यावर ह्या राजाच्या परी असलेली शिधासामग्री, रणसामग्री व धनसामग्री फार व्यवस्थित रीतीनें मिळणारी असते. अगास्तव तात्यांनीं अितःपर मुलूख रणदेवीं हीं सामग्री पैसें अुपयोगात आणण्याची पद्धति स्वीकारली. ते गुप्तीनें कर्तव्य म्हणून देशमेनिकाम मदत देतील तर ठीकच, न देतील तर सक्तीनें देणें त्यांना भाग पाडलें तरी ठीकच. ह्या तीन मुद्यांवर तात्यांनीं मांडलेलें अत्यंत विस्मयकारक रणताडव सर्वस्वी रचलेलें होतें. गनिमी कावा, टक्कर केव्हांही न घेणें व संस्थानिकांना युक्तीनें या सक्तीनें स्वातंत्र्य समरात गुंतवून टाकणें.

परंतु असल्या विषम स्थितीत कोणत्याही मानुषी प्रयत्नांना फार दिवस दम धरणें अशक्य आहे असें अिंग्रजांना साहजिकच दिसत असल्यामुळे त्यांनीं जोरा अलीपुराहून तात्या पळून जाताच निकराचें वेड संपलें असें गृहीत धरलें व आपलीं सैन्यें तात्याला सुमनें कोंडून महिन्या दीड महिन्यात मरण आणण्यासाठीं चहूबाजूंनी विभागून ठेवलीं. ग्वाल्हेर, झांशी, सिप्री व गुणा येथील फौजांनीं सर्व बाजू रोखली व राजपुतान्यात रॉबर्टनें आपली सेना पसरली. ह्या अिंग्रजी सेनेच्या व्यूहातून आता तात्या टोपे कसा सुटू पहात आहे बरें ?

तात्यांचा पहिला डाव भरतपूरवर होता. परंतु तिथे अिंग्रजी लष्कर आणलें आहे असें कळताच दुसरा फासा जयपूरला फेकला. ह्या जयपूरच्या दरबारात तात्याच्या पक्षाचे पुष्कळ लोक असून तेथील राजाचें सैन्य व शहरातील प्रजाही तात्यास अनुकूल झालेली होती. तेव्हा तात्यानें आपले दूत तेथे धाडून सज्ज रहाण्याची त्यांना सूचना दिली. परंतु ही वार्ता अिंग्रजांना त्वरित कळल्यामुळे नसिराबादेहून निघून अिंग्रजी सैन्य तावडतोब जयपूरला जाऊन अुतरलें. जयपूरचा बेत ढासळताच, तात्या दक्षिणेकडे अुतरला व त्याच्या पाठीशीं कर्नल होम्स हा ससैन्य लागला. अितक्यात तात्यानें हुलकावणी घेअून नीट जी चाल घेतली ती अेकदम टोंक संस्थानावरच होस. तेथील नवाबानें शहराचीं दारें लावलीं व बाहेर आपले निवडक सैन्य चार तोफानिशी तात्यावर लढावयास धाडून दिलें. आता लढाअीला तोंड लागणार तों टोंकचें सैन्य तात्याच्या सैन्यास बंधुप्रेमानें आलिंगू लागलें ! त्याच्या चार तोफाही त्यानी तात्यास अर्पण केल्या व अशा रीतीनें हें नवें सैन्य व नवीन तोफा घेअून तात्याची स्वारी पुन्हा दक्षिणेकडे चालली—आणि अिंद्रगडपर्यंत दक्षिणेकडे येअून तात्या थांबला. आता त्याच्या मागे होम्स व बाजूनें रॉबर्टस् हे धावत होते. ह्या दिवसात पावसाची वृष्टि अतोनात होती व चंबळ नदी दुथडी भरून राहिली होती. तेव्हा मागे प्रबळ शत्रु व पुढे अपार चंबळ पाहून तात्या नैर्ऋत्येकडे बुंदीच्या रोखानें वळले. ह्या बुंदी संस्थानचा राजा बंडवाल्यांस पूर्वी फारसा प्रतिकूल नव्हता, तरी आता अिंग्रजी सैन्य अगदीच पाठीशीं लागल्यानें त्यानें बुंदीचे दरवाजे बंद केले. हें पाहताच तात्या वाकडे तिकडे वळणें घेअून नीमच व नसिराबाद ह्या बड-

सोर प्रांताच्या दरम्यान येऊन थडकले. आपण नीट दक्षिणेकडे जाणार आहोत अशा भापेने अिंग्रजांना चकविले असल्यामुळे तात्या भिलवाड्याजवळ स्वस्थपणें अुतरलेले होते. हे अैकताच सरवरगावाहून रॉबर्ट तिकडे धावत आला व ता. ७ ऑगस्टला तात्याच्या सैन्यावर तो तुटून पडला. त्याला त्या दिवसभर दटावीत दटावीत रात्र पडताच तात्याने आपल्या सैन्यासह व तोफांसह सुरक्षित रीतीने अुदयपूरच्या हद्दीतील कोटरा गावापर्यंत कूच केलें. तेथें त्याचें सैन्य अुतरलें असता त्या दिवशी रात्री तात्या टोपे हे जवळच असलेल्या नाथद्वारा नांवाच्या हिंदुक्षेत्री श्रीकृष्णाच्या दर्शनास गेले. तेथून मध्यरात्री परत येताच त्यास वार्ता लागली की, अिंग्लिश लोकांचें सैन्य अगदी नजीक आलेलें आहे. ह्यासाठी त्यांनी सैन्यास तेथून हलण्याचा हुकूम दिला, परंतु पायदळानें साफ कळविलें की, सतत प्रवासानें सैन्य अगदी हलण्यास समर्थ नाही. घोडेस्वारानी पाहिजे तर पुढे चालू लागावें. अशी स्थिति झाल्याने लढाअी देणेंच तात्यांना भाग पडलें.

दुसऱ्या दिवशी म्हणजे ता. १४ ऑगस्ट रोजी तात्यांनी नदीला आपल्यापुढें घालून सैन्याची शक्य तितकी बळकट रचना केली व जिकडून शत्रु येणार त्या मैदानावार तोफांचा माराही रोखला. रॉबर्टसने आपलें नेटिव्ह व अिंग्रजी सैन्य त्या माऱ्याला सोसूनही नदीत आणलें व तीर चढून तें तात्याच्या अुजव्या बगलेवर तुटून पडलें. तेव्हा हातघाअीनंतर जास्त नुकसान सोसणें अशक्य झाल्याने तात्याची सेना तोफा टाकून पळाली व सुमारे १५ मैलपर्यंत हटत हटत निघून गेली. आता तात्यापाशी पुन्हा तोफा अुरल्या नव्हत्या. तेव्हा तो पाठीच्या शत्रूला झटका देअून चवळ नदीकडे पुन्हा निघाला. अिंग्रजी लष्करही मागे धावलें. मागेच नव्हे तर त्याच्या बाजूनेही अिंग्रजी लष्करें बरोबर सामोरीं आली. तरी कोणास खोट्या अफवेने, तर कोणाला वेगळ्या गतीने हटवून तात्या चवळेला येअून धडकला. फक्त काही तासाच्या अंतरावर पार्क हा तात्याची वाट पहात दबला होता. त्याच्या हातावर तुरी देअून तात्या अिंग्रजाच्या छातीवरून असेर चवळ अुतरून पार झाला!

आता अिंग्रजाच्या व तात्याच्या मध्ये चवळ आडवी पडली खरी परंतु आता तात्यापाशी तोफा राहिल्या नव्हत्या, पैसे राहिले नव्हते, रसद राहिलेली नव्हती. तात्याचा पूर्ण पराभव झालेला होता व म्हणूनच तात्या चवळ अुतरताच नीट जो चालून गेला तो अेकदम झालारपट्टणवर होय त्या संस्थानचा राजनिष्ठ अधिपति काही नामर्द नव्हता त्याने आपले विश्वासू सैन्य व जंगी तोफखाना पेटवून विनतोफी तात्याशी लढाअी माडली. पण त्या दिवशी मात्र त्या संस्थानची सर्व फौज तात्यालाच मालक म्हणून सलाम करू लागली ! तावडतोब त्या संस्थानिकाच्या फौजेला तात्याने मिळवून घेतलें. तेथील घोडे, तेथील गाड्या, मुबलक रसद तात्याच्या पायापुढे अर्पिली गेली व त्या बिनतोफी तात्याला आता ३२ तोफा मिळाल्या. रावसाहेब पेशव्याचा हुकूम सुटला की, त्या राजाने २५ लक्ष रुपये खंडणी दिली.

पाहिजे. राजाने भेट घेऊन फारच गयावया केल्यावर १५ लक्ष रुपये खंडणी ठरविण्यात आली. ह्या शहरी तात्यांचा ५ दिवस मुक्काम होता. त्यांनी आपल्या फौजेस घोडेस्वारामागे ३० व पायदळामागे १२ रुपये महिन्याचा पगार वाटून दिला. व ते रावसाहेब, तात्या टोपे व बांदाचे नबाब हे बंडवाल्यांचे तीन प्रमुख पुढारी भावी कार्यक्रमाचा थोडासा विचार करू लागले.

पेशव्यांच्या सैन्याचा सगळा रोख नर्मदा उतरून दक्षिणेत घुसण्याचा होता. ज्या भूमीत त्यांच्या पूर्वजांची प्राचीन देहरक्षा रहात होती त्या भूमीत एकदा का तात्याने पाय आपटला की त्या आवाजानेच मृताचे आत्मे सजीव होतील व मराठ्याचा रणगर्ज पुन्हा प्रचंड कडकडाट करू लागेल अशी त्याना बळकट आशा होती. म्हणून हुलकावण्या देत देत कधी तरी नर्मदा उतरावी ह्यासाठी वडवाले झटत होते. आणि नर्मदा त्यांना उतरू देणें नाही ह्या तितक्याच दृढ प्रतिज्ञेने इंग्रजांची तमाम सैन्यें ठिकठिकाणी नाकीं धरून बसलेलीं होतीं. विनतोफी तात्याला आता ३२ तोफा, नवीन सैन्य, नवीन रसद, नवीन पैसा मिळालेला असल्याने नवीन दम आलेला होता. व म्हणून तो हळूच म्हणू लागला की आता अिंदूरचा फासाच फेकला पाहिजे !

ही कल्पना तात्याच्या धाडसाला साजेल अशीच होती. ज्याने ग्वाल्हेरच्या रणभूमीवर तो अद्भुत नाटकी देखावा घडवून आणला त्या तात्याला आता अिंदूरच्या होळकरांचें सिंहासनही पोखरणें का कठीण असावें ? होळकराने त्याच्या धाडसाच्या कार्यास मदत करणें हें त्याचें कर्तव्य आहे. ते तो करीत नसेल तर पेशवे अिंदूरवर स्वारी करून जातील ! होळकरांची सेना तात्यास बोलावीत होती, होळकराचा दरबार तात्यास बोलावीत होता, तेव्हा मग त्या महाधाडसी तात्याने मनात ठरविले की आता पुढचा रोख अिंदूरच होय ! आणि तात्याच्या मनात जें असेल ते बोलण्याच्या आधीच केलें जावयाचें. तडफेने तो पट्टणहून दक्षिणेकडे धावला व माळव्यात घुसून राजगड गावाला येऊन थडकला !

आता रॉबर्ट, होम्स, पार्क, मिचेल, होप, लॉक, हार्ट ह्यांच्या नेतृत्वाखालील अितकीं भिन्नभिन्न अिंग्रजी सैन्यें, भिन्नभिन्न दिशांनी तात्याच्या पायात लडबडत होतीं. त्या सर्वांची तात्या अिंदूरकडे पळालेला पाहताच अेकच त्रेधा अुडाली. कोणी अुज्जयिनीला आला, कोणी महूहून सरकला, कोणी तळखेड्याकडे धावला, कोणी राजगडाकडे गेला. मेजर जनरल मिचेल हा आपल्या सैन्यासह मजला मारीत मारीत अेका अुचवट्यावर चढतो तों त्यास समोरच तात्या टोपे अुतरलेला दिसला. पण त्याची मजला मारता मारता अशी रग जिरली होती कीं, वाटेत घोडे मरून पडावेत. तेव्हा तो ती रात्र विसावा घेऊ लागला. तात्याही नुकताच तेथे आलेला होता. तरी अिंग्रज सेनेच्या दमण्याचा फायदा घेऊन तेथून तो रातोरात ससैन्य पसार झाला. सकाळीच मिचेलही त्याच्या पाठीवर अगदी लगटत चालला. तेव्हा वडखोर

जाणून लढाईस प्रवृत्त झाले. ह्या वेळेस त्यांची संख्या जवळ जवळ ५–६ हजार तरी होती व त्यांच्या जवळ उत्तम प्रकारच्या तीस अेक तोफा होत्या – परंतु अत्यंत आश्चर्याची गोष्ट की अिंग्रजाची हजार बाराशे फौज अंगाशी भिडताच रक्ताचा अेकही सडा पडण्याच्या आधीच बडवाले त्या तोफाही टाकीत टाकीत पळू लागले !! येथे तात्यांच्या व कुंवरसिंहाच्या गनिमी काव्यातील महत्त्वाचा फरक आढळून येतो.

अिंग्रजांशी काही झालें तरी टक्कर म्हणून देणें नाही ह्या मुद्द्याला फायदेशीर प्रसंगीही न सोडता तात्यांचें सैन्य राजगडच्या मैदानातून निघून बेत्वा नदीच्या अरण्यात घुसलें व तियून सिरोज ह्या गावी बाहेर पडले. सिरोजमध्ये तात्यांना पुन्हा चार तोफा मिळाल्या. व अिंग्रजी सैन्यें पावसाच्या अतिवर्षावाने खिळून टाकली गेल्यामुळे थोडासा विसावा घेण्यास मिळाला. अिंग्रजाच्या सतत पाठलागाने भागलेल्या सैन्यास तेथे आठ दिवस विश्रांति घेण्याचा तात्याने हुकूम सोडला होता. हे आठ दिवस संपताच ते सैन्य त्वरेने वर अुत्तरेला चढलें व शिंदाच्या मुलखातील अिसागड हे ठाणें मारून तात्याने आणखी नव्या आठ तोफा मिळविल्या. परंतु नर्मदा जवळ होण्याच्या अंवजी दिवसेंदिवस दूर चालली. अिंग्रजांच्या शिकारी भाऱ्याच्या कडेकोट कुंपणाने त्याच्या नैसर्गिक गुहेत पुन्हा काही तात्या शिरू शकत नाही हे अुघड झालें अिंग्रजही आता तात्याला नर्मदा पार होअू देणार नाही.[१]

---

१. An English writer says, "Then commenced that marvellous series of retreats which continued for ten months, seem to mock at defeat, and made Tatia's name more familier to Europe than most of our Anglo-Indian generals. The problem before him was not an easy one. He had kept together an army of beaten Asiatics bound by no tie to his person and bound to each other only by one common hate and one common fear—hate of the Britisher's name and fear of the British gallows. He had to keep this ill-assorted army in constant motion at a pace which should baffle not only the enemies who pursued him but the enemies who streamed down at right angles to his line of march. He had while thus urging his half-disciplined host to mad fiight to take some dozen cities, obtain fresh stores, collect new cannons and above all induce recruits to join voluntarily a service which promised only insistant flight at sixty miles a day. That he accomplished these ends with the means at his disposal indicates ability of no mean kind. Slightly we may hold the marauding leader,

(टीप पुढील पानावर चालू)

आता संडवाल्यांनी दोन सैन्यें करून अेक रावांच्या हाताखाली व अेक तात्याच्या हाताखालीं आलें. अशाच कित्येक हुलकावण्या दिल्या, तोफा गमावल्या, मंग्रोली, छिंदवाडा वगैरे लढाया भाग म्हणून दिल्या. थोडी झुंज व हातघाशी होताच बारा बारा मैलांच्या पाठलागातही निसटून जावें. अखेर ललितपुराला हे दोघे पुढारी पुन्हा अेकत्र झाले. पण नर्मदा काही जवळ होअीना ! अिंग्लिशाच्या आनंदाला व बंदोबस्ताला पारावार नव्हता. दक्षिणेकडून मिचेल, पूर्वेकडून व अुत्तरेकडून कर्नल लिडेल व मीड, पश्चिमेकडून कर्नल पार्क, चंबळे जवळून रॉबर्ट, तात्याच्या सर्व बाजूंना शत्रूच्या भिन्न भिन्न सैन्याचें अत्यंत आकुंचित वर्तुळ दरक्षणी मिटत येत होतें. पण राव व तात्या अेकमेकाशी काही वेळ बोलले व अेकदम कजूरीला आले, तेथे बेटवेवर अिंग्रज आहेत हें पाहताच पुन्हा जंगलात घुसले. हुलकावणी देण्यास ताल बहुतपर्यंत अुत्तरेकडे चढले आणि मग जी अेकदम मुसंडी मारली ती बेटवा अुतरून अिंग्रजांशी कजुरीशी लढून, रायगडाशी टक्कर घेअून तात्या थेट दक्षिणेकडे चालला. पायात लटवडणारीं अिंग्रजाचीं सैन्यें भराभर हिसडीत, हिसकावीत, घाट ओलांडत, नद्या अुतरत, अरण्यें पार होत, मराठी वाघ दवत, लढत, अुडचा येत दक्षिणेकडे चालला ! पार्क बाजूनें धावला मिचेल मागून धावला, बेकर पुढून धावला. पण तात्या टोपे तरी दक्षिणेकडेच चालला ! भिडला नर्मदेला, अुतरला नर्मदेत—स्तिमित जगानें टाळी पिटली की, तात्या झाला अखेर नर्मदा पार ! मॅलिसन म्हणतो,

" It is impossible to withhold admiration from the pertinacity with which this scheme was carried out ! ! ! "

ता. १७ जानेवारी १८५९ च्या टाअिम्सनें लिहिलें आहे की,

' Our very remarkable friend, Tatia Tope, is too troublesome and clever an enemy to be admired. Since last June he

---

(टीप मागील पानावरून चालू)

he was of the class to which Haider Ali belonged and had he carried out the plan attributed to him and penetrated through Nagpur to Madras he might have been as formidable as his prototype. As it was the Narbada proved to him what the channel was to Napoleon. He could accomplish anything except cross the stream. These columns which moved at first as slowly as British columns are accustomed to move, learnt to march at last and some of the later marches of Brigadier Park and colonel; Napier were equal to half of Tatia's average rate. Still he escaped, and through the hot weather and the rains and the cold weather and the hot weather again, he was still flying sometimes with two thousands dispirited followers and sometimes with fifteen thousand men ! "
— From 'The Friend of India.'

has kept central India in a fervour. He has sacked stations, plundered treasuries, emptied arsenals, collected armies, lost them, fought battles, lost them, taken guns from native princes, lost them; then, his motions were like forked lightning; and for weeks, he has marched 30 and 40 miles a day. He has crossed the Narbada to and fro He has marched between our columns, behind them, and before them. Ariel was not more subtle, aided by the best staged mechanism. Up mountains, over rivers, through ravines and vallies, amidst swamps, on he goes, backwards and forwards, sideways and zig-zag ways, now falling upon a post-cart and carrying off the Bombay mail, now looting a village, headed and burned yet evasive as proteus."

अखेर मराठ्यांचें सैन्य दक्षिणेत अुतरलें ! हुशंगाबादेजवळ नर्मदा अुतरून तात्या ससैन्य नागपुराकडे भिडला आहे ही बातमी अैकताच तिन्ही अिलाख्यांत, सर्व युरोपात व थेट युरोपखंडापर्यंत जो तो शत्रुसुद्धा अुद्गारू लागला 'वा, तात्या, वा !' व महाराष्ट्र त्याच्या सानिध्याचीच वाट पहात होते ! हैद्राबादचा निजाम, मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड हॅरिस, मुंबअीचा लॉर्ड अेलफिन्स्टन, कलकत्याचा लॉर्ड कॅनिंग, तत्क्षणी थरारून अुठले. तात्याने असा, रणचंडीवर फारच अपूर्व असा फासा फेकला. पण आता वेळ निघून गेलेली होती. अेक वर्षापूर्वी ह्या नर्मदातरणाचा अुपयोग झाला असता. आज १८५८ च्या आक्टोबर मध्ये ही रणचपलता फक्त कौतुकाला कारण आहे. अुपयोगाला वा जमाला नव्हे ! जिकडे तिकडे वडाचे निर्बीज झालेले होतें व आता राष्ट्र भयंकर रक्तस्रावाने शिथिलगात्र व विमूढसत्व झालेले होते ! त्यातूनही अुत्तर हिंदुस्थानात व राजपुतान्यात तात्याला व त्याच्या सैन्याला गावोगावचे लोक फुकट धान्य व रसद आपण होअून देत व त्याच्याकडे देशभक्ताच्या पूज्यतेने पाहत. परंतु नागपूरला खुद्द मराठ्यांच्या प्रदेशात लोक त्याला भिअू लागले. कुलकलंकिणी बाकाबाअीच्या राजनिष्ठेचे हेच फळ असावयाचें ! तेव्हा तात्या ह्या नदीतरणानंतरही विफलहेतु होअून अखेर थावला.[2] आता त्याच्या

२. मॅलेसन आपल्या Indian Mutiny Vol V, page 238-240 वर लिहितो, "It was accomplished. The nephew of the man recognised by the Mahrattas as the heir of the last reigning Peshwa was on the Mahratha soil with an army. The Nizam was loyal. But the times were peculier, Instances had occured before, as in the case of Scindia, of a people revolting against their sovereign, when that sovereign acted in the teeth of the national feeling. It was impossible not to fear lest the army of Tatia should rouse to arms the entire Mahratta population and that spectacle of a people in arms against the foreigner might act with irresistible force on the people of Dekhan."

समोर निझामचें राज्य पसरलें होतें. हैद्राबादेला नीट चालून येण्याविषयी तेथील शातिपक्ष अुत्सुकलेला होता.

अिकडे पुणें ते खानदेशकडील अिंग्रजांचीं सैन्यें भराभर दौडत दशदिशांनी धावलीं. मेलघाट, असिरगड, खानदेश, गुजरात, नागपूर आदि सर्व बाजूंनी अनेक आंग्ल सेना दक्षिणचा दरवाजा बंद करीत पुढे घुमल्या. तरी अकुंठितधैर्य तात्याने आणखी अेक विलक्षण धाडसाचा फासा फेकण्यास आरंभ केला. दक्षिणेकडे अिकडून बंदी झाल्यामुळे तात्याने अेकदम जो रोख धरला तो थेट बडोद्यावरच होय ! आग्रा रोड ओलांडून, अिंग्रजाच्या डाक गाड्या लुटून, तारा तोडून टाकून, वरील सर्व अिंग्रजी सेनानींच्या कचाट्यातून हुलकावण्या देत तात्या नर्मदेच्या मुखाकडे चालला. चालून जशी ही अिंग्रजी सैन्यें वर येत होतीं, तशीच तात्याच्या मागोमाग अुत्तरेचीं तीं हिरमुसलेलीं ब्रिटिश सैन्येंही तात्या नर्मदा अुतरताच आपणही नर्मदा अुतरून कोंडी करीत अुतरत होतीं. नर्मदेच्या तीरावरील सर्व किल्ल्यांवर अिंग्रजांनी सक्त पहारा ठेवलेला. तरीही तात्या नर्मदा पार होण्यासाठी करगूण येथे पोचला. तेथे त्याला अिंग्रजांचा सेनापति मेजर संडरलँडला तोंड द्यावें लागलें. सेना भिडल्या लढाअी चालू झाली, लढाअी येन रंगात असतानाच तात्यानी आपल्या सैन्याला आज्ञा दिली की, गोळीबार बंद करा आणि नर्मदेत अुड्या घ्या ! त्याप्रमाणे तात्याच्या अनुयायांनी त्याच्या मागोमाग नर्मदेत अुड्या फेकल्या आणि काय झालें हे अिंग्रजांना समजायच्या आत तात्या त्याच्या अनुयायासह नर्मदा पार झाले !

हा प्रसंग म्हणजे आजपर्यंतच्या लढाअीच्या अितिहासातील अेक अतुलनीय व नवें आश्चर्य समजला जातो. मॅलेसन स्पष्टपणे लिहितो " आता बंदुका गेल्या, त्याचे शिपाअी अत्यंत शीघ्र वेगाने पुढे निघून गेले. ह्या कलेत नेटिव्ह सैनिकांना कोणीही हरवू शकलेले नाही. मी म्हणतो की, जगातील कोणतेंही सैन्य त्याची बरोबरी करू शकणार नाही. असा धोका असताना तात्या थेट बडोद्याकडे निघाले, तेथील दरबारात आणि सैन्यात नानासाहेबाच्या पक्षाचे अनेक लोक होते व ते तात्याचीच वाट पहात होते. तात्या राजपुराला गेले. तेथे त्यांनी घोडे आणि पैसे मिळविले. दुसऱ्या दिवशी त्यांनी छोटा अुदेपूर गाठलें तेथून बडोदा आता केवळ ५० मैल दूर आहे ! "

आणि त्या पन्नास मैलातच अिंग्रजानी त्याचें सैन्य पेरून ठेवलें आहे ! तात्याच्या चारी बाजूनी अिंग्रजी फौज त्याचा पाठलाग करीत होती. तात्याच्या आधीच पार्क छोटा अुदेपूरला पोचला होता. त्यामुळे बडोद्याचा बेत रद्द करून तात्या त्याच्या सैन्यासह अुत्तरेला वळून बासवारा जंगलात घुसला. तेथील बांदयाच्या नवाबाने राणीच्या जाहिरनाम्याच्या काडीचा आधार घेअून शस्त्रें खाली ठेवली होतीं. त्यामुळे तात्याची व रावसाहेबांची मोठीच पंचाअीत झाली. ते दोघेही गूर बाप असा कोंडीत अडकले की, जी फोडणें अशक्य होतें. दक्षिणेस दुथडी वाहणारी

तात्यांच्या मानेवर अेकाअेकी हात पडला ! तो हात अिंग्रजाचा होता. छावणी अिंग्रजांनी भरून गेली होती आणि ते हर्षभराने ओरडत होते ' पकडला ! तात्याला पकडला ! ! ' पण तेवढ्यात त्यांना त्याचे शब्द बदलावे लागले ! ते आश्चर्याने ओरडू लागले, " अो ! तात्या आता येथे होता ना ? पळा ! शिपायांनो, पळा तात्याला शोधून काढा. तात्या गुप्त झाला, तात्या पळाला ! "

रावसाहेब, फिरोजशहासह तो जादूगार तात्या ता. २१ जानेवारी रोजी अलवार जवळील शिखर येथे दृष्टीस पडल्याची वार्ता आली. सेनापति होपची बंडवाल्यांशी चकमक झडून ते पराभूत होअून पळाल्याची माहिती देण्यात आली. शिवरच्या ह्या पराभवाने काही क्रांतिकारकांची विजयाची आशा नष्ट झाली नाही. कारण ती फार पूर्वीच नष्ट झाली होती– पण त्यामुळे ह्यापुढे प्रतिकार चालू ठेवणे अशक्य ठरले. वर्षाचा वेत फसल्यापासून तात्या अेकसारखे गनिमी काव्याने लढत पळतच होते. लढाअीच्या तंत्राविषयी तात्या व रावसाहेब यांचा विचारविनिमय होतच होता. तात्या आता थकले होते. त्यांनी रावसाहेबांचा व सैन्याचा निरोप घेतला. बरोबर दोन घोडे, अेक तट्टू, दोन ब्राह्मण आचारी, अेक गडी येवढा लवाजमा घेअून तात्या ग्वालेरच्या सरदार मानसिंगाकडे गेले. मानसिंग त्या वेळी पारोनाच्या जंगलात लपलेला होता. तो तात्यांना म्हणाला " आपण सैन्याला सोडून आलात हे बरें नाही. " त्यावर तात्या म्हणाले, " तें बरें ठरो वा वाअीट ठरो, मी आता तुझ्याकडे राहणार आहे. धावपळीने मी अगदी थकून गेलो आहें. " तात्या मानसिंगाकडे आहे हें कळताच अिंग्रजांनी लढाअीचा मार्ग सोडून फितुरीचा डाव टाकण्याचें ठरविले. त्यांनी मानसिंगाला गाठलें व त्याला आश्वासन दिले की, तात्याला पकडून देण्यात मानसिंगाने मदत केल्यास त्याला शिंद्यांकडून माफी केली जाअील अितकेच नव्हे तर नाखारची जहागीरही मिळेल. मानसिंगाने पूर्वी त्याच्या काकालाही अिंग्रजाच्या स्वाधीन केले होते. मानसिंग तात्यांना म्हणाला, ' मी अिंग्रजांना शरण जात आहे. " पण तात्यांना तो शरणागतीचा विचारही शिवला नाही. फिरोजशहाचें आलेलें निमंत्रण दाखवून तात्यांनी मानसिंगाला विचारले, " मग मी जावू का येथेच राहू ? " विश्वासघातकी मानसिंगाने अुत्तर दिलें, " थोडा वेळ वाट पहा, लवकरच मी आपणाला काय ते कळवीन. मी परत येअीपर्यंत माझा हा वाटाड्या घेअून जाअील तेथे आपण लपून रहा. " मानसिंग अिंग्रजाना शरण गेला होता तरी त्याच्यावर तात्याचा विश्वास होता. म्हणून ते मानसिंगाच्या वाटाड्यासमवेत गेले आणि त्याने दाखविलेल्या स्थळी विश्रांतीसाठी राहिले. तिमन्याच दिवशी मध्यरात्री, अनेक रणांगणात व चकमकीत अिंग्रजाना नामोहरम करणारा, हजारो मैलांची दौड करून अिंग्रजाना दमविणारा तो मराठी वाघ, तात्या, अेका देशघातक्याच्या विश्वासघाताने, झोपेत असतानाच पकडला गेला ! ! तात्यांनी डोळे अुघडले तेंव्हा त्यांना समजलें की, आपण अिंग्रजाचे कैदी झालो आहोत !

तो दिवस ७ अेप्रिल १८५९-चा होता. विश्वासघाताच्या सापळ्यात तात्या अडकला. दुसऱ्या दिवशी सकाळीच जनरल मीडच्या सिप्री येथील छावणीत त्याला कडक बंदोबस्तात ठेवण्यात आलें. तेथें त्याच्यावर कोर्टमार्शल भरण्यात येअून अिंग्रजा-विरुद्ध युद्ध पुकारण्याचा आरोप तात्यावर ठेवला गेला. बुधवारी त्या आरोपाना अुत्तर देताना तात्याने सांगितले कीं, "मी जें जें कृत्य केलें तें तें माझ्या मालकांच्या हुकमाप्रमाणे केलें. काल्पीपर्यंत मी नानासाहेबांच्या हुकमाप्रमाणे वागलो, व त्या-नंतर रावसाहेबांच्या. न्यायानुसार दिलेली लढाअी व चकमकी सोडून, मी अथवा नानासाहेबांनी अेकाही युरोपियन पुरुषाचें, स्त्रीचें वा बालकाचें निरर्थक रक्त सांडलें नाही अथवा कोणाला फासावर चढविलें नाही. ह्या पलीकडे ह्या खटल्यात मला अधिक काही सांगावयाचें नाही." अिंग्रजांच्या विशेष विनंतीनंतर तात्यांनी क्रांतीच्या प्रारंभापासूनची विश्वसनीय, महत्त्वाची व थोडक्यात तारखेनुसार माहिती दिली आणि ती अिंग्रजांच्या मुनशीने लिहून घेतली. ह्या रोजनिशीवर आणि वर दिलेल्या आपल्या कबुली जबाबावर तात्याने वळणदार अिंग्रजी अक्षरात Tatia Tope अशी सही केलेली आहे. विचारलेल्या सर्व प्रश्नांना तात्यांनी हिंदीत अुत्तरे दिली. तीं अुत्तरें थोडक्यात, सरळ व खणखणीत होती. त्यांना अिंग्रजीत कोणी प्रश्न विचारला तर तात्या गंभीरपणे अुत्तर देत 'मालूम नाही.' तीन दिवस तात्याची चौकशी चाल-लेली होती. नेटिव्ह लोकांचे थवेच्या थवे तात्याना पाहण्यासाठी लोटत असत; पण सर्वांनाच परवानगी मिळत नव्हती. ज्याना तात्याना पाहण्याची परवानगी मिळे ते भक्तीने व प्रेमाने त्याना वंदन करीत. अिंग्रजांनी जेव्हा त्याना कळविले की, "तुमची न्यायालयीन चौकशी चालू होअील. आपल्या बचावासाठी पुरावा गोळा करा." तेव्हा तात्यानी अुत्तर दिलें. "मी पूर्णपणे जाणून आहे की, ब्रिटिश सत्ता अुखडून देण्या-साठी मी लढलो असल्याने मला मृत्यु पत्करावा लागणार आहे. त्यासाठी मला कोणत्या न्यायालयाची आवश्यकता वाटत नाही आणि त्याच्या कोणत्याही काम-काजात मी भागही घेणार नाही." हातबेड्यानी जखडलेले आपले हात अुंच करून तात्या पुढे म्हणाले, "ह्या हातकड्यातून मुक्त होण्याची अेक आशा आहे. तोफेच्या तोंडी किंवा फाशी जाअून मी ह्यातून सुटू शकेन. पण मला अेक गोष्ट सांगावयाची आहे. माझ्या ग्वालेर येथे राहणाऱ्या वडिलांचा आणि माझ्या कुटुंबियाचा माझ्या कोणत्याही कृत्याशी काही संबंध नसल्याने, माझ्या ह्या कृत्यासाठी माझ्या वृद्ध वडिलांना वा कुटुंबियाना त्रास देअू नये.

चौकशीचें नाटक संपले. तात्याना फाशीची शिक्षा सुनावण्यात आली. आणि दुपारी चार वाजता त्याना फाशीकडे नेण्यात आले. त्यांच्या भोवती तिसऱ्या बंगाल—युरोपियन पलटणीचा पहारा होता फाशीच्या स्थानी तात्या पोचले तेव्हा ते सैनिक त्यांच्या भोवती चतुष्कोण करून अुभे राहिले. त्याच्यामागे नेटिव्ह पायदळ, ३ गोरे घोडेस्वार व अनेक प्रेक्षक अुभे होते. खेडेगावातील अनेक शेतकरी तात्यांना

पाहण्यासाठी जमलेले होते. तात्यांनी पुन्हा विनंती केली की, आपल्या वृद्ध वडिलांचा छळ करण्यात येऊ नये. आणि शिक्षा सुनावण्यात आली. तात्यांच्या पायांतील बेड्या काढल्या व तात्या शूरासारखे मरळ पावले टाकीत फाशापर्यंत गेले. सरळ शिडी चढून वर फळीवर उभे राहिले. जणू काय ते सभास्थानी स्वागतार्थ उभारलेल्या व्यासपीठावरच चढत होते. रिवाजाप्रमाणे जेव्हा फाशी देणारे मांग तेथे तात्यांचे हात व पाय बांधण्यासाठी पुढे सरसावले तेव्हा तात्या स्मित हास्य करून, " ह्याची काही आवश्यकता नाही " असे म्हणाले आणि लगेच त्यांनी स्वतःचे हातांनीच तो फास अेखाद्या हाराप्रमाणे आपल्या गळ्यात घालून घेतला. फळी दूर झाली! फास आवळला गेला! आणि त्या हिसक्यासरशी—तात्या टोपे, पेशव्यांचा अेकनिष्ठ सेवक, १८५७ च्या स्वातंत्र्यसमराचा नायक, हिंदुस्थानचा देशवीर, धर्मरक्षक, अभिमानी व प्रेमळ सेनापति तात्या टोपे याचें मृत शरीर अिंग्रजानी अुभारलेल्या फाशावर लटकू लागलें. तो फास रक्ताने भिजला आणि देह अश्रूंनी ओला चिंब झाला! देशाच्या स्वातंत्र्यासाठी अत्यंत कष्ट सोसले, हाच त्यांचा अपराध होता! देशद्रोही विश्वासघातक्यांच्या दुतोंडी चालींचे हे बक्षीस त्यांना मिळालें! आणि त्याचा शेवट? —अेखाद्या गुन्हेगाराप्रमाणे अिंग्लिशांनी त्यांना फाशावर लटकविलें! तात्या! तात्या! ह्या असल्या दुर्दैवी देशात तुम्ही कशाला जन्म घेतलात? ह्या नीच महामूर्ख व विश्वासघातकी लोकांकरिता तुम्ही कशाला लढलात? तात्या, आपणांसाठी आज आम्ही जे अश्रु ढाळीत आहोत ते आपणांस दिसतात का? ह्या दुर्बळांच्या अश्रूंसाठी आपण रक्त सांडावें! —खरोखर कसला हा महागडा सौदा!!

तात्याचें शरीर तेथे फाशावर लटकत असलेलें पाहून ते शूर अिंग्रज आपल्या पराक्रमाविषयी समाधान पावून गर्वभराने तेथून निघून गेले. सायंकाळपर्यंत तात्यांचा मृतदेह तेथे तसाच टांगलेला होता. तेथील पहारेकरी दूर होताच युरोपियन प्रेक्षकांमध्ये तात्याची पवित्र आठवण म्हणून त्यांच्या केसांचीं झुलपें मिळविण्यासाठी त्यांच्यात चढाओढ लागली!

१८५७ च्या त्या स्वातंत्र्ययुद्धातील होमकुंडात तात्याची ही शेवटची आहुति पडली!

तो भयंकर ज्वालामुखी—ज्याच्या विस्तीर्ण मुखातून जोरावेष्ट होअून मांसाचे, रक्ताचे, प्रेताचे, विजाचे वादळाचे, आणि रसरसणाऱ्या लाव्हाऱ्साचे कल्लोळावर कल्लोळ बाहेर पडत होते—तो ज्वालामुखी पुन्हा अेकवार आपलें तोंड मिटवू लागला; त्याचा तप्त लाव्हा थंड होअू लागला! त्याच्या तरवारीप्रमाणे नळपणाच्या जिव्हा पुन्हा म्यानात बंदिस्त झाल्या. त्याच्या लकाकणाऱ्या विजा, कानठळ्या बसविणारे गडगडाट, झंझावात, त्याच्या भयंकर हाहाःकारी, व प्रचंड भुळभुळयी—सर्व काही जादुगाराच्या पोतडीत शिरल्या आणि अदृश्य होअून विरून गेल्या. ज्वालामुखीने पडलेली प्रचंड भेग मिटली गेली, व त्यावर पुन्हा हिरवेगार

चवत अुगवू लागलें; त्यावर शेतीची लागवड चालू झाली, शांतता, सुरक्षितता व प्रेमभाव पुन्हा नांदू लागला. आणि आता ज्वालामुखीचा पृष्ठभाग अितका मऊ आणि हसरा दिसू लागला की, त्याच्याच पृष्ठभागाखाली अेखादा भयानक ज्वालामुखी असेल याची कोणास शंकासुद्धा येणार नाही !

* * *

प्रकरण तिसरें

# समारोप

आता ज्वालामुखी तात्पुरता थंड झाला आहे! तथापि वाचक आम्हांस विचारतील की, फिरोजशहाचें व रावसाहेबांचें पुढे काय झाले?

तात्या सोडून गेल्यावर रावसाहेब अत्यंत बेहोष होअून अेक महिनाभर लढत राहिले व शेवटी गुप्तपणे अरण्यात निघून गेले. तीन वर्षांच्या अज्ञातवासानंतर तेही पकडले गेले आणि कानपूर येथे ता. २० ऑगस्ट १८६२ रोजी त्यांस फासावर चढविण्यात आले. फिरोजशहा सुद्धा वेषांतर करून भटकत राहिले होते व सुदैवाने शेवटी ते हिंदुस्थानबाहेर निसटू शकले आणि पर्शियात करबेला येथे जाअून राहिले.

येथवर १८५७ च्या क्रांतियुद्धाची चर्चा वारंवार केली गेलीच आहे. त्यातून अनेक प्रश्न निर्माण होतात. त्यापैकी अेक प्रमुख प्रश्न क्रांतियुद्धाची सर्व सिद्धता पुरी होण्यापूर्वीच अकस्मात् लवकरच क्रांतीचा अुठाव झाला का ? ह्या प्रश्नाचें अुत्तर स्पष्ट आहे की, नाही! तसे झाले नाही. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात जेवढी पूर्व तयारी झालेली होती तेवढी तयारी कित्येक विजयी झालेल्या क्रांतीचे वेळीही झालेली नव्हती. शिपायांच्या पलटणीमागून पलटणी, राजेरजवाडे, प्रचलित सरकारचे वरिष्ठ अधिकारी, पोलीस, मोठमोठी शहरें, सर्व अेका पाठोपाठ अुठावाचीं वचने देत असता कोण बंडाला तत्काल प्रारंभ करणार नाही ? शिवाय, बहुतेक प्रसंगी सुरवातीलाच अडचण असते आणि अेकदा आरंभ झाला की, सर्व देश आपोआप अुठतो. ह्या अनुभव विचारात घेतला तर हें स्पष्ट होअील की क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांनी अुगाच घाअी केली नव्हती. अुलट असे म्हणावें लागेल की, अितकी अनुकूल परिस्थिति असताना अुठाव करण्याचें धाडस ज्यांना होत नाही ते क्रांतीचा अुठाव कधीही करू शकणार नाहीत!

मग प्रश्न पडतो की, त्याचा पराभव का झाला? ह्या ग्रंथात वेळोवेळी त्या त्या ठिकाणी अनेक किरकोळ तत्कालिक कारणें सांगितलीं आहेतच. पण मुख्य कारण

दिसतें, तें असें की, ह्या क्रांतीसाठी विघातक भागाची जरी व्यवस्थित आखणी केली होती तरी त्यानंतर अुत्पन्न होणाऱ्या परिस्थितीमध्यें कसें वागलें पाहिजे याविषयी विधायक आकर्षक व सुव्यवस्थित आखणी केली गेली नव्हती. अिंग्रजी सत्ता अुखडून नष्ट करावी यावर सर्वांचें अेकमत होतें; पण त्यानंतर काय ? पूर्वीचेंच तीं परस्परविघातक भाडणें, पुन्हा तेच मोंगल, तेच मराठे, आणि तीच जुनीं भांडणें— आणि अशा परिस्थितीला कंटाळूनच वेडाच्या झटक्यात परक्या शत्रूंना आत घेण्याची तीच जुनी पद्धत अवलंबावयाची असेल तर आपलें रक्त व्यर्थ कशाला सांडावयाचें असें सर्व साधारण जनतेला वाटू लागल्यास नवल काय ! त्यामुळे झालें काय, की क्रांतीचा विघातक भाग तेवढा यशस्वीपणे पार पडला; परंतु नंतर जेव्हा विधायक राजवटीचा प्रश्न अुत्पन्न झाला तेव्हा आपापसातील मतभेद, परस्परांविषयी वाटणारी भीति आणि आत्मविश्वासाचा अभाव हे सर्व दुर्गुण अुफाळून आले. क्रांतीनंतर जर लोकांच्या कल्पनेला व विचारांना पटेल असा आकर्षक कार्यक्रम ठेवण्यात आला असता तर क्रांतीनंतर होणारी स्वातंत्र्यवाढीची विधायक वृत्ति बळावून प्रारंभाप्रमाणेच क्रांतीचा शेवटही यशस्वीपणे सिद्धीस गेला असता.

पूर्ण संहारानंतर निर्मिति चालू होते, दुष्टांच्या निर्दालनानंतर चांगली राजवट चालू करता येते, येवढें जरी ह्या लोकांनी नीट लक्षात ठेवलें असतें तरीही क्रांतीचा विजय झाला असता. नव्या निर्मितीचा विचार तर दूर राहिला, पण ती जनता परकीय राजवटीचा विनाशही पूर्णपणे करू शकली नाही ! याचें कारण अुघड आहे की, ह्या देशातून विश्वासघात आणि भीरुता हे दोन महान् दुर्गुण अजून पूर्णांशाने नष्ट झाले नव्हते. पराभवाचें मुख्य कारण म्हणजे ज्या लोकांना पूर्वीच्या कोणत्याही स्वदेशी राजवटीपेक्षा परकीय अिंग्रजाची राजवट ही अधिक वाअीट आहे हें कळलेच नाही आणि ज्याच्या अंगी स्वदेशी बांधवांविरुद्ध परक्याना साहाय्य नाकारण्याअितकी देशभक्ति व प्रामाणिकपणा नव्हता त्या लोकांनी केलेला स्वदेशबंधूंशी विश्वासघात ! [१]

---

१. " Yet it must be admitted that, with all their courage, they (the British) would have been quite exterminated if the natives had been all and altogether hostile to them. The desperate defences made by the garrisons were no doubt heroic, but the natives shared their glory, and they by their aid and presence rendered the defence possible Our siege of Delhi would have been quite impossible, if the Rajas of Patiala and Jhind had not been our friends and if the Sikhs had not recruited in our battalions and remained quiet in the Punjab. The Sikhs at Lucknow did good service, and in all cases our garrisons were helped, fed

(टीप पुढील पानावर चालू)

आणि म्हणूनच ह्या पराजयाचें सर्व पाप असल्या विश्वासघातक्यांच्याच कपाळी फुटतें ! जर त्यांच्यापुढे स्वच्छ आणि आकर्षक ध्येय ठेवलें गेलें असतें तर हेच विश्वासघातकी देशभक्त बनले असते. कारण देशभक्तिच जेव्हा मिळकतीची व लाभदायक वाटू लागते तेव्हा लज्जास्पद व धोकादायक विश्वासघात आपण होऊन कोण करण्यास धजेल? विश्वासघातात विशेष गुण काही नसतो. स्वराज्यापेक्षा परकीय सत्ता अधिक वाईट व घातक असते हें लक्षात घेऊन त्यानुसार वर्तन करणाऱ्या वीरांना उज्ज्वल श्रेय लाभते मग तें स्वराज्य लोकमतानुसार चालणारें असो (Democratic), राजमतानुसार चालणारें असो (Monarchical) किंवा अनायकानुसार चालणारें असो (Anarchical). स्वातंत्र्याची अभिलाषा केवळ देश संपन्न व सुखी व्हावा येवढ्याचसाठी नसते तर स्वातंत्र्यातच आत्म्याला खरें समाधान प्राप्त होते; नफ्यातोटयापेक्षा स्वत्वाची भावनाच महत्त्वाची असते. पारतंत्र्याच्या सोनेरी पिंजऱ्यापेक्षा जगलात वसलेलें स्वातंत्र्यच शतपट श्रेष्ठ होय! सुभाषितकार म्हणतात—

फळें मधुर खावया असति नित्य मेवे तसे।
हिरेजडित सुंदरी कनक पंजरीही वसे॥
अहर्निश तथापि तो शुक मनात दुःखें झुरे।
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडी घडी सुखातें स्मरें॥

ज्यांना हें स्वातंत्र्याचे तत्त्व समजलें, स्वधर्मकरिता व स्वदेशाकरिता ज्यांना आपलें कर्तव्य पार पाडलें, स्वधर्म व स्वराज्यासाठी ज्यांनी आपल्या तरवारी उपसल्या, आणि कदाचित् जयासाठी नाही पण कर्तव्यबुद्धीने ज्यांनी मरणही पत्करलें,

(टीप मागील पानावरून चालू)

and served by the natives, as our armies were attended and strengthened by them in the field. Look at us all, here in camp at this moment, our outposts are native troops, natives are cutting grass for our horses and grooming them, feeding the elephants, managing the transports, supplying the commissariat which feeds us, cooking out soldiers' food, cleaning their camp, pitching and carrying their tents, waiting on our officers, and even lending us their money. The soldier who acts as my amanuensis decleared that his regiment could not have lived a week but for the regimental servants, Doli bearers, hospital men, and other dependents. Gurkha guides did good service at Delhi and the Bengal artillerymen were as much exposed as the Europeans."—Russell's My Diary in India.

*त्यांचीं नांवें चिरंजीव राहोत! त्यांना शतशः सहस्रशः प्रणाम असोत!* केवळ मत-भेदाने व अस्थिर बुद्धीने ज्यांनी वर अुल्लेखिलेल्या वीरांना सहकार्य केलें नाही त्यांची देशाला आठवणही राहणार नाही. आणि त्यापेक्षांही भयावह प्रकारे जे प्रत्यक्ष शत्रूलाच जाअून मिळाले व स्वदेशबंधूंशीच शत्रूसह लढले त्यांचा शतशः नव्हे सहस्रशः धिक्कार करावा तेवढा थोडाच होणार आहे! १८५७-ची क्रांति म्हणजे हिंदुस्थानची अैक्याच्या, स्वातंत्र्याच्या व जागृत जनशक्तीच्या दिशेने किनपत प्रगति झाली आहे हें पारखून पाहण्याची अेक कसोटीच होती.[२] अपयशाचा दोष ज्यांनी देशाला पारतंत्र्यात ढकललें अशा नामर्द, आळशी व विश्वासघातकी लोकांवरच येतो. परंतु स्वतःच्या अुष्ण रक्तात ज्यांनी आपल्या तरवारी बुचकळून काढल्या, क्रांतीच्या त्या नाट्यप्रयोगात अग्निमंचकावर धिटाअीने प्रवेश केला आणि साक्षात् मृत्यु पुढे अुभा असता त्याची पर्वा न करता जे त्या मृत्युमुखातही थयथय नाचले, त्यांना दोष देअून कोणीही आपल्या जीभा विटाळू नयेत! ते वेडे नव्हते; ते अुतावीळही नव्हते, झालेल्या पराजयात त्यांचा काहीही भाग नव्हता; ते अविचारी नव्हते; आणि म्हणून त्यांना दोष देणें केव्हाही अुचित होणार नाही. त्यांनी मारलेल्या हाकांनीच हिंदमाता आपल्या गाढ झोपेतून जागी झाली आणि आपलें पारतंत्र्य नष्ट करण्यासाठी ती धावून गेली. पण जेव्हा तिच्या काही सुपुत्रांनी जुलुमाच्या टाळक्यावर जबरदस्त प्रहार केला तेव्हाच, दुर्दैवाने तिच्याच काही कुपुत्रांनी तिच्या हृदयात खंजीर खुपसला! ती जखमी हिंदमाता जमिनीवर पुन्हा कोसळून पडली! आता तिच्या दोन पुत्रांपैकी कोण क्रूर, विश्वासघातकी व तिरस्करणीय आहे? आणि कोण वीर, साहसी, देशभक्त व आदरणीय आहे?

दिल्लीचा बादशहा बहादुरशहा हा अेक कवि होता. क्रांतियुद्ध अगदी अैन रंगात असतानाच त्याने अेक गझल रचला होता, त्याला कोणीतरी विचारलें की—

---

२. "Among the many lessons the Indian mutiny conveys to the historian, none is of greater importance than the warning that it is possible to have a revolution in which Brahmins and Sudras, Hindus and Mahomedans, could be united against us, and that it is not safe to suppose that the peace and stability of *our dominions, in any great measure, depends on the continent* being inhabited by different religious systems for they mutually understand and respect and take part in each other's modes and ways and doings. The mutiny reminds us that our dominions rest on a thin crust ever likely to be rent by titanic fires of social changes and religious revolutions." —Forrest's Introduction.

दमदमायें दम नही अब खैर मांगो जान की
अय जफर अब ठंडी हुओ समशेर हिंदुस्थानकी

"दिवसेंदिवस व प्रतिक्षणी तू थकत चाललेला आहेस, तेव्हा हे बादशाह, आता अिंग्लिशांपुढे पदर पसरून प्राणाची भीक माग. कारण आता हिंदुस्थानची तरवार कायमची बोथट व थंड झालेली आहे!"

असे सांगतात की, त्याला अुत्तर देताना बादशहा म्हणाला —

गाझियोंमें बू रहेगी जबतलक ओमानकी
तब तो लंडन तक चलेगी तेग हिंदुस्थानकी

'आमच्या वीरांच्या अंतःकरणात स्वत्वाचा आत्मविश्वास व देशभक्तीचा बिंदु शिल्लक असेल तोवर हिंदुस्थानची तरवार धारदारच राहील आणि अेक दिवस असा येअील की ती प्रत्यक्ष लंडनचे दरवाजे ठोठावील!"

वंदे मातरम्

---

# स्वा. सावरकरांचीं भाषणें

पुण्यातील

## 'अभिनव भारत' सांगता समारंभ

स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी सन १८९८ या वर्षी 'अभिनव भारत' ही गुप्त क्रांतिकारी संस्था निर्माण केली.[१] ब्रिटिशांच्या पारतंत्र्यातून भारत स्वतंत्र करणे हा तिचा अुद्देश होता. हा अुद्देश १९४७ वर्षी सफल झाला व भारत स्वतंत्र झाला. या अुद्देशपूर्तीनिमित्त स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या नेतृत्वाखाली दि. १० मे १९५२ या दिवशी अभिनव भारत सांगता समारंभ मोठ्या प्रमाणात साजरा करण्यात आला व त्या दिवशी १८५७ ते १९४७ पर्यंतच्या काळात ज्या स्वातंत्र्यवीरांनी राष्ट्राच्या स्वातंत्र्यार्थ आपला देह चंदनासारखा झिजविला व शेवटी प्राणार्पण केलें, त्या सर्व दिवंगत हुतात्म्यांच्या स्मृत्यर्थ अेक क्रांतिस्मृतिनगर अुभारून तेथे वीरस्मृतिस्तंभ स्थापण्यात आला व त्यापुढे सर्व दिवंगत हुतात्म्यांना श्रद्धांजलि समर्पण करण्यात आली. या प्रसंगानिमित्त ठिकठिकाणचे विद्यमान क्रांतिवीर पुण्यास अेकत्र जमले होते. त्या सांगतासमारंभानिमित्त दिवंगत क्रांतिवीरांच्या जीवनातील अद्भुत व रोमहर्षक प्रसंगाच्या चित्राचें टिळक स्मारक मंदिरात अेक प्रदर्शनही भरविण्यात आलें होतें. दि. १० मे १९५२ या दिवशी सकाळी या समारंभाचे अध्यक्ष श्री. केशवराव जेधे यांच्या अध्यक्षतेखाली स्वातंत्र्यवीर सावरकर यांचें भाषण झालें. प्रदर्शनाचें सावरकरांनी अुद्घाटन केल्यावर त्यांनी पुढील भाषण केले :

---

१. अभिनव भारत संस्थेचा अुगम कसा झाला या संबंधाने 'माझ्या आठवणी' (खंड १ ला पृ. १४२) मध्ये स्वत: च सावरकरांनी पुढीलप्रमाणे म्हटले आहे :

"वासुदेव (चाफेकर) आणि रानडे फाशी गेले तो त्या नाटकाचा शेवटचा प्रवेश मी ज्या दिवशी वर्तमानपत्रात वाचला – ते फाशीच्या आदल्या रात्री स्वस्थ निजले. पहाटे अुठले. गीतापाठ केला आणि 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि' असें गर्जत गर्जत अेकमेकांचा हृ निरोप घेत फासावर चढले – हे वर्णन ज्या दिवशी मी वाचलें तेव्हापासून तर काही दिवस हे वरील प्रश्न रात्री झोपेत देखील माझ्या मनास माझें मत विचारीत राही. शेवटी दोन चार दिवसाच्या मनाच्या ह्या अवस्थेत मला बाळपणातील माझा शेवटचा आधार, माझें संकटी समाधान करणारी, जिला माझीं

( टीप पुढील पानावर चालू )

भाषण पहिलें

# क्रांतिचित्र प्रदर्शनाचें अुद्घाटन

सावरकर म्हणाले, "हें भाषण मी ह्या क्रांतिचित्र-प्रदर्शनाच्या अुद्घाटनापुरतें लहानसेंच करणार आहे. सशस्त्र क्रांतिकारकाचें नांवही कोणी आदरानें अुच्चारता कामा नये ह्याविषयी ब्रिटिशांचा मोठा कटाक्ष असे. अेक वेळ लोकमान्य टिळकांच्या छायाचित्रांनाही गौरविलें असता ब्रिटिश शासन खपवून घेअी, परंतु सशस्त्र क्रांतिकारकाचें छायाचित्र पाहताच तो दंडच अपराध समजला जाअी. ह्या अेका गोष्टीवरूनही हें ध्यानात यावयास पाहिजे की, ब्रिटिश लोक मनातून हें समजून असत की, कोणत्याही अितर प्रकट नि वैध चळवळीपेक्षा त्यांच्या राज्याला जर खरी घातक चळवळ कोणती असेल तर ती सशस्त्र क्रांतिकारकाचीच होय. पण आज असा मंगल दिवस अुजाडला आहे की, आम्ही त्या सर्व दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांतील हुतात्म्यांच्या नि वीरात्म्यांच्या नुसत्या छायाचित्रांचेंच नव्हे तर त्यांच्या सशस्त्र झुंजीच्या रणझुंजचित्रांचेंही हें असलें भव्य प्रदर्शन दाखवू शकत आहो! तुम्ही आता जेव्हा आत जाअून पहाल तेव्हा तुम्हांला झांशीची राणी रणांगणात ब्रिटिशांच्या सैनिकांना सपासप कापीत असताना चित्रिलेली दिसेल! जॅक्सनवर हुतात्मा कान्हेरे गोळीबार करीत असतानाचें चित्र दिसेल! ह्या अेका गोष्टीवरूनही ह्या आजच्या मे १०-च्या

(टीप मागील पानावरून)

सुख-दुःखें मी सांगनाच आणि तीं ती हुगतमुखी अेकताच माझ्या मनास नेहमीं हलकेंसें वाटे तीं माझी आअी तिच्याकडे-त्या देवीकडे-मी धाव घेतली. देवघरात गेलो, तिची भक्तिभावानें पूजा बांधून स्वदेशाच्या दुःस्थितीनें तळमळणाऱ्या त्या सद्गदित अंतःकरणानें तिचें ध्यान आरंभिलें, आणि शेवटी तिच्या पवित्र चरणावर हात ठेवून,—तिला साक्ष ठेवून आणि मला तेव्हा मासे तसें तिची अनुमति घेअून मी प्रतिज्ञा केली की, माझ्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी मी सशस्त्र युद्धात शत्रूस मारीत चाफेकरासारखा मरेन किंवा शिवाजीसारखा विजयी होअून माझ्या मातृभूमीच्या मस्तकीं स्वराज्याचा राज्याभिषेक करवीन ... यापुढे मी माझ्या देशाचें स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठी सशस्त्र क्रांतीचा केतु अुभारून 'मारिता मारिता मरेतों झुंजेन'!!! ... पुढे हिंदुस्थानभर गाजलेल्या अभिनव भारताच्या क्रांतिकारक संस्थेचा खरा अुगम या शपथेंतच झाला. ही माझी प्रतिज्ञाच "अभिनव भारताचें मूळ बीज होती."

हें सन १८९८-चें वर्ष होतें. या वेळीं सावरकरांचे वय अवघें पंधरा वर्षांचें होतें.

मंगल दिवशी आपलें निदान तीन चतुर्थांश हिंदुराष्ट्र स्वतंत्र झालेले आहे हें सुचित होअू शकतें. हें वाक्य मी अशासाठी बोलत आहे की, आजकाल केव्हा केव्हा अनेक जण काही त्रास झाला की, लगेच बोलून वा लिहून जातात की, 'आमचें राष्ट्र खरो-खरच स्वतंत्र झालें आहे, का हा सर्व आभास आहे?' मी आपणांस सध्या थोडक्यात अितकेंच सांगतो की, होय! ब्रिटिशांच्या शृंखला तोडून हें आपलें राष्ट्र आजच्यापुरतें तरी राजकीय दृष्टया स्वतंत्र झालें आहेच आहे. जे आम्ही परदेशात जिकडे तिकडे युनियन जॅक अुभारलेले पाहत होतो तेच आम्ही, आज तो युनियन जॅक अुखडून समुद्रात फेकून दिला आहे. आणि आमच्या राष्ट्रावर आमचा सुदर्शन चक्रांकित राष्ट्रध्वज फडकत आहे हें प्रत्यक्ष पाहत आहो. ह्याविषयी आजच्या सध्याकाळच्या भाषणात मी क्वचित् अधिक विस्ताराने बोलेन.

## महाराष्ट्रीय हिंदूंचे राष्ट्रप्रिय मूळपुरुष शिवाजी महाराज !

ब्रिटिशासारख्या बलवत्तर नि बिलंदर शत्रूच्या हातून ही आपली मातृभूमि अशी स्वतंत्र करण्यासाठी ज्या ज्या सशस्त्र क्रांतिकारकांनी—आणि त्यांची संख्या शंभर नव्हे, दोनशे नव्हे, तर लाखांनी मोजली जाअील—आपल्या देहांची आहुति रणावर दिली त्यांचे गौरवार्ह अुघडले जाणारें हें त्यांचे चित्रप्रदर्शन पहावयास आपण जेव्हा आत जाल तेव्हा प्रथमतः सर्वोच्चस्थानी लावलेल्या श्रीछत्रपति शिवाजी महाराजांचें दर्शन घ्याल. आपणा महाराष्ट्रीयांपैकी कोणी शूद्र असतील, कोणी ब्राह्मण असतील, कोणी क्षत्रिय असतील, कोणी महार असतील, कोणी वैश्य असतील, पण महाराष्ट्रीय या नात्याने आपणातील सर्व जाती ह्या समसमान आहेत. आणि आपणां सर्व महाराष्ट्रीय हिंदूंचे राष्ट्रीय मूळ पुरुष कुलपति छत्रपति शिवाजी महाराज हेच आहेत. त्यांनीच महाराष्ट्राला महाराष्ट्र म्हणून जन्म दिला. आमचा पहिला स्वराज्यसंस्थापक हिंदुपदपादशहा तो! पहिला क्रांतिपुरुष तो!! त्यानंतर आपण लोकमान्य टिळकांचें दर्शन घ्याल क्रांतिकारकांना जन्म देणाऱ्या 'असंतोषा'चे ते 'जनक' होते. ते प्रकटपणे क्रांतिकार्यात पडले नाहीत कारण त्यांना दिवसभर लोक-समुदायातून राजकीय असंतोष अुत्पन्न करावयाचा असल्यामुळे प्रकटपणे नैर्बंधिक क्षेत्रातच काम करणे भाग पडे. पण मध्यरात्रीच्या सद्यीम मात्र ते सशस्त्र क्रांति-कारक असत. "सशस्त्र क्रांतीची पन्नास टक्के जरी शक्यता दिसली तरी पन्नास टक्के देवावर विसंबून मी वद करीन" असे ते म्हणत. तथापि मूलतः ते लोकमान्य होते, आणि म्हणून लोकसमूहाला झेपेल अशी भूमिका सभाळून राजकारण करणें त्यांना प्राप्त होअे पण आम्ही मात्र त्यांच्या पुढची भूमिका आक्रमिण्यासाठी जाणून बुजून लोकमान्यतेकडे पाठ फिरविली आणि सशस्त्र क्रांतीचा विडा अुचलला. शत्रूच्या तोफांचे पहिले गोळे आपल्या छातीवर झेलण्यासाठी, भारतातील आमचा सशस्त्र क्रांतिदल ही पुरस्सरायी आघाडी होती, मी मॅपर्स अँड मायनर्सची फळी होती.

लोकमान्याचे दर्शनानंतर प्रत्यक्षपणे सशस्त्र क्रांतियुद्धात लढलेल्या नि कामास आलेल्या वीरात्म्यांचा नि हुतात्म्यांचा चित्रविभाग आपणास लागेल. त्यांतील प्रत्येकाचें दर्शन आपण घ्याल हें सांगावयाला नकोच. ५७-च्या स्वातंत्र्ययुद्धातील दृश्यांना आणि वासुदेव बळवंतांच्या सशस्त्र उठावणीतील वीरांना आपण श्रद्धांजलि अर्पालच. वासुदेव बळवंतांच्या कालखंडातच कै. ज्योतिबा फुले ह्यांचीही प्रतिमा आपणांस दिसेल. ज्यांना माहिती नाही त्यांच्यासाठी येथे सांगितले पाहिजे की, कै. ज्योतिबा फुले जसे समाजक्रांतिकारक होते तसेच ते त्यांच्या तरुणपणी सशस्त्र क्रांतिकारकांतही मिसळलेले होते. वासुदेव बळवंतांच्यासह त्यांनी क्रांतिकारक हेतूने अेकाच आखाड्यात शस्त्रास्त्रांचे शिक्षण घेतलें. वासुदेव बळवंताचें क्रांतिकारक पथक कात्रज घाटात लढत असता त्या पथकाला पुण्याहून कै. ज्योतिबा फुले ह्यानी ताज्या भाकऱ्यांचा पुरवठाही केल्याचें समजतें. त्यांच्या 'गुलामगिरी' ह्या पुस्तकात अिंग्रजाना हिंदुस्थानातून हुसकून देण्यामाठी सशस्त्र अुठाव करावा ह्या मताचे आपण होतो' असा अल्लेख आहे असें समजतें. अर्थात् ह्याविषयी त्यांचीं मतें पुढे काही प्रकरणी पालटलीं ही गोष्ट येथे लागू नाही.

त्यानंतर जे क्रांतिकारक अिंग्रजांनी फाशावर लटकविले त्या हुतात्म्यांचीं काही चित्रे फाशावर तशीचीं तशीं लटकविलेलीं आणि त्यांच्या मोडलेल्या फटमण्यांतून रक्ताची धार नशीच्या तशीच टपकत असलेली आपणाला दिसेल. त्या रक्ताच्या प्रत्येक बिंदूला शतशः वंदनें करा. ह्या प्रदर्शनात ह्या फाशावर लटकत असलेल्या दहापांच हुतात्म्यांचीच चित्रें आणि अितराच्या नामपत्रिका जरी अुदाहरणार्थ लावलेल्या असल्या तरी अशा हिंदुस्थानभर फाशावर लटकलेल्या अर्वाचीन हुतात्म्यांची संख्या तुम्हांला शेकड्यांनी मोजावी लागेल आणि जर त्यात तुम्हीं त्यापूर्वी ५७-च्या युद्धापायी फाशावर लटकलेल्यांची संख्या मिळवू अिच्छाल तर ती संख्या तुम्हाला सहस्रांनी मोजावी लागेल."

## जिवंत क्रांतिकारकांचीं चित्रें कां नाहींत ?

नंतर वीर सावरकरांनी प्रदर्शनातील अितर क्रांतिचित्रांची अशीच काही स्फूर्तिदायक वर्णनें केलीं आणि व्याख्यानाच्या समारोपात ते म्हणाले की, "ह्या प्रदर्शनात वर दिलेल्या सर्व दिवंगत हुतात्म्यांची नि वीरात्म्यांचीं दर्शनें घडूनही काही खटकल्यासारखें होअील. कारण त्यात अनेक प्रख्यात सशस्त्र क्रांतिकारकांची चित्रें आपणास आढळणार नाहीत. अुदाहरणार्थ, हातातील पिशवीत जिवंत बाँब घेअून ब्रिटिशांचे पार्लमेंटच अुडवून द्यावयास अेकदा निघालेल्या ह्या माझ्या शेजारी बसलेल्या सेनापति बापटांचे, माझ्यावरोवर आमरण जन्मठेप अंदमानात भोगणाऱ्या वामनराव जोशांचे, वारिन कुमारांचे किंवा मुबअीचे गव्हर्नर हॉटमन ह्यांचेवर गोळीबार करणाऱ्या वीरात्मा वासुदेव बळवंत गोगट्यांचे चित्र तुम्हांस तेथे आढळ-

णार नाही. ह्याचें कारण प्रदर्शनसंचालकांची हयगय नसून त्याचें अेक निराळेंच महत्त्वाचें कारण आहे. तें असें की, त्या वेळच्या क्रांतिकारकांपैकी भारतातील निरनिराळ्या प्रांतांत जे काही आम्ही हजार पांचशे लोक जिवंत आहोत त्यांनी स्वतःभोवतीच दिवे ओवाळून घेण्यासाठी हें प्रदर्शन वा हा समारंभ जुळवून आणला असें कोणाच्या काकदृष्टीलासुद्धा म्हणता येअू नये, ह्यासाठी ह्या आम्हा विद्यमान क्रांतिकारकांच्यापैकी कोणाचेंही नाव ह्या प्रदर्शनात किंवा ह्या सांगता समारंभातही मी गोवलेलें नाही. हा सारा समारंभ केवळ दिवंगत क्रांतिकारकांच्या स्मृतिगौरवाचाच आहे. त्यांनाच काय ती सामुदायिक श्रद्धांजलि ह्या समारंभात वाहिली जाणार आहे. आम्ही जिवंत राहिलो ह्यात आमचा कोणताही दोष नसतानासुद्धा आम्हांलाच हा समारंभ जुळवून आणावा लागला. म्हणून आम्ही केवळ दिवंगत हुतात्म्यांचा नि वीरात्म्यांचाच गौरव करण्याचें ठरविलें. मी नको म्हणून सांगितलें असताही व्यवस्थापकसमूहाला तें पटेना, म्हणून त्यांनी माझें चित्र प्रदर्शनात ठेवलें आहे असें मला जेव्हा कळलें तेव्हा कारणच मी अत्याग्रहाची विनंती करून तें माझें चित्रसुद्धा प्रदर्शनातून काढून टाकिलें आहे तें अेवढ्यासाठीं! दिवंगत क्रांतिकारकांविषयी ह्या समारंभानिमित्त साऱ्या महाराष्ट्रात नि विशेषतः पुण्यात आज जो हा कृतज्ञतेचा महापूर लोटलेला आहे आणि अभिनव भारताच्या सांगता समारंभाचा हा महोत्सव गाजून राहिलेला आहे तो पहावयास आम्ही सर्व विद्यमान क्रांतिकारक योगायोगाने जगलो ह्यातच आमच्या डोळ्यांचें पारणें फिटलें!

भारतातील माझ्या सहस्रावधि हितचिंतकांकडून वेळोवेळी असे अुद्‌गार निघतात की, हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही त्या स्वातंत्र्यासाठी झुजताना मी जे काही कष्ट भोगले त्याचें श्रेय मला मिळालें नाही. सशस्त्र क्रांतिकारकांवाचून अितर निःशस्त्र मार्गानें कार्य करीत असता ज्यांनी सापेक्षतः अल्प कष्ट सोसले त्यांचाही अनेक प्रकारें गौरव होत आहे. कोणाला भू-दानें, कोणाला द्रव्यदानें कोणाला अधिकारदानें, पारितोषिकें म्हणून वाटण्यात येत आहेत, पण परकीय शत्रूंनी राजहृत केलेल्या, जप्त केलेल्या आम्हा सशस्त्र क्रांतिकारकांचीं घरेंदारें, द्रव्य, सत्ता, हींसुद्धा परत द्यावयाचीं नाही म्हणून प्रभुत्वच्या आमच्या स्वकीय शासनानें, सरकारनें अुघडपणे सांगून टाकलेलें आहे. पण हा न्याय आहे की नाही हा प्रश्नसुद्धा आज विद्यमान असलेले वयोवृद्ध क्रांतिकारक विचारात घेअू अिच्छीत नाहीत. निदान माझ्यापुरतेंच बोलायचें तर मला तरी त्याविषयी लवलेश हेवा वाटत नाही. अहो, सारा हिंदुस्थान आमची सारी मातृभूमि, निदान हा तीनचतुर्थांश तरी विस्तृत देश शत्रूच्या हातून आमचा आम्हास परत मिळाला, स्वतंत्र झाला, ह्यातच त्या शत्रूंनी हिरावून नेलेल्या दीर्घदिर्घीच्या आमच्या क्षुद्र जहागिरी नि घरटीं नि दीड दमडया ही सारी आम्हास परत मिळालेलीच आहेत. ह्या आजच्या स्वतंत्र भारतीय महाराज्याचा अध्यक्ष होण्याचा मान मिळणें हीही भाग्याची गोष्ट आहेच, पण तें भाग्य

पुढच्या पिढीतील कोणातरी सुयोग्य देशभक्तास लाभावें ह्यासाठीच पन्नास वर्षांपूर्वी देशभक्तीं झुंजत लगता मारीत मारीत मरणें हेंच सर्व भाग्यांत परम भाग्य समज-णाऱ्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या पुरस्सर पथकाच्या आम्ही अग्रभागी राहून समूवर चालून गेलो. जर कधी काळी पन्नास पाऊणशे वर्षांनंतर स्वराज्य आल्यावर आम्हास मानाचीं स्थानें किंवा पारितोषिकें 'ह्या देहींच देहीं ह्याचि डोळा' मिळतील ही आमची महत्त्वाकांक्षा असती तर आम्ही रिव्हाल्वरें आणि बाँब हातीं घेऊन त्या बलाढ्य शत्रूवर तुटून पडलो असतो का — मरण फाशीच्या वाटेनेच धावलो असतो का?

## ह्यात कृतार्थतेची धन्यतरता आहे!

मी माझ्यापुरते तरी अगदी मनःपूर्वक सांगतो की आम्ही आमची मातृभूमि स्वतंत्र झालेली 'ह्याचि देहीं ह्याचि डोळा' पाहिली ह्यानेच आम्ही स्वतःस कल्पनेहून कृतार्थ झालो असें समजतो, कारण ते पाहण्याचीही आम्हीं कधी लालसा धरली नाही केवळ तो दिवस केव्हातरी उगवावा म्हणून झुंजण्याची तेवढी लालसा धरलेली होती. म्हणून तो सोनियाचा दिवस पाहिला ह्यातच हवें होतें त्याहून अधिक मिळालें. निदान मी तरी अत्यंत समाधानात आहे. वैफल्याची लवलेश भावना माझ्या मनास शिवत नाही. कारण अेकार्थी माझे मूळ संकल्प सफल झालेले आहेत. राष्ट्र स्वतंत्र झाल्यानंतर त्याचा अध्यक्ष होणे ह्यातही धन्यता आहेच. ज्या थोर पुरुषाला आज ती लाभली आहे त्याचे हार्दिक अभिनंदन मी त्या वेळीच प्रकटपणे केलेलें आहे. आणि अेक स्वराष्ट्रनिष्ठ सामान्य नागरिक म्हणून माझ्या वाट्यास येईल ती राष्ट्र-सेवा मी करीत राहीन असें त्याना तार धाडून आश्वासिलेंही आहे.

परंतु दुसऱ्या अर्थी स्वराष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी लढून तें स्वतंत्र झाल्यानंतर ती सारी राजसत्ता आपल्या देशबांधवांच्या हातीं अर्पून, त्यातील दमडीच्याही लाभाची वा अधिकारपदाची लालसा न धरता इतर स्वदेशबांधवांच्या मानातच आपला मान आणि सुखातच आपले सुख मानून अेका स्वराज्यनिष्ठ सामान्य नाग-रिकाप्रमाणे शक्य ते राष्ट्रकर्तव्य तेवढें करीत निरिच्छ समाधानात राहणें ह्यातही कृतार्थतेची धन्यतरता आहेच आहे!!

यवनाची, सिकंदराच्या ग्रीक सैन्याची आणि राजसत्तेची, दाणादाण उडवून दिल्यानंतर आणि चंद्रगुप्ताची त्या स्वतंत्र भारतीय साम्राज्यावर स्थापना झाल्या-नंतर शेवटी आर्य चाणक्य स्वतः निवृत्त होऊन हिमालयात निघून गेले अशी कथा आहे. मला वाटतें कृतार्थ झालेल्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या आमच्या पिढीनेही तोच आदर्श डोळ्यापुढे ठेवावा. त्यांच्या आत्यंतिक त्यागाच्या प्रतिज्ञेला आणि परंपरेला तोच शोभून दिसेल.''

भाषण दुसरें

# सशस्त्र क्रांतिकारकांना श्रद्धांजलि

दिवंगत क्रांतिकारकांचा स्मृतिसमारंभ आणि अभिनव भारताचा सांगता समारंभ दि. १० मे १९५२ ला पुणें येथील पर्वतीच्या पायथ्याशी असलेल्या पेशवे उद्यानासमोरील विस्तीर्ण पटांगणात नेताजी सुभाषचंद्र बोस ह्यांच्या छायाचित्राचे अध्यक्षतेखाली अपूर्व थाटाने साजरा झाला. प्रत्यक्ष सभेचें काम चालविण्यासाठी सेनापति बापट ह्यांची नियुक्ति करण्यात आली होती. व्यासपीठाच्या समोरच अेक अुंच नि भव्य असा वीरस्मृतिस्तंभ अुभारलेला होता. दिव्यांच्या झगझगाटात शोभणाऱ्या आणि पुष्पमालांनी सजविलेल्या त्या भव्य वीरस्मृतिस्तंभावर—

" भारतीय स्वातंत्र्यसंग्रामांत अिंग्रज शत्रूशी सशस्त्र लढा देताना सन १८५७ ते सन १९४७ पर्यंत ज्या सशस्त्र क्रांतिकारक हुतात्म्यांनी आणि वीरात्म्यांनी आपल्या प्राणाहुति दिल्या त्या सहस्रावधि ज्ञात आणि अज्ञात भारतीय सशस्त्र क्रांतिकारकांच्या स्मरणार्थ "—असें महावाक्य लिहिलेलें होतें.

प्रथम स्वागत समितीचे अध्यक्ष, जेष्ठ आणि श्रेष्ठ पुढारी श्री. तात्याराव करंदीकर ह्यांचें आणि सेनापति बापटांचे ह्या महोत्सवाचें स्वारस्य सांगणारें भाषण झाल्यावर स्वतंत्र्यलक्ष्मीकी जय, वीर सावरकरकी जय, क्रांतिकारकांचा विजय असो अशा तुमुल गर्जनात वीर सावरकरांनी पुढील भाषण केलें.

## स्वातंत्र्य संपादनाचें श्रेय हें सामुदायिक श्रेय आहे

दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांना ते जिवंत असता मायेफिरू अत्याचारी, देशघातक हत्यारी अित्यादि निवडक शिव्याशापांची लाखोली परशत्रूकडूनच काय सी नव्हे तर त्यांच्या स्वदेशबांधवांकडूनही वाहिली जात होती, तथापि ते दिवंगत झाल्यानंतर का होअीना पण त्यांच्या तुमुल जयजयकारांनी आज हा प्रचंड समुदाय त्यांच्याविषयीची आपल्या देशाची अुत्कट कृतज्ञता व्यक्तवीत आहे हें पाहून नि अैकून मला तर काय, पण जर मनुष्य मेल्यानंतरही आत्मरूपानें अस्तित्वात असू शकतो हें खरें असेल तर त्या सहस्रावधि दिवंगत आत्म्यानाही मारचर्य संतोष वाटत असेल ! हें अपूर्व दृश्य मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहीन असें अगदी कालपरवापर्यंत मला केव्हाही वाटलें नव्हतें त्या परिस्थितीत तसें वाटणें शक्यच नव्हतें. अितिहासातून सशस्त्र क्रांतिकारक पक्षाने स्वातंत्र्यसंपादनार्थ काही कार्य केलें असा कोणताही अुल्लेख आणि त्यांची नांवेंही चक्क पुसून टाकण्याचा डाव परशत्रूंनी नि काही स्वार्थी नि भेकड स्वकीयांनीही योजिलेला होता. खोटा अितिहास लिहिण्याचा त्या लोकांनी चंग बांधला होता. म्हणूनच खरा अितिहास जसा घडला तसा लिहिला जावा ह्यासाठी मी नि माझ्या सहकाऱ्यांनी हा महोत्सव घडवून आणलेला आहे.

ह्या महोत्सवात केवळ भारतीय सशस्त्र क्रांतिकारकांनाच श्रद्धांजलि वाहिली जाणार आहे हें जरी खरें असलें तरी हिंदुस्थानचें जें स्वातंत्र्य आज आपण सपाडू शकलो आहोत ते सशस्त्र क्रांतिकारकांनीच काय तें मिळविलें असें मी मानीत नाही. तसें म्हणणें हीही पहिल्या चुकीप्रमाणेच अेक दुसरी अुलटी चूक होईल. तसें म्हणणें हाही खोटा अितिहास लिहिण्यासारखेंच अदलाघ्य होईल. स्वातंत्र्य मिळताच तें 'आम्हीच आणि आमच्या तथाकथित अहिंसक साधनांनीच मिळविलें' असी जी अेकच ओरड करण्यात आली ती बव्हंशी खोटी, पक्षपाती आणि लाटंबाजीची आहे हें स्पष्ट करणें अितिहासाच्या नि सत्याच्या दृष्टीनें कर्तव्यच होतें. तसें न करणें ही ऐतिहासिक कृतघ्नता झाली असती. ह्यास्तव स्वातंत्र्य मिळाल्यानंतर मला प्रकटपणें माझे विचार सागण्याची पहिली संधि मिळताच मन १९४९ च्या डिसेंबरमध्ये कलकत्त्यास भरलेल्या अ. भा. हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचे अुद्‌घाटनीय भाषणात मी स्पष्टपणे पहिली घोषणा केली की ब्रिटिशाच्या परदास्यातून भारताची मुक्तता करण्याचें नि स्वतंत्र नि सार्वभौम असें आपल्या भारताचें संघराज्य करण्याचें श्रेय हें सशस्त्र किंवा नि.शस्त्र अशा कोणत्याही अेका पक्षाचें नसून तें गेल्या २–३ पिढ्यांतील सर्व पक्षांच्या सर्व स्वदेशनिष्ठ कार्यकर्त्यांचें समाअीक श्रेय आहे! १८५७-च्या सशस्त्र क्रांतिवीरांचा वाटा तर त्यात आहेच आहे. पण त्यानंतरच्या देशभक्त दादाभाअींपासून देशभक्त गोखल्यांपर्यंतच्या नेमस्त म्हणविणाऱ्या पक्षातील सर्व कार्यकर्त्यांनाही ते श्रेय यथाप्रमाण मिळाले पाहिजे. राष्ट्रीय किंवा जहाल म्हणून ज्या पक्षाला म्हणत त्याचाही वाटा ह्या सामुदायिक क्षेत्रात आहेच आहे. स्वत स असहकारवादी आणि अहिंसक म्हणवून घेणाऱ्या सहस्रावधि देशभक्तांनी नि देश-सेवकानी ह्या राष्ट्रीय स्वातंत्र्यास्तव जें भारतव्यापी कार्य केलें त्याविषयीही आम्ही सर्वांनी कृतज्ञता व्यक्तविलीच पाहिजे. मी तर ह्याच्याही पुढे जाअून स्वानुभवाने असें सागतो की, सशस्त्र वा नि.शस्त्र अशा कोणत्याही गुप्त वा प्रकट चळवळीत सक्रिय भाग ज्यानी घेतला नाही परतु ज्यानी ज्यांनी आपापल्या हृदयांत मूक सहानु-भूति बाळगली आणि 'देवा, माझ्या भारताला स्वतंत्र कर' म्हणून अबोल प्रार्थना केल्या, अशा आमच्या लक्षावधि स्वदेशबाधवांच्या त्या मूक शुभाशीर्वादांनाही आजच्या आपल्या ह्या राष्ट्रीय विजयाचें श्रेय त्या त्या प्रमाणात आहेच आहे. रामायणाविषयी येथे लागू पडेल अशी अेक सुदर कथा आहे. जेव्हा रामाचें सशस्त्र सैन्य लंकेवर चालून गेलें तेव्हा समुद्र आडवा आला. शस्त्र टाकून रामाने त्याची पूजा केली, प्रार्थना केली की वाट दे. पण तो सागर अधिकच क्रुद्ध लागला. शेवटी रामाने धनुष्यावर अमोघ बाण चढवून दटावलें 'देतो कीं नाहीं वाट' त्यासरसी मात्र भयभीत होअून तो समुद्र प्रसन्न झाला नि वाट दिली. तुळसीदासजी ह्या कथेत म्हणतात 'भयबिन होय न प्रीत '!! पुढे रामसैनिक सेतु बाधू लागले. तिथेच अेक खाल होती तिला काही प्रचंड शिळा किंवा लहानसा दगडही त्या समुद्रात सेतुच्या आधारासाठी

भर टाकता येणें शक्य नव्हतें. तरी त्या सत्कार्यास जो शक्य तो हातभार लावण्यासाठी तिने आपलें अंग पाण्यात ओलें करावें, वाळूत घुसळावें आणि सेतूपाशी जाऊन सेवढी वाळू तेथे त्या पाण्यात झाडावी. तिला समुद्रात तेवढीच भर टाकणें शक्य होतें. त्या भरीचें स्थूल गणिताने काहीच मूल्य नव्हतें, पण सूक्ष्म गणिताने त्या वाळूच्या कणांचीही शून्यापेक्षा कांहीतरी अधिक भर पडतच होती. आणि त्या खारीच्या सद्भावनेची भर तर अगणितच होती. अशा अुदार, व्यापक नि प्रामाणिक दृष्टीनेच आम्ही सर्वांनी ह्या आपल्या स्वातंत्र्यसंपादनाचें श्रेय, नुसत्या सदिच्छकापासून तों निःशस्त्र नि सशस्त्र प्रतिकारकापर्यंत सर्वांचें मिळून, सामुदायिक श्रेय आहे अशी यथाप्रमाण कृतज्ञता बाळगली पाहिजे, अशा नि.पक्षपात भूमिकेवरून जें जसें घडलें तें तसेंच सांगणारा जो अितिहास लिहिला जाअील तोच खरा अितिहास!

परंतु अशा नि.पक्षपाती नि व्यापक दृष्टीने स्वातंत्र्यासाठी झुजून सशस्त्र निःशस्त्र प्रतिकारकांना यथाप्रमाण गौरविण्याचें सोडून गेली चार पाच वर्षे नामधारी अहिंसक पक्षाने 'आम्हीच केवळ अहिंसेने नि नि.शस्त्र मार्गाने स्वातंत्र्य मिळविलें' असे म्हणत पिटून सशस्त्र क्रांतिकारक हुतात्म्यांची नि वीरात्म्यांची नांवेंसुद्धा शक्य तर काय पण प्राधिक अितिहासातूनही पुसून टाकण्याचे अटोकाट प्रयत्न चालविले आहेत. आज त्या कॉंग्रेसी म्हणविणाऱ्या पक्षाच्याच हातीं राजसत्ताही आहे त्यामुळे तर हा अश्लाघ्य नि खोटा अेकपक्षीय प्रचार आचारातही नडू लागला. सन १९२० पासूनच काय तो 'स्वराज्याचा लढा'—लढा हा शब्दही अहिंसक नाहीच म्हणा—चालू झाला. हाच त्याच्या ह्या खोट्या अितिहासाचा श्रीगणेशा आहे. जे जे देशभक्त लोक ह्या निःशस्त्र अहिंसक मार्गाने काही महिने किंवा काही वर्षे बंदिवासात गेले त्यानाही आम्ही देशभक्त म्हणतो आणि यथाप्रमाण त्यांचेही आम्ही अुतराअी व्हावयास पाहिजे हे आम्हांलाही कर्तव्य वाटतेंच, हें मी आधी सांगितलेंच आहे पण तेच काय ते देशभक्त नि त्याच्या बंदिवासातील त्यागालाच काय ते स्वातंत्र्याचें श्रेय आहे अशा करंट्या नि कंजूष मनोवृत्तीने आमच्याच पैशानें भरलेल्या राज्यीय तिजोरींतून लक्षावधि रुपये ह्या सापेक्षत. दुय्यम प्रतीच्या कॉंग्रेसी म्हणविणाऱ्या देशभक्तांना त्यांच्या देशभक्तीचें पारितोषक म्हणून वाटण्यात आलेले आहेत, येत आहेत. त्यांना नि त्याच्या कुटुंबांनाही भूमिदानें, द्रव्यदानें, अधिकारस्थानें देण्यात येत आहेत, कॉंग्रेसी देशभक्ताची ही लूट आता अितक्यापर्यंत पोचली आहे की कॉंग्रेसचेच अख्यात पुढारी नि मद्रासचे मुख्य प्रधान श्री. राजगोपालाचारी ह्यानासुद्धा अलीकडे असें स्पष्टपणे सांगावें लागलें की 'आता यापुढे कोणालाही राज्यकोषातून असीं दानें दिलीं जाणार नाहीत.' राजाजींच्या शब्दात सांगायचें तर देशभक्तांच्या हुंड्या यापुढें राज्यीय पेढ्यांवर (बॅंकावर) पटणार नाहीत. पण हा प्रश्न केवळ देशभक्ति पैशानेच मोजण्यापुरता असता तरीही या महोत्सवात मी ती गोष्ट अुल्लेखिलीसुद्धा नसती. कारण जे सशस्त्र क्रांतिकारक वीरात्मे नि हुतात्मे स्वातंत्र्यासाठी

रणात लढून आधीच दिवंगत झालेले आहेत त्यांचाच काय तो हा अुत्सव आहे. त्यांना तुम्ही अेक अेक कोहिनूर जरी अर्पावयाचा म्हटलेंत तरी तो हाती घेण्यास ते आज अिथे या कर्मभूमीत थोडेच येणार आहेत ? देशभक्तांच्या झुंडचा तुमच्या दीड दमडीच्या पेढ्यावर पटवायच्या अमस्या तरने पन्नास वर्षापूर्वीच धिंग्रासारखे, कन्हय्यासारखे कान्हेरेसारखे, भगतसिंगासारखे फाशावर लटकून स्वर्गाच्या धन्यभूमीत पुन्हा न परतणारा प्रवेश करावयास धजलेच ना ! तर कोठल्याही अ वर्गाच्या वदिशाळेत मोर्मव्यांचीं पासंलें रिचवून ते दोन तीन महिन्यात बाहेर येअून मिरवत राहिले असते. अेक दिवस कां होअीना पण जो स्वदेशासाठी बंदिवासात पडला तोही देशभक्तच आहे आणि त्याच्याविषयी अेक दिवसापुरती कृतज्ञता आम्हांस वाटते. परंतु जेव्हा पंडित नेहरूसारखा आज भारतीय राज्याचा पंतप्रधान झालेला व प्रिमीय देशभक्त—जरी त्याचीही देशभक्ति आम्ही सादर गौरवितो—प्रसिद्धपणे गर्जू लागतो कीं 'खुदिराम प्रभृति सशस्त्र क्रांतिकारकांची मनोवृत्ति विकृत होती नि म्हणून त्यांना गौरविणें अश्लाघ्य आहे' तेव्हा कृतज्ञतेसाठी, अैतिहासिक सत्यासाठी, राष्ट्राच्या हितासाठी आम्हास स्पष्टपणे सांगावें लागतें की जर कोणाची देशभक्ति सगळ्यात अधिक गौरवार्ह असेल तर ती फाशावर गेलेल्या किंवा सशस्त्र युद्धात लढत लढत मारल्या गेलेल्या क्रांतिकारकांचीच होय. चाफेकरांचे किंवा लढत्या नि जळत्या विमानात भस्म होअून गेलेल्या सुभाषचंद्रांचें नांव घेताच तुमचा त्याग नि धैर्यवृत्ति तुम्हास तुमच्याच मनातल्या मनात दुय्यम प्रकारची, खुजी नि क्षुल्लक वाटते म्हणून तुम्ही त्यांच्या नांवाचा गौरव करण्यास कचरता, भिता. ही तुमची देशघातक कुमत्सरी, करंटी, महत्वाकांक्षाच विकृत मनोवृत्तीची द्योतक आहे. अशी अन्याय्य वस्तुस्थिति आज आहे. म्हणूनच आज ह्या दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांचाच काय तो महोत्सव साजरा करण्याची आणि त्यांच्या दिव्य स्मृतीला स्वतंत्रपणे सामुदायिक श्रद्धांजलि अर्पिण्याची आवश्यकता अुत्पन्न झाली ! पक्षाध व्यक्तींच्या हातून कृतघ्न अन्याय घडोत, पण निदान आमच्या राष्ट्राच्या हातून, अितिहासाच्याच हातून तसा कृतघ्नपणाचा अपराध घडू नये, स्वातंत्र्यार्थ झगडलेल्या सर्व देशभक्तांचाच यथाप्रमाण गौरव व्हावा म्हणूनच आज ज्यांनी सर्वांहूनही अधिक त्याग केला, सर्वांच्या पुढच्या आघाडीवर राहून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा ध्वज प्रथम अुभारला आणि त्याच्या विजयास्तव ब्रिटिशांशी शेवटपर्यंत मारिता मारिता रणांत मरेतों झुंज दिली, त्या १८५७-पासून तो १९४७-पर्यंतच्या सशस्त्र क्रांतिकारकांचा आज आम्ही स्वतंत्रपणे नि प्रकटपणे जयघोष करीत आहो. त्यांना श्रद्धांजलि वहात आहो.

वीर सावरकर पुढे म्हणाले, "पन्नास वर्षापूर्वी कोणच्या परिस्थितीत क्रांतिकारक व्यक्तिसंघटनांनी कार्य केले त्याची आजच्या मध्यम वा तरुण वयाच्या स्त्री पुरुषांना जाज्वल्य कल्पना असणें दुर्घट आहे. कोणतीही महान् क्रांति, मग ती राजकीय असो वा सामाजिक असो, अेक तर कोणा अलौकिक व्यक्तीच्या प्रभावानें

होते किंवा सामुदायिक अुत्थानाने होते. सर्व समाजाचें दायित्व अेकेका व्यक्तीने त्या समाजाचें सार्वमत नेतल्यावाचून आपल्या अेकेकट्याच्या हाती घेणें योग्य कीं अयोग्य, पुण्य कीं पाप असा पुरातन तात्त्विक प्रश्नांची येथे अुठाठेव करावयास आपल्याला वेळ नाही. तथापि त्या वेळच्या परिस्थितीची तशी कल्पना आपणां सर्वांस अंशतः तरी येण्यासाठी मी अेकदोन अुदाहरणें, अेकदोन घटनाच (facts) सांगतो.

त्या काळी हा आपला सारा देश आणि सारा समाज आपल्या नि जगाच्या मते राजकीय दृष्ट्या मृतवत् झालेला होता, राष्ट्र असें आपण राहिलोच नव्हतो. आपल्या मातृभूमीला सिंहासन नव्हते, राज्य नव्हते, ध्वज नव्हता, नाव नव्हतें, हातीं शस्त्र नव्हते, पायीं बळ नव्हतें, ती परवशांची केवळ अेक वखार झालेली होती. पारतंत्र्यामुळे होणाऱ्या अंतर्गत असह्य वेदना व्यक्त करण्याचीसुद्धा तिला शक्यता नव्हती. ब्रिटिशांच्या बेयोनेटानी आमच्या ह्या मातृभूमीला शरपंजरी खिळून टाकलेलें होतें. तिच्या अपमानांचा, छळांचा, पीडेचा दुःखावेग हृदयातल्या हृदयात ठणकत होता. पण तिला कण्हण्याची मुद्रा चोरी होती.

आमच्या राष्ट्रातील कोटी कोटी लोकांना समाज अितका चैतन्यहीन होअून पडलेला होता की, त्याला आपल्या ह्या मातृभूमीच्या, आपल्या ह्या राष्ट्राच्या मरणासन्न अवस्थेची, ह्या अपमानाची ह्या पारतंत्र्याची जाणीवही अुरली नव्हती. मग त्याची चीड येण्याची गोष्टच दूर!

## समाजासाठी व्यक्तीने वाट पहावी काय ?

तथापि समाज, समाज असा जरी निळाजरा नि निश्चेतन होअून पडलेला होता तरी काही व्यक्तींच्या हृदयात मात्र चैतन्य सळमळत होतें. आपल्या मातृभूमीचा हा छळ, अपमान, ही दुर्दशा पाहून त्या वीर हृदयाना अितका चेव येअी की, माझे अितर देशबांधव माझ्या मातृभूमीच्या ह्या छळासाठी शत्रूचे पारिपत्य करोत वा न करोत, मी तरी माझ्या हातून होअील तितका परशत्रूचा प्रतिकार करणारच करणार. माझ्या राष्ट्राला दास्यमुक्त करण्याचे दायित्व सर्व राष्ट्रावर आहे. त्या अर्थीच त्याचा माझ्यापुरता भाग माझ्या स्वत:वरही आहेच आहे. अितरानीं आपआपलें ऋण फेडलें नाहीत म्हणून मीही माझ्या राष्ट्राचे, माझ्यावर जन्मादारभ्य आलेले माझ्या देशाचें ऋण फेडू नये की काय ? राष्ट्र मूर्च्छित पडलेलें, पण माझ्या राष्ट्राचा सूड घेण्याची ही जी अीश्वरी प्रेरणा नि वीरश्री माझ्या हृदयात संचरत आहे तीच मला माझ्या राष्ट्राचे प्रतिनिधित्व अर्पण करीत आहे. ह्या परिस्थितीत मीच राष्ट्र आहे. आणि म्हणून माझ्यापुरतें शत्रूचे शक्य ते पारिपत्य मी करणारच करणार! शत्रूचा सूड घेणारच घेणार, अशा निकराच्या वीर वृत्तीने, तो समाज, समाज असा, निश्चेतन पडलेला असताही ते शतावधि क्रांतिकारक आपल्या राष्ट्रशत्रूवर, ब्रिटिश शत्रूवर जशी संधि सापडेल तसे तुटून पडत गेले. ब्रिटिशाच्या प्रत्येक अत्याचारासाठी त्या त्या ब्रिटिश अधिकाऱ्यास प्राणदंड देत चालले.

समजा, अेका पितृहीन कुटुंबात त्याची चालक असलेली माता असह्य रोगाने अंथरुणास खिळून पडली आहे. तिचीं मुलें चांगलीं वयात आलेलीं आहेत. परंतु तीं नादिष्ट, वेडपट नि अंगचुकार आहेत. आओीला असा वेदना होत असताही तिकडे लक्ष न देता त्या मुलांपैकी कोणी साहित्यसेवा हेंच ध्येय मानून अेक कादंबरी लिहिण्यात गुंग आहे. दुसरा ज्योतिष शास्त्राचे वेध घेण्यासाठी गच्चीवर दुर्बीण लावून बसला आहे, तिसरा संगीत हेंच ध्येय मानून सतार छेडीत आहे. बाहेर निबिड अंधार ! कोणीही त्या मूर्च्छित आओीसाठी त्या भावांना जो अेक जवळचाच निष्णात वैद्य माहीत होता, त्या वैद्यास बोलविण्याकरिता बाहेर पडत नाही. पण अेका पुत्रास मात्र, त्या साहित्य-संगीतादि साऱ्या शास्त्रांविषयी आदर असताही, आओीचें तें प्राणसंकट पाहून त्या वैद्यास बोलावून आणणें हे प्रथम कर्तव्य वाटलें. त्याचें हृदय आओीच्या विव्हळ-ण्याने अितकें तडफडू लागलें की, त्याला शक्यतों अुपाय केल्यावाचून कळच निघेना. आता अितर भाअू त्यांचें तें कर्तव्य करोत वा न करोत मी तरी तत्काल बाहेर पडून ह्या काळोख्या रात्रीसुद्धा त्या वैद्यास घेअून येणार. काळोखात डोळ्यात बोट घातलें तरी दिसत नाही ? तर मग, मी ही माझ्या हृदयाचीच आगकाडी पेट-वून, दिसेल त्या अुजेडात बाहेर पडणार आओीचे प्राण वाचविण्यासाठी मी तरी माझें रक्तदान, प्राणदानही करून तिचा अुतराओी होओीन असा निश्चय करून जर तो पुत्र वैद्याकडे अेकटा धावत गेला, तर कुटुंबाचे बहुमत मानलें नाही म्हणून त्यास दोषी ठरविण्यास किंवा आततायी म्हणण्यास तुमच्यांतला मेल्या आओीचें दूध प्यायलेला सुद्धा कोणी धजेल काय ?

## सीतामाओीच्या वरदानाची अिंग्रजी आवृत्ति

तोच न्याय त्या वेळच्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या गुप्त नि अेकाक्या अुठाव-ण्यास लागू आहे. राष्ट्रातील कोटी कोटी लोकांना पक्षघाताने अवयवास यावी तशी बधिरता येअून ते राजकीय दृष्ट्या मूर्छितच पडलेले होते. जे काही लोक राजकीय चळवळी करीत होते, त्यांना सत्य सांगण्याची चोरी झाली होती. सत्य कळतही नव्हते. तुमच्यातील विशी-तिशींच्या लोकांना जी अैकून क्वचित् गंमत किंवा आश्चर्य वाटेल अशी अेक, येथे अगदी लागू असलेली नि अत्यंत अर्थगर्भ गोष्ट मी तुम्हास सांगतो. मला स्वतःला दोकडो वेळा आलेल्या अनुभवाने मी तुम्हास सांगतो की, त्या वेळी अिंग्रजी नवशिक्षण नसलेल्या अनेक पंडितांची नि लक्षावधि अशिक्षित वर्गाची अशी अेक धार्मिक समजूत होती की, त्रेतायुगी माकडांनी सीतादेवीला जें साहाय्य दिलें त्यामुळे प्रसन्न होअून सीतादेवीने त्या माकडांना वर दिला होता की, "कलीयुगी तुमचेच राज्य होअील." असा अनेक लोकांत जेव्हा आम्ही अिंग्रजांचे राज्य अुलथून पाडण्याविषयी प्रसंग पाहून प्रचार करू लागत असू तेव्हा तेव्हा हे पंडित

आणि हे अडाणी लोक आम्हांला सांगत की, ' अहो, सीतदेवीनी ज्या माकडाना राज्याचा वर दिला तेच हे ताम्रमुखी अिंग्रज आहेत. सीतामाअीचा वर तुम्ही आम्ही कसा खोटा पाडणार ? अिंग्रजांचें राज्य ही अेक अढळ नि दैवी घटना आहे. अशी ही भारतामधल्या लक्षावधि भाबड्या अशिक्षित लोकांची समजूत अेका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला अिंग्रजीचें नवशिक्षण मिळालेल्या बहुजनांची ती काँग्रेसीय प्रतिज्ञा की "We accept the British suzerainty over India as ordained in the inscruitable despensation of Providence for the good of India." हिंदुस्थानच्या कल्याणाकरिताच अीश्वराने अिंग्रजाचें अधिराज्य आपल्यावर स्थापलें आहे. पुरावाच हवा तर देशभक्त गोखल्यांच्या Servants of India Society ची भारत सेवक समाजाची मूळ प्रतिज्ञा पहा किंवा राष्ट्रपितामह दादाभाअींच्या घोषणा पहा. ही ब्रीदवाक्यें म्हणजे त्या ' अशिक्षिता 'च्या सीतामाअीच्या वर-दानाची ही सुशिक्षित राजकीय पुढाऱ्यांनी काढलेली अिंग्रजी आवृत्ति नव्हे काय ? त्या वेळची सगळ्यांत प्रमुख असलेली लोकप्रतिनिधि सभा जी काँग्रेस तिच्या अधिवेशनाचा आरंभ नि अंत ही दोन्ही अिंग्रजी बादशहाच्या त्रिवार जयघोषानेच होत असत !

तथापि अिंग्रजाच्या राजाला आपलाही बादशहा, राजा म्हणून त्याचे हे जय-घोष अैकताच ज्या पाणीदार देशभक्त व्यक्तींच्या अंगाचा तिळपापड होअी त्यांनी जर त्या अधिवेशनातच अुठून विचारलें असते की ' घरांत शिरला चोर तयासी मानितसा राजा ? ॥' तर त्याला त्या काँग्रेस मंडपांतील त्याच्या स्वकीयानीच हुल्लड करून, धक्के मारून हुसकून दिलें असतें; आणि जर त्या काँग्रेसने तसें केलें नसते तर ब्रिटिशांनी तोफा डागून ती काँग्रेसच्या काँग्रेसच अंतराळात अुडवून दिली असती.

अशा स्थितीत "ज्या ब्रिटिश लोकानी तुमच्या राष्ट्रमातेचें सिंहासन घेअून तिला त्यांची बटीक करून सोडली आहे ते तुमचे राजे नसून चोर आहेत, कट्टर शत्रु आहेत. अुठा आणि मिळेल ते ते नि:शस्त्र वा सशस्त्र साधन घेअून त्यांचे राज्य अुलथून पाडा, आपल्या अपमानाचा सूड घ्या " हें सत्य, ही घोषणा प्रकटपणे अुद्घोषिणे अशक्य होते म्हणूनच क्रांतिकारकाना अप्रकट नि गुप्त संस्था स्थापाव्या लागल्या. आणि हा समाज, हें राष्ट्र, राष्ट्र असें जितकें ब्याड, दास्यशील झालेलें होतें की, त्यांना ती सत्याची घोषणा अैकण्याची सुद्धा धमक अुरली नव्हती, अिच्छाही होत नव्हती ! म्हणूनच त्या मूठभर सशस्त्र क्रांतिकारकाना आपल्या स्वत:च्या दामिरवावरच आपल्या राष्ट्रधर्माचें, आपल्यास जमेल तसें आणि जमेल तितके तरी, प्राणांतिक पारिपत्य करून आपल्या भारतमातेचे अुतराअी होण्यावाचून गत्यंतर अुरलें नाही.

ह्या विधेयाचें (Point चें) आणखी काही सोदाहरण विवेचन केल्यानंतर वीर सावरकर म्हणाले, " जितर सर्व निःशस्त्र पक्षांच्या शेकडो ग्रंथ भरतील जितक्या शाब्दिक नि ब्रिटिश राजनिष्ठ युक्तिवादाच्या अुक्तींपेक्षा — त्या ग्रंथांचाही काही अुपयोग होतच होता हें न विसरताही — त्या मूठमूठ सशस्त्र क्रांतिकारकांच्या अेकेका रणकृतीनें ते मूर्छित राष्ट्रही कसें खडबडून क्षणभर तरी चमकून अुठे, नव्हे क्षणभर तरी थरकापू लागे आणि जगातील राष्ट्रेंही क्षणभर तरी त्या हिंदुवीरांच्या पराक्रमामुळे चकित होअून वाहवा! भलेवीर! असे अुद्गारून जात! हें सिद्ध करणाऱ्या अनेक प्रसंगांपैकी मी येथे अेका प्रसंगाचा तेवढा अुल्लेख करतो.

## शोभायात्रा की शवयात्रा

हिंदुस्थानावरील ब्रिटिश सार्वभौमत्वाचा नि आमच्या राष्ट्राच्या दास्यशीलतेचा डिंडिम मान्या जगभर पिटविण्यासाठी दिल्लीला ब्रिटिश व्हाअिसरॉय लॉर्ड हार्डिंज याचा मोठा दरबार आज भरणार आहे. त्याची ही भव्य मिरवणूक निघाली आहे. तिला शोभा आणण्यासाठीं हिंदुस्थानातील सारे राव, राजे महाराजे, सूर्यवंश, चंद्रवंश, अग्निवंशाचे कुलदीपक आपआपल्या राजसंभारानिशी तिये त्या मिरवणुकीत हत्तीवर बसून चालले आहेत. लाखो हिंदी नागरिक मिरवणुकीत मार्गावर गच्चीवर ती शोभा पाहण्यास दाटले आहेत; मधोमध त्या सगळ्या हत्तींच्या थव्यांत अैरावतासारख्या शोभणाऱ्या नि शृंगारलेल्या भव्य हत्तीवर, रत्नजडित सोनेरी अंबारीत, हिंदुस्थानावरील ब्रिटिश व्हाअिसरॉय लॉर्ड हार्डिंज विराजमान झाला आहे. त्याचे पुढेमागे शेकडो निवडक अिंग्रजी घोडेस्वार आपल्या तरवारी मधून मधून तळपवीत ब्रिटिश राष्ट्रगीताच्या अनेक बॅंडच्या तालावर टापा टाकीत चालले आहेत, आमच्या देशाच्या भूमीच्या छातीवर आमच्या राष्ट्रीय अपमानाच्या पायघड्या अंथरून तिच्यावर नाचत ही लाखो लोकांची मिरवणूक चालली असता ब्रिटिशांचा ध्वज यूनियन जॅक अंतराळात अुंच अुंच फडकत आहे! त्याच्या सन्मानार्थ ठिकठिकाणी तोफांच्या फैरी गडाडत आहेत!

त्या लाखो हिंदी प्रेक्षकवर्गातून, त्या रावापासून रंकापर्यंत, ह्या राष्ट्रीय अपमानाच्या निषेधाचा अेक चकार शब्दही काढण्याची कोणाची प्राज्ञा होत नाही. अुलट त्याच्यातून ब्रिटिश राज्याच्या नि त्या व्हाअिसराय हार्डिंजच्या जयजयकाराचे तुंबळ ध्वनि निनादत आहेत. तो आमचा समाज, समाज अगा, ती 'शोभा' पाहण्यात रंगून गेलेला आहे!!

—पण अवघ्या दहापांच हिंदु तरुणाना मात्र, ती मिरवणूक म्हणजे शोभायात्रा नसून आमच्या राष्ट्रीय मानाची, स्वातंत्र्याची शवयात्राच चालली आहे असें वाटून त्यांच्या अंगाचा संतापानें तिळपापड झाला. भारतीय 'समाज' असा मेलेला, भारतीय 'राष्ट्र' असे चैतन्यहीन नि लज्जाविहीन झालेलें, पण आम्हीही

भारतीयच आहोत कीं नाही, आमचा संताप, हीही राष्ट्रीय, त्या प्रमाणातील राष्ट्रीय प्रेरणाच नव्हे का? आमच्यातील प्रत्येकाला तरी हा राष्ट्रीय अपमान सहन होत नाही हपास्तवच जोवर हा समाज आणि हें राष्ट्र मूर्छित होऊन शत्रूच्या पायदळी तुडविलें जात आहे तोवर तरी मला प्रत्येकाला त्या राष्ट्रीय अपमानाचा सूड घेण्याचा अधिकार आहे – नव्हे तें माझें कर्तव्य आहे. अशा क्षणी मीच राष्ट्र आहे ! ! ! अशा प्रेरणेने त्या दहापांच हिंदु तरुणांनी असा दरबार होणार हें ठरलें तेव्हाच ब्रिटिशांच्या त्या अपहृत्याचा सूड घेण्यासाठी कट रचला होता. त्यांची जय्यत सिद्धता झाली. पण ती पाच, अक्षरी पाच, हिंदु तरुणांची सिद्धता आणि ही जगातील अत्यंत प्रबळ असा ब्रिटिश साम्राज्याच्या व्हॉअिसरॉयाच्या चतुरंग ब्रिटिश आणि देशी सैन्याने तलवारींनी नि तोफांनी संरक्षिलेली लक्षावधि नागरिकांची मिरवणूक, शोभायात्रा त्यातही ते व्हॉअिसराय लॉर्ड हार्डिज अैरावतावर बसलेल्या अिंद्राअितके अुंच बसलेले; आणि ह्या दहापांच क्रांतिकारकांचें आपल्या नुसत्या पायांच्या अुंची-अितकेच बुटके पायदळ ! त्यांच्या धैर्याची अुंची त्यांच्या कामास काय येअील ती खरी !

दिल्लीच्या चांदणी चौकात मिरवणूक आली. तिच्या अुत्साहाचा कळस झाला. भाविक नागरिक — म्हणजे आमचा समाज — गच्च्यागच्च्यावरून फुलांचा आणि शुभेच्छादर्शक नारळ, सुपाऱ्या, लाह्या यांचा वर्षाव करीत आहे ! तोच ! —

अेका नारळामारला पदार्थ थेट त्या अैरावतावरील अंबारीच्या रोखाने येऊन आदळला !

आणि तोफेमारला स्फोटक गडगडाट होऊन अेकच हलकल्लोळ माजला !

तो स्फोट त्या क्रांतिकारकांनी लॉर्ड हार्डिजवर फेकलेल्या अेका भयंकर बॉंबचा होता ! अत्युत्कट ध्येयाने नि अचूक नेमाने फेकलेल्या त्या गूढघेत्या बॉंबच्या स्फोटासरशी हत्ती गडबडला ! त्यांचा माहूत ठार होऊन पडला. अंबारी डळमळली आणि स्वतः ब्रिटिश व्हॉअिसराय लॉर्ड हार्डिज रक्ताच्या थारोळ्यात कोसळला, पण ठार झाला नाही. तथापि अेका पाच मिनिटाच्या आत गाऱ्या मिरवणुकीत 'बडा लाट मारा गया ' असा अेकच आरोळा माजला ! सारे ब्रिटिश घोडेस्वार नि सैनिक संतापत झाले, पण शत्रु कोण नि कोठे आहे हेंच कळेना ! मिरवणूक मुधळून गेली. अैरावत परतला त्या लाग्याच्या शोभायात्रेची त्या दहापांच क्रांतिकारकांनी दाणादाण करून सोडली

हा हां म्हणता देशी विदेशी वार्तापत्रांत जे हेतुन. ब्रिटिश गौरवाच्या त्या दरबाराचा गाजावाजा जगभर पसरविण्यासाठी पाचारलेले होते त्यांना त्या दरबाराच्या अुद्घाटनाच्या ह्या बॉंबवार्तेच्याच वार्ता धाव त्या धडाक्या लागल्या आणि त्यांत मात्र त्या जगभर दुमदुमा गेल्या. हिंदुस्थानांतील लोकमान्यपदापर्यंतच्या त्या मोठी मोठी लोकांना राजकारण कशाशी खावें हें माहीत नव्हते त्यांच्या

बाजारावाजारातून मुद्धा ' अिंग्रजांचा वडा लाट मारा गया ' ही भयंकर बातमी मात्र धणव्यामारखी आपणहून पसरली. आणि तिच्यातील तो भयंकर राजकीय अर्थही त्याना सहजच समजल असा ह्या चार शब्दांत सांगितला गेल्यामुळे त्यांना कळला. सान्या पंरराष्ट्रांतही ही जाणीव झाली की, अिंग्रजांच्या राजसत्तेचा सूड घेणारा कोणता तरी अेक जिवावर अुदार झालेला पक्ष हिंदुस्थानात लढत आहे.

नंतर ' अभिनव भारताची ' आणि अेकंदर सशस्त्र क्रांतिकारक पक्षाच्या युद्धनीतीचीं तत्वें आणि त्याच्यावर त्या काळीं नि आजही ब्रिटिश शत्रूकडूनच नव्हे, तर भोंगळ किंवा भित्र्या स्वदेशीय पुढाऱ्यांकडूनही येणाऱ्या आक्षेपाला अुत्तरें, हीं आजच्या भाषेत न सागता अगदी त्या वेळच्या क्रांतिकारकांच्याच तोंडातील भाषेत अेकविण्यासाठी वीर सावरकर म्हणाले, ' हुतात्मा मदनलाल धिंग्रा यांचें सुप्रसिद्ध वक्तव्यच मी तुम्हास वाचून दाखवितो म्हणजे मला त्यावर आजचा असा अेक शब्दही अधिक बोलण्याची आवश्यकता अुरणार नाही. '

## क्रांतिकारकांचें मनोगत

अिथे धिंग्रानें न्यायालयात दिलेलें Challange (आव्हान) नावाचें सुप्रसिद्ध अिंग्लिश वक्तव्य सावरकरांनी वाचून दाखविलें. व ते म्हणाले, " हुतात्मा धिंग्राचें हें वक्तव्य, हा स्वतः क्रांतिकारकांचें मनोगत व्यक्तविणारा अेक बहुमोल असा प्रलेखीय पुरावा (Documentary Evidence) आहे. दुसरें असें की, आरामशीर सार्वजनिक सभेतल्या सुशोभित वाक्पीठावरील भाषणातील किंवा नाटकातील तो अुतारा नाही. कारण साऱ्या हिंदुस्थानात, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची किंवा स्वातंत्र्य संपादिण्याच्या अिच्छेची सुद्धा ज्यावरुन घोषणा करता येअील असें अेकही वाक्पीठ ब्रिटिशानी त्या काळीं अुरू दिलें नव्हते. तथापि जें वाक्पीठ अुखडून टाकणें ब्रिटिशाना अशक्य होतें, अितकेच नव्हे, तर जे वाक्पीठ त्याना स्वतःच्याच खर्चानें वारंवार अुभारावें लागे आणि ज्या वाक्पीठावरून साऱ्या हिंदुस्थानास नि काही प्रसंगी जगासही अैकू जातील अितक्या अुच्च स्वरात ' भारतीयांनो, अुठा, ब्रिटिश राज्यसत्तेचें अुन्मूलन करून ही आपली भारतभूमि स्वतंत्र करण्यासाठी, माझ्या कोटी कोटी देशबाधवानो, नागरिकांनो नि सैनिकांनो, ब्रिटिशा-विरुद्ध शस्त्रसज्ज होअून अुठा, मारणाम नि मरणाम तोंड द्या ! ब्रिटिश शत्रूना मारीत मारीत कसें मरावें हया रणहुन्याचें हें घ्या मीच स्वतः अेक प्रात्यक्षिकच करून दाखवितो ! ' असें स्पष्टपणें अुद्घोषिता येअी, असें अेकच वाक्पीठ काय तें साऱ्या हिंदुस्थानात अुरलेलें होतें; तें अितकें अुच्च होतें की, त्यावर जो चढू शकेल त्यानें अेक पाय पुढे टाकला की, तो स्वर्गातच पडावा, त्या अेकमेव वाक्पीठाचें नांव होतें हुतात्म्यासाठी अुभारलेला फाशीचा फळा.

अशा वाक्पीठावरून केलेल्या वक्तव्याचा प्रामाणिकपणा नि स्वार्थनिरपेक्षता केवळ अलौकिक असतेच असते. त्यातील काही वाक्याचा गूढार्थ तेवढा तरी अिथे सांगितलाच पाहिजे. सशस्त्र क्रांतिकारकावर जे परकीय नि स्वकीय आक्षेप घेत की, "तुम्ही युद्धाची अुघड घोषणा करून अुघडपणे अिंग्रजांशी का लढत नाही ? असे चोरटे छापे हे 'खुनी' आहेत" त्या परकीय शत्रूंच्या मायावी आक्षेपांना निरुत्तर करणारें अुत्तर देताना धिंग्रा म्हणतात, "I believe that a nation held in bondage with the help of foreign bayonets is in a perpetual state of war." म्हणजे युद्धघोषणा केलेलीच आहे ! आणि गुप्त छाप्यासंबंधी विचाराल तर " Since open battle is rendered impossible to a dis-armed race, I attacked by surprise; since guns were denied to me, I drew forth my pistol and fired."

## स्वातंत्र्यसमर हें दैवी कार्य होय

हुतात्मा धिंग्रा हे कट्टर हिंदु होते. भारताचें स्वातंत्र्ययुद्ध हे केवळ मानवी किंवा तामसी कार्य नसून तें दैवी कार्य आहे, तें श्रीरामाचें कार्य आहे, तें श्रीकृष्णाचें कार्य आहे. अेका व्यक्तीच्या जीवनावर किंवा मरण्यावर तें अवलंबत नाही. हें खण-खणीतपणे बजावून सांगण्यासाठी ते पुढे म्हणतात, " As a Hindu, I feel that a wrong done to my country is an insult to God. Her cause is the cause of Shri Ram. Her services are the service of Shri Krishna. दुसरे कोणी आपले कर्तव्य करोत वा न करोत त्यांच्यासाठी निरवधि थांबत ताटकळत बसण्यापेक्षा ह्या कार्यासाठी मी तरी माझें सर्वस्व अर्पून टाकतो! कारण A son like myself has nothing else to offer to the Mother but his own blood. And so I sacrifice the same at her altar. Because the only lesson required in India, at present is to learn how to die! And the only way to teach it, is by dying ourselves. (Therefore) I shed English blood as an humble revenge for the inhuman hangings and deportation of patriotic Indian youths."

पुढे या रणकृत्यामधली आपल्या कोणत्याही क्रांतिकारक संस्थेवर किंवा सह-काऱ्यावर संकट कोसळू नये म्हणून धिंग्रानी स्पष्ट सांगितले की In this attempt I have consulted none, but my own conscience; I have conspired with none but my own duty शेवटी त्यानी प्रार्थिलें की "My only prayer to God is · may I be reborn of the same mother and may I redie for the same cause till the cause is successful and she stands free for the good of humanity and the glory of God!"

हुतात्मा धिंग्रांना फाशीवर दिलें गेल्यापासून १९४७-मध्ये स्वातंत्र्य मिळे-पर्यंत ४० वर्षे तरी अुलटून गेलीं. पण त्या चाळीस वर्षांत, त्यांच्या त्या फाशीच्या

फळधाच्या रक्तानें चिंब झालेल्या रक्तभीषण वाक्यांतावरून उद्घोषिलेल्या ह्या वक्तव्याचा शब्द न् शब्द सहस्रावधि हिंदु तरुणांच्या आणि वृद्धांच्याही हृदयांना सारखा पेटवीत राहिला. "अिंग्रजांच्या गाण्या तोफांचें नि तलवारींचें संरक्षण मला आहे, मी ह्या माझ्या हिंदुस्थानातील न्यायालयात बसून, ब्रिटिशांच्या हातातून स्वतंत्र होअू पाहणाऱ्या वाटेल त्या हिंदी देशभक्ताला वा क्रांतिकारकाला शिक्षा ठोकीन, काळ्या पाण्यावर धाडीन, फाशी देअीन, हे भुक्कड वाचावीर हिंदी पुढारी नि लोक माझें काय वाकडें करू शकणार' अशा दर्पाने अिंग्रजी न्यायाधीश नि राज्य-कर्ते शूरतेचें थैमान घालीत होते. पण सशस्त्र क्रांतिकारकांच्या वरील वक्तव्यात उद्घोषिलेल्या तत्त्वांच्या नि रणकृत्यांच्या जिवंत आगीशी जेव्हा खेळ खेळावा लागला तेव्हा त्या मदांध ब्रिटिश अधिकाऱ्यांचीही बोबडी वळू लागली. 'आमच्या न्यायालयाप्रमाणेच ह्या सशस्त्र क्रांतिकाराचेंही अेक न्यायालय आहे. कोण्या हिंदी देशभक्ताच्या जिवाशी खेळ खेळणें म्हणजे प्रसंगी, आपल्या संरक्षणार्थ सज्ज अस-लेल्या साऱ्या अिंग्रजी साम्राज्याच्या तोफा नि तलवारी कुचकामी ठरून, आपला स्वतःचाच जीव गमावणें होय!' ही जाणीव त्या ब्रिटिश अधिकाऱ्याला सतावू लागली. अुलटपक्षी आमच्या देशाचा अपमान केल्यास किंवा आमच्या देशभक्तांच्या प्राणा-वर घाला घातल्यास आम्हीही आज ना अुद्या त्याचें अुट्टें घेअू शकतो, शत्रूचेंही रक्त सांडू शकतो ह्या जाणिवेने, असहायतेपायी तोवर चेतनाहीन बनलेल्या त्या लक्षा-वधि हिंदी लोकांत, गुप्तपणे व प्रकटपणे आत्मविश्वासाच्या वीरश्रीची संवेदना संचरू लागली.

## सशस्त्र क्रांतिकारकांची मालिका

खुदीराम, कन्हैयालाल यांना फाशी आणि बारिन, भूपेन, हेम, बाबाराव सावरकर प्रभृतींना काळेंपाणी अशा अघोरी शिक्षा ठोठावल्या त्याचा सूड म्हणून धिंग्राने लंडनमध्ये मुख्य 'सेक्रेटरी ऑफ स्टेट'चा अुजवा हात असलेल्या कर्झन वायलीला ठार मारलें. धिंग्राला फाशी दिले नि बाबाराव सावरकरांना जन्मठेप दिली ह्या अघोरी शिक्षाचें अुट्टें म्हणून अनंता कान्हेऱ्यांनी नाशिकचा कलेक्टर जॅक्सन ह्यास ठार मारलें. पुढे तुतिकोरीनच्या मॅजिस्ट्रेट अॅशने अत्याचार केले नि अभिनव भारताचे चिदंबरम् पिल्ले ह्यास त्याने जन्मठेप शिक्षा दिली म्हणून अभि-नव भारताचे पाँडेचरीचे सदस्य वंचुनाथ आयर ह्यांनी अॅशला ठार मारलें. अेका मिदनापूर जिल्ह्यात अेकामागून अेक आलेल्या अशा तीन अिंग्लिश मॅजिस्ट्रेटना बंगाली क्रांतिकारकांनी भितर क्रांतिकारकांच्या शिक्षेचा सूड म्हणून ठार मारले. प्रत्यक्ष व्हॉअिसरॉय लॉर्ड हार्डिंजला, हिंदुस्थानला बेयोनेटांच्या बळावर दास्यात डाबून ठेवणाऱ्या ब्रिटिश सत्तेचा हिंदुस्थानातील प्रतिनिधि म्हणून तो मिरवू लागताच भर अंबारीतून, बॉंबगोळा फेकून, खनाच्या थारोळ्यात लोळविला. लाला लजपतरायांना

लाठीमारात घायाळ केलें त्याचा सूड म्हणून भगतसिंगाने सँडर्सला ठार मारलें. जालियनवाला बागेतील आमच्या निःशस्त्र सभेवर विमानांतून बाँबफेक करविण्याचा धाक घालणारा आणि गल्ली कोंडून मशिनगन्सनी शतावधि मुडदे तत्काळ पाडविणारा पंजाबचा गव्हर्नर सर ओडवायर ह्याला शासन करण्यासाठी, सारें भारत रडव्या याचना करीत थकून गेलें, पण ब्रिटिशांनी त्याचा केंसही वाकडा केला नाही. तथापि सशस्त्र क्रांतिकारकांनी त्या सर ओडवायरला प्राणदंडाची जी शिक्षा दिली होती ती बजावण्यासाठी १५-२० वर्षे अुलटून गेल्यावरही संधि साधून भर लंडनमध्ये कॅक्स्टन हॉलच्या सभेत त्या सर ओडवायरवर क्रांतिवीर अुधमसिंग ह्याने कर्दनकाळासारखी झडप घालून त्याला ठार केलें नि स्वरः हसत हसत फाशी गेला. अशा क्रांतिवीरांच्या गुप्तसंस्थांचीं पुढे प्रकट सशस्त्र सैन्यपथकेंही अिंग्रजी ठाण्यावर चालून जाअू लागलीं ! अिंग्रजांची चितागांगसारखीं शस्त्रागारेंच अिकडे क्रांतिकारकांकडून लुटलीं जाअू लागलीं ! तर तिकडे संधि येताच युरोपमध्ये त्या क्रांतिकारकांच्या प्रकट सैन्यपथकाचीं प्रकट सशस्त्र सैन्येंच अुभीं राहिलीं. अिंग्लिशांच्या हिंदी सैन्यात क्रांतिकारकांच्या गुप्त प्रचाराने आणि अिंग्रजांच्या शत्रुस्थानी असलेल्या प्रबळ युरोपीय राष्ट्रांशी सशस्त्र क्रांतिकारकांनी केलेल्या संधिसहकार्यामुळे त्या पहिल्या महायुद्धात अिंग्लिशांच्या हाताखालील हिंदी सैन्यांनी हाँगकाँग, सिंगापूर प्रभृति ठिकाणी बंडें अुभारून, जर्मनीच्या अेम्डेनसारख्या भयंकर रणनौका भारतातील अिंग्लिश सत्तेवर मारा करण्यासाठी आणून आणि पंजाब प्रभृति प्रांतांतील हिंदी सैन्यात क्रांतीचीं स्फोटक द्रव्यें ठासून ब्रिटिशांचीं त्रेधातिरपीट अुडविली. अिकडे हिंदुमहासभेने सैनिकीकरणाचा धोशा अुडवून देअून, ब्रिटिशांना निरुपाय म्हणून जी सैन्यभरती दुसऱ्या महायुद्धासाठी करावीच लागत होती, तींत सहस्रावधि देशभक्त तरुणांची भरती करविली आणि त्यांनी ब्रिटिशांच्या साऱ्या हिंदी सैन्यात प्रसंग येतांच क्रांतीची ज्वाला पेटवून दिली. अिटलीत अजितसिंग, जपानमध्ये रासबिहारी आणि माझ्या सूचनेस स्वीकारून हिंदुस्थानातून निसटून जर्मनीत गेलेले सुभाषचंद्र बोस ह्यांच्या भगीरथ प्रयत्नाने शेवटी सिंहपुराला (सिंगापूरला) सशस्त्र क्रांतिकारकांचें साठ सहस्र, महायुद्धात कसलेलें, शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असें महासैन्यचें सैन्य 'चलो दिल्ली, चलो दिल्ली' म्हणून म्हणत गर्जून अुठलें. हिंदुस्थानात काँग्रेसच्या 'चलेजाव' ह्या निःशस्त्र चळवळीने सर्व सामान्य समाजात खळबळ अुडविली. पण त्याच वेळी अिंग्रजी सत्तेला सुरुंग लावणारें असें जें काही घडलें तेंही मुख्यतः काँग्रेसमधील जे देशभक्त भूमिगत होअून साऱ्या देशात सशस्त्र चळवळीचा धुमाकूळ घालू लागले त्यामुळेच होय. हिंदी नौदलही बंड करून अुठलें. विमानदलही क्रांतीच्या आचीने पेटण्याच्या बेतात आलें. तेव्हा कुठे बलाढ्य अिंग्रजही नरमला, आणि त्याच्या हातून आम्ही आमच्या मातृभूमीच्या पायात ठोकलेल्या राजकीय पारतंत्र्याच्या बेड्या तोडून टाकून तिला स्वतंत्र करू शकलो. अितक्यात अणू काय स्वातंत्र्यार्थ १८५७-मध्ये मंगल पांडे

यांच्या पहिल्या समिध्येने पेटविलेल्या ह्या रणयज्ञाची पूर्णाहुति देण्यासाठीच क्रांतिवीर नेताजी सुभाषचंद्र बोस ह्यांचीही समरांगणी आहुति पडली असें आजच्या उपलब्ध माहितीवरुन तरी म्हणावें लागतें. त्याच नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या स्मृतिमय अध्यक्षपदाखाली हा आजचा अभिनव भारताचा सांगता दिन साजरा होत आहे. सशस्त्र क्रांतिकारकांतील दिवंगत झालेल्या सहस्रावधि हुतात्म्यांना नि वीरात्म्यांना श्रद्धांजलि वाहण्यासाठी चाललेल्या ह्या अपूर्व समारंभाच्या अध्यक्षपदी विराजणाऱ्या त्या वीरवर नेताजी सुभाषचंद्रांचें हें पहा तें स्मृतिमय छायाचित्र! ! आणि तो पहा त्या सर्व सहस्रावधि दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांचा संहत स्मृतिमय असा वीरस्तंभ! ह्याना आता प्रकट श्रद्धांजलि वहावयाची आहे.

## समारंभाची अपूर्वाई

मी ह्या आजच्या समारंभाला अपूर्व असें जें आताच म्हटलें तें अगदी अक्षरश सत्य आहे. कारण मी मागेच सांगितलें आहे कीं, देशभक्त दादाभाईंपासून काल परवांच्या खेड्यापाड्यातील निःशस्त्र देशभक्तापर्यंत सर्व पक्षांतील निःशस्त्र देशभक्तांचा गौरव प्रकटपणे आपणा सर्वांनी आजवर केलेला आहे. फिरोजशहा मेथासारख्यांचे मुद्दा पुतळे अुभारलेले आहेत, आणि सध्याच्या शासनाद्वारेत्या सहस्रावधि देशसेवकांना व्यक्तिशः अिनामें, भूमि, पोषणें (पेन्शनें) दिलीं जात आहेत, —दिलीं जात आहेत, ते ठीकच आहे.—परतु सत्तावनच्या स्वातंत्र्यसमरासारखें महायुद्ध लढविणाऱ्या सशस्त्र क्रांतिवीरांपासून तों गेलें अुभें शतकभर अिंग्रजांच्या फाशीचा खाक आपल्या भारतमातेच्या स्वातंत्र्यासाठी आपल्या हृदयाचें रक्त ओतीत अेकमारखा ओघ चित्र ठेवणाऱ्या चाफेकर, पिंगळे, राजगुरु, भगतसिंग, ते सरदार अुधमसिंग पर्यंतच्या, सशस्त्र हुतात्म्यापर्यंतच्या, ब्रिटिशाना त्राहि भगवान् करुन शेवटी शरण आणण्यात आणि आपल्या मातृभूमीच्या मुक्ततेसाठी चालविलेल्या ह्या शतकव्यापी स्वातंत्र्यसंग्रामात त्यागाचा, पराक्रमाचा आणि असह्य छळाचाहीं अधिकात अधिक वाटा ज्यानी अुचलला त्या ह्या सहस्रावधि सशस्त्र क्रांतिकारकांना मात्र वैयक्तिक वा सामुदायिक श्रद्धांजलि, देश स्वतंत्र झाल्यानतरही, आजपर्यंत भारतात समारंभपूर्वक वाहिलेली नाही. ती तशी सामुदायिकपणे नि प्रकटपणे वाहण्याचे भाग्य आज तुमच्या वाट्यास आलेलें आहे. म्हणूनच आजच्या ह्या तुम्ही साजरा करीत असलेल्या महोत्सवास मी अपूर्व म्हणून जें म्हणतों तें अक्षरशः यथार्थ आहे. त्यातही छप्पन्नींच्या काळापासून देशस्वातंत्र्यार्थ होणाऱ्या राज्यक्रान्त्यांचीं बीजें ज्या पुण्यात रुजत आलीं त्या पुण्यातच हा अपूर्व महोत्सव साजरा व्हावा हें यथायोग्यच होय!

आता येथे माझ्यासमोर पसरलेल्या ह्या विस्तीर्ण लोकसमुदायास माझी विनती आहे कीं, या वीरस्तमाम ही श्रद्धांजलि वाहण्याची ज्याची अिच्छा असेल त्यानी मी अुभा राहताच (कारण वीर सावरकर आपले व्याख्यान खुर्चीवर बसूनच

देत होते) प्रत्येकानें आपआपल्या ठिकाणीच अुठून अगदी सैनिक व्यूहासारखें व्यवस्थित अुभें रहावें. श्रद्धांजलि वाहण्यासाठी सर्व श्रोतृवृंदांना फुलें, अक्षता नि गुलाल स्वयंसेवकांकडून आधीच पुरविले गेले आहेत, ते हातीं घ्यावें. मी जिवार 'स्वातन्त्र्यलक्ष्मीकी जय' आणि 'क्रांतिकारकांचा विजय असो' ह्या घोषणा करताच आपण सर्वांनी, आबालवृद्ध स्त्री-पुरुषांसुद्धा सर्वांनी, अेककंठानें त्या घोषणा अुच्चारून नि निनादून आकाश दुमदुमून द्यावें आणि लवलेश रेटारेटी न करता आपआपल्या ठिकाणीच अुभें राहून ह्या वीरस्तंभाच्या दिशेनें हातांतील फुलें, अक्षता नि गुलाल अुधळून द्यावा' असें सांगून वीर सावरकर श्रद्धांजलि वहाण्यास ध्वनिक्षेपकासमोर अुभे राहिले. त्यासरशी तो न्यूनतम ८० सहस्रांचा समाज अेकसाहा अुठून अुभा राहिला. वीर सावरकरांच्या अमोघ वक्तृत्वानें अुत्पन्न झालेला अुत्साह शिगेला पोचला, तोंच ध्वनिक्षेपकावरून वीर सावरकरांनी 'स्वातन्त्र्यलक्ष्मी की जय, ही गर्जना केली त्यासरशी त्या प्रचंड जनसमुदायाच्या सहस्र सहस्र कंठांतून अेकसुरानें नि अेककंठानें 'स्वातन्त्र्यलक्ष्मी की जय' 'क्रांतिकारकांचा विजय असो' अशा जिवार अेकामागून अेक प्रचंड गर्जना होअू लागून तें सारें वातावरण दूरवर घुमतें दुमदुमून गेलें. विद्युद्दीपांच्या झगझगाटांत, त्याच वेळीं आकाशांत चंद्राचाही अुदय होअून त्या चांदण्याचा सौम्य प्रकाश मिसळून गेला आणि जेव्हां त्या प्रचंड समुदायानें श्रद्धांजलि वाहतांना मुठी भरभरून पुष्पाक्षतांसह गुलाल अुधळला तेव्हां त्या गुलालाचाही रंग त्या चांदण्याच्या नि विद्युद्दीपांच्या प्रकाशांत मिसळून त्या विस्तीर्ण पटांगणांत अेक अत्यंत विलोभनीय शोभा दिसू लागली. रात्री ८ वाजता अरुणोदय व्हावा तसें झालें! स्वातंत्र्यलक्ष्मीचे नि सशस्त्र क्रांतिकारकांचे जयघोष करीत असणाऱ्या त्या अफाट नि आबालवृद्ध जनसमूहाच्या हृदयांत संचारलेला अुत्साह नि कृतकृत्यतेची धन्यता हृदयांत मावेनाशी झाली. त्या धन्यतेत ती सभा मग्न असतांनाच अध्यक्षांनी त्या दिवशीचा कार्यक्रम संपला असल्याचें नि सभा विसर्जन झाल्याचें सांगून सभा विसर्जन केली.

* * *

### भाषण तिसरें

## अभिनव भारताचा सांगता समारंभ

दि. ११ मे १९५२ दिवशीं सायंकाळीं ठीक ६॥ वाजता पर्वती तळ्याजवळील 'क्रांतिस्मृति नगरांत' अभिनव भारत सांगता समारंभाचा दुसऱ्या दिवशीचा कार्यक्रम चालू झाला.

अध्यक्षीय भाषणांत सेनापति बापट यांनी अेक महत्त्वाची सूचना केली. ते म्हणाले "क्रांतिकारकांच्या स्मृतीनिमित्त आपण हा जो क्रांतिस्मृतिस्तंभ येथें अुभारलेला

आहात त्यांचेंच स्थायी स्वरूपाच्या स्मारकात रूपांतर व्हावें आणि त्या स्तंभावर मंगल पांडेपासून तों सुभाषचंद्र बोस यांच्यापर्यंत ज्या ज्या क्रांतिकारकांनीं स्वातंत्र्याच्या होमकुंडात बलिदान केलें त्यांचीं नांवें कोरून ठेवावींत."

त्यानंतर सेनापतींनी अध्यात्मदृष्ट्या ह्या स्वातंत्र्ययुद्धातील क्रांतिवादाचें रहस्य विशदितांना सांगितलें की "ज्या सूत्रात साध्य नि साधन अेकत्र सांगितलें जातें तें सूत्र सच्चिदानंद हें होय! जगातील कोठल्याही तत्त्वज्ञानात अितकें सोपें नि सुटसुटीत सूत्र सांगितलेलें नाही."

त्यानंतर रा. स्व. संघाचे सरसंघचालक श्री. गोळवलकर गुरुजी टाळ्यांच्या कडकडाटात बोलावयास अुठले. ते म्हणाले, "जे लोक क्रांतिकारकांना वेडे नि माथेफिरु म्हणून स्वत च्या शहाणपणाचा आव आणतात त्यांना क्रांतिकारकांच्या राष्ट्रभक्तीची अुग्रता सहन होत नाही हेंच खरें आहे. राष्ट्रभक्तिशून्य अराष्ट्रीय भावनांवर आघात करण्यासाठी आणि भारताचें म्हणजेच हिंदु राष्ट्राचें राष्ट्रीय जीवन परिपूर्ण करण्यासाठी नि ह्या राष्ट्राचा राष्ट्रध्वज जो भगवा ध्वज तो यावच्चंद्र दिवाकरौ फडकत ठेवण्यासाठी आपण या समारंभाच्या निमित्ताने अमर स्फूर्ति सपादिली पाहिजे.".

## विद्यमान क्रांतिकारकांचा सत्कार

ह्याच सभेत स्वागत मंडळाच्या वतीने, अभिनव भारतादि गुप्त संस्थांतील स्वातंत्र्ययुद्धात लढलेले नि आमच्या सुदैवाने अद्यापही विद्यमान असलेले जे सशस्त्र क्रांतिकारक पुण्यास ह्या समारंभासाठी आलेले होते त्यांच्या सत्काराचा अपूर्व नि हृदयें हलवून सोडणारा सोहाळा साजरा करण्यात आला. ह्या आपल्या सर्व सहकाऱ्यांचा परिचय वीर सावरकर थोडक्यात करुन देत होते. महाराष्ट्रातल्या महाराष्ट्रात हातबॉंब सिद्ध करण्यात जवळजवळ यशस्वी झालेले श्री. गोविंदराव बापट, जॅक्सन खटल्यात ज्यांच्या तोंडून अभिनव भारताची माहिती काढण्यासाठीं ब्रिटीश सेवेतील आरक्षकांनी अनोनात शारीरिक छळ केला आणि ज्यांना कठोर कारावासाची शिक्षा भोगावी लागली ते नाशिकचे 'लोकमतकार' केळकर शास्त्री, विवर्ग सावरकर बंधूप्रमाणे त्यांच्याच मागोमाग अभिनव भारताची शपथ घेतलेले आणि सावरकर बंधूंचे बालमित्र असलेले त्र्यंबकराव नि श्रीधरपंत वर्तक बंधु; महाराष्ट्रातील सर्वात मोठ्या हातबॉंब कारखान्यातील तज्ज्ञ, आरक्षकाकडून ज्यांचा नाशिक खटल्यात अनोनात शारीरिक छळ होऊन शेवटी ज्यांना त्या क्रांतिकारक कटासाठी दहा वर्षे कठोर बंदिवास भोगावा लागला ते श्री. कृ. ह. खरे, अंदमानातच जन्मलेले क्रांतिवीर नि धर्मवीर विश्वासराव डावरे; १७-१८ वर्षांच्या वयाचे हुतात्मा कान्हेरे; खटल्यात अडकलेले श्री गो. गो. दारप, वीर सावरकर अिंग्लंडला गेल्यावर अभिनव भारताच्या महाराष्ट्र शाखेचे अध्यक्ष म्हणून वीर सावरकरांनी स्वतः

ज्यांना नेमलें, ज्यांनी पुढे नाशिकच्या क्रांतिकारक खटल्यात सिप्रजी आरक्षकांकडून अनन्वित छळ झाला असताही, तोंडातून कटासंबंधी अही काढला नाही आणि त्यामुळे ज्यांना उच्च न्यायालयाने निर्दोष म्हणून सोडून दिलें यासाठी ब्रिटिश अधिकाऱ्यांचा नुमता जळफळाट झाला होता आणि ज्यांचा प्रेमभराने परिचय करून देताना वीर सावरकरांनी धैर्याची मूर्ति म्हणून गौरव केला ते आताचे सॉलिसिटर हरी अनंत थत्ते; वीर सावरकरांचे अभिन्नहृदय बालमित्र, क्रांतिकार्यातील धाडसी सहकारी आणि शेवटी नाशिक कटाच्या खटल्यापायी कठोर बंदिवास सोसलेले सध्याचे डॉ. वि. म. भट; कर्णावतीला लॉर्ड मिंटोवर सन १९०९ चे आगेमागे बॉम्ब फेकण्याचा, सावरकर बंधूतील डॉ. नारायणराव सावरकरांच्यासह प्रयत्न करणारे नाशिकचे घाणेकर, १८-व्या वर्षीच आठ वर्षे काळेपाण्याची शिक्षा झालेले औंधचे हिंगे; कोल्हापूर कटातील पुण्यातील सुप्रसिद्ध नानाराव गोखले; नाशिकचे माथ, श्री शंकरराव मोघे, साताराचे डॉ. आठल्ये, रत्नागिरीचे श्री. गजाननराव दामले, चिताराम शस्त्रागार खटल्यातील श्री. सरखेल, महाबळ गुरुजी, कोल्हापूरचे श्री. शेणोलीकर, खडकीचे (औरंगाबाद) श्री. जोशी, मिरत कटातील भाऊ जोगळेकर, सोलापूरचे हुतात्म्याचा सूड घेण्यासाठी पुण्यास फर्ग्युसन महाविद्यालयातील विद्यार्थी असताना मुंबईचे गव्हर्नर हॉटसनवर गोळीबार करणारे वीर वा. ब. गोगटे, लॅमिंग्टन रोड गोळीबार प्रकरणातील वीर ग. र. वैशंपायन इत्यादि क्रांतिकारकांचा भारावलेल्या अंतःकरणाने घातलेल्या पुष्पहारांनी जेव्हा गौरव करण्यात आला तेव्हा त्यांच्या चर्येवर कृतकृत्यतेचे समाधान विलसत होतें. नंतर सावरकरांचें भाषण सुरू झालें.

## सर्व सशस्त्र क्रांतिकारक संस्थांची सांगता

वीर सावरकर म्हणाले, "मी, काल नि आज आपण अनेक्या ...
अनेक्या भव्य प्रमाणावर साजरा करीत आलेल्या ह्या 'अभिनव
समारंभाचें' हृद्गत तेथवें आपणास सांगणार आहे. ...
क्रांतिकारकांच्या 'अभिनव भारत' ह्या जगभर ...
असें नसून निदान माझ्या मतें तरी ह्या ...
ब्रिटिशांशी स्वातन्त्र्यार्थ सशस्त्र ...
ज्याच सशस्त्र क्रांतिकारक ...
संस्थेच्या स्थापनेनंतर विदे...
यीर्घकाळी गुप्त संस्था निघा...
स्थान ते पाडेपर्यंत पुढे पुढे
त्या स्वदेशातील आणि तिकडे ज...
भारतीय सशस्त्र क्रांतिकारकांच्या ...

... गोर्षी
युग्या
... श्री ... की त्या
... शिवाजीने
... घेऊन स्वतःस
... प्रतिष्ठेची अद्-
... लोकांच्या दुर्धर
... मारा महाराष्ट्र-

यतपूर्तीचे जे असे अुत्सव किंवा सांगता समारंभ म्हणजे पुढे जे मिळवायचे असतात त्या राष्ट्रीय विजयाचे, अुरलेल्या राष्ट्रकार्याच्या पूर्ततेचे संकल्प समारंभही असतातच.

ह्या सर्व कारणासाठीच कालच्या मे १० ह्या क्रांतिदिनाच्या दिवशी आपण जो स्वातंत्र्य अुत्सव केला, सर्व दिवंगत क्रांतिकारकांना जी कृतकृत्यतेची आणि कृतज्ञतेची श्रद्धांजलि वाहिली आणि तोच मुहूर्त साधून त्या स्वातन्त्र्यसंपादनाच्या कार्यार्थ ह्या शतकाच्या आरंभी स्थापन झालेल्या आणि ब्रिटिशांच्या हातून हिंदुस्थान मुक्त करीतों झुंजत आलेल्या 'अभिनव भारत' ह्या जगत्प्रसिद्ध क्रांतिकारक गुप्त संस्थेचा जो सांगता समारंभ साजरा करून त्या स्वरूपांतरें तिचें विसर्जन केलें तें तसें करणें हे राष्ट्रकर्तव्यदृष्टयाही अत्यंत समुचित होतें.

अभिनव भारताप्रमाणेच त्याच्या पाठोमागून बंगालमध्ये, पंजाबमध्ये, अुत्तर प्रदेश प्रभृति भारतीय विभागातून ज्या ज्या प्रख्यात क्रांतिकारक गुप्त संस्था ब्रिटिशांची हिंदुस्थानावरील राज्यसत्ता अुलथून पाडून आपली ही मातृभूमि स्वतंत्र करण्याच्या कार्यासाठीच स्थापन झालेल्या होत्या, त्यांचीही आता अशीच सांगता नि विसर्जन होणें प्राप्तकर्तव्यच आहे. कारण सार्‍या भारतातून ब्रिटिश राजसत्तेचें अुच्चाटन झालेलें आहे. हिंदुस्थानचें स्वातन्त्र्य संपादिलेलें आहे. आणि आता ह्यापुढचें जें ह्या भारतीय महाराज्याच्या स्वातंत्र्यरक्षणाचें नि संवर्धनाचें कार्य करावयाचें आहे, त्यासाठी आता त्या मागच्या गुप्त संस्थांच्या, त्या काळी अत्यंत आवश्यक असणाऱ्या, छुप्या नि फुटकळ शस्त्रांची, लपंडावी कार्यक्रमाची आणि भुमारी अस्तित्वाची अपरिहार्य अशी आवश्यकता अुरलेली नाही आता क्रांतिकालातील साधनांच्या ठायी त्याहून सहस्र पटीने सामर्थ्यशाली आणि अजेय अशी संरक्षक किंवा प्रहारक रणसाधनें आणि सैन्यें आमच्या राष्ट्रीय शस्त्रागारात आणि सकळ क्षेत्रात केवळ आपल्या आज्ञेची वाट पहात प्रकटपणे सुमी आहेत. स्वातन्त्र्यप्राप्तीनंतरच्या ह्या आपल्या महाराज्याच्या कारभाराची ही नवी कार्यप्रणालि माझ्या मताप्रमाणे कोणती असावी ह्याचें काहीसें दिग्दर्शन, मी 'साधनें तर' अुद्याच्या व्याख्यानात करीन.

पण आता तें नवी विटी नवें राज्य आहे. आपल्या अितिहासातील तो नवा गौरवमय अध्याय आरंभतच आहे या महोत्सवापुरती अितकी घोषणा स्पष्टपणें करणें पर्याप्त आहे की, अभिनव भारत ही सशस्त्र गुप्त संघटना आता त्या स्वरूपात संपूर्णपणें कृतकृत्य होअुन विसर्जन झालेली आहे. ब्रिटिश राजसत्तेच्या पंजातून आपला देश मुक्त झालेला आहे आता आपल्या देशाच्या ह्या मिळविलेल्या स्वातन्त्र्याचें संरक्षण करणें हे मुख्य कार्य आपल्यापुढे आहे ते कर्तव्य हाती घेण्यासाठी आता या नव्या परिस्थितीत अुपयुक्त असे नवे मार्ग, नव्या कार्यपद्धति नि नव्या संस्था प्रकटपणे अुभारणें आणि ह्या मिळविलेल्या स्वातंत्र्याचें संरक्षण नि संवर्धन करण्याचें दायित्व आता अुगवत्या तरुण पिढीवर आहे !

## स्वदेश बांधवांच्या हाती सत्ता पडावी हीच धारणा

आणखी अेका विशेषाचा (Point चा) या व्याख्यानात थोडा तरी अुहापोह करणे हें मला अगदी आवश्यक वाटतें. आजपर्यंत ब्रिटिशांशी झालेल्या आमच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात ज्यांनी निःशस्त्र मार्गांनी प्रयत्न केला त्यांच्या त्या प्रयत्नाचा अितिहास किंवा सविस्तर वृत्त तरी बहुतेकांना माहीत आहे. कारण ते तें वृत्त अुघडपणे प्रसिद्ध होअू शकत होतें. देशभक्त दादाभाअींच्या काळापासून तों काल-परवांच्या देशभक्त सरोजिनीबाअी नायडूपर्यंतच्या त्या निःशस्त्र प्रतिकारकांची चरित्रेंही प्रसिद्ध झालेली आहेत, म्हणून काँग्रेसीय प्रभृति निःशस्त्र चळवळींचा अितिहास सविस्तरपणे आधीच अुपलब्ध झालेला आहे. तसा तो प्रसिद्ध होण्यास ब्रिटिश राजसत्तेने विरोध केलेला नव्हता. परंतु सशस्त्र क्रांतिकारकांविषयीची माहिती मूलतः कार्यसिद्धीस्तव त्यांनीच गुप्त ठेवलेली असे. त्यातून सशस्त्रांच्या त्या चळवळींचा आनुपूर्विक अितिहास लिहिणें हें ब्रिटिशांच्या राज्यात अगदी अशक्य होते. कारण ब्रिटिशांना सशस्त्र क्रांतिकारकांची नावेंसुद्धा वृत्तपत्रांतून आलेलीं सहन नसत. सशस्त्र क्रांतिकारकांना ब्रिटिश अितर सर्व पक्षांपेक्षा भिऊन वागत असत, म्हणजेच सशस्त्र क्रांतिकारकांची चळवळ निःशस्त्र पक्षांच्या चळवळींपेक्षा ब्रिटिशांच्या मर्मावरच कसा प्रहार करीत होती त्याची ब्रिटिश सत्तेने दिलेली ही अेक पावतीच असे, अेक स्वीकारोक्तिच असे ! ह्या दोन्ही तिन्ही कारणामुळे सशस्त्र क्रांतिकारक चळवळींची यथोचित माहिती सामान्य जनतेस तर काय, पण बऱ्याच सुशिक्षित वर्गाला सुद्धा नसे आणि अद्यापही ती पूर्णपणे नाही. लोकांना जें काय साधारणतः माहीत आहे ते अितकेच की क्रांतिकारक पक्ष म्हणजे अिंग्रजांच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांना अधूनमधून बाँबगोळ्यांनी किंवा पिस्तुलांनी ठार मारणारा, क्वचित् यत्रतत्र ब्रिटिशांची कोषागारें लुटणारा, भारताच्या स्वातंत्र्यासाठी केलेल्या अशा फुटकळ भयंकर कृत्यापायी फुटकळपणे फाशी जाणारा किंवा काळ्यापाण्यावर धाडल्या जाणाऱ्या माथेफिरू तरुणांच्या गटागटांची अेक जाज्वल्य पण राजकीय योजना-शून्य, असंगत, असतत, धूमकेतूसारखी केव्हातरी अुपटणारी नि लगेच अस्त होणारी परंपरा होती. सशस्त्र क्रांतिकारक पक्षाला अगदी शिवराळ नावेंच न देता त्यातल्या त्यात शिष्टपणें जे लेखक स्वदेशात वा परदेशातही क्वचित् प्रसंगी अुल्लेखीत तेही त्या पक्षाला, Anarchist किंवा Terrorist असेच म्हणत. म्हणजे अराजक पक्ष किंवा भयंकर पक्ष अशाच नावे संबोधीत. परंतु यथार्थतः क्रांतिकारक पक्ष हा अराजकवादी Anarchist तर केव्हाच नव्हता आणि भयंकर वाद, Terrorism हें त्यांच्या शस्त्रागारातील अनेक अस्त्रांपैकी अेक अस्त्र होतें. त्या अेका अस्त्राचाही अिंग्लिश अधिकाऱ्यांना टिपून टिपून ठार मारून टाकण्याचा, त्यांच्या कोषागार, शस्त्रागार प्रभृति सत्ताकेंद्रांवर चोरून मारून छापे घालण्याचा आणि अशा शक्य

त्या त्या सशस्त्र प्रहारांनी, ब्रिटिशांच्या मनात पूर्वी जी आदौच निर्भयता वाटत असे तिचा भंग करून त्यांच्या मनात धास्ती अुत्पन्न करण्याचा, ह्या भयंकरवादा '- चाही, Terrorism चाही हिंदुस्थानच्या गेल्या शतकातील अितिहासावर जो प्रबळ नि स्फोटक परिणाम घडत आला त्याचा अुल्लेख मी गेल्या दोन व्याख्यानांत थोडा बहुत केला आहे. साधारणतः या ' भयंकरपक्षा 'ची, Terrorist पक्षाची अेखादी स्फोटक अुठावणी झाली की, दहापांच अिंग्लिश अधिकाऱ्यांचा बळी पडायचा, सारी जनता नि ब्रिटिश राजसत्ता चमकून धमका खाअून अुठायची, कोणचा तरी अेक कट अुघडकीस येअून दहावीस देशवीरांना त्यापायी स्वतःच्या प्राणदंडाची भरपाअी करावी लागायची हें जसें ठाम ठरून गेल्यासारखें होतें तसेंच ब्रिटिश राजसत्तेने खाल्लेल्या त्या क्षणिक धास्तीपायी तात्कालिक अुपचार म्हणून, हिंदुस्थानच्या पदरात अेक कोणची तरी राज्यसुधारणेची योजना ब्रिटिश अधिकाऱ्यांकडून टाकली जावयाचीच हेंही ठरलेलेंच असे. मोर्ले-मिंटो सुधारणापासूनच्या अशा सुधारणांच्या हप्त्यांचा अितिहास तुम्ही चाळून पहा म्हणजे हें सत्य तुम्हांस आढळून येअील. ह्या सुधारणांमुळे मिळणारे अधिकार ब्रिटिश सत्ता नेमस्तपक्षाच्याच पदरात टाकी. पण त्याचें आम्हा क्रांतिकारकांना काहीच वैषम्य वाटत नसे. अधिकाधिक अधिकार राज्ययंत्रात आमच्या स्वदेशबांधवांच्या हातात पडावेत ह्यास्तव आणखी पुढे झुंजत जाणें अेवढेंच आमचें जीवनकार्य, अशी आमची धारणा असे.

अशा रीतीने क्रांतिकारकांच्या सशस्त्र कार्यक्रमातील 'भयंकरवाद ' (Terrorism) हें जरी अेक अमोघ नि परिणामकारक अस्त्र असे, तथापि यदाकदाचित् पाचपन्नास अिंग्रज अधिकाऱ्यांना मारून किंवा यत्रतत्र लहानसहान सशस्त्र छापे शत्रूच्या राज्यकेंद्रावर घालून ब्रिटिशांसारखें बलाढ्य नि झुंजार राष्ट्र तमल्या सशस्त्र प्रतिकारामुळे जरी अशतः संत्रस्त झालें तरी हिंदुस्थानवरील आपलें साम्राज्य ते सोडून देण्यास सिद्ध होअील हें त्रिकालीही शक्य नाही हे अितर कोणत्याही पक्षापेक्षा क्रांतिकारक पक्षाच पक्कें जाणून होता. यास्तव क्रांतिकारक म्हणजे बाँबगोळेवाला ही जी अेवढीच त्याच्याविषयीची सामान्य लोकात आणि काही अहिंसक म्हणविणाऱ्या ढुढ्ढाचार्यांच्या मत्सरी प्रचाराने भ्रामक समजूत असते, आणि जाणूनबुजून पसरविली जाते ती आमूलात् खोटी आहे. प्रथमत ती खोडून टाकली म्हणजेच पुढचा खरा अितिहास लिहिता येअील.

## अिंग्लंडचें सामरिक संकट ही आमची स्वातंत्र्यसंधि

सशस्त्र क्रांतिकारकांच्या, ह्या शतकाच्या आरंभीच स्थापन झालेल्या 'अभिनव भारत ' ह्या संस्थेच्या कार्यक्रमात तरी ' भयंकरवादा ' प्रमाणेच सैनिकीकरण आणि परराष्ट्रीय राजकारण ह्या दोन मुख्य साधनांचा समावेश केलेला असे हें त्या काळच्या आमच्या अजून अुपलब्ध असलेल्या वाङ्मयातून नि त्या काळच्या गुप्त चळवळीवरून

कोणामही कळूनें येईल. सैनिकीकरण म्हणजे अिंग्रजांच्या हाताखालील हिंदुस्थानात असलेल्या हिंदी सैन्यात क्रांतीचा प्रचार करणें आणि शक्य तितक्या क्रांतिकारकांनी त्या सैन्यात भरती होणें होय. आमचें परराष्ट्रीय राजकारण म्हणजे अिकडे ब्रिटिशानें हाती असलेलें हिंदी सैन्य पोसवून ठेवण्याचें कार्य करीत असताच तिकडे, विशेषत: युरोप नि जपानमध्ये अिंग्रजांच्या शत्रुस्थानीं असलेल्या किंवा निदान अिंग्रजाचे मित्र नसलेल्या राष्ट्रांतून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यार्थ सशस्त्र क्रांति करणारा थेक पक्ष प्रबळ होत आहे ह्या नव्या वस्तुस्थितीचा प्रचार करुन त्या कार्यी तेथील जनतेची नि राज्याधिकारी वर्गाची सहानुभूति संपादण्याचा आटोकाट प्रयत्न करणें होय. केव्हा तरी अिंग्रजाना पाण्यात पाहणाऱ्या ह्या परराष्ट्रांपैकी कोणाचे तरी युद्ध अिंग्रजांशी छेडलें जाण्याचें संकट अिंग्रजावर गुदरेलच. अर्थात् अिंग्लंडवरचें सामरिक संकट म्हणजेच हिंदुस्थानचीं स्वातंत्र्यसंधि होय. हें आमचें युद्धनीतींचें सूत्र असल्याने अशा अेखाद्या युद्धात ब्रिटनला गाठून, त्याच्या त्या परराष्ट्रीय शत्रूकडून मिळेल तें रणसाहाय्य घेअून, हिंदी सैन्यात, आणि शक्यतों हिंदी जनतेत क्रांतीची अुठावणी करावी आणि हिंदुस्थानबाहेरूनही त्या परराष्ट्रीय साहाय्याच्या बळावर हिंदुस्थानातील ब्रिटिशसत्तेवर बाहेरून चाल करुन यावें, ही आम्हा क्रांतिकारकांच्या सामरिक कार्यक्रमाची रूपरेषा होती. अशा प्रकारची पहिली अुठावणी फसली तर संधि येताच दुसरी अुठावणी करावी, यश येईतो अेकेच, वेळी पिढ्यानुपिढ्या झुंजत रहावें, ह्या सैनिक धोरणाचें सर्व सार माझ्या त्या वेळच्या *ज्या अेका सूत्रात गोवलेलें होतें ते सूत्र आता बहुमुखी झालेले आहे की, Revolutionary war knows no truce save victory or death.*

## क्रांतीचा सैनिकांत प्रचार

ह्या रणनीतीच्या कागदी कार्यक्रमातील अनेक अुपांगांची बजावणी आम्ही तत्काल कशी करीत चालली त्याचा ह्या व्याख्यानात मावेल अितकाच अत्यंत तुरळक अुल्लेख काय तो येथे करता येईल. तो असा, मी अिंग्लंडला जाअून अभिनव भारताचे ठाण भर लंडनमध्ये मांडताच, हिंदी सैनिकांमध्ये राज्यक्रांतीचा आणि ब्रिटिश द्वेषाचा प्रचार करण्यासाठी शतावधि लहान लहान हस्तपत्रकें गुप्तरीतींने छापून हिंदुस्थानातील सैनिक भरतीचें मुख्य केंद्र जें पंजाब त्यातील सैनिकी शिबिरात धाडण्यास आरंभ केला. प्रत्यक्ष सैनिक शिबिरात अिंग्लिशांविरुद्ध अुलटण्याची सिद्धता ठेवा अशी स्पष्ट स्पष्ट भाषेत लिहिलेलीं पत्रकें पसरविणें अत्यंत दुष्कर ! पण ज्या गावागावातून शीख, जाट, डोगरा प्रभृति सैनिकांची भरती होअील त्या त्या गावातील त्यांच्या कुटुंबातून तशी पत्रकें पोचविणें त्यापेक्षा सुकर होतें. ह्यासाठी सैनिक शिबिरातील आणि अशा गावातील शक्य तितके पत्ते मिळवून आम्ही सैनिकांना अिंग्रजांविरुद्ध भडकाविणारी नि देशस्वातंत्र्याच्या अुत्कट अिच्छेने चेतविणारीं

हीं शतावधि पत्रकें महिन्याकाठी दोन तीन अनियमित वेळा टपालाने धाडीत असू. मूळ पत्रकें मी जिंग्लिशमध्ये लिही, त्याचें हिंदी नि गुरुमुखी भाषांतर माझे क्रांतिकारकांतील शीख स्नेही करीत. हीं पत्रकें मेणकागदावर (वॅक्सपेपरवर) लिहून अेका लाकडी प्रतिछापकावर (Duplicator वर) आमच्या खोल्यांतच रात्र रात्र जागून छापावीत. पत्ते लिहून गुप्तपणे टपालात टाकावीत. अभिनव भारतानेच अशीं सैनिकीकरणाचीं सक्रिय अुपार्गे सर्वांआधी अकस्मात् आचरणात आणण्यास आरंभ केल्यामुळे प्रथमतः महिनोगणती हिंदुस्थानातील जिंग्लिश अधिकाऱ्यांचें तिकडे लक्षच गेलें नाही. आमचीं हीं शतावधि पत्रकें बहुतेक पत्त्यावर जिंग्लिशांच्याच टपालातून सैनिकांच्या किंवा त्या त्या गांवच्या लोकांच्या हाती बिनबोभाट पडत ! आम्हाला तरी हें मागाहून कळलें. प्रथम प्रथम त्याचा शासनाकडून काहीच बोभाटा होअीना हें पाहून आम्हालासुद्धा शंका येअी की आमचीं सारी पत्रकें, हिंदुस्थानच्या सिंधुतटाला लागताच राज्याधिकारी गुपचूप समुद्रात फेकून देतात कीं काय ? परंतु काही महिन्यांनंतर आम्हांस आमच्या ह्या क्रांतिकारक पत्रकाची शासनीय पावतीच रीतसर मिळू लागली ! आणि मोठा आनंद वाटू लागला ! ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यात ब्रिटिश राजनिष्ठेचा सतत प्रचार चालू रहावा म्हणून ब्रिटिश अधिकारी अेक 'फौजी अखबार' नावाचें अेक शासनीय वृत्तपत्र छापून त्यांच्या प्रती सर्व सैन्यात वाटून देत असत. तें हिंदी भाषेत पण रोमन लिपीत छापलें जाअी. आम्ही तें पत्र जिंग्लंडमध्ये नियमाने वाचीत असू. त्यात अेक दिवस अकस्मात् अेक मोठमोठया अक्षरातील मथळ्याची बातमी वाचली की 'अनार्किस्ट लोक सैनिकांच्या पत्त्यावर राजद्रोही पत्रकें धाडीत असतात असे अुघडकीस आले आहे. अशी राजद्रोही पत्रकें कोणाच्याही दृष्टीला पडताच त्याने तीं तत्काळ अधिकाऱ्यांच्या हाती दिली पाहिजेत. अशीं पत्रकें हेतुपूर्वक वाचणें किंवा जवळ ठेवणें हा सैनिकी अपराध समजला जाअील. पुढे पुढे आम्ही गुप्तपणें धाडीत असलेल्या अशा पत्रकाच्या मथळ्यांचीं नावेंही 'फौजी अखबारां'तून झळकू लागली. अितकेच नव्हे तर त्या 'अत्यंत भयंकर राजद्रोही' पत्रकांतील कोटिक्रमावर अत्यंत कडक टीका करणारीं स्फुटेंही त्या शासनीय वृत्तपत्रातून येअू लागली. पुढे पुढे सरदार अजितसिंग प्रभृति तरुण लोकांचे पंजाबात जेव्हा क्रांतिकारक गट अुठाव होअू लागले तेव्हा आमच्या अशा पत्रकाची अेगादी प्रत त्यांना मिळताच तेही तिकडे त्या अेका प्रतीच्या शतावधि प्रती परस्परे गुप्तपणे छापून वाटू लागले. बंगाल, मद्रास आदि प्रांतातूनही क्रांतिसंस्थांनी तशा गुप्त पत्रकांची नि प्रचाराची सैनिकांतच नव्हे तर आरक्षक (पोलीस) विभागातही धुमदडाडी अुडवून दिली.

## सैनिकीकरणाचा अर्थ

ह्या अुपक्रमाचे मागोमाग जिंग्लंडमध्ये माझा '१८५७ चें स्वातंत्र्यसमर' (War of Indian Independence of 1857) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला ! हिंदी

सैनिकांत, ब्रिटिश राज्य अुलथून पाडणारें प्रचंड सैनिकीयुद्ध कसें अुभारावें ह्याचा तो प्रयोगसिद्ध नि प्रस्फोटक अितिहासच होता. हिंदुस्थानात त्या ग्रंथाचा गुप्तपणे केवढा प्रचार झाला, पुढे अमेरिकेतील गदर पक्षाने त्याचें पंजाबी, हिंदी, अुर्दू प्रभृति भाषांतून कसे भाषांतर करविलें, त्यानंतर भगतसिंग मंडळाने त्याच्या दोन अिंग्रजी गुप्त आवृत्त्या कशा छापल्या आणि तेथून थेट नेताजी सुभाषचंद्रांनी अुभारलेल्या स्वातंत्र्यसैन्यापर्यंत त्या ग्रंथाने अखिल भारतीय क्रांतिकारक पक्षाला वैचारिक आत्मा देअून सशस्त्र अुठावणीचें प्रत्यक्ष मार्गदर्शन कसें केले, क्रांतिकारकाची 'गीता' म्हणून सहस्रावधि क्रांतिकारकांनीच त्याग कसें गौरविलें तें वृत्त आता अितकें सर्वश्रुत झालेलें आहे की, त्याचा अिथे अधिक अूहापोह करण्याचें कारणच नाही.

ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यात हा सारा गुप्त प्रचार करताना आम्ही ब्रिटिशांच्या सैन्यात जाअू नका ' असें केव्हाही सांगितलेलें नाही. तर अुलट ब्रिटिशांचे सैन्यात राहूनच, हाती पडलेले सारे शस्त्रबळ संभाळूनच, नवनव्या हिंदी तरुणांची शक्य तितकी अधिकाधिक भरती ब्रिटिश सैन्यात करून, संधि येअीतो हिंदी सैनिकांनी परराष्ट्राशीही अिंग्लंडची प्रत्यक्ष युद्धें जुंपली असता त्या युद्धातून जिवंत लढाया लढण्याचें शिक्षण घेत राहावें, असेच ह्या प्रचारपत्रकातून नि ग्रंथातून आग्रहाने सांगत असू. म्हणजे सशस्त्र क्रांतीची वेळ येताच, शस्त्रास्त्रांनी सज्ज, युद्धें खेळण्यात मुरलेलें असे हें ब्रिटिशांच्या हाताखालचें लक्षावधि सैनिकाचें हिंदी सैन्य १८५७ च्या प्रसंगी ब्रिटिशांवरच अुलटलें तसें स्वदेशाच्या स्वातंत्र्यार्थ पुन्हा अकस्मात् अुलटवून देता येअील. माझ्या ' सैनिकीकरणा'चा अर्थ ह्या शतकाच्या अगदी आरंभापासून तो थेट ब्रिटिशांची राज्यसत्ता सन १९४७ मध्ये अुलथून पाडीतों हाच होता. आणि ह्याच धोरणाने पुढे निघालेल्या साऱ्या क्रांतिकारक संस्था शेवटपर्यंत झटत नि झुजत राहिल्या.

## युरोपातील परराष्ट्रीय राजकारण
## हिंदी क्रांतिकारकांनीच काय तें लढविलें.

ह्या सैनिकीकरणाच्या चळवळीप्रमाणेच, मी अिंग्लंडला जाताच अभिनव भारताच्या कार्यक्रमाप्रमाणे, अिंग्रजांच्या शत्रुस्थानी असलेल्या परराष्ट्रांतून हिंदी राज्यक्रांतीचा प्रचार करण्याचें आणि त्यांच्याशी मित्रत्व जोडण्याचे प्रयत्न चालू केले.

खरा अितिहास लिहिताना हें ध्यानात ठेवलें पाहिजे की, हिंदी राज्यक्रांतीसाठी, जर्मनी ते जपान प्रभृति परराष्ट्रांतून दोन्ही महायुद्धात जे जे क्रांतिकारक सामरिक अुठाव केले गेले ते ते सर्व भारतीय सशस्त्र क्रांतिकारक संस्थाच्या संयुक्त प्रयत्नानेच काय ते होअू शकले. हिंदुस्थानातील कॉंग्रेस, होमरूल लीग प्रभृति कोणत्याही नि:शस्त्रवादी प्रकट पक्षांच्या कार्यक्रमात सशस्त्र युद्ध किंवा ब्रिटिशविरोधी परराष्ट्रीय सामरिक राजकारण बसूच शकत नव्हते. त्यांनी कोणीही तसा पक्षीय

प्रयत्न केला नव्हता. अितकेच नव्हे तर मुख्यतः कांग्रेसने दोन्ही महायुद्धांत ब्रिटिशांची बाजू 'लोकसत्ताक' म्हणून, 'न्याय्य' म्हणून अुघड अुघडपणे अुचलून धरलेली होती !

अभिनव भारताच्या वतीने प्रथमतःच सशस्त्र राज्यक्रांतीच्या दृष्टीने परराष्ट्रीय राजकारणाचा सूत्रपात केला गेला. आयर्लंड, अिजिप्त, अित्यादि ब्रिटिशांच्या हाती असलेल्या देशांतील गुप्त क्रांतिकारक पक्षांना आणि युरोपमधील ब्रिटिशविरोधी जर्मनप्रभृति राष्ट्रांना अुद्देशून आम्ही लहान लहान हस्तपत्रकें गुप्तपणे छापून त्या त्या देशात वाटण्याचा सपाटा चालविला. त्या गुप्त हस्तपत्रकांत मुख्यत्वे असे सांगण्यात येअी की, 'ब्रिटिशांच्या राज्यसत्तेस सशस्त्र क्रांतीने अुलथून पाडून संपूर्णपणे स्वतंत्र होण्यासाठी हिंदुस्थानात क्रांतिकारक पक्ष वळावत चाललेला आहे. तो तुम्हा राष्ट्राशी मित्रत्वाचे संबंध जुळवू अिच्छीत आहे. आणि ह्या कार्यी तुमची सहानुभूति नि सहकार्य मिळेल असे अपेक्षीत आहे.' मी मुख्य घटनांनाच ओटकपणे अुल्लेखीत असल्यामुळे अितकेच सांगतो की अनेक प्रकारे असे यत्न करता करता कित्येक राष्ट्रांतील, विशेषतः सोशलिस्ट (समाजसत्तावादी), डेमोक्रॅट्स आणि क्रांतिकारक पक्षांतील युरोपियनादिक प्रमुख लोकामध्ये अभिनव भारताच्या पुढाऱ्यांची मानमान्यता वाढली.

## स्वतंत्र हिंदुस्थानचा पहिला राष्ट्रध्वज !

शेवटी युरोपात आतरराष्ट्रीय प्रजासत्ताक पक्षाचा जो अेक महत्वाचा मेळावा प्रतिवर्षी भरत असे त्या मेळाव्यात हिंदुस्थानातील क्रांतिकारक पक्षाचाही अेक प्रतिनिधि बोलवावा असें त्या आंतरराष्ट्रीय संमेलनाच्या पुढाऱ्यांचे मनात आलें. त्याप्रमाणे कार्ल मार्क्सचा नातू आणि Humanity ह्या पॅरिसमधील फ्रेंच पत्राचे संपादक ह्यांनी त्यांचा परिचय असलेल्या अभिनव भारत सदस्यातील प्रसिद्ध पारशी महिला मॅडम कामाबाअी ह्यांना आमंत्रिलें. सर्वांचे विचारें कामाबाअींनीच प्रतिनिधि म्हणून जावे असें ठरलें. त्या युरोपीय स्वतंत्र राष्ट्रांच्या संमेलनात युरोपातील त्या त्या राष्ट्रांचा स्वतंत्र ध्वज लावलेला असे. पण त्या काळी हतभाग्य हिंदुस्थानला स्वतःचा असा राष्ट्रध्वज नव्हता! ब्रिटिशांचा युनियन जॅक हाच हिंदुस्थानचा ध्वज म्हणून आमच्या भर कांग्रेसमध्येच मिरविला जाअी, जयजयकारिला जाअी. ह्यासाठी स्वतंत्र हिंदुस्थानचा भावी ध्वज कसा असावा ह्याविषयी अभिनव भारतात होणाऱ्या चर्चेची जी अेक कल्पना मॅडम कामाबाअी आणि हेमचंद्र दास ह्यांना आलेली होती तिचेंच स्वरूप निश्चित करून पॅरिसला चित्रकलानिपुण हेमचंद्र दास ह्यांनी तत्काल अेक सुंदर ध्वज चित्रवून दिला. तो घेअून कामाबाअी त्या परिषदेला स्टटगार्ड (जर्मनी) येथे गेल्या. त्यांची भाषणाची पाळी येताच ब्रिटिशांचें राज्य अुलथून पाडून हिंदुस्थान स्वतंत्र करणाऱ्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या वतीने

त्यांनी आपलें अुद्दीपक भाषण करताकरता मध्येच तो ध्वज काढून, आवेशानें पुढें मागें फडकावीत त्या अुद्गारत्या, "Behold !! This is the flag of Independent India." हा पहा आमचा स्वतंत्र भारताचा राष्ट्रध्वज! त्या सरशीं अकस्मात् चकित होअून तेथील सर्व आंतरराष्ट्रीय प्रतिनिधींनीं अुठून त्या ध्वजास मानवंदना दिली ! स्वतंत्र भारताचा जगातील प्रबळ राष्ट्रांच्या मेळाव्यात प्रकटपणे अुभारला गेलेला हा पहिलाच राष्ट्रध्वज होय !!!

स्वतंत्र हिंदुस्थानचा तो पहिला ध्वज अुद्भावितांना नि अुभारताना अभिनव भारतानें हें स्पष्ट केलें होतें की, हा राष्ट्रध्वज तात्कालिक, अस्थायी (Provisional) आहे, जेव्हा आमचें हिंदुस्थान पूर्णपणे स्वतंत्र होअील तेव्हा आमच्या स्वतंत्र राष्ट्राची नैर्बंधिक घटना समिति तिला रुचेल तो स्थायी राष्ट्रध्वज निर्मील, आणि त्यालाच आम्हीही स्थायी राष्ट्रध्वज मानू.

ह्या संमेलनातील ह्या घटनेचें कौतुक युरोपातील नि अितर देशांतीलही राष्ट्रांच्या अनेक वृत्तपत्रांतून मॅडम कामा नि तो राष्ट्रध्वज ह्यांचें छायाचित्र देअून करण्यात आले. An Indian Princess unfurls the colours of Independent India. अशा आशयाचे मथळे रशियादिक राष्ट्रांतील वृत्तपत्रांत प्रथमत:च आलेले पाहून आम्हा क्रांतिकारकांचीं हृदयें आनंदाने नि अभिमानाने भरून आलीं!

परंतु तितक्याच तीव्रतेने ब्रिटिश वृत्तपत्रांचा नि राज्यकर्त्यांचा संतापही अनावर झाला ! क्रांतिकारकांची ती कल्पना नि कृत्य होतेंच तसें धाडसाचें! कारण ब्रिटिश राजकारण्यांनी तोंवर साऱ्या युरोपियन राष्ट्रांची अशी पक्की समज करून दिलेली होती की, हिंदी पुढाऱ्यांना काही किरकोळ सुधारणा जरी हव्या असल्या तरी ते ब्रिटिश राज्याशी पूर्णपणे राजनिष्ठ आहेत. आणि त्याला आधार म्हणून तें ब्रिटिश राजकारणी मंडळ आमच्या Indian National Congress म्हणविणाऱ्या राष्ट्रीय सभेचेंच त्या त्या काळी ब्रिटिश सम्राटाच्या जयजयकारात संमत होणारे राजनिष्ठाप्रदर्शनाचे भपळपळ ठराव जगातील स्वतंत्र राष्ट्रांच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करवी. पण अभिनव भारताच्या परराष्ट्रात प्रकटपणे चाललेल्या ह्या ब्रिटिशविद्रोही चळवळींमुळे ब्रिटिशांचें ते सारें ढोंग अुघडकीस येअू लागले.

## बॉम्बचा पहिला स्फोट !

त्याचे मागोमाग अभिनव भारताचे जे बापट प्रभृति सदस्य रशियन क्रांतिकारकांशी संधान बांधून हस्तध्वम्पासून कालध्वम्पर्यंतची (Hand Bomb पासून Time Bomb पर्यंतची) सर्व प्रकारच्या बॉम्बची विद्या पॅरिसमध्ये गुप्तपणे शिकत होते. त्याच्यापैकी हेमचंद्रदास या बंगाली क्रांतिकारकाने बंगालमध्ये परतल्यानंतर बनविलेला बॉम्ब, युगांतर गुप्तसंस्थेचे खुदीराम बोस ह्यांनी किंग्जफोर्ड मॅजिस्ट्रेटवर म्हणून जो फेकला त्याचा भयंकर स्फोट होअून त्यात दोन ब्रिटिश माणसांचा प्राण

वळी पडला. हिंदुस्थानातील यशस्वीपणे ध्रुडालेला हा पहिला, बॉम्ब अभिनव भारताच्या दीर्घ प्रयत्नांचेंच फळ होतें.

त्या बॉम्बच्या स्फोटासरशीं हिंदुस्थानच्या जुन्या राजकारणाचाच स्फोट होऊन त्यांतून सशस्त्र क्रांतीच्या रक्तरंजित युगाचा अुदय झाला. त्याचें मागोमाग भर लंडनमध्ये धिंग्राने कर्झन वायलीस ठार केल्याने साऱ्या परकीय राष्ट्रांतून अुडालेली भारतविषयक खळबळ; फ्रान्समध्ये पंडित शामजींचें Indian Sociologist, चट्टोपाध्यायाचे संपादकत्वाखाली मी चालविलेले 'तलवार' आणि लाला हरदयाळजी यांच्या संपादकत्वाखाली मॅडाम कामा यांचे 'वंदेमातरम्' या अभिनव भारत सदस्यांच्या तिन्ही अिंग्रजी वृत्तपत्रांनी भारतीय क्रांतिकारक विचाराचा नि घटनांचा सर्व युरोपीय राष्ट्रांतून चालविलेला धुमधडाक्याचा प्रचार; अनंत कान्हेरे यांनी नाशिकला जॅक्सनला मारलें त्या वेळच्या 'The Martyr of Nasik'या तलवारमध्ये मी लिहिलेल्या लेखाचें आणि चट्टोपाध्याय यांनी 'तलवार'मध्येच लिहिलेल्या अेका लेखात 'हेल्गिोलँडची जर्मनीने त्या वेळी चालविलेली सामरिक तटबंदी नि त्यामुळे अिंग्लंड नि जर्मनी यांचें भावी युद्ध कसें जवळ येत आहे यांचे वर्तविलेले अचूक नि बुद्धिनिष्ठ भविष्य,' ह्यासारख्या लेखांचे जर्मनीतील पत्रांतूनसुद्धा घेतले जाणारे अुतारे; त्यायोगे जर्मन आरक्षक (Police) पुढाऱ्यांची नि राजकीय वर्तुळांतील प्रमुख राजकारण्यांची आम्हांशी अगा संभवनीय अँग्लो-जर्मन युद्धात भारतीय क्रांतिकारक पक्षाकडून हिंदुस्थानात सशस्त्र सैनिक अुठावणी कशी करता येअील याविषयींच्या चर्चेचा झालेला गुप्त सूत्रपात; मला शेवटी लंडनला ब्रिटिशांनी केलेली अटक; मला पकडून हिंदुस्थानात आणताना मार्सेलिसला मी समुद्रात अुडी टाकून, समुद्र पोहून, फ्रान्सच्या भूमीवर अर्धा मैल गेलो असताही ब्रिटिश अधिकाऱ्यांनी मला पकडून नेल्यामुळे फ्रेंच राष्ट्रात अुद्भवलेला प्रक्षोभ, त्यातून निर्माण झालेल्या युरोपातील सर्व राष्ट्रांच्या परस्पर संबंधानाच आव्हानिणाऱ्या अिंग्लंडने फ्रेंच भूमीवर केलेल्या आक्रमणाच्या आरोपाचा आंतरराष्ट्रीय प्रश्न आणि त्याचा निर्णय लावण्यासाठी हेग-मधील जागतिक न्यायालयात युरोपातील राष्ट्रांतून निवडलेल्या न्यायाधीशांपुढे चाललेल्या माझ्या मुक्ततेविषयीचा जगप्रसिद्ध खटला; अमेरिकेत अभिनव भारताचे सदस्य हरदयाळ ह्यांनी काढलेल्या गदर पक्षाची प्रचंड क्रांतिकारक अुठावणी आणि तीस सहस्रांवर शीख लोकांचा भरणा होअून हिंदुस्थानातील शीख सैनिकांत त्यामुळे झालेली क्रांतिकारक जागृति, त्या वेळी होअू घातलेल्या ब्रिटिश-जर्मन महायुद्धात ब्रिटिशांविरुद्ध हिंदुस्थानात सैनिक सशस्त्र अुठावणी करण्यासाठी शस्त्रांनी नि स्वयंसेवकांनी भरलेल्या आगनावा अमेरिकेतून हिंदुस्थानात धाडण्याचे धाडसी प्रयत्न; अशा अग्निनौकांपैकी कोमागाटामारू अग्निनौका कलकत्त्यास पोचताच ब्रिटिशांशी झालेली क्रांतिसैनिकांची अुघड लढाअी; बंगाली क्रांतिकारकांनी बॉम्ब नि रिव्हॉल्वरा-निशी ब्रिटिश अधिकाऱ्यांचे बळी पाडण्याचा चालविलेला गुप्त छाप्यांचा धुमाकूळ;

रासबिहारी बोस यांच्या नेतृत्वाखाली पंजाबमधील हिंदी सैनिकांच्या शिबिरात क्रांतिकारकांनी गुप्तपणे प्रचार करून ब्रिटिशांविरुद्ध हिंदी सैनिकांची अुदंड अुठावणी होण्याचा जवळ जवळ यशस्वी होत आलेला विस्तृत कट, अित्यादि घटना अितक्या त्वरेने आणि अितक्या व्यापक प्रमाणात चालल्या की, लंडनला १९०६ मध्ये मी पोचलो तेव्हा अिंग्रजांच्या शत्रुस्थानी असलेल्या परराष्ट्रांशी हिंदुस्थानात स्वतंत्र क्रांति घडवून आणण्यासाठी सधिमबंध जुळविण्याचा आणि हिंदुस्थानातील हिंदी सैनिकांत सशस्त्र क्रांतीचा प्रचार करून ५७-सारखा आणखी अेक सामरिक अुठाव करण्याचा जो कार्यक्रम केवळ कागदावर मी आखीत असे आणि ज्याचा सक्रिय सूत्रपात अभिनव भारताने सर्वांआधी अितक्या हिरिरीने चालू केला त्याला अितक्या अल्पावधीत अितकें विशाल नि जाज्वल्य स्वरुप आलेले पाहून, मी जरी मध्यंतरीच पकडला जाअून शत्रूंच्या हाती बंदिवासात पडलो होतो तरी, माझें मलाच आश्चर्य नि धन्यताही वाटू लागली.

अिंग्लंडचें पहिले महायुद्ध चालू होण्याच्या तोंडीच हरदयाळ, चट्टोपाध्याय, पंडित शामजी, आचार्य अित्यादि अभिनव भारताच्या पुढाऱ्यांच्या आणि बंगाल, अमेरिका, जपान अित्यादि ठिकाणच्या भिन्नभिन्न क्रांतिकारक संस्थांचे पुढारी यांच्याशी जर्मनीच्या राज्याधिकाऱ्यांचा हिंदुस्थानात क्रांतियुद्ध चेतविण्यासाठी शस्त्र-साहाय्य, धनसाहाय्य नि रणतज्ज्ञसाहाय्य जर्मनीने द्यावें असा अनौपचारिक सधि झाला. जर्मनांना त्या महायुद्धाच्या पूर्वरंगात जे विजयामागून विजय मिळत गेले त्या काळात जर्मनीमधील भारतीय क्रांतिकारकांची, जर्मन सरकारशी अधिकृत संबंध ठेवण्यासाठी अेक समिति नेमण्यात आली. तीत चट्टोपाध्याय, हरदयाळ, पिल्ले, आचार्य हे अभिनव भारताचे पुढारी आणि बंगाल, अमेरिका प्रभृति ठिकाणच्या क्रांतिसंस्थांतील स्वामी विवेकानंदांचे बंधु डॉ. भूपेंद्रनाथ नि आणखी दोन चार पुढारी समाविष्ट होते. जर्मन अधिकाऱ्यांशी आणि प्रत्यक्ष सम्राट् कैसरशी जीं बोलणी होत होतीं तीं प्रमुखत वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांच्या द्वारेच होत. राजा महेंद्रप्रताप हे स्वित्झरलंडमध्ये आल्यानंतर त्यांची भेट झाली तीही वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांनीच जुळवून आणली होती.

## भारताचें पहिलें स्वतंत्र अस्थायी शासन

हिंदुस्थानच्या भावी स्वतंत्र शासनाच्या पूर्व प्रतिनिधित्वाचे सर्वाधिकार वजावणारी आणि जिला जर्मन, तुर्कस्थान, प्रभृति जर्मन गटातील राष्ट्रांनी मान्यता दिली होती अशी ही क्रांतिकारक समिति हीच स्वतंत्र हिंदुस्थानचें पहिले तात्कालिक, अस्थायी शासन (Provisional Government of Independent India) म्हणून संबोधिली गेली! तथापि येथे हें निक्षून सांगितलें पाहिजे की, पुष्कळ पुढे राजा महेंद्र प्रतापांनी अफगाणिस्थानकडे जें अेक स्वतःच्याच अध्यक्षतेखाली स्वतंत्र

हिंदुस्थानचें अस्थायी शासन (Independent India provisional Government) स्थापलें त्याचा नि जर्मनीतील ह्या चट्टोपाध्याय प्रभृतींच्या क्रांतिकारक समितीच्या अस्थायी शासनाचा काही अेक संबंध नव्हता. राजा महेंद्र प्रतापांची दिशाच वेगळी होती. अभिनव भारतीय चट्टोपाध्याय प्रभृतींच्या क्रांतिकार्यी मुरलेल्या ह्या जर्मनीमधल्या समितीला ती दिशा मान्य नव्हती.

ह्या समितीच्या, हिंदुस्थानात क्रांतीचा अुठाव करण्यासाठी केलेल्या योजनेसाठी जें लागेल तें धनसाहाय्य आणि शस्त्रसाहाय्य पुरविण्यात जर्मन सम्राट् कैसरच्या आज्ञेने जर्मन सैनिक अधिकाऱ्यांनी शक्य ते ते साहाय्य दिलें, यत्न केले हें राजनैतिक कृतज्ञतापूर्वक आम्ही विसरता कामा नये. हिंदुस्थानात शस्त्रास्त्रें नि क्रांतिसैनिक धाडण्यासाठी जर्मनांनी, ब्रिटिशांच्या सर्वत्र पसरलेल्या प्रचंड रणनौकांच्या नि पाणबुड्यांच्या जाळयांतूनही वाट फोडून काही रणनौका बंगालच्या अुपसागरापर्यंत घुसविल्या, त्यांतील सर्वांत गाजलेली जर्मन रणनौका म्हणजे अेम्डेन. तिनें अचानक छापा घालून मद्रासवर बॉंबमारा जेव्हा केला तेव्हा हिंदुस्थानभर केवढी धास्ती बसली आणि पूर्वेतील ब्रिटिश नौदलाला केवढा हादरा बसला तें प्रसिद्धच आहे. ह्या अेम्डेनचा मुख्य ओघ अंदमानवर छापा घालून तें हस्तगत करून मला नि अितर क्रांतिकारक राजबंद्यांना सोडवून, ब्रह्मदेशावर चाल करावी आणि तेथे असलेल्या ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यात क्रांतिकारकांनी आधीच बंडाची सिद्धता केलेली होती त्या सैन्यास मिळावें आणि तेथून हिंदुस्थानवर चढाओ करावी असा होता. 'अेम्डेन'च्या ह्या चांचेगिरीनें साऱ्या बंगालच्या अुपसागरात ब्रिटिश नौकांची ये जा कशी बंद पडली, अंदमानादिक बेटांतील ब्रिटिशलोकांसुद्धा साऱ्यांचा अन्नपुरवठा कसा बंद पडला, त्याची काही माहिती माझ्या 'जन्मठेप' पुस्तकात दिलेली आहे. अमेरिकेतील गदर पक्षानें अेक स्वतंत्र लढाअू विमान धाडून अंदमानच्या बंदिगृहातून मला अचानक अुचलून नेण्याचाही कट केला होता परंतु अेकदोन महिन्यांतच अेम्डेन'ला घेरून ब्रिटिश रणनौकांनी पकडल्यामुळे तें सर्वच प्रकरण समाप्त झालें.

सरदार अजितसिंग, मानवेंद्र राय, राजा महेंद्रप्रताप, रासबिहारी बोस, तारकनाथ दास असे अनेक क्रांतिकारक ज्यास जशी जमली तशी त्या त्या राष्ट्रातून क्रांतिकारक अुठावणीची सज्जता करीत होते. निरनिराळ्या रणक्षेत्रातून जर्मन सैन्याच्या तुकड्यातून मिसळून अनेक हिंदी क्रांतिकारक अिंग्रजी सैन्याशी प्रत्यक्ष लढाओत लढत होते. खानखोजे, अंबाप्रसाद, सुफी प्रभृति क्रांतिवीरांनी तर अिराणपर्यंत जाअून तेथील धुमाकुळीत ब्रिटिशांशी अुडालेल्या रणांगणातील चकमकीत सशस्त्र झुंज देण्यास सोडलें नाही. अिकडे, हॉंगकॉंग, सिंगापूर नि ब्रह्मदेश यात असलेल्या ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यातून क्रांतिकारकांच्या सक्रिय अुत्तेजनानें लहान मोठी बंडेंच झाली. ब्रह्मदेशापासून अिराणपर्यंत क्रांतिकारकांच्या अिंग्रजांशी झालेल्या ह्या अनेक

सशस्त्र चकमकींत शेकडो अिंग्रजांचे जसे बळी पडले तसेच शतावधि क्रांतिकारकांचेही रणात बळी पडले. अनेकांना फाशी झाल्या, जन्मठेप काळेंपाणी झालें.

## जर्मनीने घातलेली हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची अट

सशस्त्र क्रांतिकारकांच्या ह्या परराष्ट्रीय आंदोलनाच्या प्रभावानेच जर्मन विजयाची लाट अगदी ओसरून जाण्याचे आधी जर्मन सम्राट् कैसर ह्याने प्रेसिडेंट विल्सनला तें महायुद्ध थांबविण्यासाठी जर्मनीच्या वतीनें संधीच्या ज्या चौदा अटी सुचविल्या त्यांत जर्मनीची मागणी म्हणून हीही अेक अट होती की ब्रिटिशांनी हिंदुस्थानचें पूर्ण राजकीय स्वातंत्र्य मान्य करावें!

हिंदी राजकारणाला अगदी शून्यापासून जागतिक राजकारणात जितकें वरचें स्थान पटकावून घेण्याचें हें कार्य केवळ हिंदुस्थानातील सशस्त्र क्रांतिकारकांचा त्याग, धाडस, दूरदृष्टि आणि निर्भय कार्यक्रम ह्याच्या बळानेच साधता आलें होतें. हिंदुस्थानातील कोणत्याही नि:शस्त्र पक्षापैकी अेकानेही त्या सशस्त्र क्रांतिकारक योजनांशी नांवाचा सुद्धा संबंध ठेवलेला नव्हता. कॉंग्रेस तर सशस्त्र क्रांतिकारकांच्या ह्या परराष्ट्रांतील नि स्वराष्ट्रांतील लढाअू कार्यक्रमाला राजद्रोह Sedition, Treason, म्हणून ब्रिटिश लोकांच्यापेक्षाही मोठ्यामोठ्याने निषेधीत राहिली होती. महायुद्धात ब्रिटिशाचा विजय होवो म्हणून प्रार्थना करीत होती ! ! तथापि त्यांच्यातील काही जहाल नेते महायुद्धात विजय मिळाल्यानंतर हिंदुस्थानला होमरूलचे अधिकार मिळावेत म्हणून मागण्याही करीत होते.

## क्रांतिकारकांचा दुर्दम्य आशावाद

शेवटी त्या जर्मनीशी झालेल्या पहिल्या महायुद्धात जर्मनीचा पराजय झाला. तथापि हिंदी क्रांतिकारक पक्षाची तीव्र निराशा झाली नाही. त्यांचा धीर खचला नाही. कारण त्या महायुद्धात जर्मनीचा लढाअू हात हिंदुस्थानपर्यंत प्रत्यक्षपणे पोचण्याची शक्यता नव्हती हे क्रांतिकारक पुढारी जाणूनच होते. भूमिमार्गाने तुर्कस्थान तें अफगाणिस्थानपर्यंत जर्मन शस्त्रसामग्री नि रणतज्ञ पोचून हिंदुस्थानातील क्रांतिकारकांच्या सशस्त्र अुठावणीस यशस्वी साहाय्य देतील हें जवळजवळ अशक्य होतें. आणि समुद्र मार्गे तर तें केवळ असंभवनीय होतें. कारण ब्रिटन नि अमेरिका ह्यांच्या नौदलांचे अटलांटिक ते बंगालच्या अुपसागरापर्यंत अप्रतिहत स्वामित्व होतें. आणि हिंदुस्थानला अगदी जवळ असलेलें आशियातील अेकुलतें अेक बलाढ्य जें जपान तें त्या महायुद्धात अिंग्रजांचेच बाजूला मिळालेलें होतें. ही परिस्थिति आधीपासूनच क्रांतिकारकांनी हेरलेली असल्याने त्या सन १९१४ ते १८-च्या महायुद्धात अिंग्रजाच्या शत्रूशी अेकजूट करून जितका अुपद्रव अिंग्रजांना देता आला तितका देअून, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न जागतिक राजकारणातही ब्रिटनला पदोपदी नडेल

अितकें त्याचें जागतिक महत्त्व आणि त्याचा ब्रिटिशांना वाटणारा दरारा अुत्पन्न करून आणि ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यामध्ये प्रत्यक्ष बंडें करून सहस्रावधि सैनिकांनी अुठावें अितकी हिंदी स्वातंत्र्याची आंच नि ब्रिटिशांचा विद्रोह फैलावून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गावरील जो परिणामकारक नि शेवटच्या यशास हटकून पोंचणारा टप्पा हिंदी क्रांतिकारक पक्षास गाठता आला त्यामुळे त्यांचा अुत्साह अुलट दुणावून पुढच्या अशाच कोणत्यातरी महायुद्धात ब्रिटिश सत्ता पेचात आली तर आपण तिला खिळखिळी करून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मिळवू शकू अशी त्या हिंदी क्रांतिकारक पक्षाला दुर्दम्य आशा वाटू लागली.

## अितिहासरक्षणाचें श्रेय शत्रू पक्षाला !

आपणांपैकी कोणास किंवा अेखाद्या प्रामाणिक अितिहासकारास त्या पहिल्या जर्मन-ब्रिटिश महायुद्धातील सशस्त्र क्रांतिकारकांच्या गुप्त ज्वालाग्राही नि जागतिक खटाटोपाचा वृत्तान्त जर मी वर केलेल्या नुसत्या त्रोटक रूपरेषेपेक्षा अधिक विस्तारानें वाचावयाचा असेल तर त्यांनी हिंदी क्रांतिकारकाच्या शत्रुस्थानी असलेल्या ब्रिटिशसत्तेनेच प्रसिद्ध केलेला रौलेट कमिशनचा रिपोर्ट हा ग्रंथ तरी अवश्य वाचावा. सशस्त्र क्रांतिकारकांविषयी अुल्लेख करण्यासही आमचे बहुतेक स्वदेशी ग्रंथकार घरकापत होते आणि स्वतःस 'अहिंसक पक्षीय' म्हणविणारे तर त्या क्रांतिकारक वीरात्म्यांचे नि हुतात्म्याचें नामोल्लेखही करणें 'पाप' समजत असत नि अद्यापही समजतात. त्यामुळे क्रांतिकारक आंदोलनाचा काही तरी साधार अितिहास जो आज जिवत राहू शकला आहे तो तितका तरी जिवत ठेवण्याचें श्रेय रौलेट रिपोर्टासारखी राज्यीय प्रतिवृत्तें ज्या ब्रिटिश प्रसिद्धि विभागाने छापली त्या आमच्या परकीय शत्रुपक्षालाच दिलें पाहिजे.

पहिलें महायुद्ध सन १९१८ मध्ये संपल्यानंतर दुसऱ्या महायुद्धाची संधि येअीतों सशस्त्र क्रांतिकारक पक्ष स्वस्थ बसलेला नव्हता पहिल्या महायुद्धात त्यानी केलेल्या महत्त्वाच्या प्रगतीने अुत्साहित होअून त्याच दिशेने त्यानी अधिक व्यापक प्रमाणावर सैनिकीकरणाच्या नि परराष्ट्रीय अुलाढालीच्या चळवळी सतत चालविल्या. तिकडे जपान, चीन, अमेरिका, मेक्सिकोपासून तों युरोपातील स्वित्झर्लंड जर्मनी, स्वीडन ते अिराण, अफगाणिस्थानपर्यंतच्या सर्व परराष्ट्रीय राजधान्यांतून ते क्रिक्रुतलेले क्रांतिकारकांचे गट ब्रिटिश विद्रोह फैलावीत राहिले. त्याचा तो 'जागतिक अुपद्रव हाणून पाडण्यासाठी ब्रिटिशांनाही सारखा सव्यास सोसावा लागला. अिकडे प्रत्यक्ष हिंदुस्थानात तर त्या क्रांतिकारकाच्या गुप्त संस्थानी ब्रिटिश सत्तेचा सशस्त्र प्रतिकार करण्यासाठी नि सैन्यात ब्रिटिश विद्रोह फैलावण्यासाठी ब्रिटिश अधिकाऱ्यांना वेचून वेचून ठार मारण्याचा, त्यांची कोशागारें लुटण्याचा आणि काही प्रसंगी तर ब्रिटिशांच्या शस्त्रागारांवरच धाड घालून शस्त्रास्त्रेंही लुटून नेण्याचा

गुप्तता धुमाकूळ उडवून दिला. त्यांचें सविस्तर वृत्त सांगण्याचा नाहीं हा प्रसंग नाहीं आणि ह्या व्याख्यानात आता वेळही उरला नाहीं. तथापि त्यांनी त्यांचें ध्यानात देण्यासाठी भगतसिंग-राजगुरूंची प्रकरणें; काकोरीच्या संग्रामाचा, बिस्मिल प्रभृति हुतात्म्यांचे पराक्रम; आनंदसिंग, सूर्यसेन प्रभृतींनी लुटलेले चितागांवचे ब्रिटिश शस्त्रागार, टिळकियाणच्या ब्रिटिश गव्हर्नरावर क्रांतिकारक वीरांनी केलेले गोळीबार इत्यादि व्यसनींचा नि घटनांचा गुप्तता नामोल्लेखही त्या पहिल्या महायुद्धा-नंतरच्या काळात क्रांतिकारकांनी हिंदुस्थानात जो सशस्त्र रणपाती धुमाकूळ घातला त्यांची कल्पना आपल्या डोळ्यापुढे उभी करण्यास पुरेसा आहे.

## स्वातंत्र्यप्राप्तीची दुसरी संधि

शेवटी ज्या कोणच्या तरी ब्रिटिश सत्तेच्या जिवावरच उठणाऱ्या दुसऱ्या अशाच्या महायुद्धाच्या सुवर्ण संधीकडे हिंदी क्रांतिकारक टक लावून बसले होते ती संधि अेकदाची आली!

सन १९३९ मध्ये ब्रिटनविरुद्ध जर्मनीचे दुसरे जागतिक महायुद्ध भडकलें. हिंदुस्थानातील नि हिंदुस्थानाबाहेरील साऱ्या हिंदी सशस्त्र क्रांतिकारक पक्षांनी ही पुन्हा आलेली महासंधि साधण्यासाठी लगोलग कंबर कसली. पहिल्या महायुद्धातील जी रणयोजना आखलेली होती आणि जे सामरिक अनुभव आलेले होते त्यापासून स्फूर्ति घेऊन नि नवीन परिस्थितीस जुळणारे अवश्य ते ते पालट करून तोच डाव क्रांतिकारकांनी ब्रिटिशांविरुद्ध पुन्हा टाकला. हिंदुस्थानबाहेर अुरलेले नि आता अनुभवाने नि वयानेही वृद्ध झालेले परराष्ट्रातील हिंदी क्रांतिकारक, जर्मनीची रण-देवताच बनलेल्या हिटलरच्या पक्षास अुघडपणे मिळाले नि आपआपल्या ठिकाणी ब्रिटिश-विद्रोही अुठावण्या करू लागले. क्रांतिकार्यात मुरलेल्या सरदार अजित-सिंगासारख्या पुढाऱ्यांनी ब्रिटनशी युद्ध पुकारलेल्या अिटलीत अुतरून व अिटलीचा प्रख्यात सर्वेसर्वा जो मुसोलिनी त्याच्याशी त्याने हिंदी स्वातंत्र्यासाठी सर्व प्रकारचें नि शक्य तें ते रणसाहाय्य द्यावे अशी बोलणी चालविलीं आणि मुसोलिनीनेही तीं मान्य करून अिटलीच्या हाती पडलेल्या, ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यातील सहस्रावधि हिंदी सैनिकांना शस्त्रास्त्रें पुरवून दिले. जर्मनीत हिटलरनेही तीच व्यवस्था केली. ह्या क्रांतिकारक पुढाऱ्यांच्या हाती सोपवून दिलेल्या जर्मनी, अिटली प्रभृति ठिका-णच्या सहस्रावधि हिंदी सैनिकांचे मनात ब्रिटिश विद्रोह नि स्वदेशस्वातंत्र्यप्रेम चेतवून त्यांचे अेक बसलेलें भारतीय मुक्तिसैन्य अुभारण्याचें आणि हिंदुस्थानवर चढून येण्याचें क्रांतिकारक युद्धकारण परराष्ट्रात पुन्हा नेटाने चालू झाले.

तथापि ही भारतीय क्रांतिसैन्याची चढाअी, जर्मनी, अिटलीसारख्या त्या दुसऱ्या महायुद्धात विजयामागून विजय मिळवीत आलेल्या नि ब्रिटिशांना सळो का पळो करून सोडणाऱ्या प्रबळ राष्ट्रांचें सशस्त्र साहाय्य मिळत असताही, —भूमिमार्गाने

हिंदुस्थानवर होणें हें पहिल्या महायुद्धात जसें दुर्घट होतें तसेंच या दुसऱ्या महायुद्धा-तही दुर्घटच होतें.

## रासबिहारी बोस

परंतु ह्या दुसऱ्या महायुद्धात भारताच्या सुदैवाने पहिल्या महायुद्धात न घड-लेली अशी अेक अत्यंत अनुकूल युद्धघटना घडून आलेली होती. ती ही की ज्या प्रबळ राष्ट्राचा हात हिंदुस्थानच्या सीमेला सहजीं पोचत होता तो आशियातील जपानही जर्मनी आणि अिटलीप्रमाणेच ब्रिटिश-अमेरिकेशीं युद्ध छेडील असा अुत्कट संभव दिसू लागला. त्यानही ह्या संभवनीय संधीचा पुरेपूर लाभ घेअू शकणारा, त्या दिशेने ज्याने जपानात अनेक वर्षे निर्वासिताचें जीवन कंठीत असता क्रांतिप्रयत्न अखंडपणे चालविले होते आणि ज्याने जपानमध्ये वरिष्ठ राजकारणात नि सेना-धिकाऱ्यातही संधान जुळवून ठेवले होतें असा अेक हिंदु क्रांतिवीर जपानातच विद्य-मान होता. त्याचें नाव होतें रासबिहारी बोस[1]!

रासबिहारी बोसांची नि माझी अुभ्या जन्मात प्रत्यक्ष भेट होअू शकली नाही. आता तर ते दिवंगतही झालेले आहेत. मी सन १८९९ मध्ये क्रांतिकार्यात पडल्या-नंतर कित्येक वर्षांनी रासबिहारी बाबू क्रांतिपक्षात शिरले होते. 'अभिनव भार-ताच्या अिंग्लिडमध्ये घडलेल्या अनेक धाडसी क्रांतिकारक रणकृत्याची मर्वत्र सळ-सळ अुडवून देणारीं वृत्तें त्यांच्याही मनोवृत्तींना पेटवीत राहिलेलीं होतीं. त्यामुळे पुढे ज्या वेळी त्यांनी माझ्याशी पत्रव्यवहार चालू केला त्या वेळी ते मला त्यांचे अेक स्फूर्तिस्थान मानीत असल्याचें स्पष्टपणे लिहीत असत. आता तर त्यांच्या मोठ-मोठ्या क्रांतिकार्यांची माहिती सर्वश्रुतच झालेली आहे. प्रत्यक्ष रौलॅट रिपोर्टमध्येही ब्रिटिश शासनाने ती प्रथिली आहे. माझी अंदमानातून आणि रत्नागिरीच्या स्थान-बद्धतेतून सन १९३७ मध्ये सुटका झाल्यानंतर त्यांनी प्रथम मला अुद्देशून अेक अनावृत पत्र वृत्तपत्रात प्रसिद्धविले. नंतर ते मलाही व्यक्तिशः पत्रें टाकू लागले. माझ्या सैनिकीकरणादि सशस्त्र क्रांतीच्या कार्यक्रमाशी नि धोरणाशी ते पूर्णपणे सहमत होते. ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यामध्ये ब्रिटिश-विद्रोही भावना चेतवून सैनिक क्रांतिकारक अुठावणी करण्यासाठी त्यांनी पहिल्या महायुद्धाच्याच आगेमागे पंजाब प्रांतात केलेले प्रयत्न अित्यादि त्यांच्या क्रांतिकार्यांना मी काल्च्या नि आजच्या व्याख्यानात आधी निर्देशिलें आहेच.

पुढे मी हिंदुमहासभेचा अध्यक्ष झाल्यानंतर बंगाल पंजाबपर्यंत ठिकठिकाणी असलेले अनेक पुरातन क्रांतिकारकही जसे हिंदुमहासभेत आले त्याचप्रमाणे रासबिहारी बाबूंनी जपानमध्ये हिंदुसभा स्थापिली नि स्वतः तिचें अध्यक्षपद स्वीकारलें. त्यांनी माझ्या काही भाषणांना आणि संक्षिप्त चरित्रालाही जपानी पत्रातून प्रसिद्धि दिली होती. हिंदुमहासभेच्याविषयी ते अधून मधून जीं पत्रें मला धाडीत त्यांतून त्या हिंदु

संघटन विषयाच्या पडद्याआडून जपानमध्ये ते करीत असलेल्या क्रांतिकारक चळवळीं-चेंही वृत्त सांकेतिकपणें कळवीत असत. युरोपात जेव्हां हें दुसरें ब्रिटिश जर्मन महायुद्ध चालू झालें तेव्हापासून माझ्यावर नि त्यांच्यावरही ब्रिटिश हेराची वक्रदृष्टि अधिकच कडकपणे वळल्यामुळे त्याची कधींमधीं येणारीं वरील पत्रेंही टपालानें येण्याचें बंद झालें. परंतु अेकदा दोनदा रासबिहारी बाबूंनी कोणच्या मार्गानें, काय की, पण दोघा बौद्ध भिक्षूंच्या हातीं मला दोन पत्रें धाडलीं. हे बौद्ध भिक्षु मुंबअीतच असणाऱ्या अेका लहानशा बुद्ध विहारात अुतरलो आहो असें म्हणाले. त्यापैकीं पहिल्या पत्रात ह्या दुसऱ्या महायुद्धात जर्मन अिटली नि जपानशी संधि करून मागील महायुद्धाप्रमाणेच त्यांच्या द्रव्यांच्या, शस्त्रास्त्रांच्या नि सेनानींच्या साहाय्याने भारतीय क्रांतिसैन्य अुभारले जात आहे, तिकडेही सज्जता असावी असें सुचविलेलें होतें. मी लेखी काहीच अुत्तर न देता तोंडीं विचारलें होतें कीं, 'ब्रिटिशाच्या विरुद्ध स्वतः जपान युद्ध पुकारणार आहे हें नक्की आहे का? जर्मन विजयाची लाट प्रबळपणे चढती आहे तोंवरच जपान अुठेल तर लाभ.' रासबिहारींच्या दुसऱ्या पत्रात स्पष्टपणे अुत्तर आलें की चालू वर्षाच्या (सन १९४० च्या) आत बाहेर जपान ब्रिटिशांविरुद्ध युद्धघोषणा करणार हें निश्चित दिसतें. रासबिहारींचें हें दुसरें पत्र सन १९४० च्या अेप्रिल महिन्याच्या मागेमागे मला मिळालें होतें. परंतु, त्यानंतर ते बौद्ध भिक्षु पुन्हा काहीं माझ्याकडे आले नाहीत. ते आपण होअून नाहीसे झाले किंवा त्यांना ब्रिटिश शासनानें हेरगिरीच्या संशयाखाली पकडून नेलें तें मला काहीच माहीत नाहीं.

ह्या दुसऱ्या महायुद्धाची संधि साधून ब्रिटिशाविरुद्ध क्रांतियुद्ध पेटविण्यासाठी मी प्रकटपणे सैनिकीकरणाची चळवळ देशव्यापी प्रमाणावर तत्काल हातीं घेतली. ह्या कामी हिंदुमहासभेत शिरलेल्या अनेक पूर्वीच्या क्रांतिकारक पुढाऱ्यांचा नि डॉ. मुंजे प्रभृति हिंदुसभेच्या दूरदर्शी नि राजकारणपटु पुढाऱ्यांचा पूर्ण पाठिंबा होताच. तेव्हा हिंदुमहासभेच्या अखिल भारतीय संघटनेनेच ही सैनिकीकरणाची प्रकट चळवळ हातीं घ्यावी असें ठरलें

## दोघेही गट साम्राज्यवादी आहेत

सन १९३९ मध्ये महायुद्ध आरंभ होताच कांग्रेसच्या पुढाऱ्यांनी ब्रिटन, फ्रान्स प्रभृतींचा पक्ष हा लोकमताक असल्याने आणि त्यांची घोषणा To Save Democracy in the World ही असल्याने ब्रिटिशांच्या पक्षास अुचलून धरण्याचे ठरविले आणि हिटलर मुसोलिनी प्रभृति ब्रिटिशाच्या शत्रुपक्षास दुसऱ्यांचीं राष्ट्रें गिळणाऱ्यांचीं राक्षसी महत्त्वाकांक्षा धरणारा आक्रमक नि आततायी पक्ष ठरविले. परंतु हिंदुमहासभेने मात्र माझ्या धोरणास अनुसरून धरून असा वचकचीत ठराव दुसरें महायुद्ध चालू होताच केला की ब्रिटन प्रभृति राष्ट्रांची जूट जें म्हणत आहे की जगातील लोकमतेच्या नि स्वातंत्र्याच्या रक्षणार्थच काय ते आम्हीं महायुद्धास

उतरलो आहोत आणि हिटलर, मुसोलिनी प्रभृति ब्रिटनच्या शत्रूंची महायुद्धातील फळी मात्र स्वतःचें साम्राज्य जगावर लादणाऱ्या आक्रमकाची नि आततायाची आहे, त्या ब्रिटनच्या घोषणेवर आमचा लवलेश विश्वास नाही. ह्या महायुद्धात पडलेलीं ब्रिटनपक्षीय आणि जर्मन पक्षीय सर्वच राष्ट्रें आपआपल्या स्वार्थासाठीं लढत असून दोघेही सारखेच साम्राज्यवादी आहेत. ब्रिटन, फ्रान्स प्रभृति ज्या राष्ट्रांची साम्राज्यें आज विस्तारलेली आहेत तीं त्यांची साम्राज्यें नष्ट होऊं नयेत म्हणून लढत आहेत आणि जर्मन, इटली प्रभृति ज्या राष्ट्रांची तशीं साम्राज्यें आज नाहींत ते तशीं साम्राज्यें संपादण्यासाठी लढत आहेत. अशा वेळी कोणाचा पक्ष घ्यावा हा तत्त्वाचा प्रश्न नाहीं. हिंदुस्थानच्या राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने ज्या परिस्थितीत जें धोरण शक्य अंगल तें अवलंबिणें हेंच शिष्ट होय. ह्या स्वतंत्र दृष्टीने आजच्या हिंदुस्थानच्या अंतर्गत परिस्थितीत हिंदुस्थानच्या रक्षणासाठी आणि भविष्यकालीही हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या आकांक्षा पूर्ण करण्यासाठी जे अत्यंत उपयुक्त नि व्यवहार्य साधन ठरणारें आहे तें सैनिकीकरणाची चळवळ हेंच होय. यास्तव ब्रिटिशाच्या हिंदी सैन्यात शक्य तितक्या हिंदूनी भरती व्हावें, प्रत्यक्ष युरोपीय युद्धक्षेत्रात लढण्याचें शिक्षण घ्यावें आणि हिंदुस्थानच्या रक्षणासाठी शस्त्रसज्ज व्हावें. या कामी निर्वेधद्यापुरते ब्रिटिश सत्तेशी हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात सहकार्य करण्यास हिंदुमहासभा सिद्ध आहे. अशा आशयाचा ठराव, त्या परिस्थितीत हिंदुमहासभेसारख्या अखिल भारतीयप्रकट संस्थेला जितक्या नैर्बंधिक ( Legal )मर्यादेत करणे भाग होतें तितकी मर्यादा संभाळून योजलेल्या शब्दात हिंदुमहासभेने केला

## कित्येक शतकांनंतर ब्रिटनच्या भूमीवर झालेला शत्रूचा मारा

अिंग्लंडवर ह्या दुसऱ्या महायुद्धात पहिल्या महायुद्धापेक्षाही महत्तर संकट कोसळलेलें होतें. ज्या समुद्राच्या परिघामुळे नेपोलियनसारख्याला प्रत्यक्ष अिंग्लंडवर मारा करता आला नाही तो अिंग्लंडभोवतालचा समुद्राचा खंदक निरुपयोगी ठरून, आपल्या नव्या नि प्रचंड विमानांच्या तांड्याने, नव्या नि भयंकरतम अस्त्राचा मारा प्रत्यक्ष लंडन नगरावरही करून हिटलरने ब्रिटिश जनतेला सळो का पळो करून सोडलें. कित्येक शतकें ब्रिटनच्या भूमीवरच परशत्रूच्या शस्त्राचा मारा होऊन घराघरांच्या दाराशी रणक्षेत्र आलेले, स्वकीयांच्या रक्ताचे पाट वाहिलेले, नगरेंच्या नगरें शत्रूच्या अस्त्राच्या प्रचंड स्फोटाने अग्नीत गुरफटून गेलेली आणि भूकंपाप्रमाणे धक्के बसून कोलमडून गेलेली अशी स्वदेशाचीच दुरवस्था ब्रिटिश जनतेने पाहिलेली नव्हती. हिटलरच्या वैमानिक माऱ्यामुळे ती दुर्दशा ब्रिटिशांच्या बायकामुलांनासुद्धा त्या काळी प्रत्यक्ष नि प्रथमच अनुभवावी लागली. युरोपातील ह्या भयंकर संकटापासून स्वतःच्या देशाचे संरक्षण करण्यासाठी ब्रिटनला जगभर विखुरलेलें आपले जें जातिवंत ब्रिटिश सैन्य ते शक्य तितक्या मोठ्या प्रमाणात युरोपमध्येच आणावें

लागलें. आणि साम्राज्याच्या नि महायुद्धाच्या अितर रणक्षेत्रांत शत्रुपक्षीय जर्मन गटाशी लढण्यासाठी शक्य तितक्या हिंदी सैन्याला, अिराण, आफ्रिका ते युरोप पर्यंतच्या रणभूमीवर आणणें भाग पडलें. त्यामुळे हिंदुस्थानातील ब्रिटिश अधिकाऱ्यांनी हिंदी लोकांना भूदल, नौदल नि विमानदलातील सैन्यात भरती करण्यासाठी आटोकाट प्रयत्न चालविले. त्याचवेळी हिंदु महासभेने सैनिकीकरणाचा, मी आताच सांगितलेला ठराव केल्याने आणि हिंदु लोकांनी सैन्यात शिरावें ह्यासाठी भारतव्यापी प्रचार आरंभिल्याने हिंदुमहासभेचा अध्यक्ष म्हणून मला व्हॉअिसरॉयने भेटीस बोलाविलें, त्या भेटीत मी स्पष्ट सांगितलें की 'तुमच्या ब्रिटिशसत्तेला ब्रिटिश हिताच्या दृष्टीने हिंदी सैन्याची आवश्यकता वाटते आहे आणि आम्हांला हिंदु हिताच्या दृष्टीनेही शक्य तितक्या मोठ्या प्रमाणात हिंदु लोकांची भरती हिंदी सैन्यात व्हावी याची आवश्यकता वाटते आहे. तेव्हा ह्या अुभयमान्य कार्यापुरतें आपलें नि आमचें सहकार्य ह्या महायुद्धात अवश्य होअू शकेल. हिंदी सैन्यात, हिंदु लोकांना कमिशनें मिळत नाहीत ती अट रद्द व्हावी. काही हिंदु जातींवर ( Unlisted ) बिनसैनिकी असा वाह्यात छाप मारून त्यांना हिंदी सैन्यात आजवर घेतलें जात नसे, तो भेदही रद्द व्हावा; ह्या नि अशा मी सुचविलेल्या सुधारणा करण्याचें व्हॉअिसरॉयने तत्परतेने मान्य केलें आणि जातिप्रांतनिर्विशेष हिंदु सैनिकांची सैन्याच्या तिन्ही दलांत भरती करण्यासाठी हिंदुमहासभेचें सहकार्य आपणांस अभिप्रेतच आहे असें आश्वासन दिलें.

## आधी सैनिक शिक्षण तर घ्या !

पहिल्या महायुद्धात लोकमान्य टिळकांनी याहीपेक्षा थोड्या सवलती मागितल्या होत्या. पण त्याही ब्रिटिश शासनाने दिल्या नव्हत्या. तरीही टिळकांनी सैन्यात हिंदी लोकांनी भरती व्हावें म्हणून पुणें प्रभृति ठिकाणी सभा घेअून नि लेख लिहून प्रचार चालविला होता. आता तर ब्रिटिश व्हॉअिसरॉयला ब्रिटिशांच्यात अडचणीमुळे पूर्वी नाकारलेल्या आणि मी मागितलेल्या त्या त्या सवलतीही सुविधा देणें भाग पडलें होतें. त्यातही मी केवळ हिंदूनाच सैन्यात भरती करण्याचा प्रयत्न करण्याचें आश्वासन दिलें होतें त्यासही व्हॉअिसरॉयांनी विरोधिलें नाही. ह्या सर्व अनुकूल परिस्थितीचा पुरेपूर लाभ घेण्यासाठी मी, डॉ मुंजे नि अितर काही जुन्या क्रांतिकारक हिंदुमहासभेतील पुढाऱ्यांनी साऱ्या प्रांतातून दौरे काढून सैनिक प्रचाराचा सपाटा चालविला की हिंदूंनो सैन्यात शिरा! महायुद्धाच्या युरोपियन रणक्षेत्रातही आपला पराक्रम गाजवून यथावत् युद्धशिक्षण घ्या! आपल्या देशाला तेच पुढे अत्यंत हितकारक ठरणारें आहे! माझ्या काही सभांतून ब्रिटिश सैनिकी अधिकारीही स्वतः अुपस्थित असत. त्यांच्या समक्ष सुद्धा मी त्या त्या प्रचंड हिंदु सभांतून सांगे की आज ब्रिटिश सैन्यात भरती होअून का होअीना ही अपूर्व संधि साधून प्रथम जो शस्त्रसंभार मिळतो आहे तो सर हाताशी घ्या! यथावत् युरोपियन रणं युद्धाबरोबरी

लढावयाचें ती तर लढण्यास शिका. मग ॲुद्या त्या शस्त्रांचा रोख नि नेम कोणावर-गि कुठे धरावयाचा तें ॲुद्याचें ॲुद्या बघता येईल!

जरी हिंदुमहासभेच्या नावाने हें हिंदु सैनिकीकरणाचें आंदोलन चाललें होतें, तरी तें वस्तुतः होते अभिनव भारताचेंच! सशस्त्र क्रांतिकारक राजनीतीचेंच! त्याच्या यशाविषयीं ॲकच गोष्ट सांगणें ॲिथे पुरें आहे की महायुद्धाच्या पहिल्या दोन वर्षांच्या आत दिल्लीच्या केंद्रीय विधिमंडळात संरक्षण मंत्र्यांनी आमच्या ॲका प्रश्नास ॲुत्तरिताना स्पष्टपणे सांगितलें की, जगातल्या बहुतेक रणक्षेत्रात हिंदी सैन्य लढत आहे. हिंदी सैन्यात भूदल, नौदल, विमानदल मिळून सध्या शेकडा ६५ हिंदु असून, शेकडा ३० ते ३२ मुसलमान आहेत. म्हणजे आमच्या हिंदु सैनिकीकरणाच्या चळवळीमुळे पूर्वी ज्या हिंदी सैन्यात शेकडा ३५ ही हिंदु नव्हते, तेथे हिंदूंची संख्या शेकडा पासष्ट झाली! आणि सैन्यातील मुसलमानांची संख्या शेकडा साठपासष्टा-वरून शेकडा ३०–३२ वर आली. (Militarise Hindudom ) ह्या घोषवाक्या-चीच ही यशस्वी फलश्रुति होती.

## सुभाषचंद्र बोसांची अपरिचित भेट

योगायोगाने ह्याच सधीस दि. २२ जून सन १९४० ह्या दिवशी त्या वेळचे देशगौरव, आणि आताचे नेताजी सुभाषचंद्र बोस हे अकस्मात् सावरकर सदनात येऊन मला भेटले. ह्या भेटीचा वृत्तान्त माझ्या काही निकटस्थ सहकाऱ्यांना जरी ठाऊक असला तरी त्याचा प्रकट सभेत असा ॲुच्चार हा मी प्रथमच आणि हेतुपूर्वक करीत आहे. आणि तोही ह्या व्याख्यानातील सूत्रापुरताच अगदी थोडक्यांत! सुभाषबाबू मुंबअीला मुख्यतः हिंदु मुसलमानांच्या ॲकीचा प्रश्न मिटवायचा मिटवून टाकण्यासाठी आलेले होते. वृत्तपत्रात जी भाषा त्या वेळेस वापरलेली मी वाचली तीतच बोलावयाचें म्हणजे " बॅ. जिनांची समजूत घालण्यासाठी ते गांधीजींच्याही पुढे चार पावलें जाणार होते. (He was going to outbid Gandhiji.)

ही वृत्तपत्री भाषा सोडली तरी ते स्वत च मला मनमोकळे हसत हसत म्हणाले, " अहो, मी जिनांना आताच भेटून आलो. पण काय गमत सागावी. त्यांनी मला विचारलें 'मिस्टर सुभाषबाबू, पण तुम्ही कोणाच्या वतीने ही तडजोडीचीं बोलणीं करावयास येता आहात?' मी (सुभाषबाबू) म्हणालो 'काँग्रेसच्या वतीने'! त्यावर जिना म्हणाले, 'पण तुम्हांला तर काँग्रेसने बहिष्कारलेलें आहे.' मी म्हणालो, 'पण Forward Block चा तरी मी अधिकृत पुढारी आहे की नाही! त्याच्या वतीने मी बोलू शकतो.' त्यावर जिना म्हणाले, 'परंतु जर तुम्ही मला मुसलमानांचा पुढारी म्हणून, हिंदु-मुसलमानांच्या तडजोडीकरिता भेटत असाल तर हिंदूंच्या प्रति-निधित्वाचा अधिकार असलेल्या कोणाशी तरी बोलण्यात अर्थ आहे. तुमचा Forward Block स्वत ला हिंदु संस्था म्हणवून घेतो आहे का? नाही! '; मी.

(सुभाष) म्हणाले, 'तर मग मी अेक हिंदु म्हणून तरी, हिंदु-मुसलमान तडजोडी-विषयी बोलू अिच्छितो.' त्यावर जिना म्हणाले, 'तर मग तुम्ही प्रथम सावरकरांना जाअून भेटा! हिंदूंचें प्रतिनिधित्व ते करू शकतात. व्यक्ति व्यक्तीशी चर्चा करून काय अुपयोग? सावरकर आले तर आपण काही चर्चा करू!' तेव्हा मी (सुभाष-बाबू) जिनाचे घरून निघालो नि आपल्याकडे तडक आलो! असें म्हणून सुभाषबाबू अेकदा स्वत:च पोटभर हसले! नंतर पुन्हा म्हणाले, नाही तरी मला आपल्याकडे अेकदा यावयाचेच होतें या पाळीला."

## साहसी प्रयत्नावाचून स्वातंत्र्य अशक्य

सुभाषबाबूंनी काढलेल्या ह्या हिंदु मुसलमान अेकीच्या मुख्य प्रश्नाविषयी मी काय चर्चा केली त्याचा ह्या व्याख्यानाच्या विषयाशी तितकासा संबंध नसल्याने नि वेळेच्या अभावी तें सोडून देतों. अितर सर्व चर्चा टाळून मी त्यांना मुख्य प्रश्न विचारला की, "तें सगळे आता सोडून द्या! मला अितकें सांगा की, चालू महा-युद्धाच्या संकटांत ब्रिटन सापडलें असता आपणांसारख्या पुढाऱ्यांनी हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात राहून हालवेलचा पुतळा कलकत्त्याच्या मार्गातून अुखडून टाकण्याच्या चळवळीसारख्या सापेक्षतः अगदी क्षुल्लक चळवळीपायी ब्रिटिशांच्या बंदिगृहात जाअून सडत पडण्यात काहीतरी अर्थ आहे का?" तेव्हा किंचित् निराशेच्या स्वरात सुभाष अुत्तरले, "जनतेत काहीतरी करून ब्रिटिशाविरुद्ध क्षोभ चेतवीत राहिलें पाहिजे. नाहीतर करावें तरी काय?" मी म्हटलें, "आपली तळमळ मी जाणतो. पण पुन्हा आपल्यास विचारतो की, गव्हर्नर जनरलसुद्धा हे सत्ताधारी सहस्रावधि ब्रिटिशप्रपीडक (Tyrants) हिंदुस्थानात राज्य करीत असता हालवेलसारख्या मेलेल्या ब्रिटिश प्रपीडकाचे दगडी पुतळे हलविण्यातच ज्याचा व्यय होतो, तो जन-क्षोभही निरर्थकच नाही का? आणि त्यापायी तुमच्यासारख्या पुढाऱ्याने बंदिवासात पडणें म्हणजे शत्रूला जें हवे तेच नेमके आपण होअून करणें नव्हे काय? खरे राज-कारण म्हणजे शक्य तर शत्रूला बंदिगृहात डांबावे. स्वतःलाच नव्हे! हें पहा, सुभाषबाबू, मी आपल्याला स्पष्टच विचारतो, 'आपण सशस्त्र क्रांतिकारकांशी सक्रिय नसलात तरी सबंध राशीत आला आहात, आपण गुप्तता राखू शकता. मागेही तुम्ही काँग्रेसचे अध्यक्ष असता आपली माझी अेकदा अंतःस्थ (confidential) भेट झाली होती. तितक्याच विश्वासाने नि त्याच सूत्रास धरून मी आपणांस असा आग्रह करू अिच्छितो की, सध्या ब्रिटिशाच्या हिंदी सैन्यामध्ये शक्य तितक्या हिंदूंची भरती करण्यासाठी हिंदुमहासभेच्या ढालीखाली मी जें सैनिकीकरणाचे भारतव्यापी नि आता बव्हंशी यशस्वी होअू चाललेले आंदोलन चालविले आहे तें मूलतः क्रांतिकारक आंदोलन आहे. आपण त्याच्याविरुद्ध प्रचार करता तो मी जाणून आहे. आपल्याला वाटले की, त्यायोगें काँग्रेसमधल्या तुम्हांलाही मवाळ वाटणाऱ्या अितर पुढाऱ्यांप्रमाणे

मी ब्रिटिशांना मनुष्यबळाचें साहाय्य देत आहे. पण वस्तुस्थिति सांगतो ती थेका. अिथे मी त्यांना, पहिल्या महायुद्धातील सशस्त्र क्रांतिकारकांनी जर्मनीशी केलेल्या 'तुल्यारिमित्र' संधीची आणि ब्रिटिश हिंदी सैन्यातील जर्मनीच्या हाती पडलेल्या हिंदी सैनिकातून क्रांतिसैन्य कसे अुभारलें गेलें अित्यादि प्रकरणांची माहिती सांगितली. ती मी या आजच्या आणि कालच्या व्याख्यानात त्रोटकपणे आधीच सांगितली आहे. मी पुढे म्हणालो, 'की रासबिहारी बोसांचे हें ताजें पत्र पहा. ह्यावरून असें दिसतें की जपान ह्या वर्षाच्या आत युद्ध पुकारील असा अुत्कट संभव दिसत आहे. जर असें झालें तर आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी जर्मनी-जपानच्या अश्यावत् शस्त्रास्त्रांनिशी नि लढाअीत मुरलेल्या सहस्रावधि हिंदी सैनिकांनिशी ही हिंदुस्थानवर बाहेरून स्वारी करण्याची कधीही न आलेली सुवर्णसंधि आपणास साधणारी आहे. अशा वेळी स्वदेशात अत्यंत क्षुल्लक नि वोलमांड चळवळीपायी आपल्यासारख्या पुढाऱ्याने स्वतःच बळेंच अिंग्लिशांकडून पकडवून घेअून बंदिवासात बळेंच शिरून कुजत पडणें सर्वस्वी हानिकारक आहे. कॉंग्रेस किंवा तत्सम निःशस्त्र प्रतिकारवादी संस्थेच्या कोणच्याही पुढाऱ्यापेक्षा ब्रिटिश सत्ता आपणासच प्रथमतः पकडण्यास टपलेली आहे. अशा वेळी रासबिहारींसारखे अनेक सशस्त्र क्रांतिकारक पुढारी जसे हिंदुस्थानातून ब्रिटिशांच्या हातावर तुरी देअून जपान जर्मनी येथे निसटून गेले तसे आपणही तत्काल हुलकांडी देअून निसटून जावें. तिकडे अिटली, जर्मनीच्या हाती पडलेल्या सहस्रावधि हिंदी सैनिकांचें पुढारीपण अुघडपणे स्वीकारावें. हिंदुस्थानच्या संपूर्ण स्वातंत्र्याची प्रकट घोषणा करावी आणि जपान युद्धात पडताच साधेल त्या मार्गाने बंगालच्या अुपसागरातून म्हणा किंवा ब्रह्मदेशातून म्हणा, हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेवर बाहेरून स्वारी करावी. असा काही तरी सशस्त्र नि साहसी पराक्रम केल्यावाचून आपण हिंदुस्थान स्वतंत्र करू शकणार नाही. असा पराक्रम नि साहस करण्यासाठी जीं दोन तीन माणसें आज मला समर्थ दिसतात त्यांत आपण अेक आहात. त्यातही माझा आपणांवरच डोळा आहे ! "

अितकें बोलून मी थांबलो सुभाषबाबू कोणत्या तरी विचाराच्या तंद्रीत मनुष्य खाली पाहत बसतो तसे काही वेळ स्तब्धपणे खाली पाहत बसले. मी केलेल्या सूचनेवर त्यांनी झटपट काहीतरी हो किंवा ना म्हणावे असा माझा कोणताही आग्रह नाही हें दर्शविण्याकरिता मी बळेंच तो विषय अगदी सोडून देअून त्यांच्या 'My Strange Illness" ह्या लेखाचा विषय काढला पण तेच होअून मला म्हणाले, 'मी आता प्रथम कलकत्त्याला जाअून तिथे काय घडतें तें पहातो आणि मग माझा पुढचा नक्की कार्यक्रम कोणचा तो ठरवीन अिकडे आल्यास, आपल्याला पुन्हा भेटेनच,' यापेक्षा ह्याविषयी अधिक अुलगडा मी विचारला नाही. त्यांनी केला नाही.

थोड्याच दिवसांत सुभाषबाबू कलकत्याला गेले आणि आताच पुतळा प्रकरणी पकडले जाऊन बंदिगृहात टाकले गेले म्हणून अपेक्षित वातमी आली.

बंदिगृहात पडल्यानंतर मात्र त्यांच्या मनातील हिंदु मुस्लिम अैक्य, हालवेलचा पुतळा प्रभृति पूर्वीचे जे काय असतील नसतील ते सारे मापेक्षतः क्षुल्लक नि वायफळ कार्यक्रम झिटकारले जाअून त्याचे सारे प्रयत्न बंदिवासातून कशी तरी सुटका करून घेअून जर्मनी-जपानकडे निसटून जाण्याचें साहस करण्यावरच केंद्रित झाले, हें आता प्रसिद्ध नि सुप्रसिद्ध झालेल्या सर्व वृत्तावरून अुघड आहे. त्यांनी बंदिवासात अन्नत्याग केला. ब्रिटिश शासनाच्या मानहानि करणाऱ्या अटी मानूनही पण सुटका करून घेतली आणि नंतर पुन्हा बंदिगृहाकडे परतण्याआधीच अत्यंत धाडसाने नि कौशल्याने ते ब्रिटिश सत्तेच्या हातावर तुरी देअून हिंदुस्थानातून निसटले ! [१]

## हिटलर मुसोलिनीशी संधि

जर्मनीत पोचताच सुभाषबाबूंनी अुघडपणे मुसोलिनीशी तुल्यारिमित्र संधि करून ब्रिटिशांच्या विरुद्ध भारतीय स्वातंत्र्ययुद्धाची घोषणा कशी केली, अिटली जर्मनीच्या हाती पडलेल्या सहस्रो ब्रिटिश हिंदी सैनिकांना जर्मनीच्या अद्ययावत् शस्त्रास्त्रांनी सुसज्ज करून भारतीय क्रांतिसेना कशी अुभारली, जर्मन पाणबुडीतून ते जपानने जिंकून घेतलेल्या सिंगापूरला कसे गेले, सिंगापूरहून ब्रिटिश सेनानी पळून गेल्यामुळे तिथे अुरलेल्या शस्त्रास्त्रांच्या अपार ब्रिटिश हिंदी सैन्यातील साठ्यासुद्धा तेथील ४० ते ५० सहस्र हिंदी सैन्याने 'जपानच्या पाठिंब्यामुळे रासबिहारी बोसांच्या नेतृत्वाखाली हिंदुस्थानला मुक्त करण्यासाठी क्रांतिसैन्य कसें अुभारलें, सुभाषबाबू तिथे पोचताच त्याच सैन्याचे सर सेनापति होअून त्याच शस्त्रबळाच्या आधारावर त्यांनी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची जागतिक घोषणा करून स्वतंत्र हिंदुस्थानचे अस्थायी राज्य शासन (Provisional Government) कसें स्थापिलें आणि सिंगापूरहून ' चलो दिल्ली ' ची समरगर्जना करीत हें क्रांतिसैन्य ब्रह्मदेश ओलांडून थेट

---

१. जर जर्मन प्रभृति ब्रिटिश शत्रूच्या राष्ट्रात जाअून तेथील पाडाव झालेल्या सहस्रावधि हिंदी सैनिकातून सशस्त्र क्रांतिकारक मुक्तिसैन्याची अुभारणी करण्याचा बेत सुभाषबाबूंच्या मनात वीर सावरकरांची भेट होण्यापूर्वीच ठरलेला असता तर निग्रहाच्या हातून परराष्ट्रात निसटून जाण्यासाठी ज्या वेळी ते स्वतंत्र होते त्या वेळीच त्यांना अधिक सुलभपणे यत्न करता आला असता. आणि त्यांच्यासारख्या चाणाक्ष पुढाऱ्यांनी हालवेलच्या पुतळा प्रकरणासारख्या क्षुद्र गोष्टीसाठी स्वतःवर जाणून बुजून बंदिवास ओढवून घेण्याचा वेडेपणा कधीही केला नसता ! यावरून वीर सावरकरांच्या भेटीत त्यांनी केलेल्या गंभीर सूचनेमुळेच परराष्ट्रांत निसटून जाअून क्रांतिकार्याची धुरा अंगावर घेण्याची कल्पना नि स्फूर्ति नेताजी सुभाषचंद्रांना झाली असली पाहिजे हें स्पष्ट होतें.

आसामच्या दाराशी भिडून ब्रिटिश सैन्याशी रणक्षेत्रात कसें लढत राहिलें तें सर्व वृत्त आता आपणा सर्वांना काही अंशी तरी विदित झालेंच आहे.

## सैनिकीकरणामुळे स्वातंत्र्यसेनेला सैनिक मिळाले

याच मध्यंतरात हें जें पन्नास साठ सहस्रांचें हिंदी सैन्य अद्ययावत् शस्त्रास्त्रांसह सुभाषबाबूंना अुभारता आलें तें आधी हिंदुस्थानात ब्रिटिश सैन्यात सहस्रावधि हिंदु सैनिकांची भरती करणाऱ्या आमच्या सैनिकीकरणाच्या आंदोलनामुळे शक्य झालें ही गोष्ट सुभाषबाबूंनी स्वतःच प्रकटपणे घोषित केली. सिंगापूर येथील 'आझाद हिंद' नभोवाणीवरून सन १९४४ च्या जूनच्या २५-व्या दिनांकास प्रक्षेपित झालेल्या भाषणात सरसेनापति सुभाषबाबू म्हणाले, "When due to misguided political whims and lack of vision almost all the leaders of Congress party have been decrying all the soldiers in Indian Army as mercenaries, it is heartening to know that Veer Savarkar is fearlessly exhorting the youths of India to enlist in the Armed Forces. These enlisted youths themselves provide us with trained men and soldiers for our Indian National Army."

काँग्रेसमधील बहुतेक अदूरदर्शी पुढारी ब्रिटिश हिंदी सैन्यास केवळ भाडोत्री नि पोटबाबू म्हणून सारखे निंदीत असता ही अुत्साहदायी गोष्ट आहे की, वीर सावरकर निर्भयपणे हिंदी तरुणांना सशस्त्र सैन्यात शिरा म्हणून सारखे अुत्तेजीत आहेत. ब्रिटिश हिंदी सैन्यात शिरलेल्या ह्याच हिंदी तरुणांतून आज आमच्या हिंदी राष्ट्रीय सैन्याला, I.N.A. ला, समरकलेत प्रवीण नि मुरलेल्या प्रशिक्षिताचा (Trained men चा) नि सैनिकांचा पुरवठा होत आहे.[१]

बाहेरून ह्या क्रांतिकारक I.N.A. चे शस्त्रसज्ज सैनिक ब्रिटिशावर चालून येत असतांना हिंदुस्थानच्या आतही नि:शस्त्रवादी नि अहिंसक म्हणविणाऱ्या काँग्रेसने नि:शस्त्र प्रतिकाराचा ठराव केला. Quit India but keep your army here ही त्यांची प्रकट घोषणा होती! ब्रिटिशांनो, हिंदुस्थान सोडा पण तुमचें सैन्य मात्र

१. अलीकडेच म्हणजे सन १९५४ ऑगस्टमध्ये अेक सुप्रसिद्ध जपानी ग्रंथकार श्री. जे. जी. ओहसावा ह्यांनी 'The Two Great Indians in Japan' ह्या नावाचें पुस्तक प्रसिद्धिलें आहे. त्यात त्यांनी रासबिहारी बोसांच्या चरित्राविषयी नि विशेषत: जपानमधील वास्तव्यात त्यांनी केलेल्या क्रांतिकारक कार्याविषयी अश्रुतपूर्व असा वृतान्त लिहिलेला आहे. दुसऱ्या महायुद्धात जपानी सैन्य सिंगापूरवर चालून गेलें तेव्हा तेथील ब्रिटिश हिंदी सैन्याशी जपानी सैन्याची लढाओ चालली असता सेनापति रासबिहारी बोसांच्या क्रांतिकारक सैन्याची (I.N.A. ची) तुकडीही ब्रिटिशांशी लढत होती. ह्या प्रथातील त्या प्रसंगासंबंधीचा अेक अुतारा येथे तुटकपणे देण्यात आहे. (टीप पुढील पानावर चालू)

'हिंदुस्थानातच ठेवा ! !' ही कांग्रेसची घोषणा जरी वदतो व्याघाताचें उत्कृष्ट उदाहरण होतें तरी सुदैवानें जनतेला त्यातील Quit India अेवढा पूर्वार्धच काय तो अैकू आला नि समजला. पण Keep your army here हा बावळट नि भेकड उत्तरार्ध जनतेला नीटसा अैकू आला नाही नि समजला तर नाहीच नाही. ह्या 'Quit India'च्या कांग्रेसी आंदोलनानेही देशभर मोठी खळबळ अुडवून दिली. कांग्रेसमधील शेकडो देशभक्त पुढारी बंदिवासात पडले. त्या त्यांच्या कार्याविषयी नि कष्टांविषयी त्यांचेही यथाप्रमाण आभार आहेतच. पण तुम्हां सर्वांना तो वृत्तान्त माहीतच आहे. म्हणून ह्या व्याख्यानात त्याची पुनरुक्ति न करता ह्या Quit India चळवळीविषयी जी गोष्ट स्वतःस अहिंसक म्हणवून घेणाऱ्या कांग्रेसीय लेखकांकडून जाणून बुजून सांगितली जात नाही ती तेवढी अिथे ठळकपणे सांगतो. ती गोष्ट ही की, बंदिवासात जाणें, हरताळ करणें प्रभृति केवळ आत्मक्लेशी नि निःशस्त्र साधनांनी ती चळवळ दडपून टाकण्यासाठी सशस्त्र अत्याचार करीत चाललेल्या हिंदुस्थानातील ब्रिटिश अधिकाऱ्यांना तोंड देणे आणि ब्रिटिश सत्तेला हादरा बसेल असा परिणामकारक प्रतिकार करणे अशक्य आहे असें अनुभवास आलेल्या कांग्रेसमधील शेकडो नेत्यांनी नि अनुयायांनी शेवटी सशस्त्र क्रांतिकारकांचाच मार्ग पत्करला. त्यांनी पटापट भूमिगत होअून गुप्तपणे ब्रिटिश सत्तेचा सशस्त्र

---

(टीप मागील पानावरून चालू)

......February. Japanese Attack on Singapore began... The resistance of British Indian Force was strong. The Imperial Guards (The Japanese) H.Q. had to encounter many difficulties.

The chief of the Indian National Army (I.N A) proceeded alone to the front line and talked to Indian officers and soldiers in the British Army not to be false to their love of India and the independence of India in strong heart-stirring words. Miracle accomplished ! The shooting (on the side of the British Indian forces) was stopped! Savarkar's Militarization policy in World War II began to shape.

The speech was finished, waves of cheers rose from the Indian soldiers who jumped into the Indian National Army I.NA. (Even) The Japanese Imperial Guards were entirely stupified ! ...... Fall of Singapore. Surrendered British soldiers numbered some 45,000 and Indians too I N A. absorbed these Indians (soldiers and officers) developed into a formidable force of 50,000.

Amongst the Indians newly surrendered (I.N.A.) there were some 30 officers including Lt. Col. Gil. Rash Behari became supreme commandant. (Page 47–48.)

प्रतिकार चालविला नि अेकच रक्तपाती धुमाकूळ अुडवून दिला. शेवटी नि:शस्त्रवादी कांग्रेसच काही काळ सशस्त्र क्रांतिकारकांची मठी बनली.

## हिंदुस्थानशीं संधि करण्यास ब्रिटन सिद्ध

ह्याप्रमाणे अेकीकडे हिंदुस्थानात ह्या कांग्रेसमधील सशस्त्र क्रांतिकारकांचाच हा धुमाकूळ आणि दुसरीकडे क्रांतिकारकांची हिंदुस्थान मुक्त करण्यासाठी बाहेरून चालून येणारीं मोठमोठी सैन्येंची सैन्यें यांच्या कात्रीत हिंदुस्थानातील सापडलेली ब्रिटिश सत्ता सापडली असता जपानवर अमेरिकेचा पहिला अॅटम बॉम्ब पडला नि जपान शरण गेला! तिकडे युरोपमध्ये हिटलर-मुसोलिनींचा सपशेल पराजय झाला. अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स ह्या मयीने ते दुसरें महायुद्धही जिंकले!

परंतु ब्रिटनपुरता तरी त्याचा विजय हा, जिवावरच बेतलें होतें ते शेपटावर गेलें, अितक्याच पुरता होता. ब्रिटन देश जरी वाचला तरी त्या दोन महायुद्धांच्या मान्याखाली ब्रिटनच्या साम्राज्यशक्तीचा आणि अुन्मत्तपणाचा चक्काचूर झाला. हिंदुस्थानपुरतें बोलावयाचें तर ब्रिटनची त्या महायुद्धाच्या शेवटी अशी स्थिति झाली होती की (१) हिंदुस्थानातील भूदल, नौदल, नि आकाशदल ह्या तीनही विभागातील झाडून सान्या हिंदी सैन्याने ब्रिटिश विद्रोहाचा अुठाव केलेला होता. किंवा तें सैन्य तसा अुठाव करण्याच्या मन:स्थितीत होतें. (२) १८५७ मध्ये हिंदी सैन्य ब्रिटिशसत्तेवर जेव्हा अुलटलें तेव्हा सहस्रावधि जातिवंत ब्रिटिशांचे नवें सैन्य ब्रिटन हिंदुस्थानात धाडू शकलें आणि त्या विद्रोहाचा नायनाट केला गेला परंतु महायुद्धाच्या शेवटच्या ह्या काळात जर्मनी, जपान जरी धुळीस मिळालीं तरी बोल्शेव्हिक रशियाच्या विजयामुळे ब्रिटनला पाण्यात पाहणारा अेक नवीन बलाढ्य शत्रु अुत्पन्न झाला; आणि मित्र म्हणून म्हणविणाच्या अमेरिकेच्या हातातला अणुब्रम्ह (अॅटमबॉम्ब) पाहून त्या मित्राचीही धास्ती ब्रिटनला शत्रूअितकीच वाटू लागली. अशा स्थितीत प्रत्यक्ष आपल्या स्वदेशाचेच संरक्षण करण्यासाठी सारे जातिवंत ब्रिटिश सैन्य ब्रिटनला आपल्या घरीच आणून ठेवणे भाग पडलें. हिंदुस्थानसारख्या विस्तीर्ण नि आता कट्टर ब्रिटिश विद्रोही बनलेल्या देशावर स्वत:ची साम्राज्यसत्ता शस्त्रशक्तीने चालविण्यासाठी जुनें वा नवें असें कोणचेंही जातिवंत ब्रिटिश सैन्य अिकडे धाडणें ब्रिटनला अशक्य झालें. (३) ह्या दुहेरी पेचामध्ये सापडल्यामुळे पूर्वी प्रमाणे हिंदुस्थानातल्याच हिंदी सैन्याच्या बळावर हिंदुस्थानवर राज्य करणें ब्रिटिशांना अशक्य झाले आणि स्वातंत्र्यासाठी ब्रिटिशाविरुद्ध सशस्त्र विद्रोह करून अुठलेल्या हिंदुस्थानला शरण जाण्यावाचून ब्रिटनला गत्यंतर अुरलें नाही.

तेव्हा निरुपाय म्हणून ब्रिटनने हिंदुस्थानला काही अटींवर स्वातंत्र्य देण्याचें आणि हिंदुस्थानातून आपला गाशा गुंडाळण्याचें ठरविलें आणि हिंदुस्थानशी संधि करण्यास ब्रिटन सिद्ध झालें

Independence of India Act च्या वेळी ब्रिटिश पार्लमेंटमध्ये साम्राज्यसत्ता सोडण्याचा प्रसंग आल्यामुळे दु:खी कष्टी झालेल्या चर्चिलच्या अेका प्रसारा

निरुपाय आहे म्हणून अुत्तरिताना त्यावेळचे ब्रिटिश पंतप्रधान अॅटली ह्यांनी ज्या वाक्यांत ब्रिटनच्या अवशतेचें अगदी सूत्ररूपानें वर्णन केलें आहे तें वाक्य असें –

"Britain is transferring power due to the fact that (1) The Indian mercenary army is no longer loyal to Britain and (2) Britain cannot afford to have a large British Army to hold down India." ह्या दोन सैनिक दुर्बलतेच्या कारणांमुळे ब्रिटनला हिंदुस्थान सोडावें लागलें. "अहिंसेचें' तत्त्व आम्हांस पटल्यामुळे आमचें 'हृदयपरिवर्तन' झालें, किंवा साम्राज्यवाद अन्याय्य आहे म्हणून स्वेच्छेने आम्ही हिंदुस्थान सोडले" असें काही ब्रिटनचे पंतप्रधान अॅटली किंवा कोणताही ब्रिटिश सभासद म्हणाला नाही!! अर्थात् सन १९०६ पासून ४७ पर्यंत सशस्त्र क्रांतिकारक पक्षाने हिंदी सैन्यात ब्रिटिश-विद्रोह जो फैलावला आणि परराष्ट्रीय राजकारण लढवून दोन्ही महायुद्धांत ब्रिटनच्या शत्रूशीं संधि करून त्याच्याकडून शस्त्रबळ संपादून सशस्त्र क्रांतिकारकांनी रणांगणात जी झुंज दिली त्यामुळेच ब्रिटिशसत्ता ह्या पेचात सापडली. ह्याचा प्रत्यक्ष ब्रिटिश पंतप्रधानांच्या तोंडचाच हा पडताळा आहे.

परंतु अशा अत्यंत आणीबाणीच्या वेळी ब्रिटनशी हिंदुस्थानच्या वतीने संधि करण्यास जे त्यातल्या त्यात कच्चे तेच प्रतिनिधि तुम्ही धाडले. 'Quit India' चळवळीचा परिणाम Split India मध्ये होईल, छोडो हिंदुस्थानचा परिणाम तोडो हिंदुस्थानात होईल, म्हणून ज्या हिंदी राजकीय पक्षाला तुम्ही आपले प्रतिनिधि म्हणून निवडू नका' असे माझ्यासारखे सशस्त्र क्रांतिकारक आणि हिंदुसंघटक तुम्हां हिंदु बांधवांना कठशोष करून सांगत होते त्याच पक्षाला तुम्ही आपले प्रतिनिधि म्हणून धाडलेत. अर्थात् त्यांच्याशीच त्यांच्या राजकीय कच्चेपणाचा लाभ घेऊन ब्रिटनने देशाचे तुकडे पाडण्याच्या अटीवर सत्तांतराचा संधि केला.

पण आता जें झाले ते होऊन गेले. अुरलें आहे ते पराक्रम करून अुद्या पुरतें करून घेऊ. परंतु जें साधले आहे ते यशही अितके अुदंड आहे की, निदान गेल्या अेक सहस्र वर्षात, आज आपण मिळविलेल्या ह्या यशाला आपल्या अितिहासात तोड सापडणार नाही ब्रिटिशासारख्या शत्रूच्या हातून आज निदान ¾ हिंदुस्थान तरी आपण स्वतंत्र केला आहे हे आजचें आपलें स्वतंत्र भारतीय महाराज्य जसें आता सर्वांचें समाअीक राज्य आहे तसेच ते जिंकून परत घेण्यासाठी सन १८५७ ते सन १९४७ पर्यंतच्या आम्ही ब्रिटिशांशी छेडलेल्या स्वातंत्र्ययुद्धाचे नि त्यात मिळविलेल्या विजयाचें श्रेयही आमच्यातील सर्व प्रामाणिक पक्षोपपक्षांचें, आम्हा सर्वांचें, समाअीक श्रेय आहे हे माझ्या हातूनही पक्षपात घडू नये म्हणून मी पुन्हा अेकदा सांगत आहे. परतु ह्या स्वातंत्र्ययुद्धात अगदी आघाडीवर लढणाऱ्या सशस्त्र क्रांतिकारक पक्षाच्या कार्यक्रमाचा नि पराक्रमाचा अितिहास सर्वसामान्य जनतेला यथावत् अवगत नसल्यामुळे मी कालच्या आणि आजच्या व्याख्यानांत त्या अितिहासाची कल्पना देण्यापुरता हा अेक धावत् चित्रपट प्रदर्शविला आहे.

## गंगा यमुना आज मुक्त झाल्या ! पण—?

ब्रिटिशांना पराभूत करून आज आपल्या ह्या स्वतंत्र हिंदुस्थानचे जें महाराज्य आपण स्थापिलें आहे त्याला मी जें महाराज्य म्हणून उल्लेखितो तें केवळ स्वदेशाभिमानाच्या आवेगानेच म्हणतो असें नाही. अिंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, स्पेन, पोर्तुगाल, अिटली, स्वित्झलंड — अर्ध्या अधिक युरोपातील आजचीं सारीं राष्ट्रें अेकत्र केलीं तरी त्या भूक्षेत्राहून अधिक विस्तृत असलेला प्रदेश ह्या आपल्या स्वतंत्र महाराज्याच्या चतुःसीमेत सामावलेला आहे. आणि तो आज बहुतांशी अेकजीवी, अेकराट अेकछत्र झालेला आहे. व्याख्यानाच्या आरंभी मी सांगितलें होतें की, गोदावरी ते कृष्णा ह्यामधीलच काय तो परिमित भूभाग म्लेच्छाच्या हातून शिवछत्रपतींनी जेव्हा मुक्त केला नि स्वतंत्र हिंदुराज्य स्थापिलें तेव्हा समर्थ रामदासासारख्या निःसंग साधूंनाही आनंदाचें भरतें आलें ! मग आज तर सेतुरामेश्वरापासून हरिद्वारपर्यंतचा आणि पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंतचा हा महादेश, ही आमची पितृभूमि, ही आमची पुण्यभूमि अेकछत्री झालेली आहे.

आमच्या प्राचीन चेल, चोल, पांड्य राज्यांच्या राजधान्या, चंद्रगुप्ताचें पाटलीपुत्र, विक्रमाची अुज्जयिनी, शालिवाहनाचें प्रतिष्ठान, यादवांची देवगिरी, हरिहर बुक्काचें विजयनगर प्रभृति आमची प्राचीन राज्यकेंद्रें हीं सारी अेककेंद्रित करून, अेकराष्ट्र करून आम्ही आमच्या पांडवांच्या प्राचीन अिंद्रप्रस्थातच आज आमचें हिंदुप्रस्थ पुन्हा स्थापिलेलें आहे ! आणि त्या ह्या महाराज्यावर आमचा सुदर्शन चक्रांकित ध्वज अुभारलेला आहे.

आम्हांला प्रत्यही ज्यांचें नामस्मरण धार्मिक कर्तव्य म्हणून करावे लागतें तीं आमचीं सारी पुण्यक्षेत्रें तीं 'अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, पुरी द्वारावती ते जगन्नाथपुरीपर्यंत, मदुरेच्या मीनाक्षीपासून तों कामरूपातील कामाक्षीपर्यंत, आमचीं पुण्यक्षेत्रें आज स्वतंत्र, मुक्त शुद्ध झालीं आहेत. ह्या आमच्या पुण्यक्षेत्राप्रमाणेच प्रत्यही आम्हास आमच्या राष्ट्रैक्याचें स्मरण करून देणारा आणि आमच्या पुण्यतीर्थांना आवाहन करणारा जो मंत्र, जो प्रत्येकाला स्नानाच्या वेळी म्हणावा लागतो त्या "गंगेच यमुने चैव गोदावरि सरस्वति । नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ॥' ह्या मंत्रातील ती गंगा, ती यमुना, ती गोदावरी, ती सरस्वती, ती नर्मदा, ती कावेरी ही आमची पुण्यतीर्थेंही, ह्या आमच्या राष्ट्रीय पुण्यसरिताही, ह्या भारतीय महाराज्यात आज विमुक्त आणि विशुद्ध होऊन सामावलेल्या आहेत—

पण, ह्या पुण्य सरितात सिंधु कां दिसत नाही !

सिंधु कोठे आहे ?

हाय ! हाय ! ह्या पुण्य सरितातील पुण्यतम सरिता जी सिंधु ती मात्र अद्यापि ह्या महाराज्यात सामावलेली नाही ! सिंधु आम्हांस अजूनही अंतरलेली आहे.

काय म्हणता ? आता सिंधूस विसरा ! तिचें नांव त्या मंत्रातून गाळून टाका आणि तो तुमचा स्नानाचा मंत्र आता यापुढे अर्धाच म्हणत जा ? नाहींतर अमके सोमे गोमे आमच्यावर रागावतील, आमचा द्वेष करू लागतील ! म्हणून सिंधूचा संबंध सोडून द्या ?

छे ! छे !! सारें जग जरी आमचा द्वेष करू लागलें, किंवा साऱ्या जगाचा जरी आम्हांस द्वेष करावा लागला तरी सिंधूचा संबंध आम्ही सोडणार नाही, तोडणार नाही, सिंधूस आम्ही विसरू ? सिंधूवाचून हिंदु ?! अर्थावाचून शब्द ! प्राणावाचून कुडी ! अशक्य, अशक्य ! जोवर अेकतरी हिंदु जिवंत आहे तोंवर तो सिंधूस विसरणें शक्य नाही !

## सिंधु सूक्त

जिच्या काठावर आमच्या प्राचीनतम वेदर्षींनी ऋचांचीं पहिलीं सामगायनें गाअिलीं, जिच्या पुण्यसलिलांहीं आपल्या संध्यावंदनांतील अर्घ्यें दिलीं आणि जिला अत्यादरानें वेदांतील देवतांमध्ये स्थान देअून तिच्यावर सुंदरांतील सुंदर सूक्तें रचलीं त्या तुला, हे 'अंबितमे, नदीतमे, देवीतमे,' सिंधू, आम्हीं कधींही विसरणार नाही. तुझ्या परिसरामध्ये आमच्या प्राचीनतम राजर्षींनी नि ब्रह्मर्षींनी केलेल्या यज्ञाच्या प्रदीप्त हुताशनात जेव्हा हवि समर्पिले तेव्हा अंतराळात अुंच अुंच दरवळत गेलेल्या त्याच्या सुगंधानीं लालायित होअून अिंद्र, वरुण, मरुतादिक देव त्यांचे त्यांचे हविर्भाग स्वीकारण्यास तुझ्या तीरी येत आणि सोमरसासमवेतच तुझें सुमधुर सलिल पिअून प्रसन्न होत ! त्या तुला हे सुरसरिते सिंधु, आम्ही कधींही विसरणार नाही.

## महाराष्ट्रास सिंधुजलाची तहान

त्यातही ह्या आमच्या महाराष्ट्रासच तरी पूर्वीपासून तुझी अवीट ओढ लागलेली आहे. पूर्वी अेकदा जेव्हा तू आम्हांस अशीच अंतरली होतीस तेव्हांही पारतंत्र्याच्या बंदिवासातून तुला मुक्त करण्यासाठी ह्या महाराष्ट्राचें चतुरंग सैन्य अुत्तरदिशेवर चढून गेलें. कारण दक्षिण दिग्विजय साधला पण अुत्तर दिग्विजय अुरला असें हळहळत आमचा शिवाजी राजा मरण पावला होता. त्याची ती अपुरी अिच्छा पुरी करण्यासाठी नर्मदा ओलांडून बाजीरावानें चंबळ गाठली, पण नुसतें चंबळचें पाणी पिअून काही आमच्या विजयिष्णु घोड्याची तहान भागली नाही ! म्हणून 'त्या मोंगल बादशहाची दाढीच जाळून टाकतो' असें गर्जत बाजीराव दिल्लीवर चालून गेला. आमचे जयिष्णु घोडे यमुनेचें पाणी प्यायले, गंगेचें पाणी प्यायले. पण त्यांची विजयतृष्णा भागेना. म्हणून ते पुढे घुसले. त्यांनी शतद्रु (सतलज) ओलांडली, वितस्ता (जेहलम) ओलांडली आणि म्लेंच्छाना पादाक्रांत करीत करीत त्यांनी जेव्हा अटकेवर भगवा जरिपटका अुभारला आणि तुझें तीर गाठून तुझें तें पवित्र सलिल आकंठ प्राशिलें तेव्हाच काय ती त्यांची विजयतृष्णा क्षणभर भागली ! त्या तुला

अितर कोणीही जरी अेकवेळ विसरले तरी हे स्रोतस्विनि सिंधु, हा आमचा अेकटा महाराष्ट्र अुठून तुला पुन्हा विमुक्त केल्यावाचून राहणार नाही!"

शेवटचें वाक्य अुच्चारीत व्याख्यान संपवून वीर सावरकर परत फिरू लागताच त्यांच्या व्याख्यानाच्या वरील शेवटच्या तेजस्वी छेदकातील वाक्यावाक्यासरशी त्या सहस्रावधि श्रोत्यांच्या हृदयांत हेलावत चाललेल्या भावनांना महापूर यावा तसें होअून 'वीर सावरकर की जय' 'स्वातंत्र्यलक्ष्मी की जय', 'क्रांतिकारकांचा विजय असो' अशा गर्जनांच्या लाटांवर लाटा अुसळू लागल्या!

* * *

भाषण चौथें

# सांगता महोत्सवाचा समारोप

दि. १२ मे १९५२ या दिवशी या महोत्सवाचा समारोप करणारें वीर सावरकरांचें पुढील आशयाचें भाषण झालें :

" गेले दोन दिवस दिवंगत सशस्त्र क्रांतिकारक हुतात्म्यांना नि वीरात्म्यांना श्रद्धांजलि वाहण्याचा आणि 'अभिनव भारत' सांगता समारंभाचा जो महोत्सव अितक्या भव्य आणि चैतन्यमय थाटाने तुम्ही साजरा केलात त्याविषयी हा अुत्सवकार्य स्थापिलेल्या पुण्याच्या स्वागत मंडळाचे आणि तुम्हा पुणेकर नागरिकांचे मी प्रथमतः मनःपूर्वक आभार मानतो. तथापि त्या गेल्या दोन दिवसाच्या महोत्सवातील कार्यक्रमापेक्षा त्यातील आजच्या ह्या तिसऱ्या दिवसाच्या कार्यक्रमाचें स्वरूप नि महत्त्व वेगळेंच आहे. कारण, पुणें महापालिका ही राज्यसंस्थेचेच अेक अुपांग आहे. अशा ह्या अधिकृत नि प्रातिनिधिक संस्थेने केवळ दिवंगत क्रांतिकारकांचाच नव्हे, तर स्वातंत्र्यप्राप्तीचा आजचा सोनेरी दिवस पाहू शकत असलेल्या विद्यमान क्रांतिकारकांचाही आज जो कृतज्ञ बहुमान केला त्याचें मूल्य दुहेरी आहे.

ह्या समारंभात दिवंगत हुतात्मे आणि वीरात्मे यांचाच काय तो सत्कार करून त्यांना श्रद्धांजलि वाहण्यात यावी असें अुत्सवमंडळाने प्रथमतः ठरविलें होतें. त्याप्रमाणें ती श्रद्धांजलि काल वाहण्यात आली. ह्याचें मुख्य कारण मी परवाच्या व्याख्यानात सांगितलेंच होतें की, हा अुत्सव घडवून आणण्यात माझ्यासारख्या विद्यमान क्रांतिकारकांना पुढाकार घ्यावा लागला. यामुळें आम्ही आमच्याभोवतीच दिवे ओवाळून घेण्यासाठी हा समारंभ घडवून आणीत आहो, स्वातंत्र्ययुद्धाचा खोटा अितिहास लिहिण्याचा डाव हाणून पाडण्यासाठी खरा अितिहास जमा घडला तें

दर्शविण्याच्या मुख्य हेतूने नव्हे, असा आक्षेप काकदृष्टीला सुद्धा घेता येऊ नये म्हणून. तस्तव ह्या समारंभात केवळ विद्यमान क्रांतिकारकांच्या सत्काराचा कोणचाही कार्यक्रम न ठेवता केवळ दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांना गौरविण्याचाच काय तो कार्यक्रम आम्ही ठेवलेला होता. परंतु त्यायोगे सशस्त्र क्रांतिकारक पक्षाचा यथावत् वृत्तान्त ज्या बहुसंख्याक लोकांना अद्यापही अवगत नाही त्यांचा असा अपसमज होण्याचा संभव होता की जे सशस्त्र क्रांतिकारक आज विद्यमान आहेत ते एकंदरीत दिवंगत झालेल्या क्रांतिकारकांइतके सन्मानार्ह नाहीत. परंतु हा अपसमज टाळण्यासाठी आणि काल स्वागत मंडळाने नि आज प्रत्यक्ष पुणे महापालिकेने जो त्या विद्यमान क्रांतिकारकांचाही कृतज्ञ गौरव केला तो किती उचित होता हे विशदिण्यासाठी त्या विद्यमान क्रांतिकारक वर्गाविषयी काही उल्लेख करणे हे मी माझे कर्तव्य समजतो.

## आम्ही मृत्यूला भ्यायलो नाही, मृत्यु आम्हांस भ्यायला.

विद्यमान सशस्त्र क्रांतिकारकांत नि दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांत वर्गशः बोलावयाचे तर एकच विभेद आहे. केवळ योगायोग ! स्वदेशाच्या स्वातंत्र्यार्थ ब्रिटिशांशी सशस्त्र समरात झगडत असताना काही वीर रणांगणी पतन पावले, आणि काही ते स्वातंत्र्यसमर संपेतो लढत असताही केवळ योगायोगानेच पतन पावले नाहीत. जे क्रांतिकारक आज विद्यमान आहेत त्यांच्यातील व्यक्तिशः नव्हे, तर वर्गशः बोलावयाचे म्हणजे, बहुतेकांनी कष्ट, छळ, काळेपाणी, कारागार, गोळीबार असा सर्व संकटांना दिवंगत क्रांतिकारकांच्याप्रमाणेच अटळ धैर्याने तोंड दिलेले आहे हे काल स्वागत मंडळाच्या वतीने विद्यमान क्रांतिकारकांचा सत्कार झाला त्या वेळेस त्यांच्यापैकी काहींचा जो अत्यंत त्रोटक परिचय मी करून दिला त्यावरूनही आपल्या ध्यानात आलेच असेल. ब्रिटिश राज्यद्रोहाविषयी झालेल्या अनेक खटल्यात काही क्रांतिकारकांना फाशी झाली आणि आपण 'दिवंगत क्रांतिकारक' म्हणून आज त्यास गौरवीत आहो. पण त्याच खटल्यात त्या कटाचे मुख्य सूत्रचालक असलेले आणि ज्यांच्या प्रेरणेने त्या फाशी गेलेल्या क्रांतिकारकांत हौतात्म्याचे तेज मूलतः संचरले असे काही क्रांतिकारक योगायोगानेच सुटून गेले नि जिवंत राहिले. खुदिराम, कन्हय्यालाल दत्त फाशी जाऊन हुतात्मा झाले. परंतु त्यांचे क्रांतिगुरु श्री. अरविंद घोष हे निर्दोषी म्हणून योगायोगाने सुटून गेले आणि स्वातंत्र्ययुद्ध संपेतो जिवंत राहिले ! लढाईत मरण येणे हा बहुधा योगायोग असतो. लढाईत गोळ्यांच्या पहिल्या फैरीसरशीच काही वीर तत्काल मरण पावतात, काही त्यातून वाचून सत्रूशी तसा अनेक लढाया देत असताही त्याला हैराण करीतो योगायोगाने जिवंत राहतात. पण ते दिवंगत वीर नि हे विद्यमान वीर हे वीरत्वाच्या दृष्टीने सारखेच सन्माननीय असतात. सिंहगड घेताना तानाजी लढत मेला. पण त्याच्याच जवळ लढत असलेला आणि मराठ्यांना पुन्हा सावरून तसाच लढत लढत तो गड जिंकून

घेणारा सूर्याजी विजय पाहण्यास जिवंत राहिला. पावनखिंडीत वीर बाजी रणात पडला पण शिवाजी राजा निसटून जाऊन, तशा शंभर लढाया देत देत, स्वतंत्र हिंदुराज्याच्या छत्रपतित्वाचा विजयी राज्याभिषेक स्वतःवर करून घेईतों जिवंत राहिला. अर्थात् कोण मेला आणि कोण जगला ह्या रणघाईतील योगायोगावरून हुतात्म्यांची नि वीरात्म्यांची योग्यता ठरत नाही. तर तीं सत्समरात देहपतन होईतों किंवा विजय मिळेतों कोण लढत राहिला ह्यावरूनच ठरते.

ब्रिटिशांशी झालेल्या स्वातंत्र्ययुद्धात लढत राहिलेल्या सशस्त्र क्रांतिकारक पक्षातील दिवंगत नि विद्यमान क्रांतिकारकांनाही हाच न्याय लागू आहे. आज विद्यमान असणाऱ्या अगदी ह्या शतकाच्या प्रारंभीच्या अभिनव भारतीय क्रांतिकारकांपासून तों नेताजी सुभाषचंद्रांच्या भारतीय स्वातंत्र्य सेनेतील (I. N. A. मधील) सैनिकापर्यंत अनेक वीरात्मे असे आहेत की ते जे आज जिवंत आहेत ते केवळ योगायोगाने ! रणघाईत मारले गेले नाहीत म्हणूनच काय ते होत. आम्हा विद्यमान क्रांतिकारकांपैकी अनेकांनी आपण होऊन चालून जाऊन फाशीच्या खांबाला तीनतीनदा गदागदा हलविलें आहे, पण तरीही जर आम्ही आज जिवंत असू तर तें आम्ही मृत्यूला भ्यायलो म्हणून नव्हे ! तर मृत्युच आम्हास भ्यायला म्हणून होय ! !

ह्यास्तव दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांना, हुतात्म्यांना परवा आपण सहस्रावधि नागरिकांनी जी श्रद्धांजलि वाहिली तिच्यानंतर काल ह्या उत्सव मंडळाने आणि आज प्रत्यक्ष पुणे महापालिकेने विद्यमान क्रांतिकारक वीरात्म्यांचाही तसाच गौरव केला ही गोष्ट अत्यंत न्याय्य आणि उचित अशीच झाली.

साऱ्या हिंदुस्थानात सशस्त्र क्रांतिकारक पक्षातील हुतात्म्यांचा नि वीरात्म्यांचा एवढ्या भव्य प्रमाणावर प्रकटपणे हा जो पहिलाच सत्कारसमारंभ साजविला गेला तो पुण्यानेच होय ! त्याचप्रमाणे तसा सत्कार समारंभ करण्यास साऱ्या हिंदुस्थानातील जी पहिली प्रमुख प्रातिनिधिक संस्था पुढे आली तीही पुण्याची महापालिकाच होय. आपल्या पुण्याच्या परंपरेस नि पुण्याईस अनुरूप असलेला हा गौरव संपादून आपण कृतार्थ झाला आहात

## स्वातंत्र्याचा सगळ्यात मोठा शत्रु अराजक होय !

क्रांतिकाल संपतांच आणि स्वदेश स्वतंत्र होऊन स्वराज्य स्थापन होतांच आता आपले सर्वांचे पहिलें राष्ट्रीय कर्तव्य हें असावयास पाहिजे की क्रांतिकालातील आपणच राष्ट्रभर फैलावलेल्या राज्यविध्वंसक वृत्तींना नि साधनांना तत्काल विसर्जून राष्ट्रात विधायक नि निर्बंधशील धृतींचें वर्चस्व स्थापिलें पाहिजे. परराज्य उलथून पाडण्यासाठी गुप्त कट, सशस्त्र बंडाळी, घातपातवाद, निर्बंधभंग, परराज्यद्रोह हीं सर्व साधनें पुण्यप्रद असतात, अपरिहार्य असतात पण जर हीं साधने नि ह्या सर्व वृत्ति स्वराज्य स्थापन होतांच पश्चिमात्यापारतोच अधर्म्य समजून

तत्काल टाकून दिलीं नाहीत तर बाहेरच्या शत्रूहूनही स्वराज्यास तीं प्राणघातक ठरल्यावाचून रहात नाहीत. ही जाणीव दूरदर्शी क्रांतिकारक पुढाऱ्यांना क्रांतिकाला-तच अितकी अुत्कटतेने झालेली असे की ' अभिनव भारत ' ह्या गुप्त आणि मित्र-मेळा किंवा लंडनमधील Free India Society सारख्या प्रकट शाखांतून तिची सविस्तर चर्चा केली जाअी. क्रांतिकारकांना तशी चेतावणी दिली जाअी. सुदैवाने ह्या त्या क्रांतिकालीन वस्तुस्थितीचा पुरावा आजही काही अंशी अुपलब्ध आहे. मी सन १९०८–०९ मध्ये लिहिलेला, अिंग्लिश भाषेतील War of Indian Independence 1857 हा ग्रंथ आता प्रकटपणे प्रकाशित झालेला आहे. त्यात ह्या विधेयाची (Point ची ) चर्चा नि समर्थन आपल्याला ठायी ठायी सापडेल. त्याचप्रमाणे हिंदी संस्थानिकांना क्रांतिपक्षास मिळण्यासाठी आवाहन करणारी 'Choose, O ! Indian Princes ! ' नांवाची जी अेक महत्त्वाची गुप्त अिंग्लिश पुस्तिका मी लंडन-मध्ये प्रसिद्धिली होती आणि जिचा त्या वेळी खूप गाजावाजा झाला होता ती नवंघ नसली तरी तिच्यांतील अेक वरील विषयाला लागू असलेला महत्त्वाचा अुतारा-आजही अुपलब्ध आहे. अर्थात् तो अुतारा तरी अुपलब्ध ठेवण्याचें श्रेय ' Unrest of India ' ह्या पुस्तकाचे कर्ते व्हॅलेन्टाअीन चिरोल ह्या आमच्या प्रतिस्पर्ध्यालाच आहे ! ह्या *प्रलेखीय पुराव्यावरूनही (Documentary evidence)* वरून हें स्पष्ट होअील की अगदी क्रांतिकालींही परराज्य अुलथून पाडलें जाताच स्वराज्याची स्थापना कोणत्या मूलभूत तत्त्वाच्या पायांवर नि साधनांनी केली पाहिजे ह्याचा आराखडाही क्रांतिकारकांनी निश्चित करुन आपल्यासमोर ठेविला होता. त्या वेळी ह्या प्रकरणी आम्ही क्रांतिकारकांना देत असू त्या अुपदेशाचे सार मी खालील ब्रीद-वाक्यात व्यक्तविलेलें वरील प्रलेखात सापडेल. स्वराज्य प्रस्थापित होताच क्रांति-कालांतील ब्रीद वाक्यें विसर्जून स्वराष्ट्राने तत्काल खालील ब्रीदवाक्यें आपल्या *कार्यक्रमफलकावर आणि हृदयावर कोरुन टाकलीं पाहिजेत की,* Constitution within—Revolution outside ! Law within—Sword outside ! Peace within—War outside !'

## स्वराज्य स्थापन झालें म्हणजे पहिल्याच दिवशी काही रामराज्य स्थापन होअू शकत नाहीं

कोणताही देश पारतन्त्र्याचें जोखड फेकून देअून स्वतंत्र होतो याचाच अर्थ असा असतो की पारतन्त्र्याच्या कालात परकीय शत्रूंनी त्याची जी विघटना केलेली असते; त्याच्यात दास्यप्रवण वृत्तींची जी जोपासना केलेली असते; बलात्कार, छळ, निष्पीडन यांहींकरुन त्याची जी दुर्दशा केलेली असते; दुष्काळ, दारिद्र्य नि दैन्य ह्याचा जो तेथे *हाहाकार माजविलेला असतो तो स्वातंत्र्यसंपादनाच्या पहिल्या* दिवशी त्या देशास बहुतांशी तसाच भोगीत राहिलेला असतो. स्वातंत्र्यानंतर जो

स्वराज्यीय शासनसंस्था लगोलग कारभार पाहू लागले तिला ती कोणत्याही राजकीय पक्षाची असली तरी, हा सर्व हाहाकार नि दुर्दशा अेका दिवसात कोण्या जादूच्या कांडीसरशी नाहीशी करता येणें अशक्य असते. अशा वेळी सर्व नागरिकांचें मुख्य राष्ट्रीय कर्तव्य हेंच असलें पाहिजे की, काही काळ तरी कळ सोसून आपल्या स्वकीय शासनास ती दुर्दशा निवारण्यासाठी शक्य तें तें साहाय्य प्रत्येकी आपल्या परिश्रमाने नि सहनशीलतेने देत राहिलें पाहिजे. आज राज्यकारभार कांग्रेस पक्षाच्या हाती आहे. त्यांच्या हातून शंभर चुका प्रत्यही होतात म्हणून जिकडे तिकडे ओरड चालू आहे. पण तुम्ही लक्षात ठेवलें पाहिजे की, मागच्या अनेक निवडणुकीत कांग्रेस पक्षाला बहुमतानं निवडून देऊन त्यांच्या हातून अशाच चुका घडत आल्याची अशीच ओरड करूंन जनतेनें चालविली असता पुन्हा पाण्याच्या बैलाप्रमाणे डोळेझाकपणें वांधून त्या कांग्रेसी मतपेटीशी येताच जनतेने आपली मतें गेल्या निवडणुकीतही त्याच कांग्रेस पक्षाला बहुमताने टाकलीं आणि राज्यकारभार पुन्हा त्याचे हाती दिला. त्यानी काही बळाने तो कारभार तुमच्या हातून हिसकावून घेतलेला नाही. जर आता त्यांच्या हातून चुका घडत असतील तर त्या दोषाचा अर्धाअधिक वाटा त्या करून जनतेचाच आहे. न्यायाच्या दृष्टीनें हेही स्पष्ट केले पाहिजे की, क्रांतिकाळ संपतासंपताच नवनिर्मित स्वराज्याची घडी नीट बसविण्याचें कठीण कार्य बहुमताने कांग्रेस पक्षाच्या हाती सोपविलें न जाता दुसऱ्या साम्यवादी, समाजवादी, हिंदुत्वनिष्ठ प्रभृति अितर कोणत्याही पक्षांचे हाती जाते तरी कांग्रेसप्रमाणेच काही अननुभवामुळे तर काही सत्तालोभामुळे त्या अितर पक्षांचे हातूनही अशा काही चुका घडल्याच नसत्या असें नाही. कारण अेकाच सरोवरातल्या पाण्यात भरून काढलेल्या निरनिराळ्या पोहऱ्यांप्रमाणे आपले सारे पक्ष हे अेकाच समाजातून वर येणारे असल्यामुळे त्यांच्यात ह्या वा त्या प्रमाणात तेच गुणदोष असण्याचाच संभव अधिक! अशा स्थितीत तत्कालीन शासन संस्थेकडून काही राजकीय चुका घडल्या, काही व्यक्तिव्यक्तींचा पक्षीय द्वेषभावनेने छळ झाला, तरी आपण अेकदम डोक्यात राख घालता कामा नये. माझ्यापुरतें बोलावयाचें तर ब्रिटिशाच्या वेळी माझा जो छळ झाला तो आपण जाणताच. परंतु स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही मला जे कारावास भोगावे लागले त्यामुळे अधिक मनस्ताप सोसावा लागला तथापि मी त्याविषयी स्वकीय शासनाविरुद्ध चकार शब्दही काढला नाही. तेही वरील कारणासाठीच होय.

## पण परराज्य म्हणजे प्रत्यक्ष राष्ट्रीय मृत्युच !

परंतु आजच्या सत्ताधिकाऱ्याकडून कित्येक अन्याय्य आणि देशहिताला घातक अशी दुष्कृत्यें घडतात हे जरी खरे असले तरी त्यामुळे अेकदम चिडून जाअून, मी मघा सांगितलेला तो देशहितकारक संयम सुटून सामान्य जनतेच्याच नव्हे तर राजकीय पक्षांच्या तोंडून नि लेखातूनही अशी क्षोभाविष्ट भाषा निघालेली अेव्हा

मी ऐकतो की हें कसलें स्वराज्य ? ह्यापेक्षा तें ब्रिटिश राज्यच बरें होतें किंवा रशियाचें राज्य बरें ठरेल ! तेव्हा तेव्हा माझ्या मनात चरें होतें. कारण जयचंदी वृत्ति ती हीच ! हिनेच भूतकाली आपल्या मातृभूमीला पारतंत्र्याच्या भयानक गर्तेत लोटलेलें आहे. मी आरंभीच जें सांगितले होतें की अराजकासारखा आपल्या प्रस्थापित स्वराज्याला दुसरा भयंकर शत्रु नाही. परंतु अेकवेळ तें स्वकीय देशांतर्गत अराजकही किंवा यादवी युद्धही पुरवलें, पण ब्रिटिशाचें, नि रशियाचें तर काय पण देवदूताचेंही परराज्य परवडणार नाही. देशांतर्गत अराजकही अेक भयंकर राष्ट्रीय व्याधि आहे. ती कष्टसाध्य असली तरी असाध्य असतेच असें नाही. परंतु परराज्य म्हणजे प्रत्यक्ष राष्ट्रीय मृत्युच होय. ही अुत्कट जाणीव नि भावना आपल्या लोकांच्या रोमरोमात भिनली पाहिजे.

कोणतीही राज्यपद्धति झाली तरी तीत राष्ट्राचें कल्याण कोणच्या मार्गानें साधता येअील ह्याविषयी पक्षभेद आणि मतभेद हे असणारच. त्यात काही हानि नाही. अुलट ते मतभेद नि:स्वार्थ आणि देशहितप्रेरित असले तर अुपकारकच ठरतात. परंतु आता स्वराज्य प्रस्थापनेनंतर कितीही तीव्र मतभेद असले तरी ते आपले मारे मतभेद मतपेटीतच सामावले पाहिजेत !

त्या मतपेटीचें बूड फुटकें आहे की नाही तेवढें मात्र कटाक्षानें पहा! हे दायित्व (Responsibility) जनतेवर आहेच. परंतु जनतेपेक्षाही ज्या पक्षाच्या हाती घटनात्मक रीत्या राज्यकारभार सोपविला जाअील त्या सत्ताधारी पक्षावरच तें दायित्व विशेषत: पडतें. आज कॉंग्रेसचें राज्य आहे अशी भाषा वृत्तपत्रांतून सर्वत्र वापरली जाते परंतु लोकसत्ताक राज्यतंत्राविषयी आपल्या जनतेत आणि राज्यीय अधिकाऱ्यांतही अद्याप किती अज्ञान पसरलेलें आहे तें अशाच ल्हान ल्हान वाक्यांतून प्रकट होते आणि त्या वाक्यामुळे विषारी विचार राष्ट्रीय मनोभूमिकेत रुजत जातात. राज्य कॉंग्रेसचे नाही राज्य आपणां सर्वांचें आहे. कारभार तेवढा आजच्यापुरता कॉंग्रेसचा.

ही जाणीव स्पष्टपणे व्यक्त होअील अशी भाषा तोंडोतोंडी रुळली पाहिजे. राज्यकारभार आज कॉंग्रेसच्या हाती आहे. अुद्या नव्या निवडणुकीत तो कारभार अितर कोणत्याही पक्षाच्या हाती राष्ट्रीय बहुमत देअू शकेल. कारण राज्य राष्ट्राचें आहे! ह्यास्तव जर अराजकाचें संकट टाळावयाचें असेल तर निवडणुकींतील मतदान नि तिचे निर्णय हे घटनेप्रमाणेच, पक्षपाताचा नि अप्रामाणिकपणाचा लवलेश स्पर्श होअू न देता त्या त्या वेळच्या राज्यीय सत्ताधिकारी पक्षानें पार पाडले पाहिजेत. परंतु जर त्याचेच हस्तक मतदान पेटयांचे तळ फोडून टेवू लागले किंवा ज्या राज्यघटनेविषयी राष्ट्रीय स्वातंत्र्याची स्थैर्यशिलाच अशा अत्यंत आदर लोकांत अुत्पन्न व्हावयास पाहिजे आहे त्या राज्यघटनेतच पक्षीय सत्तालोभानें राज्यधारक तात्कालिक बहुमताच्या बळावर वारंवार पालट करू लागले तर लोकभोगही कधी काळी त्या

घडलेला आग लावून देईल. ह्या संकटांची जाणीव त्या त्या वेळच्या राज्यीय सत्ताधिकारी पक्षाने जर ठेवली नाही तर देशात अराजकाला आमंत्रिल्याच्या पापाचे तेच धनी होतील.

## 'विरोधी' नव्हे 'अल्पमतीय' पक्ष

ह्या दृष्टीने ब्रिटनच्या लोकतंत्रातून आपण उसना घेतलेला विरोधी पक्ष हा विधिमंडळातून वापरला जाणारा शब्दही त्याज्य आहे. राज्यधारक (सरकारी) पक्षावाचून जे दुसरे पक्ष विधिमंडळात असतात त्यांना संयुक्तपणे साधारणत: opposition party विरोधी पक्ष असें ब्रिटनमध्ये म्हणतात. पण ब्रिटिश जनतेला त्याच्या सुदीर्घ लोकसत्ताक परंपरेमुळे त्या विरोधी, opposition शब्दाचा अर्थ कसा करावयाचा ते ठाऊक असते. त्यामुळे अेकंदर राष्ट्राला उपकारक असेल त्या त्या धोरणात राज्यधारक पक्षाला तो विरोधी म्हणविणारा पक्षही विरोध करीत नाही. उभयतांच्या संगनमतानेच ते वागतात. पण आपल्या अिकडे लोकतंत्रीय परंपरा ही नवीन. त्यायोगे राज्यधारक पक्षाला—सरकारी पक्षाला—विरोध म्हणूनच विरोध करण्याची वृत्ति बळावू नये ह्यासाठी opposition हा विपर्यासप्रवण शब्दच त्याज्य समजणें भाग्तें. राज्यधारक पक्ष आणि हा विरोधी म्हणविणारा पक्ष ह्यांच्यात खरा विभेद वितकाच असतो की पहिला पक्ष बहुमतीय असल्यामुळे त्याच्या हाती घटनेप्रमाणे राज्यकारभार जातो आणि हा भिन्नपक्षीय पक्ष, ही Opposition party अल्पमतीय असल्यामुळे त्याच्या हाती राज्यकारभार आलेला नसतो. ह्यासाठी ह्या दोन पक्षांना सरकारी पक्ष नि बिनसरकारी पक्ष असें जरी म्हणता येअील तरी बहुमतीय पक्ष आणि अल्पमतीय पक्ष असे शब्द योजणेंच अुचिततर आहे. ह्या अल्पमतीय पक्षाचें मुख्य कर्तव्य जर देशाला अपायकारक कृत्य राज्यधारक पक्षाचे हातून होते असें वाटलें तर ते हाणून पाडण्यापुरता त्या शासकीय पक्षाला (Government) विरोध करणें वैध, परंतु ज्या गोष्टी देशहितकारक आहेत त्यात राज्यधारक पक्षाशी मन:पूर्वक सहकार्य करणें, असें दुहेरी काम राहील."

ह्या नंतर वीर सावरकरांनी, अगदी क्रांतिकालात लंडनमध्ये असतानाच देश स्वतंत्र झाल्यानंतर राज्यघटना कशी असावी याची चर्चा ते नि त्यांची समवयी तरुण मंडळी कशी करीत, क्रांतिकारकांतील अनेक तरुण बॅरिस्टरीचा नि आय सी. अेस. चा अभ्यास करणारेच असल्यामुळे घटनाशास्त्राचा (Constitution Law चा) विषय त्यांना कसा अभ्यासातच लागे, विविध राष्ट्रांच्या घटना आणि ज्या अैतिहासिक परिस्थितींतून त्या अुद्भवतात आणि ब्रिटिश राज्य अुलथून पाडून हिंदुस्थान स्वतंत्र होताना कोणकोणत्या संभवनीय परिस्थितीतून आपली घटना आपणास घडवावी लागेल याविषयी स्वत: त्यांचीच व्याख्यानें त्याच्या फ्री अिंडिया सोसायटी मध्ये कशी होत त्याचें काही वृत्त सांगितले आणि ते पुढे म्हणाले :

## भारतीय तरुणांनो, आता प्रथम शस्त्रबळ हवें

आता ह्या अितक्या यशस्वीपणे पार पडलेल्या मंगल समारंभाचा अुपसंहार करताना साऱ्या राष्ट्रातील तरुण पिढीला माझें असें आवाहन आहे की, ब्रिटिशांसारख्या प्रबळ नि विकट शत्रूच्या हातून आपलें राष्ट्र मुक्त करण्याचें दुर्घट कार्य यशस्वीपणानें पार पाडून ह्या प्रस्थापित झालेल्या स्वतंत्र भारताच्या महाराज्याचा वारसा आमच्या पिढीनें आता तुमच्या तरुण पिढीच्या हाती दिलेला आहे. ह्या राष्ट्रस्वातंत्र्याचें संरक्षण करण्याचा भार आता तुमच्यावर आहे. जर ह्या तुमच्या महाराज्याच्या संरक्षणार्थ आणि संवर्धनार्थ तुम्ही, हा सशस्त्र क्रांतिकारकांचा जो वीरस्मृतिस्तंभ तुमच्यासमोर अुभारलेला आहे त्यांनी केलेल्या निस्सीम त्यागाचा, पराक्रमाचा नि शत्रूचे बळी घेत घेत अर्पिलेल्या स्वप्राणांच्या बलिदानाचा आदर्श दृष्टीपुढे ठेवून कर्तव्यक्षेत्रात अुतराल नि त्याच वीरवृत्तीने झुजाल तर तुम्ही हें स्वातंत्र्यसंरक्षणाचें तुमचें कर्तव्य निश्चितपणें पार पाडू शकाल. कारण तुमची आजची तरुण पिढी म्हणजे ह्या आजकालच्या स्वातंत्र्यसंपादक पराक्रमी पिढीचेच पुत्राची किंवा फारतर पौत्राची आहे. ह्या स्वातंत्र्यसंपादक, पराक्रमी, सावळ्या पिढीचें तुमच्या अुगवत्या तरुण पिढीत अुतरलेलें रक्त नि तेज फुंकर घालताच भडकून अुठावें अितकें ताजें नि धगधगतें आहे. त्यांच्याअितकाच नव्हे तर त्यांच्याहून सवाई पराक्रम राष्ट्रस्वातंत्र्यरक्षणार्थ करून दाखवाल तरच तुम्ही त्यांचे पुत्र शोभाल. म्हणून तुम्ही स्वराज्य मिळताच तें अुपभोगासाठी मिळालें आहे असें समजू नका हें तुमचें महाराज्य जर सुरक्षित नि प्रबळ करावयाचें असेल तर आणखी दहा वर्षें तरी तुम्हांस स्वातंत्र्यसंपादक पिढीनें केला त्याहून दसपटीने अधिक त्याग, अधिक कष्ट नि अधिक पराक्रम केला पाहिजे.

ह्या नव प्रस्थापित भारतीय महाराज्याच्या संरक्षणार्थ नि संवर्धनार्थ आता अितर सर्व गोष्टींच्या आधी, मध्यें नि नंतर आवश्यकता आहे, दुर्धर्ष नि प्रचंड शस्त्रबळाची!

कारण आजही सारी मानवजात राष्ट्रवादाच्या नि शस्त्रवादाच्याच राजकीय पातळीवर अुभी आहे ही खूणगाठ बांधून ठेवा! जीं राष्ट्रें स्वतःच्या शस्त्रबळाच्या आधारावर स्वतंत्र आहेत तींच काय तीं आज खरीखुरीं स्वतंत्र आहेत. आणि अितर दुर्बळ राष्ट्रांवर आपापलें वर्चस्व स्थापण्यासाठी खटपटत आहेत. ही वस्तुस्थिति आहे. अफिमी स्वप्नरंजनात न रंगता जर तुम्हांस ह्या वस्तुस्थितींत आणि ह्या आक्रमक सशस्त्र राष्ट्रांच्या धकाधकीत जगायचें असेल, जर खरेखुरे स्वतंत्र राष्ट्र म्हणून विजयपणें जगायचें असेल तर भोंगळ्या नि दुबळ्या शांतिपाठाच्या मृगजळाच्या पाठीमागे धावत सुटण्याची तुमची हाडीमासी खिळलेली खोड सोडून देवून अेरमहा आपल्या ह्या स्वतंत्र हिंदुराष्ट्राचें रोखठोक शस्त्रबळ अितर आजच्या कोणत्याही राष्ट्राच्या शस्त्रबळाअितकें तरी समर्थ बनविण्याचें कार्य तत्काळ हातीं घ्या.

स्वतंत्र होताच आज ज्या पक्षाच्या हाती आपल्या राज्यकारभाराची सूत्रें पडलेली आहेत त्यांनी स्वातंत्र्यानंतर चार वर्षे अुलटून गेलीं तरी तशा प्रकारच्या प्रचंड नि अजेय सैन्यबळाची सज्जता करण्याच्या दिशेने पहिलें पाअूलसुद्धा अजून टाकलें नाही. ही त्यांची अक्षम्य चुकी होत आहे. त्यांच्यातील काही प्रमुख पुढारी अजूनही मोठ्या भैटीने जागतिक घोषणा करीत आहेत कीं, आम्हांला ज्या अर्थी कोणावरही आक्रमण करण्याची अिच्छाच नाही त्या अर्थी आमच्यावरही कोणी आक्रमण करील असें आम्हांस वाटत नाही. वास्तव आम्ही शस्त्रबळाच्या नढाओढीचें आततायी पाप करणार नाही!

ह्या अशाच दुबळ्या वृत्तीने आपल्या राष्ट्राची गेली अनेक शतकें अपरिमित हानि झालेली आहे. शेळ्यामेंढ्यांनी आम्ही तुमच्यावर केव्हाही आक्रमण करू अिच्छीत नाही असें लाडग्यांना सांगणें हें जितकें हास्यास्पद आहे तितकेंच अमेरिका, ब्रिटन, रशियासारख्या हाती अॅटमबाँब घेअून अुभ्या असलेल्या आजच्या बलाढ्य राष्ट्रांना आमच्या ह्या आज हाती रिव्हाल्व्हरें सुद्धा पुरेशी नसलेल्या भारताने, आम्ही तुमच्यावर आक्रमण करू अिच्छीत नाही म्हणून सांगणे बालिशपणाचें आहे! आणि आम्ही असें त्यांना आश्वासन दिले म्हणजे ते आमच्यावर आक्रमण करणार नाहीत असें विश्वासणें ही बावळेपणाची परमावधि आहे!

अशाच मनोवृत्तीचे काही सत्ताधारी पुढारी आणि त्यांचे अनुयायी शस्त्रबळ हें तुच्छ नि आत्मघातकीच काय ते आहे हे सिद्ध करण्यासाठी सांगत असतात की अहो जे जे शस्त्रबळावर भर देतात त्यांची त्यांची कोण दुर्दशा अुडते ते पहा! तो हिटलर, तो मुसोलिनी, तो जपानचा टोजो ह्यांनी शस्त्रबळाची कास धरली, ह्यामुळेच त्याचा नि त्याच्या राष्ट्राचा विध्वंस झाला! हिटलरचा नि मुसोलिनीचा नि टोजोचा विध्वंस झाला हें खरेच आहे पण तो कोणी केला! नि कशाने केला? अमेरिका, रशिया नि ब्रिटन ह्यांनी वायबलाच्या पुरश्चरणांचा मारा केला आणि अहिंसक धम्मपदांच्या लक्षावधि प्रतींचा जर्मनी जपानवर पाअूस पाडला म्हणून का त्यांच्या हिंसक शस्त्रबळाचा विध्वंस झाला? नाही! नाही! जपान जर्मनीच्या हिंसक शस्त्र-बळाच्या शंभर पटीनी अधिक विध्वंसक नि हिंसक असलेल्या अॅटम बाँबच्या अणु-ध्वमुच्या, शस्त्रबळानेच तो विध्वंस होअू शकला. म्हणजे अेकपट शस्त्रबळाचा विध्वंस नि:शस्त्र शांतिसूक्तांनी होत नाही तर सवापट शस्त्रबळानेच काय तो होअू शकतो. हाच धडा हिटलर, मुसोलिनी नि टोजोच्या पराभवाने आम्हास शिकविला आहे.

अेवढ्याचसाठी रशियामध्ये सोव्हिअेट राज्यक्रांति विजयी होअून सत्तान्तर होताच त्या वास्तववादी राज्यचालकांनी पहिल्या प्रथम जी योजना हाती घेतली ती अद्ययावत् शस्त्रबळ, प्रचंड नि अमोघ लाल सैन्य अुभारण्याची नि सज्ज ठेवण्याचीच होती. मग औद्योगिक कारखान्याच्या, शेतीच्या, शिक्षणाच्या दुय्यम पंचवार्षिक योजनांची गोष्ट!

कारण, तुम्ही साऱ्या देशभर लाख कारखाने अुभारलेत, शाळा काढल्यात नि संपत्तीचा धूर तुमच्या राष्ट्रात निघू लागला तरी जर त्या सर्वांचें तुमच्या शत्रुस्थानीं असलेल्या प्रबळ राष्ट्रांच्या सशस्त्र आक्रमणापासून संरक्षण करणाऱ्या भूदलाचें, नौदलाचें, नि विमानदलाचे सबाअी शस्त्रबळ तुमच्यापाशीं नसेल तर त्या तुमच्या साऱ्या औद्योगिक कारखान्यांची, अन्नधान्याची, विद्यापीठाची नि संपत्तीची लुटालूट करून परकीय आक्रमक धुळधाण अुडविल्यावाचून राहणार नाहींत. तर्शी शस्त्रबळावाचून असुरक्षित संपत्ति हीच लुटारू पण सशस्त्र परराष्ट्रीय दरोडेखोरांना अेक प्रलोभन, अेक आमंत्रण असतें. ह्या कटु सत्याचा अनुभव विशेषत: भारतानें आजपर्यंत अितिहासात शंभर वेळा घेतलेला आहे. पण भारताचे डोळे अजूनही अुघडत नाहींत. तथापि सोव्हिअेट रशियाने ती चूक केली नाही. अितकेंच नव्हे तर अमेरिकेच्या शस्त्रागारात अगदीं गुप्तपणें म्हणून तिने अॅटमबाँब नि हायड्रोजनबाँब —अणुब्बम् आणि अुज्जब्बम्—ह्या भीषण अस्त्रांची निपज केली न केली तोंच रशियन सोव्हिअेटनेंही त्याच्या तोडीस तोड देणारीं तशींच अस्त्रें आपल्याही शस्त्रागारात सिद्ध आहेत असें जगतास आव्हान दिलें. म्हणून आज रशिया हें बडें राष्ट्र झालें आहे!

## कोणतें राष्ट्र 'बडें' ठरतें ?

आम्हीच आमच्या वृत्तपत्रात प्रत्यहीं छापतो, तिथा बड्या राष्ट्रांची बैठक! बडीं राष्ट्रें अमुक म्हणतात नि तमुक म्हणतात! पण आम्हांस हा विचारसुद्धा शिवत नाही की ह्या तीनच राष्ट्रांना हें बडेपण कां आलें? अमेरिका, रशिया आणि आता ब्रिटन ह्याच तीन राष्ट्रांना सारें जग Three Big Nations, तीन बडीं राष्ट्रें असें कां म्हणतें आणि भारताला Big Nation का म्हणत नाही? तीं तिन्हीं राष्ट्रें अध्यात्मशास्त्रात किंवा लोकसंख्येत, किंवा क्षेत्रफळात किंवा बुद्धिमत्तेत जगामध्यें श्रेष्ठ आहेत म्हणून? नव्हे, तर तीं तिन्ही राष्ट्रें आज केवळ शस्त्रबळात श्रेष्ठ आहेत, त्यांच्यापाशीं आज भीषणतम असलेलीं अण्वस्त्रें वाय्वस्त्रें, जलास्त्रें सज्ज आहेत म्हणून! म्हणून कायशी तीं तीन राष्ट्रें बडीं! आणि बाकी सारें जग छोटें! तीं तीन राष्ट्रें म्हणतील ती पूर्व दिशा!

अशा ह्या आजच्या जगात त्या बड्या राष्ट्राअितके तरी आपलें हें भारतीय राष्ट्र शस्त्रसज्ज झाल्यावाचून आम्ही तटस्थ आहों अशी पोकळ अंटसुद्धा तुम्हाला मारता येणार नाहीं ! आपल्या अुभापायघ्याची शस्त्रसज्ज होअून प्रकट नि गुप्तशत्रु आमच्यावर झेंप घालण्यासाठी नि आमच्या राज्याचे लचके तोडण्यासाठी टपून बसले असता तुम्हाला तटस्थ तरी कोण राहू देतो? चिमण्यांनी आम्ही तटस्थ आहों म्हणून घोषणा केली तरी ससाणे त्यांच्यावर झेंप घालण्यास थोडेच सोडणार आहेत! हें काहीं नाहीं ! आमच्या राज्यधारकांनी मिळालेल्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्या-

साठी तत्काल शस्त्रसज्जतेचें कार्य प्रचंड प्रमाणावर हाती घेतलें पाहिजे. हें त्यांचें पहिलें कर्तव्य आहे. अितर स्वतंत्र नि प्रबळ देशांतून तरुणांपासून प्रौढांपर्यंत जसें सैनिक शिक्षण सक्तीने दिलें जातें तसें अद्ययावत् नि पराक्रमी सैनिकी शिक्षण सर्व नागरिकांना अनिवार्यपणे दिले पाहिजे. विशेषतः शाला, प्रशाला नि महाशालांतून अुगवत्या तरुण पिढीला तर स्वराष्ट्राच्या स्वातंत्र्यरक्षणार्थ अितके रणनिष्णात करून सोडलें पाहिजे की ह्या पांच वर्षांच्या आत निदान अेक कोटी हिंदु तरुणांचें अद्ययावत् शस्त्रांनी नि अस्त्रांनी सुसज्ज असें भूदल, नौदल नि विमानदल भारताच्या चतुःसीमांचें संरक्षण करण्यास रणसज्ज पविख्यात अुभें ठाकलें पाहिजे! आजचीं जगास ठाअूक असलेलीं सारी शस्त्रें नि अस्त्रेंच नव्हेत तर त्याहूनही भीषणतर अशी नवनवीं शस्त्रास्त्रें शोधून काढण्यासाठी आणि घडविण्यासाठी शतावधि रणरसायनशाला लटपटत राहिल्या पाहिजेत, नि सहस्रावधि शस्त्रास्त्रांचे कारखाने साऱ्या देशभर धणधणत राहिले पाहिजेत. या पांच वर्षांच्या आत आजच्या जगातील कोणत्याही राष्ट्रापेक्षा शस्त्रबळात ह्या आपल्या हिंदुस्थानचें हे महाराज्य केवळ समबलच नव्हे तर बलवत्तर झालेच पाहिजे.

तसे बलवत्तर झालात म्हणजे मग पाहिजे तर जगास तुम्ही सांगू शकाल की आम्ही आक्रमण करणार नाही. किंवा आम्ही तटस्थ राहू अिच्छितो. त्या शब्दांत तेव्हा काहीतरी अर्थ येअील. आज तुम्हां दुर्बलाच्या तोंडून निघणारे ते शब्द व्यर्थ आहेत. अितकेच नव्हे तर ते तुमच्या स्वतःच्या दुबळेपणाचेंच जागतिक प्रदर्शन करणारे आहेत

भारतीय तरुणांनो, मघा मी तुम्हांस सांगितल्याप्रमाणे आता ह्या स्वातंत्र्यसंरक्षणाचा भार विशेषत तुम्हांवरच आहे. जर ह्या आमच्या जुन्या पिढीच्या हातीं असलेल्या आजच्या राज्यशासनाच्या नि नेतृत्वाच्या हातून हे वरील राष्ट्रीय स्वातंत्र्यरक्षणार्थ अत्यंत आणि सर्वप्रथम अवश्य असलेले शस्त्रसज्जतेचें कार्य पार पडेनासें झाले तर, अराजक न माजविता आणि मतपेटीच्या मार्गे, तुम्ही हे जुने नेभळट नेतृत्व झुगारून द्या. तुमचें स्वतःचें तरुण नेतृत्व अुभारा, आणि ह्या भारतात पराक्रमी शासन स्थापून वरील शस्त्रसज्जतेचा कार्यक्रम धडाडीने निघडावयाल पार पाडा! ध्यानात धरा की अनाव्हाननीय आणि अजेय असें भारतीय शस्त्रबळ असले तरच हें भारतीय महाराज्यही स्वतन्त्र नि अजेय राहू शकेल.

स्वातंत्र्यसंपादक अशा दिवगत हुतात्म्यांच्या आणि वीरहस्त्याच्या गौरवार्थ विघृदीपांनी लखलखाटलेला हा जो वीरस्मृतिस्तंभ तुम्ही अुभारलेला आहात त्या वीरस्मृति स्तंभाचा तुम्हास हाच आजचा निकडीचा संदेश आहे!!!

* * *

## ( ५ )

# तेंव्हा स्वातंत्र्यसंपादन, आता स्वातंत्र्यसंरक्षण

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यार्थ ब्रिटिशांशी झालेल्या सशस्त्र संग्रामात ज्यांनी ज्यांनी प्राणान्तापर्यंत झुंज दिली त्या सर्व ज्ञात-अज्ञात अशा दिवंगत हुतात्म्यांना नि वीरात्म्यांना कृतज्ञ श्रद्धांजलि अर्पिण्यास्तव मेच्या १०-व्या दिनांकाला त्यांचा स्मृतिदिनसमारंभ पुण्यास साजरा झाला, ही आनंदाची गोष्ट होय. त्याच दिनाका-निमित्त सशस्त्र क्रांतिकारकांच्या अितिहासाचें ओझरतें दर्शन घडविणारा 'केसरी 'चा अेक विशेषांकही निघत आहे. अितरही काही वृत्तपत्रें विशेषांक काढून किंवा विशेष लेख लिहून आपापली श्रद्धांजलि त्या हुतात्म्यांच्या चरणीं अर्पितील असें समजते. पितृतर्पणाप्रमाणेच अशी सार्वजनिक श्रद्धांजलि दिवंगत देशवीरांना अर्पण करणें हें आपणा सर्वांचे अेक धार्मिक नि राष्ट्रीय कर्तव्यच आहे.

### अेक पथ्य

तथापि ज्या अर्थी हा अुण्यापुऱ्या शंभर वर्षांचा क्रांतिकाल आता अितिहासात समाविष्ट झाला आहे, त्या अर्थी त्या दिवंगत क्रांतिकारकांचे असे गौरवसमारंभ करताना किंवा त्यांचा अितिहास वाचताना आजच्या वर्तमानकाळाच्या दृष्टीने अेक पथ्य तेवढें पाळणें राष्ट्रहितार्थच अवश्य आहे. ते कोणते, कसें नि का तें या लेखात दिग्दर्शवीत आहोत.

ब्रिटिशांनी केवळ शस्त्रबळाने आपल्या राष्ट्रास पादाक्रांत करुन आम्हांस राजकीय पारतंत्र्यात डांबून टाकल्यानंतर आपल्या मातृभूमीला स्वतंत्र करण्या-साठी सन १८५७-मध्ये आपल्या क्रांतिकारकांनी पहिले सशस्त्र क्रांतियुद्ध लढविलें. त्याचा प्रारंभ साधारणतः त्या वर्षीच्या मे महिन्याच्या दहाव्या दिनाकाला हुतात्मा मंगल पांडे याने ब्रिटिश अधिकाऱ्यावर मीरत येथे झाडलेल्या पहिल्या गोळीने झाला.

तें क्रांतियुद्ध शेवटी मोडले. पण सशस्त्र क्रांतिकारकांची परंपरा काही मोडली नाहीं, खंडिली गेली नाही. ज्वालामुखीचा अेक स्फोट जरी विझला तरी जिवंत असलेला ज्वालामुखी जसा विझत नाही, त्याचे ज्वालाग्राही घटक भूमिगत होअून धगधगत राहतात, त्याचा पुन्हा स्फोट होतो, पुन्हा लोप होतो, पुन्हा स्फोट होतो तसेच ब्रिटिशांनी ठाणलेल्या आमच्या जिवंत वैराच्या ज्वालामुखीचें झालें.

सार्वभौम संपूर्ण स्वातंत्र्य हे होतें त्या क्रांतिकारकांचें ध्येय ! आणि त्याच्या त्या काळच्या शब्दांतच सांगावयाचे म्हणजे —

साप विखारी देशजननिचा ये घेऊ चावा ।
अवचित गाठुनि ठकवुनि भुलवुनि कसाही ठेचावा ।।

हें होतें त्याच्या राजनीतीचें सूत्र ! त्याप्रमाणे साधेल तेव्हा, साधेल तेथे, देशात वा परदेशात, व्यक्तिश: वा समूहश:, गुप्तपणे वा प्रकटपणे, ते क्रांतिकारक ब्रिटिशांवर सशस्त्र घाले घालीत राहत. ब्रिटिश शासनाचे मूर्तिमंत प्रतीक असलेले हिंदुस्थानातील गव्हर्नर जनरल, गव्हर्नर्स, कलेक्टर्स अित्यादिकांच्यावरच काय पण प्रत्यक्ष भर लंडनमध्ये ब्रिटिश अधिकाऱ्यावर ह्या आमच्या क्रांतिकारकाच्या कोपाने हात टाकण्यास आणि त्यांचे बळी घेण्यास सोडलें नाही. सर्वसमर्थ नि सार्वभौम भासणाऱ्या ब्रिटिशसत्तेचा असा अेकेक अधिकारी टिपून टिपून मारला जाताच सारा देश नि परदेशही हादरला जाअी. ब्रिटिशानी हिंदुस्थानचें स्वातंत्र्य शस्त्रबळाने हिरावून घेतलें आहे त्याचा हा हिंदूनी घेतलेला सशस्त्र सूड आहे हे आपण होअूनच जग बोलू लागले.

अेकीकडे ब्रिटिशसत्तेविरुद्ध सशस्त्र क्रांतिकारकांचा हा लढा चालू असताच दुसरीकडे ह्या सशस्त्र प्रतिकाराचें अत्युग्र व्रत ज्याना पचण्यासारखें वा रुचण्यासारखें नव्हतें अशा देशभक्तांनी नि:शस्त्र प्रतिकाराच्या चळवळी अुभारल्या आणि त्यामुळे सर्वसामान्य जनतेत परसत्तेविषयी तीव्र असंतोष अुत्पन्न होत गेला. सशस्त्र क्रांतिकारकांनाही हें हवेंच होतें. कारण नि:शस्त्र किंवा वैधिक चळवळींना काही केले तरी ब्रिटिशसत्ता भीक घालीत नाही हें जितक्या वेळा सिद्ध होअी तितक्या वेळा असंतुष्ट जनतेची मनें सशस्त्र क्रांतीकडे पुन्हा ओढ घेत

त्यातही हिंदुस्थानचें सार्वभौम स्वातंत्र्य मिळाल्यावाचून ब्रिटिशांचे नि आमचें ठाणलेलें वैर शमणार नाही असी निधडी घोषणा ज्यावरून जगतापुढे करता येअील असें त्या काळी साऱ्या हिंदुस्थानात अुचातील अुच वाक्‌पीठ अेकच काय ते होते— फाशीचा फळा !! म्हणून ते क्रांतिकारक त्या फाशीच्या फळ्यावरच अेकामागून अेक चढत राहिले आणि स्वातंत्र्यलक्ष्मीचा जयजयकार करीत चालले. त्यांनी देशाला स्वातंत्र्याच्या ध्येयाचा विसर असा पडू दिला नाही. त्याच्या रक्ताने फाशीचे खांब अुणीपुरी नव्वद वर्षे सारखे निथळत राहिले होते. त्यांची

सतत-शोणित-तर्पण धारा धरीत आली पिढी पिढी ।
हविर्भुजाची रणकुंडातिल आग विझल ना विझू दिली ।।

पुरेसें बळ वाढताच ते पुन्हा अुघड रणात अुतरले. त्यांनी ब्रिटिशसत्तेचीं कोषागारें लुटलीं, ब्रिटिश सत्तेची शस्त्रागारें लुटलीं.

## पहिलें स्वतंत्र अधिशासन

आपल्या शत्रूचा शत्रू तो आपला तात्पुरता मित्र या राजनीतीला धरून अिंग्रजांच्या शत्रुस्थानी असलेल्या युरोपातील बलाढ्य राष्ट्रांशी त्यांनी सूत्र बांधलें.

कित्येकांनी युरोप-अमेरिकेत अद्ययावत् सैनिकी शिक्षण घेतलें. जर्मनीचें नि ब्रिटनचें पहिलें महायुद्ध जुंपताच क्रांतिकारकांनी उघडपणे जर्मनीचा पक्ष घेतला. बर्लिनला पहिलें तात्कालिक स्वतंत्र भारतीय अधिशासन (प्रोव्हिजनल गव्हर्नमेंट ऑफ अिंडिपेंडंट अिंडिया) स्थापून त्याला जर्मनपक्षीय राष्ट्रांची प्रकट मान्यता मिळविली. हिंदी सैनिकाचें पहिलें स्वतंत्र भारतसैन्य अुभारलें नि हिंदुस्थानवर स्वारी करण्याची सिद्धता चालविली. पण तेवढ्यात जर्मनीचाच पराजय झाला; आणि क्रांतिकारक देशोदेशी पांगले, पण खचून न जाता देशोविदेशी अुठावण्या करीतच राहिले.

अितक्यात दुसऱ्या ब्रिटिश-जर्मन महायुद्धाची संधि आली. ब्रिटिशांना लक्षावधि हिंदी सैन्याची आवश्यकता पडली. तेव्हा सैनिकीकरणाची भारतव्यापी चळवळ अुभारून सहस्रावधि हिंदूंची ब्रिटिश सैन्यात भरती करून, नानामिषाने नि नानावेषाने अनेक क्रांतिकारक स्वतः सैन्यात प्रवेशले; आणि त्यांनी ब्रिटिशांच्या हिंदी सैन्याची 'राजनिष्ठा' आतून पोखरून टाकली. जपानच्या हाती सिंगापूर पडताच क्रांतिकारकांनी पुन्हा अेकदा स्वतंत्र भारताचें तात्कालिक अधिशासन (प्रोव्हिजनल गव्हर्नमेंट) प्रस्थापिलें आणि त्यास कित्येक राष्ट्रांची मान्यताही मिळविली. ब्रिटिशांनी अुभारलेल्या, परंतु क्रांतिकारकांनी पोखरलेल्या हिंदी सैन्यातील सहस्रावधि शस्त्रसज्ज सैनिक ह्या स्वतंत्र भारताच्या ध्वजाखाली गोळा झाले. 'चलो दिल्ली'ची वीरगर्जना करीत मातृभूमीस मुक्त करण्यासाठी त्यांनी हिंदुस्थानच्या सीमेपर्यंत चढाअी केली. ब्रिटिशांशी लढाअी दिली. त्याच वेळी देशातही नि:शस्त्र प्रतिकारकांची अुठावणी झाली. पण त्यांच्यातीलच अनेक देशभक्त भूमिगत होअून सशस्त्र प्रतिकार करू लागले. अशी आतून बाहेरून हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेची लाडगतोड होत चालली, तो तिकडे महायुद्धात जपान-जर्मनीचा मोड होअून ब्रिटिश पक्षाचा जय झाला तथापि त्यात ब्रिटनचा अितका शक्तिपात झाला की, विचरून गेलेल्या हिंदुस्थानला केवळ शस्त्रबळाने हाती ठेवणें त्यास अशक्यप्राय होअून गेलें. जातिवंत ब्रिटिश सैन्य ब्रिटनच्या सरक्षणास पुरणारें नव्हतें. म्हणून त्याच्या बळावरच हिंदुस्थानला दडपून टाकणे असंभव झालें.

## सैन्याचा विद्रोह

हिंदुस्थानातील ज्या हिंदी सैन्याच्या बळावर आजवर हिंदुस्थान दडपता आलें तें भूदल-नौदलासुद्धा ब्रिटिशसत्तेविरुद्ध विद्रोह करून अुठलेले! महायुद्धात पिचून गेलेल्या ब्रिटनला अशा पेचात जीव वाचवावयाचा तर हिंदुस्थानातून चंबूगबाळें अुचलून निघून जाण्यावाचून गत्यंतर अुरलें नाही. त्यामुळे जाता जाता जो काही अपशकून, खोडसाळपणा, मोडतोड नि वाटमारी करता येअील तितकी करून पूर्वी सिकंदराच्या सेना जशा हिंदुस्थानच्या प्रतिकाराने हताश होअून पडत झडत निघून गेल्या तसेंच अिग्रजांना सन १९४७-मध्ये हिंदुस्थानचें स्वामित्व सोडून देअून

हताशपणे परत जाणें भाग पडलें. सारे हिंदुस्थान ब्रिटिशांच्या वेढ्या तोडून स्वतंत्र झालें. ब्रिटिशांच्या राजाने लाटलेली 'हिंदुस्थानचा सम्राट्' ही पदवी सुद्धा त्याच्यापासून हिसकावून घेतली. आमच्या इंद्रप्रस्थाच्या प्राचीन राजधानींत आज पुन्हा आमचें स्वतंत्र नि सर्वप्रभुत्व-संपन्न भारतीय लोकराज्य प्रस्थापिलें गेलें आहे. त्या आमच्या प्राचीन इंद्रप्रस्थावर आमच्या स्वतंत्र भारताचा सुदर्शनचक्रांकित ध्वज आज पुन्हा फडकत राहिलेला आहे !

एका घासात सर्व जेवण जेवता येत नाही. कोणचीही एवढी व्यापक राज्यक्रांति एका टप्प्यात शभरी शंभर टक्के यशस्वी झाली असें जगात सहसा घडलें नाही. वास्तव आपल्याला मिळालेल्या ह्या वरील राष्ट्रीय विजयातही जरी काही व्यंग उरलेलें आहे, स्वातंत्र्यसंग्रामात लागलेले काही घाव अजून चिघळत आहेत, कोनाकोपऱ्यात काही मोडतोड जरी झालेली आहे तरीही आज ह्या आपल्या विस्तीर्ण देशाच्या तीनचतुर्थांशाहूनही अधिक नि सलग अशा भूभागावरच आपलें स्वतंत्र नि एकछत्री महाराज्य आपण प्रस्थापित करूं शकलो आहों ही काही सामान्य घटना नाही ! जगातील स्वातंत्र्य-संपादनार्थ घडलेल्या मोठमोठ्या राज्यक्रांत्यांत गणली जावी अशीच ह्या राज्यक्रांतीचीही महत्ता आहे जर आपण आपल्या हाती आलेल्या या विस्तीर्ण शक्तिसेंधारा झटपट संघटित करून, आपल्या राष्ट्रात वीरवृत्ति संचरवूं शकलो तर मग—'का कथा बाणसंधाने !' प्रबळ प्रत्यंचेच्या नुसत्या टणत्कारासरशी हीं उरलेलीं लुगीसुगी विघ्नें पराभूत होतील !

असाच एका प्रसंगी समर्थांनी दिग्दर्शिलें होतें की, प्रथम " आहे तितुकें जतन करावें " आणि मग त्याच्याच बळावर " पुढें आणिक मेळवावें । "

## ह्या यशस्वी राज्यक्रांतीचें श्रेय समाईक आहे !

स्वातंत्र्य-संपादनार्थ परकी ब्रिटिश सत्तेशी आपआपल्या परीनें झुजलेल्या सशस्त्र क्रांतिकारक, नि:शस्त्र प्रतिकारक, फार काय कोणतीही चळवळ न केलेल्या परंतु देश स्वतंत्र व्हावा असी मनातल्या मनात ज्यांना तळमळ लागली होती त्या सहानुभूतिक वर्गासुद्धा सगळ्यांना या अंतिम विजयाचें श्रेय यथाप्रमाण देण्यात आलें पाहिजे. त्यांच्या सर्वांच्या पराक्रमाचें, त्यागानें नि शुभेच्छेचें हा विजय, हें संभूय फलित आहे

पैकी नि:शस्त्र प्रतिकारकांना ब्रिटिश राज्य होतें तेव्हापासून तों आजपर्यंत आपला देश आपली कृतज्ञ श्रद्धांजलि अर्पण करीत आला आहे; त्यांचा कृतज्ञ गौरव नाना प्रकारे आजवर करीत आला आहे. ते युक्तच झालें.

परंतु ज्यांनी स्वातंत्र्याच्या ध्येयानें रणशृंग भर मध्यरात्रीच्या काळोखात पहिल्याने फुंकलें आणि त्याप्रीत्यर्थ ब्रिटिश सत्तेवर तलवारीचा पहिला वार केला त्या सशस्त्र क्रांतिकारकांचा प्रकट गौरव करणें हें ब्रिटिशसत्ता होती तोंवर शक्यच नव्हतें. पुन्हा क्रांतियुद्धही चालूच होतें.

पण स्वातंत्र्य-संपादनानंतरही काही तुरळक वैयक्तिक अपवाद सोडले तर, यच्चयावत् दिवंगत सशस्त्र क्रांतिकारकांचा गौरव-समारंभ असा प्रकटपणे आजवर कुठेही झालेला नाही. तसा समारंभ करून ब्रिटिशांशी झुजलेल्या त्या हुतात्म्यांना नि वीरात्म्यांना आपली कृतज्ञ श्रद्धांजलि प्रथम पुण्यातच वाहिली जावी हें पुण्याच्या परंपरागत पराक्रमी क्षेत्रमाहात्म्याला साजेसेंच होत आहे. पुन्हा आज जें पुण्यास होतें तें उद्या दिल्लीलाही होण्याचा उत्कट संभव असतो.

## यशस्वी राज्यक्रांतीचें अंतिम कर्तव्य आत्मविसर्जन

जोवर राज्यक्रांति चालू होती तोवर परकीय ब्रिटिशसत्तेचें राज्ययंत्र मोडून टाकणें, त्याचा विध्वंस करणे हेंच आवश्यक नि प्रथम कर्तव्य होतें. कारण तें परशासन उच्छेदिल्याविना स्वातंत्र्यसंपादन अशक्य होतें. त्या क्रांतिकालात वर वर्णिलेल्या विध्वंसक क्रांतिप्रवृत्ति हाच धर्म होता.

परंतु हें विसरता कामा नये की, तो आपद्धर्म होता. परसत्तेच्या आपत्तीतून आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य-संपादन करण्यास्तव असंतोष, उत्क्षोभ, निर्बंधभंग, शस्त्राचार, गुप्त कट इत्यादि साधनें योजणारी विध्वंसक क्रांतिप्रवृत्ति त्या कालापुरतीच काय ती धर्म्य असते; परंतु जनतेत ती क्रांतिप्रवृत्ति जर तशीच मूळ धरून राहू दिली तर केव्हा केव्हा आपद्धर्मालाच नित्यधर्म समजण्याची भयंकर भूल जनतेच्या हातून घडते आणि त्यामुळे राज्यक्रांति यशस्वी झाल्यानंतरही राष्ट्रात ही विध्वंसक बेबंदशाही तशीच चालू राहाते. त्यामुळे राज्यक्रांतीनंतर घटनात्मक स्वराज्य स्थापन करणे अशक्य होऊन अपक्रांति नि अराजक माजते. अर्थात् मिळविलेलें स्वातंत्र्यही धोक्यात येतें. पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीचा इतिहास हा अशा भयंकर परिणामाचे एक ज्वलंत उदाहरण आहे.

यास्तव जेव्हा स्वातंत्र्य संपादन हें आपले प्रथम साध्य होतें तेव्हा सशस्त्र वा निःशस्त्र प्रतिकारक देशभक्तांनी जनतेत संचरविलेल्या वरील सर्व विध्वंसक क्रांतिप्रवृत्तींचें तत्काल विसर्जन करणे हे आपल्या यशस्वी झालेल्या राज्यक्रांतीचें अंतिम कर्तव्य होय. कारण आता आपलें साध्य स्वातंत्र्य-संरक्षण हे आहे, राष्ट्रसंवर्धन हें आहे. आता निर्बंधतुच्छता नव्हे, तर निर्बंधशीलता, विध्वंसक नव्हे, तर विधायक प्रवृत्ति, हा राष्ट्रधर्म आहे.

परकीय राजवटीविरुद्ध जी अराज्यनिष्ठेची, असहकाराची नि विध्वंसाची क्रांतिप्रवृत्ति आपणच निर्मिलेली होती तिचें आता स्वराज्यनिष्ठ, सहकारी नि विधायक अशा शांतिप्रवृत्तींत तत्काल रूपांतर केलें पाहिजे. ह्या कर्तव्याचे दायित्व जनतेवर तर आहेच, परंतु त्याहून दमपटपणाने राज्यशासनाचा भार आज ज्यांच्यावर सोपविला गेला त्या राज्यशासकांच्यावर हें दायित्व पडलेले आहे. त्यांनी राज्यघटनेच्या बाहेर केव्हाही पाऊल टाकता कामा नये. शासक असोत वा शासित असोत, आम्हा

सर्वांच्या राजकीय चळवळी नि कृत्यें आता नैर्बंधिक, वैध नि घटनात्मक (लीगल, लेजिटिमेट अँड कॉन्स्टिटयूशनल) कक्षेतच असलीं पाहिजेत. पक्षोपपक्षांचे सारे मतभेद मतदानपेटीतच मावले पाहिजेत.

माझ्या सहकारी असलेल्या थोरथोर राज्यक्रांतिकारक पुढाऱ्यांविषयी तरी मी हें प्रतिज्ञेवर सांगू शकतो की, आमचें हें मत आजचें नसून, ब्रिटिशांशीं जुंपलेल्या सशस्त्र क्रांतीच्या भर शुजीतही आम्ही आमच्या क्रांतिकारक कार्यक्रमाची हीच मर्यादा आखलेली होती. ब्रिटिश राज्य उलथून पाडले गेलें, देश स्वतंत्र झाला आणि घटनात्मक स्वतंत्र भारतीय राज्यशासनाची प्रतिष्ठापना झाली की, त्याच दिवशी सशस्त्र क्रांतिसंस्थेने आपले आत्मविसर्जन केले पाहिजे. सन १९०८ च्या आगेमागे मी लिहिलेल्या १८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या अितिहासात जवळ जवळ वरील भाषेतच, क्रांति यशस्वी होताच तिचें पहिलें नि शेवटचें कर्तव्य म्हणजे घटनात्मक स्वराज्यस्थापना हेंच असलें पाहिजे हें विस्तरशः विवेचिलें आहे.

हेंच तत्त्व जनतेच्या मनावर बिंबविण्यासाठी आणि ह्या मताच्या क्रांतिकारकाच्या वतीने राज्यक्रांतीचें हें शेवटचें कर्तव्य करण्यासाठी हुतात्म्यांच्या या गौरवसमारंभाच्या वेळीच हिंदुस्थानातील जगभर गाजलेल्या दोनतीन क्रांतिसंस्थांपैकी 'अभिनव भारत' ह्या गुप्त संस्थेचा सांगतासमारंभही प्रकटपणे करण्याचें योजिले.

—केसरी, दि. ११ मे १९५२

* * *

## (६)

# सामरिक सामर्थ्याची वाढ हीच आजची निकड

### पहिला विचार

लोकसत्ताक भारताच्या अंतर्बाह्य संरक्षण-विषयक समस्या ह्या विषयावर 'केसरी'च्या प्रजासत्ताक दिनानिमित्त जो विशेषांक निघत आहे त्यात मी अेक लेख लिहावा म्हणून केसरीच्या संपादकमहाशयांनी मला कळविले आहे. अशा विषयावर अेक लेखमालाच लिहावी असें मलाही वाटतें; परंतु अशी लेखमाला तत्काळ लिहिण्यास अनेक अडचणींमुळे आज जरी मला सवड नाही, तथापि पाकिस्तान-अमेरिकन शस्त्रास्त्र-विषयक संधि ह्यांच्याशी चर्चा होत असल्याची बातमी वाचताच माझ्या

मनात जो पहिला विचार अुसळला तो जरी तत्काळ जनतेपुढे मांडून टाकला तरी ह्याविषयी मला काय वाटते त्याची वाचकांना रूपरेषा कळू शकेल, अशा आशेने ह्या लेखात तेवढाच विचार विशद करून सांगत आहे.

वास्तविक पाहता ज्या दिवशी आपलें हें भारतीय लोकसत्ताक महाराज्य स्थापित झालें, त्याच दिवसापासून आपलें भौमिक, सामूहिक आणि वैमानिक शस्त्रबळ वाढविण्याचें आणि तें अद्ययावत् आयुधांनी सज्ज ठेवण्याचें कार्य आम्ही तत्काळ हातीं घ्यावयास पाहिजे होतें. पण गेलीं सोन्यासारखीं सहा वर्षे आम्ही फुकट घालविलीं. नीरावेंद्रापासून तो वनमहोत्सवापर्यंत जितर वाटेल त्या सापेक्षतः अगदीं दुय्यम महत्त्वाच्या असणाऱ्या रिकाम्या नि निकाम्या अुलाढालींतच काळ दवडला! तशा गोष्टींचाही काही अुपयोग असतोच, जसा घरात लहान मुलांच्या पुरता भातुकलीचाही अुपयोग असतो.

पण अेक महाराज्य हातीं येताच आणि त्याच्या भोवती शत्रूंचा गराडा पडला आहे हें दिसताच प्रथमत: सर्व लक्ष त्या महाराज्याचें सामरिक संरक्षण करण्यासाठीं अत्यवश्य अशा शस्त्रबळाची सिद्धता करण्यावरच केंद्रित करावयास हवें होतें.

पण नेमकें तेंच कर्तव्य आम्ही जवळजवळ प्रतिज्ञापूर्वक टाळलें. शाला, प्रशाला व महाशाला यांतून तरुण पिढीस सक्तीचें सैनिक शिक्षण देण्याची अगदीं प्राथमिक गोष्टसुद्धा अजून हातीं घेतलेली नाही. भोंगळ तत्त्वांच्या शब्दांचे बुडबुडे अुडवीत आणि कागदी घोडे नाचवीत आम्ही शांततेचा दिग्विजय करण्यास निघालो!

## कीलक राष्ट्रें (Buffer States)

तेच चीनकडे पाहा! ह्याच सहा वर्षांत चीनने त्याचें सारे राष्ट्र अद्ययावत् आयुधानी शस्त्रसज्ज नि संरक्षणक्षम करून दाखविलें. जितकेंच नव्हे तर भारताला भीक न घालता तिबेटचे कीलक राष्ट्र नष्ट करून चीनने त्याच्या महाराज्याच्या विस्तीर्ण सीमाची बळकट तटबंदी केली आणि मनात येतान भारतावर सरळ आक्रमणही करता यावें अशा प्रकारे त्याच्या सीमा आमच्या हिंदुस्थानच्या सीमांशी रेटारेटीने भिडवून टाकल्या. ब्रिटिशानी त्याच्या हातीं हिंदुस्थानचें साम्राज्य असता त्याच्या संरक्षणार्थ चीन आणि रशिया ह्या पलीकडच्या दोन्ही साम्राज्याना हिंदुस्थानशी सरळ टक्कर देता येअु नये म्हणून त्यामध्ये अिकडे तिबेट, नेपाळ, भूतान

## चीनला कां हटकलें नाहीं ?

त्याच्या आधारे तिबेटच्या कीलक राष्ट्रावर हिंदुस्थानास अेका शब्दानेही न विचारता जेव्हा चीनने आक्रमण केले, तेव्हा तिबेटात असलेल्या आपल्या वरील हितसंबधाचें संरक्षण करण्यासाठी हिंदुस्थानने चीनला लगेच हटकावयास हवें होते. पण आमचें भारतीय शासन तसें काही करू शकलें नाही. कारण ? आजच्या आमच्या भारतीय शासनाची सामरिक दुर्बलता !

त्यामुळे तिबेटचें कीलक राष्ट्र अलगाद गिळून टाकून आज चीन आणि रशिया यांचीं बलाढ्य सैन्यें आमच्या सीमेच्या अगदी काठावर सज्ज अवस्थेत अुभीं आहेत! आणि त्या बळावरच आज चीन अुघडपणे नेपाळ नि भूतान हा अुरलेल्या दोन्ही कीलक राष्ट्रांनाही गिळून टाकण्याचे डाव खेळत आहे. अितकेंच नव्हे तर गंगोत्री-पासून बद्रिकेदारापर्यंतच्या आमच्या जिव्हाळ्याच्या अंतर्गत प्रदेशावरही आपले अधिकार सांगू लागला आहे. कारण आमच्या त्या सीमांवर रेटारेटी करीत अुभ्या असलेल्या चीन रशियाच्या बलाढ्य सैन्याशी प्रबळ झुंज देण्यासारखी अद्ययावत् आयुधांनीं सज्ज अशी आमच्या सैन्याची दुर्धर फळी आम्ही त्या आमच्या सीमावर अजून अुभी करू शकलो नाही.

## तीं आक्रमक सैन्यें !

अिकडे अुत्तरेच्या या टोकाला हें शत्रुसैन्य नि तिकडे दुसऱ्या टोकाला पाकिस्तान अमेरिकेचीं आता खरोखरच आपल्याहून बलाढ्य झालेल्या परकीयाचीं आक्रमक सैन्यें ! पाकिस्तानलाही जन्मून आपल्यासारखीं पांचसहा वर्षेच झालीं.

परंतु पाकिस्तानने आपल्यासारखें भ्रातिनिष्ठ राजकारणाच्या मागे न लागता वस्तुनिष्ठ राजकारण हातीं घेतले आणि आपलें मुख्य लक्ष सामरिक शक्ति वाढवि-ण्याच्या प्राथमिक कर्तव्यावरच केंद्रित करून व परराष्ट्रीय कारस्थानाचे अनेक डाव-पेच खेळत खेळत पाक-अमेरिकन संधीमुळे तें आज आमच्या मानगुटीस बसण्या-अितके प्रबळ झाले आहे हे खचित. अुद्या त्यांचें या कारस्थानामुळे काय होअील हा प्रश्न त्यांच्या अुद्याच्या चलाखीवर अवलंबून आहे.

## पोर्तुगीजांपासून धोका !

आमच्या अुत्तरेकडे ही स्थिति आता दक्षिण हिंदुस्थानकडे पहा. पोर्तुगालचें राष्ट्र तें काय ? पण भारताशी गोवाप्रकरणी प्रसंगीं रणांगणातही टक्कर देण्याच्या अीर्षेपायी त्याने ह्याच पांच-सहा वर्षांत ब्रिटन अमेरिकन गटाशी सूत जमवून गोव्याच्या त्याच्या टीचभर राज्यातच अेक बलाढ्य युद्धतळ बनवून सोडला आहे. गोवें सोडून जाण्याची तर गोष्ट दूरच, पण पाकिस्तानने भारतावर आक्रमण कर-ताच पोर्तुगीज आमच्याविरुद्ध पाकिस्तानशी हातमिळवणी करतील व पाकिस्तानला

सर्व प्रकारच्या सवलती नि माहात्म्य देतील अितकेंच नव्हे तर बहुधा त्यांच्या सागरी सामर्थ्याच्या आधारावर महाराष्ट्रावर स्वारीही करतील. मराठ्यानी पोर्तुगीजांच्या हातून पूर्वी छिनावून घेतलेल्या वसअीप्रभृति मराठी प्रदेशाला पुन: जिंकायची अीर्षा पोर्तुगीजानी सोडलेली नाही. त्याचाही पुढे जाअून त्यांच्या अद्ययावतपणे बलिष्ठ असलेल्या युद्धनौकांचा लहानसा तांडा त्रावणकोरवर चढाअी करण्यासाठी जर त्यांनी धाडला तर तिकडचे विघडलेले पाद्रिस्तानवादी ख्रिश्चन लोकही आमच्याविरुद्ध बंड करून अुठतील आणि गोवा ते त्रावणकोरपर्यंतचा सारा सिंधुतट पोर्तुगीजांच्या हाती पडू शकेल.

कारण आमचें सामुद्रिक रणसामर्थ्य अजून अितकें पंगु आहे की, सिंधुसागरापासून ते हिंदुमहासागरापर्यंत नि हिंदुमहासागरापासून तो वर थेट गंगासागरापर्यंत भारताची सारी विस्तीर्ण सामुद्रिक सीमा आजही अगदी असुरक्षित नि अुघडी पडलेली आहे.

## ज्यू राष्ट्राचें अुदाहरण

ज्यू राष्ट्राचें अुदाहरण तर ह्या सर्व अुदाहरणांवर कळस चढविणारें आहे. हें ज्यू राष्ट्रही दोन सहस्र वर्षांच्या अस्तानंतर पाच सहा वर्षांपूर्वीच पुन: अस्तित्वात आलेलें ! त्याच्या भोवती त्याचे कट्टर शत्रु असलेल्या अरब राष्ट्रांचा सशस्त्र वेढा पडलेला ! पण त्या लहानशा राष्ट्राने प्रथमत: आपल्या साऱ्या स्त्री-पुरुषांना सैनिकी शिक्षण देअून, ब्रिटन-अमेरिकेकडून शस्त्रास्त्रें मिळवून त्यांच्या स्वत:च्या राष्ट्रात शस्त्रास्त्राचे कारखाने काढून परराष्ट्रीय संधि-विग्रहाचीं कारस्थानें खेळत आज स्वत:ची सामरिक शक्ति अितकी वाढविली आहे की, त्याच्या शत्रुस्थानी असलेल्या त्या साऱ्या अरब राष्ट्रांना त्यांच्यावर चालून जाण्याची धमक होत नाही, अितकेंच नव्हे तर तें ज्यूचें अिस्रायल राष्ट्रच येताजाता त्या अरब राष्ट्रावर छापे घालून हैराण करीत आहे !

## वस्तुनिष्ठ राजकारण असतें तर !

जर गेल्या पाच-सहा वर्षांत, वर दिलेल्या चीनप्रभृति राष्ट्रांनी दाखविलेल्या तडफेने आमच्या राष्ट्रानेही भ्रांतिनिष्ठ राजकारणाच्या मागे न लागता वस्तुनिष्ठ-राजकारणच अवलंबिलें असतें, प्रथमपासूनच आपलें सामरिक सामर्थ्य वाढविण्याचे आटोकाट प्रयत्न केले असते आणि त्या दिशेने परराष्ट्रीय संधिविग्रहाचीं कारस्थानें खेळविलीं असतीं तर भारतही तसाच बलाढ्य झाला असता. आम्हीही ब्रिटन, रशियासारखे स्वतंत्रपणे स्वत:च्या प्रयोगशाळेत अणुबाँब सुद्धा करू शकलो असतो-अद्ययावत् शस्त्रास्त्रानी सुसज्ज अशा प्रचंड भू-दलाच्या, सिंधुदलाच्या नि वैमानिक-दलाच्या संरक्षणाने अकुतोभय झालेला आपला आजचा सुदर्शन चक्रांकित राष्ट्रीय ध्वज आपल्या दुर्धर्ष तेजाने आज हिमालयावर फडकत राहिला असता !

## अजून चूक सुधारता येईल

पण ते आम्हांस साधले नाही. ती अक्षम्य चूक झाली ! पण ती होऊन गेली ! आता तिचा उल्लेखही जो वर केला आहे तो सुद्धा उखाळ्यापाखाळ्या काढण्याकरिता नाही. पण काय चुकी झाली ती कळल्यावाचून ती सहसा सुधारता येत नाही म्हणून काय तो तिचा उल्लेख वर करावा लागला. आता तरी ह्या पाक-अमेरिकन कराराने ओढवलेल्या अचानक संकटामुळे जर आपण ती झालेली अक्षम्य चुकी कडोनिकडीने सुधारून आपलें सामरिक सामर्थ्य वाढविण्याचे आंदोलन आणि कार्य प्रचंड उत्साहाने नि वेगाने हाती घेतलें तर शत्रूच्या वरील पाक-अमेरिकन कराराने आपला हा अेक महत्त्वाचा लाभच झाला असे मानता येईल !

—केसरी, दि. २६ जानेवारी १९५४

* * *

## (७)

# महाराष्ट्र हा हिंदुस्थानचा खड्गहस्त झाला पाहिजे

[स्वातंत्र्यवीर सावरकर हे त्यांना ब्रिटिश सरकारने दिलेल्या दोन जन्मठेपींच्या पन्नास वर्षांच्या कालखंडालाही पुरून अुरले या निमित्ताने स्वातंत्र्यवीरांचा मृत्युंजय दिन पुण्यास भव्य प्रमाणावर दि. २४ डिसेंबर १९६१ या दिवशी साजरा करण्यात आला. त्या समयी अुत्तरादाखल त्यांनी पुढील भाषण केलें.]

सभा संपत आली आहे. सभेमध्ये बसण्याची सुद्धा माझी शक्ति आता संपत आली आहे. मी अत्यंत क्षीण असताना, पुण्याला, अेकंदर महाराष्ट्राच्या आग्रहाने मला यावें लागलें; कारण—त्यांनी माझ्या सत्कारनिधि मंडळाच्या द्वारा होत्या त्या सर्वांनी—आम्ही पुण्याला येअू म्हटलं अैवढ्याकरिता. मी अेक कोणती तरी सभा येअीन असं म्हटलं; आणि मी तिथं आलो. पण आता मला अगदी बोलवत नाही. माझ्या पोटातून शब्द अुठतात. तुम्हीं त्याला व्याख्यान, व्याख्यान, म्हणत होतेत, आणि दोन-दोन तास मी इथे पुण्याच्या गल्ली-गल्लीतून व्याख्यानें दिलेलीं आहेत, तसे व्याख्यान आता माझ्याच्याने देववत नाही. तुम्ही येथे आलेत हेंही अेक व्याख्यानच आहे आपल्या कृतज्ञतेच; काहीं कृतज्ञता आपल्यास असावी मिनर्व आम्ही केलं आहे हें मी विनय सोडून मानतो. सत्यासाठी, विनयासाठी असत्य बोलू नये. अवश्य असेल तर अवश्य तें सत्य सांगावं, विनय बाजूला गेला तरी चालतो. त्याचप्रमाणे:

आमचे तात्या ( सेनापति बापट ) त्यांचं तरी आता काही नहलं होतं ? ह्या गोमंतकात हुल्लड निघाली की, पोर्तुगिझांच्या गोळ्या खायच्या, पण जायचं ! माझ्या दृष्टीनं तें साफ चूक होतं. पण ( बापट ) ते तिथे गेले. आपल्याला कुणी अंगचुकार म्हणू नये म्हणून. तेव्हा अशा निघड्या छातीची ज्यांची आजपर्यंत रीति आहे, अशा लोकांच्या संबंधानं ज्यांच्या मनात कृतज्ञताबुद्धि आहे, त्या समाजाला काही तरी भविष्य आहे असं मी समजतो. यापेक्षा अधिक काही बोलणार नाही.

## राष्ट्रापुढे आता मरगळ ठेवू नका

तथापि माझं मन पूर्वीच्या परंपरेनं असं बनलेलं आहे की, मला राहवत नाही काही गोष्टी सांगितल्यावाचून ! म्हणून मी आपल्याला, मला माझ्या राष्ट्राविषयी जी गोष्ट वाटते . . . ती नुसती गद्यात सांगणार आहे. त्यात अुपमा नाहीत, अलंकार नाहीत. बापट नेहमी म्हणतात तसं त्यात वक्तृत्व नाही. अगदी त्याच्या पेक्षाही रद्द शब्दात सांगणार आहे. आपल्या देशाला सध्या, माझे मित्र श्रीयुत श्री. म. ( अेस्. अेम्. जोशी ) जोशी यांनी सांगितल्याप्रमाणे जे दिवस आले आहेत ते काहीसे मरगळीचे आहेत ही गोष्ट अगदी खरी आहे. परंतु लोकांपुढे तुम्ही आता मरगळ ठेवू नका. दोन्ही बाजू ठेवा. कां मरगळ असावी या देशाला या दिवसात ? चंद्रगुप्ताच्या वेळी जितके तुम्ही स्वतंत्र--स्वतंत्र हं--समर्थ नव्हे, पण स्वतंत्र होतात; तेवढा भारताचा तीन चतुर्थांश भाग आज स्वतंत्र आहे. अेकाचं टोक दुसऱ्याला दिसत नाही अेवढा ! ही दक्षिण पहा ! भाअुसाहेबांनी अुदगीरची लढाअी मारल्यानंतर पानिपताचं पत्र येण्याच्या आधी 'प्रतिज्ञा केली – बोलून गेले विजयाच्या अवसानात की, पुढल्या वर्षी सारी दक्षिण मोकळी करुन टाकू म्हणजे निजाम जो थोडा थोडका वाचला आहे तो पार घालवून देतो. भाअुसाहेब गेले, पेशवाअी गेली, अिंग्रजाअी गेली, तरी निजाम जसाच्या तसा होता, पण तो पटेल . . . तो पोलादी पुरुष . . . . मी त्याचे शतशः गुण गातो. जर त्याच्या हाती राज्यसत्ता असती ना; तर पेशवाअी आज गेली नसती. पण नेभळट लोकांच्या हाती तुम्ही सत्ता दिलीत, मतं दिलींत आणि आता रडत बसता ? मरगळ आली म्हणता ? कोणी मतं दिली नेहरूला ? तुम्ही दिलींत ! ! हीच मतं जर पटेलाना मिळालीं असतीं ना; तर जसा त्यानी निजामाला दोन दिवसांत होता कीं नव्हतासा करुन टाकला आणि बोटातला काटा काढून टाकला; नेहरु त्याच्या विरुद्ध होते मी तुम्हांला आतला अितिहास सांगतो. पुस्तकं जाअून वाचा. आता प्रसिद्ध झालीं आहेत रात्री बारा वाजेपर्यंत नेहरुंनी त्याला अनुमोदन दिलं नव्हतं कार्यालयात. नाही नाही ! काहीतरी तडजोड काढा ! मुसलमान ना तो ? काही तरी तडजोड करावी. पण पटेलांनी स्पष्ट सांगितलं की, माझ्या पोटातच हा शूल आहे. सहन करु शकत नाही. हें माझं त्यागपत्र घ्या, तेव्हा रात्री बाराच्या सुमाराला सैन्याला आज्ञा सुटल्या आणि त्याप्रमाणे सैन्य

जाऊन निजामाला होता की, नव्हतासा करून टाकला. आता कुठे पडला आहे मला माहीत नाही. पण पडला आहे हं ! विसरू नका ! ! अेकदा पेशव्यांनी त्याला असाच होता का नव्हतासा करून टाकला होता. असाच मेल्यासारखा पडून राहिला होता. पण वेळ येताच मराठ्यांविरुद्ध जोर करून अुठला. आताही तो तिथे आहे. जर का अयूबखानाची स्वारी लहानशी किंवा मोठीशी तुमच्यावर झाली तर देशातून अुत्पन्न होणारे तुमचे जे शत्रु आहेत त्यांचा पुढारी निजाम होअील; आणि पुन्हा निजामशाही स्थापन करायला सोडणार नाही. ही आपल्या शत्रूंची वर्तनं आपण ध्यानात ठेवली पाहिजेत.

## सध्याच्या पिढीचा पराक्रम

पण आज या वेळेला सारी दक्षिण मोकळी झाली आहे. आणि ती तुमच्या पिढीनं केली. कसला पराक्रम केला आहे तुम्ही ! ! म्हणजे कोणीही समजा. अ ब क, हीं माणसं नव्हेत पण अेकंदर पिढीने सर्व पक्षांनी मिळून आपापल्या परीने जे प्रयत्न केले त्याचं संकलित संयुक्त असं जें फळ आलं तें म्हणजे आज सारी दक्षिण भाअूंच्या म्हणण्याप्रमाणं मोकळी झाली आहे. शनिवारवाड्याच्या पुढे जाअून भाअूसाहेबांना कळवा की, आज तुमचा हेतु आम्ही पूर्ण करून टाकला आहे.

तसाच तो जंजिरा. लहानसं शिद्द्यांचं बेट. हे शिद्दी म्हणजे कोण माहीत आहे तुम्हाला ! हे आफ्रिकेचे लोक. आफ्रिकेतून येतात. जाड ओठ, राठ केस अित्यादि. आपल्या पुराणांतून राक्षसांची जी वर्णनें आहेत तीं ज्यांना लागू होतात ते. मी त्याचा द्वेष करीत नाही तो ह्याकरता की, तेही त्याच रुप आहे. त्यात काय मोठंसं. परंतु त्यांना शिद्दी म्हणतात. पण अेक शिद्दी तेथून आला. कुठे आफ्रिका कुठे हिंदुस्थान ! पण त्यांच्यापैकी अेकानं येअून राज्य स्थापिलं. अेक दहा गावापुरतं अेका तालुक्या अितकं फार तर ! पण त्या राजानी स्वतःपुरतं, लढता लढता तो पोर्तुगीजांना हार गेला नाही, शिवाजीला हार गेला नाही. महाराज त्याच्या भोवती भोवती असत. पण अिंग्रज मध्ये असे. तेव्हा जंजिरा काही महाराजांना बुडविता आला नाही. जंजिरा म्हणजे सिंधुदुर्ग. सिंधूमध्ये बांधलेला जो दुर्ग त्याला जंजिरा म्हणतात महाराजांनी तें नांव बदलल पुढे त्यांनी आपल्या दुर्गांना कधीं जंजिरा म्हटल नाही. सिंधुदुर्ग अमुक दुर्ग असीं असीं नावं दिलीं. तेव्हा. . तो . . . हा जंजिऱ्याचा शिद्दी तो शिवाजीला हार गेला नाही. संभाजीला हार गेला नाही. पेशवाओ आली आणि गेली. चिमाजी अप्पांनी किती प्रयत्न केला. सगळा अितिहास जे जाणते आहेत त्यांनी. डोळ्यापुढे आणावा. दुसरा बाजीराव तेवटी शरण गेला. पण शिद्दी आपल्या आहेच अिंग्रज गेले ! जंजिरा तसाच ! ! पण जेव्हा तुमची ही पिढी आली तेव्हा, अिंग्रजाला, तुम्ही ज्या सिंधूतून तो दर आला त्याच मुखाच्या सिंधूत तुम्ही गाडल्यात त्याला ह्या डोळ्यांनी ते दृश्य पाहिलं की जिंकून अिंग्रज लोक हिंदुस्थानावर चढले..

त्याचे सोल्जर आम्हाला पाठी दाखवीत त्याच मिधूतुन जहाजात बसून निघून गेले. हा काही अल्प स्वल्प पराक्रम झाला नाही तुमचा !

## निर्वंश होअून ठरेल अखंड वंश

तेव्हा जंजिरा गेला, अिंग्रज गेला, निजाम गेला, अुत्तर हिंदुस्थानात मुस्लिम भोपाळ गेला, रामदुर्ग गेला, ज्या दोन सत्तानी तुमच्यावर आठशे बाराशे वर्ष पारतंत्र्य लादलं ते मुसलमान आणि ते अिंग्रज तुम्ही अुपटून टाकले आहेत, ह्या सध्याच्या दिवसात. हा का धन्य दिवस नाही ! विचार करा, ती धन्यता आज तुम्ही भोगता आहात, मी जगतो आहे, तो काहीसा या धन्यतेनं जगतो आहे. आणि नसतं हे झालं तरी मला त्याचं दुःख नव्हतं. आणखी अेक पिढी येती. येती नाहीतर न येती, माझं वर्तव्य मी करून जाणार होतो. परंतु आज मला तो दिवस बघायला मिळतो आहे. म्हणून माझ्या वतीनं जेव्हा माझे लोक प्रेमानं माझा, आदर करावा म्हणून, अर्ज करतात, आवेदनं करतात की, त्यांची जहागीर मुक्त करा, त्याचं घर त्याना परत देववा, त्यांना भारतरत्न ही अुपाधी द्या. तेव्हा वाटतं; आता मला या अुपाधींचं काय हो कौतुक आहे ? काय अर्थ आहे भारतरत्न हे शब्द माझ्या छातीवर बसून ? माझ्यापाशी पन्नास पदव्या लटकल्या आहेत. नागपूरचा अेल. अेल्. डी. आहे, मुंबअीचा पुन्हा बी. अे. झालो परीक्षा न देवानी. पुण्याचा डॉक्टर आहेच मी ! ! पण याचा मला काही अुपयोग आहे काय ? काही नाही ! ! मी अगदी समाधानात आहे. मला कुणी विचारलं म्हणजे मी सागतो, मला जहागीर नको. अेवढा तीन चतुर्थांश हिंदुस्थान मला परत मिळाला माझा. त्यात काय माझी जहागीर आली नाही ? जो विचारा ती खात असेल, सुखानं खावो ! माझे आशीर्वाद आहेत त्याला. त्याचा वंश तिथे फुलला म्हणजे माझा वंश फुलल्यासारखाच आहे. अेका काळी वंशच नव्हता मला ' निर्वंश होअून ठरेल अखंड वंश ' अशा ध्येयाची आम्ही माणसं. आता मला काय किंवा तात्याना काय पोरंबाळ झाली. आली त्या स्थितीत, झाली म्हणून झाली, नाहीतर काही नवस केले नव्हते कुणाला.

## अध्यक्ष झालो तर दोन वर्षात देश समर्थ करीन.<br>या गोष्टी सैन्याच्या असतात, सामर्थ्याच्या असतात !

तेव्हा अशा रीतीने मी संपूर्ण समाधानात आहे . . . अध्यक्ष वगैरे व्हायचं सुद्धा माझ्या मनात कोणत्याही प्रकारच नाही. याचं कारण विचाराल तर सागतो. तुम्हाला वाटेल सोप आहे, ह्याना कुणी निवडून देत नाहीत म्हणून हे अध्यक्ष होत नाहीत. नाही वर ! निवडून दिलंत तर मी होअीन सुद्धा. तुमचं जर मत असेल तर मी अध्यक्ष होअीन आणि दोन वर्षांच्या आत मी हा देश युद्धोत्कच्या रशियापेक्षा . . . बलाढ्य करून दाखवीन . . . दोन वर्षांच्या आत –

हो हो दोन वर्षांच्या आत—त्यानं जसा जगाला जोडा दाखवला तसा मी माझा बूट अुचलून सबंध जगाला दाखवीन ! ! अरे, ह्या गोष्टी शक्तीच्या असतात, सैन्याच्या असतात. नेहरूंच्या मागे शक्ति नाही. नाहीतर तो फार चांगला मनुष्य आहे. गोरा गोमटा, चांगल्या स्वभावचा पण त्याच्या मागे शक्ति नाही. आणि हं तो जाणतो. म्हणून ज्याच्या त्याच्या पुढे ' अं ' म्हटलं की शेपूट घालून मागे फिरतो ही वस्तुस्थिति आहे !

## आमच्या पवित्र शपथा ! शत्रूचें निखंदन करीत मरावें हीच आमची आकांक्षा

परंतु जरी तुम्ही मला निवडून दिलं नाही ना ! तरी मी काही मागितलं नाही तुमच्यापाशी. अुभासुद्धा कधी राहिलो नाही. याचं कारण फार निराळं आहे. ते आज मी तुम्हांला सांगतो. बोलणार नव्हतो. पण आली आहे शक्ति कुठून तरी. हे माझ्या जन्मभर जोडीचे मित्र जे बसले आहेत—आता फार थोडी माणसं राहिलीं आहेत अशीं. ते सांगतील तुम्हाला ही गोष्ट खरी आहे की नाही तें ! ते जेव्हा क्रांतिकारक होते आणि आम्ही जेव्हा अगदी पोरकट म्हणून खलबतें करीत होतो—जीं आमची आम्हांलाही पोरकट वाटत असत. टिळकांनाही तीं हास्यास्पद वाटत. आणि तरीही आमच्या योजना अितक्या बरोबर आखलेल्या होत्या की, टिळकांना कोणी तें समग्र सांगणारा भेटला असता तर त्यांनाही ते पटलं असतं. अहो ! पहिल्यानी ते होते आमच्या पंथात, नंतर ते होमरूलपर्यंत मागे गेले. पण त्यानी तिथपर्यंत आणलं म्हणून आम्ही पुढे सरकलो. त्याच्या खांद्यावर आम्ही अुभे राहिलो, म्हणून—आम्हाला तिथपर्यंत आणलं—म्हणून आम्हाला त्याच्यापलीकडे दिसू लागलं हेही खरच. पण त्यानी अेकदा बापटांना तो प्रश्न विचारला होता की, ' अरे ! तू अेक पिस्तूल घेअून आलास; पण असें अेक अेक पिस्तूल आणून तुम्ही अिंग्रजांबरोबर कसे लढणार ? ' पण आमची कल्पना काय असे की, देशाला पुढे जय यावा, देशाचा झेंडा घेअून जाणारी जी यशस्वी सेना तिने पुढे यावें म्हणून पहिलीं काटे कुटे—मार्गातून साफ करायला, पूल बांधायला ' पायोनिअर्स ' ज्याला म्हणतात आणि ' सॅपर्स अॅन्ड मायनर्स ' ज्याना म्हणतात अशी अेक पिढी पहिल्याने अुत्पन्न व्हावी लागते. ती पिढी मरण्याकरिताच अुत्पन्न व्हावी लागते. ते देशभक्त, खरे देशभक्त ! म्हणजे मागचे खोटे असं माझं म्हणणं नाही. पण प्रकारानं तुलना जर करावयाची झाली, तर त्याची देशभक्ति निर्मळ देशभक्ति त्याची अिच्छाच ही असते. अुतावीळ झालेले असतात ते माझे स्वतःचे अनुभव सांगतो मी. ही पोरं अशीं अुतावीळ होत कीं, मला कां नाही सांगितलं हे काम करायला ? मला काम द्या ! मला मरायचं आहे ! हा ! . . . अनंता कान्हेरे पहा. अितका सुंदर पोरगा की, शाळेच्या नाटकात नटीचं काम करायचा ! अितका छानछोक पोरगा. पण कोण त्याला मरणाची, हौतात्म्याची हौस

आली. अशी अशी मंडळी होती. त्यांची शपथ ही असे की, सर्वांच्या आधी मी मरेन-ही प्रतिज्ञा असे. खरा आनंद जीवनात, लढाओ चाललेली असताना सगळ्यांच्या आधी, मागची मनस्वी सेना यावी म्हणून शत्रूचं निर्दलन करीत मरावं ही आकांक्षा असे. त्यांत जें सुख आहे तें सुख भोगण्याची पात्रता ही जगातील सर्वोत्कृष्ट पात्रता ! सर्वोत्कृष्ट सुख तें आहे. मग योगायोगाने कुणी मरतील कुणी जगतील. काय होओील तें होओील, पण आकांक्षा ही असे.

## याला म्हणतात अेकी—अेकजूट.

अशी स्थिति असल्यावाचून आम्ही तें जगाला शिकविलं — धिंग्रा काय, वासुदेव बळवंत गोगटे काय — यांना तें शिकविलं. आज गोगटे महापौर आहेत. पण त्या वेळी अेक चुकार पोरगा — चुकार म्हणजे अगदी चुकार नव्हे ! माझ्याकडे येत असत. अेकदा रत्नागिरीला ते आले असता माझं बोलणं झालं होतं त्यांच्याशी ह्या संबंधात. तेव्हा मीच त्याला महाविद्यालयात परत पाठविलं आणि सांगितलं की, सध्या तू यात पडू नकोस. असा जेव्हा समय येओील की, तुझ्या योग्यतेचा मनुष्य आणि तुला निःस्पृह रीतीने मारेल तो शिकार कर. त्याप्रमाणे सोलापूरचे लोक फाशी गेले म्हणून हा सुंदर — तरणाबांड मुलगा महाविद्यालयात शिकत असतांना — घरी काही कमी नसताना त्यानं रिव्हॉल्व्हर काढलं आणि झाडलं. का ? सोलापूरच्या लोकांच्या वधाचा सूड घ्यायचा म्हणून. याला म्हणतात अेकी ! याला म्हणतात देशभक्ति ! याला म्हणतात अेकजूट !

## राज्यक्रांतिकारकांचा त्याग

अशा दृष्टीने जी राज्यक्रांति आम्ही चालविली ज्या संस्था आम्ही चालविल्या त्यांत आम्ही शपथ घेतली होती. आता दुर्दैवाने किंवा सुदैवाने म्हणा ते मारले गेले. माझ्या अेका कवितेत मी म्हटलं आहे अंदमानात गेलो तेव्हा की, ' मित्रांनो आता माझा हा शेवटचा नमस्कार, जातो आता. कुठेही जरी माझीं हाडकं पडलीं तरी सारखंच माझी म्हणजे माझ्यामारख्याची. अंदमानात मी अेकटाच गेलो म्हणून समजू नका. अंदमानात मी गेलो तेव्हा मला वाटे की, हें काम कसं होओील ? अरे ! मी अेकटा गेलो तर माझ्यावर अेवढा दुःखाचा डोंगर वाटे मला. आणि देश कोण हादरून गेला आहे. पण . . . अशीं जहाजच्या जहाज भरून आलीं पाहिजेत अंदमानात. सैबेरियाला रशियाची नाही गेली ? तर ही राज्यक्रांति होओील. पण देवांनी म्हणा — कुणी म्हणा ती शक्ति आमच्या राष्ट्रात आली. आणि जहाजच्या जहाज भरून अंदमानात आलीं. माझ्या डोळ्यांनं मी पाहिलीं. हे गदर पार्टीचे लोक ! सबंध जहाज भरून आलेलं होतं. मी तेव्हा तिथे थापा निर्मीत होतो. माझी अेक कविता आहे तशी. नेहमी मला वाटे

हें घाण्यातलं तेल माझ्या रक्ताचं, माझ्या घामाचं—देशबांधवांच्या कामी येत आहे का ? हे तर, हे लोक अियंच खाअून टाकताहेत त्याचा लिलाव करून ! ! पुन्हा वुद्धीनं सावरावं आणि सांगावं नाही ! त्या तेलाचा प्रत्येक बिंदु तुझ्या देशात जी आग पेटविली आहे तिच्यात सूक्ष्मरूपानें जाअून पडत आहे. पण ती अेक कवि कल्पना होती. पण गदर पार्टीचे लोक तिथे आले; त्यांनी गाणी म्हणून दाखविलीं की, ' तुमचं चित्र कोलू पिसत असताना जें होतें—तें आम्ही कल्पनेनं छापलं आणि त्याच्या लाखो प्रती वाटल्या आणि हे पहा त्याच्यावर रचलेलं गाणं की; असा आमचा अेक अमुक वीर—तमुक वीर स्तुति करून तिथं घाणा पिसतो आहे. आणि लोक हो ! ! तुम्ही अिथे शेती काय करता आहात ? सहस्रावधि रुपये काय मिळविता आहात ? रात्री मद्य काय पिता आहात ? फेकून द्या तें सगळं ! ! आणि चलो भाओी देशको आजाद करनेको ! ! असा हुंकार देत आणि या महायुद्धाची संधि साधून तुमच्याच म्हणण्याप्रमाणे आम्ही देशात घुसलो. पकडले गेलो; आणि हे ऽऽ अंदमानात आलो तेव्हा अंदमानात मी अेकटाच गेलो असं आपण समजू नका. असे शेकडो देशभक्त गेलेले आहेत. त्याच्यापैकी कित्येक जण फाशी गेले, अनेकानी अंदमानात आत्महत्या केल्या. आमच्या डोळ्यासमोर ज्याचा हात धरून गोड बोलून—निरोप द्यावा—खोलीत घाटावा—सकाळी त्याचं प्रेत लटकलं म्हणून बातमी येओी. त्यांच्यापेकी अेकानं आपल्या जानव्यासाठी आत्महत्या केली. खरा ब्राह्मण तोच ! त्याच जानव हे काढीत. तिथे गेल्यावर आम्हा सर्वानाच जानवीं काढायला लागत. आता माझं जानवं तर नेहमी निधालच होतं. तेव्हा मला त्याच काही वाटल नाही, पण तो कट्टर ब्राह्मण—बीजाचा ब्राह्मण. त्यान नाही काढू दिलं आपलं जानवं. म्हणून त्यानी त्याला छळायला प्रारंभ केला. कठीण काम दिलं. त्याने काम नाकारलं, त्याला खोलीबंद केला. ठीक आहे. तो खोलीत राहू लागला. पण त्याने आपली गायत्री आपलं जानवं काही काढू दिलं नाही त्याना ! अगदी औरंगजेबाच्या दिवसात जसं आमच्या पूर्वजांनी हौतात्म्य केलं धर्माकरिता आणि धर्म राखला, तसं हयान केल शेवटी त्याला फटके मारायला काढला. ज्या दिवशी त्याला फटके मारायला काढला, त्या रात्री त्यान फास लावून घेतला आणि मरणी मेला ! !

## बरोबरीच्या मंडळींशी विश्वासघात होओील ही भीति

अशा अशा वीरानी देह सोडून दिले आहेत. त्यातून आम्ही वाचलो. वाचलो ते काही भिअून वाचलो नाही, माहीतच आहे तुम्हाला. पन्नासदा सांगितल आहे. खरोखर आम्ही फाशीच्या खांबाला जाअून गदगदा हलविलं. पण नाही मेलो. योगायोग ! ! लढाओीत होतात असे ! शिवाजीने शमर लढाया मारल्या आणि गुडघीच्या रोगान मेला. तेव्हा हे योगायोग होतात असे. तसं आम्ही अिथे आलो

पण शपथ ती होती, की आम्ही दिवस चांगला पहायाला काही जन्माला आलेलो नाही ! हिंदुस्थानचं स्वातंत्र्य पाहयला जन्मलो नाही. त्या स्वातंत्र्यासाठी, लढत-लढत मरायला जन्मलो आहोत. त्याप्रमाणे आमचे लोक रोज दहा-पांच बंगाली, पंजाबी वगैरे जात होते. आम्ही तिथे लिहिलेलीं पुस्तकं ह्या त्यांच्या गीता असत असे लोक मरून गेले. आता मी त्यांच्यापैकी राहिलो; तो काय याच्या गव्हर्नरी-करिता ? अध्यक्षपदाकरिता ? की, जीं आम्हीच त्यांना मिळवून दिलीं आहेत त्यासाठी आस धरावी ? मी तुम्हाला लाखो लोकांना विचारतो की—कोण असा पराक्रमी आहे,–ज्याने राज्यक्रांतीच्या रणापेक्षा अधिक जास्त पराक्रम केला आहे ? त्यानं पुढं याव ! अेक जण योग्य नाही पुढ यायला. पण आम्ही जीं राज्यं यांना दिलीं ती त्यांनी सुखाने भोगावीत. त्याच्याकरिताच तीं आम्ही मिळविलीं आहेत. शहाणे नसतील त्यांना काढून टाका. पण तुम्हीच कोणीतरी राजे व्हा ! असं न म्हणतां आम्ही पुन्हा राज्य करण्याकरिता—अध्यक्ष होण्या-करिता—भारत भूपण होण्याकरिता म्हणून जर लालसा धरली; तर आमच्या शपथा आम्ही मोडल्या, आमच्या बरोबरच्या मंडळींशी आम्ही विश्वासघात केला, त्यांना मृत्यूमध्ये ढकलून देऊन आम्ही राज्योपभोग भोगायला राहिलो असं होजील, ही भीति माझ्या हृदयात आहे.

बिचारे राजेंद्र प्रसाद ! देव त्याना चिरंतन आयुष्य देवो ! ते जितके सुखी असतील किंवा नसतील आपल्या अध्यक्षपदाच्या मानाने; तेवढाच मी माझ्या घरी कोणत्याही प्रकारचा सन्मान नसताना सुखी आहे. आणि ह्या सुखाला जर तुलनाच असेल, तर ती माझ्यापाशीही आहे, बापटांपाशीही ती तुलना आहे. या सगळ्या-क्रांतिकारकापाशीही ती तुलना आहे.

मग त्यात मी प्रजापक्ष घेतो, कम्युनिस्ट घेतो, सर्वांना घेतो ! त्या सगळ्यां-पाशी ती तुलना आहे. मग त्यांची अितर मतं काहीही असोत ! आम्ही सगळे जण अगदी सतुष्ट रीतीनं कालक्रमणा करीत आहोत. आता केव्हा मृत्यु येईल हें सांगता येत नाही. पण आता त्यानं लौकर यावं ही अिच्छा आहे. पन्नासदा बोलावलं त्याला ! पण त्याला यायलाच होत नाही. गद्यात बोलावलं, पद्यांत बोलावलं, शिव्या देऊन बोलावल, आळवून बोलावलं. आता वृद्धपकाळचे हे हाल नको आहेत! जायचं तर चट्कन् जाव.

## आम्ही अगदी प्रसन्न आहोत

पण मघा मी म्हटलं तें की, त्यांच्या अध्यक्षपणाचा, त्याच्या स्वातंत्र्याचा, जेवढा अुपभोग त्याना घेता येईल तेवढाच अुपभोग अुलट तुम्ही जे लाखो लोक न बोलवता येता.—मी अलीकडे वैतागतो, तुसडेपणा करतो, त्रास करतो,तुसडेपणाने म्हणजे वरवर हो ! पण कुणाशी बोलत नाही तरीही आठ-आठशे माणसं 'दर्शन झालंच

'पाहिजे ' 'दर्शन झालंच पाहिजे ' (अगदी 'झालाच पाहिजे ' च्या तालावर ) अशी सारख ताम निदर्शनं करतात माझ्या घरासमोर.—हे काय विजयाचं चिन्ह नाही ? हा काय राजमुकुट नाही ? याच्यापेक्षा अधिक काय मिळायचं आहे मनुष्याला ? त्यांच्या मोत्यांच्या माळा त्यांना लखलाऽऽभ असोत ! आमच्या ह्या फुला-पानांच्या माळा—हारांच्या माळा आम्हाला लखलाऽऽभ असोत ! ! त्यात आम्ही अगदी प्रसन्न आहोत. मितकं आपल्याला सांगतो.

## शासन सामर्थ्यवान झालें पाहिजे !

### तरुणांचें कर्तव्य

हे जाता जाता अेकच सांगतो की, तुम्ही पुढे काय कराल ? हें सांगितल्याचून केव्हाही मला व्याख्यान संपवताच आलेलं नाही. पुढे काय कराल ? झालं ! स्वातंत्र्य आलं ! अगदी भाग्याचा कळस झाला ! ! पण केव्हा हातातून जाअील याचा नियम नाही हं ! तुम्ही जर अशीच ' मतं ' देत राहिलात भोंगळवृत्तीपणानं आणि असेच नेभळट राज्यकर्ते राज्यावर आले तर—Once Rajaji said : I suppose that the duty of the Government is first and foremost to Govern. (अेकदा राजाजी म्हणाले होते वाटते, 'शासनाचें पहिलें कर्तव्य जर कोणतें असेल तर तें चांगलें राज्य करणें हें होय )

त्याप्रमाणे सत्ता हाती घेणारं जर कुणाचं राज्य असेल मग तें हिटलरची का असेना...ते मी आनंदाने पत्करीन ! I will prefer that to the democracy that is cowardly, yielding to any aggressor. I would prefer Hitler ! (प्रत्येक आक्रमकापुढे शरणागति पत्करणाऱ्या लोकशाहीपेक्षा शक्तिशाली नि सामर्थ्यवान् हिटलरची एकशाही मी पत्करीन—मी सर्वश्रेष्ठ मानतो.) कसानेही का होईना देश समर्थ होईल आणि रणांगणात अुभा राहील. मग त्या हिटलरला मारायला तीच देश त्याच शक्तीनं पुढे जातो हे इतिहासात प्रत्येक ठिकाणी दिसला असाल. नेपोलियनचं काय झालं ? तेव्हा शेवटच हे सांगण आहे की, हे आलेलं स्वातंत्र्य राखणं हें काम तुम्हा तरुण लोकांच आहे मला फार आनंद होतो की आताशा सभांना तरुण मंडळी आणि तरुण स्त्रिया पुष्कळ मोठ्या प्रमाणावर येतात माझ्या घरी देखील मी हेच पाहतो. अुत्सवाला वाढदिवसाला येतात, तेव्हा भयाट दाटी होते त्या लोकांची ! पण आज तुम्हाला अुघड कुणी सांगत नाही. ही चुकी आहे. माझ्या मित्रांना श्री. म. जोशी यांना हेंच सांगायचं आहे की, मराठ मिरगळ काही नाही. स्पष्ट बोला आणि स्पष्ट सांगा. ह्याच समाजातून तरुण आणि तरुणी असे अुत्पन्न होतील की जे राज्यक्रांतिकारकांपेक्षाही अधिक पराक्रम करतील याची मला मुळीच शंका नाही. गोव्याच्या वेळेला काय झालं ? कुदून निघाली तीं

माणसं ! ह्याच महाराष्ट्रांतून नि हीं गुढा किती येरेपणानं ? गोळ्या सायच्या! ...शत्रूला मारायच्या नाहीत ! अहो ! गोळ्या सायला जर देशात एवढी माणसं निपतात; तर मारायला कां निपणार नाहीत ! अवश्यमेऽव निपतील.

## अद्ययावत् व्हा—सामर्थ्यवान् व्हा !!

हीं माणसं त्यांना सैन्य म्हणतात. तें सैन्य अद्ययावतही पाहिजे. आता आपल्याला सगळं अगदी अद्ययावत् पाहिजे. आताच मला 'शिवा' दामल्यांनी सांगितलं, की ते एक घर बांधीत आहेत असं. शिवा दामल्यासंबंधानं मला फार आदर आहे. आज सैनिकीकरणाची काही खटपट त्यांनी चालविली आहे. तेव्हा त्यांनी विचारलं ! की, हें घर बुरुज बांधलेला आहे त्यावर चित्र कोणतं काढू ? आपली, जुनीं शस्त्रास्त्रं, ही बंदूक–तोफ–धनुष्यबाण–गोफण हीं काढू की आणखी काही ? मी सांगितलं छट् छट् छट्. ते काही नाही. भीमाची गदा गेली. आता आपल्याला अगदी अद्ययावत् up-to-date अशीं जीं शस्त्रास्त्रं तीं पाहिजेत. हैड्रोजन बॉम्ब काढा, ऑक्सिजन बॉम्ब काढा. जो त्याना सापडला नाही असा आणखी अेक शोधून काढा, पण अद्ययावत् रहा. तरुणांपुढे तो आदर्श ठेवा म्हणून तुम्ही सगळेजण म्हणजे अगदी सगळे नाही गेलात तरी चालेल. अेखादा लंगडा-लुळा-पांगळा राहिला तरी चालेल. पण......पुरुष म्हणून जे म्हणवीत असाल ते तमाशाबरोबर जायचं नाही—नाटक करायचं नाही हें सर्व चांगलं आहे हं ! भलता अर्थ घेऊ नका. तेव्हा......चित्रकला नाही —महाविद्यालयाची परीक्षा नाही—लेखलिखाही नाही. तर तुमचं सगळ्यांत महत्त्वाचं कर्तव्य हें आहे की; जें युरोपमध्ये प्रत्येक तरुणाकडून बळानं करून घेतलं जात आहे ते म्हणजे, सैन्यात शिरणं. सैनिकीकरण. सैनिक शिक्षा घेणं हें होय. तुम्ही महाविद्यालयात जितके असाल तितके येन. सी सी. मध्ये जा, सुदैवानं अेक अजून आहे की, नेहरूंची वक्रदृष्टि म्हणा किंवा भीतिदृष्टि अजून तिकडे वळलेली नाही. नेहरू भितात. त्याना कां कळत नाहीं की सैन्यावाचून राष्ट्र रहात नाही ? पण त्याना भय वाटते की आजूबाजूला सर्व सैनिकी राष्ट्रें आहेत. मी बरोबर जाणतो. सागाव त्यानी हे सोडं म्हणून. तो मोवृट्[1] अहो ! तो कागोचा. पण त्याच्या हाती तरवार होती तो तीनशे कीं चारशे माणसें घेऊन, कागोला हाताखाली घालून 'यूनो'ला डरकावीत बसला आहे. कारण माणसं सैनिक होती तीं. नेहरूला ती भीति आहे की, सेनेचं तत्त्व, सेनेचं तेज एकदा का लोकांत संचरल की, (The atmosphere of war, the atmosphere of soldiery.)—हे एकदा का लोकांत संचरल की न जाणो ! अेखादे वेळी माझ्याही बंगल्यावर–माझ्या म्हणजे त्याच्या स्वतःच्या नव्हे विचाऱ्याच्या–पण राज्यकर्त्यांच्या बंगल्यावरही अुलटेल आणि ही जी झुटमूट लोकशाही चालली आहे, तिला आग लागून जाईल कारण आजूबाजूला तिथून तिथून साऽऽरे

वायूवसान भरलेले आहेत. हा तुर्कस्थान काय, हा गॉल काय, हा लोकशाहीचा का गॉल आहे ? हा तर वळानं अलिला आहे. तेव्हा असे कोणी जरी तुम्ही घेतलेत तरी, तुम्हाला सैन्य नसेल तर तुमची लोकशाही सुद्धा—ती मग अत्युत्कृष्ट घटनेची असताना सुद्धा—तुम्हाला पचायची नाही. लोकशाहीच्या मागेसुद्धा शक्ति पाहिजे. शक्ति नाही ते राज्य नाही.

म्हणून तुम्ही सर्व जण जे महाविद्यालयात जात असाल त्यांनी अेन्. सी. सी. मध्ये जावं. चव्हाणांनी हेंच वाक्य आता अुच्चारलं आहे. निदान काही दिवस तरी तें खरं ठरेल. नेहरूंनी तिकडून अुलटं कळविलं तर मात्र अुलटं होअील हे ! पण नेहरू जोपर्यंत अुलटं बोलत नाहीत तोंपर्यंत चव्हाण ते करतील हा माझा विश्वास आहे. कारण काही झालं तरी तो ' मर्द मराठा ' आहे. माझ्या अंतःकरणानं मला माहीत आहे. दुसरा पुरावा घायलाच नको आहे. तेव्हा जे महाविद्यालयांत असतील त्यांनी अेन्. सी. सी. मध्ये जावं, शाळेत असतील त्यांनी अे. सी. सी. मध्ये जावं. जितकं सैनिकी शिक्षण मिळेल तितकं घ्या. मी अशी पुष्कळ रडकीं मुलं पाहिली आहेत की, ती म्हणतात ! ' अहो तिथे काऽऽही सुद्धा शिकवीत नाहीत. ' पण मी म्हणतो तिथे जें शिकवतात ते तरी तुला येत का ? बंदुकीला कधी शिवला होतास का तू ? पण ते, बदूक अुघडून दाखवितात. धरावी कशी—सोडावी कशी हें शिकवतात. रायफल्स शिकवितात, मुलींच्या अेन. सी. सी. निघाल्या आहेत. त्यांत मुलींनी जावं. भोसला स्कूल आहे. प्रिपेरेटरी स्कुलें निघालीं आहेत. जीं निघालीं आहेत त्याचा असा फायदा घ्या ! तुम्ही महाराष्ट्रीय आहात. हें मी विशेषतः महाराष्ट्रीय समाजाला सांगतो आहे. तुम्ही सैन्यात शिरा तुमची संख्या देशाच्या मानानं कमी आहे. आणि मला सैन्य भारतीयच व्हायला पाहिजे. कारण माझं राष्ट्र, माझा प्रदेश, माझा गाव, माझा प्रांत हा हिंदुस्थानच आहे, महाराष्ट्र नव्हे किंवा भगूर नव्हे.

## महाराष्ट्र हा हिंदुस्थानचा खड्गहस्त झाला पाहिजे.

पण भारतात जो गुण नाही तो महाराष्ट्राने त्याला पुरविला पाहिजे. आणि तो तुमच्यात आहे तुम्ही राज्य केलेले लोक आहात. दोन पिढ्या अुलटल्या नाहीत. हे अिग्रजाचं राज्य अुलथून टाकलं. गेलं अिंग्रजांचं राज्य, डोळ्यासमोर—बोलता बोलता ते लोक तुम्ही आहात म्हणून सैन्यात मराठे जरी महाराष्ट्रीयांचं बहुमत लागू नाही तरी अेकेक महाराष्ट्रीय म्हणजे दामर दमर बंगाली आणि अितर लोक यांना तेज पुंज करून नेअील, आपल्या स्वतःच्या जोराने अशी वस्तुस्थिति आहे. पण तुम्हीच जर अिथे आम्ही मरगळलो आहोत—आम्हाला मार्गदर्शन नाही असं म्हणत पडाल तर ही मरगळ घालविणार कोण ? तुम्हीच अुठा ! तुम्हाला मार्ग हाच आहे अेकदा ! मागे अेकदा मी माझ्या अिथून हात खडेन घातला होता कोण-

दप्तांच्या हाती मी ' महाराष्ट्र हा भारताचा खड्गहस्त झाला पाहिजे. महाराष्ट्र हा भारताचा खड्गहस्त होता.........शिवाजी महाराजांच्या वेळी. म्हणून म्हणूनच मुसलमानांच्या हातून तुम्ही मुक्त झाला. नाहीतर कधी होते ना ! महाराष्ट्र पुढे झाला; रजपूत थकले, शिखांनी नाद सोडून दिला. आणि ज्याचं त्याचं आक्रमण करतं असे अगदी आपल्यापुरतं. आज संरक्षक फौज म्हणतात. खोटी गोष्ट आहे. सैन्य हे नेहमी आक्रमक असावं लागतं. संरक्षक सैन्य ही गोष्टच मुळी अस्तित्वात नाही. सैन्य जर आक्रमक असेल तरच राष्ट्राचे संरक्षण करू शकेल. ( Every Army must be aggressive, then alone it can defend the Country.)

माझी काही वाक्यं तुम्हाला चमत्कारिक वाटतील पण विचार केला म्हणजे बरोबर वाटतील. तुम्ही संरक्षक नाही, आक्रमक असला पाहिजे. आपलं सैन्य दुसऱ्याला अशी भीति वाटली पाहिजे की, जर का हिंदुस्थानला दुखविलं, तर त्याचं सैन्य आपल्यावर आक्रमण करू शकेल. आम्ही गेलो की हे संरक्षण करतील म्हणे ! तो आला की चीन तुमची संरक्षणशक्ति पहायला. तुम्ही का गेला नाही तिकडे ? तर म्हणे ती निर्मनुष्य भूमि होती ( It was no man's land ! ) तुम्हांलाही माहित होतं की ती निर्मनुष्य भूमि होती. नेहरूंना सर्व गोष्टी माहीत होत्या. काश्मीरचे पंतप्रधान बक्षी गुलाम महमद यांनी उघडपणे सांगितलें की आपण स्वतः नेहरूंना चिनी सीमेसंबंधातील सर्व हालचाली व घटना कळवल्या होत्या. ( It was no man's land. Nehru knew all these things. Bakshi told openly that he had informed Nehru of evry detail that was happening on the Chinese Frontiers. ) नेहरूला हें माहीत होतं. त्यानं लपवून ठेवलं आपल्याला दोष येईल म्हणून आणि चीनला कानात फूस दिली की — ( 'It is no man's land. if you want to occupy, occupy. We do not want to increase our frontiers ! )

' ती निर्मनुष्य भूमि आहे. तुला जर वाटलें तर ती घे. आम्हांला काही आमच्या सीमा वाढवायच्या नाहीत. ' मी म्हणतो, अशा नेभळटानी तुमचीं राज्य घालविलीं आहेत.

मी पत्रकच काढल होतं हिंदुस्थान स्वतंत्र झाला तेव्हा मी जर अध्यक्ष झाली असतो मला व्हायचं नाही पण—झालो असतो तर ! पहिल्या दिवशी दोन मानचित्र माझ्या डोळ्यापुढे ठेवली असती. अेक म्हणजे हिंदुस्थानच्या सीमा कोणत्या आहेत त्या निश्चित करून—याही माझ्या—माझ्या व्याख्येप्रमाणे ! त्यात अरबी समुद्राला ' अरबी ' समुद्र हें नाव नाही......तो काही अरबाच्या बापाचा नाही... त्याला सिंधु सागर केला असता. आणि नंतर हें मानस सरोवर, हा चीन, आमची सगळीं पुराण काढून आमच्या मरसीमा कुठवर होत्या त्या पाहून ही जी No Man's Land होती ती Hindu Man's Land करून घेतली असती आणि

आमची सेना तिथे नेऊन ठेवली असती. हा चीन–दहा वर्षात जन्मला होता कुठे चीन? फोर्मोसाला अजून घेऊ शकत नाही. चीन म्हणजे काही 'अद्वितीय' प्रकरण आहे असं नाही. त्याचाच तुटून पडलेला फोर्मोसा–जसं तुमचं तुटून पडलेलं पाकिस्तान-त्या फोर्मोसाला तो घेऊ शकत नाही. कारण तिथे त्याच्यामागे अमेरिका आहे. पोर्तुगीझाच यःकश्चित 'मकाव' बंदर! तें अजून चीन घेऊ शकत नाही. कारण पोर्तुगाल नाटोमध्ये आहे. त्याला हात लावला तर सारा युरोप कोसळून पडेल.

बिचारा नेहरू ..!! त्याच्यापाशी आला. दोन थापा मारल्या सह-जीवन, सह-अस्तित्व. अरे सहजीवन दोन प्रकारचं असतं!! अेकमेकांशेजारी बसून बरोबरीनं वागून होतं हें अेक सहजीवन असतं. आणि अेकानं दुसऱ्याच्या पोटात जाअून होतं तेही सहजीवनच वाघ जेव्हा बोकीला खातो तेव्हा संपूर्ण सह-जीवन होतं. पण हे 'भोगळमूत' समजले आता. आपण म्हणू तें चीन करील आणि चीन म्हणेल ते आपण करू. परंतु नेहरूला माहीत होतं की चीन तिकडे रस्ते बांधतो आहे. अरे! चार-चारशे मैल मोटारचे रस्ते–रेल्वेचे रस्ते–सैनिकी रेल्वेचे रस्ते तिकडे बांधले जात असतानी तुमचं हेर खातं काय करीत होतं? पहिल्याने नेहरूनी अगदी खोट सांगितलं की 'आपल्याला बुवा काही पत्ता नव्हता' जर पत्ता नव्हता तर पंतप्रधान व्हायला अयोग्य होतास तू! याला हेरखातं म्हणतात का? आणि जर पत्ता होता तर तू देशापासून लपवून का ठेवलीस ही गोष्ट? तू लगेच सैन्य तिकडे कां नाही धाडलंस? नेहमी तुम्हाला सांगतो लढाओ जेव्हा करायची, तेव्हा शत्रूवर आक्रमण करावं. (He wins half the war who aggresses—takes the offensive) जो चढाओ करतो, आक्रमण करतो तो अर्धी लढाओ जिंकतो असे म्हणतात.

नीतिची तत्त्वं समजून घेअून वापरावीं. नुसती ही लोकशाही—ती लोकशाही हा न्याय! अरे! न्याय वगैरे काही नाही या जगात जोपर्यंत सार जग अन्यायी आहे तोपर्यंत अन्यायाला अन्यायानेच अुत्तर देणें भाग आहे जोपर्यंत सार जग आक्रमक आहे तोपर्यंत आक्रमणाला प्रत्याक्रमणानेच प्रत्युत्तर देणे आवश्यक होतं. When the whole world is aggressive you must be aggressive, when the whole world is unjust, you must be unjust नेहरूनी चीनला सांगितलं की त्या टोकापर्यंत तुम्हाला काही ग्राम देणार नाही म्हणून चीनने आज मानस सरोवर घेतलं. ज्या मानस सरोवरावर कालिदासान कविता लिहिल्या, ज्यात आमच्या देवांगना न्हायल्या—त्या मानस सरोवराची यात्रा करू नका म्हणतो. कारण नेहरू सांगतात तिकडे दंगल आहे. आणि हज्जची यात्रा सोपी जावी म्हणून त्याचे पैसे आमच्या राज्यातून दिले जातात तुमच्या आमच्या करातून त्यांच्या हज्जच्या यात्रा होतात आणि मानससरोवराची यात्रा करू नये, कारण तिकडे

दंगल आहे. अरे ! दंगल आहे, तर अियून फौज पाठवून दे. काय करताहेत या ठेवलेल्या सेना ? पण तुम्हांला सांगतो, सेनेला दोष देअू नका ! अगदी योग्य आहे आजची सेना.

## भारतीय सेनेचा अपूर्व त्याग

हेच ते राअीस अीटर्स. याना काँग्रेसमध्ये राअीस अिटर्स ठरविलं होतं. हे थिमय्या, हे थोरात, हे करिअप्पा हे सगळे तेव्हा शिकत असत. आम्ही सुद्धा तेव्हा शिकत होतो. लेनिनही शिकत होता. स्टॅलिनही शिकत होता. हे सर्व तेव्हा अिंग्रजाच्या तिथे शिकत. तेव्हा देशभक्त काँग्रेसमध्ये जमून ' These are rice-soldiers because they serve the British ' असं म्हणत.

मी तेव्हाच सांगत असे ते काही पोटभरू भाडोत्री सैनिक नाहीत आणि ते ब्रिटिशाची सेवाही करीत नाहीत. युद्धशास्त्राचें ज्ञान ते मिळवीत आहेत, त्याचे ते शिक्षण घेत आहेत. त्यांना अेकदा का सैनिक शिक्षण मिळाले, रायफली कशा चालवाव्यात हें अेकदा का ते शिकले, नवनवीन, नि अद्ययावत् शस्त्रास्त्राची त्यांनी माहिती करून घेतली की, स्वातंत्र्ययुद्धात आघाडीवर हेच सैनिक लढतील. These are not rice soldiers. They are not serving the British They are learning–getting the training of war. Let them take up Rifles, know the machine guns and latest baloons and when th day of our rising will come these will be the soldiers who will b in the forefront.

त्याप्रमाणे सुभाष बोसला जी सेना मिळाली, ते सर्व तथाकथित ( They were all rice eaters ) पोटभरू नि भाडोत्री सैनिकच होते. अिंग्लंडच्या शाळेमध्ये, अिंग्लंडच्या तोफा घेअून, अिंग्लंडच्या बंदुका घेअून ते सैन्य शिकलेलें होते. आणि आज जें याच आजूबाजूला संरक्षण करताहेत, अेक मंत्री निघाला की जें लटावर चालत ते सर्व पोटभरूच (राअीस सोल्जर्स) आहेत. आता ते ह्याना चालतात.

तेव्हा ही जी सेना आहे, त्या सेनेने अत्यंत कष्ट सहन केलेले आहेत. तुम्हा लोकाकडून शिव्या सहन केलेल्या आहेत तुमच्यातही असे लोक असतील की ज्यानी असमंजसपणाने त्याना दोष दिलेला असेल, की हे अिंग्रजांसाठी लढतात म्हणून. परंतु त्या वेळी तो शस्त्रविद्या शिकायला तोच अेक मार्ग होता. शुक्राचार्याचें शिष्यत्व पत्करणें हाच अेक मार्ग कचाला होता. त्याप्रमाणे ब्रिटिशाकडून अुत्तमोत्तम विद्या— कारण त्या वेळी ब्रिटिश अद्ययावत् होते –अजूनही ते आहेत हं लेकाचे, पण त्या वेळी अगदी अद्ययावत् असत. तशी विद्या शिकायला आम्हाला दुसरा मार्गच नव्हता. म्हणून आम्ही त्याच्याकडे जात होतो, त्याच्यात मिसळत होतो. त्याच्या लढाया '

लढत होतो. कुणाविरुद्ध ? जर्मनीविरुद्ध ! जर्मन आमचा कोण लागत होता ? मेला तर जर्मन, जिंकला तर अिंग्रज ! आम्ही आपले विद्या शिकून आलो. ही दृष्टि होती. ती लोकांना कळली नाही. म्हणून सैन्याला व्यर्थ शिव्या दिल्या बरं! आता चांगला दिवस आला आहे. अजून तरी त्या सैन्याची पारख करा ! त्यांना धन्यवाद द्या की, आज ते आहेत म्हणून आपण देशात कुठेतरी शांत रीतीने बसू शकतो आहोत. परंतु तुम्ही काय वागवीत आहात त्यांना ? नागालँड बाबत जी पहिली आज्ञा नेहरूंनी दिली. अगदी संसदेतच सांगितली आहे. नाकारताच यायचं नाही जर टिपली असेल तर ! आज्ञा ही होती की, तुम्ही गोळी खा. पण अुलटी मारायची नाही हं. ! हे सैन्या—हे माझ्या शिपाया तू असा शूर झाला पाहिजेस की गोळी खायची, पण मारायची नाही ! त्याप्रमाणे यःकश्चित नागा लोकांनी—अेका आठवड्यात ज्यांचा बंदोबस्त तुम्हाला करता आला असता,—चार विमानं पाडून, अहो, आता ते विमानं घेअू लागले आहेत, त्यांना मिळू लागली आहेत. बाहेरचे लोक जवळ आले म्हणून—पण पूर्वी काहीही नसे त्यांच्यापाशी. मी स्वतः हिंडलेलो आहे आणि तुम्हाला सांगितलं तर खरं वाटेल की नाही सांगता येत नाही पण " हिंदुओंका राजा आया " म्हणून हे लोक माझ्या पाया पडलेले आहेत शिवसागरला. मी हें काही माझ्या पदरचं सांगत नाही आहे. नथुरामनी —पंडित नथुरामनी त्या वेळेचे वातमीपत्र केसरीत प्रसिद्ध केलं आहे तें वाचा म्हणजे कळेल की हें खरं कीं खोटं. तेव्हा ते हे नागा...अेका आठवड्याच्या आत यांचा प्रश्न मिटवून टाकायला हवा होता. दडपून टाकायला हवा होता. त्या कमांडरने नेहरूंना सुचविलं होत की विमानं धाडावीत कारण ते जंगलात लपतात आणि जंगलात गनिमी कावा चालत नाही तिथं अेकच हत्यार आणि ते म्हणजे वरचं विमान ! कुठं लपतात ते विमानाच्या टेहळणीच्या बाहेर ?

जिथं असतील तिथं मारा करून अेका आठवड्याच्या आत आम्ही जिंकून देतो. पण त्याना नेहरूनी अुत्तर दिलं ... आणि त्यांच्यासाठी त्यांना—कमांडरांना त्याला अुत्तर द्याव लागल " अहो हे आपले लोक ना ? त्यांच्यावर विमानानी हल्ला कसा करायचा ? गोळ्या कशा झाडायच्या ? त्याना असंच समजावून घ्यायला लागता आलं तर बर !" हृदय परिवर्तन हा नेहरूच्या हातातील शेवटचा बॉम्ब आहे. हृदयपालट ! Persuade ! That is the last Atom Bomb Nehru has got in his hand ! Persuade ! हे जे नागा लोक होते त्याना आठ दिवसात चेपता आल नाही ते अुलटचा गोळ्या झाडू लागले. आणि रोज वर्तमानपत्रात वाचून मान खाली जाअू लागली ... आपले आठ लोक मारले .... आपले चार लोक मारले. दोन गांव घेतली! आता विमानान वृष्टि करूलागले बॉम्बची... पण नागा कुणी मेला म्हणून काही बातमी यायची नाऽऽही ! !....पाकिस्तानचेहि .....! !

## निषेध पत्रांचा वर्षाव
## हृदयपरिवर्तन हाच अेकमेव मार्ग !

तिकडून लोक प्रत्येक वेळी आमच्या सीमेत यायचे. अरे ! ओलीस म्हणून तरी त्याना धरून ठेवायला हवं होतंय ! पण लढायी ही घोषणा आम्हाला करायची नाही. हं ! संसदेत अुघड गांगायचं की आम्ही कधीहि युद्धघोषणा करणार नाही. ( we will never declare war ). त्या शत्रूला तुमचं काय भय वाटेल म्हणून गागावं. तुम्ही तोंडानं सांगता की आम्ही तुमच्यापाशी लढणार नाही हं ! येअू द्यात तुमचीं विमानं आपण हें करू . . . निषेध पत्र पाहिलं ! निषेध पत्र दुसरं ! ! कटावयाचं निषेध पत्र . . . . अगदी कडाड मडावयाचं निषेध पत्र ! ! . . . . पण निषेधपत्र त्यापलीकडे कोणतंही पत्र आमच्याकडे राहिलेलं नाही . . . तेव्हा हें जो लोकसभेत सांगतो, आश्वासन देतो, त्याच्या राज्याचा प्रांत नि प्रांत अजून कसा गेला नाही याचंच मला आश्चर्य वाटतं. असं धाडस अजून कसं कुणाचं होत नाही याचं मला आश्चर्य वाटत !

## भारताकडून निराशा ! नेतृत्व संभाळता आलें नाहीं

पहिल्यानं, पहिल्या घडावयाला—सिक्कीम—नेपाळ—भूतान—नागालँड त काय य.कश्चित गोष्ट—ब्रह्मदेश हे सगळे आपल्याकडे वळलेले होते, हिंदुस्थान स्वतंत्र झाला तेव्हा. ठिकठिकाणी असलेले आपले जे हिंदु लोक आहेत जे आपलेच आत वास्तविक अुपनिवेश झालेले आहेत ते सारे जर अेखादा छान, दणकट मनुष्य अध्यक्ष किंवा पंतप्रधान झाला असता, तर हे मारे हिंदुस्थानचा ध्वज घेअून अुभवतील असे—मॉरिशस—डच गायना अित्यादि आणि जिथे आपली हिंदूंची वस्ती, तिथल्या नेटिव्हापेक्षा आणि निग्रजापेक्षा अधिक आहे असे आफ्रिकेतील आणि आजूबाजूचे टापू . . . या सर्वांना वाटल. काय भाग्याचा दिवस आला आहे हा ! हिंदुस्थान स्वतंत्र झाला. आता हे आजूबाजूचे लोक काय आपल्याकडे पाहतात ? आपण यांच्याशी मिळू. म्हणून नेपाळ मिळायला पाहत होता. तो तर आपलाच आहे. पण सिक्कीम—वगैरे ही की, पूर्वीच्या आपल्या पूर्वजानी केलेलीं धर्मानि, भाषांनी आपलीशी केलेलीं राज्यें . किती दूरवर त्या पूर्वजानी काम केली होती ? कल्पना करवत नाही. म्हणजे अगदी अेकात्म केले होते मुसते अेकत्र नव्हे ! ते सर्व तुमच्याकडे आले होते. तो ब्रह्मदेशाचा अु—नू तो नेहरूंचाच मामेभाअू दिसतो. त्याच्यातही काही पाणी नाही-कधी संन्यास घेतो-कधी राज्यावर बसतो. तोही आला होता. पण याच हे नेभळ धोरण पाहून . . ... जो देश आपलं रक्षण पाकिस्तान्याच्या विमाना-पासून करू शकत नाही. य.कश्चित नागापासून करू शकत नाही, तो देश आमचं रक्षण चिन्यापासून किंवा पूर्व पाकिस्तान्यापासून काय करणार अशा हताशतेनं आता चीनकडे जाअून मिळताहेत. आणि रोज भीति पडली आहे की चीन कधी नेपाळ मधून

सिक्कीम काय किंवा भूतान काय तसे त्यांच्याकडे आहेत. नेपाळ मात्र अगदी आपला आहे.

तेव्हा हे सगळे लोक हाताखून पाठविले आणि या भयंकर धोरणांनी जो काही पराक्रम आपल्यात होता तो ह्यांनी ह्यांच्या धाकांनी घालविला आहे. पुढचं बाबच्या सैन्यात—आजच्या हं ! तुम्ही जाऊन पाहिलेत जास्त मला—नराज असो आता मी धरतो—मरतोपर्यंत तरी—पण आजचं सैन्यही काही व्यर्थ नाही आहे. यांनी मागे लढाया जिंकलेल्या आहेत. जर्मनांशी लढाया केलेल्या आहेत, तुर्कस्थानशी केलेल्या आहेत जगातल्या मोठमोठ्या राष्ट्रांच्या त्यांचाला मांडी घालून आपली बरोबरी त्यांनी सिद्ध केलेली आहे. युरोपमध्ये जा आणि युरोपला विचारा काय सांगतील ते ऐका.

सैन्यात शिरा ?

पण आताशा मी वाचतो की, ऐका लेफ्टनंटच्या जागेसाठी यारा-बाराने आवेदनं ( अर्ज ) येतात, अरे ! सैन्यात जागा आहे, तिथे तुम्ही जा ! सैन्यात शिरा ! ...... पण सैन्य म्हणजे असा ऐक धास्तीच आपल्याला दोन पिढ्या पडलेली आहे की काहीतरी भयंकर प्रकार आहे. तो मागेच नव्हे आपला ..आता मुली आल्या. त्याही ठरवतात ! मॅट्रिक झाल्या की, क्लार्क होतात कुठे तरी. त्यांनाही ध्येय राहिलेलं नाही की मी ऐक जिजामाता होईन, जिजामातेचं गाणं गाईन अगदी उत्तम रीतीनं गाईन,—पेटीचा सूर लावून गाईन पण गाणं गाईन—रण-गाणं गाईन, गाण्याचं रणगाणं करीन. पण जिजामाता धन्य होती शिवाजीला जन्म देऊन. जो शिवाजी, रोज रणाला जाऊन मरणाला आव्हान करीत असे आणि ती त्याला धाडीत असे, तर तुम्हा नको का ऐखादा शिवाजी उत्पन्न करायला ! पण त्या मुलींच्या मनात ही कल्पना सुद्धा येत नाही. त्या त्यांच काम हं समजतात की, पुरुषाप्रमाणे आपणही नोकरी करायची.

म्हणून माझं ऐवढं सांगणं आहे की, महाराष्ट्राने भारताचा खड्गहस्त झालं पाहिजे. तुमचं सैन्य, हं भारताच्या सैन्यात अत्यंत पराक्रमी ठरलं पाहिजे. ही संयुक्त महाराष्ट्राची चळवळ जी ह्या जोशांनी आणि अत्र्यांनी केली त्याला माझी संपूर्ण सहानुभूति होती. तेव्हा माझे परप्रांतातले माझ्याबरोबर काम केलेले माझे स्नेही मला विचारीत, काहो ! तुम्ही देखील प्रांतीय झाला ? तर मी सांगितलं की, नाही रे बाबा, मी काही प्रांतीय झालो नाही. मला महाराष्ट्र हाच भारत वाटतो आणि भारत हाच महाराष्ट्र वाटतो अरे ! पण मी महाराष्ट्राला का म्हणतो की तो भारताचा खड्गहस्त झाला पाहिजे म्हणून ? की, सैन्य जर तुमचं असेल, तर भारताला भीति नाही. मराठे आपल्या देशाला मुक्त करायला अटकेला गेले. कोणता रजपूत तुमच्या पुण्यावर आलेले संकट निवारण करण्यासाठी राजपुताना सोडून

पुण्याला आला होता ? तें याळकडून गल्हतें त्यांना ! आपल्याला आक्रमण हें पाळावं होतं. शिवाजी महाराजांपासून. आक्रमण करायचं. शत्रूवर चालून जायचं. हें धारिष्ट्य आपल्यात होतं. आपण नर्मदा ओलांडली, तें पुरें नाहीं झालं, पंजाबला गेलो, दिल्लीला गेलो, हिमालयावर गेलो, ही जिज्ञासा ही मनातली अूर्मी अेका महाराष्ट्रात होती. तशी काही अितर कोणत्याही प्रांतात नव्हती. बंगाल्यात नव्हती. कुणात नव्हती. पण महाराष्ट्रात ती होती. त्यांना मी दोष देत नाहीं त्या करिता की, त्या त्या परिस्थितीप्रमाणं तसं तसं झाल सारं ! म्हणून महाराष्ट्रानेच सङ्गहस्त झालं पाहिजे ! तुमच्यामागे ही परंपरा आहे. तुम्ही शत्रूवर चालून जाअून आपला प्रांत तसाच लढवून त्याला पाठीशी घालून शत्रूवर आक्रमण करणारे लोक आहात. म्हणजे आपणहून संरक्षण करायला तुमच्या देशावरून तिकडे जातो. औरंगजेबाला अिकडे यायचं कामच नव्हतं ! अरे ! आम्हीच दिल्लीला गेलो !

तेव्हा अुद्या संसदेत असा नियम आला की, महाराष्ट्राला भारतापासून तोडून टाकावं तर शस्त्रास्त्रें घेअून आम्ही तुमच्यावर चालून येअू की भारत आमचा आहे! तुमचा कोठून म्हणता ! अितकं महाराष्ट्राचं स्वातंत्र्य मला कःपदार्थ वाटतं की, तुम्ही महाराष्ट्र जर सोडाल तर आम्ही भारतच मागू, कारण तोच आमचा खरा देश आहे, आणि म्हणून तुमचं सैन्य जर झालं, आणि सैन्य म्हणजे ज्याच्या हाती राज्य आहे ती सत्ता. बाकी सर्व व्यर्थ आहे. अरे ! मोठमोठे कारखाने काढता! वेड्यांनो ! मोठाले रस्ते बांधता ? सगळं मान्य आहे मला, हें सारं केलं पाहिजे, जगामध्ये संसारात हें सगळं लागतं, चूल–बोळकी सगळं, सगळं पण जर का कुणी– मी अयुवधानाचं नाव घेत नाही–अेक य.कश्चित व्यक्ति आहे ती. पण जर कुणी दुसरे अेखादें परराष्ट्र चालून आले तुमच्यावर ?तर तुमची ही यंत्रं, गिरण्या व, पंप हे का जाअून लढणार आहेत ? हे जे रस्ते पडले आहेत ते का अुभे राहून लढणार आहेत त्याच्याशी ? कोण लढणार आहे त्यांच्याशी ? तुमचीं शस्त्रास्त्रं, तुमचं लोखंड, तुमचं पोलाद, तुमचीं अण्वस्त्र, तुमच्या सुन्यातीं त्यांच्याशी लढतील ! ! मी आता सुन्यांच्या काळात राहणारा माणूस नाही, मला अण्वस्त्रं हवीत, तीं मिळालीं पाहिजेत ती त्याच्याशी लढतील. आणि मग तुम्हाला या वाढलेल्या शेतीचा, मार्गांचा, सेतूंचा कारखान्याचा यथेच्छ अुपभोग घेता येअील. नाही तोपर्यंत त्याचा काही अुपयोग नाही.

अेक गोष्ट सांगतो. तुमच्या देशाला सुवर्णभूमि म्हणून नाव माग पडलं होतं. *ह्यूअेन्‌-संग आणि अितर चिनी प्रवासी लिहितात, " सुवर्ण भूमि म्हणून म्हणतात ती हीच "* अगदी रोमन साम्राज्यापर्यंत म्हणजे आपलं विजयनगरच राज्य होअी-पर्यंत हे होत. ही सुवर्णभूमि पदवी मिळाल्यामुळं हे सर्व चोर, लुटारू, भामटे, पश्चिमेचे आणि पूर्वेचे, तुमच्यावर अेअून कोसळत, कारण सुवर्णभूमि आहे ना ही ? चला बरं तिथं हात पोहोचतो का पाहू ? कारण तिथं शस्त्रास्त्र बळ काही नाही. *असं जोपर्यंत होतं तोपर्यंत त्यांनी तुम्हाला लुटून खाल्लं.* तसं तुम्हाला, ते लुटून

खातील. हिमालय सोडून द्या. हिमालय निर्जीव आहे. ही भिंत आता मला नको आहे. विमानं त्याच्यावरून जाऊ लागलीं आहेत. तेव्हा विमान दल, भू-दल, नौ-दल आणि आपल्या छातीचा कोट करील असं सैन्य अुभारा. विज्ञानाच्या आधारे नवीन शिकून घ्या! अहो! तें अशक्य नाही आहे आता! आज अेकमेकाला अणुबाँब देअू लागले आहेत. पोर्तुगालला अेक देतो आहे तर स्पेनला दुसरा देतो आहे. तेव्हा असे संधिविग्रह करून तुम्ही आपली शक्ति वाढवा. पहिल्यानं हें करा. आणि मग कारखाने अुभारा ! मग म्हणजे अगदी मग नव्हे. बरोबरीनं केलं तरी चालेल. पण सैन्याची जर शक्ति असेल तर शत्रूला बाहेरच्या बाहेर रोखून धरून या कारखान्याचा या रस्त्यांचा या संपत्तीचा अुपभोग तुम्ही घेअू शकाल. नाही तर हें सर्व तुम्हाला असून नसून सारखंच होअील. म्हणून अेवढ्यासाठी, तरुण महाराष्ट्रियानी आपली आकांक्षा ही ठेवली पाहिजे-दुसरी कोणतीही ठेवू नये — मागून वाटेल तें घ्या. पण पहिल्यान भारताचा महाराष्ट्राने ' खड्गहस्त ' झालं पाहिजे. यात आणखी अेक हेतु आहे की, महाराष्ट्रीय मनुष्य म्हटला की, अितिहासाच्या आधारे सांगतो. कल्पनेच्या आधारे सांगत नाही. किंवा महाराष्ट्रियाची स्तुति करावी म्हणून सांगत नाही. त्याची यथेच्छ निंदा मी केली आहे. पोथ्या पुराणाची. मला त्याचा पश्चाताप नाही. योग्य तीच केली. तेव्हा अेकेक महाराष्ट्रीय म्हटला की तो भारतीय असलाच पाहिजे. म्हणून जर तुमचं प्राबल्य सैन्यामध्ये झालं संख्येच्या बाबतीत नव्हे पराक्रमाच्या बाबतीत. काश्मीरचं ते मेननची लिहिलेलं पुस्तक वाचा अेकदा अवश्य ? महार पलटणी विषयी ते लिहितात, ' ही महारांची पलटण, आंबेडकर मोठे दूरदर्शी, त्यांनी महारांचीच अेक पलटण केली आणि नेहरूंनी अस्पृश्यतेचा शिक्का लावून ती काश्मीरमध्ये पाठवून दिली. ' पहा आमचे काय शूर लोक होते ते ' केवढा पराक्रम त्यांनी केला काश्मिर हातात ठेवण्यासाठी ! तेव्हा तुमच्याकडे भारतपणाच बाळकडूच असल्या कारणानं तुमची फौज भारतात श्रेष्ठ झाली. जर बॉम्ब तुमच्या हाती आला तर तो भारताच्या शत्रूवरच पडेल. अितर हिंदुस्थानातील कुणावर पडणार नाही. हिंदूवर पडणार नाही. जे तुमचे शत्रू आहेत त्याच्यावरच पडेल. आणि तो देखील तो शत्रू असेल तोवरच पडेल, आणखी अेक दोन चार दिवस अलीकडे पलीकडे पडला तरी चालेल, म्हणजे पक्के मित्र व्हावें म्हणून ! म्हणून तुम्हीच भारताचं ' खड्गहस्त ' झालं पाहिजे अशी माझी आकांक्षा आहे आणि ती आपण पुढची पिढी, ती आकांक्षा पूर्ण कराल अशी आशा करतो !

* * *

# (८)
# भगवान् श्रीकृष्ण

गोकुळाष्टमीचा दिवस म्हणजे साक्षात् भगवान् श्रीकृष्णांच्या अवताराचा दिवस. श्रावण वद्य अष्टमीच्या रात्रीं त्या परमपावन गोकुळाचें सर्व पुण्य फळाला आलें आणि त्याचें नांव गाऱ्या दिगंतात धन्य होऊन राहिलें ! गोकुळाच्या त्या अतुल भाग्याचा प्रेमातिशयपूर्ण अगा हेवा वाटूनच की काय हा गोकुळाष्टमीचा दिवस हिंदुस्थानातील प्रत्येक नगरी आणि प्रत्येक गावीं मोठ्या उत्सवात घालविण्यात येतो त्या गाऱ्या आठवड्याभरच आनंदाचा ' रंग हिंदुस्थानात सर्वत्र उमळत असतो. कोट्यवधि हिंदु गोविंदा ! गोविंदा ! ' अशा नामघोषात रंगून जाऊन हा आठवड्यात नगरीं-नगरीं आणि वनोपवनीं श्रीकृष्णाच्या जन्मोत्सवाच्या आनंदाच्या निनादाने भारताचें उभें आकाश प्रतिध्वनित करीत असतात !

साक्षात् 'आनंदाचा कंद'च अशा त्या नंदनंदनाचा तो जन्म खरोखर अत्यंतच अद्वितीय नि भव्य दिव्य होता. त्या दिवसास सांप्रत उर्णापुरीं पांच सहस्र वर्षें झाली. पण त्या दिवशी अेका दासीला झालेल्या अेका मुलाच्या जन्माची आठवण आजही जग विसरले नाही. देवकीच्या उदरात पांच हजार वर्षांपूर्वी ज्या प्रसववेदना होऊं लागल्या त्या आज साऱ्या हिंदु जगताच्या प्रसववेदना झालेल्या आहेत. त्या वेदनाची प्रत्येक कळ हें उभें हिंदुजगत् अनुभवीत आहे. त्या कारागारातील लहानशा कोठडीत ते गोजिरे बालक जन्मताच, त्याला फारतर चार महा नेत्रांनीच आनंदाश्रूत न्हाणविलें असेल. आज त्या जन्मघटीची उत्कट आनंदाने वाट पहात बावीस कोटी जीव त्या दैवी बाळंतिणीच्या खोलीचा कानोसा घेत आहेत. आणि देवाचा जन्म झाला म्हणून खूण होताच चव्वेचाळीस कोटी नेत्रांतून आनंदाच्या अश्रूंच्या धारा त्या लहानग्या श्रीकृष्णास न्हाणवीत आहेत. उधळलेल्या गुलालांनी, फुलानी, लाह्यानी घर-घर आणि मन-मन सुगंधी आनंदाने नुसते दरवळून जात आहे तें मूल जन्मले तेव्हा अेका वसुदेवाचे दोन हातच काय ते ज्या मुलास आनंदाने उचलून घेण्यास पुढे झाले, तें मूल आज ह्या हातातून त्या हातात प्रेमभराने देता घेता कोटी-कोटी हात त्याच्या स्पर्शाचे दिव्य सुख अनुभविण्यासाठी उतावीळ होत आहेत. कोटी-कोटी हृदयाचे पाळणे प्रेमाच्या दोरीनें हळूहळू ओढिले जात त्या बालकास 'अंगाओ' म्हणत आहेत ! वसुदेव त्या मुलास गुप्तमार्गे पळवून यमुना उतरू लागला तेव्हा त्यास दैववशात् किंवा पूर्वी माहीत असलेला अेक पाणउतार सापडला. पुढे पुराणे त्या योगायोगास दैवी चमत्कार म्हणून लिहितीं झालीं की, त्या बाळकृष्णाच्या चरणाचा स्पर्श होताच दुथडी भरून चाललेली यमुना दुभंगून जाऊन वसुदेवाला वाट देती झाली. पण आज त्या दैवी चमत्कारासही निस्तेज करणारा महत्तम चमत्कार त्या मुलाच्या पदस्पर्शाने घडत आहे. कारण त्या श्रीकृष्णाचा चरणस्पर्श होताच ती काळी यमुना नदीच नव्हे, पण काळा भवसागर देखील दुभंगून

वाट देतो आहे. आणि त्या वाटेने अनेक जीव पायखुरारांनी परमीराग जात आहेत. त्या परतीरास वसुदेव गेला त्या वेळेस गुप्तपणे नंदाचे गोकुळच होते, पण आज कृष्ण-चरणांची वाट देखून त्या सार्‍यांनी दुर्भंगलेल्या भवसागराच्या पार जे जातात त्यांस केवळ नंदाचें गोकुळच लागत नसून आनंदानें प्रत्यक्ष वैकुंठच लागत आहे !

श्रीकृष्णावर त्यांच्या जीवनकाळीं अनेकांनी अत्युत्कट प्रेम केलें. प्रेमाची छाया द्वेष. अुत्कट प्रेम म्हटलें की अुत्कट द्वेष आलाच. 'अजातशत्रु' धर्मराजाला निदान दोघे चार शत्रु होतेच होते ! खरा 'अजातशत्रु' जर कोणी असू शकेल तर तो 'अजातमित्र' ही असणारच. पण "तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्" "न मे भक्तः प्रणश्यति" म्हणून कंकण बांधून धर्मक्षेत्रात "परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् !" पुढे सरसावलेला देव 'अजातशत्रु 'कसा राहणार? त्याचा कोणी अेकवेळ शत्रु नसेल पण त्याला शत्रु समजणारे अनेक असणार. दुर्योधनाकडे श्रीकृष्ण शिष्टाअीला गेले असता त्याचा अपमान करण्यात आला ! सभेत येताच त्यांना बांधून टाकण्याचा बेत झाला. जरासंधाने त्यांस पांडवांचा पक्षपाती म्हणून, भित्रा म्हणून, नीच म्हणून, कपटी म्हणून भर राजसभेत त्याची निंदा केली. शिशुपालासारख्यांनी त्यांच्या पिढीतही अगदी दुष्यम आणि डाकाअू ठरलेल्या माणसांनी श्रीकृष्णाच्या वैभवास न साहून मोजून मोजून शब्दांवर शिव्या दिल्या. पण श्रीकृष्ण ते श्रीकृष्णच राहिले. आज पाच हजार वर्षे त्यांच्या चरणांवर भक्तीने गुंफून घेत आलीं फुलें सुधळीत आलीं, —आणि शिशुपाल आणि रुक्मी अित्यादि ? जर आज त्यांचे नाव अुरलें असेल तर ते केवळ त्यांनी श्रीकृष्णास शिव्या हासडल्या म्हणूनच काय ते ! त्या अगदी सामान्य माणसांत त्यांची जगास आठवण राहण्यासारखें स्वतःसिद्ध असें काहीही नव्हतें. श्रीकृष्णासारख्या असामान्य विभूतींचे थोरपण अितकें थोर असते की त्यांचा अपमान करू पाहणाऱ्या सामान्य व्यक्तींसच केवळ त्या थोरांशी संबंध आल्याच्या पुण्याने शतकों शतकें त्यांची आठवण ठेवण्याचा मान जगाकडून जगाच्या अिच्छेविरुद्ध दिला जातो. नाहीतर शिशुपाल किंवा रुक्मी किंवा चाणूरी किंवा पूतना, किंवा तुकारामास मारणारा मंबाजीबुवा, यांची आठवण आज कोणास तरी अुरती काय ? पण ह्यावरून श्रीकृष्णाचे द्वेष्टे सर्व दोषी होते असेंही म्हणण्याचें कारण नाही. त्यांच्या पिढीत ते (श्रीकृष्ण) प्रथमतः सामान्यच दिसणार. आपल्या गोकुळातील खोड्या करणारा हा नंदकिशोर पुढे दुष्टांचा वध करून जगताचे तारण करणारा कृष्ण भगवान् होणार आहे हें त्याला लाडाने चापट्या मारून त्याची गाऱ्हाणीं यशोदेस सांगणाऱ्या गोपगोपींस जर प्रथमच माहीत असतें, तर त्यांनी त्याला तसें बरोबरीने वागविलें नसतें. गोपशिशूंस तो अेक गवळ्याचा मूलच वाटणार! म्हणूनच ते अेकमेकांस सहज वाटणाऱ्या आश्चर्याने डवचून आणि गंभीर मुद्रा करून म्हणणार "गड्यांनो ! कृष्ण गडी अपुला, राजा मथुरेचा झाला !" आणि तो मथुरेचा असा राजा झाला तेव्हा तीच स्थिति जरासंधादिक राजांची झाली, त्यांनाही तो प्रथम आपल्यासारखाच अेक वाटणार ! त्यांतही मत्सराने त्यांना

पछाडलेलें. अशा स्थितीत श्रीकृष्णाचें असामान्यपण या काही सामान्य जनांनी तत्काळ ओळखलें नाही ह्यांत तितकें आश्चर्य नाही. पण ज्या शुद्धांतःकरणी, परगुणग्राहक, न्यायपरायण अनंत लोकांनी तें तत्काळ ओळखिलें आणि आपला क्षुद्र अहंकार त्या महनीय देवाचे पायांवर अर्पण केला, त्या गवळी पेंदयापासून तों सम्राट पांडवांपर्यंतच्या त्या निर्मलतर पारदर्शित्वाचेंच आश्चर्य केलें पाहिजे. अितक्या थोड्यांनी त्याचा द्वेष किंवा अवहेलना केली, आणि अितक्या असंख्यांनी त्याला आपलें चित्त-वित्त-ममत्व अर्पण केलें. त्याच्या पिढींतच अर्पण केलें, हेंच श्रीकृष्णाच्या चरित्राचें खरें मापन होय. त्याहूनही वरोवर मापन हें होय की प्रेमाने असो वा द्वेषाने असो, निंदेसाठी असो वा प्रशंसेसाठी असो, पण श्रीकृष्णाचें नांव, श्रीकृष्णाचे बोल, श्रीकृष्णाचें स्मरण अुभ्या भरतखंडात रात्रं दिवस मनुष्यमात्रातच नव्हे तर गायीवासरांपर्यंत संकीर्त होत होतें ! अेवढी मोठी ती शक्ति आविर्भूत झालेली होती ! ज्याचे त्याचे ध्यानी मनी कृष्ण ! गायींचा गवळी, गोपींचा गोविंद, राधेचा रमण, मत्तांचा मर्दक, दुष्टांचा दंडक, सुष्टांचा स्नेही, गीतेचा गायक, भक्ताचा भगवान् ! त्याच्या पिढीच्या युगास जली स्थली श्रीकृष्ण दिसत हेता. त्याच्या अुभ्या युगावर त्याची छाप पडलेली होती आणि ती त्याचें युग संपून अन्य युगें संपत आली तरी पडलेलीच आहे ! आजही ह्या असंख्य हिंदु जगताच्या कोटि कोटि बाल-बालिकांचा प्रणयी-प्रणयिनींचा, वृद्ध-तरुणांचा, योगा-भोगांचा, बंध-मोक्षाचा, आदर्श तो भगवान् श्रीकृष्णच आहे !

श्रीकृष्णाने केलें बहुत आणि सांगितलेंही बहुत. पण त्या सर्व कृत्यात जें त्याचें अवतारकृत्य म्हणून त्याने केलें, तें अनन्यसामान्य कृत्य म्हणजे कंसवध म्हणजे दुष्ट वध ! आणि त्याच्या सर्व सांगीत जी विशिष्ट, अनन्यसाधारण शिकवण त्याने दिली ती म्हणजे भगवद्गीता !

गोकुळाष्टमीचा आठवडा म्हणजे श्रीकृष्ण जन्माच्या अुत्सवाचा होय. दुष्टांनी बंदीत टाकलेल्या त्या देवकीच्या ५००० (पाच सहस्र) वर्षापूर्वीच्या प्रसूतिवेदना आज अुभ्या भारताच्या प्रसूतिवेदना झाल्या. अष्टमीस श्रीकृष्णजन्महीं होतोच. पण आता कंसवधासारखें महत्त्वाचें कार्य करणारा कोण राहिला आहे ? त्याच्या जन्माला येण्याच्या साध्या कृत्याचे अनुकरण प्रत्येक कृमि-कीटकही करू शकतो. जो तो आलेलाच आहे. पण जन्मास येअून कृष्णाने कंसवध केला. करणीत करणी ती ! तिचें अनुकरण कोणी करीत आहे काय ? दास्यकंसवध कोणी करीत आहे काय ! नुसत्या जन्माचें अनुकरण काय कामाचे ? जर कृष्णजन्माला राष्ट्रीय अुत्सवाचें महत्त्व आणून देणाऱ्या पारतंत्र्याच्या कंसवधाचे अनुकरण करण्यास तुम्ही कंबर कसीत नसाल, तर नुसते 'कृष्ण कृष्ण' म्हणून माळ फिरविणें हीही भक्तिच आहे, पण ती खरी भक्ति नाही. कृष्णाची खरी भक्ति म्हणजे कंसवध. करणी नसेल तर नुसती स्मरणी काय कामाची ? ती मिथ्या भक्तीची स्मरणी हीच आज ह्या भारताची मरणी झाली आहे.

* * *

# (९)
# आत्महत्या आणि आत्मार्पण

धन्यो ऽ हं धन्यो ऽ हं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ।
धन्यो ऽ हं धन्यो ऽ हं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ।।

आत्मार्पण आणि आत्महत्या यांत काहीच का फरक नाही ? आहे म्हणावा तर नाही आणि नाही म्हणावा तर आहे !

व्याधींनी, अपघाताने, किंवा अशाच कोणत्या तरी अपरिहार्य कारणामुळे मरण न येता, जीव न जाता, जे लोक कोणत्याही कारणाने जीव नकोसा होऊन स्वतःच स्वतःचें मरण स्वतःवर ओढवून घेतात त्यांनी आत्महत्या केली असें आपण म्हणतो. पुष्कळ समाजांतून तो अेक दंडनीय अपराधही (गुन्हा) समजला जातो. आत्मा नि जीव या शब्दातील तात्त्विक भेद काय मानला जातो याची चर्चा येथे न करता व्यवहारात आपण होऊन आपला जीव देण्याच्या कृत्यास जो वर सांगितल्या-प्रमाणे 'आत्महत्या' शब्द वापरला जातो त्यातला तो आत्मा हा शब्द त्याच व्यावहारिक अर्थी आम्ही येथे वापरीत आहोत. तथापि काही प्रकरणी आपण होऊन आपला जीव देणाऱ्याच्या, आपल्याच हाताने आपल्या प्राणाचा बळी देणाऱ्याच्या कृत्यांना, तीं कृत्यें वरील व्यावहारिक अर्थी 'आत्महत्या'च असताही त्यांना मात्र आत्महत्या न म्हणता आत्मार्पण, आत्मविसर्जन अित्यादि संस्कृत शब्द योजून तीं कृत्यें प्राचीन कालापासून गौरवार्ह मानलीं जात आली आहेत. ही भिन्नता कां आली, काही प्रकारच्या आत्महत्यांना मनुष्य समाजाने तो अेक दंडनीय अपराध न मानता, त्याला अेक पुण्यकृत्य, महनीय कृत्य, गौरवार्ह कृत्य कां मानलें त्याचें मर्म आम्ही येथे दिलेल्या तशा काही अुदाहरणावरून आपोआपच स्पष्ट होओील. हीं अुदाहरणें देताना आमच्या आजच्या परिस्थितीत त्यांच्या विवरणात काही त्रुटि राह-ण्याचा संभव आहे. कारण वयोमानानुसार आम्ही सध्या वार्धक्य नि व्याधि यांच्या मुळे अंथरुणास खिळून पडलेले आहोत. अशा स्थितीत त्या त्या अुदाहरणासंबंधींचीं संदर्भपुस्तकें पुन्हा अेकदा वाचून पाहण्याची शक्ति नाही, अिच्छा नाही, आवश्यक-ताही वाटत नाही. असलेल्या आठवणीवर काय तें विसंबून त्या अुदाहरणाचें वर्णन दिलें आहे. त्यात न्यूनाधिक ज्या काही फुटकळ त्रुटि असतील त्या वजा घालूनही त्या अुदाहरणांवरून जो अंतिम निष्कर्ष आम्ही काढू अिच्छितो त्याला काही अुणेपणा येणार नाही ही आमची निश्चिति आहे.

प्रथमतः प्रख्यात मीमांसक आणि वैदिक कर्मकांडाचे कट्टर पुरस्कर्ते श्री. कुमारील भट्ट यांचे अुदाहरण घेअू. वैदिक धर्माचा संपूर्ण पाडाव करू अिच्छिणाऱ्या बौद्ध सिद्धान्ताचा कोटिक्रमाने अुच्छेद करण्यासाठी अगदी बुद्धांच्याच ग्रंथातून त्या सिद्धान्तांचाच अभ्यास करावा म्हणून त्यांनी त्रिपीटकादिक बुद्ध ग्रंथांचा अभ्यास

केला. त्यांनी आचार पाळले, तसें बुद्धधर्मीय जीवन जगून पाहिलें. नंतर त्या मतांचा पराजय करण्याच्या आणि त्या आचाराचा फोलपणा दाखविण्याच्या महत्कार्यास हात घातला. मोठमोठ्या वादविवादांच्या सभांतून, प्रवचनांतून प्रचार करीत करीत साऱ्या भारतभर वैदिक मीमांसकांच्या मताची पुन्हा प्रस्थापना केली. शेवटी आपलें हें मुख्य जीवनकार्य यशस्वीपणें संपलें आहे असें जेव्हा त्यांना वाटलें तेव्हा मग वैदिक धर्माच्या विजयाकरिताच का होईना, पण अवैदिक आणि पाखंडीय अशा बुद्धधर्म ग्रंथाच्या वाचनाचा आणि त्याच्या आचारविचाराचा जो अवलंब करावा लागला त्या पापसंपर्काचें प्रायश्चित्त घेण्यासाठी नैसर्गिक निधन होण्यापूर्वी तुषाराग्नीत स्वतःचा देह भस्म करून घेण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. तीप्रमाणे त्यांनी स्वहस्तें चिता पेटवून तींत प्रवेश केला. पाहता पाहता त्या अग्निज्वालांच्या कल्लोळात त्यांच्या देहाचें भस्म होऊन गेलें.

परंतु त्या महान् बलिदानास 'आत्महत्या' असें न म्हटलें जाता 'अग्निदिव्य' 'आत्मार्पण' अशाच शब्दांनी अितिहासात गौरविलें गेलें आहे.

दुसरें अुदाहरण जगद्‌गुरु श्रीमदाद्य शंकराचार्य यांचें देता येअील. अद्वैत मताच्या दिग्विजयासाठी साऱ्या भारतभर संचार करीत ते जेव्हा आसाममध्ये (त्या वेळच्या कामरूपमध्ये) गेले तेव्हा तेथे शाक्त पंथाशी त्यांचा वादविवाद झाला. त्यातही त्यांनी विजयश्री संपादन केली. परंतु शाक्तातील अुग्रपंथीयांना तें सहन न होअून त्यांनी शंकराचार्यांवर विषप्रयोग केला. त्यामुळे त्यांच्या प्रकृतीला बराच अपाय झाला. तथापि तेथून ते काश्मीरपर्यंत संचार करीत गेले. काश्मीरला जाताच आपल्या दिग्विजयाची पूर्णता झाली असें पाहून आपला चौथा प्रमुख मठ त्यांनी स्थापला. शृंगेरी, द्वारका, पुरी आणि हा काश्मीरचा मठ मिळून चार दिशास अद्वैतमतप्रचारार्थ चार धामें स्थापण्याचें त्यांचें महत्कार्य असें तडीस गेलें. श्रीशंकराचार्य त्या वेळेस भर तारुण्यात होते हें प्रसिद्धच आहे. तथापि अेक तर वर अुल्लेखिल्याप्रमाणे खचत चाललेली त्यांची प्रकृति, दुसरें की, महाभाष्यादि ग्रंथ लिहून आणि वर दिलेलीं चार धामें स्थापून आपलें अवतारकार्य आपण संपूर्ण केलें आहे असें वाटणारें समाधान आणि तिसरें म्हणजे बालवयापासूनच त्यांच्या अंगी 'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् । गृहाद्वा वनाद्वा ।' या त्यांच्या सूत्राप्रमाणे वाणलेली अुपजत वैराग्यवृत्ति, या तिन्ही कारणामुळे ज्या आपल्या जीवनाची अशी संपूर्ण कृतकृत्यता झाली आहे ते अैहिक जीवन संपवून परब्रह्मी आता विलीन व्हावें अशी आतुरता त्यांना वाटू लागली. ह्यास्तव त्यांनी स्वत: महान् योग्याच्या पूर्व परंपरेनुसार गुहाप्रवेश करण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणे गुहेत जाअून आपण योगासन घालून बसले आणि त्यांच्याच आज्ञेप्रमाणे त्यांच्याच शिष्यांनी अेका मल्या मोठ्या शिळेने गुहेचें तें द्वार बंद करून टाकलें. याप्रमाणे योगमार्गे जगद्‌गुरु शंकराचार्यांनी मोठ्या समाधानाने प्राणविसर्जन केलें.

आपण होऊन न जाणारा जीव बळाने देण्याची क्रिया ही, ज्याला आपण दण्डनीय आत्महत्या म्हणतो तीत आणि अशा यौगिक प्राणविसर्जनात, आत्मविसर्जनात जरी अेक सामान्य घटक असला तरीही जगद्गुरु शंकराचार्यांचा हा गुहाप्रवेश अितिहासात 'आत्महत्या' म्हणून अुल्लेखिला न जाता 'आत्मार्पण' ह्या गौरवार्ह नांवाने यथार्थपणेच अुल्लेखिला जात आला आहे.

अशा योगेश्वरांच्या गुहाप्रवेशाची अनेक अुदाहरणें आपल्या प्राचीन अितिहासात सापडतात. आता सापेक्षतः अगदी अर्वाचीन अितिहासातील अशा कृतकृत्यतेच्या समाधानानेच आपण होअून स्वदेह विसर्जन केल्याची आत्मसमर्पणाची काही अुदाहरणें अुल्लेखू.

गौरांगप्रभु अशा प्रेमदर्शक नावाने बंगालमधील ज्या वैष्णवाचार्यांची, महाप्रभु चैतन्यांची, कीर्ति भारतभर पसरली आहे त्यांच्या निधनाविषयी अशीच अेक कथा सांगितली जाते. श्रीकृष्णाच्या भक्तिसंप्रदायाचा प्रचार करीत करीत हे श्रीचैतन्यप्रभु सामुदायिक भजनात रंगून मोठमोठ्या नगरयात्रा काढीत तेव्हा त्या भक्तिरसाच्या आनंदात वाहत जाअून त्या त्या नगरात सहस्रावधि स्त्रीपुरुष त्यांच्यामागे नामाचा गजर करीत चालू लागत आणि भक्तीच्या भावोन्मादात मार्गामार्गातून नाचत नाचत चैतन्यप्रभु पुढे पुढे चालत. आयुष्याच्या अुत्तरार्धापर्यंत साऱ्या बंगालभर भक्तिसंप्रदायाचाच असा अुत्कट प्रचार करीत करीत ते शेवटी जगन्नाथपुरीला गेले. तेव्हा अेकदा तेथील सागराच्या तटावर ते सामुदायिक भजनयात्रेत चालले असता त्या सागराच्या नीलजलाशयास पाहताच भावावेशात येअून घनश्यामल श्रीकृष्णाचेच हें स्वरूप आहे, तो श्रीकृष्णच दिसत आहे असा अुत्कट भास त्याना झाला, आणि त्या स्वरूपास प्रत्यक्ष आलिंगन देण्याकरिता 'हे कृष्ण! हे श्याम!! हे श्याम!!!' असा टाहो फोडीत देहभान सुटून त्यांनी अकस्मात् त्या अफाट सागरातच अुडी घेतली. ते आत्मविसर्जन करते झाले. परन्तु या देहत्यागास चैतन्याने आत्महत्या केली असें न म्हणता चैतन्यप्रभूने जलसमाधि घेतली, आत्मार्पण केले असेंच अितिहास म्हणत आला आहे.

आपल्या महाराष्ट्रात श्रीज्ञानेश्वर महाराजांची कथा तर प्रसिद्धच आहे. ह्या अलौकिक विभूतीने अगदी तरुण वयातच ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यासारखे तत्वज्ञानाच्या मंदिराचे सुवर्णकलश शोभावे असे दोन ग्रंथ लिहिले. आपले जें अवतारकार्य होतें ते आता संपले आहे, ह्यापुढे जग त्याप्रमाणे चालो किंवा न चालो, त्याचें अुत्तरदायित्व आपणांवर राहिलेलें नाहीं अशा कृतकृत्यतेच्या जाणिवेने वयाच्या अवघ्या तिशी पस्तिशीच्या आतच त्यांनी अंतिम समाधि घेण्याचा निश्चय केला. जे जे योगिजन समाधिस्थ होअू शकतात त्यांची ती समाधिस्थ स्थिति अंतिम असते असे नाही. समाधि घेतलेला योगी ती समाधि स्वेच्छेने अुतरवूही शकतो. पुन्हा व्यावहारिक, सांसारिक, जागतिक, जागृतीत, अिच्छा असल्यास तो येअू शकतो. पण

केला. त्यांचे आचार पाळले, तसें बुद्धधर्मीय जीवन जगून पाहिलें. नंतर त्या मताचा पराजय करण्याच्या आणि त्या आचारांचा फोलपणा दाखविण्याच्या महत्कार्यास हात घातला. मोठमोठ्या वादविवादांच्या सभांतून, प्रवचनांतून प्रचार करीत करीत साऱ्या भारतभर वैदिक मीमांसकांच्या मताची पुन्हा प्रस्थापना केली. शेवटी आपलें हें मुख्य जीवनकार्य यशस्वीपणें संपलें आहे असें जेव्हा त्यांना वाटलें तेव्हा मग वैदिक धर्माच्या विजयाकरिताच कां होईना, पण अवैदिक आणि पाखंडीय अशा बुद्धधर्म ग्रंथांच्या वाचनाचा आणि त्याच्या आचारविचारांचा जो अवलंब करावा लागला त्या पापसंपर्काचें प्रायश्चित्त घेण्यासाठी नैसर्गिक निधन होण्यापूर्वी तुषाराग्नीत स्वतःचा देह भस्म करून घेण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. तीप्रमाणे त्यांनी स्वहस्ते चिता पेटवून तीत प्रवेश केला. पाहता पाहता त्या अग्निज्वालाच्या कल्लोळात त्यांच्या देहाचें भस्म होऊन गेलें.

परंतु त्या महान् बलिदानास 'आत्महत्या' असें न म्हटलें जाता 'अग्निदिव्य' 'आत्मार्पण' अशाच शब्दांनी इतिहासात गौरविलें गेलें आहे.

दुसरें उदाहरण जगद्गुरु श्रीमदाद्य शंकराचार्य यांचे देता येईल. अद्वैत मताच्या दिग्विजयासाठी साऱ्या भारतभर संचार करीत ते जेव्हा आसाममध्ये (त्या वेळच्या कामरूपमध्ये) गेले तेव्हा तेथे शाक्त पंथाशी त्यांचा वादविवाद झाला. त्यातही त्यांनी विजयश्री संपादन केली. परंतु शाक्तातील उग्रपंथीयाना तें सहन न होऊन त्यानी शंकराचार्यांवर विषप्रयोग केला. त्यामुळे त्यांच्या प्रकृतीला बराच अपाय झाला. तथापि तेथून ते काश्मीरपर्यंत संचार करीत गेले. काश्मीरला जाताच आपल्या दिग्विजयाची पूर्णता झाली असें पाहून आपला चौथा प्रमुख मठ त्यानी स्थापला. शृंगेरी, द्वारका, पुरी आणि हा काश्मीरचा मठ मिळून चार दिशास अद्वैतमतप्रचारार्थ चार धामे स्थापण्याचें त्यांचें महत्कार्य असें तडीस गेलें. श्रीशंकराचार्य त्या वेळेस भर तारुण्यात होते हें प्रसिद्धच आहे. तथापि एक तर वर उल्लेखिल्याप्रमाणे खचत चाललेली त्याची प्रकृति, दुसरे की, महाभाष्यादि ग्रंथ लिहून आणि वर दिलेली चार धामें स्थापून आपले अवतारकार्य आपण संपूर्ण केलें आहे असें वाटणारे समाधान आणि तिसरे म्हणजे बालवयापासूनच त्यांच्या अंगी 'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् । गृहाद्वा वनाद्वा ।' या त्यांच्या सूत्राप्रमाणे बाणलेली उपजत वैराग्यवृत्ति, या तिन्ही कारणानुळे ज्या आपल्या जीवनाची अशी संपूर्ण कृतकृत्यता झाली आहे तें ऐहिक जीवन संपवून परब्रह्मी आता विलीन व्हावे अशी आतुरता त्यांना वाटू लागली. ह्यास्तव त्यांनी स्वतः महान् योग्याच्या पूर्व परंपरेनुसार गुहाप्रवेश करण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणे गुहेत जाऊन आपण योगासन घालून बसले आणि त्यांच्याच आज्ञेप्रमाणे त्यांच्याच शिष्यांनी एका भल्या मोठ्या शिळेने गुहेचें ते द्वार बंद करून टाकलें. याप्रमाणे योगमार्गे जगद्गुरु शंकराचार्यांनी मोठ्या समाधानाने प्राणविसर्जन केलें.

आपण होऊन न जाणारा जीव बळाने देण्याची क्रिया ही, ज्याला आपण दंडनीय आत्महत्या म्हणतो तीत आणि अशा यौगिक प्राणविसर्जनात, आत्मविसर्जनात जरी अेक सामान्य घटक असला तरीही जगद्गुरु शंकराचार्यांचा हा गुहाप्रवेश अितिहासात 'आत्महत्या' म्हणून अुल्लेखिला न जाता 'आत्मार्पण' ह्या गौरवार्ह नांवाने यथार्थपणेच अुल्लेखिला जात आला आहे.

अशीं योगेश्वरांच्या गुहाप्रवेशाचीं अनेक अुदाहरणें आपल्या प्राचीन अितिहासात सापडतात. आता सापेक्षतः अगदी अर्वाचीन अितिहासातील अशा कृतकृत्यतेच्या समाधानानेच आपण होअून स्वदेह विसर्जन केल्याचीं आत्मसमर्पणाचीं काही अुदाहरणे अुल्लेखू.

गौरांगप्रभु अशा प्रेमदर्शक नांवाने बंगालमधील ज्या वैष्णवाचार्यांची, महाप्रभु चैतन्यांची, कीर्ति भारतभर पसरली आहे त्यांच्या निधनाविषयी अशीच अेक कथा सांगितली जाते. श्रीकृष्णाच्या भक्तिसंप्रदायाचा प्रचार करीत करीत हे श्रीचैतन्यप्रभु सामुदायिक भजनात रंगून मोठमोठ्या नगरयात्रा काढीत तेव्हा त्या भक्तिरसाच्या आनंदात वाहत जाअून त्या त्या नगरात सहस्रावधि स्त्रीपुरुष त्यांच्यामागे नामाचा गजर करीत चालू लागत आणि भक्तीच्या भावोन्मादात मार्गामार्गातून नाचत नाचत चैतन्यप्रभु पुढे पुढे चालत आयुष्याच्या अुत्तरार्धापर्यंत साऱ्या बंगालभर भक्तिसंप्रदायाचाच असा अुत्कट प्रचार करीत करीत ते शेवटी जगन्नाथपुरीला गेले. तेव्हा अेकदा तेथील सागराच्या तटावर ते सामुदायिक भजनयात्रेत चालले असता त्या सागराच्या सुनील जलाशयास पाहताच भावावेशात येअून घनश्यामल श्रीकृष्णाचेंच हे स्वरूप आहे, तो श्रीकृष्णच दिसत आहे असा अुत्कट भास त्यांना झाला, आणि त्या स्वरूपास प्रत्यक्ष आलिंगन देण्याकरिता 'हे कृष्ण! हे श्याम!! हे श्याम!!!' असा टाहो फोडीत देहभान सुटून त्यांनी अकस्मात् त्या अफाट सागरातच अुडी घेतली. ते आत्मविसर्जन करते झाले. परंतु या देहत्यागास चैतन्याने आत्महत्या केली असे न म्हणता चैतन्यप्रभूने जलसमाधि घेतली, आत्मार्पण केलें असेच अितिहास म्हणत आला आहे.

आपल्या महाराष्ट्रात श्रीज्ञानेश्वर महाराजांची कथा तर प्रसिद्धच आहे. ह्या अलौकिक विभूतीने अगदी तरुण वयातच ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यासारखे तत्त्वज्ञानाच्या मंदिराचे सुवर्णकलश शोभावे असे दोन ग्रंथ लिहिले. आपले जें अवतारकार्य होते ते आता संपलें आहे, ह्यापुढे जग त्याप्रमाणे चालो किंवा न चालो, त्याचे अुत्तरदायित्व आपणावर राहिलेले नाही अशा कृतकृत्यतेच्या जाणिवेने वयाच्या अवघ्या तिशी पंचतिशीच्या आतच त्यांनी अंतिम समाधि घेण्याचा निश्चय केला. जे जे योगिजन समाधिस्थ होअू शकतात त्यांची ती समाधिस्थ स्थिति अंतिम असते असें नाही. समाधि घेतलेला योगी ती समाधि स्वेच्छेने अुतरवूही शकतो. पुन्हा व्यावहारिक, सांसारिक, जागतिक, जागृतीत, अिच्छा असल्यास तो येअू शकतो. पण

ऐकनाथ-तुकाराम महाराजांच्या निधनाच्या कथा अशाच प्रकारच्या आहेत. ऐकनाथमहाराजांनी अनेक अुत्कृष्ट ग्रंथ लिहिल्यानंतर आणि हरिभक्तीचा अुदंड प्रचार केल्यानंतर वयोमानानुसार त्यांची प्रकृति अत्यंत क्षीण झाली. आपल्या हातून जें व्हायचें तें देवकार्य पूर्ण झालें आहे, आता यापुढे समाजाची कोणती अधिक सेवा घडावी अशी देवाचीच अिच्छा नाही, हें आपली प्रकृति क्षीण झाली अधिक कार्य करण्यास दुर्बल झाली आहे ह्यावरूनच दिसते असें ऐकनाथ महाराजांस वाटू लागलें. ऐकदा तर त्यांचा व्याधिग्रस्त देह अितका आसन्नमरण झाला की, त्यात चेतना म्हणून अुरलीच नाही. पण थोड्या समयानंतर तो निश्चेतन झालेला देह पुन्हा सचेतन झाला. आपलें पारमार्थिक कार्य शक्य तितकें पूर्ण झाल्यानंतर असा स्वतःला नि समाजाला भारभूत झालेला देह आपण होअून अीश्वरार्पण करणें हेंच आता आपलें अंतिम कर्तव्य आहे. अशा जाणिवेने आणि मोठ्या सुप्रसन्नसमाधानाने ऐकनाथ महाराजांनी, स्नानसंध्या करावयास ते पैठणला ज्या गंगेवर जात त्याच गंगेत शिरून जलसमाधि घेतली.

तें त्यांचें जलसमाधीचें कृत्य आत्महत्येसारखें निंद्य न मानलें जाता समाजामध्ये अितकें वंद्य मानलें गेले की, त्यांच्या जलसमाधीच्या स्थानाला पवित्र तीर्थस्वरूप प्राप्त झाले.

ऐकनाथ महाराजांच्या ह्याच समाधिस्थानाचें दर्शन घेण्याकरिता पुढे स्व. श्रीतुकाराम महाराज ऐकदा पैठणला गेले होते. श्रीऐकनाथांची ती आत्मविसर्जनाची कथा तुकाराम महाराजानाही अवगत होती. पुढे जेव्हा तुकाराम महाराजाना आपलें भक्तिसम्प्रदायाचें प्रचार करण्याचें महत्कार्य पूर्ण झाल्याची जाणीव होअून मध्यम वयातच परमेश्वराच्या प्रत्यक्ष भेटीची अुत्कट आतुरता अुत्पन्न झाली, तेव्हा त्यानींहि ऐहिक जीवनाचा त्याग करण्याचें मनात आणून सगळ्यांचा मोठ्या समाधानाने शेवटचा निरोप घेण्यासाठी देहू गावात घरोघर भेट देअून 'आम्ही जातो आमुच्या गावा। आमुचा रामराम घ्यावा॥ आता कैचें येणें जाणें। सहज खुंटलें बोलणें॥' हा सुप्रसिद्ध अभंग गात गात ते अिंद्रायणी नदीवर गेले. भजनानंदात तल्लीन होता होता भगवंताचें विमानच आपल्याला नेण्याकरिता अिंद्रायणीच्या पल्याड आलें आहे असें त्याना भासू लागलें परमोल्हासाने त्यांनी अिंद्रायणीत प्रवेश केला. ऐक कथा सांगते की, त्या नदीतच ऐकनाथाप्रमाणे त्यांनी जलसमाधि घेतली. दुसऱ्या कथेप्रमाणे त्या विमानात बसून ते सदेह स्वर्गास गेले.

तथापि दोन्ही कथांचा आशय ऐकच की, तुकाराम महाराजांनी अत्यंत सुखासमाधानाने आपलें ऐहिक जीवन कृतकृत्य झालें असें समजून ऐहिक जगाचा निरोप घेतला. ऐहिक जीवनाचा त्याग केला. आणि ते परमात्मस्वरूपी विलीन झाले म्हणूनच त्यांच्या ह्या ऐहिक अस्तित्वाच्या त्यागाला 'आत्महत्या' न म्हणता 'आत्मार्पण' म्हणून गौरविलें आहे.

वर तशा शतावधि अुदाहरणांपैकी जीं काही अुदाहरणे दिलीं आहेत, त्या सर्वांवरून जो निष्कर्ष निघतो तो असा की, जो जीव आपण होअून जात नाही, तो हेतुपूर्वक बळाने देण्याच्या सर्व कृत्यांना 'आत्महत्या' म्हणत नाहीत. तसें कृत्य निद्य मानले जातें असें नाही. तर अत्यंत असमाधानाने, विफलतेच्या तीव्र जाणिवेने, संकटांना टाळून, अिच्छा असतानाही सुखाने जगता येत नाही म्हणून, अत्यंत अतृप्त अशा मन:स्थितीत, वैतागाच्या भरात जे बळाने जीव देतात त्याच्या त्या कृत्याला साधारणत: 'आत्महत्या' म्हटलें जातें. परंतु आपलें जीवितकार्य, जीवनाचें ध्येय, जीवनाचा हेतु, संपूर्णपणे सफल झालेला आहे अशा सफलतेच्या, कृतकृत्यतेच्या, भावनेने जे आपल्या अैहिक अस्तित्वाची हर्षभराने समाप्ति करतात त्याच्या त्या कृत्यास 'आत्मार्पण' असें म्हणतात. यद्यपि ह्या परिवर्तनशील किंवा अखंड विकरानशील जगात सर्वतोपरी परिपूर्णता अशी केव्हाही असू शकणार नाही.

जें जीवनात संपादावयाचे होतें तें सर्व संपादिलेलें आहे म्हणून आता कर्तव्य असें काही अुरलेलें नाही अशा कृतकृत्य भावनेने रिक्तकाम किंवा पूर्णकाम झालेले धन्य पुरुष आपण होअून आपले प्राण विसर्जन करतात. ते आपलें नश्वर जीवन विश्वाच्या चिरंतन जीवनात विलीन करून टाकतात. योगवासिष्ठात म्हटल्याप्रमाणे

अंतः रीक्तो बहि रिक्तो रिक्त कुम्भरिवाम्बरे ।
अंत पूर्णो बहि:पूर्णो पूर्णकुम्भरिवार्णवे ॥

तथापि आपल्या या जीवनकार्याची सापेक्षत: परिपूर्णता झाली आहे अशी आत्मसंतुष्टता वाटल्यानंतर समाजाला किंवा स्वत:ला जो देह वार्धक्याने म्हणा, व्याधीने म्हणा पण केवळ भारभूत असाच राहणार आहे त्या देहाचा गुहाप्रवेशाने, प्रायोपवेशनाने, अग्निदिव्याने, समुद्रसमाधि किंवा जलसमाधि किंवा अंतिम योगसमाधि घेअून किंवा अशाच कोणत्या तरी मार्गाने जे त्याग करतात ते त्याचे कृत्य वृत्तान अर्थी 'बळाने जीव देणें'च असताही त्याला 'आत्मसमर्पण' म्हणून जें गौरविले जातें ते यथार्थच असते !

धन्योऽहं धन्योऽहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ।
धन्योऽहं धन्योऽहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ॥





अशी कालावधीची समाधि न घेता ज्ञानेश्वरांनी 'यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।' अशा अंतिम समाधीला घेण्याचें ठरविलें. त्यांचे गुरुच असलेले त्यांचे ज्येष्ठ बंधु जे निवृत्तिनाथ त्यांनी स्वतः त्या ज्ञानेश्वरांच्या निर्धारास अनुमति दिली. अनेक संत मंडळींच्या समक्ष, भजनाच्या गजरात, स्वतःच बांधविलेल्या समाधिस्थानामध्ये कृतकृत्यतेच्या परम समाधानात श्रीज्ञानेश्वर महाराज उतरले आणि योगासन घालून बसले. स्वतः निवृत्तिनाथांनी त्या समाधिस्थानावर शेवटचा चिरा स्वहस्ते बसविला. अशा प्रकारे ज्ञानेश्वरांनी अंतिम समाधि घेतली.

जो जीव बाह्य निमित्ताने जात नाही तो आपला जीव आपण होऊन बळाने देणें हें कृत्य व्यवहारात ज्याला 'आत्महत्या' म्हणतात तोच आणि ह्या जिवंतपणी आपण होऊन अंतिम समाधी घेण्यात उभयसामान्य असताही त्याला ज्ञानेश्वरांनी 'आत्महत्या' केली असें न म्हणता श्रीज्ञानेश्वरांनी 'आत्मार्पण' केलें, श्रीज्ञानेश्वर समाधिस्थ झाले असेंच संतमहंतांपासून तों सामान्य जनतेपर्यंत सर्वांमुखी म्हटलें जात आहे.

तीच गोष्ट समर्थ रामदासांच्या आत्मार्पणाची आहे. 'प्रस्तुत यवनांचें बंड । हिंदु उरला नाही थंड । बहुता दिवसाचें मुंड । शासन मिळे तयासी ।।' अशा परिस्थितीने व्याकूळ होऊन त्या यवनाच्या बंडाचा समूळ नि:पात करण्याच्या कार्यासच श्रीसमर्थांनी आपलें जीवनकार्य मानलें. महाराष्ट्रातील हिंदु समाजाच्या धर्मयुद्धाची आग पेटवून देण्यासाठी आपल्या तपोबळाने त्यांनी प्रचंड संघटना उभारली. त्याला जोडूनच तिकडे त्याच महान् ध्येयाने प्रेरित होऊन श्रीशिवछत्रपतींनी आपल्या शस्त्रबळाने मुसलमानांच्या शहांचीं नि पातशहांचीं तक्तें गदगदा हलवीत जेव्हा प्रत्यक्ष औरंगजेबाच्या छातीवरच रायगडचें स्वतंत्र हिंदुराज्य, हिंदुध्वज नि हिंदु सिंहासन उभारलें तेव्हा हिंदुजातीच्या त्या महान् विजयाने प्रफुल्लित होऊन समर्थ गर्जते झाले

> स्वप्नी जें देखिलें रात्रौ तें तें तैसेंहि होतसे ।
> बुडाला औरंग्या पापी म्लेंछ संहार जाहला ।
> मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें, हिंदुस्थान बळावलें ।।

आपल्या प्रतिज्ञेची अशी कल्पनातीत पूर्तता झाली अशा कृतकृत्यतेच्या भावनेने आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी समर्थ रामदासाना आपले अवतारकार्य संपलें असे वाटू लागले. इतक्यात शिवछत्रपतींचा अंतकाल झाल्याची दुष्ट वार्ता समर्थांना कळली. 'राजे आम्हांला सोडून गेले' असे शोकाकुल उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडले. लगोलग संभाजी महाराजांनी उच्छृंखलपणाने शिवछत्रपतींना अनुकूल असलेल्या अनेक प्रमुख व्यक्तींना वदीत घातलें, कित्येकाना ठार मारलें. स्वराज्यात भाऊबंदकीचा वणवा पेटला. स्वतः संभाजी सज्जनगडाच्या पायथ्याशी येऊन समर्थांना भेटण्यासाठी आग्रह धरुन बसला. शिवछत्रपतींच्या अनेक विश्वासपात्र

मंत्र्यांचा ज्याने घातपात केला तो शिवछत्रपतींचे राजगुरुच असलेल्या समर्थांनाही काही अुपद्रव देण्यास सोडणार नाही हें अुघड दिसत असल्याने समर्थांनी कळविलें की, वयोमानाने आता गडाखाली अुतरण्याची शक्ति आमच्यात राहिली नाही. वास्तव आशीर्वादाचें अेक पत्र तेवढें धाडीत आहे. तेंच तें खणखणीत, सणसणीत सुप्रसिद्ध पत्र होय की, ज्यात समर्थांनी लिहिलें होतें —

"शिवरायाचें आठवावें रूप । शिवरायाचा आठवावा प्रताप ।
शिवरायाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥
जीवित तृणवत मानावें । कष्टें करून घसरावे । म्लेंछावरी ॥
आहे तितुकें जतन करावें । पुढे आणिक मेळवावें ॥
महाराष्ट्र राज्यचि करावें । जिकडे तिकडे ॥

त्याच वेळी हिंदूंचें स्वतंत्र राज्य स्थापन झाल्याचें अेकून चवताळलेला औरंगजेब साऱ्या मुसल्मानी शक्ति अेकवटून स्वतः मराठ्यांवर चढून येत आहे अशी वातमी आली. असा या नवीन संकटाला तोंड देण्याची ज्या अर्थी आपल्या ८० वर्षांवर गेलेल्या वयोमानाला नि व्याधिग्रस्त शरीरात शक्ति नाही, महाराजासुद्धा आपली पिढीची पिढी निघून गेली, त्या अर्थी आपले कर्तव्य संपलें, 'अुपाधीचें काम अैसे । काहीं साधे काही नासे ॥' या न्यायाने स्वतंत्र हिंदुराज्य स्थापनेचें जें महान् कार्य पार पडले तीच आपल्या जीवनाची कृतकृत्यता ठरावी अशी भगवताची अिच्छा दिसते! आता नवीन पिढीचे प्रश्न, नवीन पिढीच्या कर्तृत्वावर नि भगवंतांच्या कृपेवर अवलंबून! असा विचार करून समर्थांनी प्रायोपवेशन करण्याचा निश्चय केला. आपल्या सर्व शिष्यशिष्पिणींना अेकत्र करून सांगितले की, 'आम्ही आता देह ठेवणार. आमचें अवतारकृत्य संपलें. देहाचें सार्थक झालें. ते अैकताच शोकाकुल झालेल्या आपल्या भक्तांना त्यानी धीर दिला. 'जरी माझी वाणी । गेली म्हणाल अंतःकरणी। तरी मी असें जगजीवनी ।निरंतर ॥' आणि मार्गदर्शनाविषयी विचाराल तर 'हा माझा दासबोध मी मागे ठेवतोच आहे!' असे आश्वासून अचल आसन मांडून, अन्नत्याग करून, रामनामाच्या गजरात समर्थांनी आरंभ केला. अशी कथा आहे की, त्या अखंड नामजपाच्या शेवटी प्रत्यक्ष श्रीरामानी समर्थांना दर्शन दिले, तेव्हा अत्यंत कृतकृत्य भावनेने श्रीरामाच्याच चरणी समर्थांनी अन्नत्यागाने क्षीणतम झालेला आपला शेवटचा निश्वास सोडला.

आपल्या जीवनाची संपूर्ण सफलता झाल्यानंतरही जो जीव समाजाला आणि स्वतःलाही केवळ भारभूत होअून रेंगाळत राहतो त्याची आपण होअून अितीश्री करणें ही क्रिया अशा 'आत्मार्पणा'त आणि 'आत्महत्ये'त जरी समावेश असली तरी समर्थ रामदासांनी आत्महत्या केली असें कोणी म्हणत नाही, मानीत नाही; तर समर्थांनी प्रायोपवेशन केलें, आत्मसमर्पण केलें असेच अितिहास म्हणत आला आहे.

अेकनाथ-तुकाराम महाराजांच्या निधनाच्या कथा अशाच प्रकारच्या आहेत. अेकनाथमहाराजांनी अनेक सुत्कृष्ट ग्रंथ लिहिल्यानंतर आणि हरिभक्तीचा अखंड प्रचार केल्यानंतर वयोमानानुसार त्यांची प्रकृति अत्यंत क्षीण झाली. आपल्या हातून जें व्हायचें तें देवकार्य पूर्ण झालें आहे, आता यापुढे समाजाची कोणती अधिक सेवा घडावी अशी देवाचीच अिच्छा नाही, हें आपली प्रकृति क्षीण झाली अधिक कार्य करण्यास दुर्बल झाली आहे ह्यावरूनच दिसते असें अेकनाथ महाराजांस वाटू लागलें. अेकदा तर त्यांचा व्याधिग्रस्त देह अितका आसन्नमरण झाला की, त्यात चेतना म्हणून अुरलीच नाही. पण थोड्या समयानंतर तो निश्चेतन झालेला देह पुन्हा सचेतन झाला. आपलें पारमार्थिक कार्य शक्य तितकें पूर्ण झाल्यानंतर असा स्वतःला नि समाजाला भारभूत झालेला देह आपण होअून अीश्वरार्पण करणें हेंच आता आपलें अंतिम वर्तव्य आहे. अशा जाणिवेने आणि मोठ्या सुखासमाधानाने अेकनाथ महाराजांनी, स्नानसंध्या करावयास ते पैठणला ज्या गंगेवर जात त्याच गंगेत शिरून जलसमाधि घेतली.

तें त्यांचें जलसमाधीचें कृत्य आत्महत्येसारखें निंद्य न मानलें जाता समाजामध्ये अितकें वंद्य मानलें गेलें की, त्यांच्या जलसमाधीच्या स्थानाला पवित्र तीर्थाचें स्वरूप प्राप्त झालें.

अेकनाथ महाराजांच्या ह्याच समाधिस्थानाचें दर्शन घेण्याकरिता पुढे स्वतः श्रीतुकाराम महाराज अेकदा पैठणला गेले होते. श्रीअेकनाथांची ती आत्मविसर्जनाची कथा तुकाराम महाराजांनाही अवगत होती. पुढे जेव्हा तुकाराम महाराजांना आपलें भक्तिसंप्रदायाचें प्रचार करण्याचें महत्कार्य पूर्ण झाल्याची जाणीव होअून मध्यम वयातच परमेश्वराच्या प्रत्यक्ष भेटीची अुत्कट आतुरता अुत्पन्न झाली, तेव्हा त्यांनीही अैहिक जीवनाचा त्याग करण्याचें मनात आणून सगळ्यांचा मोठ्या समाधानाने शेवटचा निरोप घेण्यासाठी देहू गावात घरोघर भेट देअून 'आम्हीं जातो आमुच्या गावा। आमुचा रामराम घ्यावा॥ आता कैंचें येणें जाणें। सहज सुटलें बोलणें॥' हा सुप्रसिद्ध अभंग गात गात ते अिंद्रायणी नदीवर गेले. भजनानंदात तल्लीन होता होता भगवंताचें विमानच आपल्याला नेण्याकरिता अिंद्रायणीच्या पल्याड आलें आहे असें त्यांना भासू लागलें. परमोल्हासाने त्यांनी अिंद्रायणीत प्रवेश केला. अेक कथा सांगते की, त्या नदीतच अेकनाथाप्रमाणे त्यांनी जलसमाधि घेतली. दुसऱ्या कथेप्रमाणे त्या विमानात बसून ते सदेह स्वर्गास गेले.

तथापि दोन्ही कथांचा आशय अेकच की, तुकाराम महाराजांनी अत्यंत सुखासमाधानाने आपलें अैहिक जीवन कृतकृत्य झालें असें समजून अैहिक जगाचा निरोप घेतला. अैहिक जीवनाचा त्याग केला. आणि ते परमात्मस्वरूपी विलीन झाले म्हणूनच त्यांच्या ह्या अैहिक अस्तित्वाच्या त्यागाला 'आत्महत्या' न म्हणता 'आत्मार्पण' म्हणून गौरविलें आहे.

वर तशा शतावधि अुदाहरणांपैकी जीं काही अुदाहरणें दिलीं आहेत; त्या सर्वांवरून जो निष्कर्ष निघतो तो असा की, जो जीव आपण होअून जात नाही, तो हेतुपूर्वक वळाने देण्याच्या सर्व कृत्यांना 'आत्महत्या' म्हणत नाहीत. तसें कृत्य निंद्यच मानलें जातें असें नाही. तर अत्यंत असमाधानाने, विफलतेच्या तीव्र जाणिवेने, संकटांना टाळून, अिच्छा असतानाही सुखाने जगता येत नाही म्हणून, अत्यंत अतृप्त अशा मन:स्थितीत, वैतागाच्या भरात जे वळाने जीव देतात त्यांच्या त्या कृत्याला साधारणत: 'आत्महत्या' म्हटले जातें. परंतु आपलें जीवितकार्य, जीवनाचें ध्येय, जीवनाचा हेतु, संपूर्णपणे सफल झालेला आहे अशा सफलतेच्या, कृतकृत्यतेच्या, भावनेने जे आपल्या अैहिक अस्तित्वाची हर्षभराने समाप्ति करतात त्यांच्या त्या कृत्यास 'आत्मार्पण' असें म्हणतात. यद्यपि ह्या परिवर्तनशील किंवा अखंड विकसनशील जगात सर्वतोपरी परिपूर्णता अशी केव्हाही अमू शकणार नाही.

जें जीवनात संपादावयाचें होतें ते सर्व संपादिलेले आहे म्हणून आता कर्तव्य असें काही अुरलेले नाही अशा कृतकृत्य भावनेने रिक्तकाम किंवा पूर्णकाम झालेले धन्य पुरुष आपण होअून आपले प्राण विसर्जन करतात. ते आपलें नश्वर जीवन विश्वाच्या चिरंतन जीवनात विलीन करून टाकतात. योगवासिष्ठात म्हटल्याप्रमाणे

> अंता रीक्तो बही रिक्तो रिक्त कुम्भरिवाम्बरे ।
> अंत:पूर्णो बहि:पूर्णो पूर्णकुम्भरिवार्णवे ॥

तथापि आपल्या या जीवनकार्याची सापेक्षत: परिपूर्णता झाली आहे अशी आत्मसंतुष्टता वाटल्यानंतर समाजाला किंवा स्वत:ला जो देह वार्धक्याने म्हणा, व्याधीने म्हणा पण केवळ भारभूत असाच राहणार आहे त्या देहाचा गुहाप्रवेशाने, प्रायोपवेशनाने, अग्निदिव्याने, समुद्रसमाधि किंवा जलसमाधि किंवा अंतिम योगसमाधि घेअून किंवा अशाच कोणत्या तरी मार्गाने जे त्याग करतात ते त्याचें कृत्य सुतान अर्थी 'वळाने जीव देणें' च असताही त्याला 'आत्मसमर्पण' म्हणून जें गौरविलें जातें तें यथार्थच असते !

> धन्योऽहं धन्योऽहं कर्तव्य मे न विद्यते किंचित् ।
> धन्योऽह धन्योऽह प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम ॥

